॥ श्रीसिद्धिविनायक प्रसन्न ॥



-हस्तरेषा संजीवनी-

प्रयुक्त

# सामुद्रिकतिलक

अथवा

# सामुद्रिक शिक्षक


लेखक व प्रकाशक:—

ज्योतिपरत्न, ज्योतिर्भूषण, ज्योतिषसुधाकर,

**पंडित रघुनाथशास्त्री मोरेश्वर पटवर्धन**

ज्योतिर्भूषण कचेरी, शिंदिआळी, १४० शुक्रवार पेठ. पुणें.



१९४०

मुद्रक—प्र. भा. काळे, प्रतिभा मुद्रणालय, ३३५ शनवार पेठ पुणें.

## ज्योतिषरत्न पंडित रघुनाथशास्त्री



चालक - सामुद्रिक-शिक्षणक्रम

आणि

ज्योतिष-शिक्षणक्रम, पुणें.

# प्रास्ताविक चारच शब्द !

**कोणतेंही कार्य यशस्वी रीतीनें आणि अगदीं बिनचूक पार पडावयाचें, असा ईश्वरी संकेत** असला म्हणजे तें कार्य कितीही " **वज्रादपि कठोराणि** " असें असलें तरी " **मृदूनि कुसुमादपि** " असें अगदीं सहजसुलभ व सहज साध्य भासतें व प्रत्यक्ष घडून येतें. हा सर्व परमेश्वरी कृपेचा प्रभाव आहे अशी आमची पूर्ण निष्ठा व दृढ श्रद्धा आहे. कारण त्याचा अनुभव आम्ही प्रत्यक्ष आणि परोक्ष असा सतत घेत आहोंत.

" असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास, तुका म्हणे " असें जरी श्री तुकाराम महाराजांचें अनुभविक तत्त्वज्ञान जनतेला सांगण्यांत येत असलें, तरी त्याचा अर्थ किंवा गूढार्थ हाच आहे कीं, इष्टसाध्य होण्यासाठीं अनन्य भावानें ईश्वर-चिंतनाचा अभ्यास जो करील त्याचे हेतु व उद्दिष्ट परमेश्वर पूर्ण करील. कारण प्रत्यक्ष परमेश्वरानेंच सांगितलें आहे कीं,

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥**

सन १९३८ जुलै २० तारखेला सामुद्रिक शिक्षणक्रम सुरू करण्यांत आला. दरमहा एक भाग याप्रमाणें २१ महिने बिनचूक चालवून तो ता. २० मार्च १९४० ह्या दिवशीं २१ विभागांची सेवात्मक दूर्वांकुराची जुडी अनन्य भावानें श्रीऋद्धि-सिद्धिसहित सकल अभीष्ट कामनांचा जो सिद्धिदाता श्रीसिद्धिविनायक देव त्यास अर्पण करून ज्ञानप्रसाराचें कार्य व सामुद्रिकशिक्षण रूपानें तयार केलेला हा ग्रंथ पूर्ण करण्यांत आला. अनेकांच्या अनेक हातांतून जाणारें हें कार्य अगदीं निर्विघ्नपणें तसेंच बिनचूक पार पडलें. पूर्ण झालें व कल्पनेबाहेर समाधानकारक व यशस्वी झालें. कै. लो० टिळक यांच्या दोन्ही हातांचे फोटो ह्या ग्रंथांत असल्यानें हा योगही अपूर्वच जमला. ह्या सर्व गोष्टी परमेश्वरीकृपेशिवाय कशा झाल्या असत्या ? सारांश, याच्या मुळाशीं परमेश्वरी कृपेचें सहाय्यक सामर्थ्य आहे यांत शंकाच नाहीं.

ह्या ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याचें कारणच नाहीं अशी याची रचना केलेली आहे. ही गोष्ट ग्रंथाच्या वांचनानें अभ्यासूस सहज कळेल.

जगांत सर्वांशीं निर्दोष व पूर्ण अशी गोष्ट, स्वयंपूर्ण व सर्वज्ञ परमेश्वराखेरीज दुसरी कोणतीच नाहीं. मनुष्यनिर्मित कोणतीही गोष्ट थोडी तरी सदोष असावयाचीच. म्हणून सुज्ञांस विनंति आहे कीं, ह्या ग्रंथांत त्यांना जे दोष आढळतील ते त्यांनीं कृपा करून आम्हांस कळवावे आणि हंसक्षीर न्यायानें यांतील गुणग्रहण करून दोष टाकून द्यावे.

ह्या ग्रंथाच्या पृष्ठसंख्येबाबतची सुरुवातीची कल्पना आणि ग्रंथसमाप्तीच्या वेळचा प्रत्यक्ष अनुभव यांत दीडपटीपेक्षांहि जास्त वाढ झाली! शिवाय सुमारें १०० हातांच्या आकृति, दुहेरी अनुक्रमणिका यांमुळेंही पृष्ठसंख्या वाढली आणि त्यांतच महायुद्धाचा जोराचा धडाका, कागदाची भयंकर महागाई!! पण ह्या सर्व आधिभौतिक व्यवहारप्रपंचांतून पार पडून अध्यात्मिक व दैवी शक्तीच्या सहाय्यानें सर्व कार्य यथासांग पार पडलें. "**ग्रहाणां दैवयोगेन मनुष्याणां शुभाशुभम्। पूर्वार्जितेन पुण्येन लभते नात्रसंशयः**" असें जे म्हटलें आहे तें यथार्थच आहे. वैदिकपद्धतीप्रमाणें अध्ययनाध्यापनाचे प्रारंभीं "**हरिः ॐम्**" आणि समाप्तीचेवेळीं "**श्रीकृष्णार्पणमस्तु**" असें म्हणण्याचा परिपाठ आहे. त्याला अनुसरून आम्ही आज अत्यंत नम्रभावानें म्हणतो कीं, **श्रीकृष्णार्पणमस्तु.**

ह्या ग्रंथाचे कामीं ज्या ज्या ग्रंथकारांच्या ग्रंथांचा उपयोग झाला, त्या सर्वांचे आणि आमचे सन्मान्य मित्र श्री. रा. रा. रा. वि. पटवर्धन, बी. ए. एल्. एल्. बी. यांनीं जें वेळोवेळीं साह्य केलें, त्याबद्दल त्यांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानून हे चार शब्द पुरे करतों.

फाल्गुन शु. ४
शके १८६१

रघुनाथशास्त्री पटवर्धन.

# हस्तसंजीवनीयुक्त

# सामुद्रिकतिलक अथवा सामुद्रिकशिक्षक.

## विषयानुक्रमणिका.

# ( अकारविल्हे ) वर्णानुक्रमें अनुक्रमणिका.

| विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|

# हातांच्या सर्व आकृतींचा खुलासा.

( १ ) लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्या दोन्ही हस्तरेषांचे फोटो ( २ ) विविध रेषांकित हात. ( ३ ) एक महत्त्वाचा हात. ( ४ ) पौर्वात्य पद्धतीचा चिन्हांकित हात. ( ५ ) पाश्चिमात्य पद्धतीचा रेषांकित हात.

हाताच्या आकृति क्रमांक १ ते १६ विविध प्रकारचे हात.

आकृति क्रमांक १७ व १८ मुख्य व महत्वाच्या रेषा.

आकृति क्रमांक १९ ते ३२ ह्या आकृतिपैकीं प्रत्येक आकृति व त्या आकृतींतील रेषा, विद्वत्ता, नैसर्गिक बुद्धिमत्ता आणि सांपत्तिक स्थिती ह्या तिन्ही दृष्टीनें आरंभापासून अखेरपर्यंत क्रमशः उच्च स्थिति दर्शविणाऱ्या आहेत.

आकृति क्रमांक ३३।३४ विकास रेषा—वर्तुलरेषा.

आकृति क्रमांक ३५।३५अ. दीर्घ चतुष्कोण व तिरप्या रेषांची आद्यंत स्थानें.

आकृति क्रमांक ३६।३७ कालनिर्णायक स्थानें.

आकृति क्रमांक ३८।३९ सार्ध वर्तुल किंवा कंसाकार रेषा.

आकृति क्रमांक ४०।४१ मुख्य रेषांवरून कालनिर्णय.

आकृति क्रमांक ४२।४३ बहुरेषा आणि ग्रहसीमांचा आद्यंत.

आकृति क्रमांक ४४ विविध रेषा व विविध गोष्टींचीं स्थानें.

आकृति क्रमांक ४५ हाताचे आद्यमध्यांत नऊ विभाग.

आकृति क्रमांक ४६ अंकस्थानदर्शकस्थानांतील असंख्य गोष्टी.

आकृति ४६ ( १ ) पोट, कोठा, स्त्रीसौख्य, भागीदार, देवघेव.

( २ ) अधिकार, कर्तबगारी, व सिद्धी, विशेषकार्यें, नौकरचाकर, समाजांत, देशांत पुढारीपणा, लौकिक, मोठ्या संस्थांचें कार्य, स्वातंत्र्यवृत्ति, संग्राम श्रेष्ठत्व, अभिमान, उपजीविका साधन, दर्जा, राजयोग.

( ३ ) मेंदू, विचार, बुद्धी, कर्तबगारी, शरीरस्थिती, निद्रा.

( ४ ) वाहनें, स्थावर, जमीन, बागबगीचे, राहण्याची ठिकाणें, कीर्ति, संस्था, स्वजनशत्रुत्व, आयुष्य अखेरची स्थिती.

( ५ ) मूत्राशय, जननेंद्रिय, वासना, संकटें, आयुष्य, गंडांतरें, समधातुस्थिती, लाभकारण.

( ६ ) भाग्य, ऐश्वर्य, जगणारी संतति, वैभवकाल, दैवसाह्य, चिरस्थायी गोष्टी, पूर्ववैभव, उच्चस्थिति, प्रारब्धयोग, पोटाचा डावा भाग.

( ७ ) द्रव्यप्राप्ति, लाभाचें प्रमाण, धंदा, थोरली भावंडें, मित्रसाह्य, हात, कान, हनुवटी, दाढा, दांत, मान, छाती वगैरेचा डावा भाग.

( ८ ) डावाडोळा, गुप्तशत्रु, अपयश, द्रव्यनाश, हानि, पारमार्थिक गोष्टी, चुलता चुलती, आत्या.

( ९ ) उजवा डोळा, गाल, द्रव्यसाधन, द्रव्यसंचय, आप्तवर्ग, सुवर्ण-रत्नादिकांचा संचय, आवड किंवा प्रवृत्ति.

( १० ) कान, हनुवटी, दाढा, दात, मान, छाती वगैरेचा उजवा भाग, धाकटी भावंडें, पराक्रमाचे स्वरूप, राजकीय मदत, धंदा, प्रवास.

( ११ ) संतति प्राप्ति, विद्यालाभ, बुद्धी, आकस्मिक लाभ, विद्येत यश, मंत्रसिद्धि, गुप्तधन, पुत्र संतति, पोटाचा उजवा भाग, दैवसिद्धि.

( १२ ) शत्रू, रोगपीडा ( मलोत्सर्ग ) शरीरशुद्धिस्थिति, अनिष्ट रोग, अधिकार, दर्जा, आप्त, कुटुंब आणि जबाबदारी.

आकृति क्रमांक ४७ ते ५८ पर्यंतच्या प्रत्येक हातांतीलरेषा सबंध आयुष्यभर मध्यमस्थितींत राहणाऱ्या पण त्यांतल्य त्यांत बऱ्या स्थितींत असलेल्या व्यक्तींच्या निदर्शक आहेत.

आकृति क्रमांक ५९ ते ७० यांपैकीं प्रत्येक हातांतील ( युग्म , रेषांचे वैशिष्टय विशेष प्रकारचें असून सबंध आयुष्यांत उत्कृष्ट सहकारी) सांपत्तिक दृष्टया सर्वतोपरी सहाय्यक, मार्गदर्शक आणि कौटुंबिक दृष्टया हरघडी योग्य मदत करणारे, मदतगार, अशा प्रकारच्या व्यक्तींच्या हातावरील रेषांचे दिग्दर्शक आहे.

आकृति क्रमांक ७१ ते ८८ ह्यापैकीं प्रत्येक हातावरील रेषा ज्यांच्या आयुष्यांत चमत्कारिकपणा, विचित्रपणा आणि ' एक ना धड भाराभर चिंध्या ' अशा लहरी, आतताई आणि सांपत्तिकदृष्टया सबंधजन्म हलाखींत व अपयशांत घालविण्याऱ्यांच्या निदर्शक आहेत.

पृष्ठ ३१ मध्यें अनेक चिन्हांचा नकाशा असून पृष्ठ ३२ मध्यें विविध प्रकारच्या रेषांचें दिग्दर्शन केलें आहे.

लो० बा. गं. टिळक यांच्या उजव्या हाताचें छायाचित्र



## सर्व प्रकारच्या विविधरेषादर्शक हात






# पाश्चिमात्य पद्धतीचें हस्तरेषा दिग्दर्शन



अर्पणपत्रिका

# हिंदुस्थानांतील

पुरुषार्थ, कमालीची सत्यनिष्ठा, अलौकिक विद्वत्ता, स्वातंत्र्यतेज, बल, स्वाभिमान, आणि आत्यंतिक निःस्वार्थबुद्धि इत्यादि सर्व अलौकिक सद्गुण ज्या थोर विभूतीच्या ठिकाणीं असामान्य रीतीनें प्रकट झाले व भारतवर्षाचे कर्तबगार सिंह म्हणून ज्यांचें नांव चोहोंकडे गर्जत होतें व आहे, तसेंच आपल्या लोकोत्तर कर्तबगारीनें

## " लोकमान्य "

ही अनन्यसाधारणपदवी पावले असे जे

## हिंदुस्थानचे अनभिषिक्त भूपति

**कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक,**

यांच्या आत्म्यास

## हा ग्रंथ

ग्रंथकर्त्यानें अत्यादरपूर्वक अर्पण केला आहे.

आकृति १७

मेषरा.
मकर रा.
कर्क रा.
मनः स्थिति
कुंभ रा.
सिंह रा.
वृषभ रा.
तर्क
तूळ रा.
मीन रा.
वस्तु ज्ञान
क. रास.
वृ. रा.
शारिरिक स्थिति
मिथुन रा.
धनु रा.
उत्तर
श. उंच.
र. उंच.
पश्चिम
गु. उंच
बुध. उं.
पूर्व
शुक्र कंकण
इच्छा
अंतःकरण रेषा
चौकोन
मस्तक रेषा
मं. उंच.
तर्क
आयुष्य रेषा
भाग्य रेषा
आरोग्य रेषा
आकाशगंगा
विकार
शुक्राचा उंचवटा
चंद्राचा उंचवटा
दक्षिण
आयुष्य कंकण
मणिबंध रेषा

आकृति १८


शंख
सींप (शुक्ति)
चक्र
चक्र
चक्र
चक्र
पश्चिम
उत्तर
पूर्व
यव
आयुष्य रेखा नं. १
स्त्री
रेखा
विरह रेखा
आ.रे.नं. २
गोत्र रेखा
आयुष्य रेखा
यवमाला


आ-३८
अंत: करण रेषा
मस्तक रेषा
मणि बंध रेषा


आ-३९
बुध
रवि
शनि
गुरु
भौम
चंद्र
शुक्र

आ. ४४


१०
मकर
११
कुंभ
१२
मीन
४
५
सिंह
६
कन्या
७
तुळ
८
वृश्चिक
९
धनु
१
मेष
२
वृषभ
३
मिथुन
शनि कंकण
रवि कं
गुरु कंकण
शुक्राचें कंकण
बुध
अंतःकरण रेषा.
मस्तक रे.
आयुष्य
भौम रे
मंगळ कं.
चंद्र
आयुष्य कंकण.
विकार
तर्क
संयम
इच्छा


आ
अंत्य
विभाग
द्य
मध्य
विभाग
वि
भाग
विभाग
आद्य
विभाग
विभाग

आ.६५


पूर्व
दक्षिण
उत्तर
पश्चिम
१
२
३
४
५
६
७
८
९
१०
११
१२

आ.६६

आ. ४७



आ. ४८



आ. ४९



आ. ५०



आ. ५१



आ. ५२



आ. ५३



आ. ५४



आ. ६७



आ. ६८



आ. ६९



आ. ७०



आ. ८०



आ. ८१



आ. ८२



आ. ८३



आ. ८४



आ. ८५



आ. ८६



आ. ८७



आ. ८८



ॐ

# चिन्हांचा नकाशा, ( दी मॅप ऑफ दी साईन्स )

| पोर्वात्य चिन्हें | | दोहो कडील चिन्हें सादृश्य | | पाश्चात्य चिन्हें | |
|---|---|---|---|---|---|
| १ बिंदु (स्पॉट) | २ वर्तुल सरकल बिंदुमाळ | ३ कर्तरी - क्रॉस | १ स्पॉट - बिंदू | २ सर्कल - वर्तुल | ३ क्रॉस - कात्री |
| माष उडीद | कंकण | गोपुर रेखा विधा रे. कात्री | स्पॉट ० बिंदू | सर्कल - वर्तुल | क्रॉस - कात्री |
| ४ तारा - स्टार | ५ चतुरस्त्र - स्क्वेअर | ६ त्रिकोण - ट्रॅंगल | ४ स्टार - तारा | ५ स्क्वेअर - चौकोन | ६ ट्रॅंगल - त्रिकोण |
| ७ यव - आयर्लंड | ८ लता - ब्रँच | १४ रज्जु रेखा | ७ आयर्लंड - यव | ८ ब्रँच - लता | १४ चेन्स रज्जुरेखा |
| १५ तंतूरेषा हेअर लाइन्स | ९ त्रिशूल - ट्रायडेंट | १० चंद्र - मून | १५ हेअर लाईन्स तंतू रेषा | ९ ट्रायडेंट - त्रिशूल | १० क्रेसेन्ट आणि मून चंद्रकोर. |
| ११ रविरेषा - दि सन | १२ पाश: - ग्रील | १३ काकपद - ऍंगल | ११ दि सन् - रवि रे. | १२ ग्रील - पाश: | १३ ऍंगल काकपद |














सदरहू नकाशावरून वर्णाशिवाय रेषांच्या निरनिराळ्या प्रकारच्या ठेवणींची नीट कल्पना येण्यास मदत होईल.

| | |
|---|---|
| सरळ व बारिक रेषा<br>नीट लाइन्स | पातळ व रुंद रेषा<br>थिन् ॲन्ड ब्रॉड लाइन्स |
| स्पाटस ॲन्ड दि लाईन<br>बिंदुयुक्त रेषा. | रेखा युग्म<br>सिस्टर लाईन्स |
| फोर्क्ड टर्मिनेशन्स<br>संकट रेषा | टॅसल टर्मिनेशन्स पल्लवित रेषा. |
| शाखान्वित रेषा<br>असेंडींग व डिसेंडींग ब्रांचेस | चेन्ड लाईन्स, सच्छिद्र रेषा |
| वेव्ही लाईन्स<br>विक्षिप्त रेषा | भग्नरेषा<br>ब्रोकन लाईन्स |
| कॅपिलो अँड लाइन्स<br>रश्मिजाल रेषा. | विषम रेषा |
| तिरप्या रेषा | ऊर्ध्व रेषा |

| | | | |
|---|---|---|---|
| मासा | भोंवरा | चक्र | शंख |

# सामुद्रिक तिलक

अथवा

# सामुद्रिक शिक्षक.

" पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यं " ऋग्वेद.

अग्निर्विषंच शास्त्रं वीणा वाणी तथैव भृत्याश्च ।
पुरुषविशेषं प्राप्ता भवन्त्ययोग्याश्च योग्याश्च ॥

सुभाषित.

सांप्रत नामधारी ज्योतिषि आणि अशास्त्रीय भविष्यें ह्यांचा जो महापूर जिकडे तिकडे लोटला आहे, त्याच्या योगानें सत्य व शास्त्र ह्यांची गळेचेपी होण्याची वेळ आली आहे, असें पुष्कळ प्रामाणिक लोकांस वाटत असलें पाहिजे. अशास्त्रीय भविष्यांचा असा मनसोक्त धूमधडाका उडालेला पाहून, बऱ्याच लोकांनीं कंबरा बांधून ढोंगी लोकांवर हल्ले चढविण्यास सुरवात केली आहे; आणि भविष्यकथनाच्या आणि ज्योतिषशास्त्राच्या नांवानें एकच गिल्ला उडवून दिला आहे. ढोंगीपणा नष्ट करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे पण ढोंगीपणा नष्ट करतांना केव्हांही खऱ्या शास्त्रसेवकांना त्याची झळ न लागूं देण्याची दक्षता बाळगण्याचे कामीं चुकारपणा होतां कामा नये. ढोंगास ठेंचून टाकण्याचे उपाय दोन आहेत. एक तात्पुरता

आणि दुसरा ठाम. वास्तविक, ढोंगी लोकांवर टीकेची झोड उठविणें व कडक प्रहार करणें हा तात्पुरता उपाय आहे. परंतु खरा, जोरदार आणि चिरंतन उपाय म्हणजे शास्त्रसंशोधन, शास्त्र-प्रतिपादन आणि शंका निरसन हा होय. ढोंगी लोकांस राजशासनाचा तडाका केव्हां बसेल तो बसो, परंतु तोंपर्यंत उगीच घसाफोड करण्यापेक्षां संशोधनासारख्या उपायाचा व ज्ञानप्रसाराचा अवलंब करणें हेंच श्रेयस्कर अशी आमची ठाम समजूत आहे. आणि म्हणूनच संशोधन कार्याकडेच आम्ही विशेष लक्ष देत आहों.

जसें फलज्योतिष अथवा होराशास्त्र त्याचप्रमाणें अंगलक्षणविद्या अथवा "सामुद्रिक" हें होय. दोहोंनाहि खोटें म्हणणारे कांहीं लोक असतील, पण दोहोंना खरें म्हणणारेहि असंख्य लोक आहेत. फलज्योतिष आणि सामुद्रिक हीं शास्त्रें निराधार आहेत अशी ज्यांची वास्तविक समजूत आहे, त्यांची विचार पद्धति वेडगळपणाची तर आहे पण त्याच्याही पेक्षां ती विचारसरणी उलटी आहे. यन्त्रशास्त्र, रसायनशास्त्र, ग्रहगणितशास्त्र ह्यांच्या प्रमाणेंच फलज्योतिष व सामुद्रिक असलें पाहिजे असें त्यांना वाटतें. पण येथेंच ते चुकतात. कडुलिंब जसा रुचिला कडु तसें कोयनेलहि कडू लागतें. येथपर्यंत गुणधर्म शास्त्र जुळले. परंतु कोयनेलामुळें पुष्कळांचें डोकें फिरतें, कांहींना चक्कर येते व कडुलिंबामुळें तर कांहीं लोकांना वान्ति देखील होते. परंतु इतरांना हीं लक्षणें फारशीं जाणवत नाहींत. हा फरक कां पडतो ? निरनिराळ्या स्वभावधर्मामुळें किंवा प्रकृतिमुळें पडतो असें आपण म्हणूं. परंतु निश्चित कारण सांगतां येणार नाहीं. मनुष्याचे स्वभावधर्म आणि सूर्यादि ग्रहांचे भूतलावर घडून येणारे परिणाम ह्यांचा संबंध कसा सिद्ध होतो याचें विवेचन करण्याचा हा प्रसंग नव्हे, परंतु तो संबंध निश्चितपणें आहे हें अनेक वेळां समर्पक रीतींनें सिद्ध झालेलें आहे.

सामुद्रिक शास्त्रही याप्रमाणेंच विशेष स्पष्ट आहे. मनुष्याचे मनोविकार बहुतेक वेळां त्याच्या चेहऱ्यावर उमटतात; त्याच्या हाताच्या हालचालीवरून लक्षांत येतात; त्याच्या नजरेच्या लकबी-वरून ठरूं शकतात आणि त्याच्या एकंदर राहाटीवरून तर ते ठाम समजून येतात.

ह्याप्रमाणें अंतर्गत स्वभावाचा शरीराच्या बाह्य लक्षणांशीं संबंध आहे हें सहज सिद्ध होतें. आतां राहिलें हस्तसामुद्रिक. तळहाता-वरच्या ज्या कांहीं स्पष्ट अस्पष्ट रेषा असतात त्यांचा संबंधहि शरी-राच्या अन्तर्गत रचनेशीं आहे ह्याविषयीं आतां संशय राहिलेला नाहीं.

कामक्रोधादि मनोविकार, दया वात्सल्य इत्यादि सौम्यवृत्ति, ह्यांचें जेव्हां आविष्करण होऊं लागतें त्यापूर्वी मेंन्दूचीं जीं अनेक वलयें आहेत त्यांत निरनिराळे व्यापार चालू राहतात. त्यांचा परि-णाम मज्जातंतूवर होऊन त्याच्या जोरानें रक्तवाहिन्यांनाहि चालन मिळतें. ह्या चालनाच्या आणि मज्जातंतूच्या हालचालींचें जें निदर्शक त्याच ह्या **हस्तरेषा.** अर्थात् हस्तरेषा म्हणजे स्वभाव आणि त्याचें आविष्करण. आणि आविष्करण म्हणजेच मनुष्याचें **जीवन चरित्र.** अर्थात् हस्तरेषांवरून जीवन चरित्र निश्चित होतें **ह्यांत संशय कसचा ?** तळहातावर ज्या रेषा असतात त्यांपैकीं कांहीं अगदीं **कायम** असतात. हा **स्थिरस्वभाव** आणि दुसऱ्या कांहीं नवीनच दिसूं लागतात, स्पष्ट होतात. आणि कांहीं अस्पष्ट होतात आणि कांहीं नष्टही होतात. ह्यावरून मनुष्याच्या स्वभावाचा सर्वच अंश **कायम** किंवा **स्थिर** असतो असें नव्हें हें उघड दिसतें.

## आंगठा व बोटें

आंगठा आणि बोटें ह्यांच्यावर चक्राकार, शंखाकार, आवर्ताकार म्हणजे दोरखण्डाच्या वेटोळ्याप्रमाणें तशाच लंबाकार म्हणजे धोतराच्या

पिळ्याप्रमाणें लांबट, अशा तऱ्हेतऱ्हेच्या आकृतीच्या रेषा असतात. त्या जन्मादारभ्य मृत्यूपर्यंत अगदीं **कायम** राहतात, असें गेल्या ५०।६० वर्षांत ठाम सिद्ध झालें आहे. ह्याप्रमाणें अनेक व्यक्तींच्या बोटांचे ठसे पोलिसांच्या संग्रहीं असतात आणि त्यावरूनच ते गुन्हे-गार नेमका हुडकून काढतात. ज्यांना लिहितां किंवा सहीकरितां येत नाहीं त्यांच्या आंगठ्यांचा ठसा घेण्याची जी सरकारी वहिवाट आतां पडली आहे तिचें कारण तरी हेंच.

एक प्रख्यात इंग्रज सरदार हिंदुस्थानांत आला होता. तो सामुद्रिक शास्त्र ह्या देशांत शिकला. तो लिहितो कीं, "मी हिंदुस्थानांत असतांना माझ्या सुदैवानें मला कांहीं सामुद्रिक शास्त्रज्ञ भेटले; आणि त्यांनीं मला त्यांच्या जवळच्या जुन्या पुस्तकांतून बरेच श्लोक उतरून दिले. त्यांच्या योगानें मला त्या शास्त्रांसंबंधीं पुष्कळ माहिती मिळाली".

युरोपांतील ग्रीस देशांत ही विद्या येथूनच गेली. त्यामुळें ग्रीक भाषेंत ह्या शास्त्रावर बरीच ग्रन्थनिर्मिति झाली. परंतु युरोपांतील सामुद्रिकाचा अभ्यास तीनचारशें वर्षांतच विशेष झाला आणि अलिकडे ५०।६० वर्षांत मात्र तो हातांचे ठसे घेऊन अगदीं पद्धतशीर सुरू आहे. व त्या संबंधानें पुष्कळ ग्रन्थरचनाही झाली आहे.

तथापि नुसतीं पुस्तकें वाचून किंवा ग्रंथ पाठ करून ह्या शास्त्रांत जी गति होईल त्यास अनुभवाची जोड पाहिजे. अभ्यासूनीं दोन्ही हातांचे ठसे जमा करून ह्या पुस्तकाच्या सहाय्यानें अभ्यास केला पाहिजे. म्हणजे हें अद्भुत शास्त्र फारसे सायास न करतां अवगत होईल. मात्र तळहातांचे ठसे घ्यावयाचे ते छापील शाईनें घ्यावे. त्याचप्रमाणें बोटांचे व आंगठ्याचेहि घ्यावे; त्याच्या दोन तीन प्रती असाव्या; आणि प्रत्येक प्रतीवर छाप देणाऱ्या गृहस्थाचें किंवा स्त्रीचें संपूर्ण नांव व जन्म तारीख, वेळ, सन आणि जन्मस्थल इतकी

माहिती अवश्य लिहावी. फलज्योतिषाला जशी कुंडली तशी सामुद्रिकशास्त्रजिज्ञासूला दोन्ही हातांचे ठसे हें साधन अत्यंत जरूर आहे. ह्या पुस्तकामध्यें हातांच्या आकृति देण्यांत येतीलच. परंतु त्यावरून तत्त्व दिग्दर्शन मात्र होईल. अभ्यासाला अनेक व्यक्तींचे प्रत्यक्ष ठसे संग्रहीं ठेवणें हा उत्तम मार्ग होय.

प्रत्येक शास्त्राचा सूक्ष्म अभ्यास प्रामाणिकपणें करणाराला शेंकडों ढोंगी, लफंगे, घमेंडखोर आणि दुराग्रही लोक भेटणारच. परंतु ह्या ग्रंथाच्या सहाय्यानें वाचकांच्या शंका आपोआप दूर होऊन ते आपल्या मार्गावर स्थिर राहतील, अशी आम्हांस आशा आहे.

वास्तविक पाहतां सामुद्रिक पाहतांना कुण्डलीची, जन्मवेळेची अगदीं आवश्यकताच आहे असें नाहीं. पण हें केव्हां? तर शास्त्र जिज्ञासूंची अभ्यासांत बरीच प्रगति होईल तेव्हां. अशी पूर्ण प्रगति झाल्यावर मग फक्त हातांचे ठसे असले म्हणजे झालें. तोपर्यंत हाताच्या छापाबरोबर जन्मवेळ व कुंडली यांची जरूरी आहेच आहे.

परमेश्वरी लीलेच्या योगानें व सर्वशक्तिमान आणि सर्वज्ञ अशा जगन्नियंत्याच्या इच्छेनें सृष्टीचें चक्र सारखें अव्याहत चाललेलें आहे! ईश्वरी शक्ति इतकी अफाट आहे, ईश्वरी सामर्थ्य इतकें मोठें आहे, व ईश्वरी लीला इतकी विचित्र आहे कीं, त्या लीलेचें, त्या सामर्थ्याचें, त्या शक्तीचें संशोधन करण्यांत आमच्या प्राचीन पूज्य ऋषिवर्यांचें जन्मच्या जन्म होऊन गेलें, तत्रापि त्यांचें संशोधन अपुरेंच राहिलें! ज्या ईश्वरी शक्तीचा आदि, मध्य, अंत नाहीं, अशा परमेश्वरी सूत्राचा ठाव महान् तपस्व्यांना देखील लागला नाहीं, तेथें यःकश्चित् व क्षुद्र अशा मनुष्य प्राण्याचा टिकाव कितीसा लागेल! सृष्टिक्रमाचा चालक कोण? तो असतो कोठें? त्याचें स्वरूप काय? ही सर्व

घडामोड, हा सर्व व्यापार, हें सर्व कारस्थान व चमत्कार तो एकटाच करितो किंवा या कामांत त्यानें कोणी आपल्या मदतीस घेतले आहेत;—इत्यादि गोष्टी मनुष्यप्राण्याच्या कल्पनेला शरण देणाऱ्या असूनहि त्यांचा मागमूस देखील लागत नाहीं! तरी पण हा सृष्टि-क्रमाचा गाडा नियमितपणें आपल्या मार्गानें चालला आहे त्याला खळ नाहीं; त्याला विश्रांति नाहीं; त्याला दिवस नाहीं; त्याला रात्र नाहीं. तो कोणत्याही भानगडींत न पडतां आपल्या मालकाच्या हुकमानें आपल्या कार्यामध्यें निमग्न झालेला आहे. या सृष्टिक्रमाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या अनेकांपैकीं मानवजाति ही एक आहे. मानव-जातीच्या प्राण्याला परमेश्वरानें बुद्धि दिलेली आहे, हें ह्या प्राण्यांत वैशिष्ट्य आहे. अन्य प्राण्यांना बुद्धिसामर्थ्याची कमतरता ठेविल्यानें ते हीन कोटींत गेले आहेत. ज्याप्रमाणें सृष्टीच्या चालकानें हे अनेक प्रकारचे प्राणी उत्पन्न केले, त्याचप्रमाणेंच दुसऱ्याही अनेक गोष्टी ह्या प्राण्याकरितां त्यानें निर्माण करून ठेविल्या आहेत. त्यांमध्यें मनुष्यप्राण्याकरितां अनेक प्रकारचीं शास्त्रेंही त्यानें निर्माण केलीं आहेत. सृष्टी उत्पन्न करणारा हा एक महान् जादुगार असून त्याला अनेक प्रकारचे खेळ करितां येतात. मनुष्यप्राण्याच्या आयुष्यांत घडत असलेले निरनिराळे खेळ हें त्याच्या मंत्रविद्येचें सामर्थ्य आहे. हा निर्गुण, निराकार गारोडी आपलें नांव सांगत नसला, आपण गुप्त राहून सृष्टीला उजेडांत आणीत असला व त्याला लोकप्रियतेची हांव नसली, तरी त्याचें धोरण फार दूरदर्शीपणाचें व लोककल्याण-कारक आहे. उत्पत्ति, स्थिति आणि लय या सर्व गोष्टी त्याच्या हातांतल्या असल्यामुळें उत्पत्ति झाल्यानंतर स्थिति व लय या गोष्टींची रचना काय आहे, हें हा सृष्टीचा चालक आपल्या मुखानें कधींही सांगत नाहीं. त्यानेंच उत्पन्न केलेल्या अनेक शास्त्रांपैकीं, ज्योतिष व सामुद्रिक शास्त्रांकडे बोट दाखवून तो असें सांगतो कीं, "बा प्राण्या,

मी तुझ्याशीं कधींही बोलत नाहीं. इतकेंच नव्हे तर आजपर्यंत मी कोणाशींही बोललों नाहीं. परंतु तुझ्या भावी आयुष्याचें रहस्य ओळखण्याकरितां तुझ्या हातांवर मी ज्या रेषा उत्पन्न केल्या आहेत, त्या तुझा सर्व इतिहास सांगतील! ज्या वेळीं मीं मानवजाति निर्माण केली त्याच वेळीं त्यांच्या सुखदुःखाची कल्पना त्यांना यावी म्हणून प्रत्यक्ष प्रमाण अशा हस्तरेषाचीही योजना करून ठेविली असून, त्यांवरून आपल्या भावी आयुष्याचें चित्र समजून घेतां येईल." सृष्टिकर्त्यानें इतक्या कल्पकतेनें या मानवदेहाची रचना केलेली आहे कीं, त्याच्या शरीराचा कोणताहि भाग अतिशय उपयोगी, अतिशय कार्यकारी व अतिशय महत्त्वाचा आहे. आणि म्हणून "धन्य धन्य हा नरदेहो" अशी संतवाणी या नरदेहाचें वर्णन करिते.

शरीराच्या अनेक अवयवांपैकीं नेत्र, कान, नाक, हे अवयव ज्या भागांत आहेत, व ज्याचे योगानें आपली मानसिक स्थिति उघड करितां येते, तें मुख सर्व शरीरांत मुख्य आहे. शरीराच्या कौन्सिलचा मुख हा अध्यक्ष आहे, पुढारी आहे, नायक आहे. असें नसतें तर "सर्वेषु गात्रेषु शिरः प्रधानं" असें कधींहि म्हटलें गेलें नसतें. शरीराच्या अवयवांपैकीं एखाद्या अवयवाची कमतरता असेल तर त्या नरदेहाला गौणत्व येतें. क्वचित् प्रसंगीं अंध, पंगु, बहिरा, मुका किंवा मेंदू बिघडलेला वेडा प्राणी जर पहाण्यांत आला, तर 'काय परमेश्वरी लीला आहे पहा' असे उद्गार निघतात; परंतु इतर अवयवांप्रमाणेंच सृष्टिकर्त्यानें जन्मतःच मनुष्याच्या हातावर जो भविष्यसूचक रेषात्मक आपला संदेश लिहून ठेविला आहे. त्याजकडे कोणी लक्षही देत नाहीं व त्याबद्दल विचारही करीत नाहीं. शरीराची रचना करितांना सृष्टिकर्त्यानें अशी एकहि वस्तु या शरीरावर वृथा लादली नाहीं कीं, जिचा उपयोग शरीरास नाहीं. शरीराचे सर्व भाग इतक्या कुशलतेनें व सूक्ष्म

रीतीनें तयार केले गेले आहेत कीं, कोणताही अचाट बुद्धीचा एंजिनी-अर आला तरी या कामीं त्याचा मेंदु थंडच पडला पाहिजे. इतक्या सूक्ष्म दृष्टीनें तयार केलेल्या शरीरामध्यें ज्या हस्तरेषा उत्पन्न करण्यांत आल्या आहेत, त्या कां? कांहीं उद्देशावांचूनच? सृष्टिकर्त्याला कांहीं उद्योग नव्हता म्हणून? सृष्टिकर्त्याला जर शरीराची कांहीं तरी रचना करूनच सृष्टि वाढवावयाची असती, तर दोन डोळ्यांऐवजीं तीन डोळे, दोन पायांऐवजीं एकच पाय किंवा हातावरील रेषांऐवजीं पोटावर किंवा गालांवर अनेक रेषा उत्पन्न करण्यास त्यास कांहींच अवघड किंवा अशक्य नव्हतें! आणि असें ज्या अर्थीं झालें नाहीं, त्याअर्थीं हस्तरेषा उत्पन्न करण्यांत परमेश्वराची कांहीं तरी सूक्ष्म योजना असलीच पाहिजे! ती परमेश्वराची योजना व हेतु आपण लक्षांत घेऊन त्या ईश्वरी योजनेचा आपणांस जितका फायदा करून घेतां येईल तितका घेतला पाहिजे हें उघड आहे. ज्याप्रमाणें हस्तरेषा हें आयुष्यांतील शुभाशुभ गोष्टींचें भविष्य जाणण्याचें प्रमुख साधन आहे, त्याचप्रमाणें मनुष्याचा चेहरा हा देखील मनुष्याचा स्वभाव, गुण, वर्तन, आचार, विचार, बुद्धिसामर्थ्य, वगैरे गोष्टींचें यथातथ्य दिग्दर्शन करून देणारा वाकबगार असा चित्रगुप्तच आहे. कांहीं मनुष्याकडे पाहिलें असतां पाहणाराच्या मनावर एक प्रकारचा विलक्षण परिणाम घडतो व त्यांजबद्दल आदर आणि प्रेम वाटावयास लागतें. कांहीं लोकांना पाहातांच मनांत तिरस्कारबुद्धि उत्पन्न होऊन त्यांजविषयीं मनाची वृत्ति वाईट प्रकारची बनते. अशा प्रकारचे बरेवाईट परिणाम मनावर घडविण्यास कारणीभूत होणारें हें मुखकमल खरोखर परमेश्वरानेंच निर्माण केलें असतां एकाबद्दल आदर व दुसऱ्याबद्दल विषाद वाटण्यासारखे परिणाम पाहणाऱ्याच्या मनावर कां व्हावेत? कांहीं चेहेरे मोठे भव्य, तेजस्वी व गंभीर दिसतात; व कांहीं तेजोहीन, उत्साहशून्य व तामसिक असे

पाहण्यांत येतात. मनुष्याची मानसिक स्थिति व विचार ज्या प्रकारचे असतात, त्याच प्रकारचे परिणाम त्याच्या चेहऱ्यावर हुबेहूब प्रतिबिंबित झालेले आढळतात. अर्थात् त्याच्या चेहऱ्यावरून त्याची मानसिक स्थिति समजण्यास कांहींच अवघड नाहीं. एखाद्या कपटी व दुराचारी मनुष्याला जर सांगितलें कीं, तूं नेहमीं आनंदी व गंभीर असा आपला चेहरा ठेव, तर त्या मनुष्याला ही गोष्ट कधींही साध्य होणें शक्य नाहीं. कारण त्याच्या मानसिक स्थितीचें प्रतिबिंब जें त्याच्या चेहऱ्यावर त्याला न कळत उमटतें, तें त्याला टाळतां येणें शक्य नसतें. याला थोडकेंसें उदाहरण म्हणजे खुनी व बदमाष किंवा चौर्यकर्मनिपुण लोकांच्या दृष्टीकडे बारीक नजरेनें पहावें. त्यांची नजर इतकी अस्थिर व हालचाल इतकी संशयित असते कीं, अशा प्रकारचे लोक साधारण मानानें आपणांला सहज ओळखतां येतात. एवंच काय कीं, हस्तरेषांवरून ज्याप्रमाणें भविष्य समजतें, त्याचप्रमाणें चेहऱ्यावरून देखील कित्येक गोष्टींचा तत्काळ बोध होतो. त्या गोष्टी जरी सामान्य असल्या, तरी सुद्धां प्रसंगविशेषीं त्या सामान्य गोष्टींचें ज्ञानच विशिष्ट गोष्टींपेक्षांही अधिक सरस व अधिक फलदायक होऊन आपले उपयोगी पडते. तळहातावर रेषा उत्पन्न करण्यांत सृष्टिकर्त्या परमेश्वरानें किती कौशल्य दाखविलें आहे पहाः—शरीराचे जे अवयव आहेत त्यांमध्यें कार्यकारित्व जर कोणाकडे असेल, तर हातांकडे आहे. मनानें चिंतावें, बुद्धीनें हुकूम द्यावा आणि प्रत्यक्ष अंमलबजावणी हातानें करावी, अशा प्रकारचा श्रेष्ठ व सन्माननीय जो हात, त्यावर या रेषा असल्याकारणानें त्यांचें श्रेष्ठत्वही आपोआपच सिद्ध होत आहे.

महत्त्वाच्या गोष्टींचें महत्त्व कित्येक वेळां लक्षांत येत नाहीं; उलट त्याचा उपहास करण्यामध्येंच अभिमान वाटत असतो. परंतु असा प्रकार सूक्ष्मदृष्टीच्या विचारी माणसाकडून कधींही होत नाहीं.

याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे लो. बाळ गंगाधर टिळक हे होत. अलीकडील आंग्लविद्याविभूषित तर्कवादी लोक पौर्वात्य शास्त्रांचें किंवा इतर गोष्टींचें स्वरूप लक्षांत न घेतां, त्या कुचकामीं आहेत असा आपला गैरसमज करून घेतात; व कोणत्या तरी एखाद्या नवीन गोष्टीचें स्तोम माजविण्याकडे त्यांची बुद्धिमत्ता खर्च होऊन जाते. परंतु हा अंधविश्वास लो० टिळकांच्या चरित्रांत कोठेंच सापडत नाहीं. त्यांनीं केलेले "आर्टिक होम इन् दि वेदाज्" "ओरायण" "गीतारहस्य" इत्यादि अमूल्य ग्रंथ पहा. त्यांवरून ही गोष्ट पूर्णपणें सिद्ध होते कीं, त्यांची विचाराची दिशा व परीक्षणशक्ति सूक्ष्म व अलौकिक आहे. कोणतीहि गोष्ट किंवा शास्त्र असो, त्या संबंधींचा विचार लो० टिळक इतक्या चिकित्सक बुद्धीनें व संशोधनाच्या दृष्टीनें करीत कीं, त्यांच्या परीक्षणांत सत्य तेवढेंच टिकूं शके. कै० महाडकर ज्योतिषी हे चेहऱ्यावरून व हस्तरेषा पाहून कुंडली मांडीत, ही गोष्ट जगजाहीर असून लो० टिळकांनीं त्याचा प्रत्यय अनेक वेळां घेतला असल्यानें व हें सत्य त्यांना बरोबर पटल्या कारणानें ते एकदां कै. महाडकरांना बरोबर घेऊन, त्यासंबंधीं जास्त चिकित्सा करण्याकरितां मद्रास येथें गोविंदचेट्टी या प्रसिद्ध सामुद्रिकांकडे गेले होते, असें सांगतात. ही शास्त्रशोधनाची व प्राचीन परंपरेची अभिवृद्धि करण्याची महत्त्वाकांक्षा कोणीकडे, आणि अलीकडे सुशिक्षित म्हणविणाऱ्या 'वाचि वीरां" ची कमकुमत व विचारहीन वृत्ति कोणीकडे ? तेव्हां अशा प्रकारचे लो० टिळकासारखे पुरुष जर हल्लींच्या सुशिक्षितांत तयार होतील तर कोणतेंहि शास्त्र असो, तें ऊर्जित दशेला पोहोंचलेंच पाहिजे. कोणत्याहि कार्याचे प्रारंभीं 'विघ्नान्नाशय मे सर्वान्' अशी निर्गुण निराकार परमेश्वराची प्रार्थना करणें हें आमच्या धर्माचें प्रधान कार्य आहे व तें करणें अत्यंत आवश्यक आहे. त्याचप्रमाणें ही प्रार्थना केल्यानंतर सामुद्रिक शास्त्रांतील गूढ तत्त्वांचा प्रत्यय ज्यांनीं सर्व जनतेला

पूर्णपणें आणून दिला, ते कै. **बाबाजीराव पटवर्धन** महाडकर ज्योतिषी यांचाही येथें अभिमानपूर्वक उल्लेख केल्यावाचून आमच्यानें राहवत नाहीं. यांनीं ' हस्तरेषा व चेहरा यांवरून कुंडली मांडतां येते ' व ' हस्तरेषा हें भविष्यकथनाचें ईश्वरनिर्मित प्रत्यक्ष साधन आहे ' हें सिद्ध करून ठेवलें आहे. हस्तरेषा हें साधन अशा प्रकारचें आहे कीं, त्यांत संशयास जागा नाहीं. रेषा चुकण्याचा संभव नाहीं. तसेंच हें साधन अल्पज्ञ अशा मनुष्यानें उत्पन्न केलेलें नसून प्रत्यक्ष सृष्टिकर्त्यानें स्वतःच निर्माण केलें आहे. याप्रमाणें जें उत्तम साधन जन्मतःच मनुष्याच्या हिताकरितां ईश्वरानें उत्पन्न केलें आहे, त्याचा उपयोग करून घेणें हें आमचें काम नव्हे काय ?

सध्यां चालू असलेल्या आधिभौतिक प्रगतीच्या कालामध्यें मनुष्याला ' कनक ' आणि ' कांता ' या दोन गोष्टींनीं वेड लावलेलें असून ते शांति सुखापासून पराङ्मुख झालेले आहेत. पाश्चिमात्य पद्धतींच्या नानातऱ्हेच्या सुधारणांची आवड आणि त्याकरितां लागणाऱ्या द्रव्यनिधीची कमतरता या परस्परविरोधी अशा गोष्टींचें प्राबल्य सुरू झाल्याकारणानें आमच्या मनाची पूर्वींची ती सत्त्वस्थ व समाधान वृत्ति कोठेंच दिसत नाहीं. जिकडे पहावें तिकडे सारे लोक उदासीन, चिंतातुर व काळजीनें युक्त ! ही चिंता शेंकडा नव्याण्णव लोकांना द्रव्याची आहे. कारण सर्व गोष्टी साध्य करून देणारी द्रव्य ही एकच गुणकारी वल्ली आहे. परमेश्वर मनुष्याच्या जन्मकालींच त्याच्या सांपत्तिक स्थितीची रूपरेषा आंखून ठेवतो. व इतर गोष्टींबद्दलही तो आपला निर्णय हस्तरेषांच्या द्वारें जाहीर करतो. परंतु ती परमेश्वरी इच्छा जाणण्याचें साधन अशा या हस्तरेषा आमच्याजवळ असूनहि आम्ही चिंताग्रस्त आणि उदासीन ! याला त्या परमेश्वरानें काय करावें ! सामुद्रिक शास्त्र

शिकण्यापासून जर कोणता फायदा असेल तर तो हा आहे कीं, मनाची वृत्ति शांत, समाधानी आणि आनंदी राहते. अमुक एक गोष्ट अशा प्रकारचीच होणार हें समजून देखील जर मनुष्यास समाधान राहणार नाहीं, तर त्याचा नरदेह 'धन्य' नसून 'वृथा' होय!

ईश्वरनिर्मित ज्या अनेक गोष्टी आहेत, त्यांपैकींच आकाशांतील नक्षत्र तारे व ग्रह हे होत. ग्रहांचे परिणाम प्रत्येक चराचर वस्तूवर व प्राणिमात्रावर घडतात. ते परिणाम ज्या शास्त्राचे योगानें कळतात, त्याचें नांव ज्योतिषशास्त्र. मनुष्याचे आयुष्यांतील गोष्टींचें भविष्य सांगणारी 'ज्योतिष' व 'सामुद्रिक' हीं दोन प्रमुख शास्त्रें आहेत. त्यांपैकीं सामुद्रिक शास्त्रासंबंधीं आपणांस विचार करावयाचा आहे. या शास्त्राचा उत्पत्तिकाल कोणता हें नक्की कळत नसलें तरी, हें शास्त्र फार प्राचीन आहे, याबद्दल कोणासच शंका नाहीं. या शास्त्रावरील कांहीं संस्कृत ग्रंथ सध्यां उपलब्ध आहेत व कांहीं अप्रसिद्ध किंवा गुप्त आहेत. त्याचप्रमाणें हस्तसामुद्रिकावर अनेक इंग्लिश ग्रंथही प्रकाशित आहेत. या सर्वांच्या सहाय्यानें व त्यांतील मथितार्थ काढून अनुभवाच्या दृष्टीनें जो योग्य आणि उपयुक्त असा भाग आहे, तो आम्ही या शिक्षणक्रमांत ( **कोर्समध्यें** ) शिकविणार आहों.

या शिक्षण क्रमांत **हस्त सामुद्रिक** ( Palmistry ) व **शीर्ष-सामुद्रिक** ( Phrenology ) हे दोन्ही विषय प्रत्यक्ष **छायाचित्रां**-सह दिले जातील. हें शास्त्र झालें तरी अत्यंत पूर्णावस्थेला गेलेलें आहे असें कोणीही व केव्हांही म्हणणार नाहीं. आणि म्हणूनच याचा जितका जास्त ऊहापोह होईल तितका तो उपयोगीच पडणारा असल्याकारणानें त्यांतील मूलभूत गोष्टी सांगून तात्त्विक विचारांची दिशा दाखविण्याचें कार्य आम्ही करीत आहों.

स्वतःचा अनुभव हें शिक्षण दुसऱ्या कोणत्याही शिक्षणाला

केव्हांही हार खावयास लावणारें असल्यामुळें, पुढें देण्यांत येणाऱ्या मूलभूत तत्त्वांना व तात्त्विक विचारांना अनुसरून प्रत्येकानें आपलें आत्मिक शिक्षणाचें बल वाढविलें पाहिजे, हें अगदीं उघड आहे. इच्छा असून साधन नाहीं, अशा लोकांकरितां हा शिक्षणक्रम आम्ही सुरू करीत असून, यावरून ग्राहकांना थोडक्यांत पुष्कळ अशी निरनिराळ्या प्रकारची वेचक माहिती व आर्यांग्ल ग्रंथांतील विचार सहज समजतील, अशी याची योजना आहे.

प्राचीनकाळीं सामुद्रिक शास्त्रावर मूळ ग्रंथ केव्हां झाला हें जरी निश्चयात्मक सांगतां येत नाहीं, तरी पण उपलब्ध माहितीवरून **असें स्पष्ट दिसतें कीं सामुद्रिक शास्त्राची उत्पत्ति भारत:वर्षांत सुमारें २००० वर्षापूर्वींच झालेली आहे आणि त्यामुळेंच वराहमिहिराचार्यांनीं आपल्या बृहत्संहितेंत सामुद्रिकशास्त्र विवेचन केलेले आहे. अर्थात् हिंदुस्थानांत २००० वर्षें हें शास्त्र प्रचारांत आहे.** युरोपांत इंग्लिश भाषेंत सामुद्रिकाची माहिती असलेला असा ग्रंथ इसवी सन १४४८ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें दिसून येतें. त्यानंतर आजपर्यंत ४५० वर्षांत म्हणजे मानवी दृष्टीच्या दीर्घ-कालांत सामुद्रिक वाङ्मयाचे अनेक ग्रंथ उत्तरोत्तर प्रगतिपर स्वरूपांत प्रसिद्ध झाले असून, प्रत्येक वेळीं अनुभवाच्या दृष्टीनें त्यांत सुधारणा होऊन या शास्त्रांतील तत्त्वनिर्णयाचें कार्य अव्याहत व जोरानें घडत आहे. हिंदुस्थानांत देखील मद्रास, म्हैसूर, वगैरे प्रांतात अनेक उत्तमोत्तम ग्रंथ असल्याचें आढळून येतें. परंतु ते अप्रकाशित असल्याकारणानें व चालू विसाव्या शतकांत आणि सुधारणेच्या मन्वंतरांत, ग्रंथ हातानें लिहून काढणाऱ्या कलमबहाद्दरांचा दुष्काळ पडल्यामुळें त्या ग्रंथांचा समाजाला व्हावा तसा उपयोग होत नाहीं. इतकेंच नव्हे तर कांहीं ग्रंथांचा मागमूस देखील लागत नाहीं. आर्यांग्ल पद्धतीप्रमाणें विचार करून त्यांतील महत्त्वाचा भाग आम्ही या शिक्षणक्रमांत देणार हें

सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें हाताच्या व चेहऱ्याच्या प्रत्यक्ष छायाचित्रासह सविस्तर रीतीनें त्याचें स्पष्टीकरण करण्यांत येईल. प्रास्ताविक लेखांत यापेक्षां जास्त विवरण न करितां, ईशस्मरणपूर्वक मुख्य विषयालाच आतां आम्ही सुरुवात करितों.

उन्मानमानगातसहातसारिवण-
स्नेहस्वरप्रकृतिसत्त्वमनूकमादौं ।
क्षेत्रं मृजां च विधिवत् कुशलोऽवलोक्य
सामुद्रविद्वदति यातमनागतं वा ॥

—बृहत्संहिता.

सामुद्रिकाचा खरा अर्थ म्हटला म्हणजे—सामुद्रं—अंगलक्षणं म्हणजे शारीरलक्षणविद्या असा होय. ज्या शास्त्रांत शरीराच्या सर्व अवयवांची ठेवण, आकारमान, स्वर, गति, अंगविक्षेप व इतर चिन्हें यांवरून मनुष्याच्या स्वभावाचें व सुखदुःखांचे शुभाशुभत्व जाणण्याचे मार्ग ( नियम ) सांगितलेले असतात व ज्यांत हातांवरील रेषांचा विचार केलेला असतो, त्यास सामुद्रिक शास्त्र असें म्हणतात. परंतु आपल्या इकडे व पाश्चात्य देशांत याचा मुख्यार्थ अथवा खरा अर्थ एका बाजूस राहून, आपल्या इकडे “ सामुद्रिक ” हा शब्द उच्चारल्याबरोबर हस्तसामुद्रिक अशीच कल्पना प्रत्येकाच्या मनांत उभी रहाते. तसेंच युरोपमध्यें “ फिजिऑग्नमी ” म्हटल्या-बरोबर “ मुखपरीक्षाशास्त्र ” अशी भावना उत्पन्न होते. ह्याचें कारण इतकेंच कीं, जरी शास्त्रकारांचा हेतु सर्व शारीरलक्षणांवरून शुभाशुभ सांगण्याचा होता, तरी शरीरांतील सर्व अवयवांमध्यें मुख व हात हे दोन विभाग सहज पहातां येण्याजोगे असून, त्यांच्या निरीक्षणास कोणत्याही तऱ्हेचा अडथळा येण्याचा संभव नसतो;

इतर भागाचें तसें नसतें, डोक्यावर केस असल्यास, त्यावरील उंचवटे पहाणें मुष्कीलीचें होतें; छाती, पोट, बेंबी, जंघा, खाक वगैरे अवयवांची तशीच स्थिति असल्यामुळें, शिवाय पुरुषांपेक्षां स्त्रियांचे बाबतींत तर फारच पंचाईत असल्यामुळें, शास्त्रकारांचा आशय एका बाजूस राहून निरीक्षणास सुगम अशा ह्या दोन शरीरविभागांवरच शोधकांचा भर वाढला. ह्या दोन अवयवांचेंच निरीक्षण जास्त प्रचारांत येत गेल्यामुळें, मुख्यार्थ एका बाजूस राहून वरील कल्पना रूढ झाल्या. आतां ह्या दोन विभागांपैकीं मुखावरून स्वभाव परीक्षा व तात्कालीक सुखदुःखांची छटा जाणण्यापलीकडे मनुष्यप्राण्यास भविष्यकाल जाणण्याची जी उत्कट इच्छा, तीस चेहऱ्यावरील अनुमानांचा विशेष उपयोग होत नाहीं; परंतु हस्तसामुद्रिकांत शास्त्रकारांनीं तशी योजना केली आहे, म्हणून प्रथम हस्तसामुद्रिकाचा सुलभ विचार करण्याचें योजिलें आहे.

आतां हें शास्त्र प्रथम कसें अस्तित्वांत आलें असावें ह्याचा विचार करूं.ज्योतिषशास्त्रांत फलें वर्तविण्यास ज्याप्रमाणें ग्रहांचा आधार घेतात, त्याप्रमाणें सामुद्रिक शास्त्रास मनुष्य–प्राण्याच्या शरिरावर व शास्त्रज्ञांच्या अनुभवावरच अवलंबून ठेवावें लागलें आहे. कांहीं शास्त्रज्ञांनीं जरी ह्यांस नामधारी शास्त्रें ( So called Sciences ) म्हणून शास्त्रमालिकेंतून ह्यांचें उच्चाटन केले असलें, तरी ही त्यांची चूक होय असें म्हणणें भाग पडतें; कारण ज्या ज्या गोष्टींचा आपणांला कार्यकारणभाव सांगतां येईल त्यालाच शास्त्र ही संज्ञा प्राप्त होते, असें मानिलें तर रसायनशास्त्रासही ह्याच मालिकेंत ढकलून देण्याची पाळी येईल. कारण चुना व हाळद हीं एकत्र केली असतां तांबडा रंग बनतो; तो कां बनतो, ह्याचें कारण जसें सांगतां येत नाहीं, तथापि प्रत्यक्ष अनुभव हाच जसा त्याचा पुरावा होय, तसेंच ज्योतिष, सामुद्रिक, हीं अनुभवजन्य शास्त्रें होत. कांहीं

लेखकांनीं केवळ व्यावहारिक रीतीनें ह्यांचा कसाबसा विचार करून आपल्या अनुमानाला तें पटेना, म्हणून हीं शास्त्रेंच नव्हत असें म्हणण्याची त्यानीं जशी घाई केली, तसाच थोडासा दम धरून, अनुभवाला तरी हें शास्त्र कितपत उतरतें, हें सप्रमाण पाहून निर्णय दिला असतां तर त्यांच्या मतास एक चांगला सबळ पुरावा झाला असता, आणि सारासारविचारास हें पटत नाहीं म्हणून हें शास्त्र नव्हे, अशा पंगू विधानावर त्यांची असलेली सर्व मदार कोसळून पडण्याची भीति रहातीना! कारण सामान्य धोरण त्या त्या काळच्या समाजानुरूप बनलेलें असतें, व जशी जशी परिस्थिति बदलेल त्याप्रमाणें बदलणारें असतें. उदाहरणार्थ दोनशें वर्षांपूर्वीं जर कोणी रामेश्वरापासून काशीपर्यंत लोखंडी रूळ पसरून व जागोजाग स्टेशनें करून, त्यावरून एक पन्नास मैल वेगाच्या वाफेच्या धावत्या गाडींची कल्पना सांगतां, किंवा १०० वर्षांपूर्वीं रामायणकालचें विमान तयार करण्याची कल्पना सांगतां तर, त्या त्या काळच्या धोरणानें वरील कल्पना शक्यतेच्या कोटींत आणणाऱ्या व्यक्तीस, वेड्याचेच इस्पितळांत पाठविण्याचें ठरविलें असतें. विमानें शक्यतेच्या कोटींत येणें शक्य नाहीं असें सर्व जगाचें कामन्सेन्स परवां परवां-पर्यंत सांगत होतें, पण तें आज प्रत्यक्ष खोटें ठरलें आहे. करितां अनुमान धबका ही शास्त्राची कसोटी नसून त्यावरून ठरविलेला निर्णय हा खरा निर्णय नव्हे, तर तो अनुभवास कितपत उतरतो ह्यावरच निर्णय ठरविणें रास्त होय.

निरीक्षण हाच ह्या शास्त्राचा पाया होय. प्रथमतः कामक्रोधादि विकारामुळें मनुष्याच्या चेहेऱ्यांत निरनिराळे फरक होतात, व ह्या निरनिराळ्या होणाऱ्या फरकांवरून, मनुष्याची तात्कालिक मानसिक स्थिति ओळखितां येते, असें अनुभवास आलें आहे. आपण व्यवहारां-तही नेहमीं मनुष्य आनंदी आहे कीं, दुःखी आहे, रागांत आहे कीं

प्रेमांत आहे, हें त्याच्या मुद्रेवरून ठरवितों. म्हणजे ही रागलोभाची, सुखदुःखाची स्थिति ओळखण्यास त्याचा चेहरा हा आधार होय. ह्या अनुभावसिद्ध सिद्धांतावरून ह्या शास्त्राचा पाया रचण्यास आरंभ झाला असला पाहिजे. नंतर असें निरीक्षण चाललें असतांना मग असें आढळून आलें कीं, चेऱ्यावरून जरी हे विकार ओळखितां येतात, तरी त्यांतल्या त्यांत हे विकार ओळखण्यास "नेत्र" हें प्रमुख साधन होय. कारण हा होणारा फेरफार इतर भागांपेक्षां चेहऱ्याच्या याच भागांत दाखविण्याची शक्ति खास अधिक आहे, असें निदर्शनास आलें. त्यानंतर जसें जसें हें अवलोकन जास्त अधिक सुरू झालें, तसें तसें हे फक्त क्षणिक होणारे फेरफार ओळखण्याच्या पलीकडे त्याची मजल जाऊन, मग मनुष्यामध्यें कोणत्या विकाराचें जास्त प्राबल्य आहे हें ओळखण्यास सुरुवात झाली. हें नेत्रनिरीक्षण जसें जसें वाढत गेलें, तसें तसें हे नेत्र नुसते क्षणैक उठणाऱ्या विकारांचें निदर्शक नसून मानवी अंतःकरणाचे प्रतिबिंबदर्शक आहेत असें आढळून आलें, व ह्या नेत्रनिरीक्षणच्या अभ्यासानेंच, नेत्रांच्या ठेवणीवरून व त्यांत होणाऱ्या फरकांवरून मनुष्य पहातांच, तिरसट, गंभीर, हुषार, मंद, आनंदी, दुःखी, लुच्चा, सच्चा, शहाणा, वेडा ह्याची प्रत्येकास कल्पना करितां येऊं लागली व ती बहुतेक जुळते असा अनुभव आहे. नंतर हें निरीक्षण शरीराच्या इतर भागांकडे क्रमाक्रमानें गेलें असलें पाहिजे. चलाख माणूस सडसडीत असतो, मंद माणूस स्थूल असतो, अशा रीतीनें हें निरीक्षण सुरू होऊन, चेहऱ्यांत जसें चक्षुरिंद्रियाचें प्राधान्य दिसून आलें, तसेंच इतर अवयवांत 'हात' हे ह्या फेरफारांचे द्योतक आहेत असें दृष्टोत्पत्तीस आलें.

मनुष्याचे मनोविकार, किंवा स्वभाव दर्शविण्यास जसे नेत्र

कारणीभूत आहेत, तसेच त्या त्या विकारांची पूर्तता करण्यास, व त्यांचें प्रमाण मापण्यास हात हे उत्कृष्ट आदर्श होत. आणि ह्यावरूनच हातास कर म्हणजे करणारा, हें जें नांव मिळालें आहे तें सर्व इंद्रियांची कामगिरी बजावणारा दूत म्हणूनच पडलें आहे. मनुष्य रागावला असतांना, नेत्रांबरोबरच मुठी वळून, समाधानाचे वेळीं—ते व्यक्त करतांना—हात उघडून व पालथे करून, आदरातिथ्याचे वेळीं हात जोडून, याचना करतांना व भीक मागतांना हात उताणा पसरून, आपलें मनोगत पूर्णपणें प्रगट करितो. अशा रीतीनें मनुष्याच्या प्रत्येक कृत्यांत ह्या करांचा संबंध नाहीं, असें प्राय: एकही कृत्य सांपडणार नाहीं. तेव्हां मनुष्यप्राण्याच्या सर्व कृत्यांची व स्वभावाची गुरुकिल्ली ह्या हातांतच असली पाहीजे अशी कल्पना दृढ होऊन, ह्या विभागाच्या निरीक्षणास सुरुवात झाली, व ह्या निरीक्षणांतच हातावरील रेषा दृष्टीस पडल्या. नंतर सर्वांच्या हातांत ह्या रेषा सारख्याच असतात कीं काय, कां कांहींच्या हातांत ह्या मुळींच नसतात, असा प्रश्न उत्पन्न झाला, व शोधाअंतीं प्रत्येकाच्या हातावर त्या असतातच पण त्या कमीजास्त प्रमाणांत असतात असें आढळून आलें. आतां ह्या प्रत्येकाच्या हातांत असलेल्या सर्व रेषा, जन्माबरोबरच निर्माण झालेल्या असतात कां पुढें पुढें त्यांत कांहीं फरक होत जातो इकडे लक्ष गेलें, व ह्या रेषांत कमीजास्त फरक होतो असें जेव्हां आढळलें, तेव्हां ह्या उत्पन्न होणाऱ्या व कालमानानें बदलणाऱ्या रेषांचा मनुष्यावर त्या त्या कालीं येणाऱ्या सुखदु:खांशीं कांहीं संबंध असावा अशी कल्पना सहजीं उत्पन्न झाली. कारण तसें नसतें तर ह्या रेषा जन्मापासून शेवटपर्यंत तशाच रहावयास पाहिजे होत्या; अशा तऱ्हेनें ही कल्पना मूर्त झाली. व अशा मानवी निरीक्षणानेंच या शास्त्राची इमारत उभी होऊन हें सामुद्रिकशास्त्र अस्तित्वांत आलें आहे.

Desbarrolles having studied all the cheiromantic works on which the sorcers, astrologers, necromancers and enchanters of the middle ages founded their pretended knowledge rejected all as the creation of unscrupulous mystery-mongers, and seeking for cheiromancy its true origin in the cabbala of India, embdied the principles of the science by which the instincts of man, his past life, and to a certain extent his future may be explained and revealed.

मध्ययुगांतले चेटकें, ज्योतिषी, टाणेटोणे करणारे व इतर ढोंगी लोक यांच्या दांभिक ज्ञानाची भिस्त ज्या ग्रंथांच्या आधारावर आहे असें म्हणत, अशा सर्व ग्रंथांचा डेस् बॅरोलेस्नें अभ्यास करून ह्या ढोंगी लोकांचे ग्रंथ म्हणजे निव्वळ थोतांड होय असें ठरविलें. आणि पुरातन हिंदुस्थानांतील परंपरागत चालत आलेल्या गूढ शास्त्रांतून या सामुद्रिकाचें खरें मूळ शोधून काढून, त्यावर, ज्याच्या योगानें मनुष्याची उपजत बुद्धि, त्याचें. गतायुष्य, आणि विशिष्ट मर्यादेपर्यंतचा भविष्यकाल ह्यांची त्यास ओळख व ज्ञान करून देतां येईल अशा या आमच्या ( पाश्चिमात्य ) सामुद्रिक शास्त्राच्या प्रमेयांची मांडणी केली. ह्या शास्त्राच्या कालाचा विचार करतां तें इसवी सनापूर्वी तीन हजार वर्षें चीनमध्यें, दोन हजार वर्षें ग्रीस आणि रोमच्या इतर भागात अस्तित्वांत होतें असें आढळतें. आमच्या इकडे रामायणकालीं तें बरेंच प्रचारांत होतें, हें युद्धकांड सर्ग ४८ मध्यें राम व लक्ष्मण वध पावले, असें जेव्हां सीतेनें तेव्हां ती शोक करूं लागली असतांना, तिच्या तोंडून निघालेले उद्गारांवरून दिसतें.

भर्तारं निहितं दृष्ट्वा लक्ष्मणं च महाबलं
विललाप भृशं सीता करुणं शोककर्शिता
ऊचुर्लाक्षणिका ये मां पुत्रिण्यविधवेति च

तेऽद्य सर्वे हते रामे ज्ञानिनोऽनृतवादिनः
इमानि खलु पद्मानि पादयोर्वै कुलस्त्रियः
आधिराज्येऽभिषिच्यन्ते नरेन्द्रैः पतिभिः सह
सत्यनामानि पद्मानि स्त्रीणामुक्तानि लक्षणैः।
तान्यद्य निहिते रामे वितथानि भवान्ति मे
केशाः सूक्ष्माः समा नीला भ्रुवौ चासंहते मम
वृत्ते चारोमके जंघे दंताश्चाविरला मम
शंखे नेत्रे करे पादौ गुल्फावुरू समौ चितौ
अनुवृत्तनखाः स्निग्धाः समाश्चांगुलयो मम
स्तनौ चाविरलौ पीनौ मामकौ मग्नचूचुकौ
मग्ना चोत्सेधनी नाभिः पार्श्वोरस्कं च मे चितम्
मम वर्णो मणिनिभो मृदून्यंगरुहाणि च
प्रतिष्ठितां द्वादशभिर्मामूचुः शुभलक्षणाम्
समग्रयवमच्छिद्रं पाणिपादं च वर्णवत्
मंदस्मितेत्येव च मां कन्यालाक्षणिका विदुः

म्हणजे इसवी सनापूर्वीं चार पांच हजार वर्षांपासून तें बरेंच प्रचारांत आहे असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. पांडवकालींही तें चांगल्या रीतीनें प्रचारांत होतें, हें सुयोधनाच्या हातावरील मच्छ-चिन्हाच्या कथेवरून लक्षांत येतें; एकंदरींत जवळ जवळ हें शास्त्र सात हजार वर्षें अस्तित्वांत असून त्यापूर्वीं बरेच दिवस ह्या शास्त्राचा पाया रचला गेला असला पाहिजे असें ठरतें.

आतां हें शास्त्र प्रथम कोठें निर्माण झालें ह्याचा विचार करितां ह्याचें उगमस्थान हिंदुस्थानांतच असलें पाहिजे. ‘ कारण आपल्या इकडे ह्या शास्त्रास आरंभीं लक्षणशास्त्र व नंतर सामुद्रिक हे शब्द जसे सर्वशरीरबोधक आहेत तसे ते युरोपीय सामुद्रिकांत नाहींत. ह्या शारीरलक्षणविद्येची जशी माहिती जशी तिकडे होत चालली तशी

तशी त्या त्या विभागानुरूप त्या त्या अंगांचीं नांवें त्यास मिळून त्यांचीं निरनिराळीं शास्त्रें बनत चाललीं. हस्तसामुद्रिक (कायरोमॅन्सी) मस्तकपरीक्षा (फ्रेनॉलजी), मुखपरीक्षा (फिजिऑग्नमी) व अलीकडे स्वरावरून, चालण्याच्या व इतर हावभावांवरून (गेट्स ऍण्ड गेश्चर्स) अक्षरावरून ( ग्रॅफॉलजी ) वगैरे पद्धतींनें फलें सांगण्याचे प्रयत्न तिकडे सुरू झाले आहेत, म्हणजे आज ते प्रारंभींच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें किंवा—

नव रंध्राणि हस्तांघ्रिपृष्ठनाभिशिरोवपुः
कंठवक्षोदरोर्वादि सहरेखं परीक्षयेत्
शरीरावर्तगतिच्छायास्वरवर्णगंधसत्त्वानि
दृष्टिशीलादि चिन्हानि विज्ञानफलमीरयेत्

हे आमच्या शास्त्रज्ञांनीं ठरविलेले परीक्षणाचे जे मार्ग अगर जीं साधनें आहेत त्यांच्या जवळ जवळ ते येत चालले आहेत; म्हणजे या शारीर लक्षणविद्येची रूपरेखा आमचेकडे अगोदर आंखली जाऊन आज त्यांनीं आमचें अनुकरण करण्यास सुरवात केली आहे. ह्या अंगलक्षण विद्याशास्त्राच्या प्रगतीच्या तिकडील इतिहासावरून पाहतां तें युरोपमध्यें अर्वाचीन काळीं सुधारत चाललें आहे असें स्पष्ट दिसते, आपल्याकडून हें शास्त्र ग्रीक लोक शिकले. आणि ग्रीकापासून युरोपांत पसरलें. कारण कॉयरॉमन्सी, फिजीऑग्नमी, फ्रेनालॉजी हे सर्व ग्रीक शब्द आहेत. त्यावरूनच हें सिद्ध होतें, युरोपांत इसवी सनापूर्वीं तें प्रचलित असल्याचें दिसत नाहीं व त्याचें अगोदर तें चीनमध्यें व त्याचें पूर्वीं तें हिंदुस्तानांत बऱ्याच रीतींनें प्रचारांत असल्याचें आढळतें. ह्याशिवाय इतरही पुरावा देता येईल, पण वर दिलेल्या उताऱ्यांत युरोपीय संशोधकांनीं हिंदुस्तान देश ह्यांचें जन्मस्थान होय, अशी कबुली दिली असल्यामुळें आतां अधिक प्रमाणें पहात बसण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं.

## दोहोंकडील अर्वाचीन इतिहास व परिस्थिति.

ह्या शास्त्रावरील इकडील ग्रंथ पाहतां, गर्ग, नारद, प्रल्हाद, वराहमिहिर, वगैरे विद्वानांनीं यावर बराच विचार केलेला दिसतो. परंतु त्यानीं आपल्या ग्रंथांत सर्वच शरीराचीं चिन्हें सांगितलीं आहेत आणि हातांच्या तळव्यावरील चार रेषा, यवचिन्ह व बोटावरील इतर रेषांची त्रोटक माहिती आणि इतर चिन्हें यांचा विचार केलेला आहे. वराहमिहिरानंतर आजपर्यंत ह्यावर कोणीही स्वतंत्र शोधक बुद्धीनें ग्रंथ लिहिलेला दिसत नाहीं आणि अलीकडे झालेले ग्रंथ यांना ग्रंथ म्हणण्यापेक्षां पाश्चात्य सामुद्रिकांची त्रोटक भाषांतरेंच म्हणणें बरें. कारण त्यांत आपल्या इकडील बिलकूल माहिती नसून, ग्रंथकारांच्या अनुभवाचा व शोधाचा पूर्ण आभाव दिसून येतो. म्हणून इकडील तिकडील ठिगळापेक्षां त्यांत कांहीं जास्त नाहीं असें म्हणणें भाग येतें. यापेक्षां त्यांनीं एक तर निवळ पाश्चात्य ग्रंथांचीं किंवा आपल्या इकडील ग्रंथांची सविस्तर माहिती देण्याचा प्रयत्न केला असता तर बरें झालें असतें. कोणी कोणी तैलंगण वगैरेकडे ह्यावर उत्तमोत्तम ग्रंथ असल्याचें सांगतात; पण ह्या सांगीव पुराव्यापेक्षां त्यास दुसरा कांहीं आधार नाहीं. बेळगांवचिकोडीकडील कांहीं सामुद्रिक लोक आमचे पाहाण्यांत आले. त्यांनीं मागील सांगितलेल्या कित्येक गोष्टी जमल्या, इतकेंच नव्हे, तर भविष्यत् कालची सांगितलेलीं त्यांचीं पांच दहा फलें तंतोतंत जमलीं. परंतु ग्रंथ वगैरेची माहिती त्यांना विचारतां ‘ परंपरा ’ एवढेंच उत्तर मिळालें. “ तुमचा सर्व खर्च चालवितों, ” ह्या शास्त्राचा व विद्येचा प्रसार करण्याचा आपण सामुदायिक प्रयत्न करूं आणि सामुद्रिक ज्ञान जनतेंत फैलावून आणखीही कांहीं शोधलागल्यास पाहूं. पण हें शास्त्र गुप्त ठेवू नका. ” असेंही आम्ही त्यांना सांगितलें, पण त्यांनीं तें नाकबूल केलें. त्यांच्या आलेल्या अनुभवावरून या शास्त्रांत

चांगलेंच तथ्य आहे. अशी सर्वांची खात्री झाली. पण त्यांना हें भविष्य दोन चार वर्षांपुरतेंच सागतां येतें कीं जन्माचें सांगतां येतें ही शंका राहिलीच; आणि त्यांच्या ग्रंथांचें स्वरूप व दिशा हीही कळली नाहीं. परंतु त्यांच्या विद्वत्तेवरून ते कांहीं ग्रंथपढले असतील वाटले नाहीं, कारण त्यांस जेमतेम अक्षर ओळख होती. एकंदरींत शास्त्र जितकें प्राचीन आहे, तितकीच दुःप्रवृत्तीनें त्याची दुर्दशा, व अनवस्था आहे असें म्हणण्यास मात्र फार खेद होतो.

गेल्या चार-पांचशें वर्षांत युरोपामध्यें ह्या शास्त्रावर परिश्रम होण्यास सुरुवात होऊन आजमितीला ह्या शास्त्राला सुसंबद्ध व सुसंघटित स्वरूप प्राप्त होत चाललें आहे. इकडे आमच्या पूर्वाचार्यांनीं ह्याबद्दल जो काय तत्त्वरूप विचार केला, त्यानंतर ह्यांत कांहींही सुधारणा झाल्या नाहींत. पण ह्यांत सुधारणा न होण्याचीं दोन कारणें संभवतात. एक तें परमेश्वरानें स्वतःच सांगितलें अशी त्याची परंपरा असल्यामुळें तें पूर्णच असून त्यांत सुधारणा करण्याचें कांहीं राहिलेंच नाहीं, ही भावना. पण ही परमेश्वरी परंपरा ह्या शास्त्राचीच आहे असें नाहीं, तर ज्योतिष, वैद्यक, गायन, वेदांत, व्याकरण वगैरे शास्त्रेंच काय, पण कामशास्त्राची परंपराही अशीच नेऊन भिडविली आहे. असा प्रचार पडण्याचें कारण त्या काळीं नास्तिक मताची लाट पसरत चालली असावी व त्यामुळें ह्या शास्त्रांत ढवळाढवळ न होतां तीं जशीच्या तशींच राहावीं ह्या हेतूनें किंवा आस्तिक्यतेची परमावधि होऊन सर्व गोष्टींचें कर्तेपण परमेश्वराकडेच आहे अशा पवित्र भावनेनें हा प्रचार अथवा परंपरा सुरू झाली असावी. कोणत्याही कारणानें कां होईना, ह्या सुरू झालेल्या परंपरेच्या योगानें जितका फायदा झाला असेल त्यापेक्षां सहस्रपटीनें नव्हेंतर लाखोपटीनें आमचें नुकसान झालें आहे. ह्याच्या योगानें आमची सर्व बाजूंनीं प्रगतीच खुंटली आणि एके काळीं सुधारणेच्या व वैभवाच्या शिखराला

पोंचलेला हा आमचा देश आज त्याच्या उलट स्थितींत आलेला आहे व आमच्या उलट युरोपची स्थिति झाली आहे. असो. -ही भावना हें एक कारण किंवा मध्यंतरींच्या धामधुमीच्या काळांत स्वस्थता न सांपडल्यामुळें इकडे लक्ष देण्यास फावलें नसेल हें होय. कोणी कांहीं शोध लाविले असल्यास ते नाहींसे झाले असतील. परंतु पाश्चिमात्य शोधकांनीं, ह्या शास्त्राचीं मूलतत्त्वें म्हणून जीं ग्रथित केलीं, तीं व आमचीं अगदीं बरोबर असून कांहींचा तिकडील शोधकांना अजून शोध लागावयाचा आहे, असें म्हटलें तरीं चालेल. तेव्हां हिंदुस्थानही सामुद्रिक शास्त्राची जन्मभूमि असून आमच्या शोधकांचेंही असेंच सूक्ष्म निरीक्षण सतत चालू रहातें तर ह्या वृक्षाचीं गोड फळें आमची आम्हांस चाखावयास सांपडली असती.

## ह्या शास्त्रास सामुद्रिक हें नांव कसें प्राप्त झालें ?

युरोपमध्यें हें शास्त्र प्रथम ग्रीकांपासून चोहोंकडे फैलावलें, म्हणून हें शास्त्र तिकडे कॉयर म्हणजे कर, व मान्टिआ म्हणजे भविष्यकथन अशा अर्थपूर्णबोधक ग्रीक नांवानें प्रचारांत आहे. त्यांच्या कायर व आपल्या कर ह्या शब्दोच्चारांत व अर्थांत फार साम्य आहे, ही ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. तथापि आपल्या इकडे हस्तसामुद्रिक हें स्वतंत्र शास्त्र नसून सामुद्रिकाचा एक भाग आहे व ह्यास करशास्त्र असें नांव नाहीं. तेव्हां या साम्यापेक्षां ह्याचा इतर कांहीं संबंध नाहीं. आतां तिकडे जसें हें अर्थबोधक नांवानें प्रचारांत आहे तसेंच तें प्रथम आपल्या इकडेही प्रचारांत होतें; कारण, प्रथम ह्यास सामुद्रिक शास्त्र असें नांव नसून, लक्षणशास्त्र असें नांव होतें व त्याच्या शास्त्रज्ञांस लाक्षणिक ( लक्षणया बोधयति ठक्– ) असें म्हणत असत. वर दिलेल्या सीतादेवीच्या उद्गारांमध्यें सामुद्रिकानें सांगितलें असा कोठेंही उल्लेख नसून, लाक्षणिक असाच

उल्लेख आहे. ह्यावरून रामायणकालानंतर ह्याची व्यवस्थित मांडणी केली गेली व त्या वेळीं हें पहिलें नांव बदलून ह्याला लक्षणशास्त्रसामुद्रिक हें नांव मिळालें असलें पाहिजे. यासंबंधीं आपल्या इकडे निरनिराळ्या दंतकथा अस्तित्वांत आहेत. आमच्या पौराणिक पद्धतीप्रमाणें तें शिवांनीं पार्वतीस सांगितलें. कोणी म्हणतात भगवान् श्रीविष्णूंनीं समुद्राचें ठिकाणीं शयन केलें असतां, समुद्रानें त्यांचीं चिन्हें पाहून शास्त्र केलें. कोणी म्हणतात श्रीविष्णूंनीं समुद्र या नांवानें अवतार घेऊन, हें शास्त्र भूतलावर प्रसृत केलें, तर कोणी म्हणतात समुद्रांतून उत्पन्न झालें, म्हणून हें सामुद्रिक. एकंदरींत समुद्र या नांवाचा आणि या शास्त्राचा खास निकट संबंध आहे एवढें स्पष्ट होतें. मग तें समुद्र ऋषि सांगो, कीं समुद्रांतून निघो. परंतु ह्यास हें नांव कसें प्राप्त झालें असावें, ह्याची दंतकथा एका बाजूस ठेवून जरा बारकाईनें विचार करणें भाग आहे. कारण दंतकथा खऱ्या मानल्या तर प्रथम लक्षणशास्त्र व सामुद्रिक अशीं दोन नांवें असण्याचें कारण नव्हतें. तशीं तीं असल्यामुळें दंतकथेस विरुद्ध दिसतात. कारण दंतकथेप्रमाणें प्रथमपासून शेवटपर्यंत एकच नांव अस्तित्वांत हवें होतें. तें तसें ज्याअर्थी नाहीं त्याअर्थी खालील दोन तऱ्हेनें हें नांव यास प्राप्त होण्याचा संभव आहे असें मानावें लागतें. कोणत्याहि शास्त्राचा उत्पादक व शोधकही कोणी तरी एखादा ऋषिच असला पाहिजे, व ज्या ऋषीनें हें प्रचारांत आणलें त्याचें नांव ह्या शास्त्रास मिळालें असण्याचा फार संभव आहे. मेस्मेरिझम, हर्शल, झेपलीन, वगैरे नांवें ज्याप्रमाणें एखाद्या ग्रहास, वस्तूस, किंवा शास्त्रास त्या त्या उत्पादकांवरून मिळाल्याची आपणांस माहिती आहे, तसेंच ह्या शास्त्रासही असें नांव मिळालें असें मानल्यास अस्थानीं होणार नाहीं. आतां दुसरें अनुमान शब्द व्युत्पत्तीवरूनः—मुद्रा म्हणजे खुणा

अशा खुणांनीं युक्त जें शरीर, व त्या शरीरचिन्हांवरून सांगण्याचें जें शास्त्र तें लक्षणशास्त्र, अशा अर्थबोधक नांवानें प्रचरांत आलें असावें. ह्या दोन अनुमानांशिवाय, तिसरे सयुक्तिक असें आणखी अनुमान निघूं शकत नाहीं. आतां ह्या वरील दोन अनुमानांचा विचार करितां दुसऱ्यापेक्षां पहिलेंच अनुमान जास्त संभवतें. " कारण मुद्राभिः सहितं समुद्रं शरीरं " आणि तत्संबंधीं जो ग्रंथ तो सामुद्रिक ग्रंथ, असा अर्थ घेतला असता; पण समुद्र म्हणचे शरीर, असा देहवाचक अर्थ रुढ झालेला संस्कृत वाङ्मयांत कोठें दिसत नाहीं. नाहीं तर तो तसा असावयास पाहिजे होता. पण तो तसा नसून " सामुद्रं देहचिन्हं " असा शब्द रुढ झालेला आहे. शब्दव्युत्पत्तीवरून या नांवाचा मेळ बसत नाहीं. तो मेळ बसला असतां तर मात्र ह्या शास्त्रास हें नांव कसें प्राप्त झालें हें ठरविणें कठीण झालें नसतें. आणि समुद्र ऋषीनें केलें म्हणून हें सामुद्रिक किंवा मुद्रायुक्त असें जें हें शरीर त्या मुद्रांवरून अथवा चिन्हांवरून मानवी स्वभाव अथवा सुखदुःखें सांगण्याचा व्यासंग किंवा अभ्यास करणारा मनुष्य तो सामुद्रिक, असे दोन्हीही अर्थ संभवतात व पहिल्या कल्पनेस जसा समुद्र या आडनांवाचा आधार मिळाला आहे, तसाच धंद्यावरून आडनांव प्राप्त झाल्याचा पुरावा आपल्यांतील जोशी हें आडनांव देत आहे. कारण हें आडनांव त्यांच्या ज्योतिषव्यवसायावरूनच मिळालेलें आहे, आणि मग शास्त्रावरून व्यक्तीस किंवा व्यक्तीवरून शास्त्रास " हीं दोन्हीं कारणें सयुक्तिक व साधार होऊन, जी कल्पना करावी तीं खरींच असें मानणें भाग पडलें असतें; तथापि शब्दव्युत्पत्तीवरून याचा मेळ बसत नाहीं हें एक कारण व सर्वत्र ( समुद्रेण प्रोक्तं वेत्त्यधीते वा टञ् ) समुद्रानें सांगितलेलें, इति समुद्रः । समुद्रेण स्वहृदि विचिन्त्य समुद्रः कृतवान् " असेच उल्लेख असल्यामुळें आणि प्रारंभीं लक्षणविद्या असें नांव आहे, तेव्हां समुद्र

ऋर्षीनेंच ह्याची व्यवस्थित मांडणी करून हें प्रचारांत आणलें, व त्याचें नांव ह्या शास्त्रास मिळून तेंच सामुद्रिक ह्या नांवानें प्रचारांत रूढ झालें असें मानणें भाग पडतें. तथापि मुद्रा म्हणजे चेहरा, मुद्रा म्हणजे रेषा व मुद्रा म्हणजे सर्व शारीर चिन्हें ह्या शब्दव्युत्पत्तीच्या अर्थांचाही या नांवांत पूर्णपणें बोध होत आहे, व दोन्ही अर्थ मोठ्या खुबीनें या नांवांत साधले आहेत. असो, आतांपर्यंत हें शास्त्र म्हणजे काय, तें कसें अस्तित्वांत आलें असावें, त्यांत कोणकोणत्या गोष्टींचा समावेश होतो, तें प्रथम कोठें निर्माण झालें व त्यास सामुद्रिक हें नांव कसें मिळालें वगैरे गोष्टींचा आपण विचार केला.

## स्त्रीपुरुष भेद

शास्त्रामध्यें याचा प्रथम स्त्री आणि पुरुष असा मुख्य भेद केला आहे. व तो त्यांच्या शरिरांची ठेवण, प्रकृतिधर्म व स्वभाववैशिष्ट्य यांस अनुसरून केलेला आहे. आपल्याकडे तर हा भेद स्पष्टपणें लक्षांत रहावा व फल निर्देशाचा घोटाळा होऊं नये म्हणून ज्योतिषांत स्त्रीजातक, सामुद्रिकांत स्त्रीसामुद्रिक अशीं यांचीं स्वतंत्र प्रकरणेंच केलीं आहेत. कांहींनीं स्त्री, पुरुष आणि बालक असे तीन भेद केले आहेत, व तिसरा भेद करण्याचीं दोन कारणें दिलीं आहेत. पहिलें कारण असें आहे कीं " बालक चौदा वर्षांचें होईपर्यंत त्याची प्रकृति स्त्रीस्वभावास अनुसरून रहाते आणि दुसरें कारण सर्व रेषा ह्या वयापुढेंच हातावर उमटतात. तेव्हां लहानपणीं बालकांना स्त्रीसामुद्रिकाचें नियम लावावेत व मोठेपणीं पुरुषसामुद्रिकाचे नियम लावावेत; पण असा भेद करण्याबद्दल दिलेल्या दोन्हीं कारणांचा विचार केला तर तीं कारणें बरोबर नाहींत असें दिसतें. कारण बालक या सदरांत मुलगे आणि मुली दोन्ही येतात, त्यांपैकीं मुली लहान असल्या काय व मोठ्या झाल्या काय त्यांचा स्त्रीस्वभावधर्म कायमच

असणार; तेव्हां त्यांचे बाबतींत हा तिसरा भेद होऊं शकत नाहीं. आतां राहिले फक्त मुलगे; त्यांचा विचार केला तर लहानपणीं ते स्त्रीस्वभावास अनुसरून असतात असें जरी धरलें तरी त्याबरोबरच लहानपणीं त्यांच्या अवयवांची ठेवणहि स्त्रियांसारखी असते व पुढें तींत एकदम पालट होऊन पुरुषांप्रमाणें बनते असें मानावें लागेल; पण वस्तुस्थिति तशी नसल्याकारणानें वरील म्हणणें अयुक्तिक दिसतें. आतां आमच्या मतें ह्या वयांत मुलांची स्थिति स्त्रियांप्रमाणें परावलंबी असते व ह्या एकाच दृष्टीनें फक्त मुलांचे बाबतींत बालक असा तिसरा भेद करतां येईल; पण ही परावलंबनाची स्थिति त्यांच्या कर्तृत्वशक्तीवर अवलंबून असल्यामुळें, व ही शक्ति कोणांस केव्हां येईल यास वयोमर्यादा घालणें कठीण असल्याकारणानें, बालक असा भेद करण्यापेक्षां पूर्ववयांत कर्तृत्वशक्ति येईपर्यंत असा भेद केल्यास तो सयुक्तिक होईल. आतां लहानपणीं सर्व रेषा उमटलेल्या नसतात या कारणाचा विचार केला तर, रेषा जर पूर्णपणें उमटलेल्याच नसतात तर कोणत्याहि नियमाप्रमाणें बालकांचा विचार केला तरी पूर्ण रेषांचे अभावीं त्यांचीं फलें तरी निरपवाद काय सांगणार ? त्यांत जेवढ्या रेषा स्पष्ट असतील तेवढ्यांचीच फलें सांगतां येतील. शास्त्रकारांनीं—

नैसर्गिकं कालजं च चिन्हं नैमित्तिकं तथा
कालदेशानुमानेन ज्ञात्वा फलमुदीरयेत् ॥

जन्मसिद्ध, कालमानानें उत्पन्न होणारी, कांहीं निमित्तानें झालेली खूण, यांचीं फलें, काल, देश व वर्तमान स्थिति लक्षांत घेऊन सांगावींत असें सांगितलें आहे. परमेश्वरानें हातावर उत्पन्न केलेल्या रेषा, भविष्य समजावें म्हणूनच केलेल्या आहेत असें जर मानावयाचें असलें तर, लहान मुलांच्या हातांवर त्या पूर्णपणें उमटत नाहींत, असें म्हणणें अशास्त्रीय अतएव चुकीचें होय. रेषा

जातात व येतात हें दोहोंकडील शास्त्रज्ञांना मान्य आहे. आणि असें जर आहे, तर मग पुरुष, स्त्री, बाल, वृद्ध कोणी असो त्यांच्या हांतावर सर्व रेषा एकदम उमटभलेल्या सांपडावयाच्या नाहींतच; तर कालमानाप्रमाणें भविष्यसूचक अशीं चिन्हें निर्माण व्हावयाचीं व त्यांचें काम झालें कीं तीं नाहींशीं होऊन त्यांच्याऐवजीं पुढील कालदर्शक अशीं दुसरीं चिन्हें यावयाचींच. असा ह्या चिन्हांचा क्रम असल्यामुळें हें दुसरें कारणहि अजीबात लंगडे पडतें, हें ध्यानांत येतें. आणि वरील कारणें चुकीचीं आहेत असें ठरलें कीं हा केलेला तिसरा भेदहि आपोआपच चुकीचा ठरतो. लहानपणीं शरिराची वाढ व्हावयाची असते आणि त्यामुळें बऱ्याच अवयवांचे आकार पूर्णपणें प्रगट झालेले नसतात आणि ह्या कारणांमुळें रेषांशिवाय अवयवांच्या ठेवणीवरून निघणारीं अनुमानें सांगणें कठीण असतें; तेव्हां तशीं फलें सांगतांना त्याचा नीट विचार केला पाहिजे. उदाहरणार्थ, लहानपणीं कांहीं मुलें नकटीं किंवा आखुऱ्या नाकाचीं दिसतात व मोठेपणीं त्यांचीं नाकें सरळ निघतात, अशावेळीं त्या त्या अवयावरून केलेलीं अनुमानें चुकल्यावाचून रहाणार नाहींत.

## हस्तनिरीक्षण

आपल्याकडे स्त्रियांचा डावाच व पुरुषांचा उजवाच हात पहावा असा नियम नव्हे प्रचार पडला आहे. आपलें सामुद्रिक, प्रत्यक्ष स्त्रीचा डावाच व पुरुषांचा उजवाच हात पहात असतांना व त्याला ग्रंथोक्त अधार असतांना आम्ही हा शास्त्रीय नियम नसून रूढि आहे असें जें म्हणतों तें उगाच कांहीं तरी नसून त्याला चिकित्सेचे बरेच आधार आहेत. स्त्रीचा डावाच व पुरुषाचा उजवाच हात पहावा असा जर नियम नसता, तर एक ग्रंथकार एक नियम देत-असतांना दुसरा विशेषें करून पहावा असें सांगतांना, त्याच्या विशेषेंकरून या शब्दानें असें ध्वनित होतें कीं, दोन्ही हात पहावेत;

पण हात पहातेवेळीं स्त्रीच्या डाव्या व पुरुषाच्या उजव्या हातास प्राधान्य द्यावें, व तें आमच्या मतें सयुक्तिक आहे. गर्गांनीं तर असा भेद करण्याचें कारणच नाहीं असें सांगितलें आहे. तेव्हां असें मतांतर असतांना बाकीचीं मतें नाहींशीं होऊन स्त्रीचा डावा व पुरुषाचा उजवाच हात पाहण्याचा आपलेकडे, हा जो सरसहा परिपाठ पडला आहे त्याचें कारण काय असावें असा साहजिक प्रश्न उद्भवतो व त्याचा विचार करावयाचा म्हणजे अगोदर ही पद्धत शास्त्रांतर्गत कारणांमुळें पडली आहे कीं बाह्य कारणामुळें पडली आहे हें पाहिलें पाहिजे; कारण शास्त्रांतर्गत आहे असें मानल्यास हा नियम ज्या ठिकाणीं दिला आहे तेथें अगर इतरत्र त्याची उपपत्ति अथवा कारण सांपडावयास पाहिजे. पण तें तसें सांपडत नाहीं. शिवाय ह्या नियमाला बरेच विरोध असून तो नियमहि सयुक्तिक नसल्यामुळें हा शास्त्रीय नियम आहे असें मानतां येत नाहीं; तेव्हां त्यास कांहीं तरी बाह्य कारण असावें असें ठरतें. आतां ज्या बाह्य कारणामुळें ह्या शास्त्रांत ही पद्धत पडली असेल, त्याच कारणाचा धागा कारणबाह्य असल्यामुळें हातांचा निकट संबंध येणाऱ्या इतर शास्त्रांतहि सांपडावयास पाहिजे व त्या दृष्टीनें पाहिलें असतां ह्या सामुद्रिक शास्त्राप्रमाणें आपल्याकडे वैद्यशास्त्रांत नाडीज्ञानाशीं ह्या हातांचा फार निकट संबंध येतो व तेथेंहि ही पद्धति असलेली दृष्टीस पडते. असें दृष्टीस पडल्यानंतर ह्या शास्त्रांत तरी ह्या पद्धतीला कांहीं शास्त्रीय आधार सांपडतो कीं काय म्हणून पाहिलें असतां तेथेंहि त्यास कांहीं आधार तर सांपडत नाहींच; पण ही केवळ रूढि असून ती दोन्ही शास्त्रांत कशी शिरली ह्याचा मात्र नीट उलगडा होतो. सामुद्रिकांत ह्या रूढीचा प्रवेश झाल्याबद्दल विशेष आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं; पण वैद्यशास्त्रांत तिचा जो प्रवेश झाला आहे तो पाहिला म्हणजे मात्र ही रूढि पडण्याला

फार सबळ कारण असलें पाहिजे व ह्या वैद्यशास्त्रावरहि अम्मल बसविण्याइतकें सामर्थ्य धार्मिक समजुतीशिवाय दुसऱ्या कशांत आहे असें आम्हांस वाटत नाहीं. धर्मशास्त्रच ह्या रूढीस कारण असावें असें आम्हांस वाटतें व तें कसें सयुक्तिक आहे हें पुढील विवेचनावरून ध्यानांत येईल.

आपल्यांत विवाह्याचे वेळीं स्त्रीच्या उजव्या हाताचें "पाणिग्रहण" केलें जातें व एकदां धर्मे च, अर्थे च, कामे च नातिचरामि असें म्हणून अर्धांगी या नात्यानें पतीच्या स्वाधीन केलेल्या ह्या हातास केव्हांहि व कोणत्याहि कारणानें परपुरुषाचा स्पर्श होऊं द्यावयाचा नाहीं, ही अत्युच्च कल्पना वरील परिपाठांचें कारण होय. ह्या धर्माच्या पाठिंब्यामुळें ह्या कल्पनेचा इतका कांहीं प्रसार झाला कीं, उजवा हात पहातां येत नाहीं म्हणून डावा हात पहावयाचा ही जी मूळ भावना ती एका बाजूस राहून स्त्रीचें सर्वच डावें अंग शुभाशुभदर्शक आहे; तेव्हां कोणत्याहि अवयवांचीं फलें पहातांना, डावे बाजूस असलेलीं चिन्हें पाहून फलें सांगावींत व उजव्या बाजूचीं चिन्हें निष्फल होत ( पल्लीसरटपतन, नेत्रस्फुरण वगैरे प्रकरणें पहावींत म्हणजे ध्यानीं येईल ) असें मानण्याचा प्रघात पडला ! आतां वैद्याला जर स्त्रीची नाडीपरीक्षा करावयाची असेल, तर त्यानें स्त्रियांच्या डाव्या नाडीनें काय समजेल तें समजून घ्यावें. पायाची नाडी पाहाणें असल्यास तीहि डाव्या पायाची पहावी असें सांगितलें आहे, व त्याचीं कारणें देतांना शास्त्र आणि स्वानुभव या दोहोंची भक्कम जोड त्यास असतांना आणखी संप्रदाय ( रूढि ) हें पद ज्याअर्थी घालावें लागलें त्याअर्थी धार्मिक कल्पनेशिवाय अशा गोष्टीला थारा मिळणें कठीण आहे असें मानण्यास कांहींहि हरकत दिसत नाहीं. ही कल्पना दोन्ही शास्त्रांत कशी रूढ होत गेली हें ध्यानांत येण्यासाठीं पुढें तुलनात्मक कोष्टक देत आहोंत.

| नंबर. | वैद्यक. | सामुद्रिक. |
|---|---|---|
| १ | वाग्भट, चरक, वगैरेंचे वेळेस नाडीपरीक्षाच नव्हती; नंतर ती सुरूं झाली व त्यांत पुढीलप्रमाणें फरक होत गेले. | रामायणकालीं हस्तसामुद्रिक नव्हतें; नंतर तें सुरूं झालें व त्यांत पुढीलप्रमाणें फरक होत गेले. |
| २ | नाडीमंगुष्ठमूलाधः स्पृशेद्दक्षिणगे करे । ज्ञानार्थं रोगिणो वैद्यो निजदक्षिणपाणिना ॥<br><br>वैद्य नें उजव्या हातानें रोग्याच्या रोगाचें ज्ञान व्हावें म्हणून उजव्या हाताची नाडी पहावी. | अथातः संप्रक्ष्यामि गर्गसामुद्रसंग्रहं । स्त्रीणां च पुरुषाणां च फलसाम्याय कल्पते ॥<br><br>स्त्री-पुरुष या उभयतांना एकच फल (लागू केलें आहे) ज्यांत सांगितलें आहे असें गर्गसामुद्रिक सांगतो. |
| ३ | प्रायः स्फुटा भवति वामकरे वधूनां । पुंसां च दक्षिणकरे तदियं परीक्षा ॥<br><br>स्त्रीच्या डाव्या व पुरुषाच्या उजव्या नाडीवरून प्रायः बोध होत असल्यामुळें ती ती नाडी पहावी. | विशेषाद्दक्षिणः पुंसां वामः स्त्रीणां तथा स्मृतः। रेखा निसर्गजा यत्र काले नैमित्तिकस्तथा ॥<br><br>विशेषेंकरून स्त्रीचा डावा व पुरुषाचा उजवा हात पहावा. |
| ४ | स्त्रीणां भिषग्वामहस्ते वामे पादे च यत्नतः । शास्त्रेण संप्रदायेन तथा स्वानुभवे न वै ॥<br><br>स्त्रीच्या डाव्या हाताची व डाव्या पायाची नाडी, शास्त्र, स्वानुभव व संप्रदाय म्हणून पहावी. | वामहस्ते तु नारीणां पुरुषाणां च दक्षिणे । चिन्हं निरूपयेद्धीमान् समुद्रवचनं यथा ॥<br><br>बुद्धिमान सामुद्रिकांनीं स्त्रीच्या डाव्या व पुरुषाच्या उजव्या हातावरील चिन्हें पाहून फलें सांगावींत. |

टीपः—वरील क्रमांकावरून ही पद्धति सुरू झाल्यावरून दोन्हीं शास्त्रांत प्रथम डावा उजवा असा भेद नव्हता. नंतर डावा उजवा हात आणि नाडी प्राधान्यैंकरून पहावी असें सांगून त्या त्या हातांना प्रधान्य दिलें आहे, आणि सरतेशेवटीं डावाच हात व डावीच नाडी पहाण्याचा सरसहा परिपाठ पडला.

सामुद्रिकांत अशी निसर्गाची आडकाठी नसल्यामुळें ह्या शास्त्रांत तिचें बरेंच प्रस्थ माजलें. वस्तुतः अशास्त्रीय, पण शास्त्रीय गणली गेलेली ही समजूत इतकी अंगवळणी पडली आहे कीं, सामुद्रिकाकडे गेल्याबरोबर, स्त्रीपृच्छक असल्यास डावा व पुरुषपृच्छक असल्यास उजवा हात त्यानें मागण्याचे पूर्वींच पुढें करितो. आणि एखाद्या अडाण्यानें भलताच हात दाखविल्यास त्याची झालेली चूक आमचे सामुद्रिकबुवा दुरुस्त करून ह्या डाव्याउजव्याचें शास्त्रीयत्व त्यांस समजावून देतात. आणि त्या नियमाप्रमाणें फलें सांगतांना दृष्टीस पडतात. मग सामान्य माणसाची तशी समजूत झाल्यास त्यांत नवल काय. शिवाय असा नियम असतां तर स्त्रीसामुद्रिकांत, " पाणिद्वयं शास्तं, " " पाणियुगलं स्निग्धं " असा ( एकाचें फळच नाहीं तर ) उल्लेख करण्याचें कारण नव्हतें. व असा उल्लेख ज्याअर्थीं आहे त्याअर्थीं दोन्ही हात पाहिले पाहिजेत असें ठरतें. नुसते हातच काय पण डाव्या बाजूच्या चिन्हांचींच फलें घ्यावींत हें म्हणणें सुद्धां शास्त्रकारांस मान्य नसून त्यांनी बाजूचा विचार केला आहे. दोन्ही आणि डाव्याउजव्या दोहोंचींहि बरीं वाईट फलें विचारांत घेतलीं आहेत.

ऱ्हस्वत्वे दक्षिणांगस्य भविता कीर्तिशालिनी ।
वामांगस्य तु दुष्कीर्तिं प्राप्नुयात् पुंश्चली भवेत् ॥

स्त्रीच्या शरिराचा उजवेकडील कोणताहि भाग डावेकडील अंगच्या भागापेक्षां लहान असल्यास कीर्तिमान् होईल व ह्याच्या उलट स्थिति असल्यास ती कजाग होऊन अपकीर्ति संपादन करील. असो, एकंदरींत विचार करतां दोन्ही हात पाहून फलें सांगावींत पण हात पहातांना स्त्रीच्या डाव्या व पुरुषाच्या उजव्या हातास प्राधान्यत्व द्यावें असा निष्कर्ष निघाला व याखेरीज बाकीच्या पद्धति चुकीच्या आहेत असें ठरलें.

## पाश्चात्य पद्धति.

पाश्चात्त्यांची पद्धति म्हणण्यापेक्षां ह्यासंबंधींचे त्याचे विचार असें म्हटलें असतां जास्त सयुक्तिक होय. त्यांच्याकडे आपल्यासारखा असा भेद रूढ नसून त्यांचे विचार पुढीलप्रमाणें आहेत. हात पाहिल्याबरोबर ज्याअर्थी दोन्ही हातांवर रेषा असून त्या एकसारख्या नसतात त्याअर्थी दोन्हीं हात पहावेत असें लक्ष्यांत येतें, व त्याप्रमाणेंच दोन्ही हातांचें सूक्ष्म अवलोकन केल्यास, कोणत्याहि कृत्यास आरंभ करण्यांत ह्या हाताची बहुतेक आघाडी असते. तसेंच प्रत्येक कार्यासंबंधींच्या बऱ्यावाईट सूचनांची वर्दीहि अगोदर ह्या हातांपासूनच मिळते. आणि डावा हात त्याचा मदतनीस म्हणून त्यांना दृष्टीस पडतो. एकंदरींत डावा हात, उजव्याचे मानानें पहातां निष्क्रियच आहे असें मानण्यास हरकत नाहीं. आणि ह्या भेदाप्रमाणें, आपणाला डाव्या हातावर क्रियारहित विचारांचे अवशेष व निरुद्योगीपणाचीं चिन्हें अधिक सांपडतील.

जर डाव्या हातावरील चिन्हें, सप्रमाण व व्यवस्थेशीर आहेत असें आढळलें तर आपण मनाशीं खुशाल खूणगांठ घालावी कीं स्वारी आळशी आहे. हे योजना करितील; पण ती तडीस न्यावयास, अगोदर यांना एक योग्य माणूस पैदा करून द्यावयास पाहिजे.

कारण यांचें बहुतेक यश स्वतः प्रयत्न करून संपादन करण्यापेक्षां तें सर्वस्वी दुसऱ्यावरच अवलंबून असतें.

उजव्या हातावरील चिन्हें सप्रमाण व व्यवस्थित असलीं तर असलीं माणसें तडफदार स्वभावाचीं असून तीं उद्यां दैव उघडावयाचें आहे म्हणून कधींहि वाट पहात बसावयाचीं नाहींत. त्यांचें यश म्हणजे, उठावयाचें व मनापासून झटून उद्योग करावयाचा आणि भगीरथ प्रयत्न करून, येणारें दुर्दैव अथवा सुदैव यांशीं टक्कर द्यावयाची व आपलें नशीब उदयाला आणण्याचा प्रयत्न करावयाचा. मग जें व्हावयाचें असेल तें होवो. त्याच्या उलटच डाव्या हातावरील चिन्हें स्पष्ट असणाऱ्या माणसांची स्थिति होय, त्यांच्या शांत वृत्तीचा त्यांना काय फायदा मिळेल तेवढाच. कारण त्यांना दैव केव्हां उघडेल याची वाट पहात बसावयाचें असतें; पण प्रयत्न करावयाचा नसतो. उजवा हात पुढारी तर डावा हात त्याचा अनुयायी होय. आपणास व्यवहारांत पुढारी व अनुयायी यांमध्यें जितकें अंतर दिसतें, तितकेंच अंतर या दोन हातांच्या माणसांत असतें. पुढारी माणूस प्रयत्नाची कांस धरणारा, तर अनुयायी दैवावर हवाला ठेवणारा; पुढारी अनेक युक्त्या प्रयुक्त्या शोधून काढून त्यांना स्वतःच मूर्त स्वरूप देऊन त्या तडीस नेऊन दाखविणारा, तर अनुयायी डोक्यांत उत्तमोत्तम नानाफडनविशी योजना तयार करून त्या अमलांत आणणारा कोणी भेटतो कीं काय ह्याची वाट पहात बसणारा. अशा प्रकारची एकाची स्वावलंबी तर दुसऱ्याची परावलंबीपणाची वागणूक असते ) स्वभाव असतो ) असें हें ह्या दोन हातांच्या माणसांत अंतर दृष्टीस पडतें. एकंदरींत डाव्या हातावर स्पष्ट चिन्हें असणारीं माणसें "आयत्या बिळांत नागोबा" या म्हणीप्रमाण नशीबवान असतात. बापजाद्यांनीं मिळवावें व ह्यांनीं स्वस्थ बसून खावें, अशी तरी एक स्थिति असते, किंवा जन्मतः दरिद्री असल्यास केवळ

नशिबानें, "माणकेश्वराप्रमाणें" एकदम कथेकऱ्याचे दिवाण बनून उदयास आलेले असतात. कामाचा खंडीभर बोजा आहे, असा रात्रंदिवस ते जप करीत बसतील; पण इकडची काडी तिकडे करतील तर शपथ, पण तीं एकंदर शिकंदर नशिबाचीं ( विशेषतः ज्यांच्या डाव्या हातावर ही नशिबाची रेषा स्पष्ट व चांगली असते तेव्हां ) असल्यामुळें त्यांचें कांहींहि अडत नाहीं. बडे बडे संस्थानिक, राजघराण्यांत किंवा मोठ्या कुलांत जन्म झाल्यामुळें मोठेपणा प्राप्त झालेले लोक हे सर्व ह्या सदरांत येतात. ह्याच्या उलट उजव्या हाताची गोष्ट होय. त्याला चार पैसे मिळवावयाचे असोत, कीं राज्य संपादन करावयाचें असो; मजुराप्रमाणें रात्रंदिवस राबावें लागून हाडांचीं काडें करावीं लागतात. छत्रपति शिवाजीमहाराज, समर्थ, नेपोलियन, शिकंदर हे या वर्गांत येतात. या वर्गांतलीं आपणांस ताजीं उदाहरणें हवीं असल्यास लो. टिळक, लाइड जार्ज व बेझंटबाई यांचीं होत. वाचकांनींहि आपले हात पाहून ह्या दोन वर्गांपैकीं ते कोणत्या वर्गांत येतात हें आपल्या मनाशीं ठरवावें.

## स्त्रीच्या डाव्या व पुरुषाच्या उजव्या हातास प्राधान्य कां द्यावयाचें ?

हा दोन्हीं हातांतील फरक आपणांस एकदां कळला म्हणजे आपल्या पूर्वाचार्यांनीं "स्त्रियांच्या डाव्या हातास व पुरुषांच्या उजव्या हातास प्राधान्य देण्याबद्दल कां सांगितलें याचा उलगडा होतो." सर्व जगांतील स्त्रियांकडे पाहिलें असतां त्यांच्या शरिराची ठेवण व प्रकृतिधर्म यांवरून त्यांच्याकडे नैसर्गिक परावलंबन आहे असें दिसतें व त्यांचें भाग्य वगैरे गोष्टी बऱ्याच अंशीं दुसऱ्यावर अवलंबून असतात. विवाह होतांच पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या आयुष्यामध्यें फार फरक होतो. पति कलेक्टर असल्यास ही कलेक्टरीण, जहागीरदार असल्यास जहागीरदारीण, राजा असल्यास

राणी, कारकून, शिपाई, आचारी अगर पाणक्या असल्यास स्त्रियांना तो तो दर्जा प्राप्त होतो, म्हणजे प्रयत्नाशिवाय त्यांना आयतें भाग्य प्राप्त होतें. दारिद्र्य यावयाचें असल्यास तेंहि आयतेंच येतें आणि हें कार्य डाव्या हातावरील चिन्हांचें असल्यामुळें स्त्रियांच्या डाव्या हातास प्राधान्य देण्याबद्दल आमच्या शास्त्रकारांनीं सुचविलें. तसेंच पुरुषाची शरीराची ठेवण व प्रकृतिधर्म यांवरून त्याच्याकडे नैसर्गिक स्वावलंबन आहे असें दिसतें आणि काबाडकष्ट केल्याशिवाय त्यांना स्त्रियांसारखें फुकट भाग्य फारच क्वचित् लाभतें व हें लक्षण उजव्या हातावरील चिन्हांचें असल्यामुळें आमच्या शास्त्रकारांनीं केलेली सूचना किती यथार्थ आहे याची आपणास नीट कल्पना होईल. मात्र हा भेद पाश्चात्त्यांच्या ध्यानांत आलेला नाहीं. आतां येथें एवढें सांगून ठेवलें पाहिजे कीं, मनुष्य डावरा असल्यास ह्याच्या उलट समजावें म्हणजे त्या ठिकाणीं डावा हात हा प्रधान हात समजून उजवा हात गौण समजावा. तसेंच स्वतःच्या बुद्धिमत्तेवर अथवा कौशल्यावर उदरनिर्वाह करणाऱ्या स्त्रियांच्या उजव्या हातास प्राधान्य द्यावें आणि स्त्रीस्वभावी पुरुषाचे डाव्या हातास प्राधान्य द्यावें. कांहींजणाचें असें मत आहे कीं, डाव्या हातावरून भूतकालीन गोष्टी कळतात व उजव्या हातावरुन भविष्यकालीन गोष्टींचा बोध होतो; पण उपपत्तीच्या दृष्टीनें ही कल्पना सयुक्तिक दिसत नाहीं.

## हात केव्हां पहावा ?

आपल्या इकडे हात केव्हां पहावा ह्यासंबंधीं विशेष असे कांहीं नियम दिलेले नाहींत. तथापि ज्योतिषी वगैरे लोकांना प्रश्न केव्हां विचारावा व त्यांच्याकडे केव्हां जावें ह्यासंबंधीं परंपरागत पुढीलप्रमाणें नियम आहेत. सामुद्रिकशास्त्र हें त्याचपैकीं असल्याकारणानें तेच नियम ह्या शास्त्रास लावण्यास कांहीं हरकत नाहीं. (१) स्नान

केल्याशिवाय अमंगळपणानें हात दाखवूं नये. (२) दुपारीं जेवण झाल्यावर १२ ते ३ पर्यंत हात दाखवूं नये. (३) संध्याकाळ झाल्यानंतर दिवस उगवेपर्यंत हात दाखवूं नये. येणेंप्रमाणें नियम आहेत. पाश्चात्यांनीं पुढीलप्रमाणें नियम दिलेले आहेत. (१) हात अगदीं स्वच्छ धुतलेले असावेत. तसेंच अति भोजन व अति व्यायाम केला असल्यास हात पाहूं नये. कारण ह्या वेळीं रेषांचा मूळचा रंग पालटलेला असतो काम केल्यावर हात धगधगीत व वाजवीपेक्षां जास्त लाल होतात असा आपणासहि अनुभव आहे. तसेंच कडक उन्हाळा व कडक हिंवाळा पडला असतांना हात पाहूं नये; कारण उन्हाळा फार असल्यास रेषा जास्त लाल दिसतात, तर थंडीच्या कडाक्यामुळें रक्त गोठत असल्याकारणानें हातांवरील रेषा फिक्कट दिसतात. दारू आणि मिष्टान्न यांच्या योगानें इंद्रियें स्वाभाविकपणें जास्त उत्तेजित होत असल्याकारणानें तळव्यावरही याचा परिणाम साहजिकपणेंच घडतो. ह्याशिवाय वय, जात, शरीरप्रकृति व ठेवण इतक्या गोष्टी विचारांत घेऊन स्वभाव वगैरे सांगण्याचा प्रयत्न जर "सामुद्रिक" करील तर आरशामध्यें ज्याप्रमाणें कोणासहि त्याचें प्रतिबिंब दाखवितां येतें, त्याचप्रमाणें ह्या हस्तरूप आदर्शांत पृच्छकाच्या स्वभावाचें हुबेहूब चित्र दाखवितां येईल. तेव्हां हात पाहतांना वरील नियम लक्षांत ठेवावेत. आतांपर्यंत आपण स्त्री आणि पुरुष, डावा व उजवा हात त्यांतील भेद, स्त्रीच्या डाव्या हातास कां प्राधान्य द्यावयाचें व हात केव्हां पहावा ह्याचा विचार केला. आतां हात केव्हां पहावा हें समजल्यानंतर तो कसा पहावा हें समजण्याची साहजिक इच्छा उत्पन्न होते, पण हाताच्या इतर भागांची माहिती झाल्याशिवाय हा प्रश्न समजाऊन देतां येणें कठीण असल्याकारणानें अगोदर त्याचा विचार केला पाहिजे.

# सामुद्रिक-तिलक

सिद्धिदं सर्वकार्याणां चंडविघ्नविनाशकम् ।
गणानां नायकं वंदे श्रीमत् सिद्धिविनायकम् ॥ १ ॥
विश्वनियामकपरमेश्वरवाचं नाम वेदवाणीं ताम् ।
विद्यादेवीमादौ प्रणमामि श्रीसरस्वतीं चैव ॥ २ ॥

सर्व कार्यांची सिद्धि घडवून आणणारा आणि प्रचंड विघ्नांचा चक्काचूर करणारा असा जो गणांचा नायक श्रीसिद्धिविनायक त्यास आणि जगन्नियंत्या परमेश्वराची वाणी अर्थात् वेदवाणी श्रीसरस्वती विद्यादेवीस आम्ही प्रथम वंदन करतों.

रामायणप्रणेता च महाभारतलेखकः ।
लल्लो भट्टोत्पलश्चैव गर्गभास्करनारदाः ॥ ३ ॥
वराहमिहिराचार्यस्तथा व्यासः पराशरः ।
एते सामुद्रिके शास्त्रे दिव्यशक्तिसमन्विताः ॥
तान् सर्वान् प्राक्तनाचार्यान् प्रणमामि पुनः पुनः ॥४॥

महाभारतकार व्यास, रामायणकार, तसेंच वराह मिहिराचार्य, गर्ग, पराशर, लल्ल, नारद, भट्टोत्पल, भास्कराचार्य इत्यादि प्राचीन आचार्य आणि सामुद्रिक शास्त्राचें दैवी सामर्थ्यसंपन्न प्रणेते यांना आमचें वंदन असो.

मातरं पितरं वंदे तथा च कुलदेवताम् ।
सिद्धसाध्यात्मकीं चैव देवतां, ज्ञानदं गुरुम् ॥ ५ ॥
ऋग्वेदकालात् गूढानि तत्त्वानि प्रसृतानि यैः ।
हस्तसामुद्रिकादीनां वंदेऽहं तान् महात्मनः ॥ ६ ॥

मातापिता आणि कुलदेवता, त्याचप्रमाणें सिद्ध व साध्य देवता आणि ज्ञानगुरू या सर्वांस आमचें वंदन असो.

वेदकालापासून आज तागायत ज्यांनीं हस्तसामुद्रिक, शीर्ष-सामुद्रिक, मुखपरीक्षा, शारीर चिन्ह, लक्षण इत्यादि गूढ व परमोपकारक भविष्यकथन शास्त्राचीं मूलतत्त्वें जगतीतलावर स्थापन व प्रवृत्त केलीं त्या महान् पुण्यात्म्यांस, दैदिप्यमान् दैवी तपःसामर्थ्य-संपन्न महापुरुषांस आमचे शतशः प्रणाम असोत.

यत्र मूलानि वै संति भविष्यकथनस्य च ।
तान् वेदादीन् महाग्रंथानीशनिःश्वसितान् तथा ॥ ७ ॥
वराहमिहिराचार्यादिभिरंगीकृतानि च ।
मूलतत्त्वान्यनुःसृत्य सारमुध्दृतवानहम् ॥ ८ ॥
उपदेशितानि तत्त्वान्याचार्यैः प्राकृतनैर्यथानुभवम् ॥
संशोधनानि तद्वत् यान्यर्वाचीनपंडितकृतानि ॥ ९ ॥
संग्राह्यतानि सर्वाणि यथातथ्यं मया यथाज्ञानम् ।
सामुद्रिकतिलकोऽयं ग्रंथो लोकोपकारको रचितः ॥१०॥

ऋग्वेद, महाभारत, रामायण इत्यादि प्राचीनांत प्राचीन अशा ईश्वरोपन्न महाग्रंथांत ज्या गूढ भविष्यकथन तत्त्वांचा निर्देश आला आहे. त्यांना आणि वराहमिहिर, भट्टोत्पल, गर्ग, पराशर, नारद, इत्यादि महान् ग्रंथकारांच्या मूलभूत तत्त्वांना अनुसरून ह्या ग्रंथांत सामुद्रिक शास्त्राचा सारभूत संग्रह केला आहे. याचें सर्व श्रेय व कारकत्व प्राचीन आचार्यांच्या दिव्य दृष्टीला आहे.

प्राचीन आचार्यांनीं प्रत्यक्ष अनुभवानें दिग्दर्शित केलेलीं महत्तत्त्वें आणि आधुनिक विज्ञानयुगाच्या परिभ्रमणांत अर्वाचीनांनीं लावलेले शोध व शास्त्रोत्कर्षाचे प्रयत्न ह्या सर्वांचा यथातथ्य संग्रह करून, हा लोकोपयोगी "सामुद्रिक तिलक" नांवाचा ग्रंथ मी तयार केला आहे.

हस्तसामुद्रिक, रेषाविज्ञान, मुखपरीक्षा, शारीरचिन्हनिर्णय शारीर गुणवर्णन, स्त्रीसामुद्रिक, नाडी ग्रंथसमुच्चय, ललाटरेखा विमर्श, अंगुष्ठचिन्हसंग्रह, शरीरावयव मीमांसा इत्यादि प्रकारानें मानवी आयुष्यांत होणाऱ्या वर्तमान, भूत व भविष्यकालीन शुभाशुभ घडामोडींचा निर्णय हें ग्रंथाचे ध्येय असून प्राचीनार्वाचीनांच्या तत्त्वनिर्णयानुरूप ह्या प्रकरणांचा निर्णय यांत केला आहे. त्याच्याचबरोबर अनुभवसिद्ध तत्त्वांच्यासंग्रहानें ह्या ग्रंथाचे वैशिष्ठ्यांत भर घातली आहे.

चिकित्सक, प्राचीन शास्त्राचे अभिमानी, ज्ञानलोलुप आणि भविष्यकथन विद्येचे संचालक या सर्वांना हा ग्रंथ संतोषकारक व आनंददायक होवो.

नूतनं च जगत्यस्मिन् न किंचिदपि वर्तते ।
प्राचीनाधारपीठेषु तिष्ठंत्याधुनिकगृहाः ॥ ११ ॥
प्राचीनाचार्यतत्त्वानां स्वीयंकालानुसारतः ॥
कर्तव्यमर्वाचीनैस्तु विशदीकरणं खलु ॥ १२ ॥
नित्यं प्राचीनतत्त्वानां शाश्वतानां यथामति ।
तथाऽर्वाचीनशोधानां कृत्वा योग्यसमन्वयम् ॥ १३ ॥
विशदीकरणं गूढार्थस्य कालानुसारतः ।
ग्रंथस्य ध्येयमेवेदं विशेषेणास्य वर्तते ॥ १४ ॥

जगांत नवीन असें कांहींच नाहीं. प्राचीनांच्या आधारभूत मूळ पायांवरच अर्वाचीनांच्या सुंदर इमारती आणि भव्य प्रासाद निर्माण होत असतात. प्राचीन आचार्यांच्या अजरामर व निश्चित तत्त्वांचें अर्वाचीन कालानुरूप सुसंगत विशदीकरण करणें हेंच सांप्रतिकांचें कर्तव्य होय. त्याचप्रमाणें प्राचीन व अर्वाचीन यांचा योग्य समन्वय करून प्राचीन सिद्धांततत्त्वें व अर्वाचीन संशोधन यांच्या मिलाफानें

अनुभवसिद्ध असें शास्त्र रहस्य सांगणें आणि गूढार्थाचें स्पष्टीकरण करणें हें ह्या ग्रंथाचे विशेष स्वरूप आहे.

हस्तरेषायुतं धाता मनुष्यं निर्मिमे सदा ।
स्थित्यंतराणि ताः सर्वाः शंसंत्यारभ्य जन्मनः ॥१५॥
नरहस्तस्थिता रेषा ईशादेशोपदेशिनी ।
हस्तस्थितानां रेषाणामतो महात्म्यमस्ति च ॥ १६ ॥
सामुद्रिकस्य शास्त्रस्य भूयादभ्युदयः सदा ।
दिगंतं यातु तत्कीर्तिरितीशंप्रति मेऽर्थना ॥ १७ ॥

परमेश्वरानें ज्याप्रमाणे मनुष्य प्राणी निर्माण केला आहें, त्याप्रमाणें मनुष्य प्राण्याच्या जन्माबरोबरच त्याच्या दोन्ही हातांवर भविष्य दिग्दर्शक अशा रेषा उत्पन्न केल्या आहेत. हातांवरील रेषा म्हणजे आयुष्यांतील सुखदुःख दर्शविणारी परमेश्वरानिर्मित जन्मादारभ्य नैसर्गिक स्थिति होय. अर्थात् हस्तरेषांचें महत्त्व विशेष आहे. हस्तरेषा म्हणजे दैवनिर्णयाचा ईश्वरी संदेश होय.

चिकित्सकानां विदुषां शोधकानां तथैव च ।
सर्वेषामुपभोगाय ग्रंथोऽयं चास्तु सर्वदा ॥ १८ ॥
हस्तसामुद्रिकादीनां ग्रंथानामनुसारतः ।
स्थित्यंतराणां कथनं नवशोधानुरूपतः ॥ १९ ॥
तथानुभवसिद्धानां तत्त्वानां च समुच्चयः ।
वर्तते चास्य ग्रंथस्य मुख्यमेव प्रयोजनम् ॥ २० ॥
सोयं ग्रंथः सुखयतु प्राक्तनशास्त्राभिमानिनो नित्यम् ।
तद्वत् चिकित्सकानपि भविष्यविद्याप्रसारकान् सुज्ञान् २१

म्हणून शास्त्रशोधक, चिकित्सक, बुद्धिमान्, जिज्ञासू व ज्ञानार्थी अशा सर्वांस ह्या संशोधनात्मक व अनुभवसिद्ध ग्रंथाचा

यथायोग्य उपयोग होवो व सामुद्रिक शास्त्राचा उत्कर्ष होऊन प्राचीन अशा ह्या गूढ विद्येची त्रिखंड कीर्ति पसरो अशी जगन्नियंत्या परमेश्वराची प्रार्थना करून विषयविवेचनास प्रारंभ करतो.

---

## वराहमिहिराचार्यकृत बृहत्संहितांतर्गत

### पुरुषलक्षणं

# प्रकरण पहिलें.

उन्मानमानगतिसंहतिसारवर्ण-
स्नेहस्वरप्रकृतिसत्त्वमनूकमादौ ।
क्षेत्रं मृजां च विधिवत् कुशलोऽवलोक्य
सामुद्रविद्वदति यातमनागतं च ॥ १ ॥

### स्त्री–पुरुष–लक्षणशास्त्र

### (सामुद्रिक)

उन्मान ( उंची ), मान ( वजन ), गति ( चालण्याची ढब ), संहति (हातापायांच्या सांध्यांचा ठसठशीतपणा), सार (शरीराचा दणगटपणा), वर्ण (कातडीचा रंग), स्नेह (आंगाची तकतकी किंवा तजेला), स्वर (आवाज), प्रकृति (स्वभाव), सत्व (आंगांतील धमक) अनूक (जन्मार्जित), क्षेत्र (अवयवांची ठेवण), आणि मृजा (अंगकांति) इत्यादि लक्षणांचें शास्त्रीय दृष्टीनें अवलोकन करण्यांत कौशल्य प्राप्त झालें म्हणजे, चतुर पुरुष सामुद्रिक शास्त्रज्ञ होऊन [लक्षणानुरोधानें] भूत भविष्य सांगू शकतो.

अस्वेदनौ मृदुतलौ कमलोदराभौ
श्लिष्टाङ्गुलौ रुचिरताम्रनखौ सुपार्ष्णी ।

उष्णौ शिराविरहितौ सुनिगूढगुल्फौ
कूर्मोन्नतौ च चरणौ मनुजेश्वरस्य ॥ २ ॥

हातापायांचे तळवे घामानें ओलसर नसून साधारणपणें मऊ कमळाच्या गाभ्याप्रमाणें तजेलेदार असतात. बोटांच्यामध्यें फटी नसून (पंजा उघडला असतां बोटें एकमेकांशीं जुळलेलीं असतात.) बोटें तेजस्वी, नखें आरक्त, टांचा भरदार, घोटे उबदार, वर उचलून दिसणाऱ्या शिरांनीं रहित; आणि मांसांत रुतलेले असावें. पावलांचा पृष्ठभाग कासवांच्या पाठीप्रमाणें बांकदार असावा. म्हणजे तो पुरुष ( किंवा ती स्त्री ) सर्वलक्षण संपन्न आहे असें समजावें. असा पुरुष राजा असतो किंवा होतो.

शूर्पाकारविरूक्षपाण्डुरनखौ वक्रौ शिरासन्ततौ
संशुष्कौ विरलाङ्गुलौ च चरणौ दारिद्र्यदुःखप्रदौ
मार्गायोत्कटकौ कषायसदृशौ वंशस्य विच्छित्तिदौ
ब्रह्मघ्नौ परिपक्वमृद्द्युतितलौ पीतावगम्येरतौ ॥ ३ ॥

ज्याच्या पावलांचीं नखें फार पसरट ( ज्यांना तजेला नाहीं अशीं ) रूक्ष, पांढुरकीं असतात आणि पावलेंहि वांकडीं उंचावलेल्या शिरांनीं युक्त, वाळकुंडीं, बोटांमध्यें परस्परांत फटी असतात असा मनुष्य दुःखी, कष्टी, दरिद्री असतो. ज्याचीं पावलें भसाडीं राकट असतात त्याचा स्वभाव वारंवार पायांनीं प्रवास करण्याचा असतो. ज्याच्या पायांचा रंग बैंगणी त्याचा वंश वाढत नाहीं. ज्याचे पाय भाजलेल्या मडक्याप्रमाणें भेसूर रंगाचे असतात तो खूनही करूं शकेल आणि ज्याचे पाय पिवळसर दिसतात तो गम्यागम्य न पहातां वाटेल त्या स्त्रीशीं आसक्त होण्याचा संभव असतो.

**टीप**—वरील श्लोकांमध्यें ज्या लक्षणांचा संग्रह केला आहे. तीं सर्व एकाच माणसाच्या ठिकाणीं आढळलीं पाहिजेत असा अर्थ नव्हे. त्यापैकीं एक किंवा

एकापेक्षां कांहीं अधिक इतकींच कोणाकोणामध्यें दृष्टोत्पत्तीस आलीं तरीहि त्यांचा विचार शास्त्रज्ञानें केला पाहिजे. लक्षण यथायोग्य असल्यास तें शुभ व त्याबरोबरच दुसरें एकादें विपरीत लक्षण आढळल्यास तें अशुभ असें समजून व त्यांचें परस्पर बलाबल पाहून निर्णय करावा. उदाहरणार्थ कोणा एकाचें नाक सरळ, वर्ण गौर, कपाळ उंच व रुंद असूनही त्याचीं पावलें राकट असतील तर उत्तमबुद्धि, भटक्या स्वभाव ह्यांची सांगड आहे असें समजावें. एवंच जिज्ञासूनें ह्या विषयांत तारतम्य अवश्य राखलें पाहिजे.

प्रविरलतनुरोमवृत्तजङ्घा । द्विरदकरप्रतिमैर्वरोरुभिश्च ।
उपचितसमजानवश्च भूपा । धनरहिताःश्वशृगालतुल्यजङ्घाः ॥ ४ ॥

ज्यांच्या पोटरीवर दाट केंस नसून फक्त बारीक लव आहे, आणि पोटऱ्या गरगरीत, मांड्या भरदार, गुडघे पुष्ट आणि प्रमाणबद्ध, असा पुरुष राजा, पुढारी किंवा प्रमुख अधिकारी असतो; ह्यांच्या उलट प्रकारचे म्हणजे कोल्ह्याकुतऱ्यांच्या पायाप्रमाणें उभट वाळकुंडे ज्यांचे पाय ते दरिद्रि असतात.

रोमैकैकं कूपके पार्थिवानां । द्वेद्वे ज्ञेये पण्डितश्रोत्रियाणाम् ।
त्र्याद्यैर्निःस्वा मानवा दुःखभाजः । केशाश्चैवं निन्दिताः पूजिताश्च ॥५॥

आंगावर जीं केश-छिद्रें असतात त्या प्रत्येक छिद्रांतून जर एकेकच केस निघालेला असेल तर इतर शुभ चिन्हें असल्यास तो मनुष्य राजवैभव भोगील. एकाच छिद्रांतून दोन दोन केस निघालेले असतील आणि इतर बुद्धिदर्शक लक्षणें असतील तर तो विद्वान् पण्डित असेल. परंतु दोहोंपेक्षां अधिक केश जर एकाच छिद्रांतून निघालेले असतील तर तें लक्षण अशुभ समजावें. ह्याचप्रमाणें मस्तकावरीलही केश तपासून पहावें.

निर्मांसजानुर्म्रियते प्रवासे । सौभाग्यमल्पैर्विकटैर्दरिद्राः ।
स्त्रीनिर्जिताश्चापि भवन्ति निम्नै । राज्यं समांसैश्च महद्भिरायुः ॥ ६ ॥

प्रवास करीत असतांना जर गुडघ्यांचें मांस नाहीसें झालें

तर प्रवासांतच मृत्यु होईल. ज्याचे गुडघे बेतशीर आकाराचे म्हणजे लहानसरच असतील तो भाग्यशाली असतो. ज्याचे गुडघे अवाढव्य असतात तो दरिद्री, गुडघ्याच्या भागांत खळगे पडले असतील तर तो स्त्रीलंपट असेल. परंतु गुडघे मांसल, दणगट असले तर तो चिरायु होतो.

लिङ्गेऽल्पे धनवानपत्यरहितः स्थूले विहीनो धनै-
र्मेढ्रे वामनते सुतार्थरहितो वक्रेऽन्यथा पुत्रवान् ।
दारिद्र्यं विनते त्वधोऽल्पतनयो लिङ्गे शिरासन्तते
स्थूलग्रन्थियुते सुखी मृदु करोत्यन्तं प्रमेहादिभिः ॥ ७ ॥

पुरुषेन्द्रिय प्रमाणशीर असेल तर धनवान्, उगाचच जाडजूड असेल तर संतति वांचण्याची आशा कमी; इन्द्रिय डावीकडे वळलेले असेल तर दरिद्री; परंतु वांकडेंच झालेलें असेल तर द्रव्य नाहीं आणि संततिहि नाहीं अशी स्थिति असेल. पण तें प्रमाणानें जाड सरळ असें असेल तर त्याला पुत्रसंतति होणारच. इंद्रिय नेहमींच खालीं पडलेलें असेल तर दरिद्री, शिरांनीं व्यापलें असेल तर संतति कमी होते आणि पुढील भाग गांठदार जाड असेल तर स्त्रीसुख लाभतें. परंतु तो विसविशीत असेल तर प्रमेह झालेला असेल किंवा होऊन त्यांत मृत्यु येण्याचा संभव असतो.

कोषनिगूढैर्भूपा दीर्घैर्भग्नैश्च वित्तपरिहीनाः ।
ऋजुवृत्तशेफसो लघुशिरालशिश्नाश्च धनवन्तः ॥ ८ ॥

इंद्रियाचें टोंक कातडीनें झाकलेलें असावें म्हणजे भूमिलाभ होतो. इंद्रियाचा अग्रभाग कातडीच्या बाहेर उघडा पडलेला असेल तर द्रव्यनाश. पुरुषाचें पुरुषेंद्रिय हें सरळ (नळकांड्याप्रमाणें) गोल पण फार लांब नसून त्यावरील शिरा थोड्या पण स्पष्ट दिसाव्या म्हणजे भाग्य लाभतें.

जलमृत्युरेकवृषणो विषमैः स्त्रीचञ्चलः समैः क्षितिपः ।
ऱ्हस्वायुश्चोद्बद्धैः प्रलम्बवृषणस्य शतमायुः ॥ ९ ॥

वृषणामध्यें दोन ग्रंथि असतात; परंतु कोणाच्या वृषणांत एकच ग्रंथि असेल तर त्यानें पोहोण्यास जाऊं नये जलांत बुडून मरण्याचा संभव. ग्रंथि लहान मोठ्या असतील तर स्त्रीलंपट; सारख्या असतील तर राजा प्रमाणें सुखी. ग्रंथि वर बांधल्याप्रमाणें आणि खालीं नुसती पिशवी असें असेल तर अल्पायु; परंतु वृषण लांबट असेल तर तो शतायु होईल.

रक्तैराढ्या मणिभिर्निर्द्रव्याः पाण्डुरैश्च मलिनैश्च ।
सुखिनः सशब्दमूत्रा निःस्वा निःशब्दधाराश्च ॥ १० ॥
द्वित्रिचतुर्धाराभिः प्रदक्षिणावर्तवलितमूत्राभिः ।
पृथ्वीपतयो ज्ञेया विकीर्णमूत्राश्च धनहीनाः ॥ ११ ॥
एकैव मूत्रधारा वलिता रूपप्रधानसुतदात्री ।
स्निग्धोन्नतसममणयो धनवनितारत्नभोक्तारः ॥ १२ ॥
मणिभिश्च मध्यनिम्नैः कन्यापितरो भवन्ति निःस्वाश्च ।
बहुपशुभाजो मध्योन्नतैश्च नात्युल्बणैर्धनिनः ॥ १३ ॥

पुरुषेंद्रियाचा अग्रमणि लाल असल्यास द्रव्यप्राप्ति; पांढुरका किंवा मळकट असल्यास द्रव्यनाश; मूत्राची धार सुटत असतां कांहींतरी थोडा आवाज निघेल तर सुखप्राप्ति. मुळींच आवाज न निघेल तर दारिद्र्य. इंद्रियांतून मूत्राच्या धारा एकदम अनेक निघत असतील तर राजाप्रमाणें सुख; त्या उजवीकडे वळसा घेतील तरी सुख, परंतु ज्यांचें मूत्र तडाक्यानें बाहेर न पडतां पाणी ओतल्याप्रमाणें सांडेल, किंवा लघ्वी थांबून थांबून होईल ते धनहीन. मूत्रधारा—( नळांतून पाणी जोरानें सुटल्याप्रमाणें ) कमानदार परंतु एकच असेल तर रूप आणि संतति ह्या

दोहोंचाही लाभ. अग्रमणि तजेलदार, टंच व चोहोंकडून सारखा असल्यास त्याला स्त्रीसुख प्राप्ति आणि द्रव्यलाभहि होतो. अग्रमणि खोलगट असेल तर कन्या संतति होऊन आणि धननाशही होतो. अग्रमणि मधोमध उंच असेल तर त्याच्या घरांत गाई व इतर पशु खूप असतात; परंतु अग्रमणि फारच मोठा नसावा म्हणजे धनप्राप्ति होते.

परिशुष्कबस्तिशीर्षैर्धनरहिता दुर्भगाश्च विज्ञेयाः ।
कुसुमसमगन्धशुक्रा विज्ञातव्या महीपालाः ॥ १४ ॥
मधुगन्धे बहुवित्ता मत्स्यसगन्धे बहून्यपत्यानि ।
तनुशुक्रः स्त्रीजनको मांससगन्धो महाभोगी ॥ १५ ॥
मदिरागन्धे यज्वा क्षारसगन्धे च रेतसि दरिद्रः ।
शीघ्रं मैथुनगामी दीर्घायुरतोऽन्यथाल्पायुः ॥ १६ ॥

बस्तिशीर्ष म्हणजे ओटीपोट आणि जननेंद्रिय ह्यांच्या मधील स्थानांतील मुख्य भाग ( मांसरहित ) वाळकुडा असेल तर दरिद्री आणि भाग्यहीन होतो. ज्याच्या रेताला पुष्पाप्रमाणें वास येतो ते भूमिपाल होतात. ( त्यांच्या मालकीची जमीन पुष्कळ असते ). रेताला मधासारखा वास येत असेल तर तो पुरुष संपत्तिमान् होतो. मत्स्याच्या वासाप्रमाणें वास असेल तर संतति पुष्कळ होते. रेत, अल्प असेल तर कन्या संतति. रेताला मांसाप्रमाणें वास असल्यास चैन भोगणारा; मद्याप्रमाणें वास येईल तर यज्ञकर्ता; परंतु क्षाराप्रमाणें दर्प येईल तर द्रव्यनाश; जो स्त्रीसमागमांत यशस्वी परंतु वाहवलेला नव्हे तो दीर्घायुहि होतो; परंतु जो अतिसमागम करणारा त्याचें आयुष्य क्षीण होतें.

**टीपः**— ह्या श्लोकांतील स्थितीचा अनुभव घेण्याचें कारण व प्रसंग हल्लींच्या काळांत आढळणार नाहीं. पूर्वीच्या परिस्थितीमध्यें प्रत्येक जहागिरदाराच्या पदरीं एक दोन वैद्य, व कांहीं ज्योतिषि व सामुद्रिकशास्त्रज्ञ असावयाचेंच. आतां ही

रेतपरीक्षा होत नाहीं असें नाहीं, परंतु निराळ्या साधनांनीं आणि निराळ्या कारणांस्तव होते इतकेंच.

निःस्वोऽतिस्थूलस्फिक् समांसलस्फिक् सुखान्वितो भवति ।
व्याघ्रान्तोऽध्यर्धे स्फिग्मण्डूकस्फिग्नराधिपतिः ॥ १७ ॥

ज्याचे कुल्ले अवाढव्य तो दरिद्री. परंतु ज्याचे कुल्ले पुष्ट तो सुखी. ज्याचा एकच कुल्ला मोठा व दुसरा लहान त्याला व्याघ्रादिकापासून मृत्यु; परंतु ज्याचे कुल्ले असे कीं जो बेडकाप्रमाणें बसला असतांहि एकदम उठूं शकतो तो राजा होण्याला लायक असतो.

सिंहकटिर्मनुजेन्द्रः कपिकरभकटिर्धनैः परित्यक्तः ।
समजठरा भोगयुता घटपिठरनिभोदरा निःस्वाः ॥ १८ ॥

ज्याची कमर सिंहासारखी म्हणजे ( पोटाच्या मानानें ) थोडी बारीक असते तो राजाप्रमाणें सुखी; वानराप्रमाणें किंवा उंटाप्रमाणें ज्याची कमर ( वांकडी तिकडी ) तो धनहीन; ज्याचे पोट ढेंबर याणि आणि खपाटीला गेलेलें नसतें ते सुदैवी; ज्याचे पोट घागरीसारखें, मडक्यासारखें तो दुर्दैवी अथवा दरिद्री.

अविकलपार्श्वा धनिनो निम्नैर्वक्रैश्च भोगसन्त्यक्ताः ।
समकुक्षाः भोगाढ्या निम्नाभिर्भोगपरिहीनाः ॥ १९ ॥
उन्नतकुक्षाः क्षितिपाः कुटिलाः स्युर्मानवा विषमकुक्षाः ।
सर्पोदरा दरिद्रा भवन्ति बह्वाशिनश्चैव ॥ २० ॥

ज्यांच्या पाठीच्या कण्याच्या दोहोंबाजूंचे–बरगड्यांचे–भाग पुष्ट असतात ते धनाढ्य. खोलगट किंवा वांकडे तिकडे असल्यास दुःखी; विषम नाहीं आणि वांकडे तिकडेहि नाहींत असे असतील तर भोगशाली; आणि दोहोकडे खळगे असल्यास कष्टें राहतील.

बरगड्यांचा भाग उंच आणि पुष्ट असल्यास भूमिधारक, उंच सखल असा असेल तर कपटी; पोट सापासारखें सळसळीत असलें तर तो दरिद्री आणि खादाड असावयाचा.

परिमण्डलोन्नताभिर्विस्तीर्णाभिश्च नाभिभिः सुखिनः ।
स्वल्पा त्वदृश्यनिम्ना नाभिः क्लेशावहा भवति ।। २१ ।।
वलिमध्यगता विषमा शूलाबाधं करोति नैःस्व्यञ्च ।
शाठ्यं वामावर्ता करोति मेधां प्रदक्षिणतः ।। २२ ।।
पार्श्वायता चिरायुषमुपरिष्टाच्चेश्वरं गवाढ्यमधः ।
शतपत्रकर्णिकाभा नाभिर्मनुजेश्वरं कुरुते ।। २३ ।।

बेंबीची गांठ वाटोळी, उंच आणि मोठी असेल तर मनुष्य सुखी; तीच लहान दिसेल नसेल अशी किंवा खोलगट असेल तर दुःखी; पोटाच्या वळकटींत झांकली जाईल किंवा खडबडीत असली तर पोटशूळ उत्पन्न होण्याचा किंवा दारिद्र्य येण्याचा संभव. बेंबीची गांठ डावीकडे पिरगळल्याप्रमाणें असेल तर मनुष्य कपटी; परंतु पीळ उजव्या बाजूस असेल तर बुद्धिमान् होतो. बेंबी आडवट असेल तर चिरायु, खालीं निमुळती असेल तर समृद्धि; आणि वर निमुळती असली तर पशु लाभ, परंतु कमलाप्रमाणें असेल तर राजा होईल.

शस्त्रान्तं स्त्रीभोगिनमाचार्य्यं बहुसुतं यथासङ्ख्यम् ।
एकद्वित्रिचतुर्भिर्वलिभिर्विद्यान्नृपं त्ववलिम् ।। २४ ।।
विषमवलयो मनुष्या भवन्त्यगम्याभिगामिनः पापाः ।
ऋजुवलयः सुखभाजः परदारद्वेषिणश्चैव ।। २५ ।।

पोटाला वळ्या पडतात. तशी वळी एकच असेल तर युद्धांत मृत्यु; दोन असतील तर स्त्रीसमागम; तीन असतील तर उत्तम अध्यापक; आणि चार असतील तर पुत्र पुष्कळ अशीं फळें असतात. मुळींच वळ्या नसतील तर भूमिचा मालक; वळ्या

लहान मोठ्या असतील तर स्त्रीलंपट; आणि वळ्या एकसारख्या असतील तर मनुष्य सदाचरणी राहतो.

मांसलमृदुभिः पार्श्वैः प्रदक्षिणावर्तरोमभिर्भूपाः ।
विपरीतैर्निर्द्रव्याः सुखपरिहीनाः परप्रेष्याः ॥ २६ ॥

बरगडयांची बाजू पुष्ट असून तेथील लव दक्षिणावर्ती म्हणजे भोंवरेदार परंतु भोंवरा उजवीकडे वळलेला असें असेल, तर पुरुष राज्याधिकारी, ह्याच्या उलट लक्षणें असतील तर अर्थात्च दरिद्री; दुःखी, कष्टी आणि दुसऱ्याचा ताबेदार असतो.

सुभगा भवन्त्यनुद्बद्धचूचुका निर्धना विषमदीर्घैः ।
पीनोपचितनिमग्नैः क्षितिपतयश्चूचुकैः सुखिनः ॥ २७ ॥

वक्षःस्थलावरील स्तनाग्रें लहान परंतु सारखीं अशीं असलीं तर भाग्यशालित्व; तींच लहान मोठीं किंवा लांबट असलीं तर दरिद्री; स्तनाग्रें टणक परंतु वर उचलेलीं नसून मांसांतच रुतलेलीं अशीं असतील तर तो पुरुष दैवशाली असतो.

हृदयं समुन्नतं पृथु न वेपनं मांसलञ्च नृपतीनाम् ।
अधमानां विपरीतं खररोमचितं शिरालञ्च ॥ २८ ॥

समवक्षसोऽर्थवन्तः पीनैः शूरास्त्वकिञ्चनास्तनुभिः ।
विषमं वक्षो येषां ते निःस्वाः शस्त्रनिधनाश्च ॥ २९ ॥

वक्षःस्थल विस्तृत, भरदार आणि भीतीनें थडथड न उडणारें असें असेल तर तो राजा. आणि त्याच्या उलट प्रकारचे रांठ केंसांनीं युक्त आणि शिरांनीं व्याप्त असें असेल तर दरिद्री होतो. वक्षःस्थल सपाट परंतु पुष्ट असलें तर द्रव्यवान् व शूर असतो. उलट म्हणजे कृश, दबलेलें किंवा चिमडलेलें असेल तर अर्थात् दरिद्री. उंच सखल असेल तर अपघातानें मृत्यू.

विषमैर्विषमो जत्रुभिरर्थविहीनोऽस्थिसन्धिपरिणद्धैः ।
उन्नतजत्रुर्भोगी निम्नैर्निःस्वोऽर्थवान् पीनैः ॥ ३० ॥

जत्रु ( म्हणजे मान गळा आणि खांदे ह्यांच्या मधोमध आडवीं हाडें असतात तो भाग ) वांकडा तिकडा असल्यास मनुष्य क्रूर असतो. तेथील सांधे दिसण्यांत येत असतील तर दरिद्री स्कंधास्थिचा भाग उंच अथवा पुष्ट असला म्हणजे भाग्यशाली किंवा धनवान्. उलट खोलगट असला तर दरिद्री होतो.

चिपिटग्रीवो निःस्वः शुष्का सशिरा च यस्य वा ग्रीवा ।
महिषग्रीवः शूरः शस्त्रान्तो वृषसमग्रीवः ॥ ३१ ॥
कम्बुग्रीवो राजा प्रलम्बकण्ठः प्रभक्षणो भवति ।
पृष्ठमभग्नमरोमशमर्थवतामशुभदमतोऽन्यत् ॥ ३२ ॥

मान चापटकी, कृश, शिरायुक्त असेल तर निर्धन, महिषासारखी वर निमुळती असेल तर निधड्या छातीचा परंतु बैलासारखी असेल तर शस्त्रमृत्यु. गळा शंखाप्रमाणें असेल तर राजा. लांबटमानेचा दरिद्री, पाठीचा भाग पुष्ट आणि एकसारखा असेल तर धनाढ्य; उलट असेल तर अभागी.

अस्वेदनपीनोन्नतसुगन्धिसमरोमसङ्कुलाः कक्षाः ।
विज्ञातव्या धनिनामतोऽन्यथार्थैर्विहीनानाम् ॥ ३३ ॥

खाकेचा भाग ज्याचा घामानें ओलसर दुर्गंधयुक्त आणि खोल नसतो, म्हणजे उथळ किंवा पुष्ट असतो तो धनवान् होतो. उलट लक्षणाचा मनुष्यदरिद्री.

निर्मांसौ रोमचितौ भग्नावल्पौ च निर्धनस्यांसौ ।
विपुलावव्युच्छिन्नौ सुश्लिष्टौ सौख्यवीर्यवताम् ॥ ३४ ॥

खांदे भरदार. एकसारखे उतरते, उगीच ओबड-धोबड आणि केसाळ नव्हेत असे असले तर मनुष्य सुखी आणि

पराक्रमी समजावा. परंतु उंच सखल, केसाळ, ओबडधोबड असले, तर भाग्यहीन.

करिकरसदृशौ वृत्तावाजान्ववलम्बिनौ समौ पीनौ ।
बाहू पृथिवीशानामधमानां रोमशौ ह्रस्वौ ॥ ३५ ॥

भुजदण्ड किंवा बाहू हत्तीच्या सोंडेसारखे म्हणजे पुष्ट मनगटाकडे निमुळते, भरगच्च आणि गुडघ्यापर्यंत लांब असे असतील तर तो मनुष्य नराधिप होतो. परंतु आखूड, केसाळ बाहूंचा मनुष्य दरिद्री असतो

हस्ताङ्गुलयो दीर्घाश्चिरायुषामवलिताश्च सुभगानाम् ।
मेधाविनां च सूक्ष्माश्चिपिटाः परकर्मनिरतानाम् ॥ ३६ ॥
स्थूलाभिर्धनरहिता बहिर्नताभिश्च शस्त्रनिर्याणाः ।
कपिसदृशकरा धनिनो व्याघ्रोपमपाणयः पापाः ॥ ३७ ॥

हाताचीं बोटें लांब व •सारखीं म्हणजे प्रमाणबद्ध असतील तर दीर्घायुषी. वाकडीं तिकडीं किंवा सुरकुतलेलीं नसतील तर भाग्यशाली, लांब परंतु थोडीं कमी जाड व निमूळतीं असतील तर ज्ञानी, चापटकी अथवा कांहींतरी आकाराचीं असतील तर दुसऱ्याचा ताबेदार होतो. बोटें जाडजूड असतील तर निर्धन, बोटाचे शेवट बाहेरच्या बाजूकडे वळलेल्यांना दुखापती होतील. वानराच्या बोटाप्रमाणें लांब सडक बोटे व पेरीं स्पष्ट अशीं असतील तर धनवान्, आणि वाघाच्या पंजाप्रमाणें बोटें स्थूल व आंखूड, अग्रभाग पसरट अशीं असतील तर मनुष्य पातकी समजावा.

मणिबन्धनैर्निगूढैर्दृढैश्च सुश्लिष्टसन्धिभिर्भूपाः ।
हीनैर्हस्तच्छेदः श्लथैः सशब्दैश्च निर्द्रव्याः ॥ ३८ ॥

ज्याच्या मनगटाचीं हाडें फार स्पष्ट दिसत नाहींत परंतु सांधे भरीव असतात ते नराधिप होतात. मनगटेंच नसल्या-

सारखीं असतील तर हात मोडण्याचा संभव. मनगट कमजोर, खुट-खुट वाजणारें असें असेल तर मनुष्य दरिद्री असतो.

पितृवित्तेन विहीना भवन्ति निम्नेन करतलेन नराः ।
संवृतनिम्नैर्धनिनः प्रोत्तानकराश्च दातारः ॥ ३९ ॥
विषमैर्विषमा निःस्वाश्च करतलैरीश्वरास्तु लाक्षाभैः ।
पीतैरगम्यवनिताभिगामिनो निर्धना रूक्षैः ॥ ४० ॥

ज्यांच्या तळहाताला मोठा खळगा असतो त्यांना वडिलांची मिळकत मुळींच नसते. परंतु ज्यांच्या तळहाताला खळगा कडेला कळत नकळत इतका असला तरी ते धनाढ्य असतात; किंवा ज्यांनीं हात उघडला असतां तळहात खोलगट दिसत नाहीं ते पुरुष दातृत्वशाली असतात आणि तळहात उंच सखल म्हणजे विषम असेल ते दुष्ट किंवा दरिद्री असतात. तळहाताचा वर्ण लाल असेल तर लोकाग्रणी, पिवळसर असेल तर स्त्रीलंपट, परंतु पांढरा रूक्ष असेल तर मनुष्य निर्धन असतो.

तुषसदृशनखाः क्लीबाश्चिपिटैः स्फुटितैश्च वित्तसन्त्यक्ताः ।
कुनखविवर्णैः परतर्कुकाश्च ताम्रैश्च भूपतयः ॥ ४१ ॥

धान्याच्या फोलकटासारखीं नखें असलीं तर मनुष्य दुबळा किंवा नपुंसक असतो. नखें चेपलेलीं अथवा फुटलेलीं असलीं तर दारिद्र्य येतें, वेडींवाकडीं, पांढरीं फटक नखें असलीं तर परधार्जिणें, मिंधे असे होतात. लाल नखें असतील ते लोकनायक होतात.

अङ्गुष्ठयवैराढ्याः सुतवन्तोऽङ्गुष्ठमूलगैश्च यवैः ।
दीर्घाङ्गुलिपर्वाणः सुभगा दीर्घायुषश्चैव ॥ ४२ ॥

आंगठ्यावर तीन यव असतील तर धनाढ्य, त्यांपैकीं एक किंवा अनेक आंगठ्याच्या मुळाशीं असतील तर पुत्रवान्,

बोटें लांब असून पेरेंही लांब असलीं तर दीर्घायुष्य आणि भाग्य लाभतें.

स्निग्धा निम्ना रेखा धनिनां तद्व्यत्ययेन निःस्वानाम् ।
विरलाङ्गुलयो निःस्वा धनसञ्चयिनो घनाङ्गुलयः ॥ ४३ ॥

तळहातावर ज्या रेषा असतात, त्या लाल, स्निग्ध आणि खोल असाव्यात म्हणजे तो मनुष्य भाग्यशाली असतो. पुसट, तुटक्या, वांकड्या तिकड्या, नागमोडी असल्या तर त्या अशुभ. त्यामुळें दारिद्य आणि दुर्भाग्य येतें. पंजा उघडून बोटें जुळून धरलीं असतां मध्यें फटी पडल्या नाहींत तर तो मनुष्य द्रव्य संचयी, धनाढ्य आणि जुळलेल्या बोटांमध्यें फटी असतील तर द्रव्यहानि होते.

तिस्रो रेखा मणिबन्धनोत्थिताः करतलोपगा नृपतेः ।
मीनयुगाङ्कितपाणिर्नित्यं सत्रप्रदो भवति ॥ ४४ ॥
वज्राकारा धनिनां विद्याभाजां तु मीनपुच्छनिभाः ।
शंखातपत्रशिबिकागजाश्वपद्मोपमा नृपतेः ॥ ४५ ॥
कलशमृणालपताकाङ्कुशोपमाभिर्भवन्ति निधिपालाः ।
दामनिभाभिश्चाढ्याः स्वस्तिकरूपाभिरैश्वर्यम् ॥ ४६ ॥
चक्रासिपरशुतोमरशक्तिधनुः कुन्तसन्निभा रेखाः ।
कुर्वन्ति चमूनाथं यज्वानमुलूखलाकाराः ॥ ४७ ॥
मकरध्वजकोष्ठागारसन्निभाभिर्महाधनोपेताः ।
वेदीनिभेन चैवाग्निहोत्रिणो ब्रह्मतीर्थेन ॥ ४८ ॥
वापीदेवकुलाद्यैर्धर्मं कुर्वन्ति च त्रिकोणाभिः ।
अङ्गुष्ठमूलरेखाः पुत्राः स्युर्दारिकाः सूक्ष्माः ॥ ४९ ॥

ज्याच्या तळहातावरील शुभपद्धतिच्या तीन रेषा मनगटा पासून निघतात आणि त्यांपैकीं एक आंगठा आणि ( तर्जनी )

प्रदेशिनी ह्यांच्यामध्यें कडेपर्यंत जाते व दुसरी आणि तिसरी ह्यापैकीं प्रत्येक मधलें बोट, आंगठीचें बोट, किंवा करंगळी ह्यांच्या मधोमध जाणाऱ्या अशा असतील तर तो खरोखरच राजा होतो. अशा तीन रेषांनीं हातावर त्रिकोण, चौकोन, मत्स्य, कलश इत्यादि अनेक वस्तूंच्या आकृतीप्रमाणें आकृति बनतात. [ ह्यापैकीं त्रिकोण, चौकोन, मत्स्य तर स्पष्ट ओळखतां येतात. बाकीच्या आकृती सूक्ष्म अवलोकनानें व सरावानें ओळखूं येतात.] ज्याच्या हातावर दोन मत्स्य तो यज्ञकर्ता आणि अन्नदाता होतो. हातावरील रेषा वज्राकार असली तर धनाढ्य होतो. मत्स्यपुच्छासारखी आकृति असेल तर विद्यावान्, शंख, छत्र, पालखी, हत्ती, घोडा, कमल ह्या रेषांनीं मंडित असतो तो राजा. कलश, कमलाचा देठ, पताका, अंकुश ह्यांच्यायोगानें संपत्तिलाभ. स्वस्तिकाकार रेषेनें ऐश्वर्य-लाभ. चक्र, तरवार, परशु, तोमर, शक्ति, धनुष्य, भाला ह्या रेषांनीं सेनापतित्व प्राप्त होतें. उलूखलानें यज्ञकर्ता, मगर, कोठार ह्या चिन्हांनीं अतिशय धनाढ्य होतो; वेदीनें अग्नीहोत्री होतो; वाघ, देवालय, सिंहासन अशा आकृतींच्या रेषानीं धार्मिकता. त्रिकोणानें सत्कर्म; आंगठ्याच्या मूळाशीं जाड रेषा असेल तर पुत्र, व बारीक असेल तर कन्या.

रेखाः प्रदेशिनीगाः शतायुषां कल्पनीयमूनाभिः ।
छिन्नाभिर्द्रुमपतनं बहुरेखारेखिणो निःस्वाः ॥ ५० ॥

आंगठ्यापासून दर्शक बोटापर्यंत आणखी रेषा असते' ती तेथपर्यंत पोहोंचली असली तर शतवर्षायुष्य लाभतें, ती कमी असेल तितक्या मानानें आयुष्य कमी असें समजावें. आयुष्याची रेषा तुटकी असेल तर अपघात, आणि रेषांचा घोटाळा असेल तर दुर्भाग्य.

अतिकृशदीर्घैश्चिबुकैर्निर्द्रव्या मांसलैर्धनोपेताः ।
बिम्बोपमैरवक्रैरधरैर्भूपास्तनुभिरस्वाः ॥ ५१ ॥
ओष्ठैः स्फुटितविखण्डितविवर्णरूक्षैश्च धनपरित्यक्ताः ।
स्निग्धा घनाश्च दशनाः सुतीक्ष्णदंष्ट्राः समाश्च शुभाः ॥ ५२ ॥

हनुवटीवर मांस नसेल किंवा फार लांबट असेल तर तो दरिद्री. हनवटी पुष्ट असली तर द्रव्यवान्. ओष्ठ लाल असले तर भाग्यशाली, ज्याचे सुकलेले ओठ तो दरिद्री. ओठ तुटलेले, फाटलेले, फटफटीत सुकलेले, असे असले तरी दरिद्री; दांत स्वच्छ, एकमेकांस लागून असणारे, दाढा अणकुचीदार परंतु एकसारख्या, अशा असल्या तर तो भाग्यशाली.

जिह्वा रक्ता दीर्घा श्लक्ष्णा सुसमा च भोगिनां ज्ञेया ।
श्वेता कृष्णा परुषा निर्द्रव्याणां तथा तालु ॥ ५३ ॥

जीभ लाल, पातळ, लांब असून खडबडीत नसेल तर सुखी, पांढरी फटक, काळी, खरखरीत अशी ज्यांची जिव्हा ते दरिद्री. जशी जीभ लाल तशीच तालूही असावी.

वक्त्रं सौम्यं संवृतममलं श्लक्ष्णं समं च भूपानाम् ।
विपरीतं क्लेशभुजां महामुखं दुर्भगाणां च ॥ ५४ ॥

सौम्य, डौलदार, सम ( म्हणजे खांच खळगे नसणारें ) स्वच्छ कृश नाहीं आणि फार गुबगुबीतहि नाहीं असें मुख ( चेहरा ) ज्यांचें असतें ते राज्य भोगतात. ह्याच्या उलट लक्षणें असणारें मुख दुर्भाग्यांचें तसेंच भसाडें तोण्डहि अशुभच.

स्त्रीमुखमनपत्यानां शाठ्यवतां मण्डलं परिज्ञेयम् ।
दीर्घं निर्द्रव्याणां भीरुमुखाः पापकर्माणः ॥ ५५ ॥
चतुरस्रं धूर्तानां निम्नं वक्त्रं च तनयरहितानाम् ।
कृपणानामतिह्रस्वं सम्पूर्णं भोगिनां कान्तम् ॥ ५६ ॥.

[ स्त्रीमध्यें कांहीं दोष नसतांहि ] ज्यांना मूलबाळ होत नाहीं त्यांचें तोण्ड लहान असतें, परंतु कपटी लोकांचें मोठें पण वाटोळें असतें. लांबट तोण्डाचे लोक दारिद्रि, भेकड चेहेऱ्याचीं माणसें दुराचरणी असतात. ठकबाज लोकांचें तोण्ड चौकोनी; निमूळतें तोण्ड निपुत्रिकांचें असतें; तसेंच बसकट तोंण्डाचा मनुष्य कंजूष, परंतु भरदार आणि तेजस्वी तोण्डाचे लोक मात्र सुखी असतात.

अस्फुटिताग्रं स्निग्धं श्मश्रु शुभं मृदु च सन्नतं चैव ।
रक्तैः परुषैश्चौराः श्मश्रुभिरल्पैश्च विज्ञेयाः ॥ ५७ ॥

पुरुषाच्या तोण्डावरचे केस ( म्हणजे दाढी मिशा ) ह्यांच्या टोकाला फाटे फुटलेले नसतील, आणि तजेलेदार, मऊ, पाहिजे तसे वांकणारे असे असतील तर शुभ; परंतु केस पिंगट, राठ, विरळ असले तर ते लोक लफंगे असतात.

निर्मांसैः कर्णैः पापमृत्यवश्चर्पटैः सुबहुभोगाः ।
कृपणाश्च ऱ्हस्वकर्णाः शङ्कुश्रवणाश्च भूपतयः ॥ ५८ ॥

रोमशकर्णा दीर्घायुषस्तु धनभागिनो विपुलकर्णाः ।
क्रूराः शिरावनद्धैर्व्यालम्बैर्मांसलैः सुखिनः ॥ ५९ ॥

कान हडकुळे असले, त्यांच्यावर मांस नसले तर तो मनुष्य गुन्ह्यांत सांपडून मृत्यु पावतो. चापट आणि विस्तृत कानांचे सुखी व धनवान होतात. आखूड कानांचा मनुष्य कृपण आणि टोंकदार कानांचा मनुष्य राजा होतो. कानांमध्यें केस असले तर दीर्घायु. कानाच्या चामडावर शिरा उठून दिसतील तर तो मनुष्य क्रूर असतो. मोठे आणि भरदार कान असतील तर पुरुष दीर्घायु होतो.

भोगी त्वनिम्नगण्डो मन्त्री सम्पूर्णमांसगण्डो यः ।
सुखभाक् शुकसमनासश्चिरजीवी शुष्कनासश्च ॥ ६० ॥

छिन्नानुरूपयागम्यगामिनो दीर्घया तु सौभाग्यम् ।
आकुञ्चितया चौरः स्त्रीमृत्युः स्याच्चिपिटनासः ॥ ६१ ॥
धनिनोऽग्रवक्रनासा दक्षिणवक्राः प्रभक्षणाः क्रूराः ।
ऋज्वी स्वल्पच्छिद्रा सुपुटा नासा सभाग्यानाम् ॥ ६२ ॥

गाल उंच असले तर भोगी; पुष्ट असले तर मुत्सद्दी; नाक पोपटाच्या चोचीसारखें असेल तर भाग्यवान; परंतु नाक वाळकुंकें असलें तरी दीर्घायुषी. नाक अग्रें ( तुटकें ) असेल तर दुराचारी; सरळ नाकाचा भाग्यशाली; आखुड नाकाचा लफंगा; अगदीं बसक्या नाकाचा अपघातानें मृत्यु पावण्याचा संभव; गरुड नाक्या भाग्यवान्, नाकाचा शेंडा उजवीकडे वळलेला असला तर खादाड. नाक ल्हान परंतु सरळ असलें म्हणजे सुखी.

धनिनां क्षुतं सकृद् द्वित्रिपिण्डितं ह्लादि सानुनादं च ।
दीर्घायुषां प्रमुक्तं विज्ञेयं संहतं चैव ॥ ६३ ॥

ज्यांना सामान्यतः एकच शिंक येते ते द्रव्यसंचयी, दोन येतात किंवा तीनही लागोपाठ येतात ते दीर्घायु; शिंकेचा नाद घुमणारा असेल तर मनुष्य आनंदी; आवाज दीर्घ असेल तर दीर्घायु.

पद्मदलाभैर्धनिनो रक्तान्तविलोचनाः श्रियोभाजः ।
मधुपिङ्गलैर्महार्था मार्जारविलोचनाः पापाः ॥ ६४ ॥
हरिणाक्षा मण्डललोचनाश्च जिह्मैश्च लोचनैश्चौराः ।
क्रूराः केकरनेत्रा गजसदृशदृशश्च भूपतयः ॥ ६५ ॥
ऐश्वर्यं गंभीरैर्नीलोत्पलकान्तिभिश्च विद्वांसः ।
अतिकृष्णतारकाणामक्ष्णामुत्पाटनं भवति ॥ ६६ ॥
मन्त्रित्वं स्थूलदृशां श्यावाक्षाणां च भवति सौभाग्यम् ।
दीना दृग्निःस्वानां स्निग्धा विपुलार्थभोगवताम् ॥ ६७ ॥

डोळे कमलपत्रासारखे असतील तर भाग्यवान्, डोळयांचे कोपरे च

फक्त लाल असले तर संपत्तिमान् ; मधासारख्या रंगाचीं बुबुळें असतील तर महाभाग्य; परंतु मांजरासारखे असल्यास अशुभ; पुरुषांचे डोळे हरिणासारखे चंचल असले तर लफंगा. तिरळ्या डोळ्याचा क्रूर; हत्तीसारखे संथ डोळे असतील तर अधिपत्य; दृष्टी गंभीर असेल तर ऐश्वर्य; निळे डोळे विद्वत्ता दर्शक; बुबुळें फारच काळीं असतील तर नेत्ररोग. बुबुळें विस्तीर्ण असलीं तर मुत्सद्दी; काळसर असलीं तर भाग्यवान्, दृष्टी दीन असली तर दारिद्र्य; नेत्र निर्मळ आणि विस्तृत असले म्हणजे धनाढ्य आणि सुखी.

अभ्युन्नताभिरल्पायुषो विशालोन्नताभिरतिसुखिनः ।
विषमभ्रुवो दरिद्रा बालेन्दुनतभ्रुवः सधनाः ॥ ६८ ॥
दीर्घासंसक्ताभिर्धनिनः खण्डाभिरर्थपरिहीनाः ।
मध्यविनतभ्रुवो ये ते सक्ताः स्त्रीष्वगम्यासु ॥ ६९ ॥

भिवया बारीक, आखूड आणि उंच असतील तर अल्पायु रुंद आणि विस्तृत आणि उंच असतील तर सुखी, वाकड्या असतील तर दरिद्री; चन्द्रकोरीप्रमाणें असतील तर धनाढ्य; भिवया विस्तृत परंतु एकमेकांस न चिकटलेल्या असतील तर संपत्ति; तुटक्या असतील तर दरिद्री; आणि मध्येंच वांकलेल्या असतील तर मनुष्य दुराचारी असतो.

उन्नतविपुलैः शङ्खैर्धन्या निम्नैः सुतार्थसन्त्यक्ताः ।
विषमललाटा विधना धनवन्तोऽर्धेन्दुसदृशेन ॥ ७० ॥
शुक्तिविशालैराचार्यता शिरासन्ततैरधर्मरताः ।
उन्नतशिराभिराढ्याः स्वस्तिकवत्संस्थिताभिश्च ॥ ७१ ॥
निम्नललाटा वधबन्धभागिनः क्रूरकर्मनिरताश्च ।
अभ्युन्नतैश्च भूपाः कृपणाः स्युः संवृतललाटाः ॥ ७२ ॥

कण्ठावरील शंख उंच व विस्तीर्ण असेल तर धनवान, सखल

असेल तर पुत्र आणि द्रव्य ह्यांचा अभाव. कपाळ उंच सखल म्हणजे एकदम खळगा असेल तर निर्धन. कपाळ अर्धचन्द्रासारखें असेल तर संपत्ति; भाल विस्तीर्ण असेल तर विद्वन्मान्य; कातडीवर शिरा बऱ्याच असतील तर दुष्कर्मप्रवृत्त; परंतु त्याच शिरा उंच किंवा स्वस्तिकाकार असतील तर शुभ; कपाळाला मध्येंच खोलगटपणा असेल तर बंधन किंवा नाश; शिवाय प्रवृत्तीहि वाईटाकडेच, कपाळ उंच असेल तर अधिपत्य. कपाळ लहान व अरुंद असेल तर कंजूष असतो.

रुदितमदीनमनश्रु स्निग्धं च शुभावहं मनुष्याणाम् ।
रूक्षं दीनं प्रचुराश्रु चैव न शुभप्रदं पुंसाम् ॥ ७३ ॥

एकाद्याला रडूं येतें पण भीती, दुःख, लाचारी अथवा अश्रू ह्यांपैकीं कांहीं नसते. केवळ दुःखाचें कारण नसतांहि रोदन येतें, तें अशुभ नव्हे; त्याच्या उलट, म्हणजे दुःख, लाचारी, घबराटपणा ह्यांच्यामुळें जें रोदन असतें तें वाईट.

हसितं शुभदमकम्पं विनिमीलितलोचनं च पापस्य ।
दुष्टस्य ऱ्हसितमसकृत् सोन्मादस्यासकृत्प्रान्ते ॥ ७४ ॥

कंपरहित हास्य शुभकारक असतें. डोळे मिटून हसणारे लोक दुष्ट असतात. आनंदाचें हसणें पुष्कळ वेळ राहतें. हसतांना वारंवार चमत्कारिक हास्य मद्यपानादिकानें उन्मत्ततेनें होतें.

तिस्रो रेखाः शतजीविनां ललाटायताः स्थिता यदि ताः ।
चतसृभिरवनीशत्वं नवतिश्चायुः सपञ्चाब्दा ॥ ७५ ॥
विच्छिन्नाभिश्चागम्यगामिनो नवतिरप्यरेखेण ।
केशान्तोपगताभी रेखाभिरशीतिवर्षायुः ॥ ७६ ॥
पञ्चभिरायुः सप्ततिरेकाग्रावस्थिताभिरपि षष्टिः ।
बहुरेखेण शतार्धं चत्वारिंशच्च वक्राभिः ॥ ७७ ॥

त्रिंशद्भ्रूलग्नाभिर्विंशतिकश्चैव वामवक्राभिः ।
क्षुद्राभिः स्वल्पायुर्न्यूनाभिश्चान्तरे कल्प्यम् ॥ ७८ ॥

कपाळावर तीन रेघा असतां १०० वर्षें आयुष्य असतें. चार रेघा असतील तर राजैश्वर्य भोगतो व त्याचें आयुष्य ९५ वर्षें असतें. कपाळावरील रेघा तुटलेल्या किंवा रेघा नसलेलें कपाळ असतां आयुष्य ९० वर्षें असतें व तो पुरुष अगम्य स्त्रीगमन करणारा असतो. केसापर्यंत लांब रेघा गेल्या असतील तर ८० वर्षें आयुष्य असतें. कपाळावर पांच रेघा असतील तर ७० वर्षें आयुष्य असतें. कपाळावरील सर्व रेघा शेवटीं एकत्र मिळाल्या असतील तर आयुष्य ६० वर्षें असतें. पुष्कळ रेघा असतील तर ५० वर्षें आयुष्य असतें. कपाळावरील रेघा वांकड्या असतील तर ४० वर्षें आयुष्य असतें. कपाळावरील रेघा भिंवयास मिळाल्या असतील तर आयुष्य ३० वर्षें असतें. कपाळावर डाव्या बाजूस वांकड्या रेघा असतील तर आयुष्य २० वर्षें असतें. कपाळावरील रेघा फार बारीक असतील तर तो मनुष्य अल्पायु होतो. वर सांगितल्यापेक्षां १।२ कमी रेघा असतांहि अल्पायु होतो. वर तीन रेघा असतां १०० वर्षें आयुष्य व ४ रेघा असतां ९५ वर्षें आयुष्य असें सांगितलें पण रेघा ज्या मानानें कमजास्त ठळक अगर अस्पष्ट असतील त्या मानानें आयुष्य प्रमाण ठरवावें.

परिमण्डलैर्गवाढ्याश्छत्राकारैः शिरोभिरवनीशाः ।
चिपिटैः पितृमातृघ्नाः करोतिशिरसां चिरान्मृत्युः ॥ ७९ ॥
घटमूर्धा ध्वानरुचिर्द्विमस्तकः पापकृद्धनैस्त्यक्तः ।
निम्नं तु शिरो महतां बहुनिम्नमनर्थदं भवति ॥ ८० ॥

डोकें वाटोळें असेल तर पुष्कळ गाई पाळणारा असतो. छत्राकार ( वर मोठें ) डोकें असतां राजासारखें ऐश्वर्य मिळतें. डोकें चपटें असेल तर आईबापांना वाईट असते. करवंटीप्रमाणें डोकें

असेल तर तो मनुष्य पुष्कळ वर्षें जगतो. घागरीसारखें डोकें असेल तर त्या मनुष्यास प्रवासाची फार हौस असते. द्विमस्तक असणारा पापकृत्यें करणारा व दरिद्री असतो. खोलगट डोकें असेल तर तो मनुष्य श्रेष्ठ होतो. फार खोलगट डोकें असेल तर दुःखी होतो.

एकैकभवैः स्निग्धैः कृष्णैराकुञ्चितैरभिन्नाग्रैः ।
मृदुभिर्न चातिबहुभिः केशैः सुखभाग् नरेन्द्रो वा ॥ ८१ ॥
बहुमूलविषमकपिलाः स्थूलस्फुटिताग्रपरुषह्रस्वाश्च ।
अतिकुटिलाश्चातिघनाश्च मूर्धजा वित्तहीनानाम् ॥ ८२ ॥

प्रत्येक रोमरंध्रांत एकच, मऊ, काळा, आखूड, फाटे न फुटलेला असा केस असेल तर तो मनुष्य सुखी असतो व राजासारखें ऐश्वर्य भोगतो. प्रत्येक रोमरंध्रांत पुष्कळ, कांहीं आंखूड कांहीं लांब कपिलवर्ण, जाड, फुटलेली अग्रे, रुक्ष, आंखूड, फार वांकडे, फार दाट असे केश असतील तर तो मनुष्य दरिद्री असतो.

यद्यद्गात्रं रुक्षं मांसविहीनं शिरावनद्धं च ।
तत्तदनिष्टं प्रोक्तं विपरीतमतः शुभं सर्वम् ॥ ८३ ॥

जो शरिराचा अवयव रुक्ष, मांसहीन, शिरा असलेला असेल तर तो अशुभ समजावा. याच्या उलट म्हणजे जो शरिराचा अवयव स्निग्ध, मांसयुक्त शिरारहित असेल तर तो शुभ समजावा.

त्रिषु विपुलो गम्भीरस्त्रिष्वेव षडुन्नतश्चतुर्ह्रस्वः
सप्तसु रक्तो राजा पञ्चसु दीर्घश्च सूक्ष्मश्च ॥ ८४ ॥

तीन ठिकाणीं विस्तीर्ण, तीन ठिकाणीं खोल, सहा ठिकाणी उंच, चार ठिकाणीं लहान, सात ठिकाणीं तांबडा, पांच ठिकाणीं लांब, पांच ठिकाणीं बारीक असा जो पुरुष असतो तो राजा होतो. याचा विस्तार पुढें आहे.

नाभिः स्वरः सत्त्वमिति प्रदिष्टं गम्भीरमेतत्त्रितयं नराणाम् ।
उरो ललाटं वदनं च पुंसां विस्तीर्णमेतत्त्रितयं प्रशस्तम् ॥८५॥

वक्षोऽथ कक्षा नखनासिकास्यं कृकाटिका चेति षडुन्नतानि ।
ह्रस्वानि चत्वारि च लिङ्गपृष्ठं ग्रीवा च जङ्घे च हितप्रदानि॥८६॥

नाभि, स्वर, धैर्य ही तीन मनुष्याची खोल असावींत. उर, ललाट, मुख ही तीन विस्तीर्ण असणारे पुरुष भाग्यवान असतात. कपाळ, कांख, नखें, नाक, मुख, मानेचा मागील भाग हे ६ भाग उंच असतील तर तें शुभ लक्षण समजावें. शिश्न, पाठ, मान, पोटऱ्या हें चार भाग लहान असतील तर हितकारक असतात.

नेत्रान्तपादकरताल्वधरोष्ठजिह्वा
रक्ता नखाश्च खलु सप्त सुखावहानि ।
सूक्ष्माणि पञ्च दशनाङ्गुलिपर्वकेशाः
साकं त्वचा कररुहाश्च न दुःखितानाम् ॥ ८७ ॥

हनुलोचनबाहुनासिकाः स्तनयोरन्तरमत्र पञ्चमम् ।
इति दीर्घमिदं तु पञ्चकं न भवत्येव नृणामभूभुजाम् ॥८८॥

इति क्षेत्रम् ॥

डोळ्याचा भाग, पाय, हात, टाळू, ओठाच्या खालचाभाग आणि जीभ व नखे रक्तासारखीं तांबडीं असतील तर सुखकारक असें लक्षण समजावें. दांत, बोटांचीं पेरें, केश, त्वचा, नखें हीं पांच बारिक असतां सुखी असतो. हनवटी, डोळे, बाहु, नाक, दोन स्तनांच्या मधलें अंतर हीं ५ राजा असेल तरच लांब असतात.

छाया शुभाशुभफलानि निवेदयन्ती
लक्ष्या मनुष्यपशुपक्षिषु लक्षणज्ञैः ।
तेजोगुणान् बहिरपि प्रविकाशयन्ती
दीपप्रभा स्फटिकरत्नघटास्थितेव ॥ ८९ ॥

शुभाशुभ फलें सांगणारी अशी छाया. लक्षणज्ञ पुरुषांनीं मनुष्य पशुपक्षी यांच्याठायी पहावी. स्फटिकरत्नांच्या घटामध्यें राहिलेली

दीपकांती जसी बाहेर प्रकाश करत्ये तशी शरीरस्थ छाया बाहेरहि तेजाच्या गुणांते प्रकट करते.

स्निग्धद्विजत्वङ्नखरोमकेशच्छाया सुगन्धा च महीसमुत्था ।
तुष्ट्यर्थलाभाभ्युदयान् करोति धर्मस्य चाहन्यहनि प्रवृत्तिम्॥९०॥

भूमिसमुत्थछाया ( शरीरकांति ) अर्थात मनुष्याचे दंत, त्वचा, नखें, आंगावरील केश, मस्तकावरील केश हे सर्व स्निग्ध होतात व शरीरकांति सुगंध होतें ती छायातुष्टि, अर्थलाभ, अभ्युदय व दिवसादिवसाचे ठाई धर्माची प्रवृत्ति वाढविते.

स्निग्धा सिताच्छहरिता नयनाभिरामा
सौभाग्यमार्दवसुखाभ्युदयान् करोति ।
सर्वार्थसिद्धिजननी जननीव चाप्या
छाया फलं तनुभृतां शुभमादधाति ॥ ९१ ॥

स्निग्ध, श्वेत, स्वच्छ, हरिद्वर्ण, नेत्रसौख्य करणारी अशी छाया सौभाग्य, मृदुत्व, सुख, अभ्युदय देतें. व सर्व कार्यांची सिद्धि करणारी आईसारखी ती छाया प्राण्यांस शुभफल देते.

चण्डाधृष्या पद्महेमाग्निवर्णा युक्ता तेजोविक्रमैः सप्रतापैः ।
आग्नेयीति प्राणिनां स्याज्जयाय क्षिप्रं सिद्धिं वांच्छितार्थस्य धत्ते ॥

चंड ( क्रोध ) अधृष्य ( अनाभिभवनीय ) कमल, सुवर्ण व अग्नियांसारख्या रंगांची, तेज, पराक्रम, शौर्य, यांही युक्त अशी ( आग्निसंबंधी ) छाया प्राण्यास जय, इच्छितार्थाची शीघ्र सिद्धि करते.

मलिनपरुषकृष्णा पापगन्धानिलोत्था
जनयति वधबन्धव्याध्यनर्थार्थनाशान् ।
स्फटिकसदृशरूपा भाग्ययुक्तात्युदारा
निधिरिव गगनोत्था श्रेयसां स्वच्छवर्णा ॥ ९३ ॥

मलिन, परुष ( रूक्ष ) कृष्णवर्ण, दुर्गंध अशी वायूत्पन्न छाया, वधबंध, व्याधि, अनर्थ, द्रव्यनाश करते. स्फटिकासारखी स्वच्छ, भाग्ययुक्त, फार उदार निधिसारखी सर्व अर्थ देणारी,. स्वच्छ वर्ण अशी आकाशोत्पन्न छाया होय.

छायाः क्रमेण कुजलाग्न्यानिलाम्बरोत्थाः
केचिद्वदन्ति दश ताश्च यथानुपूर्व्या ।
सूर्याब्जनाभपुरुहूतयमोडुपानां
तुल्यास्तु लक्षणफलैरिति तत्समासः ॥ ९४ ॥

इति छाया ॥

ह्या पूर्वोक्त छाया अनुक्रमानें पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश या पंचमहाभूतापासून उत्पन्न झालेल्या सांगितल्या. कोणी गर्गादि-ऋषि ह्या पांच व सूर्य, विष्णु, इंद्र, यम, चंद्र ह्यांच्या ५ एकूण दहा छाया असें म्हणतात. परंतु सूर्य व अग्नि; विष्णु व आकाश; इंद्र व पृथ्वी; यम व वायु; चंद्र व जल; या दोहो दोहोंचें लक्षण व फलें यांहीं करून समानत्व आहे; यास्तव मी येथें त्यांचा पांचांतच संक्षेप केला आहे.

करिवृषरथौघभेरीमृदङ्गसिंहाब्दनिः स्वना भूपाः ।
गर्दभजर्जररूक्षस्वराश्च धनसौख्यसन्त्यक्ताः ॥ ९५ ॥

इति स्वराः ॥

हत्ती, वृषभ, रथसमूह, दुंदुभि, मृदंग, सिंह, मेघ यांसारखा ज्यांचा शद्ब ते राजे होतात. गाढव, विकारयुक्त, कठोर किंवा कर्कश ज्यांचा स्वर ते द्रव्य व सौख्य यांनीं त्यक्त म्हणजे दरिद्री व दुःखी होत.

**सप्त भवन्ति च सारा मेदोमज्जात्वगस्थिशुक्राणि ।**
**रुधिरं मांसं चेति प्राणभृतां तत्समासफलम् ॥ ९६ ॥**

मेद ( हाडांतील स्नेहभाग ) कपालांतरस्थमेंदू, त्वचा, हाडें, रेत, रक्त, मांस ह्या ७ गोष्टी प्राण्यांमध्यें सार ( बळकट ) असतां. त्यांचे संक्षेपानें फल सांगतों.

ताल्वोष्ठदन्तपालीजिह्वानेत्रान्तपायुकरचरणैः ।
रक्तैस्तु रक्तसारा बहुसुखवनितार्थपुत्रयुताः ॥ ९७ ॥

तालु, ओष्ठ, दंतांची मांसपंक्ति, जिव्हा, नेत्र, घ्रांण, गुद, हस्त, पाय, हे तांबडे असतां तो रक्तसारपुरुष, बहुत सुख, स्त्री, द्रव्य, पुत्र यांनीं युक्त होतो.

स्निग्धत्वक्का धनिनो मृदुभिः सुभगा विचक्षणास्तनुभिः ।
मज्जामेदः साराः सुशरीराः पुत्रवित्तयुताः ॥ ९८ ॥

त्वचा ( कातडी ) स्निग्ध असतां धनवान्, मृदु असतां भाग्यवान्–तनु ( पातळ ) त्वचा असतां पंडित होतात. मज्जा व मेद बलिष्ठ असतां उत्तम, शरीर, पुत्र, द्रव्य यांनीं युक्त होतात.

स्थूलास्थिरस्थिसारो बलवान् विद्यान्तगः सुरूपश्च ।
बहुगुरुशुक्राः सुभगा विद्वांसो रूपवन्तश्च ॥ ९९ ॥

मोठें हाड ज्याच तो अस्थिसार बलवान्, विद्वान्, सुरूप होतो. बहुत धन व रेत ज्यांचे ते सुभग, विद्वान्, रुपवान् असें होतात.

उपचितदेही विद्वान् धनी सुरूपश्च मांससारी यः ।
सङ्घात इति च सुश्लिष्टसन्धिता सुखभुजो ज्ञेयाः ॥ १०० ॥
इति संहतिः ॥

जो मांससार तो स्थूलशरीर, विद्वान्, धनवान्, सुरूप होतो. सर्वांगाच्या संधीच्या ठाई सुश्लिष्टत्व म्हणजे सांधे चांगले बळकट मिळालेले असतां संहति होते. तो ज्या पुरुषांस असेल ते सुखी जाणावे.

स्नेहः पञ्चसु लक्ष्यो वाग्जिह्वादन्तनेत्रनखसंस्थः ।
सुतधनसौभाग्ययुताः स्निग्धैस्तैर्निर्धना रूक्षैः ॥ १०१ ॥
इति स्नेहः ॥

वर्ण, जिव्हा, दंत, नेत्र, नखें या पांचस्थानीं स्नेह पहावा. ही ५ स्निग्ध असतां पुत्र, धन, सौभाग्य यांनीं युक्त होतात व ही पांच रुक्ष असतां दरिद्री होतात.

द्युतिमान्वर्णः स्निग्धः क्षितिपाना मध्यमः सुतार्थवताम् ।
रुक्षो धनहीनानां शुद्धः शुभदो न सङ्कीर्णः ॥ १०२ ॥
इति वर्णः ॥

राजांचा वर्ण तेजस्वी व स्निग्ध होय. पुत्र व द्रव्य यांनीं युक्तांचा वर्ण मध्यम ( किंचित् स्निग्ध व किंचित् रुक्ष ) होय. दरिद्र्यांचा वर्ण रुक्ष होय. शुद्ध वर्ण शुभ व मिश्रितवर्ण अशुभ होय.

साध्यमनूकं वक्त्रात् गोवृषशार्दूलसिंहगरुडमुखाः ।
अप्रतिहतप्रतापा जितरिपवो मानवेन्द्राश्च ॥ १०३ ॥
वानरमाहिषवराहाजतुल्यवदनाः सुतार्थसुखभाजः ।
गर्दभकरभप्रतिमैर्मुखैः शरीरैश्च निःस्वसुखाः ॥ १०४ ॥
इत्यनूकम् ॥

मुखावरून पूर्वजन्मशुभाशुभत्वाची कल्पना करावी. गाय वृषभ, वाघ, सिंह, गरुड यांसारखे ज्यांचें मुख ते अकुंठित सामर्थ्य, जितशत्रूराजे होतात. वानर, रेडा डुकर, बकरा यांसारखें ज्यांचें मुख ते पुत्रवान् धनवान् सुखी होतात. गाढव, उंट यांसारखें ज्यांचें मुख व शरीर ते दरिद्री व दुःखी होतात.

अष्टशतं षण्णवतिः परिमाणं चतुरशीतिरिति पुंसाम् ।
उत्तमसमहीनानामङ्गुलसङ्ख्यास्वमानेन ॥ १०५ ॥
इत्युन्मानम् ॥

१०८, ९६, ८४ अंगुलें ( त्याचे हाताचीं ) अनुक्रमें करून उत्तम, मध्यम, कनिष्ट असें पुरुषांच्या उंचीचें मान जाणावें.

भारार्धतनुः सुखभाक् तुलितोऽतो दुःखभाग्भवत्यूनः ।
भारोऽतीवाढ्यानामध्यर्धः सर्वधरणीशः ॥ १०६ ॥

मनुष्य तोलला असतां जो १००० पलें वजन येतो तो सुखी होय, याहून कमी दुःखी होय. भार म्हणजे २००० पलें वजन अतिधनवान् होत; ३००० पलें वजन सार्वभौमराजा होतो. ( ४ तोळे म्हणजे १ पल, २००० पलें म्हणजे १ भार असें प्रमाण जाणावें येथें ८० गुंजांचा तोळा घ्यावा.

विंशतिवर्षा नारी पुरुषः खलु पञ्चविंशतिभिरब्दैः ।
अर्हति मानोन्मानं जीवितभागे चतुर्थे वा ॥ १०७ ॥
इति मानम् ॥

स्त्री विसाव्या वर्षीं व पुरुष पंचविसाव्या वर्षीं मान म्हणजे वजन व उन्मान म्हणजे उंची यांस योग्य होतात. अथवा शंभर वर्षांच्या आंत आयुष्याचा निश्चय झाला असतां त्याचे चतुर्थांश भागीं मानोन्मानास योग्य होतात.

भूजलशिख्यनिलाम्बरसुरनररक्षःपिशाचकतिरश्चाम् ।
सत्त्वे न भवति पुरुषो लक्षणमेतद्भवत्येषाम् ॥ १०८ ॥

भूमि, जल, अग्नि, वायु, आकाश, देव, मनुष्य, राक्षस, पिशाच्च, पशुपक्षी यांच्या सत्वानें म्हणजे प्रकृतीनें पुरुष होतो. त्यांचें हें वक्ष्यमाण लक्षण जाणावें.

महीस्वभावः शुभपुष्पगन्धः । सम्भोगवान् सुश्वसनः स्थिरश्च ।
तोयस्वभावो बहुतोयपायी । प्रियाभिलाषी रसभोजनश्च ॥१०९॥

चंपक प्रभृति शुभ पुष्पासारखा ज्याचा असा गंध आहे, भोगशील सुंदर आहे ज्याचा वायु असा पुरुष भूमिप्रकृति होय. बहुत उदकपान करणारा, अनुकूल भाषण करणारा, मधुरादि रसयुक्त भोजन करणारा असा पुरुष जलप्रकृति होय.

अग्निप्रकृत्या चपलोऽतितीक्ष्ण । श्चण्डः क्षुधालुर्बहुभोजनश्च ।
वायोःस्वभावेन चलः कृशश्च । क्षिप्रं च कोपस्य वशं प्रयाति

अग्निप्रकृतिकरून चपल, अतितीक्ष्ण, क्रूर, भुकाळू, बहुत खाणारा असा पुरुष होतो. वायुप्रकृतीनें चंचल, कृश, शीघ्रकोपी असा पुरुष होतो.

स्वप्रकृतिर्निपुणो विवृतास्यः। शब्दगतेः कुशलः सुशिराङ्गः।
त्यागयुतः पुरुषो मृदुकोपः। स्नेहरतश्च भवेत् सुरसत्त्वः ॥१११॥

सर्व कलांमध्यें निपुण, प्रसृतमुख, शास्त्रगायनादिकांत कुशल, सुषिर (पोळक) शरीर असा पुरुष आकाशप्रकृति होय दानशील, अल्पकोपी, स्नेहयुक्त असा पुरुष देवप्रकृति होय.

मर्त्यसत्त्वसंयुतो गीतभूषणप्रियः।
संविभागशीलवान्नित्यमेव मानवः ॥ ११२ ॥

मनुष्यप्रकृतियुक्त पुरुष गायन व भूषण ( अलंकार ) ह्याविषयीं प्रीतियुक्त सम्यक् विभाग व चरित्र यांनीं युक्त, असा नित्य होतो.

तीक्ष्णप्रकोपः खलचेष्टितश्च। पापश्च सत्वेन निशाचराणाम्।
पिशाचसत्वश्चपलो मलाक्तो। बहुप्रलापी च समुल्वणाङ्गः ॥११३॥

अत्यंत क्रोधी, दुर्जनासारखा व्यापार करणारा; पापरत असा राक्षसप्रकृति पुरुष होतो. चंचल, मलयुक्त, बहुत बडबड करणारा, स्थूलशरीर असा पिशाचप्रकृति पुरुष होतो.

भीरुः क्षुधालुर्बहुभुक् च यःस्याज्ज्ञेयः स सत्वेन नरस्तिरश्चाम्।
एवं नराणां प्रकृतिःप्रदिष्टा यल्लक्षणज्ञाः प्रवदन्ति सत्वम् ॥११४॥

इति प्रकृतिः।

भयार्त, भुकाळू, बहुत खाणारा, असा पशुपक्ष्यांच्या प्रकृतियुक्त पुरुष होय. याप्रकारें पुरुषांच्या प्रकृति सांगितल्या. असें प्रकृति-लक्षण जाणणारे प्रकृति सांगतात.

शार्दूलहंससमदद्विपगोपतीनां
तुल्या भवन्ति गतिभिः शिखिनां च भूपाः।

येषां च शब्दरहितं स्तिमितं च यातं
तेऽपीश्वरा द्रुतपरिप्लुतगा दरिद्राः ॥ ११५ ॥

इति गतिः ।

व्याघ्र, हंस, उन्मत्तहत्ती, वृषभ, मयूर यांसारख्या गमनाचे पुरुष राजे होतात. ज्यांचें गमन शब्दरहित व मंद तेहि धनवान् होतात. त्वरित व अडखळत जे गमन करतात ते दरिद्री होतात.

श्रान्तस्य यानमनशनं च बुभुक्षितस्य
पानं तृषापरिगतस्य भयेषु रक्षा ।
एतानि यस्य पुरुषस्य भवन्ति काले
धन्यं वदन्ति खलु तं नरलक्षणज्ञाः ॥ ११६ ॥

चालतानां दमला असतां वाहन मिळतें. भूकलागली असतां खाण्यास मिळते. तहान लागली असतां पाणी वगैरे पिण्यास मिळतें. भीति वाटत असतां रक्षणकर्ता मिळतो. असे योग ज्या पुरुषास वेळेवर मिळतात, त्या पुरुषास पुरुषलक्षण जाणणारे धन्य ( शुभलक्षण ) असें म्हणतात.

पुरुषलक्षणमुक्तमिदं मया
मुनिमतान्यवलोक्य समासतः ।
इदमधीत्य नरो नृपसम्मतो
भवति सर्वजनस्य च वल्लभः ॥

॥ इति श्रीवराहमिहिरकृतौ बृहत्संहितायां पुरुषलक्षणम् ॥

पूर्वाचार्यांचीं मतें पाहून वर पुरुषलक्षणें संक्षेपानें सांगितलीं आहेत. ह्याचा नीट अभ्यास केल्यास तो मनुष्य लोकांस प्रिय होऊन राजाकडून मानसन्मान पावेल.



# प्रकरण दुसरें.

## ॥ अथ पञ्चमहापुरुषलक्षणविभागो नामाध्यायः ॥

ताराग्रहैर्बलयुतैः स्वक्षेत्रस्वोच्चगैश्चतुष्टयगैः ।
पञ्च पुरुषाः प्रशस्ता जायन्ते तानहं वक्ष्ये ॥ १ ॥

मंगळादि पांचग्रह बलिष्ठ, स्वगृही, स्वोच्ची, केंद्री असतां, पाचप्रकारचे उत्तम पुरुष होतात ते खालीं सांगतले आहेत.

जीवेन भवति हंसः सौरेण शशः कुजेन रुचकश्च ।
भद्रो बुधेन बलिना मालव्यो दैत्यपूज्येन ॥ २ ॥

वर सांगितलेल्या स्थानांत गुरु बलिष्ठ असतां हंससंज्ञक पुरुष होतो. शनि बलिष्ठ असतां शशसंज्ञक पुरुष होतो. मंगळ बलिष्ठ असतां रुचकसंज्ञक पुरुष होतो. बुध बलिष्ठ असतां भद्रसंज्ञक पुरुष होतो. शुक्र बलिष्ट असतां मालव्यसंज्ञक पुरुष होतो.

सत्त्वमहीनं सूर्याच्छारीरं मानसं च चन्द्रबलात् ।
यद्राशिभेदयुक्तावेतौ तल्लक्षणः स पुमान् ॥ ३ ॥
तद्धातुमहाभूतप्रकृतिद्युतिवर्णसत्त्वरूपाद्यैः ।
अबलरवीन्दुयुतैस्तैः सङ्कीर्णा लक्षणैः पुरुषाः ॥ ४ ॥

सूर्य बलिष्ठ असतां सत्वादि गुण परिपूर्ण होतात. देहगुण व मानसगुण चंद्रबलानें होतात. ज्या राशीचे होराद्रेष्काणादि भेदयुक्त सूर्य चंद्र असतील त्या राशिभेदस्वामीच्या लक्षणांचा तो पुरुष होतो. त्या स्वामीच्या स्नाय्वादिधातु, महाभूतांच्या प्रकृति (महीस्वभाव इत्यादि मागील प्रकरणांत श्लोक १०९।११० पहा. कांति मागील प्रकरण श्लोक ८९ ) वर्ण, सत्व, रूपादिकांहीं समान होतात. ( जन्मकालीं सबल सूर्य चंद्र ज्या ग्रहाच्या गृहहोरादि षड्वर्गी असतील त्या ग्रहाच्या धात्वादि प्रकृतियुक्त पुरुष होतो. ) जन्मकालीं चंद्रसूर्ययुक्त गृहहोरादि षड्वर्ग असतां लक्षणेंही संकीर्ण ( मिश्र ) होतात.

भौमात्सत्त्वं गुरुता बुधात्सुरेज्यात्स्वरः सितात्स्नेहः ।
वर्णः सौरादेषां गुणदोषैः साध्वसाधुत्वम् ॥ ५ ॥

सत्व ( धैर्य ) मंगळापासून होतें. शरिराचे गुरुत्व बुधापासून, शब्द गुरूपासून, स्नेह ( निर्मलत्व ) शुक्रापासून, वर्ण शनैश्चरापासून हीं होतात. या ग्रहांच्या सबलत्वानें चांगलें व निर्बलत्वानें वाईट असे होतात.

सङ्कीर्णाः स्युर्न नृपा दशासु तेषां भवन्ति सुखभाजः ।
रिपुगृहनीचोच्चच्युतसत्पापनिरीक्षणैर्भेदः ॥ ६ ॥

संकीर्ण ( मिश्र ) जे ते राजे होत नाहींत. त्या ग्रहाच्या दशेमध्यें सुखी होतात. शत्रुग्रह, नीच, उच्च यांपासून च्युत जे शुभ व पापग्रह यांच्या दृष्टीनें त्या पुरुषांचा भेद म्हणजे सुखदुःखादि मिश्रत्व होतें.

षण्णवतिरङ्गुलानां व्यायामो दीर्घता च हंसस्य ।
शशरुचकभद्रमालव्यसंज्ञितास्त्र्यङ्गुलविवृद्ध्या ॥ ७ ॥

हंससंज्ञक पुरुषाची लांबी ९६ अंगुलें व उंचीही ९६ अंगुलेंच होय. शश, रुचक, भद्र, मालव्य, संज्ञक पुरुषांची रुंदी व उंची तीन तीन अंगुलें अनुक्रमानें अधिक जाणावी. म्हणजे ९९ शश, १०२ रुचक, १०५ भद्र, १०८ मालव्य अशी जाणावी.

यः सात्त्विकस्तस्य दया स्थिरत्वं सत्त्वार्जवं ब्राह्मणदेवभक्तिः
रजोऽधिकः काव्यकलाक्रतुस्त्रीसंसक्तचित्तः पुरुषोऽतिशूरः ॥
तमोऽधिको वञ्चयिता परेषां मूर्खोऽलसः क्रोधपरोऽतिनिद्रः
मिश्रैर्गुणैः सत्त्वरजस्तमोभिर्मिश्रास्तु ते सप्त सह प्रभेदैः ॥ ९ ॥

सत्वगुणाधिक पुरुषास दया, स्थिरचित्त, सत्यभाषण, सरळस्वभाव, ब्राह्मण व देव यांची भक्ति हे गुण असतात. रजोगुण अधिक असल्यास काव्यनृत्यगीतादिकला, यज्ञ, स्त्री यांच्याठायीं आसक्त-

चित्त व अतिशूर असा होतो. तमोगुण अधिक असल्यास लोकांस ठकविणारा, मूर्ख, आळशी, क्रोधिष्ठ, खूप झोप घेणारा असा होतो. सत्व, रज, तम हे तीनही गुण मिश्रित असतां पूर्वोक्त स्वभाव मिश्र होतात. त्यांचे भेद सात होतात. ( १ सत्व २ रज ३ तम ४ सत्व-रजसी ५ रजतमसी ६ सत्वतमसी ७ सत्वरजस्तमांसि असे सात प्रकार राशिभेदास्तव व संकीर्णत्वास्तव होतात. )

मालव्यो नागनासासमभुजयुगलो जानुसम्प्राप्तहस्तो
मांसैः पूर्णाङ्गसन्धिः समरुचिरतनुर्मध्यभागे कृशश्च ।
पञ्चाष्टौ चोर्ध्वमास्यं श्रुतिविवरमपि त्र्यङ्गुलोनं च तिर्यग् ।
दीप्ताक्षं सत्कपोलं समसितदशनं नातिमांसाधरोष्ठम् ॥ १० ॥

हत्तीच्या सोंडेसारखे दोन्ही खांदे, गुडघ्यापर्यंत लांब हात, अंगाचे सांधे परिपूर्ण मांसल असलेले. सारखें आणि तेजस्वी शरीर, मध्य-भागीं कृश, हनुवटीपासून कपाळापर्यंत तेरा अंगुलें मुख, कर्णविव-रहि तिरकस त्र्यंगुलोन ( तीन अंगुलांत कांहीं कमी ) म्हणजे हनु-वटीपासून कर्णविवर १० अंगुलें. स्वच्छ डोळे, सुंदर गाल, सारखे व पांढरे दांत, फार मोठा नाहीं अधरोष्ठ, असा मालव्यसंज्ञक पुरुष असतो.

मालवान् सभरुकच्छसुराष्ट्रान् लाटसिन्धुविषयप्रभृतींश्च ।
विक्रमार्जितधनीऽवति राजा पारियात्रनिलयः कृतबुद्धिः ॥ ११ ॥

सुंदर बुद्धि, पारियात्र पर्वतावर राहणारा, स्वपराक्रमानें संपा-दित द्रव्य असा मालव्यसंज्ञक पुरुष, राजा होऊन माळवा, मरु, कच्छ, सुराष्ट्र, लाट, सिंधुदेश इत्यादिकांतें रक्षण करतो.

सप्ततिवर्षो मालव्योऽयं त्यक्ष्यति सम्यक् प्राणांस्तीर्थे ।
लक्षणमेतत् सम्यक् प्रोक्तं शेषनराणां चातो वक्ष्ये ॥ १२ ॥

७० वर्षांचा हा मालव्य. तप करून पुण्यभूमीच्या ठायीं प्राण

सोडील. हें उत्तम प्रकारें मालव्य पुरुषाचें लक्षण सांगितलें. भद्रादि पुरुषांचीं लक्षणें पुढें दिलीं आहेत.

उपचितसमवृत्तलम्बबाहुर्भुजयुगलप्रमितः समुच्छ्रयोऽस्य ।
मृदुतनुघनरोमनद्धगण्डो भवति नरः खलु लक्षणेन भद्रः ॥ १३ ॥

पुष्ट, सारखे, वाटोळे, लांब असे ज्याचे, बाहु आहेत वांवाइतकी ज्याची उंची आहे, मृदु, बारिक, दाट अशा रोमांनीं (अंगावरील केशांनीं) युक्त ज्याचे गाल आहेत असा पुरुष भद्रसंज्ञक होतो.

त्वक्शुक्रसारः पृथुपीनवक्षाः सत्त्वाधिको व्याघ्रमुखः स्थिरश्च ।
क्षमान्वितो धर्मपरः कृतज्ञो गजेन्द्रगामी बहुशास्त्रवेत्ता ॥ १४ ॥
प्राज्ञो वपुष्मान् सुललाटशङ्खः कलास्वभिज्ञो धृतिमान् सुकुक्षिः ।
सरोजगर्भद्युतिपाणिपादो योगी सुनासः समसंहतभ्रूः ॥ १५ ॥

त्वचा बळकट, रेत पुष्कळ, विस्तीर्ण व पुष्ट कपाळ, सत्वगुणाधिक, व्याघ्रासारखें मुख, स्थिरबुद्धि, दयायुक्त, धर्मरत, उपकार जाणणारा, मंदगति, बहुतशास्त्रें जाणणारा, ज्ञानी, दृढदेह, ललाट व शंख ज्याचे, उत्तम आहेत नृत्यादिकला जाणणारा, धैर्यवान, उत्तम कुक्षि, कमल गर्भासारखे तेजस्वी हात व पाय योगाभ्यासी, सुंदरनाक, सारख्या व मिळालेल्या भिंवया याप्रमाणें लक्षणें असणारा भद्र पुरुष होय.

नवाम्बुसिक्तावनिपत्रकुङ्कुमद्विपेन्द्रदानागुरुतुल्यगन्धता ।
शिरोरुहाश्चैकजकृष्णकुञ्चितास्तुरङ्गनागोपमगूढगुह्यता ॥ १६ ॥

नवीन उदकानें सिंचित भूमि, तमालपत्र, कुंकुम, हत्तीचे मदोदक, धूप यासारखा गंध, एका रोमरंध्रामध्यें एक असे काळे अंकुचित केश ज्याचे आहेत, घोडा व हत्ती या सारखे गुप्त आहे ज्याचें शिश्न असें भद्रपुरुष होय.

हलमुसलगदासिशङ्खचक्र
द्विपमकराब्जरथाङ्कितांघ्रिहस्तः ।
विभवमपि जनोऽस्य बोभुजीति
क्षमति हि न स्वजनं स्वतन्त्रबुद्धिः ॥ १७ ॥

नांगर, मुसल, गदा, तलवार, शंख, चक्र, हत्ती, मगर, कमल, गाडी यांसारख्या रेषांनीं युक्त ज्याचे, पाय व हात आहेत ते लोक ऐश्वर्य ( संपत्ति ) यांचा उपभोग करितात. स्वजनाची क्षमा करीत नाहीं. व ज्याची बुद्धि स्वाधीन आहे असा भद्रपुरुष होय.

अङ्गुलानि नवतिश्च षड्रूनान्युच्छ्रयेण तुलयापि हि भारः ।
मध्यदेशनृपतिर्यदि पुष्टास्त्र्यादयोऽस्य सकलावनिनाथः ॥ १८ ॥

सहा अंगुलें कमी नव्वद म्हणजे ८४ अंगुलें उंच, दोनहजार पलें वजन असा भद्रसंज्ञक पुरुष मध्य देशाचा राजा होईल. जर तोच पुरुष १०५ अंगुलें उंच असेल तर सर्व पृथ्वीचा राजा होईल. ( सातव्या श्लोकांत त्र्यादिपुष्ठ सांगितले आहे त्याप्रमाणें )

भुक्त्वा सम्यग्वसुधां शौर्येणोपार्जितामशीत्यब्दः ।
तीर्थे प्राणांस्त्यक्त्वा भद्रो देवालयं याति ॥ १९ ॥

पराक्रमानें मिळविलेल्या पृथ्वीचा उपभोग घेऊन ८० वर्षांनंतर पुण्यक्षेत्रीं प्राणत्याग करून भद्रसंज्ञक महापुरुष स्वर्गाप्रत जातो.

ईषद्दन्तुरकस्तनुद्विजनखः कोशेक्षणः शीघ्रगो
विद्याधातुवणिक्क्रियासु निरतः सम्पूर्णगण्डः शठः ।
सेनानीः प्रियमैथुनः परजनस्त्रीसक्तचित्तश्चलः
शूरो मातृहितो वनाचलनदीदुर्गेषु सक्तः शशः ॥ २० ॥

थोडे वर दातांचा, बारिक दांत व नखांचा, नेत्रपाती अधिक शीघ्रगामी, ज्यांची शद्वविद्या, गौरिकादिधातु, क्रयविक्रयादिव्यापार यांच्या ठायी तत्पर, पुष्ट गालांचा, परकार्यविन्मुख, सेनापति, मैथुनप्रिय,

लोकांच्या स्त्रियांच्या ठायीं आसक्त, चंचलबुद्धि, युद्धशूर, मातृभक्त, वनें, पर्वत, नद्या, किल्ले यांच्या ठायीं आसक्त चित्त असा शशसंज्ञक महापुरुष होय.

दीर्घोऽङ्गुलानां शतमष्टहीनं साशङ्कचेष्टः पररन्ध्रविच्च ।
सारोऽस्य मज्जा निभृतप्रचारः शशो ह्ययं नातिगुरुः प्रदिष्टः॥२१॥

हा शशसंज्ञक पुरुष ९२ अंगुलें उंच, शंकायुक्त व्यापार कर्ता, शत्रूचें छिद्र जाणणारा, मज्जासार, स्थिरप्रचार ( चंचल नव्हे ) फार स्थूल नाहीं असा होय.

मध्ये कृशः खेटकखड्गवीणापर्यङ्कमालामुरजानुरूपाः ।
शूलोपमाश्चोर्ध्वगताश्च रेखाः शशस्य पादोपगताः करे वा ॥२२॥

मध्यभागीं कृश, ढाल, तलवार, वीणा, मंचक, माळ, मृदंग यांसारख्या व शूलासारखा ऊर्ध्वगत रेषा पायांवर किंवा हातांवर असा पुरुष शशसंज्ञक होय.

प्रात्यन्तिको माण्डलिकोऽथवायं स्फिक्स्रावशूलाभिभवार्तमूर्तिः ।
एवं शशः सप्ततिहायनोऽयं वैवस्वतस्यालयमभ्युपैति ॥ २३ ॥

शश, गुहावासी लोकांचा राजा किंवा मांडलिक राजा होतो. कुल्यांचा स्राव व शूलरोगाच्या पीडेने पीडितशरीर असा ७० वर्षांनीं मरतो.

रक्तं पीनकपोलमुन्नतनसं वक्त्रं सुवर्णोपमं
वृत्तं चास्य शिरोऽक्षिणी मधुनिभे सर्वे च रक्ता नखाः ।
स्रग्दामाङ्कुशशङ्खमत्स्ययुगलक्रत्वङ्गकुम्भाम्बुजै-
श्चिह्नैर्हंसकलस्वनः सुचरणो हंसः प्रसन्नेन्द्रियः ॥ २४ ॥

आरक्त, पुष्टगाल, उंचनाक, सुवर्णासारखें असें मुख, वाटोळें मस्तक, मधासारख्या वर्णाचे डोळे, सर्व नखें तांबडीं, माला, अंकुश, शंख, मत्स्यद्वय, यज्ञांग, ( वेदी स्रुवादि ) कुंभ, कमल या चिन्हांनीं

चिन्हित, हंसासारखा मधुरशद्ब, सुंदरपाय, स्वच्छ इंद्रियें असा हंस-संज्ञक महापुरुष होय.

रतिरम्भसि शुक्रसारता द्विगुणा चाष्टशतैः पलैर्मितिः ।
परिमाणमथास्य षड्युता नवतिः सम्परिकीर्तिता बुधैः ॥ २५ ॥

हंसाची क्रीडा उदकामध्यें, रेत अधिक, वजन १६०० पलें, उंची ९६ अंगुळें याप्रमाणें पंडितांनीं सांगितलीं आहेत.

भुनक्ति हंसः खसशूरसेनान् गान्धारगङ्गायमुनान्तरालम् ।
शतं दशोनं शरदां नृपत्व कृत्वा वनान्ते समुपैति मृत्युम् ॥२६॥

खस, शूरसेन, गांधार, गंगा व यमुना यांचा मध्यप्रदेश यांचा उपभोग हंस महापुरुष करतो. ९० वर्षे राज्य करून वनांत मृत्यु पावतो.

सुभ्रूकेशो रक्तश्यामः कम्बुग्रीवो व्यादीर्घास्यः ।
शूरः क्रूरः श्रेष्ठो मन्त्री चौरस्वामी व्यायामी च ॥२७॥

सुंदर भिवया व केश, तांबडा व काळावर्ण, त्रिवलियुक्तमान, थोडेसें लांब तोंड, शूर, क्रोधी, श्रेष्ठ, मसलती, चोरांचा राजा, श्रम करणारा, असा रुचकसंज्ञक महापुरुष होय.

यन्मात्रमास्यं रुचकस्य दीर्घं मध्यप्रदेशे चतुरस्रता सा ।
तनुच्छविः शोणितमांससारो हन्ता द्विषां साहससिद्धकार्यः
खट्वाङ्गवीणावृषचापवज्रशक्तीन्दुशूलाङ्कितपाणिपादः ।
भक्तो गुरुब्राह्मणदेवतानां शताङ्गुलः स्यात्तुलया सहस्रम् ॥२८॥

रुचकाचें जितकें लांब मुख तितकीच उदरमध्याची विपुलता, ( रुंदी ) सूक्ष्मत्वचा, रक्त व मांस हीं बळकट, शत्रु मारणारा, साहसकर्मानें कार्यसिद्ध करणारा, रुचक संज्ञक महापुरुष होय.

मन्त्राभिचारकुशलः कृशजानुजङ्घो
विन्ध्यं ससह्यगिरिमुज्जयनीं च भुक्त्वा ।

खट्वांग ( आयुधविशेष ), वीणा, वृषभ, धनुष्य, वज्र, शक्ति ( सैती ), चंद्र, त्रिशूल यांसारख्या रेषांनीं युक्त हात व पाय, गुरु, ब्राह्मण, देव.यांचा भक्त १०० अंगुलें उंच, सहस्रपलें वजन असा रुचकसंज्ञक पुरुष होय.

सम्प्राप्य सप्ततिसमा रुचको नरेन्द्रः
शस्त्रेण मृत्युमुपयात्यथवा नलेन ॥ ३० ॥

मंत्रप्रयोग व जारणमारणादि याच्याठायीं कुशल, गुडघे व पोटऱ्या बारिक, विंध्य व सह्य पर्वत आणि उज्जनी—यांचें राज्य करून ७० वर्षें झाल्यावर रुचक महापुरुष राजा शस्त्रानें अथवा अग्नीनें मृत्यु पावतो.

पश्चापरे वामनको जघन्यः कुब्जोऽपरो मण्डलकोऽथ सामी ।
पूर्वोक्तभूपानुचरा भवन्ति सङ्कीर्णसंज्ञाः शृणु लक्षणैस्तान् ॥३१॥

पूर्वोक्त पांच महापुरुषांहून दुसरे वामनक, जघन्य, कुब्ज मंडलक, सामी हे पांच पुरुष पूर्वोक्तराजांचे अनुचर ( सुहृत ), संकीर्ण (मिश्र) संज्ञक होत. त्यांची लक्षणें सांगतों.

सम्पूर्णाङ्गो वामनो भग्नपृष्ठः किञ्चिच्चोरुमध्यकक्षान्तरेषु ।
ख्यातो राज्ञो ह्येष भद्रानुजीवी स्फीतो दाता वासुदेवस्य भक्तः ॥

पूर्णावयव, वक्रपाठ, मांड्या, मध्यभाग, कांख यांमध्यें थोडासा वांकडा. कीर्तिमान्, भद्रसंज्ञक राजाचा सेवक; वृद्धिगत, दानशील, वासुदेवाचा भक्त, वामन पुरुष होय.

मालव्यसेवी तु जघन्यनामा खण्डेन्दुतुल्यश्रवणः सुगन्धिः ।
शुक्रेण सारः पिशुनःकविश्च रूक्षच्छविःस्थूलकराङ्गुलीकः ॥३३॥

क्रूरो धनी स्थूलमतिःप्रतीतस्ताम्रच्छविःस्यात्परिहासशीलः ।
उरोऽङ्घ्रिहस्तेष्वसिशक्तिपाशपरश्वधाङ्कश्च जघन्यनामा ॥३४॥

मालव्यसंज्ञक पुरुषाची सेवा करणारा, अर्धचंद्रासारखे कान, सुंदर अंगसंधि, रेत अधिक, पिशुन, कवि, कठिनत्वचा, करांगुली मोठ्या, क्रोधी, धनवान, अल्पबुद्धि, प्रसिद्ध लोहितवर्णत्वचा, हंसणारा, उर,

चरण, हस्त, यांवर तलवार, शक्ति, पाश, फरश, यांसारख्या रेषा, असा जघन्यनामक पुरुष होय.

कुब्जो नाम्ना यः स शुद्धो ह्यधस्तात् क्षीणः किञ्चित्पूर्वकाये नतश्च
हंसासेवी नास्तिकोऽर्थैरुपेतो विद्वान् शूरः सूचकः स्यात् कृतज्ञः
कलास्वभिज्ञः कलहप्रियश्च प्रभूतभृत्यः प्रमदाजितश्च
सम्पूज्य लोकं प्रजहात्यकस्मात् कुब्जोऽयमुक्तःसततोद्यतश्च॥ ३६॥

कुब्जनामक, अधोभागी संपूर्णांग, पूर्वभागीं ( वरच्या अंगीं ) किंचित् क्षीण व नत ( अस्पष्ट ) हंससंज्ञकची सेवा करणारा, नास्तिक, द्रव्ययुक्त, विद्वान, शूर, पिशुन, उपकार जाणणारा, नृत्यादि कला जाणणारा, कलहप्रिय; बहुत चाकर, स्त्रीजित, लोकांची पूजा करून अकस्मात् सोडणारा, निरंतर उद्योगी कुब्ज होय.

मण्डलकनामधेयो रुचकानुचरोऽभिचारवित्कुशलः ।
कृत्यावैतालादिषु कर्मसु विद्यासु चानुरतः ॥ ३७ ॥
वृद्धाकारः खररूक्षमूर्धजः शत्रुनाशने कुशलः ।
द्विजदेवयज्ञयोगप्रसक्तधीः स्त्रीजितो मतिमान् ॥ ३८ ॥

मंडलक पुरुष रुचकाचा सेवक, अभिचारिक कर्म करणारा, कुशल कृत्या ( आभिचारिक मंत्रांनीं उत्पन्न झालेली स्त्री ), वेताल इ० कर्मांच्या ठायीं व विद्यामध्यें तत्पर, वृद्धसदृश शरीर, कठिण व रूक्ष असे केश, शत्रूंच्या नाशाविषयीं कुशल, ब्राह्मण, देव, यज्ञ, योगाभ्यास यांच्या ठायीं आसक्तबुद्धि, स्त्रीजित बुद्धिमान्, मंडलक होय.

सामीति यः सोऽतिविरूपदेहः शशानुगामी खलु दुर्भगश्च ।
दाता महारम्भसमाप्तकार्यो गुणैः शशस्यैव भवेत् समानः ॥ ३९॥

सामिसंज्ञक फार विरूप देह, शश याचा सेवक, दुर्भाग्य, दानशील मोठ्या कार्यांचा आरंभ करून समाप्ति करणारा, सत्वादि गुणांनीं शशासारखा.

इति श्रीवराहमिहिरकृतौ बृहत्संहितायां पञ्चमहापुरुषनामाऽध्यायः

---

# प्रकरण तिसरें.

अथ स्त्रीलक्षणाध्याय: ॥

स्निग्धोन्नताग्रतनुताम्रनखौ कुमार्या:
पादौ समोपचितचारुनिगूढगुल्फौ ।
श्लिष्टाङ्गुली कमलकान्तितलौ च यस्या:
स्तामुद्वहेद्यदि भुवोऽधिपतित्वमिच्छेत् ॥ १ ॥

स्नेहयुक्त, कूर्मपृष्ठोन्नत, पुढें बारिक, तांबडी नखें, समान, पुष्ट, सुंदर, गुप्तगोफे, मिळालेल्या अंगुली, कमलाच्या कांतीसारखे तल, असे जिचे पाय असतील त्या स्त्रीस भूपतित्व इच्छिणारानें वरावी.

मत्स्याङ्कुशाब्जयववज्रहलासिचिह्ना:
वस्वे दनौ मृदुतलौ चरणौ प्रशस्तौ ।
जङ्घे च रोमरहिते विशिरे सुवृत्ते
जानुद्वयं सममनुल्बणसन्धिदेशम् ॥ २ ॥
ऊरू घनौ करिकरप्रतिमावरोमा-
वश्वत्थपत्रसमदृशं विपुलं च गुह्यम् ।
श्रोणिललाटमुरु कूर्मसमुन्नतं च
गूढो मणिश्च विपुलां श्रियमादधाति ॥ ३ ॥

मत्स्य, अंकुश, कमल, यव, वज्र, नांगर, तलवार यांसारख्या रेषांनीं चिन्हित घर्मयुक्त नव्हत, मृदु आहेत तल ज्यांचे असे पाय शुभ होत. केशरहित शिराविरहित व वाटोळ्या पोटऱ्या, सारखे बारीक सांधे असे जानु, घट्ट, हत्तीच्या शुंडेसारख्या, रोमरहित अशा मांड्या, पिंपळाच्या पानासारखी विस्तीर्ण योनि, श्रोणीललाट ( कमरेच्या वरचा भाग ), विस्तीर्ण व कूर्मपृष्टोन्नत, योनींतला मणि गुप्त अशी स्त्री असतां बहुत लक्ष्मी प्राप्त होते.

विस्तीर्णमांसोपचितो नितम्बो गुरुश्च धत्ते रसनाकलापम् ।
नाभिर्गभीरा विपुलाङ्गनानां प्रदक्षिणावर्तगता प्रशस्ता ॥ ४ ॥

स्त्रियांचा नितंब ( कटिप्रदेश ) विस्तीर्ण, मांसल, गुरु असा असतां कमरपट्टा धारण करते. स्त्रियांची नाभि खोल, मोठी, प्रदक्षिण भोंऱ्यानें युक्त अशी प्रशस्त होय.

मध्यं स्त्रियास्त्रिवलिनाथमरोमशं च
वृत्तौ घनावविषमौ कठिनावुरस्यौ ।
रोमापवर्जितमुरो मृदु चाङ्गनानां
ग्रीवा च कम्बु निचितार्थसुखानि धत्ते ॥ ५ ॥

स्त्रीचा मध्यभाग ( पोट ) त्रिवलियुक्त व केशरहित असावा. स्तन वर्तुळ एकांशी एक सारखे, कठिण असावे. उर केशरहित, मृदु असावा. मान त्रिवलियुक्त असावी. म्हणजे द्रव्य व सुख हीं प्राप्त होतात.

बन्धुजीवकुसुमोपमोऽधरो मांसलो रुचिरबिम्बरूपभृत् ।
कुन्दकुड्मलनिभाः समा द्विजा योषितां पतिसुखामितार्थदाः

बंधुजीव ( दुपारीं तांबडी ) पुष्पासारखा, मांसल, सुंदर, पक्क तोंडल्यासारखें रूप धारण करणारा, असा स्त्रियांचा ओष्ठ शुभ होय. कुंदाच्या कळीसारखें सम (सारखे) असे दांत असतां पतिसुख व बहुत द्रव्यप्राप्त होते.

दाक्षिण्ययुक्तमशठं परपुष्टहंस-
वल्गु प्रभाषितमदीनमनल्पसौख्यम् ।
नासा समा समपुटा रुचिरा प्रशस्ता
दृग्नीलनीरजदलद्युतिहारिणी च ॥ ७ ॥

चातुर्ययुक्त, प्रामाणिक, कोकिल व हंस यासारखें रमणीय; दीन नव्हें असें भाषण बहुत सुख देतें. समान, समपुटें, सुंदर अशी नासिका शुभ होय. नीलकमलपत्राचें तेज हरण करणारी ( कमल-पत्रासारखी ) दृष्टि ( नेत्र ) प्रशस्त होय.

नो सङ्गते नातिपृथू न लम्बे शस्ते भ्रुवौ बालशशाङ्कवक्रे ।
अर्धेन्दुसंस्थानमरोमशं च शस्तं ललाटं न नतं न तुङ्गम् ॥ ८ ॥

भिवया मिळालेल्या नाहींत व फार मोठ्या नव्हत, आंखूड, द्वितीयेच्या बालचंद्रासारख्या वक्र अशा भिवया शुभ होत. अर्धचंद्रासारखें, केशरहित नीच नव्हे व उंचही नव्हे ( सम ) असें ललाट शुभ होय.

कर्णयुग्ममपि युक्तमांसलं शस्यते मृदु समं समाहितम् ।
स्निग्धनीलमृदुकुञ्चितैकजा मूर्धजाः सुखकराः समं शिरः ॥ ९ ॥

कर्णद्वय, योग्यपुष्ट, मृदु, तुल्य, संलग्न असें शुभ होय. स्निग्ध, नीलवर्ण, मृदु, कुरळ, एकरंध्रामध्यें एक असे केंश सुखकारक होत. मस्तक सम शुभ होय.

भृङ्गारासनवाजिकुञ्जररथश्रीवृक्षयूपेषुभि-
र्मालाकुण्डलचामराङ्कुशयवैः शैलैर्ध्वजैस्तोरणैः ।
मत्स्यस्वस्तिकवेदिकाव्यजनकैः शङ्खातपत्राम्बुजैः
पादे पाणितलेऽपिवा युवतयो गच्छन्ति राज्ञीपदम् ॥ १० ॥

जलपात्र ( झारी ) आसन, अश्व, हत्ती रथ, बिल्ववृक्ष, यज्ञस्तंभ, बाणमाला, कुंडल, चवरी, अंकुश, यव, पर्वत, ध्वज, तोरण, मत्स्य, स्वस्तिक, वेदी, व्यजनशंख, छत्र, कमल, हीं चिन्हें (रेषारूप) पायांवर किंवा हस्तस्तलावर अथवा हृदयावर असतां, त्या राजस्त्रिया होतात.

निगूढमणिबन्धनौ तरुणपद्मगर्भोपमौ
करौ नृपतियोषितां तनुविकृष्टपर्वाङ्गुली ।
न निम्नमति नोन्नतं करतलं सुरेखान्वितं
करोत्यविधवां चिरं सुतसुखार्थसम्भोगिनीम् ॥ ११ ॥

जिचा मणिबंध अस्पष्ट आहे ( हस्तमूल ) अशी, नूतन कमलगर्भासारखे व बारिक व ज्यांची अंगुलिपर्वें लांब आहेत असे हात

राजस्त्रियांचे होत. खोलगट नव्हे व अतिउंचही नव्हे व उत्तम रेषांनीं युक्त हस्ततल अशी स्त्री चिरकाल पतियुक्त व पुत्र, सुख, द्रव्य यांचा उपभोग घेते.

मध्याङ्गुलिं या मणिबन्धनोत्था रेखा गता पाणितलेऽङ्गनायाः ।
उर्ध्वस्थिता पादतलेऽथवा या पुंसोऽथवा राज्यसुखाय सा स्यात्

स्त्रीच्या हस्ततलांमध्यें मणिबंधा ( हस्तमूला ) पासून उत्पन्न होऊन मध्यमांगुलीप्रत गेलेली रेषा अथवा पुरुषाच्या पादतलाच्या ठाईं उर्ध्वस्थित रेषा असेल अथवा अशा रेषा हस्ततलीं किंवा पादतलीं असतील तर राज्यसुख देतील.

कनिष्ठिकामूलभवा गता या प्रदेशिनीमध्यमिकान्तरालम् ।
करोति रेखा परमायुषः सा प्रमाणमूना तु तदूनमायुः ॥ १३ ॥

कनिष्ठिकामूलापासून उत्पन्न होऊन प्रदेशिनी ( आंगठ्याजवळची ) व मध्यमा यांच्यामध्यें जी रेषा गेली ती परमायु करते. ती प्रमाणाहून कमी असल्यास त्या परमायूपेक्षां कमी आयुष्य जाणावें. ( याची वर्षे कल्पनेनें १०० वर्षांत कमी जाणावी. )

अङ्गुष्ठमूले प्रसवस्य रेखाः पुत्रा बृहत्यः प्रमदास्तु तन्व्यः ।
अच्छिन्नदीर्घा बृहदायुषां ताः स्वल्पायुषां छिन्नलघुप्रमाणाः ॥ १४ ॥

अंगुष्ठमूलाच्या ठायीं पुत्रादि अपत्यांच्या रेषा होत. त्या मोठ्या असतां पुत्र व बारिक असतां कन्या होतात. त्यांतहि तुटलेल्या नसून व लांब अशा दीर्घायूच्या व तुटलेल्या आणि बारीक अल्पायूच्या होत.

इतीदमुक्तं शुभमङ्गनानामतो विपर्यस्तमनिष्टमुक्तम् ।
विशेषतोऽनिष्टफलानि यानि समासतस्तान्यनुकीर्तयामि ॥ १५ ॥

पूर्वोक्त प्रकारें स्त्रियांचें शुभलक्षण सांगितलें. याहून जें विपरीत तें अशुभ होय. फारच अशुभ फलें तीं संक्षेपानें पुढें सांगतों.

कनिष्ठिका वा तदनन्तरा वा महीं न यस्याः स्पृशती स्त्रियाः स्यात् ।
गताथवाङ्गुष्ठमतीत्य यस्याः प्रदेशिनी सा कुलटातिपापा ॥ १६ ॥

ज्या स्त्रीच्या पायांची कनिष्ठिका किंवा अनामिका भूमीस स्पर्श करीत नाहीं; अथवा प्रदेशनि अंगुष्ठाच्या पुढें गेलेली असेल तर ती स्त्री व्यभिचारिणी किंवा पापिष्ट होईल.

उद्बद्धाभ्यां पिण्डिकाभ्यां शिराले शुष्के जङ्घे रोमशे्चातिमांसे
वामावर्तं निम्नमल्पं च गुह्यं कुम्भाकारं चोदरं दुःखितानाम् ॥ १७ ॥

पोटऱ्या वर बद्ध अशा गोळ्यांनीं युक्त, शिरायुक्त, केशयुक्त, फार मोठ्या अशा पोटऱ्या अशुभ. डावीकडे फिरलेले केशांनीं युक्त, निम्न ( अधःस्थ ) अल्प अशी योनि अशुभ, घागरीसारखे पोट अशुभ, हीं तीन दुःखकारक होत.

ह्रस्वयातिनिःस्वता दीर्घया कुलक्षयः ।
ग्रीवया पृथूत्थया योषितः प्रचण्डता ॥ १८ ॥

मान फार आखूड असतां निर्धनत्व, फार लांब असतां कुलक्षय- पृथुत्थ ( चेपट ) असतां ती स्त्री फार क्रूर असते.

नेत्रे यस्याः केकरे पिङ्गले वा सा दुःशीला श्यामलोलेक्षणा च ।
कूपौ यस्या गण्डयोश्च स्मितेषु निःसन्दिग्धं बन्धकीं तां वदन्ति

डोळे तिरवे व पिंगट वर्ण असतील तर ती स्त्री दुःशीला असते. डोळे काळे असून चंचल असतील तर तीही दुःशीला. जी स्त्री हसली असतां गालांस खळग्या पडतात ती निःसंशय व्यभिचारिणी होय.

प्रविलम्बिनि देवरं ललाटे श्वशुरं हन्त्युदरे स्फिजोः पतिं च ।
अतिरोमचयान्वितोत्तरोष्ठी न शुभा भर्तुरतीव या च दीर्घा ॥ २० ॥

लांब कपाळ असणारी दिरास वाईट. पोट लांब असणारी सास-

ऱ्यास वाईट. कुल्ले लांब ( मोठे ) असणारी पतीचा नाश करणारी. फार केसांनीं युक्त वरचा ओठ असतां ( मिशी आलेली ) व फारच उंच अशी स्त्री पतीस शुभकारक नव्हे.

स्तनौ सरोमौ मलिनोल्बणौ च क्लेशं दधाते विषमौ च कर्णौ
स्थूलाः कराला विषमाश्च दन्ताः क्लेशाय चौर्याय च कृष्णमांसाः

स्तन व कर्णकेशयुक्त, मलीन, अतिस्थूल दोनहीं सारखे नव्हत असे असतील ती दुःखी होते. मोठे, बाहेर आलेले व लांब, सारखे नाहींत असे दांत दुःखकारक होतात. दांतांजवळचें मांस काळें असलें तर ती स्त्री चोर होते.

क्रव्यादरूपैर्वृककाककङ्कसरीसृपोलूकसमानचिह्नैः ।
शुष्कैः शिरालैर्विषमैश्च हस्तैर्भवन्ति नार्यः सुखवित्तहीनाः॥२२॥

राक्षस, लांडगा, कावळा, कंक ( पक्षिविशेष ) सर्प, घुबड यांसारख्या रेषांनीं चिन्हित, मांसरहित, शिरायुक्त, अतुल्य असे ज्या स्त्रियांचे हस्त त्या दुःखी व दरिद्री होतात.

या तूत्तरोष्ठेन समुन्नतेन रुक्षाग्रकेशी कलहप्रिया सा ।
प्रायो विरूपासु भवन्ति दोषा यत्राकृतिस्तत्र गुणा वसन्ति ॥

ज्या स्त्रीचा वरचा ओष्ठ उंच व केशांचीं अग्रें रखरखीत ती कज्जेदलाल असते. बहुतकरून विरूप स्त्रियांच्या ठायीं दोष राहातात. जिची आकृति सुंदर तिच्या टिकाणीं गुण असतात.

पादौ सगुल्फौ प्रथमं प्रदिष्टौ जङ्घे द्वितीयं च सजानुचक्रे ।
मेढ्रोरुमुष्कं च ततस्तृतीयं नाभिः कटिश्चेति चतुर्थमाहुः ॥ २४ ॥

गोफा व ( घोटा ) या सहित पाय प्रथम फल देतात असें सांगितलें. गुडघ्यासहित पोटऱ्या द्वितीय दशाफल देतात. शिश्न, मांड्या, वृषण हीं तिसरें दशाफल देतात. नाभि व कमर हीं चतुर्थ दशाफलें देतात.

**उदरं कथयन्ति पञ्चमं हृदयं षष्ठमतः स्तनान्वितम् ।**
**अथ सप्तममंसजत्रुणी कथयन्त्यष्टममोष्ठकन्धरे ॥ २५ ॥**

उदर पंचम दशाफलें देतें. स्तनयुक्त हृदय सहावें दशाफल देतें. खांदा व जत्रू ( बाहु व कंठ यांचा सांधा, सरी ) हीं सातवें दशाफल देतात. ओष्ठ व मान हीं आठवें दशाफल देतात.

**नवमं नयने च सभ्रुणी सललाटं दशमं शिरस्तथा ।**
**अशुभेष्वशुभं दशाफलं चरणाद्येषु शुभेषु शोभनम् ॥ २६ ॥**

**॥ इति श्रीवराहमिहिरकृतौ बृहत्संहितायां स्त्रीलक्षणनामाध्यायः ॥**

नेत्र व भिवया हीं नवम दशाफलें देतात. ललाट व शिर हीं दशम दशाफलें देतात. ( आयुष्याचे १० भाग करून जीं वर्षें येतील त्यांमध्यें प्रथम पायाचे शुभ किंवा अशुभ फल येतें. असें दुसऱ्या भागांत पोटाऱ्यांचें येतें असें पुढें १० पर्यंत जाणावें. ) हीं चरणादि इंद्रियें अशुभ असतां अशुभ फल व शुभ असतां शुभफल जाणावें.



# प्रकरण चवथें

## ॥ अथ अंगविद्या ॥

दैवज्ञनशुभाशुभंदिगुदितस्थानाध्दृता नीक्षता
वाच्यंप्रष्ट निजापरांगघटनांचालोक्यकालंधिया ।
सर्वज्ञोहि चराचरात्मकतयासौसर्वदर्शीविभु
श्चेष्टाव्याहृतिभिः शुभाशुभफलंसंदर्शयत्यार्थिनां ॥ १ ॥

पूर्व इत्यादि दिशा, प्रश्न करणाराचें भाषण, बसण्याचें ठिकाण, प्रश्नकर्त्यानें बरोबर आणलेला एखादा पदार्थ आणि प्रश्नकर्ता ज्यावेळीं आला असेल ती वेळ या सर्वांचा विचार करून शुभाशुभ फल सांगावें. काल हा स्थावर जंगम जगताचा आत्मा आहे म्हणून सर्व जाणणारा, सर्व पाहणारा, व्यापक आहे. प्रश्नकर्त्याचे स्पर्शादि चेष्टा व भाषण यावरूनहि शुभाशुभ फल सांगता येतें.

स्थानंपुष्पसुहासिभूरिफलभृत्सुस्निग्धकृत्तिच्छदा
सप्राक्षिच्युतशस्तसंज्ञिततरुच्छायोपगूढंसमं ।
देवर्षिद्विजसाधुसिद्धनिलयंसत्पुष्पसस्योक्षितं
सत्स्वादूकनिर्मलत्व जनिताल्हादंचसच्छाड्वलं ॥ २ ॥

प्रफुल्लित पुष्पांनीं हास्य करणारे, बहुतफलांनीं युक्त, ओली साल व पानें यांनीं युक्त, काकोलुकादि अशुभ पक्षिरहित असें पळस, पिंपळ, वड इत्यादि शुभ वृक्ष त्याच्या सावलींत असलेली, सारखी जागा, देवऋषि, ब्राह्मण, साधु, सिद्ध यांचें राहण्याचें ठिकाण, उत्तम पुष्प व धान्य यानीं युक्त, गोड पाण्याच्या व निर्मळ पाण्याच्या ठिकाणीं, दूर्वादि हिरव्या गवतानें सुशोभित अशी जागा प्रश्न-कर्त्यास शुभ होय.

छिन्नभिन्नकृतिखातकंटकिप्लुष्टरूक्षकुटिलैर्नसत्कुजैः ।
क्रूरपक्षियुतनिंद्यनामभिः शुष्कशीर्णबहुपर्णचर्मभिः ॥ ३ ॥
श्मशानशून्यायतनंचतुष्पथंतथामनोज्ञंविषमंसदोषरं ।
अवस्करांगारकपालभस्मभिश्चितंतुषैः शुष्क तृणैर्नशोभनं ॥ ४ ॥

ज्या ठिकाणीं तोडलेलीं, कांट्याचीं, जळालेलीं, रूक्ष, वांकडीं, कावळे इत्यादि क्रूरपक्षी बसतात अशीं, वाळलेलीं, ज्यांचीं पानें वाळलीं आहेत अशीं झाडें असतील असें ठिकाण प्रश्न विचारण्यास चांगलें नाहीं. स्मशान, पडलेलें देवघर, चव्हाटा, ज्याठिकाणीं आनंद होत नाहीं अशी जागा, उंच सखल अशी जागा, रेती असलेली जागा, विष्टा केरकचरा असलेली जागा, कोळसे, हाडें, भस्म, कोंडा, वाळलेले गवत यांनीं युक्त अशी जागा प्रश्नास अशुभ समजावी.

प्रव्रजितनग्ननापित रिपुबंधनसूनैकैस्तथाश्वपचैः ।
कितवयाति पीडितैर्युतमायुधमाध्वीकाविक्रयैर्नशुभं ॥ ५ ॥

तपस्वी लोक, नग्नलोक, न्हावी, शत्रु, बंधनशाला, पशुवधकरण्याचें ठिकाण, चांडाल लोकांची वस्ती, कपटीलोकांची वस्ती, संन्यासीरहाण्याचे ठिकाण, रोगी लोक असलेली जागा, शस्त्र ठेवण्याची जागा, दारूचें दुकान अशा जागा प्रश्न करण्यास योग्य नव्हेत.

प्रागुत्तरैशाश्चदिशः प्रशस्ताः प्रष्टुर्नवाग्वंवुयमाग्निरक्षः ।
पूर्वाण्हिकालेस्ति शुभंनरात्रौसंध्याद्वयेप्रश्नकृतोपराण्हे ॥ ६ ॥

प्रश्नकरणाराचें तोंड पूर्व, उत्तर किंवा ईशान्य दिशेस असेल तर शुभ समजावें. वायव्य, पश्चिम आणि नैर्ऋत्य दिशेकडे असेल तर अशुभ समजावें. दिवसाच्या प्रथमभागीं प्रश्न केल्यास ती वेळ शुभ समजावी. रात्रीची वेळ, प्रातःकाळ व संध्याकाळची वेळ आणि अपराण्हकाळची वेळ अशुभ समजावी.

यात्राविधानेहि शुभाशुभंयत्प्रोक्तं निमित्तं तदिहापिवाच्यं ।
दृष्ट्वापुरोवाजनतान्हृतंवा प्रष्टुस्थितंपाणितलेथवस्त्रे ॥ ७ ॥

प्रश्न सांगणारानें यात्राप्रकर्णांत जे शुभाशुभ शकुन सांगितले आहेत, तेहि प्रश्न पहातांना पहावे व आपल्या पुढील पदार्थ व प्रश्नकर्त्यानें आणलेला पदार्थ व प्रश्नकर्त्याच्या हातांत अगर वस्त्रांत असलेला पदार्थ पाहून मग प्रश्नाचें उत्तर शुभाशुभ असेल त्याप्रमाणें सागावें.

अथांगान्यूर्वोष्ठस्तनवृषणपादंचदशना
भुजौहस्तौगंडौकचगलनखांगुष्ठमपियन ।
सशंखंकक्षांसश्रवणकुदसंधीति पुरुषे
स्त्रियांभ्रूनासास्फिग्वालिकाटिसुलेखांगुलिचयं ॥ ८ ॥

मांड्या, ओष्ट, स्तन, वृषण, पाद, दंत, भुज, हस्त, गाल, केश, कंठ नखें, हस्त, पादांगुष्ठ, कांख ( बाहुमूल ), स्कंध ( खांदा ), कान, गुद, सर्वांगाच्या संधि, शंख हे सर्व अवयव पुरुष संज्ञक समजावे. भिंवया, नासिका, कुले, बलि ( उदरादिकावरील त्रिबलि ) कंबर, हस्तादिकावरील उत्तमरेषा, अंगुलिसमूह.

जिव्हाग्रीवापिंडिके पार्ष्णियुग्मंजंघेनाभिःकर्णपाली कृकाटी ।
वक्रंपृष्ठंजत्रुजान्वस्थिपार्श्वेहृत्ताल्वक्षीमेहनोरस्त्रिकंच ॥ ९ ॥

जिव्हा, मान, पोटरीचा गोळा, दोन खोंटा, पोटऱ्या, नाभि—कानाच्या पाळी, कृकाटी ( मानेचा सरळभाग ) हे अवयव स्त्रीसंज्ञक समजावे. मुख पृष्ठ, जत्रु ( बाहु व कंठ यांचा संधि, सरी ) ढोपरहाडें, पार्श्व ( बरगड्या ) हृदय, तालु, नेत्र, शिश्न, वक्षस्थल, त्रिक, ( पाठीच्या कण्याखालीं मिळालेलीं जीं तीन हाडें ती, माकड हाड )

नपुंसकाख्यंचशिरोललाटं आश्वाद्यसंज्ञैरपरौश्चिरेण ।
सिद्धिर्भवेज्जातुनपुंसकैर्नरुक्षक्षतैर्भग्नकृशैश्चपूर्वैः ॥ १० ॥

शिर, ललाट हें अवयव नपुंसक संज्ञक समजावे. आद्य म्हणजे पुरुषसंज्ञक अवयवांनीं शीघ्र कार्यसिद्धी होतें. अपर म्हणजे स्त्री-संज्ञकांनीं पुष्कळ कालावधीनें कार्यसिद्ध होतें. नपुसकांनीं कार्यसिद्ध होत नाहीं व रुक्ष, क्षत, भग्न, कृश असे पुरुषसंज्ञक व स्त्रीसंज्ञक अवयव असले तर सिद्धी होत नाहीं. ( हें फल स्पर्शादिकांचे समजावें. )

स्पृष्टेवाचालितेवापिपादांगुष्ठेक्षिरुग्भवेत् ।
अंगुल्यांदुहितुःशोकं शिरोघातेनृपाद्भयं ॥ ११ ॥

पायाच्या आंगठ्यास स्पर्श केला किंवा हालवला तर पृच्छकास नेत्ररोग होतो. अंगुलीस स्पर्श करून विचारील तर कन्येचा शोक होतो. मस्तकास ताडन करून विचारील तर राजापासून पृच्छकास भय आहे असें समजावें.

विप्रयोगमुरसिस्वगात्रतः कर्पटाद्दृतिरनर्थदाभवेत् ।
स्यात्प्रियाप्तिरभिगृह्यकर्पटंपृच्छतश्चरणपादयोजितुः ॥ १२ ॥

पृच्छकानें उरास स्पर्श करून प्रश्न केला तर कोणाचा तरी वियोग होतो. अंगावरील वस्त्र टाकलें तर अनर्थ होतो. वस्त्र घेऊन पायावर पाय ठेऊन पृच्छक प्रश्न करील तर प्रियवस्तूची प्राप्ति होईल असें सांगावें.

पादांगुष्ठेनविलिखेद्भूमिंक्षेत्रोत्थाचिंतया ।
हस्तेन पादौकंडूयेत्तस्यदासीमयाचसा ॥ १३ ॥

पृच्छक पायाच्या आंगठ्यानें जमीनिवर रेघा काढील तर त्या पृच्छकास जमीनीसंबंधीं काळजी आहे असें सांगावें. हातानें पाय खाजवील तर त्यास दासीसंबंधी काळजी आहे असें समजावें.

तालभूर्जपैटदर्शनेशुकं चिंतयेत्कचतुषास्थिभस्मगं ।
व्याधिराश्रयतिरज्जुजालकंवल्कलंचसमवेक्ष्यबंधनं ॥ १४ ॥

ताडपत्र किंवा भूर्जपत्राचें दर्शन झालें तर पृच्छकास-वस्त्राची

काळजी आहे असें समजावें. केश, तुष, हाडें, भस्म, यांचें दर्शन झालें तर व्याधि होतो. दोरी, जाळें, वल्कल हीं प्रश्नकालीं पाहिलीं तर बंधनाची भीति जाणावी.

पिप्पलीमरिचशुंठिवारीदरोध्रकुष्ठवसनांबुजीरकैः ।
गंधमांसिशतपुष्पयावदेत्पृच्छतस्तगरकेणचिंतनं ॥ १५ ॥
स्त्रीपुरुषदोषपीडितसर्वाध्वसुतार्थधान्यतनयानां ।
द्विचतुष्पदक्षितीनांविनाशतःकीर्तितैर्दृष्टैः ॥ १६ ॥

प्रश्नवेळीं पिंपळी पाहिली तर सदोष स्त्रीविषयक काळजी आहे असें समजावें. मिरे किंवा मिरची पाहिली तर सदोष पुरुष विषयक काळजी आहे असें समजावें. सुंठ पाहिली तर व्याधीत किंवा मृतविषयक काळजी आहे असें समजावें. नागरमोथा पाहिला तर नाशासंबंधीं काळजी आहे असें समजावें. लोध्र पाहिले तर मार्ग नाशविषयक काळजी, कुष्ठकोळिंजन पाहिले तर पुत्रनाश विषयक काळजी, वस्त्र पाहिलें तर अर्थनाशाची काळजी, पाणी पाहिलें तर धान्याच्या नाशासंबंधीं काळजी, जिरे पाहिले तर पुत्रनाशाची काळजी, जटामांसी पाहिली तर द्विशफ नाशासंबंधीं काळजी, शतपुष्पा ( बडिशेप ) पाहिली तर चतुष्पादाच्या नाशाची काळजी, तगर पाहिलें तर भूमीनाशाची काळजी आहे असें समजावें. वरील जिन्नसा प्रश्नवेळीं पाहिल्यास त्या त्या वस्तूसंबंधीं काळजी प्रश्नकर्त्यास आहे असें समजावें.

न्यग्रोधमधुकतिंदुकजंबुप्लक्षाम्र बदरिजातिफलैः ।
धनकनकपुरुषलोहांशुकरूप्योदुंबराप्तिरपिकरगैः ॥ १७ ॥

प्रश्नकर्त्याच्या हातांत वडाचें फळ असेल तर धनप्राप्ती, मोहाचें फळ असेल तर सुवर्ण प्राप्ती, टेंभुर्णीचें फळ असेल तर पुरुषप्राप्ती, जांभुळ असेल तर लोखंड प्राप्ती, प्लक्ष ( पिंपळ किंवा पिंपरी ) इचें फळ

असेल तर वस्त्रप्राप्ती, आम्रफल असेल तर रौप्यप्राप्ती, जायफळ असेल तर ताम्रप्राप्ती होईल असे समजावें.

धान्यपरिपूर्णपात्रंकुंभः पूर्णः कुटुंबवृद्धिकरौ ।
गजगोशुनांपुरीषंधनयुवतिसुहृद्विनाशकरं ॥ १८ ॥

प्रश्नकर्त्याच्या हातांत धान्यानें भरलेलें पात्र किंवा पाण्यानें भरलेलें भांडे असेल तर कुंटुंबाची वृद्धी होते. हत्तीची लीद असेल तर धननाश, गाईचें शेण असेल तर स्त्रियांचा व्यभिचार, कुत्र्याची विष्टा असेल तर मित्रनाश होईल असें समजावें.

पशुहस्तिमहिषपंकजरजतव्याघ्रैर्लभेतसद्दृष्टैः
अविधननिवसनमलयजकौशेयाभरणसंघातं ॥ १९ ॥

प्रश्नकालीं पशु दृष्टीस पडेल तर कंबलादि लाभ, हत्ती दृष्टीस पडेल तर धनलाभ, रेडा दृष्टीस पडेल तर वस्त्रलाभ, कमल दृष्टीस पडेल तर ( मलयज ) चंदन लाभ, रुपें दृष्टीस पडेल तर कौशेयवस्त्र ( पीतांबर ) लाभ, वाघ दृष्टीस पडेल तर अलंकारलाभ प्रश्नकर्त्यास होईल असें समजावें.

प्रृच्छावृद्धश्रावकसुपरिव्राट् दर्शनेनृभिर्विहिता ।
मित्र द्यूतार्थभवागणिकानृपसूतिकार्थकृता ॥ २० ॥

प्रश्नकालीं, वृद्धश्रावक ( कापालिक जैनयती ) याचें दर्शन झालें तर मित्रांसंबंधीं किंवा द्यूतांसंबंधीं प्रश्न आहे असें सांगावें. उत्तम संन्यासी दृष्टीस पडला तर वेश्या, राजा, सूतिका ( बाळंतीण ) ह्या संबंधीं प्रश्न आहे असें समजावें.

शाक्योपाध्यायार्हतनिर्ग्रंथनिमित्तनिगमकैवर्तैः ।
चौरचमूपति वणिजांदासीयोधापणस्थवध्यानां ॥ २१ ॥

प्रश्नकालीं शाक्य ( बौद्धमत स्थापनकर्ता ) दृष्टीस पडला तर

चोरविषयक प्रश्न आहे. उपाध्याय दृष्टीस पडला तर सेनापति विषयक प्रश्न आहे. अर्हत ( बौद्धमतानुसारी ) दृष्टीस पडला तर व्यापारी विषयक प्रश्न आहे. निर्ग्रंथ ( दिगंबर साधु ) दृष्टीस पडला तर दासीविषयक प्रश्न आहे. निमित्त ( दैवज्ञ, ज्योतिषि ) दृष्टीस पडला तर योद्ध्यासंबंधी प्रश्न आहे. निगम ( व्यापाऱ्याचा समूह ) दृष्टीस पडला तर आपणस्थ ( कुलपरंपरागत शिल्पज्ञ किंवा बाजारांत राहणारा ) संबंधीं प्रश्न आहे. कोळी दृष्टीस पडला तर वध्यप्राणिविषयक प्रश्न आहे असें समजावें.

तापसे शौंडिकेदृष्टेप्रोषितः पशुपादुंच्छलनं ।
हृद्गतं पृच्छकस्यस्यावृत्तौ विपन्नता ॥ २२ ॥

प्रश्नकालीं तपस्वी दृष्टीस पडेल तर प्रवासास गेलेल्या मनुष्यासंबंधीं प्रश्न आहे असें समजावें. मद्यपी दृष्टीस पडेल तर पशूच्यापालनाविषयीं प्रश्न आहे असें समजावें. उंछवृत्ति ( शेतकऱ्यानें शेत कापून नेल्यावर जमिनीवर पडलेलें धान्य निवडून त्यावर उपजीविकाकरणारा) दृष्टीस पडला तर विपत्तिविषयीं काळजीचा प्रश्न आहे असें समजावें.

इच्छामिप्रष्टुंभणपश्य त्वार्यःसमादिशेत्युक्ते ।
संयोग कुटुंबोत्थालाभैश्वर्योद्गता चिंता ॥ २३ ॥

प्रश्न करावयास इच्छितों असें प्रश्नकर्ता भाषण करील तर ( संयोग ) विषयकचिंता, भण ( सांग ) असें बोलेल तर कुटुंबोत्पन्न चिंता, पश्यतुआर्यः ( सत्पुरुष पाहू ) असें बोलेल तर लाभोत्पन्न चिंता, समादिश ( आज्ञा करा ) असें बोलेल तर ऐश्वर्योत्पन्न चिंता प्रश्नकर्त्याच्या मनांत आहे असें सांगावें.

निर्दिशेतिगदितेजयाध्वजाप्रत्यवेक्ष्ममचिंतितंवद ।
आशुसर्वेजनमध्यगत्वयादृश्यतामितिचबंधुचौरजा ॥ २४ ॥

निर्दिश ( स्पष्ट सांग ) असें पृच्छक भाषण करील तर जयार्थ

किंवा मार्गविषयक चिंता. प्रत्यवेक्ष्म मम चिंतितंवद् ( पाहून माझें चिंतित सांग ) असें पृच्छक भाषण करील तर बंधुविषयीं चिंता. सर्व जन मध्येंत पहाणाऱ्याप्रत आशुत्वयादृश्यतां ( शीघ्र त्वां पहावें ) असें विचारील तर चौरविषयक चिंता प्रश्नकर्त्यास आहे असें सांगावें.

अंतस्थेंगेस्वजनउदितोबाह्यजे वाह्यएवं
पादांगुष्ठांगुलिकलनयादासदासीजनः स्यात् ।
जंघेप्रेष्योभवतिभगिनीनाभितोहृत्तभार्या
पाण्यंगुष्ठांगुलिचयकृतस्पर्शने पुत्रकन्ये ॥ २५ ॥
मातरंजठरेमूर्ध्नि गुरुं दक्षिण वामकौ
बाहूभ्राताथतत्पत्नीस्पृष्टेवंचोरमादिशेत् ॥ २६ ॥

प्रश्न समयीं प्रश्नकर्ता अंतस्थ ( गुप्त ) अंगाला स्पर्श करील तर स्वजनानें चोरी केली असें समजावें. बाह्य अंगास स्पर्श करील तर बाहेरचा चोर आहे असें जाणावें. पयाच्या अंगठ्यास स्पर्श करील तर नोकरानें चोरी केली असें समजावें. पायाच्या अंगुलीस स्पर्श करील तर दासीनें चोरी केली असें सांगावें. पोटऱ्यास स्पर्श करील तर सेवकानें चोरी केली असें जाणावें. नाभीस स्पर्श करील तर बहिणीनें चोरी केली असें सांगावें. हृदयास स्पर्श करील तर स्वतःच्या स्त्रीनें चोरी केली असें जाणावें. हाताच्या आंगठ्यास स्पर्श करील तर मुलानें चोरी केली असें समजावें. हाताच्या अंगुलीस स्पर्श करील तर स्वतःच्या मुलीनें चोरी केली असें सांगावें. उदर स्पर्श करील तर आईनें चोरी केली असें जाणावें. मस्तकास स्पर्श करील तर गुरूनें चोरी केली असें समजावें. उजव्या बाहूस स्पर्श करील तर भावानें चोरी केली असें सांगावें. डाव्या बाहूस स्पर्श करील तर भावाच्या बायकोनें चोरी केली असें समजावें. याप्रमाणें स्पर्शावरून चोर सांगावें.

अंतरंगमवमुच्य बाह्यगस्पर्शनंयदिकरोतिपृच्छकः ।
श्लेष्ममूत्रशकृतस्त्यजन्नधः पातये त्करतलस्थवस्तुचेत् ॥२७॥

प्रश्नकर्ता, अंतरंग ( गुप्त ) अवयव सोडून बाह्य अवयवास प्रश्नकाली स्पर्श करील, अथवा श्लेष्मा ( कफ ) मूत्र, विष्ठा ही खाली सोडील; किंवा हातांतील कांहीं वस्तू खाली पाडील,

भृशमवनामितांगपरि मोटन तोप्यथवा
जनधृतरिक्त भांडमवलोक्यच चौरजनं ।
न्हृतपातितक्षतास्मृतविभग्नगतोन्मुषित
मृताद्यानिष्टरवतोलभतेनन्हृतं ॥२८॥

अंगपरिमोटन म्हणजे अंग मोडून हाडें मोडील, लोकांनीं धरलेलें रिकामें भांडे किंवा चोर यांस पाहील; अथवा नेलें, पडलें, खत- विसरलें, सांडलें, मोडलें, गेलें, उपटून नेलें, मेलें हे शब्द किंवा अशा अर्थाचे तिन्हीलिंगी अनिष्ट शब्द प्रश्नकर्त्यास ऐकूं येतील तर नष्ट वस्तू सांपडणार नाहीं.

निगादितामिदंयत्तत्सर्वं तुपास्थिविषादिकैः
सहमृतिकरं पीडार्तानांसमंरुदित क्षुतैः ।
अवयवमपिस्पृष्टांतःस्थंदृढं मरुदाहरेदति
बहुतदाभुक्त्वान्नंसंस्थितः सुहितोवदेन् ॥ २९ ॥

वरील २७।२८ श्लोकांत नष्टवस्तूविषयीं सांगितलें तें सर्व, तुष- ( धान्याचा कोंडा ), हाडें, विष, रोदन, शिंक, यांसहित असेल तर, रोग्यास ( रोगविषयक प्रश्न असतां ) मृत्युकारक होतें. अंतःस्थस्थिर अवयवास स्पर्श करून, वायू बाहेर टाकित असतां प्रश्न करील तर, प्रश्न कर्ता पुष्कळ जेऊन प्रश्न करतो, असें सांगावें.

ललाट स्पर्शनाच्छूक दर्शनाच्छालिजौदनं ।
उरःस्पर्शात्पष्टिकान्नंग्रीवास्पर्शेचयावकं ॥ ३० ॥

प्रश्नकर्ता ललाटास स्पर्श करील, किंवा शूक ( कुसवेळें ) धान्य पाहील तर साळीचा भात भक्षण करून, प्रश्न करतो. उरास स्पर्श करील तर साठके तांदुळाचें अन्न व मानेस स्पर्श करील तर यवान्न भक्षण केलें असें सांगावें.

कुक्षिकुचजठरजानुस्पर्शेमाषाः पयस्तिलयवाग्वः ।
आस्वादयतश्चौष्ठौं लिहतोमधुरं रसं संज्ञेयम् ॥ ३१ ॥

कुक्षि, स्तन, उदर, जानु, यांस स्पर्श करील तर अनुक्रमानें माष, दुग्ध, तिल, यवागु, ( पातळभात, आटवल, कांजी ) ही भक्षण केलीं व ओठ चाटित असेल तर गोड पदार्थ प्रश्नकर्त्यानें भक्षण केला असें सांगावें.

विस्पृक्के स्फोटयेज्जिव्हामाम्ले वक्त्रं विकूणयेत् ।
कटुतिक्तकषायोष्णैर्हिक्केत् ष्ठीवेच्चसैंधवे ॥ ३२ ॥

जीभ चावील तर विस्पृक्क हा पदार्थ खाल्ला. तोंड वांकडें करील तर आंबट खाल्ला. उचकी येईल तर तिखट, कडू व कढलेले पदार्थ खाल्ले आहेत. थुंकेल तर सैंधव किंवा खारट पदार्थ खाल्लेले आहेत असें सांगावें.

श्लेष्मत्यागेशुष्कतिक्तंतदल्पंश्रुत्वाक्रव्यादंप्रेक्ष्यवामांसमिश्रं ।
भ्रूगंडौष्ठस्पर्शनेशाकुनंतद्भुक्तंतेनेत्युक्तमेतान्निमित्तं ॥ ३३ ॥

पृच्छक श्लेष्मा ( कफ ) टाकील तर, शुष्क व कडू असें अल्प भक्षण केलें. मांसभक्षण कर्त्या प्राण्यास पाहिला किंवा श्रवण केला तर मांसयुक्त भक्षण केलें. भिवया, गाल, ओष्ठ, यांस स्पर्श करील तर पक्षिमांस पृच्छकानें भक्षण केलें असें समजावें.

मूर्धगलकेशहनुशंखकर्णजंघंबस्तिंचस्पृष्ट्वा ।
गजमाहिषमेषशूकरगोशशमृगमांसयुग्भुक्तं ॥ ३४ ॥

मस्तक, गळा, केश, हनु, शंख, कान, पोटरी, बस्ति ( नाभीच्या खालचा भाग, गर्भाशय ) यांस स्पर्श करील तर अनुक्रमानें, गज, महिष, मेंढा, सूकर, गो, ससा, मृग यांच्या मांसानें युक्त भोजन पृच्छकानें केलें असें सांगावें.

दृष्टेश्रुतेप्यशकुनेगोधामत्स्यामिषंवदेभ्दुक्तं ।
गर्भिण्यागर्भस्यच निपतनमेवं प्रकल्पयेत्प्रश्ने ॥ ३५ ॥

दुःशकुन पाहिला किंवा ऐकला तर प्रश्नकर्त्यानें घोरपड किंवा मत्स्य यांचें मांस भक्षण केलें असें सांगावें. गर्भिणीच्या प्रश्नाविषयींही असें कल्पावें. म्हणजे दुःशकुन पाहिला किंवा ऐकला तर गर्भपात होईल असें प्रश्नकर्त्यास सांगावें.

पुंस्त्रीनपुंसकाख्ये दृष्टे नुमितेपुरः स्थितेस्पृष्टे ।
तज्जन्म भवतिपानान्नपुष्पफलदर्शने च शुभं ॥ ३६ ॥

गर्भ प्रश्न समयीं पुरुषदृष्ट, अनुमित, पुरःस्थित किंवा स्पष्ट असेल तर पुरुषजन्म, स्त्री दृष्टादि असेल तर स्त्रीजन्म. नपुंसक दृष्टादि असेल तर नपुंसक जन्म होईल असें प्रश्नकर्त्यास सांगावें. मद्य, अन्न, पुष्प, फल हीं प्रश्नसमयीं असतील तर सुखानें प्रसूति होईल असें सांगावें.

अंगुष्ठेनभ्रूदरंवांगुलिंवा स्पृष्ट्वापृच्छेद्गर्भचिंतातदास्यात्
मध्वाज्याद्यैर्हेमरत्नप्रवालैरग्रस्थैर्वामातृधात्र्यात्मजैश्च ॥ ३६ ॥

स्त्री आंगठा भिवया अथवा उदर किंवा अंगुलीया वर बोट ठेवून प्रश्न करील तर गर्भाविषयीं प्रश्न आहे असें सांगावें. अथवा मध, घृत पुरुषनामक उत्तमफल, सुवर्ण, रत्न, पोंवळें, माता, धात्री ( दायी ) पुत्र हीं पुढें असतील आणि त्यावेळीं प्रश्न करील तर गर्भाविषयीं प्रश्न आहे असें सांगावें.

गर्भयुताजठरेकरगेस्याद्दुष्टनिमित्तवशात्तदुदासः ।
कर्षाभितज्जठरंयदिपीठोत्पीडनतः करगेचकरेपि ॥ ३८ ॥

गरोदर स्त्री उदरावर हात ठेवून प्रश्न करील आणि त्याच वेळीं शिंक इत्यादि दुर्निमित्तें होतील तर गर्भपात होईल असें सांगावें. अथवा आसनाचे मर्दन करून, उदर खाजवील, किंवा हातानें हात धरून प्रश्न करील तर गर्भपात होईल असें सांगावें.

घ्राणाया दक्षिणेद्वारे स्पृष्टे मासोत्तरंवदेत् ।
वामेद्वौ कर्णएवंवाद्विचतुर्घ्नः श्रुतिस्तने ॥ ३९ ॥

नाकाच्या उजव्या नाकपुडीस स्पर्श करून स्त्री गर्भाविषयीं प्रश्न करील तर एक महिन्यानंतर गर्भधारणा होईल असें जाणावें. डाव्या नाकपुडीस स्पर्श करील तर दोन वर्षांनीं, डाव्या कानास स्पर्श करील तर दोन वर्षांनीं. उजव्या कानास स्पर्श करील तर दोन महिन्यांनीं. स्तनांस स्पर्श करील तर चार महिन्यांनीं गर्भधारण होईल असें सांगावें.

वेणीमूलेत्रीन्सुतान्कन्यकेद्वे कर्णेपुत्रान् पंच हस्ते त्रयंच ।
अंगुष्ठांते पंचकंचानुपूर्व्या पादांगुष्ठे पार्ष्णियुग्मेपि कन्यां ॥ ४० ॥

स्त्री वेणीमूलास स्पर्श करून प्रश्न करील तर तीन पुत्र व दोन कन्या होतील. कानांस स्पर्श करील तर पांच पुत्र होतील. हातानें हातास स्पर्श करील तर तीन पुत्र होतील. कनिष्ठिकेस स्पर्श करील तर एक पुत्र. अनामिकेस स्पर्श करील तर दोन पुत्र. मध्यमेस स्पर्श करील तर तीन पुत्र. तर्जनीस स्पर्श करील तर चार पुत्र. अंगुष्ठास स्पर्श करील तर पांच पुत्र होतील. पायांचा आंगठा, दोन्ही खोटा यांस स्पर्श करील तर कन्या होईल असें सांगावें.

सव्यासव्येरुसंस्पर्शेसूते कन्या सुतद्वयं ।
स्पृष्टे ललाट मध्यांते चतुस्त्रितनयाभवेत् ॥ ४१ ॥

स्त्री प्रश्नकालीं डाव्या किंवा उजव्या मांडीस स्पर्श करील तर दोन कन्या व दोन पुत्र होतील. ललाटाच्या मध्यें स्पर्श करील तर चार पुत्र. ललाटाच्या अंतीं स्पर्श करील तर तीन पुत्र होतील असें सांगावें.

शिरोललाट–भ्रूकर्ण गंडहनुरदागलं ।
सव्यापसव्यस्कंधश्चहस्तौचिबुकनालकं ॥ ४२ ॥
उरः कुचं दक्षिणमध्यसव्यंहृत्पार्श्वमेवं जठरं कटिश्च ।
स्फिक् पायुसंध्यूरुयुगंच जानूजंघेथपादावितिकृत्तिकादौ ॥ ४३ ॥

प्रश्न विचारतांना गर्भिणी स्त्री, शिरादि अवयवास स्पर्श करील तर, ती स्त्री कृत्तिकादिनक्षत्रीं प्रसूत होईल असें जाणावें. शिरस्पर्श करील तर कृत्तिका, ललाट स्पर्श करील तर रोहिणी, भ्रूकुटी स्पर्श करील तर मृगशीर्ष, कर्ण स्पर्श करील तर आर्द्रा, गालास स्पर्श करील तर पुनर्वसु, हनवटीस स्पर्श करील तर पुष्य, दातांस स्पर्श करील तर आश्लेषा, कंठास स्पर्श करील तर मघा, उजव्या खांद्यास स्पर्श करील तर पूर्वा, डाव्या खांद्यास स्पर्श करील तर उत्तरा, हातास स्पर्श करील तर हस्त, ओठाच्या खालच्या भागास स्पर्श करील तर चित्रा, कंठाच्या नळीस स्पर्श करील तर स्वाती, उरास स्पर्श करील तर विशाखा, उजव्या स्तनास स्पर्श करील तर अनुराधा, डाव्या स्तनास स्पर्श करील तर ज्येष्ठा, हृदयास स्पर्श करील तर मूळ, उजव्या कुशीस स्पर्श करील तर पूर्वाषाढा, डाव्या कुशीस स्पर्श करील तर उत्तराषाढा, उदरास स्पर्श करील तर श्रवण, कमरेस स्पर्श करील तर धनिष्ठा, कुले व गुद यांची संधि किंवा योनीस स्पर्श करील तर शततारका, उजव्या मांडीस स्पर्श करील तर पूर्वाभाद्रपदा, डाव्या मांडीस स्पर्श करील तर उत्तराभाद्रपदा, गुडघ्यास स्पर्श करील तर रेवती, पोटऱ्यास स्पर्श करील तर अश्विनी, पायास स्पर्श करील तर भरणी, याप्रमाणें त्या त्या नक्षत्रावर प्रसूत होईल असें सांगावें.

इतिनिगदितमेतद्गात्रसंस्पर्शलक्ष्म
प्रकटमभिमताप्त्यैवीक्ष्यशास्त्राणिसम्यक् ।
विपुलमतिरुदारोवेत्तियःसर्वमेतत्
नरपति जनताभिः पूज्यतेसौसदैव ॥ ४४ ॥

याप्रमाणें पुष्कळ शास्त्रें पाहून इच्छित मनोरथांची प्राप्ति व्हावी याकरतां शरीरस्पर्श लक्षण स्पष्ट सांगितलें. हे सर्व, बहुत बुद्धिमान् व उदार ( निर्लोभी ) असा जो ज्योतिषी जाणतो तो राजांस व पुष्कळ लोकांस सर्व काल पूज्य होतो.

॥ इति वराह संहितयाम् ॥

“ अङ्गविद्या ”

आतां वर **वराहसंहितेपैकीं** “ अङ्गविद्या ” हें प्रकरण भाषान्तरासुद्धां प्रसिद्ध केलें आहे. वरवर पाहणारास हा अध्याय प्रश्न ज्योतिषाचा आहे असें वाटेल, परंतु जरा विचार केल्यास हा अध्याय सामुद्रिक शास्त्राला धरूनच आहे असें दिसून येईल. ह्याचा खुलासा करावयाचा म्हणजे, मानुषशारीरापैकीं अर्थात् मनुष्याच्या शरीराचा मुख्य भाग जो मस्तकांतील मेन्दू त्याचें आणि मज्जारज्जू अथवा वांतवाहिन्या ह्याचें वर्णन केलें पाहिजे. त्याचप्रमाणें सामुद्रिक शास्त्राशीं ज्याचा अतिशय निकट संबंध असें जें “अङ्गुलिरेषा ” वर्णन त्याचेंहि विवचेन केलें पाहिजे; म्हणून प्रथमतःच ओघास येणारें आणि सर्वांस ऐकून तरी माहित असणारें असें “ अंगुष्ठरेषा ” स्वरूप त्याचीच माहिती प्रथम देउं.

# " अंगुष्ठ रेषा "

" विशिष्ट व्यक्ति नेमकी ओळखितां यावी म्हणून त्यासाठीं बोटांच्या--ठशांचा फिंगर प्रिन्टसूचा- उपयोग करून घेण्याच्या पद्धतीचा उगम फार पुरातन कालचा आहे आणि पौर्वात्य देशांतील राजमुद्रा अथवा निशाणी सही किंवा त्याच्या आंगठ्याचा ठसा उमटवून घेण्याची पद्धति ह्यांची फार प्राचीन काळापासून पौर्वात्यांना माहिती होती. मानवी हातांतील व विशिष्ट मर्यादेपर्यंत पायांतील दिसून येणाऱ्या रेषावैशिष्ट्यावर हे ठसे अवलंबून असतात. ही त्वचा नांगराच्या आडव्या उभ्या सऱ्यांप्रमाणें अथवा जाळ्याप्रमाणें चोहों बाजूंनीं व्यापलेली असते व ती नाहींशी होणें अथवा तींत बदल करणें अशक्य असून, बाल्यावस्थेपासून तों तहत अत्यंत जीर्ण जरावस्थेपर्यंत त्यांत यत्किंचितहि फरक होत नाहीं. ह्या बोटांच्या अग्रांचे सतत ठसे उमटवून घेत गेल्यामुळें यांतील वैशिष्ट्य आढळून आलें व त्यायोगानें सर्व शंकांचें पूर्ण निरसन होऊन व्यक्तिविशिष्ट ओळखण्यासाठीं बोटांचे ठसे उमटवून घेण्याच्या आधुनिक शास्त्रीय पद्धतीचा हा मूळ पाया, सशास्त्र व जगन्मान्य ठरला. ह्या ठशांचें निरीक्षण केलें असतां हीं तंतूमय जाळीं विविक्षित कायम ठशांच्या स्वरूपांत असतात असें आढळलें आहे व त्यांच्या योगानें त्यांची नोंद ठेवण्याला सोईस्कर अशी वर्णमाला किंवा चिन्हपद्धति तयार करतां आली आहे. पुष्कळ प्रयोगांवरून असें अनुभवास आलें आहे कीं, ह्या ठशांत मुख्य प्रकार चार असून या चोहोंच्या चतुर्गुणित संकलनानें उत्पन्न होणाऱ्या वर्गीकरणांत निरनिराळ्या पुष्कळ प्रकारच्या आकृतींचा समावेश होतो. हे मुख्य चार प्रकार पुढीलप्रमाणें आहेत. वक्र, साखळीसारखे, ऊर्ध्व व मिश्र. यांचे पुनः सात उपविभाग केले आहेत आणि तज्ज्ञ माणसाला हे ठसे ओळखण्याची इच्छा अस-

ल्यास त्याला ह्या ठशांच्या तयार केलेल्या जंत्री ( कोड ) वरून हे सहज पूर्णपणें ओळखतां येऊन प्रत्येक ठशांचें विशिष्ट व स्पष्ट स्वरूप सांगतां येतें आणि अशा रीतीनें प्रत्येक व्यक्तीच्या ठशाची बिनचूक निवड केली जाते."

आपल्या इकडे या गोष्टीचा शोध करून त्याची साधार माहिती एकत्र करून त्याचा सुसंबद्ध इतिहास लिहून ठेवलेला नाहीं; परंतु चेहऱ्यामध्यें व्यक्तिविशिष्टत्व दाखविण्याची जशी शक्ति आहे, तशीच बोटांतील ह्या सूक्ष्म रेषांत व विशिष्ट मर्यादेपर्यंत पावलांच्या ठशांतहि दाखविण्याचें सामर्थ्य आहे हें आपल्याकडे फार प्राचीन काळापासून लोकांना माहीत होतें हें वरील उताऱ्याचा आधार न दिला तरी आपल्या इकडे अस्तित्वांत असलेल्या निरनिराळ्या अवशेषांवरून दिसून येतें. चेहऱ्यावरून व्यक्ति ओळखतां येते ह्याचा जगांतील सर्व व्यक्तींना अनुभव आहेच; इतकेच नव्हे, तर आपल्याकडील शब्दवेधी शब्दावरूनहि व्यक्ति ओळखतात हें पृथ्वीराज चव्हाणाच्या ऐतिहासिक किंवा राणा भरतानसिंहाच्या पंधरावीस वर्षांपूर्वींच्या प्रत्यक्ष पाहिलेल्या प्रयोगावरून आपल्या निदर्शनास आलें आहे. हातांवरील सूक्ष्म रेषांबद्दल त्यांचे ठसे उमटवून घेऊन व्यक्ति ओळखण्याच्या आपल्या प्राचीन पद्धतींचा उल्लेख वरील उताऱ्यांत आलेला आहेच. तसेच आपल्याकडील रामोशी वगैरे लोक पावलावरून चोरांचा माग बरोबर लावतात व पोलीसखात्यांत त्याचा उपयोग करून घेतात हें आपणांस माहीत आहेच. आमच्या पूर्वजांच्या सूक्ष्म निरीक्षणानें व त्यांनीं दिलेल्या "शरीरावर्तगतिच्छायास्वरवर्ण वर्णगंधसत्त्वानि" या नियमाप्रमाणें अंगालाहि गंध असतो व त्यावरून ही माणसाची परीक्षा करावी असें जें सांगितलें आहे व त्याच्या सत्यतेबद्दल आणखी एक गोष्ट नमूद करावीशी जी वाटते ती ही कीं, प्रत्येक व्यक्तीच्या अंगाला गंध असला

पाहिजे व त्याच्या वासावरून विशिष्ट व्यक्ति ओळखितां येते असें दिसतें. कारण कुत्रीं चुकलीं असतां त्यांच्या धन्याचा माग तीं पाउलें हुंगून काढतात. हुंगून काढतात असें म्हणण्याचें कारण कुत्र्यांना पाउलाचें आकारमान लक्षांत येत असेल असें वाटत नाहीं, शिवाय कुत्रींच नव्हे तर इतर जनावरेंहि त्यांचें भक्ष्य हुंगून शोधून काढतात. तसेंच मालकाचें अगर वस्तूचें अंग हुंगूनच तीं त्याची निवड करतांना दृष्टोत्पत्तीस येतात व ती त्यांची निवड बरोबर असते असा आपणास अनुभव येतो. बोटांच्या ठशांसंबंधीं पाश्चात्यांनीं गोळा केलेली माहिती व अनुभव पुढीलप्रमाणें आहे. प्रथम इ. स. १८२३ मध्यें जे. इ. परकिन नावाचा सुप्रसिद्ध प्राणिगुणधर्मशास्त्रज्ञ ( प्रोफेसर ऑफ फिजिऑलजी ) यानें बोटांच्या ठशांबद्दल साधक बाधक प्रमाणानिशी ब्रेसलॉच्या युनिव्हर्सिटीपुढें हा विषय मांडून यांतील शास्त्रीयत्व सिद्ध करून दाखविलें; पण त्या वेळीं ह्याकडे कोणाचेंहि विशेष लक्ष गेलें नाहीं. त्यानें ह्या ठशांचे नऊ विभाग केले होते. नंतर बिवुइक नांवाच्या एका इंग्रज डूप्समनचें ह्या सूक्ष्म रेषांच्या गुणवैशिष्ट्याकडे लक्ष वेधलें व त्यांतील वैशिष्ट्य त्याचें लक्षांत आलें; तेव्हां त्यानें आपल्या दोन बोटांचे कोरीव शिक्के तयार करून सहीच्या ऐवजीं त्यांचा तो उपयोग करीत असे. त्यानंतर सर फ्रॉन्सिस गाल्टन ह्याच्या हें विशिष्टत्व नजरेला आलें व त्यानें ही पद्धत अमलांत आणण्यासाठीं अत्यंत परिश्रम केले व जे चिनी लोक युनायटेड स्टेटसमध्यें कायम वसाहत करण्यासाठीं म्हणून येत त्यांची सरकारी नोंद ठेवितेवेळीं त्यांची ओळख पट-ण्यास त्रास पडूं नये म्हणून त्याबरोबरच त्यांच्या हातांचे ठसेहि घेत जाण्याबद्दल त्यानें अमेरिकन सरकारास सूचना केली होती इकडे हिंदुस्थानांत प्रथम सर वुइल्यम हर्शल यानें व्यक्ति ओळखली जाण्यास व तसेच दस्तऐवज करून देणारी व्यक्ति यांच्यांत लबाडी

होऊं नये म्हणून ही पद्धति हुगळी परगण्यांतील कोर्टांत सुरू केली. त्याच्यामागून सर इ. आर. हेन्री नांवाच्या प्रथम बेंगालच्या व नंतर लंडनच्या पोलीसखात्याचा मुख्य अधिकारी ( हाय कमिशनर ) असलेल्या गृहस्थानें या पद्धतीचा नीट विचार करून त्याची उपयुक्तता जेव्हां त्याच्या नजरेस आली, तेव्हां त्यानें या शास्त्राचा गुन्हेगार ओळखण्यास फार उपयोग असल्यामुळें या पद्धतीचा पोलीसखात्यांत सरसहा उपयोग सुरूं केला व त्याचेंच अनुकरण इतर खात्यांत हिंदुस्थानांत चोंहोंकडे सरकारनें सुरू केलें आहे. सरकारांत इस्टेटीची देवघेव करतांना, दस्तऐवज करतांना मजुरांना व अफू पिकविणाऱ्या शेतकऱ्यांना आगाऊ पैसे देतांना, मुदतबंदीचे मक्ते देतांना व वैद्यक तपासणी करून सर्टिफिकेट देतांना व्यक्ति ओळखण्यास त्रास पडूं नये व त्यांत चूकभूल न होतां नानातऱ्हेच्या लुच्चेगिऱ्यांना आळा बसावा म्हणून आंगठयाचे ठसे उमटवून घेतात. हातांच्या बोटांची ठेवण बाह्य आकारावरून पुष्कळांची जरी सारखी दिसत असली, तरी त्यांचे ठसे ( इम्प्रेशन्स ) घेतांच प्रत्येक व्यक्तीच्या बोटांमध्यें असलेला फरक आढळून येतो व त्या ठशांवरून ती ती व्यक्ति बिनचूक ओळखतां येते. या बोटांच्या ठशांच्या न बदलणाऱ्या स्थितीमुळें गुन्हे शोधण्यास याचा नेहमीं फार उपयोग होतो व त्यामुळें चोऱ्या पकडण्यास फार मदत झालेली आहे. हा उपयोग कसा होतो हें नीठ ध्यानांत यावें म्हणून एक उदाहरण देतों. एका चोरानें घरफोडी चोरी केली. चोराचें मुख्य काम झाल्यावर मग इकडे तिकडे शोधतांना त्याला एक दारूची बाटली आढळली. तेव्हां त्यानें त्यांतील थोडेंसें मद्य एका ग्लासांत ओतून घेतलें व तें मद्य तो प्याला. पितांना त्याच्या गलिच्छ हातास जी दारू लागली होती त्यामुळें त्याच्या बोटांचे ठसे त्या ग्लासावर सहजीं

उमटले गेले. चोर चोरी करून गेल्यावर मालक जेव्हां घरीं आला आणि झालेला सर्व प्रकार त्याच्या दृष्टीस पडला तेव्हां त्यानें पोलीसला वर्दी दिली. नंतर पोलीसतपास सुरूं झाल्यावर त्यांना त्याचा कांहीं मागमूस लागेना; पण सरतेशेवटीं एका पोलीसअधिकाऱ्याला त्या मद्याच्या ग्लासावर ते ठसे आढळले. त्यानें लागलीच कचेरींत जाऊन तें ताडून पाहतांच हा पूर्वी शिक्षा झालेला चोर आहे असें त्याला आढळलें. त्याचा पत्ता तेथेंच टिपलेला होता. त्याबरोबर त्यानें एकदम जाऊन त्याच्या घराची झडती घेतांच बराच मुद्देमाल त्याच्याजवळ सांपडला व त्यास शिक्षा झाली. अशा तऱ्हेचीं बरींच प्रत्यक्ष घडलेलीं उदाहरणें आहेत व त्यास ह्या उपयुक्ततेमुळें सरकारनें दरोडेखोर, खुनी, डांबीस, भामटे वगैरे लबाड लोकांना लिहितां जरी येत असलें तरी त्यांच्या बोटांचे ठसे घेण्याची पद्धति सरसहा मुद्दाम सुरूं केली आहे व त्याचा फार उपयोग होतो हें आतां निर्विवाद सिद्ध झालें असून त्याचें शास्त्रीयत्व प्रस्थापित झालें आहे. ह्यासंबंधींची सर्व माहिती सेंट्रल ऑफिसमध्यें सांपडेल. कारण त्या ठिकाणीं ह्याचें रजिस्टर किंवा इंडेक्स तयार असून तें तेथील तज्ज्ञ ओळखतात. ह्या विषयावरील कांहीं पुस्तकें पुढें देत आहे तीं वाचलीं असतां सर्व माहिती समजेल.

एफ् गॉल्टन = फिंगरप्रिन्टस् १८९२ व फिंगर प्रिन्टस् डायरेक्टरी १८९५.

इ. आर. हेन्री = क्लासिफिकेशन ऍन्ड यूसेस ऑफ फिंगरप्रिंटस् १९०५.

एच क्रॉस=क्रिमिनल इनव्हेस्टीगेशन १९०७.

एच कॉल्डस–गाइड टु फिंगरप्रिंटस आयडेन्टिफिकेशन १९०५.

एकंदर वरील माहिती व इतिहासावरून मनुष्य शोधक बुद्धि

ठेवून जर योग्य प्रयत्न करील तर त्यामुळें त्याचा स्वत.चा फायदा तर होईलच; पण जगाच्या ज्ञानांत भर घालून त्यास लोकांचाहि फायदा करून देतां येतो व व्यवहार अधिकाधिक सुखद करून घेतां येतो, हें शोधपरंपरेच्या इतिहासावरून निर्विवाद सिद्ध झालें आहे. कांहीं माणसें अशीं असतात कीं, तीं स्वत: तर प्रयत्न करावयाचीं नाहींतच; पण दुसरा करीत असला तर मात्र ह्या शास्त्रांत काय अर्थ आहे, त्या शास्त्राच्या शोधनापासून लौकिक व्यवहाराला यत्किंचितसुद्धां उपयोग नाहीं. अमक्या शास्त्राचें संशोधन म्हणजे उगाच कालाचा बुद्धीचा व पैशाचा निरर्थक व्यय होय, अशा अनेक शंका वाढवीत असतात; पण ते असा विचार करीत नाहींत कीं, ह्या सृष्टींतील सर्व शास्त्रें एकमेकांवर अवलंबून आहेत. एका शास्त्राचें दुसऱ्याच्या मदतीशिवाय कधींहि भागावयाचें नाहीं. फरक इतकाच कीं, एका शास्त्राची एखाद्या कामांत बरीच जरूरी भासेल, तर दुसऱ्या शास्त्राची त्या कामीं कमी लागेल; पण दुसऱ्या कामांत त्या दुसऱ्या शास्त्राची जरूरी अधिक भासेल व पहिल्याची कमी लागेल इतकेंच. उदाहरणार्थ, आपण नौकानयन घेऊं. त्याचा आपण वरवर विचार केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, एक जहाज हांकणारा व त्याचे हाताखालीं कांहीं खलाशी असले म्हणजे बस्स झालें; पण एकदां तें जहाज अफाट सागरांत शिरून बरेंच दूर गेल्यावर व त्याला निरनिराळे प्रसंग येऊं लागल्यावर, जहाजावर नुसते खलाशी व जहाज हांकणारा असून भागावयाचें नाहीं; तर त्यावर कित्येक शास्त्रज्ञ व शिल्पज्ञ असल्याशिवाय चालावयाचें नाहीं असें आढळून येईल. पहिल्या-प्रथम समुद्राची माहिती असणारा तज्ज्ञ त्यावर अवश्य हवा. कारण समुद्रांतील लोहचुंबकाचे खडकांची त्याला माहिती नसल्यास जहाज त्यांवर आपटून केव्हांच नाश पावेल. त्याचप्रमाणें निरनिराळ्या

देशांची माहिती असलेला भूगोलज्ञ पाहिजे. वादळाचें ज्ञान होण्यासाठीं वायुभारमापक यंत्रांची माहिती असलेला तज्ज्ञ, दिशा समजण्यासाठीं होकायंत्रज्ञ, जहाज वाटेंत नादुरुस्त झाल्यास यंत्रशास्त्रज्ञ ( मेक्यानिकल इंजिनीयर ), सुतार, लोहार व बिगारी यांची जरूरी आहे. जहाज संकटांत सांपडलें असल्यास तारायंत्राची व बिनतारायंत्राची ( वायरलेस टेलिग्राफी ) माहिती असणारा तज्ज्ञ हवा, घड्याळ नादुरुस्त झाल्यास व होकायंत्र बिघडल्यास नक्षत्रांवरून वेळ व दिशा समजण्यासाठीं खगोलज्ञ हवा व त्याचप्रमाणें निरनिराळ्या भाषा समजणारे दुभाषे पाहिजेत. जहाजें फुटून लोक बुडूं लागल्यास त्यांना वांचविण्यासाठीं पोहणारे लोक हवेत, तसेंच संकटाची इशारत देण्यासाठीं अथवा शत्रूची गांठ पडली असतां त्यापासून बचाव करून घेण्यासाठीं गोलंदाज व युद्धशास्त्रविशारदांचीहि त्याला जरूरी आहे.. एवंच बरवर विचार करतांना एक जहाज हांकणारा यंत्रशास्त्रज्ञ व त्याच्या हाताखालीं थोडे लोक असले म्हणजे बस्स झालें, अशी जी प्रथम वेडगळपणाची कल्पना असते ती पार नाहींशी होऊन एका नौकानयनास किती तरी लोकांची व निरनिराळ्या शास्त्रज्ञांची व कलाभिज्ञांची जरूरी आहे याची नीट कल्पना येते व एका कार्यास कितीजणांच्या ज्ञानाची व शास्त्रांची मदत असावी लागते हें बुद्धीला पटतें. जगांतील कोणतेंहि शास्त्र, कला अगर विद्या असो, ती जगाच्या उपयोगाकरितां परमेश्वरानें निर्माण केली आहे. तेव्हां त्यांतील लागणाऱ्या शोधांवर जगांत घडामोडी ह्या झाल्याच पाहिजेत व त्यांचा फायदाहि लोकांना अगर राष्ट्राला हा मिळालाच पाहिजे; पण प्रयत्न न करणाराला कोठेंच फायदा दिसावयाचा नाहीं. असो. तेव्हां आपल्या शास्त्रकारांनीं केलेल्या नवव्या विभागावरून त्याचें सूक्ष्म निरीक्षण तर दिसून येतेंच; पण त्यांच्याच नवव्या विभागानें ह्या शास्त्रांत

बरेंच तथ्य असून त्याचें (ह्या शास्त्राचें) निरीक्षण असेंच सतत चालू ठेवल्यास ह्या ( फिंगर प्रिंटस् बोटांच्या ठशांप्रमाणें इतर रेषांबद्दलहि महत्त्वाचे शोध लागून जगाचा फार फायदा होईल व ह्या शास्त्राचें सत्यत्व अधिकाधिक प्रस्थापित होत जाईल. हें सप्रमाण सिद्ध करून देऊन याचें महत्त्व जगाच्या निदर्शनास आणून देण्याच्या कामीं आमच्या शास्त्रज्ञांनीं केलेल्या ह्या नवव्या विभागाचा आरंभीं म्हटल्याप्रमाणें महत्त्वाचा उपयोग झाला आहे. दोघांनींहि याचे नऊ विभाग केले असून पहिले आठ दोघांनींहि सारखेच कल्पिले आहेत. कल्पिले आहेत म्हणण्यापेक्षां हात पहातांच जे सहजीं दृष्टीस पडतात तेच धरले असून नववा विभाग मात्र दोघांच्या निराळा आहे. पंजाची ठेवण हा **पहिला भाग** व रेषा आणि तळवा ह्यांचा वर्ण हा **दुसरा भाग** आणि वरील पहिले **आठ विभाग** मिळून दोघांनीं एकंदर दहा विभाग केले आहेत. त्यांत प्रत्येकाकडील शेवटचा भाग मिळविल्यास अकरा विभाग होतात आणि ह्यामध्यें दोघांकडील असलेल्या निरनिराळ्या नवव्या विभागाची कल्पना एकमेकांनीं घेतल्यास याचे बरोबर बारा विभाग होतील. अशा रीतीनें पंजाचे हे नैसर्गिक विभाग पडले गेले आहेत. आतां या बारा विभागांचा क्रमशः विचार करूं.

पहिला भाग पंजाची एकंदर ठेवण—याचा विचार करावयाचा म्हणजे मणिबंध, तळवा, बोटें, आंगठा, नखें व पंजाची पाठ, ह्या सर्व गोष्टींचा अगोदर विचार करावयास पाहिजे. कारण हे सर्व विभाग मिळून पंजाची संपूर्ण आकृति होत असल्याकारणानें त्यांचा विचार अगोदर झाल्याशिवाय एकंदर ठेवणीचा विचार करतां येणार नाहीं. ह्यासाठीं आपण आधीं ह्या विभागांचा विचार करूं, पण ह्या पहिल्या विभागाचा जरी आपणास विचारकरितां येत नसला तरी ह्याचा दुसरा विभाग म्हणजे हस्त, रेषा, वगैरेंचा वर्ण

ह्याचा विचार केल्याशिवाय ह्या विभागाकडे वळतां येत नाहीं म्हणून आपण आतां उलट क्रमाप्रमाणें वर्णाचा अगोदर विचार करूं.

## वर्ण-पौर्वात्यपद्धति

**अरुणेनाढ्यः पीतेनागम्यस्त्रीरतिः करतलेन ।**
**सितासितेन दरिद्रो नीलेनापेयपायी स्यात् ।**

पौर्वात्यांनीं तळव्याचे वर्ण सांगतांना तांबूस, पिंवळा, पांढरा, काळा व निळा असे पांच प्रकारचे भेद केले असून त्यांचीं पुढील-प्रमाणें फलें दिलीं आहेत.

हाताचा वर्ण तांबूस असल्यास तें श्रीमंतीचें दर्शक आहे. पिवळा असल्यास अगम्यगामी असतो. पांढरा=(व्हाइट), काळा=(ब्लॅक) वर्ण असल्यास दरिद्री व निळा-(ब्लू) वर्ण असल्यास दारूबाज असतो. अशी ह्या तळव्याच्या वर्णाची व त्याच्या फलांची सदरीलप्रमाणें आपलेकडील स्थिति आहे. आतां पाश्चात्यांच्या माहितीकडे वळूं.

## पाश्चात्य पद्धति.

पांढरा — तळव्याचा पांढरा वर्ण असून तो कधींहि न बदलणारा ( त्यांत थंडी व उष्णता यांनीं फरक झालाच तर फार थोडा ) असा असला तर तें अप्पलपोटेपणा, आत्मश्लाघा, आणि परसुखदुः-खाबद्दल सहानुभूतीचा अभाव याचें दर्शक आहे.

तांबडा वर्ण असल्यास उमेदी व आशावादी स्वभावाचें तें द्योतक होय. पिवळा वर्ण असल्यास तें पित्तप्रकृति व तापट स्वभा-वाचें द्योतक होय. काळा वर्ण असल्यास दुःखी, निस्तेज, कफप्रकृति, व भेंग्या स्वभावाचा असतो. भुरकट वर्ण असल्यास मात्र तें निस्ते-जता व नेभळटपणाचें विशेष द्योतक होय.

गुलाबी वर्ण हा सर्व वर्णांत चांगला धरला असून तो तेजस्विता व न्यायबुद्धीचा द्योतक आहे. ह्याप्रमाणें पाश्चिमात्त्यांनीं आपल्या-

प्रमाणेंच पांढरातांबडा, पिवळा, काळा असे चार प्रकार कल्पिले असून भुरकट हा कृष्णवर्णाचा व गुलाबी हा तांबड्याचा असे दोन प्रकारचे उपवर्ण कल्पिले आहेत. तळव्याखेरीज रेषांच्या रंगासंबंधीं विचार केल्यास वरील रंगांशिवाय आपल्याकडे पुढीलप्रमाणें आणखी तऱ्हा किंवा प्रकार आढळतात. " मधुपिंगाभिः सुखिनः शोणाभिस्त्यानभि गर्भीराः स्युः " मधाच्या रंगासारखा म्हणजे तांबड्या व पिवळ्याचे मिश्रणाची एक तऱ्हा जर धरली तर ती गुलाबीच्या जवळ जवळ येते; किंवा हातासारखा धरल्यास अरुण म्हणजे तांबूस गुलाबी व शोणित म्हणजे रक्तासारखा लाल असा होतो व अशा तऱ्हेच्या वर्णाच्या रेषा असल्यास तो अनुक्रमें गुलाबी व दानी असतो व विवर्ण आणि रूक्ष असा रंग म्हणजे वर्णरहित, निस्तेज, फिकट असा रंग असल्यास तें दारिद्र्याचें दर्शक होय.

पाश्चात्त्यांच्या मतें फिक्कट रेषा (पेल लाइन्स) असल्यास तीं माणसें बेहिम्मती नेभळीं असतात. ( स्त्रियांच्या हाताच्या रेषा बहुधा फिक्कट असतात असा अनुभव आहे ). असे लोक एकदम बेभान होतात. व तसेच एकदम शांत होतात. हे लोक बहुधा दिलदार स्वभावाचे आणि अत्यंत हुरुपाचे असतात; पण ह्या त्यांच्या सर्व क्रिया पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें क्षणैक, तात्पुरत्या असून चिरकाल टिकणाऱ्या नसतात.

काळ्या निळ्या ( लिव्हीड ) रेषा असल्यास विशेषतः काळसरपणाकडे त्यांचा कल असल्यास अशीं माणसें दुःखी व सूड घेणाऱ्या बुद्धीची, फार खोल, लबाड व हेकट असतात. हे गुण बहुधा हाताचीं बोटें लांब व आंगठा रुंद असून वरीलप्रमाणें वर्ण असणाऱ्या माणसांत प्राधान्येंकरून आढळतात. अशा रितीनें पौर्वात्त्य व पाश्चात्त्य ह्या दोघांनीं ह्या रंगांचे प्रकार अथवा भेद जवळ जवळ सारखेच केले आहेत व त्या दोघांचीं फलें वर नमूद केल्याप्रमाणें आहेत. आमच्या

शास्त्रज्ञांनीं तांबड्या वर्णांचे तीन प्रकार सांगितले आहेत. पाश्चात्यांनीं काळ्याचे तीन प्रकार केले असून तांबड्याचे दोन प्रकार सांगितले आहेत. पण आमच्या शास्त्रकारांनीं शुद्ध निळ्या वर्णाचा एक स्वतंत्र भेद केला आहे. ह्याप्रमाणें थोडासा फरक आहे. ह्या वर्णासंबंधीं एका फ्रेंच शास्त्रज्ञानें त्याचा अनुभव पुढीलप्रमाणें नमूद करून ठेवलेला आहे. तो म्हणतो शिपाई, नोकर व इतर मजूरलोक इत्यादिकांचे म्हणजे ज्यांचे धंदे रोजच्यारोज पालटतात ते सर्व हातावरील उपजीविकीचे आणि करण्यास श्रमाचे व कठीण असे असून त्यांच्या योगानें हाताच्या कातडींत वर्णांत फरक हा व्हावयाचा. अशा लोकांच्या हातांच्या ह्या वर्णनिदानावर विश्वास ठेवून त्यावरून त्यांचें स्वभावपरीक्षण करणें बरोबर नव्हे. कारण त्यावरून ती उत्पन्न झालेली वर्णाची स्थिति विशिष्ट स्वभावाचीच द्योतक आहे अशी खात्री देतां येत नाहीं. परंतु स्त्रिया आणि बैठ्या व सुखाच्या उद्योगधंद्याचे अगर नौकरीचे लोक किंवा ज्यांच्या हाताला विशेष परिश्रमाचीं व कठीण कामें करावयाचीं नसतात. आणि ज्यांच्या हातांस किंवा कातडीस इजा न होतां ते मूळच्या स्वरूपांत राहूं शकतात. अशांच्या हातांच्या रंगावरून मात्र वर दिलेल्या वर्णनाचा व त्यांच्या स्वभावाचा उत्तम मेळ बसतो. आतां आपण पंजाच्या पहिल्या नैसर्गिक विभागाचा थोडासा विचार करूं; कारण मणिबंधावरील चिन्हांचा व रेषांचा इतर भागांशीं संबंध असल्यामुळें, शिवाय चिन्हांची व रेषांची आपणांस आज माहिती नसल्यामुळें तूर्त त्रोटकच विचार करणें बरें. हा पहिला विभाग म्हणजे आकृति क्र. नं. १ मधील १ या अंकानें दर्शित केलेल्या रेषेपर्यंतचा होय.

**मणिबंध पौर्वात्त्य पद्धति**

**मणिबंधस्त्रिरेखस्तु मणिभूषणभाग्भवेत् ।**
**साधारणो द्विरेखः स्यादेकरेखस्तु भिक्षुकः ॥ १ ॥**

**मणिबंधे कंकणाख्याश्चतस्रो भोगलक्षणाः**
**राज्ञां तिस्रस्तु नारीषु कामिन्यां द्वितयं स्मृतं ॥**

आपल्याकडे मनगटावर तीन किंवा चार रेखा असतात असें मानतात व त्या तीन किंवा चार असणें उत्तम, दोन असणें मध्यम व एक असणें कनिष्ठ असें समजतात. तसेंच आपल्याकडे ह्या रेषा साध्या असण्यापेक्षां यवाच्या आकाराच्या असाव्यात म्हणजे त्या उत्तम असें मानतात. त्यांचीं सविस्तर फलें पुढें देऊं. परंतु आपल्याकडे ह्या रेषांचीं फलें संपत्तिदर्शक आहेत असें मानिलें आहे.

## पाश्चात्त्य पद्धति.

पाश्चात्त्यांनींहि ह्या तीनच रेषा मानलेल्या आहेत व त्यांनींहि तीन रेषा असणें उत्तम, दोन रेषा असणें मध्यम व एक रेषा असणें कनिष्ठ असें मानलें आहे. परंतु ते ह्या संपत्तीच्या द्योतक आहेत असें जरी आपल्याप्रमाणेंच मानतात तरी ते त्या आयुष्यसूचक आहेत असें प्रमुखत्वेंकरून मानतात. शिवाय ह्या रेषा तीनच्याऐवजी क्वचित्-प्रसंगीं चारहि आढळतात व त्याचें फल उत्तम आहे असें मानतात. ह्या मनगटावरील रेषांचा आपण पुढें सविस्तर विचार करणार असल्याकारणानें त्यांची नीट कल्पना येण्यापुरती वरील माहिती पुरेशी झाली आहे. तेव्हां आतां आपण ह्या पंजाचा दुसरा विभाग जो तळवा त्याच्या विवेचनास सुरवात करूं. हा विभाग आकृतीमध्यें चित्रित होईल.

## तळवा ( पौर्वात्त्यपद्धति. )

**मृदुपाणिपदश्चैव स्थिरकार्यकरस्तथा ।**
**धृतिमान् जागरूकश्च धनवान् भवति ध्रुवं ॥**
**मृदुत्वे पादतलयोर्भवेद्वाहनसौख्यभाक् ।**

हाताचा व पायाचा तळवा कसा असावा म्हणजे तें शुभ लक्षण होय हें वरील श्लोकांत सूत्ररूपानें आमच्या शास्त्रकारांनीं ग्रथित केलें आहे. ज्याच्या हाताचा व पायाचा तळवा मृदु (मऊ) असेल व असें असून ती व्यक्ति जर स्थिरकार्य करणारी असेल तर तो मनुष्य धैर्यवान, दक्ष आणि संपत्तिमान होतो. आणि ह्या फलनिर्देशाबद्दल ग्रंथकारांची बरीच खात्री दिसते. हे हातपाय मऊ म्हणजे कसे असावेत ह्याबद्दल शंका राहूं नये म्हणून, त्याबरोबरच आमच्या शास्त्रकारांनीं ते तळवे—

**अंभोजगर्भसुभगं मृदु पाणिद्वयं शस्तं ।**

कमलाच्या गाभ्याप्रमाणें सुंदर व अत्यंत सुकुमार नाजूक असे असावेत अशी त्याची व्याख्या दिली आहे. तसेंच ह्या व्याख्येप्रमाणें ह्या हाताची अशी ठेवण. व्यक्ति स्थिरकार्य करणारी असली म्हणजे राहूं शकेल. लोहारासारखें घण मारणें, मजुरासारखीं अवघड ओझीं उचलणें, पाट्या वहाणें, खणणें व पादत्राणाखेरीज धांवपळ करणें कीं ज्यांच्या योगानें त्याच्या हाताच्या, पायाच्या, शरीरवर्णाच्या मूळस्वरूपांत फार फरक पडतो, अशा माणसांत अशी स्थिति दृष्टीस पडणार नाहीं. म्हणून स्थिरकार्य करणारीं म्हणजे मुत्सद्दी, राजे, व्यापारी, न्यायाधीश व प्रोफेसर वगैरे लोकांप्रमाणें बौद्धिक कामें करणारीं माणसें असलीं तर मग वरील फल त्यांना तंतोतंत लागू पडेल; इतकेंच नव्हे तर त्यांना वाहनसौख्याहि मिळेल असें सांगितलें आहे. व्यवहारांतहि बौद्धिक श्रम करणाऱ्या व शारीरिक कष्ट करणाऱ्या माणसांत वरील प्रकारचें अंतर सहजीं दिसून येतें. यांवरून आपल्या शास्त्रकारांचा हा अनुभव व वर्णासंबंधींचा वर नमूद केलेला फ्रेंच शास्त्रज्ञांचा अनुभव ह्याचा चांगलाच मेळ बसला आहे हें कोणाच्याही ध्यानांत येईल. तसेंच बौद्धिक काम करणारीं

माणसें स्वाभाविकपणेंच बुद्धिमान व दक्ष असतात व त्यांचा तळवा मृदु राहणें शक्य आहे. आतां ह्या मृदु हाताचें ऐवजीं कठीण हात असला तर त्याचें लक्षण त्यांनीं खालीलप्रमाणें दिलें आहे.

**यस्य हस्ततलं सम्यक्कठिम्नं स हि कर्मकृत् ।**
**उपदंतश्च दुष्टात्मा बंधुनाशेन खिद्यति ॥**

हे तळवे मृदुचे ऐवजीं कठीण असल्यास तें कावाडकष्टी माणसाचें मजुराचें लक्षण आहे असें समजावें, असें शास्त्रकारांनीं सांगितलें आहे. ह्या श्लोकाच्या दुसऱ्या चरणाचा ह्या हस्तसामुद्रिकाशीं कांहीं संबंध नाहीं, पण दांतांवर दांत येतात हें पूर्वीपासून आपल्या लोकांस माहिती असून त्याचें फल तो मनुष्य दुष्ट स्वभावी असून मित्र व बंधु ह्यांच्या हानीपासून त्याला दुःख होतें असें सांगितलें आहे. ह्या मृदु व कठीण भेदांशिवाय पुढीलप्रमाणें ह्या तळव्याचें आणखी भेद केलेले दृष्टीस पडतात.

**संवृत्तनिम्नेन धनी पाणितलेनोन्नतेन दानरुचिः ।**
**निम्नेन जनकवित्तव्यक्तो विषमेष धनहीनः ॥**
**रोमाशिरापरिहीनं घनमांसं पाणितलयुगं स्निग्धम् ।**
**बहु शुभमनुन्नतमनिम्नं रुक्षं खरं विवर्णं क्लेशदं भवति ॥**

हाताला खळगा असल्यास वडिलार्जित संपत्ति नसते किंवा मिळत नाहीं. हात विषम म्हणजे असम अथवा सारखा नसल्यास, उंच सखल असा मिश्र स्थितींत असल्यास दरिद्री होतो. वराहमिहिरानें नुसता दरिद्रीच नव्हे; तर असा मनुष्य क्रूर स्वभावाचा असतो असें त्यांचें फल दिलें आहे. संवृत्त म्हणजे वर्तुलासारखा वाटोळा परंतु लहान असा तळव्याला खड्डा असेल तर संपत्तिमान होतो. तळवा उंच असल्यास दानधर्म करण्याची आवड असते. तसेंच तळव्यावर केश असूं नयेत व शिरा दिसूं नयेत आणि घनमांस म्हणजे भरदार व

आर्द्र असा तळवा असावा म्हणजे तो चांगला. ह्याच्या उलट अनुन्नतम् म्हणजे कर्माजाडीचा रुक्ष, खरखरीत, व निस्तेज किंवा फिकट आणि उताणा–खोलगट हात असला तर तो दुःखदायक समजावा. तेव्हां मृदु हात, कठीण हात, निम्न हात–संवृत्तनिम्न–उन्नत, घनमांस ( भरदार, ) अनुन्नत–इतक्या प्रकारचे तळवे आतांपर्यंत झाले. ह्याशिवाय " प्रोत्तानकराश्च दातारः " ( ओव्हरडेव्हलप्ड ) असल्यास दानशूर असतो, असें सांगितलें आहे. म्हणजे ह्यांत दानरुचीपेक्षां अधिकता दाखविली आहे. तेव्हां हा दाता, कर्ण किंवा बळीच्या सदरांतला असावा असें दिसतें. " क्षोणिपतेर्विस्तीर्णं करं भवति " राजाचा हात प्रशस्त रुंद असतो. अशा रीतीनें ह्या तळव्याचें दहा प्रकार केले असून त्याचें वर्णन व फल ढोबळ मानानें दिलें आहे. आतां पाश्चात्त्यांनीं ह्याचे किती प्रकार केले आहेत व त्यांचा अनुभव काय आहे तें पाहूं.

## पाश्चात्यपद्धति.

हाताची एकंदर ठेवण कशीहि असो; प्रथम त्यांत समावेश होणाऱ्या सर्व भागांच्या ठेवणीचा व आकाराचा आपणांस अवश्य विचार करावयास पाहिजे. कारण त्या त्या भागांच्या ठेवणीनुरूप त्या त्या व्यक्तींच्या स्वभावधर्माचें मिश्रण बनलेलें असतें. तेव्हां त्याचेकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. व ते विभाग म्हणजे तळवा, बोटें, पेरीं. आंगठा हे असून ह्या प्रत्येकाची व एकंदर पंजाची ठेवण ह्या सर्वांचा नीट विचार केल्याशिवाय फलनिर्देश सांगू नये अशी प्रस्तावना देऊन तळव्यासुद्धां इतर विभागांचा विचार केलेला आहे.

## हाताचा तळवा ( दि पाम ऑफ दि हॅन्ड )

पहिल्या प्रथम आपण तळव्याची ठेवण व रचना यांची स्थिति

नीट पाहिली म्हणजे त्यावरून त्याच्या शारिरीक ठेवणीची कल्पना आपल्या ध्यानांत येते. आणि मग पुढीलप्रमाणें त्याचें वर्गीकरण झालेलें आपल्या दृष्टीस पडतें. अशा ह्या तळव्यांच्या ठेवणी व स्वभावधर्म खालीलप्रमाणें आहेत.

अरुंद आणि पातळ तळवा. ( थिन ॲन्ड नॅरो पाम ) जर तळवा पातळ, अरुंद व चिंरम्या पडलेला असा असेल तर तें मानसिक दुर्बलता, भितरेपणा व निर्बुद्धता याचें लक्षण असून तो अनीतिमान, चारित्र्यरहित, नेभळा व चंचलस्वभावी असतो. बांधेसूद ( वेलप्रपोर्शन्ड ) सर्व शरीराच्या एकंदर प्रमाणाच्या मानानें योग्य प्रमाणांत तळवा; बोटें व आंगठा हीं असून पक्का मजबूत पण कठीण नव्हे, लवचीक पण थलथलीत (.शिथील नव्हे, ) असा तळवा असल्यास तें समतोल बुद्धीचें, बुद्धिमत्तेचें, गुणग्राहकतेचें आणि स्वतःच्या मनोभावनांना सुव्यवस्थित वळण देऊन त्यांचा योग्य उपयोग करून घेण्याचें त्याच्यांत सामर्थ्य असतें ह्याचें द्योतक आहे.

प्रोत्तानकर ( ओव्हरडेव्हलपड् ) जर हा तळवा फारच मांसल, उंच ( अतिशय जाड ) असा असला तर ही फाजील वाढ, फाजील आत्मविश्वास, आपलपोटेपणा व बेगुमानपणा ह्याचें द्योतक आहे.

कठीण तळवा ( हार्ड पाम ) जर वरील तळव्यांत कठीणपणाची भर पडली. आणि बोटांपेक्षां तळवा जरा लांब असला, तर तें पशुवृत्तीचें व पशुबुद्धीचें म्हणजे आपण ज्यांना पुच्छविषाणहीन माणसें समजतों अशा खादाड व मदांध माणसांचा असा हात असतो. व हा तळवा अत्यंत कठीण ( व्हेरी हार्ड हॅन्ड ) असेल तर ह्या गुणाची परमावधि होते. बहुतेक एलेमेंटरी टाइपच्या वर्गांतील माणसें अशी असतात. मृदुहस्त ( सॉफ्ट पाम ) तळवा मृदु असणारीं माणसें, कल्पनिक चित्रें रेखाटणारीं कोंवळ्या मनाची व चैनी अशीं असतात.

खोल हात ( हालो पाम ) तळव्यास खड्डा असणें चांगलें नव्हे;

तें दुर्दैवाचें लक्षण होय. अशा लोकांना आपत्ति, पैशाचा व्यय आणि धंद्यांत अपयश येण्याचा फार संभव असतो. आणि असा खड्डा असलेल्या तळव्यावर इतर चिन्हें जरी चांगलीं असलीं तरी त्या सर्वांना एका बाजूस सारून हें दुर्दैवी चिन्ह आपला प्रभाव दाखविल्याशिवाय रहात नाहीं. ह्या खड्ड्याच्या चिन्हाबद्दल अशी शंका येते कीं, उंचवटे भरदार असलेले चांगले असें एकीकडे सांगतात व असे उंचवटे असले कीं, खड्डा पडावयाचाच; तेव्हां ह्या दोहोंचा मेळ बिलकूल बसत नाहीं. आपल्या पद्धतीप्रमाणें " संवृत्तनिम्नेन धर्ना " असें गृहीत धरल्यास मात्र ह्याचा नीट मेळ बसतो. कारण भोंवतालचें सर्व उंचवटे नीट असल्याशिवाय तळव्याला बेताचा असा खड्डा येणार नाहीं. व ह्या खड्ड्याचें आपल्या पद्धतीप्रमाणें फल शुभ धरल्यास उंचवटच्यांच्या फलालाहि विरोध येणार नाहीं. व शिवाय कांहीं उंचवटच्यांच्या अभावीं हा खड्डा स्वाभाविकच वेडावांकडा होईल व त्याचें दोघांनींहि दारिद्र्यसूचक दिलेलें फल बरोबर ठरेल; तथापि ह्या खड्ड्याचा विचार आपण पुढें भविष्यकथनाच्या भागाचे वेळीं करूं. एकंदरींत तळवा हा इतर भागांच्या व शरीराच्या समप्रमाणांत असला म्हणजे तो मनुष्य स्वभावानेंहि प्रमाणशीर असतो; पण तसें नसून एखाद्या भागाचें आपणांस आधिक्य आढळल्यास तो भाग ज्या गोष्टींचा दर्शक असेल त्याचें आधिक्य त्या व्यक्तींत सांपडल्यावांचून रहावयाचें नाहीं व न्यून असल्यास न्यूनता दृष्टीस पडेल. अशा तऱ्हेनें पाश्चात्त्यांनीं आठ प्रकार कल्पिले असून त्यांची फलें वरीलप्रमाणें आहेत. आतां ह्याचे नैसर्गिक विभाग जीं बोटें, पेरीं व नखें यांचा विचार करूं. प्रथम नखें व मग पेरीं ह्यांचा आपण क्रमानें विचार करूं. म्हणजे मग बोटांचा विचार करण्यास सोपें होईल. कारण हीं बोटें, नखें, पेरीं, अग्रें व इतर भाग मिळून बनलेलीं असतात; तेव्हां त्याच क्रमाक्रमानें त्याचा विचार करणें बरें.

परंतु ही तुलना करण्याचे पूर्वी नखांचा प्राचीन काळीं भविष्य सांगण्याचे कामीं दुसऱ्या रीतीनें उपयोग करीत असत व कांहीं ढोंगी लोक ह्या नामसादृश्याचा फायदा घेऊन त्यांची ती पद्धतीहि ह्या सामुद्रिकांपैकींच एक आहे असें भासवीत असत; तेव्हां सुरवातीला त्याचा थोडासा इतिहास देतों.

## नखाग्रनिध्यान ( ऑनिक्सोमॅन्सी )

फार पुरातन कालापासून हाताच्या नखांचा आपल्याकडे व तिकडे भविष्य सांगण्याकडे उपयोग करून घेत असत. आपल्याकडे ह्या पद्धतीस अंगुष्ठाग्रनिध्यान अथवा हजरत असें म्हणत व त्यांचेकडे यास ऑनिक्सोमॅन्सी म्हणत. ( ऑनिक्स म्हणजे नखें व मॅन्टिआ भविष्यकथन ) नखावरून भविष्य सांगण्याची पद्धति या नांवानें ती अस्तित्वांत होती. आपल्याकडे आंगठ्याच्या नखाला लोण्यांत खललेलें काजळ किंवा काळा रंग फासून व त्यावर तेलाचा टिपका देऊन त्याला तुकतुकी आणावयाची व अशा रीतीनें त्यांचा उपयोग करून घेत. त्यांचेकडे नखांवर आंगठीचीं किरणें पाडून किंवा नखें तेलानें पॉलिश करून त्यांचा उपयोग करीत. हें काम दोघांकडेहि सूर्यप्रकाश किंवा दिव्याची ज्योत ह्याच्या सहायानें लहान मुलांकडूनच करण्याची वहिवाट असून हे प्रयोग आपल्याकडील देवऋषि व पंचाक्षरी आणि त्यांच्याकडील सोर्सरर्स व शार्लटन्स् करीत. खरोखर ह्यांचा सामुद्रिकाशीं कांहींहि संबंध नाहीं. फक्त भविष्य समजण्यासाठीं एकाग्र दृष्टि व्हावी एवढ्याकरितां फार प्राचीन काळीं नख हें गंजणारें नसून आयतेंच चकचकीत असतें म्हणून ह्याचा उपयोग करीत व ह्या परिपाटामुळें वरील नांव त्यास मिळालें आहे इतकेंच. परमेश्वरानें नखें निर्माण करण्याचें कारण बोटांचीं अग्रें फार नाजुक असल्याकारणानें त्यांना नखांची जोड असल्याशिवाय ह्या बोटांकडून स्वतःचें संरक्षण करण्याचें व दुसऱ्या-

कडून उत्पन्न होणाऱ्या विघ्नांचा प्रतिकार व पारिपत्य होणार नाहीं म्हणून नखांची योजना केली आहे. तथापि त्यांच्या ठेवणीवरून इतर भागाप्रमाणें व्यक्तिस्वभाव व भविष्यसूचकत्वशक्ति त्यांचे ठिकाणीं आहे, असा अनुभव असल्यामुळें दोहोंकडील शास्त्रज्ञांनें ह्या विषयींचे अनुभव काय आहेत तें आतां आपण पाहूं.

विद्रुमरुचयः श्लक्ष्णाः पाणिनखाः कच्छपोन्नताः स्निग्धाः
सशिखाः क्रमेण विपुलाः पर्वार्द्धमिता महीशानाम्

पोंवळ्याच्या रंगासारखीं लाल, कासवाच्या पाठीसारखीं उंच पण बोथट नव्हेत अशीं, पाणिदार आणि पेऱ्याच्या अर्धापर्यंत, हें नखांचें प्रमाण दिलेलें आहे, त्यावरून लांब म्हणजे किती व आखूड म्हणजे किती व प्रमाणशीर म्हणजे किती हें ओळखतां येईल. अशीं नखें राजांचीं असतात.

दीर्घाः कुटिला रुक्षाः शुक्लनिभा यस्य करनखा विशिखाः ।
तेजोमृजा विहीनः स हीयते धान्यधनभोगैः ॥

ज्यांचीं नखें फार लांब, रुक्ष, पांढरीं फटफटीत, तेजोहीन व टोंकाला थापटलेलीं अशीं असतात त्याला धनधान्याचा उपभोग मिळत नाहीं म्हणजे तो दरिद्री असतो.

पुष्पयुतैर्दुःशीलाः श्वेतैः श्रमणास्तुषोपमैः क्लीबाः ।
परतर्कका विवर्णैश्चिपिटैः स्फुटितैर्नखैर्निःस्वाः ॥

फुलांच्या शिडकावाप्रमाणें नखांवर शिडकाव असल्यास तो दुष्टस्वभावी असतो. पांढरीं नखें असल्यास भिकारी, कोंबड्याच्या वर्णासारखीं असल्यास षंढ, नेभळा असतो. वर्णरहित नखें असल्यास परनिंदक असतो व चपटीं आणि खडबडींत नखें असल्यास दारिद्र्याचें लक्षण समजावें.

अपसव्यसव्यकरयोर्नखेषु सितबिंदवश्चरणयोर्वा ।
आगन्तवः प्रशस्ताः पुरुषाणां भोजराजमतम् ॥

मनुष्याच्या डाव्या उजव्या हाताच्या अथवा पायांच्या नखांवर जर पांढरे ठिपके उमटतील तर तें शुभ लक्षण आहे असें समजावें. असें भोजराजाचें मत आहे.

आरक्तनखरो भूस्थो भूयद्वक्रनखः खलः ।
हारिद्रनखरो भूयाद्दुराचाररतो नरः ॥
रोगी तु नीलनखरो रिक्तश्च शिथिलो नखैः ।
विमलाः प्रवालरुचयः स्निग्धाः कूर्मोन्नता नखाः श्लक्ष्णाः ॥
मुकुराकाराः सूक्ष्माः सौख्यं यच्छंति मनुजानाम् ।
स्थूलैर्नखैर्विदीर्णैः शूर्पाकारैश्च दीर्घनखैः ॥
असितैः सितैर्दरिद्रा भवन्ति तेजोरुचा रहितैः ।

नखें लाल असल्यास जमीनदार, वांकडीं असल्यास दुष्टस्वभावी पिवळीं असल्यास दुराचारी, निळ्या रंगाचीं असल्यास रोगी, शिथिल, निर्जीव नखें असल्यास दरिद्री. निर्मळ, आरशासारखीं तेजस्वी, पातळ, उंच व आरक्त अशीं नखें असल्यास तीं शुभदायी सुख देणारी असतात. जाड, वेडीवाकडीं, सुपासारखीं फताडीं, फार लांब, काळीं, पांढरीं, निस्तेज अशीं नखें असल्यास तो दरिद्री होय. ह्याप्रमाणें आमच्या शास्त्रकारांनीं लाल ( रेड ), पिंवळीं ( यलो ), पांढरीं ( व्हाइट ), काळीं ( ब्लॉक ), उंच व जाड ( थिक ), चपटीं व पातळ ( थिन् ), लांब ( लॉंग ), आंखूड ( शॉर्ट ), मध्यम ( मिडियम ), सुंदर ( ब्रॉड ), सरळ ( नीट ), वांकडीं ( कर्व्हेड ), अणकुचीदार ( पॉइन्टेड ), बोथट ( ब्लन्ट ), सतेज ( पॉलिश्ड ), निस्तेज ( पेल ), कोंड्यासारखीं ( चॉकि ), खडखडीत ( बीटन् ),

ठिपके असलेलीं ( स्पेकल्ड ). इतक्या प्रकारचीं नखें असतात व असें त्यांचें वर्गीकरण केलें आहे व त्यांचीं फलेंहि दिलीं आहेत आतां पाश्चात्यांनीं ह्याबद्दल काय विचार केला आहे तो पाहूं.

## पाश्चात्त्य पद्धति ( नेल्स ऑनिक्सोमॅन्सी )

आंखूड नखें—(शॉर्ट-नेल्स); जर नखें आखूड व रुंद असतील तर तो भांडखोर, चिडाचिडा, ऐश्वर्योपभोगाची लालसा असणारा, स्वतःच्या व भोंवतालच्या सर्व गोष्टी आपल्या हुकमतींत ठेवणारा; खरें म्हटलें म्हणजे तो वागणुकींत समता रहावी या ईर्षेत गढलेला व आपला लवाजमा अगदीं टाकठिकींत व पद्धतशीर ठेवणारा असा असतो.

आखूड नखें, रुंद बोटें व लहान अंगठा असल्यास त्याची खोली नानाविध वस्तूंनीं भरलेली असते. पण प्रत्यहीं मांजराच्या पोराप्रमाणें इकडून तिकडे व तिकडून इकडे अशीं त्यांची उलथापालथ चाल लेली असते. अशीं नखें स्त्रीची असल्यास तें त्राटिकेचें लक्षण समजावें. ह्याच नखाला अंतःकरण रेषा लहान, मस्तक रेषा सरळ करांगुळीकडे झुकलेली, बुधाचा उंचवटा सरळ रेषांनीं आच्छादलेला, मंगळ व चंद्राचा उंचवटा हे उंच आणि बोटांचीं पेरीं सुस्पष्ट अशी स्थिती असल्यास ती पुरुषस्वभावाची स्त्री असून झाशीची राणी किंवा ज्योन ऑफ आर्कप्रमाणें शिपाईबाणा व शूरत्वाबद्दल तिची प्रख्याती असते. नखें आखूड असून रुंद नसल्यास तें शहाणपण, तरतरीतपणा व कुशाग्र बुद्धीचें द्योतक होय. अशा माणसाची कोणत्याहि वादांत अगर विषयांत चटदिशी आपला प्रवेश करून घेण्याची व साधकबाधक प्रमाणांनिशीं त्यावर टीका करण्याच्या त्यांच्या स्वभावसिद्ध पात्रतेमुळें ते उत्तम वर्तमानपत्रकार होतात. फार मऊ हाताच्या नखांची अशीं ठेवण आढळल्यास ते बढाईखोर विरोधी व हास्योत्पादक टीका करणाऱ्या प्रवृत्तीचें द्योतक होय.

खडबडीत नखें ( बिटन नेल्स ) असल्यास तें नाउमेदी, वैराग्यशील, उदासीन वृत्ति व पिरपिऱ्या स्वभावाचें द्योतक होय. बोटाची अग्रें रुंद असून अशीं नखें असल्यास त्यांचे ठिकाणीं हीं सर्व लक्षणें सांपडतात.

पांढरी नितळ ( व्हाइट स्मूथ नेल्स ) पांढरीं. नितळ, पाणीदार, गुलाबी रंगाची झांक असलेलीं व प्रणाशीर अशीं नखें असल्यास तें कोमलांतःकरण, कार्यकुशल, उत्तम पारख व योग्य अभिमान असणें यांचे द्योतक होय.

आकार रंग आणि प्रमाण विरहित, वाटोळीं, ओबडधोबड अशीं नखें असल्यास तें विपयांधतेचें लक्षण समजावें. तसेंच पांढरीं फटफटीत व काळीं नखें असल्यास मनुष्य दुष्ट व हेकेखोर असतो.

( लॉंग ऍन्ड कर्व्हड, शॉर्ट, डार्क, नॅरो, राउंड ऍन्ड थिन म्हणजे ) दीर्घ बांकदार आखूड, काळीं, चिंचोळीं, वाटोळीं, व पातळ नखें–नखें लांब आणि बांकदार असलीं तर तें क्रौर्य व निर्दयतेचें द्योतक होय. गॉलच्या अनुभवाप्रमाणें तें पशुवृत्तिचें बाहेरख्यालीचें व दुष्ट लक्षण होय. आंखूड आणि फिकट नखें असल्यास तें लबाडी व लफंगेबाजीचें द्योतक होय. काळसर नखें असल्यास — विश्वासघातकी. अरुंद व कुरळी नखें असल्यास तें जुलमी व धाडशी स्वभावाचें द्योतक होय. नखें लांब पांढरीं असल्यास तो गृहस्थ नीतिमान असतो. वाटोळीं नखें हें चैनी स्वभावाचें आणि पातळ नखें लबाडीचें द्योतक होय. पातळ नखें बहुधा अशक्त प्रकृतीचीं द्योतक असतात.

शिडकावाचीं नखें–(स्पॉटस ऑन दि नेल्स); जर नखांवर काळे पांढरे असे दगाच्या वर्णाप्रमाणें व ताऱ्याच्या आकृतीसारखे डाग पसरलेले असल्यास अंगीकृत कार्याची फुकट बडेजावी दाखविण्याकडे प्रवृत्ति असते. तें अगदीं हुबेहुब ताऱ्यासारखें असल्यास त्याच्या वृत्तीचे वर्णन करणें कठीण असतें. आंगठ्यांवर पांढरे तेजस्वी ठिपके

असले तर ते परस्परावलंबी प्रेमाचे द्योतक होय. ह्या ठिपक्याचे तेजस्वी फवारे असल्यास तें अगम्यगामीत्वाचें लक्षण आहे. तेच ठिपके काळे असल्यास विषयांधतेमुळें गुन्हे करण्याची प्रवृत्ति असते. केव्हां केव्हां तर फौजदारी गुन्हे करण्यापर्यंत त्याची मजल जाते. हे पांढरे ठिपके, तर्जनी ( फोर फिंगर ) वर असले तर फायदा व काळे असले तर नुकसान दाखवितात. मध्यमेच्या (सेकंड फिंगरच्या) नखांवर पांढरे ठिपकें असल्यास तें जलपर्यटन व काळे असल्यास भावी संकटाचें, नाशाचें सूचक होत. तर्जनीच्या ( थर्ड फिंगर ) नखावर पांढरे ठिपके असतात, ते संपत्ति व सन्मान यांचे, आणि काळे ठिपके अपकीर्ति व हातून नीच कृति होण्याचें सूचक होय. अनामिकेच्या ( लिटर फिंगर ) नखावर पांढरे ठिपके असल्यास ते शास्त्रश्रद्धा व व्यापारांतील फायद्याचें द्योतक होत. ह्याप्रमाणें ह्या नखशास्त्राची ( अनिक्सोमॅन्सीची ) प्राचीन परंपरागत निदानपद्धति आहे. आतां ह्याच्यासंबंधींच्या अर्वाचीन शोधकांचे काय अनुभव आहेत ते पाहूं. डिमोक्रीटस ज्यूनीअर ( रॉबर्ट बर्टन ) नांवाच्या शास्त्रज्ञानें इ. स. १६२१ ऑक्सफोर्ड ॲनॉटमी ऑफ मेलांकली, पार्ट फर्स्ट, सब सेक्शन ४ ह्यांत नखनिरीक्षणासंबंधानें फार मनोरंजक, महत्त्वाची व अनुभवशीर माहिती दिली आहे त्याच्या अनुभवाप्रमाणें नखें हीं सुखदु:सूचक असून त्यांवर काळे टिपके असल्यास तें काळजी, असमाधान, औदासिन्य ह्याचें दर्शक होत व ह्याबद्दलचा त्याचा स्वानुभव त्यानें असा दिला आहे कीं, त्याच्या नखांवर सतत सात वर्षे असे काळे ठिपके होते व तेवढ्या अवधींत सतत खटले, खोकले, वारसासंबंधींचे तंटे, भीति, अपकीर्ति देशत्याग, शष्क आणि चिंता यांना ऊत आलेला होता आणि ही संकटपरंपरा हे नखावरील काळे ठिपके ज्यावेळीं नाहींसे झाले त्याच वेळीं संपली. मि. गॉरडन नांवाच्या ग्रंथकर्त्यानें त्यांच्या ग्रंथांत असा स्वानुभव नमूद करून

ठेविला आहे कीं, त्याच्या मुलाच्या मृत्यूपूर्वी त्याच्या नखावर एक काळा ठिपका उमटला होता व त्याचे मृत्यूचे दिवस जों जों जवळ येत चालले तों तों तो ठिपका सर्व नखभर पसरला. सर टी ब्राऊन यानें ह्या-संबंधीं बरीच चिकित्सा करून त्याचा अनुभव गॉरडनच्या अनुभवाशीं तंतोतंत जुळतो असें त्यानें कबूल केलें आहे व ह्या ठिपक्यांत सूचक शक्ति असून, ते टिपके नखाग्रावर असल्यास भूतकालीन, मध्यें असल्यास वर्तमानकालीन, व तळाशीं असल्यास भविष्यकालीन परिणाम सुचवितात. तसेंच पांढरे टिपके सौख्यदर्शक व निळे टिपके दुर्दैवदर्शक आहेत. आंगठ्यावरील ठिपके कीर्ति व अब्रू, तर्जनीवरील संपत्ति वगैरे अशा वर सांगितलेल्या क्रमालाच अनुसरून असतात असा त्यांचा अनुभव आहे. मेल्टन असें म्हणतो कीं, हे ठिपके पिंवळेहि असतात व ते मृत्यू सुचवितात. ह्याप्रमाणें दोन्ही शास्त्रज्ञांनीं सांगितलेली नखांची स्थिति असून तशी नखांची स्थिति असते हें अनुभवास येतें. आतां त्यांनीं त्यांचीं फलेंहि दिलीं आहेत. त्यांचा अनुभव कितपत मिळतो हें पुढें पाहूं. दोघांचें वर्गीकरण सारखें आहे; पण पौर्वात्यांनीं नखांचें जसें प्रमाण दिलें आहे त्याप्रमाणें पाश्चात्यांनीं दिलें नसल्याकारणानें त्यांचें प्रमाण ठरविणें कठीण आहे व प्रमाण ठरवितां आलें नाहीं कीं, फलनिर्देश करणेंहि कठीण व त्याचा अनुभव ताडून पहाणेंहि त्रासाचें काम होय. तसेच पाश्चात्यांनीं दिलेलीं फलेंहि मिश्र आहेत. तीं आपल्यासारखीं पृथक् पृथक् दिलेलीं नाहींत. हें वैगुण्य आहे; पण त्यांनीं फलांविषयीं नमूद करून ठेविलेले स्वानुभव मात्र आपल्याकडे नाहींत त्यामुळें त्यांच्या फलावर जसा थोडासा विश्वास ठेवला तरी चालेल तसा आपल्याकडील फलाचा मेळ मिळेपर्यंत विश्वास ठेवणें चुकीचें होईल; पण शेवटीं आपण ह्या सर्वच गोष्टींचा आपणाला येणाऱ्या स्वानुभवावरच

निकाल करणार आहों; त्यामुळें शेवटच्या मुद्यांत आज कांहीं विशेष अर्थ नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

मागील लेखांत हाताचा तळवा, वर्ण व नखें यांचा विचार केला. नख म्हणजे बोटांचें मागील अग्र होय. तेव्हां मागल्या अग्रांचा म्हणजे नखांचा जसा आपण विचार केला; तसाच पुढील अग्रांचा विचार करावयास पाहिजे. आपल्या इकडे ह्या अग्रांबद्दल विशेष ऊहापोह केलेला नाहीं. फक्त बोटांचीं टोकें निमगोल अर्धचंद्राकार असणें चांगलें व अणकुचीदार चपटीं वगैरे इतर अग्रांचीं बोटें मध्यम होत असा त्यांचा निष्कर्ष निघतो. पाश्चात्यांनीं हीं अग्रें चार प्रकारचीं असतात असें सांगितलें आहे. व तें वर्गीकरण पुढीलप्रमाणें आहे. पहिलें स्पॅच्युलेट म्हणजे चापट व लांब ( पट्टीदार ) असणारीं. दुसरी स्क्वेअर म्हणजे जाड बोटांच्या शेवटासारखीं चौकोनी. तिसरी कोनिक गिमुळत्या बोटांच्या अग्रांसारखी निमगोल; व चौथी पॉइन्टेड म्हणजे बोटांच्या शेवटासारखी अणकुचीदार असे ह्याचे प्रकार केलेले आहेत. त्यांबरोबरच त्यांचीं फलेंहि दिलेलीं आहेत; पण त्यांचा समावेश बोटांच्या, पेऱ्यांच्या व हातांच्या फलांमध्यें होत असल्याकारणानें तीं येथें देत नाहीं. आतां पेऱ्यांचा विचार करूं.

## बोटांचीं पेरें.

( पौर्वात्य पद्धति. )

**अंगुष्ठपर्वणी द्वे तु त्रीणिचासामुदीरिते**
**पर्वांतरे पर्वाणि च रेखाः स्युः फलदायकाः**

प्रथम अंगठ्यास दोन पेरीं व इतर बोटांस तीन पेरीं असतात व ह्यांत असणाऱ्या आडव्या उभ्या रेषा फलदायक असतात असें

सांगितलें आहे. आणि तदनंतर ह्या पेऱ्यांच्या इतर ठेवणीकडे ते वळले आहेत.

**पर्वांतरालं सूक्ष्मं च पृथु पर्व यदा भवेत्**
**संयोजने छिद्रदर्शी निर्धनो भविता नरः**

पेऱ्यांचीं दोन्हीं अग्रें म्हणजे त्यांचे साधे जाड असून मधला भाग जर बारीक असेल तर तो दरिद्री होतो. कारण अशीं पेरीं असलीं म्हणजे स्वाभाविकच बोटांत फटी रहातात व त्याचें फल दारिद्र्य होय.

ह्यावरून पेरीं जाड व बारीक असतात. तसेंच मधला भाग व सांधे असे मिळून चार तऱ्हा झाल्या. त्यानंतर "सुदीर्घपर्वाभिः सौभाग्ययुतः स्यात्" आणि "समानि पर्वाणि" लांब आणि सारखीं असणारीं पेरीं चांगलीं व आंखूड असणारीं पेरीं वाईट असें मानलें आहे. म्हणजे पहिले चार व हे तीन मिळून एकंदर जाड, बारीक, लांब, आंखूड, मध्यम, समान व फुगार सांध्याचीं असे त्यांनीं सात प्रकार केले असून त्यांचा फारच थोडक्यांत फलनिर्देश दिला आहे.

## पाश्चात्त्य पद्धति.

पाश्चात्त्यांचें ह्यासंबधीं पुढीलप्रमाणें निरीक्षण आहे. बोटाचीं तिन्हीं पेरीं विशिष्टत्वदर्शक आहेत. पहिलें नखाचें पेरें उपजतबुद्धि, दुसरें मधलें तर्कशक्ति आणि तिसरें व्यावहारिकता दर्शवितें. जर शेवटचीं म्हणजे तिसरीं पेरीं इतरांपेक्षां लांब व जाड असलीं तर तें चैनी व विषयी स्वभावाचें द्योतक होय. दुसरें पेरें जाड व लांब असल्यास तो साधक बाधक प्रमाणें पाहून त्याचा नीट विचार केल्याशिवाय कांहींहि न करणारा असा असतो. पहिलें पेरें असें असल्यास तीं माणसें ईश्वरी संकेतावर हवाला देऊन वागणारीं

असतात. तसेच बोटांचे सांधे तर्कशक्ति, जगिक ज्ञान, उपजतस्वभाव व ईश्वरी प्रेरणा यांचा मेळ घालून देणारे आहेत. सर्व जगांतील मानवी प्राण्यांचे हात पाहिले असतां मुख्य दोन तऱ्हा आढळतात. एक नॉटेड ( म्हणजे गांठाळ ) व दुसरी (स्मूथ म्हणजे) साफ नितळ बोटें. गांठाळ आकृतीची खरी कल्पना द्यावयाची म्हणजे ज्या हाताच्या बोटाचें सांधे फार रुंद व फुगीर असतात तीं गांठाळ बोटें होत व हीं सहज ओळखतां येतात. आतां ( स्मूथ ) नितळ म्हणजे विशेषतः ज्यांचे सांधे फुगलेले नसतात, म्हणजे पेरांच्या इतर भागासारखें किंवा थोडे लहान असतात अशीं बोटें या सदरांत येतात. ह्याप्रमाणें हे दोन मुख्य भाग झाले; पण बोटांना तीन तीन पेरीं आहेत. पैकीं नखाचें पहिलें पेरें सोडून दिलें पाहिजे; कारण त्याला शेवटीं सांधा नाहीं व त्याच्या तळाचा सांधा हाच दोन्ही पेऱ्यांचा सांधा असल्या-कारणानें हे सांधे दोनच उरतात. व हे सांधे दोनच असल्यामुळें ह्या दोन मुख्य विभागांचे आणखी येणेंप्रमाणें पोटभेद होतात. १ दोन्ही फुगीर सांधे असलेलीं बोटें, २ एक सांधा फुगीर असलेलीं बोटें, ३ दोन्ही सारखे सपाट सांधे असलेलीं बोटें. ह्याप्रमाणें मुख्य दोन व पोटभेद दोन मिळून एकंदर चार प्रकार केले आहेत व ते " पर्वा-तरालं सूक्ष्मं च " पेरांचा मधला भाग बारीक असून ' पृथु पर्व यदा भवेत् " सांधे फुगीर असल्यास हें जें आपल्या शास्त्रकारांनीं सांगि-तलें आहे, म्हणजे फुगीर सांध्यांचीं व बिनफुगीर सांध्यांचीं हे आपले दोन भेद व पाश्चात्यांना जगाचें अवलोकन करितांना आढळलेले प्रकार हे एकच आहेत असें दिसून येतें. आतां पाश्चात्यांनीं ह्यांचीं फलें काय दिलीं आहेत तीं पाहूं. ह्या बोटांच्या सांध्यांच्या असणाऱ्या कमीजास्त परिणत स्थितिवर सांध्याच्या निरनिराळ्या प्रकारच्या विशिष्ठ स्थितिवर मनुष्याची वृत्ति व वागणूक अवलंबून असते असें त्याना आढळलें आहे.

पहिला सांधा--पहिला सांधा म्हणजे नखांचे पेऱ्याचे खालचा व मधल्या पेऱ्याचे वरचा सांधा; हा जर फुगीर असेल तर प्रमाणशीर व मुद्देसूद विचार, समंजसपणा आणि व्यवस्थित रहाणीचें तें द्योतक आहे. अंगठ्याचें पहिलें म्हणजे नखाचें पेरें लांब असून त्याला असे सांधे असल्यास तें अत्यंत कुशाग्रबुद्धीचें द्योतक होय. पण जर हेंच आंगठ्याचें पेरें आंखूड असेल तर अंधश्रद्धा व वाहवलेल्या तर्कबुद्धीचें तें द्योतक होय. आणि मस्तकरेषा चंद्राच्या उंचवट्यावर आलेली असेल व बोटांचीं अग्रें बारीक असतील तर हे गुण खात्रीनेंच आढळतात. व गुरूचाच उंचवटा नुसता उंच असल्यास तें बढाईखोरपणाचें द्योतक होय.

हें उंचवटे चांगलेच फुगीर असल्यास ते नेहमीं उत्कृष्ट बुद्धीचें दर्शक असतें. परंतु हातावरील रेषा सूक्ष्म--( थिन् ) व रुक्ष--( ड्राय ) असून अंगठा आंखूड असला तर त्या माणसांत बहुधा हिमतीचा अभाव व क्षुद्र स्वभाव दिसून येतो; तथापि सारासार विचारशक्ति हा त्याचा उपजत गुण असलेला स्पष्टपणें दृष्टोत्पत्तीस येतो.

आतां जर दुसरा सांधा म्हणजे बोटाच्या तळाच्या पेऱ्याचा वरील सांधा-हा जर भरदार असला तर अशीं माणसें पहिल्याच्या उलट म्हणजे पहिलीं बौद्धिक आणि मानसिक कामांत तरबेज तर हीं माणसें व्यापारी हिशेबी, सट्टेवाले यांच्याप्रमाणें स्वार्थबुद्धीचीं असून टापटीपीचीं असतात.

आतां हे दोन्हीहि सांधे जर गांठाळ असतील तर अशीं माणसें सारासार विचारशक्तींची, व्यवस्थित, नियमित असून त्यांचे विचार समतोल व वागणूक प्रमाणशीर असते; चौकस बुद्धिचा उपयोग प्रत्येक गोष्टीची शहानिशा व शास्त्रीय विषयाचा व्यासंग यांची त्यांना आवड असते. ह्याला जर चंद्राच्या उंचवट्याची जोड मिळाली तर सारा-

सार विचाराला धरून व उदात्त असें काव्य ( कल्पनामय नव्हे ) व शास्त्रशुद्ध गाणें यांची त्यांना आवड असते.

साधीं बोटें—साधीं असलीं तर कलांची त्यांस आवड असते; पण त्याचीं कृत्यें काल्पनिक, लहरी, तर्क व मनोप्रेरणा यांच्या पायावर उभारलेलीं असतात व त्याला सारासार विचारशक्ति, ज्ञान यांचा मुळींच पाठिंबा नसतो. अशीं बोटें असणाऱ्या माणसांचा आरंभ मुद्देसूद असतो, पण शेवटीं मात्र वाहवतो. अशा बोटांचीं माणसें अंगीकृत कार्य मध्येंच अर्धवट स्थितींत सोडून देतात. कारण अगोदर नीट विचार न करतां उसळीसरशी त्यांनीं कामास सुरवात केलेली असते. अशीं बोटें असून जर आयुष्यरेषा व मस्तकरेषा ह्या शेवटाला जुळलेल्या नसतील तर असा माणूस प्रत्येक काम उतावीळपणानें व विचार केल्याशिवाय करितो व त्याला त्याच्या सामर्थ्याचा फाजील विश्वास असतो. एकंदरींत विचार करतां एवढें ध्यानांत ठेवावें कीं, गाठाळ पेऱ्यांचीं माणसें हिशेब, समंजसपणा व प्रत्येक गोष्टींचें ज्ञान करून घेऊन कामें करितात तर साफ पेऱ्यांचीं माणसें उपजत स्वभाव, लहर, नैसर्गिक प्रेरणेनें कामें करितात. शिक्षण, व्यवस्थितपणा यांच्या योगानें थोडा बहुत या ठेवणींत फरक होतो असें आढळलें आहे. याप्रमाणें दोघांचे भेद सारखेच आहेत. पण सारख्या पेरांचा आपलेकडील एक भेद पाश्चात्यापेक्षां जास्त आहे.

आतां बोटांच्या एकंदर ठेवणीचा विचार करूं. म्हणजे पंजाच्या एका बाजूच्या एकंदर ठेवणीचा भागशः विचार संपला असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

हातांची व पावलांची ठेवण सारखी असल्यामुळें आपल्याकडे त्या दोहोंचाहि बराच विचार केला असून हाताप्रमाणेंच ' तथा पातदले सर्व फलं वाच्यं पृथक् पृथक् " पायाचींहि चिन्हें व आकारमान पाहून फलें सांगावींत असें सांगितलें आहे. तेव्हां बोटांचा व तळ-

ळ्याच्या आकाराचा विचार करतांना पायाच्या व हाताच्या बोटां-संबंधीं व इतर ठेवणीसंबंधीं जे जे प्रकार आपल्या शास्त्रकारांनीं सांगितले असतील त्यांचा, ही तुलना करतांना विचार करावयास पाहिजे व त्याला अनुसरूनच पुढील विवेचन केलें आहे.

## बोटें पौर्वात्य पद्धति.

अंगुष्ठांगुलयो र्वा संख्या न्यूनाधिकाः स्फुटं यस्य ।
धनधान्यैः परिहीनः सोल्पायुर्भूतले भवति ॥

प्रथम पंजाला केव्हां केव्हां पांचापेक्षां कमी अधिक बोटें सांपडतात असें सांगितलें असून तें चिन्ह चांगलें नव्हे असें त्याचें फल दिलें आहे. नंतर

सततं भवंति वलिताः सौभाग्यवतां सुमेधसां सूक्ष्माः ।
पाण्यंगुलयः सरला दीर्घा दीर्घायुषां पुंसाम् ॥

हाताचीं बोटें सरळ व लांब असणें हें दीर्घायुष्य, बुद्धिमत्ता व भाग्याचें लक्षण आहे, असें मानिलें आहे.

स्थूला धनोज्झितानां शस्त्रान्वि बहिर्नताः पुंसाम् ।
ऱ्हस्वांगुलयश्चिपिटाश्चेटानां हन्त जायन्ते ॥
चिपिटाः स्फुटाश्च रुक्षाः पृष्ठे रोमान्विताः खरा वक्राः ।
अतिऱ्हस्वकृशा विरला विदधाति दारिद्र्यमंगुलयः ॥

लठ्ठ बोटें असणें निर्धनता, बाहेर झुकलेलीं असल्यास शस्त्र धारण करणारा योद्धा आणि आखुड व चपटीं बोटें दास्यत्वाचीं द्योतक होत. तसेंच रुक्ष, बोटांच्या पाठीवर केंस असलेलीं, खडबडीत, वांकडीं ( स्त्रियांच्या हातापायांचीं बोटें वांकडीं असल्यास तें वैधव्य व निपुत्रकतेचें द्योतक होय. ) फार बुटकीं, किडकिडीत व विरळ बोटें चांगलीं नव्हेत. ह्याप्रमाणें आपल्या आचार्यांनीं प्रथम बोटें पांचापेक्षां

कमीजास्त असतात व नंतर त्याचे सरळ, वांकडीं, लांब, आंखूड, फार बुटकीं, चपटीं, उंच, बाहेर झुकलेलीं, लठ्ठ किंवा भलीं जाड, व किरकोळ असे प्रकार केले आहेत. नंतर प्रत्येक बोटाच्या कमीजास्त प्रमाणांवर निरनिराळीं फळें दिलीं आहेत, पैकीं थोडीशीं एथें देतों.

### प्रत्येक बोटाचें वैशिष्ट्य ( दि इन्डिव्हिज्युअल फिंगर्स. )

अंगुष्ठाग्रं तु तर्जन्या द्वितीयं पर्व संस्पृशेत् ।
शिल्पे च लेखने शस्त्रविद्यायां वा बलाधिका ॥

अंगठ्याचें टोंक तर्जनीच्या दुसऱ्या पेऱ्यास स्पर्श करीत असेल तर तो शिल्प, लेखन व शस्त्रविद्या यांत आपलें नांव गाजवील. ( ह्या ठिकाणीं अंगठा बराच लांब पाहिजे. )

अनामिका तृतीये च समुत्तुंगा कनिष्ठिका ।
बंधुश्रैष्ठ्यं प्रकुरुते धनाधिक्यं च पौरुषम् ॥

करांगुली ही आनामिकेच्या दुसऱ्या पेरास उलटून जर तिसऱ्या पेऱ्यांत पोचेल इतकी लांब असेल तर तो सर्व भावंडामध्यें अग्रणी होऊन स्वपराक्रमावर उदयाला येतो.

छिद्रं मिथःकनिष्ठांगुलिमध्यप्रदेशिनीनां स्यात् ।
वृद्धत्वे तारुण्ये बाल्ये क्रमशो नरस्य सुखम् ॥

हाताचीं बोटें जुळलीं असतांना पुष्कळांच्या बोटांत फट रहाते व ते उधळेपणाचें दारिद्र्याचें लक्षण आहे असा समज आहे. पण त्याचा ह्या ठिकाणीं नीट उलगडा केला आहे, व तें वर्गीकरण असें आहे. करांगुली व तिसरें बोट (अनामिका) ह्यांच्यामध्यें छिद्र असलें तर म्हातारपणीं सुख असतें. अनामिका व मधलें बोट ह्यांच्यांत फट राहिल्यास तारुण्यांत, व मधलें बोट आणि तर्जनी ह्यांच्यांत फट पडत

असेल तें बालपणांतील सुखाचें द्योतक होय. अगदीं मिळालेलीं बोटें चांगलीं होत. ह्याच्यापुढें पायांच्या बोटांचें वर्णन दिलें आहे.

## पायांचीं बोटें.

आयतया मध्यमया कार्यविनाशो ऱ्हस्वया दुःखम् ।
धनया समया पुत्रोत्पत्तिः स्तोकं नृणामायुः ॥

पुरुषाच्या पायाचें मधलें बोट फार लांब असेल तर तो अपेशी असतो, आंखूड असल्यास दुःखी ( स्त्रीच्या पायाचें हें बोट आंखूड असल्यास ती पराक्रमी असते. पण चालतांना जर जमिनीला लागत नसलें तर तिचे अनेक विवाह होतात. ) व इतर शेजारच्या बोटांएवढें तें असेल तर मनुष्य अल्प संततीचा व अल्पायु असतो.

दीर्घा कनिष्ठिकापि स्याद्यस्य स्वर्णभाजनं स नरः ।
यदि सापि पुनर्लघ्वी परदारपरायणः सततम् ॥

करांगुली व अनामिका ह्या लांब असल्यास धनवान् व आंखूड असल्यास परदारपरायण असतो. ( स्त्रीचीं हीं बोटें जमिनीस लागत नसतील तर अनुक्रमानें तिचे दोन व तीन विवाह होतात ) व ही करांगुली लहान असून लठ्ठ असल्यास लहानपणीं मातृवियोग होतो. तसेंच आंगठ्याच्या शेजारचें बोट लांब असल्यास स्त्रीसुख चांगलें असतें व आंखूड असल्यास तें स्त्रीसुख नष्ट करतें व तंटे लावतें. स्त्रीच्या पायाचें आंगठ्याशेजारचें बोट आंगठ्यापेक्षां लांब असूं नये. तसें असल्यास ती स्त्री लहानपणापासून कुमार्गी असते.

## पाश्चात्य पद्धति.

आंखूड बोटें—( शॉर्ट फिंगर्स ) आंखूड बोटांचीं माणसें चलाख, धडाडीचीं आणि मनांत येतांच तत्क्षणीं कामास लागणारीं असतात. ते क्षुल्लक गोष्टीकडे लक्ष देत नाहींत व आयुष्याची आणि

बाह्य देखाव्याची ते मुळींच पर्वा करीत नाहींत. पण त्यांचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे हें कीं, त्यांच्या क्रिया ताबडतोब सुरू होतात. निकाल त्वरित असतो. कोणत्याहि समाजाचें स्वरूप त्यांना सहज अवगत होतें व थोडक्यांत आणि विस्तृत अशी त्यांची लेखन-पद्धति असते. पण हीं बोटें जाड असून आंखूड असल्यास तें निर्दयतेचें द्योतक होय. ह्यालाच जर आंखूड मस्तकरेषेची जोड मिळाली तर त्याला वागण्याची हातोटी नसते व तो निष्काळजी असतो; परंतु जर ही मस्तकरेषा लांब असून नखें आंखूड असतील तर अशा माणसांत विलक्षण विषयग्राहता असून तो उत्तम राजकार्यकुशल ( ॲडमिनिस्ट्रेटर ) असतो.

लांब बोटें—( लांग फिंगर्स ) लांब बोटांचीं माणसें प्रत्येक वस्तूचें अगदीं बारीक सारीक निरीक्षण करणारीं, पोशाखाची व चालीरीतींची काळजी बाळगणारी व गबाळीं आणि चालीरीती न पाळणाऱ्यांचा सतत द्वेष करणारीं अशीं असतात. हे लोक प्रतिष्ठित आणि सन्माननीय असून क्षणांत रागावणारे व त्यांच्या स्वभावाला आवडणाऱ्या क्षुल्लक गोष्टी जरी आपण लक्ष देऊन सांभाळल्या तरी सुद्धां खूष न होणारे असे असतात. अशा हाताचे लोक विश्वास ठेवण्यास अयोग्य, दुटप्पी भाषा बोलणारे व ढोंगी असतात व स्वतःला आणि दुसऱ्याला त्रासदायक असतात. अशीं माणसें शिकतांना निरर्थक निरीक्षण व प्रत्येक गोष्टीचें प्रत्यक्षप्रमाणानें ज्ञान संपादन करून घेण्याचा आव घालणारीं व शेवटीं सर्वांचाच गोंधळ करून टाकणारीं असतात. हे भितरे, मायावी आणि प्रेमी असतात; परंतु मंगळाचा उंचवटा ( आ. नं. ९ पहा. ) उंच व मस्तक रेषा चांगली असल्यास ह्यांत फरक पडतो.

लठ्ठ बोटें:—( थिक फिंगर्स )—–अशा बोटांचीं माणसें चैनी व

ख्यालीखुशालीत मग्न असतात; परंतु हात कठीण असल्याशिवाय ते सुख मिळविण्याच्या नादीं लागत नाहींत.

वेडीवांकडीं बोटें ( ट्विस्टेड फिंगर्स ) जर हीं बोटें अशीं वेडीवांकडीं असून नखें आंखूड आणि हातांवर तांनिच रेषा असल्या तर तें निःसंशय निर्दयता, जुलूम आणि खुनी स्वभावाचें द्योतक होय. चांगल्या हाताचीं अशीं बोटें आढळल्यास तें त्रासदायक स्वभावाचें व थट्टेखोरपणाचें द्योतक होय.

बहिर्नत--( फिंगर्स टर्निंग बॅक ) बोटें लवचीक व सुळसुळींत असल्यामुळें मागच्या बाजूस वांकूं शकतात अशीं माणसें शहाणीं, हुशार असतात; परंतु साधारणपणें उधळीं, तऱ्हेवाईक व चौकस असतात.

संलग्न व विरल बोटें ( फिंगर्स फिटिंग इन्टू वन अनदर ऑर नॉट ) ज्यांचीं बोटें अगदीं एकमेकांस चिकटलेलीं असतात अशीं माणसें कृपण असतात व विरल बोटांचीं म्हणजे ज्यांच्या बोटांतून तीं जुळलीं असतांना फटीतून प्रकाश दिसतो, अशीं माणसें चौकस असतात.

पारदर्शक ( ट्रॅन्सपरन्ट ) अशीं बोटें असलीं तर तें अविवेक व वाचालतेचें लक्षण आहे.

फुगीर अग्राचीं बोटें (बॉल ॲट दि फिंगरटिप्स) ज्यांच्या बोटांचीं अग्रें उचललेलीं, उंच, फुगीर असतात अशीं माणसें उपजतच मनाला अत्यंत लावून घेणारीं ( सेन्सेटिव्ह् ), सहृदय, जाणीव असलेलीं व व्यवहारकुशल अशीं असतात.

## प्रत्येक बोटाचें वैशिष्ट्य.

प्रत्येक बोटाचें विशिष्टत्व सांगण्याचें कारण मिश्र हातांच्या निरानिराळ्या स्थितींत ह्या बोटांचें फार मिश्रण झालेलें असतें व

ध्यानांत आल्याखेरीज त्यांचा नीट बोध होणार नाहीं, म्हणून हें देणें जरूर आहे.

तर्जनी—( इन्डेक्स फिंगर ) हें बोट लांब असेल तर तें गर्व व स्थिरबुद्धीचें द्योतक आहे. आंखूड असल्यास चापल्य व मधल्या बोटाप्रमाणें फार लांब असल्यास चैनी, विषयी व अहंमन्य असतो. हेंच बोट लांब व टोंकदार असल्यास धर्मवेडा असतो व हें मधल्या बोटापेक्षां लांब असल्यास धार्मिक व महत्त्वाकांक्षी असतो. ह्या बो-टाचें पहिलें पेरें लांब असल्यास धर्मप्रवृत्ति, दुसरें लांब असल्यास महत्वाकांक्षा, तिसरें असल्यास गर्विष्ठ असतो. जर हें बोट चौकोनी असेल तर सत्यान्वेषी असतो, हेंच बोट अर्धवर्तुल असेल तर फार चुक्या करणारा असतो व बोट साफ नितळ असल्यावर तर मग ह्या चुक्यांना कांहीं गणतीच नसते.

मधलें बोट—( सेकंड फिंगर ) जर हें मधलें बोट भरदार व रुंद असलें तर तो कोत्या कल्पनांचा, दैववादी व दुःखी असा असतो. तेंच जर पीळ घातल्यासारखें असेल तर तें खुनशी अथवा खुनी वृत्तीचें द्योतक आहे. हें बोट क्वचित् अणकुचीदार असतें; पण तसें तें असल्यास मनुष्य फार छचोर व बहिरट असतो. याला लहान अंगठ्याची जोड मिळाल्यास हीं चिन्हें हटकून सांपडतात. तें चौकोनी असल्यास गंभीर असतो. हें बोट बहुतेक अर्धवर्तुळ असतें. हें कल्पनाशक्ति देतें. कला, शास्त्र आणि वाङ्मय यांचा त्याला शोक असतो. याचें पहिलें पेरें लांब असल्यास अंधश्रद्धा व दुःख, फार लांब असल्यास मृत्यु यावा अशी फार इच्छा असणारा व लहान अंगठ्याची जोड अलल्यास आत्महत्त्या करून घेण्याचा त्यास अनिवार मोह असतो. दुसरें पेरें लांब असल्यास शेतीची व यांत्रिक कलांची आवड असते. ह्यालाच गांठाळ सांध्याची जोड मिळाल्यास त्याला गणिताची व इतर शास्त्रांची आवड फार असते.

सांधे साफ असल्यास गूढशास्त्रांत त्याची गति असते आणि शेवटचें पेरें असल्यास तें चिक्कुपणाचें द्योतक आहे.

अनामिका—( दि थर्ड फिंगर ) हें तिसरें बोट जर तर्जनी-इतकें लांब असेल, तर त्याला कलांची आवड असून कलांच्या योगानें द्रव्य व कीर्ति मिळविण्याची इच्छा व महत्त्वाकांक्षा असते. मधल्या बोटांइतकें लांब असल्यास तो जुगारी व आडमुठा असतो; पण त्याला मंगळाच्या उंचवट्याची जोड पाहिजे. दुसरीं चिन्हें चांगलीं असल्यास ही खूण साहस, धडाडी यांचें द्योतक होय. विशेषतः टोकें निमगोल असलीं तर हीं फलें जास्त अनुभवाला येतात. मधल्या बोटापेक्षां लांब असल्यास सर्व संकटांना बाजूला सारून कलेमध्यें त्याला प्राविण्य मिळून त्याची कीर्ति होते ह्या बोटाचें टोंक अणकुचीदार असलें तर त्याला उपजत कलाभिज्ञता असते; • परंतु इतर बोटांची ठेवण वेगळी असल्यास तें छचोर व हलक्या वृत्तीचें द्योतक होय. जर हें अग्र चौकोनी असेल तर निश्चयबुद्धि व कलासंशोधनवृत्ति असते व ह्याचें तिसरें पेरें लांब असल्यास द्रव्याची आवड असते. हें बोट निमगोल असल्यास कला, लढाई, भांडणें इतर चळवळी व प्रयत्न करण्याची हौस व त्यांचें चित्र लोकांपुढें मांडण्याची आवड असते. असे लोक बहुधा नट, वक्ते वगैरे असतात. जर हें बोट आकार-रहित असेल तर व्यापारदृष्टि असते व बोट आंखूड असल्यास कलेची आवड असते पण गति नसते. त्याचें पहिलें पेरें लांब अस-ल्यास कलारुचि, मधलें लांब असल्यास व्यापार, व शेवटचें लांब असल्यास द्रव्येषणा व पोकळगर्व हे गुणावगुण असतात.

करांगुली—( दि फोर्थ फिंगर ) जर हें बोट मधल्या बोटाच्या तिसऱ्या पेराला पोंचेल इतकें लांब असलें तर ज्ञानलालसा व शिक्ष-णाची आवड असते. इतकेंच नव्हे तर त्यांत प्राविण्य संपादन कर-

ण्याची इच्छा असते. असलीं माणसें शास्त्राचें रहस्य सहजीं हुडकून काढतात आणि वाग्बलानें व विषय प्रतिपादन करण्याच्या नैसर्गिक हातोटीमुळें ते कोणताहि विषय सहज प्रतिपादन करूं शकतात. हें बोट अनामिकेइतकें लांब असेल तर तो वेदांती असतो; पण इतर चिन्हें वाईट असल्यास मनुष्य ढोंगी असतो. अगदीं क्वचित् प्रसंगीं ज्यावेळीं ही करांगुली मधल्या बोटाइतकी लांब असते, त्या वेळीं ती सर्व अडचणी एका बाजूला सारून आपलें कार्य तडीला नेणारा असतो. उलटपक्षीं हें बोट फार आंखूड असल्यास ग्राहकशक्ति चांगली असते. जर ह्याचें शेवट अणकुचीदार असेल तर गूढविद्यांची आवड असूनहि लुच्चा असतो. असलीं माणसें स्वागतपर भाषणें करण्यास योग्य असतात. करांगुलीचें अग्र निमगोल असल्यास तें यंत्रज्ञतेचें द्योतक आहे; पण इतर चिन्हें वाईट असल्यास तें चोरीचें दर्शक होय. पहिलें पेरें लांब असल्यास शास्त्रांची आवड, दुसरें लांब असल्यास व्यापारी दृष्टि व शेवटचें असल्यास तें धूर्तत्व, हुशारी आणि लबाडीचें द्योतक होय. आतांपर्यंत पौर्वात्य व पाश्चिमात्य यांनीं केलेल्या अग्रांच्या ( टिफ्स ), पर्वांचा ( फॅलांजेस ), व सांधे ( जाइन्टस ) तसेंच, बोटांची सर्वसाधारण व वैयक्तिक ( फिंगर्स इन जनरल ॲन्ड इन्डिव्हिज्युअल्स ) ठेवण यांचा तुलनात्मक विचार झाला. शेवटच्या दोन विभागांखेरीज बाकीच्यांतील वैगुण्य व आधिक्य त्या त्या ठिकाणीं दाखविलेंच आहे. शेवटच्या विभागांत मात्र पाश्चात्त्यांचे पारदर्शक ( ट्रॅन्सपरंट ) व ( ऑल ॲट दि फिंगरटिप्स ) म्हणजे अग्राला चेंडूसारखी उंच असलेल्या ठेवणींचा हे दोन भेद जास्त आहेत. तसेंच प्रत्येक बोटाचें त्यांनीं व्यवस्थित व विस्तृत वर्णन केलेलें आहे. बोटाच्या ह्या वैयक्तिक निरीक्षणांत दोघांचेहि अगदीं निरनिराळे अनुभव असून आपल्या शास्त्रज्ञांनीं हाताबरोबर पायांच्या बोटांचेंहि बरेंच निरीक्षण केलें आहे तसें पाश्चात्त्यांनीं केलेलें नाहीं

असा फरक आहे. ह्याप्रमाणें आतांपर्यंत विचार झाला. आतां आपण अंगठा व हाताची पाठ यांचा विचार करूं.

## आंगठा ( दि थंब )

"In default of other proofs, the thumb would convince me of the existence of God."

Isaae Newton.

इतर पुराव्याच्या अभावी परमेश्वरी अस्तित्वाची साक्ष पटविण्यास हा चिमुकलासा अंगठाच बस्स आहे.

ऍझाक न्यूटन.

याच्या मतानें हातामध्यें हें बोट फार महत्त्वाचें आहे. हें एक दोघांनाहि मान्य आहे असें म्हणण्यापेक्षां तें सर्व जगाला मान्य आहे असें म्हटलें असतां त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. शरीरदृष्ट्या जर पाहिलें तर ह्या बोटाच्या अभावी बाकीचीं सर्व बोटें जवळ जवळ निरुपयोगी होत आणि म्हणूनच आपल्या इकडे याला अंगुष्ठ "अंगे पाणौ प्राधान्येन तिष्ठति स अंगुष्ठः" असें जें म्हटलें आहे तें किती यथार्थ आहे, हें भारतामधील एकलव्य व्याधाची सर्वविश्रुत गोष्ट वाचली म्हणजे ( ह्या अंगठ्यांत काय सामर्थ्य आहे हें ) ध्यानांत येतें. ज्या बहाद्दरानें गुरूच्या अभावीं गुरूची प्रतिमा करून तिच्याजवळ धनुर्विद्या शिकून अत्यंत परिश्रमानें प्रत्यक्ष द्रोणाचार्यांजवळ शिकलेल्या सव्यसाची पार्थालाहि मागें सारण्याइतकें प्रावीण्य संपादन केलें, त्याचा गुरुदक्षिणेसाठीं अंगठा जातांच सर्व कौशल्य, श्रम व सामर्थ्य हीं वाया गेलीं. कारण आंगठ्यामुळें त्याच्या हाताचें खरें सामर्थ्य नष्ट झालें. रोमन लोकांतहि " पोलीस ट्रूंकॅटस " अंगठा कापलेला माणूस म्हणजे भेकड ह्या अर्थीं योजीत. कांहीं

पुसिलॅनिमस जातीचे गुलाम त्यांना लढाईला पाठवूं नये म्हणून ते आपल्या हाताचा अंगठा कापून घेत आणि ह्याच कारणामुळें फ्रेंच व इंग्लिश ह्या भाषांमध्यें पालटून म्हणजे नामर्द असे शब्द रूढ झाले आहेत. मनुष्याला उत्पन्न झालेली इच्छा कृतीनें तडीस नेण्याचें खरें सामर्थ्य हातांच्या ह्या मुख्य बोटांत आहे असें आढळलें व म्हणून पाश्चात्यांनीं ह्या बोटाला इच्छाशक्तीचें— वुइल व इन्टलेक्ट बुद्धिमत्तेचें बोट असें अन्वर्थक नांव दिलेलें आहे. नुकतेंच जन्मलेलें अर्भक तें आपल्या इच्छाशक्तीचा उपयोग करूं लागेपर्यंत त्याच्या मुठीच्या आंत अंगठा व वर बोटें असतात. अपस्मारी रोगी त्यांच्या फिट्समध्यें व मृत्युवश लोक हे त्यांच्या मृत्यूचे वेळीं आपले आंगठे बहुधा मुठीचे आंत झांकून घेतात. त्याचप्रमाणें तर्कज्ञ माणूस ज्या वेळीं एखाद्या गोष्टीबद्दल विचार अथवा निश्चय करावयास लागतो, अशा वेळीं बहुधा तो इतर बोटें व त्यांवर अंगठा अशी त्याच्या हाताची ठेवण असलेली आढळते. अंगठा हा मानवी अंतःकरणाला विचारशक्ति जागृत आहे कीं नाहीं, हें दाखविण्याचा परमेश्वरी सिग्नलच होय. कारण मनुष्य विचार करूं लागला कीं, वरीलप्रमाणें जशी त्याच्या बोटांची स्थिती असते. त्याच्या उलटच तो रागावला असतां त्याची शक्ति नष्ट होते व तो दुसऱ्याला मारण्याकरितां मुठी वळूं लागतो, तेव्हां बहुधा बोटांच्या आंत अंगठा घेऊन ठोसा लगावण्याची त्याची तयारी झालेली आपल्या दृष्टीस पडते. म्हणजे विचारशक्ति नष्ट झाली कीं, अंगठा बोटांचे आंत व ती जागृत झाली कीं, बाहेर सांपडावयाचा हें वरील उदाहरणांवरून निरनिराळ्या दृष्टीनें सिद्ध होतें. अर्भकावस्थेंत त्याच्या विचारांचें कपाट खुलें होईपर्यंत, तसेंच मृत्यूच्या व फिट्सच्या स्थितींत व रागाचे भरांत मनुष्याची विचारशक्ति नष्ट झालेली असते व ती नाहींशी झाली किंवा होत चालली कीं, लागलीच हा सिग्नल आपलें सुचना देण्याचें व ती देऊन इतरांना

जागृत करण्याचें काम करीत असतो. ह्याप्रमाणें हा अंगठा इच्छाशक्तीचा-(वुइलचा) व निग्रहशक्तीचा-(कंट्रोलचा) द्योतक होय व ही शक्ति मानवी अंतःकरणांत वास करीत आहे किंवा ह्या शक्तीचा शरीरावर व मनावर जोंपर्यंत ताबा आहे तोंपर्यंत हें बोट कहींहि इतर बोटांच्या आंत झांकलेलें सांपडावयाचें नाहीं व ह्याच्या ह्याच सामर्थ्यामुळें आपल्यांत "त्यानें सरतेशेवटीं अंगठा दाखविला" म्हणजे तो फसला नाहीं, उलट त्यानेंच मात केली असें म्हणण्याचा प्रचार पडला आहे. तसेंच पाश्चात्यांची "अंडर वन्सथंब" ही म्हणहि त्याचें द्योतक होय. परमेश्वरानें निर्माण केलेल्या अत्यंत श्रेष्ठ अशा या मानवी देहाची, त्याच्या मनाची व इच्छाशक्तीची कामगिरी सिद्धीस नेण्याचें काम त्यानेंच हाताकडे सोंपविलें असून त्याचें नियंत्रणाचें खरें सूत्र आंगठा ह्या एवढ्याशा चिमकुल्या अवयवांत कसें खुबीनें ठेविलें आहे ह्याची ओळख पटतांच सुप्रसिद्ध व जगन्मान्य शास्त्रज्ञ सर एझाक न्यूटन याचे तोंडून वरीलप्रमाणें उद्गार निघाले. असो. पौर्वात्य पद्धतीप्रमाणें हा अंगठा लांब, सरळ, मांसल व उजव्या बाजूला झुकलेला, समान पेऱ्याचा व मृदु असा असला तर तें शुभ लक्षण समजावें व लहान, वांकडा, चपटा, रूक्ष, कठीण व खडबडीत असल्यास वाईट समजावा असें सांगितलें आहे. पाश्चात्यांनीं जरा विस्तृत विवेचन केलें आहे. ह्या अंगठ्याचे तळाचें पेरें लॉजीक-तर्कशक्तीचें म्हणजे सारासार विचार, विवेक व विषयग्रहणशक्ति दाखवितें व पहिलें म्हणजे नखाचें पेरें इच्छाशक्ति, शोध, कोणत्याहि गोष्टीचा झटपट निकाल व आरंभ यांचें सूचक आहे. हें पेरें जर आंखूड व अरुंद असेल तर दुसऱ्याचे ओंजळीनें पाणी पिणारा संशयी, अस्थिर, बेपर्वा उत्साही व उल्लू असतो. अंगठा मोठा असल्यास तो स्वातंत्र्य, अधिकार व अरेरावी गाजविण्याची हौस असणारा असा असतो. ज्यांचीं इतर बोटें साफ असून अंगठा लहान असतो

अशा माणसाची उपजतच काव्य आणि कला यांत गति असते, मग ती तो विचारानें वाढवो कीं न वाढवो.

## हाताची पाठ

पौर्वात्य पद्धति—आपल्या पद्धतीप्रमाणें हाताची पाठ ही तळव्याप्रमाणें मांसल, उंच, प्रशस्त 'विस्तीर्ण करपृष्ठं' अशी असावी; रूक्ष खडबडीत असू नये असें तर सांगितलेंच आहे; पण त्याच्यापेक्षां त्या ठिकाणीं आणखी दोन गोष्टी अधिक सांगितल्या आहेत. त्या ह्या कीं, चिरम्या असलेली, सुरकुतलेली व बोटांवर आणि 'रोमसंचितं करपृष्ठं' दाट पाठीवर केस असलेली अशी हाताची पाठ चांगली नाहीं त्याचें फल दारिद्र्य असें सांगितलें आहे. ह्याच्या उलट असल्यास तें भाग्याचें द्योतक होय.

पाश्चात्यपद्धति—हाताच्या मागील बाजूवर फार केंस असल्यास तें चांचल्यतेचें द्योतक होय. त्याच्याच उलट बिलकूल केंस नसून पाठ नितळ असल्यास मूर्ख तर्कटी असतो. तुरळक केंस असल्यास ते दूरदर्शित्वाची, चैनीची व सुखोपभोगाची आवड दर्शवितात व स्त्रीच्या हातावर फार केंस असल्यास तें निर्दयतेचें द्योतक होय. अंगठ्यावर असल्यास बुद्धिमत्ता, इतर बोटांच्या तिसऱ्या तळाच्याच पेऱ्यावर असल्यास तें कठोर अंतःकरणाचे व सर्व पेरांवर असल्यास तें गडबड्या व तमोगुणी वृत्तीचें द्योतक असतात. अजिबातच केंस नसणें हें नामर्दपणाचें व भितरेपणाचें द्योतक होय. ह्याप्रमाणें आतांपर्यंत पंजाच्या सर्व उपांगांचा आपण विचार केला. आतां आपण पंजांच्या एकंदर ठेवणीचा विचार करूं.

## पंजाची एकंदर ठेवण.

आतां आपलेजवळ पंजाच्या एकंदर ठेवणीचा विचार करण्यास लागणारीं उपकरणें अथवा साधनसामुग्री भरपूर गोळा झाली आहे.

आपल्याकडील व तिकडील पंजाच्या ह्या उपविभागांचा आपण जो तुलनात्मक विचार केला त्यावरून त्यांतील कांहीं भेद सोडून दिल्यास (उदाहरणार्थ हाताचा रंग, याचा ठेवणीशीं कांहीं संबंध नाहीं, असे भेद वगळल्यास) त्या ठेवणीचा सामान्य विचार करण्यास लागणाऱ्या मुख्य विभागांत भेद नसून फारच साम्य आहे असें आपणांस आढळलें. व त्यावरून उत्पन्न होणारे दोहोंकडील भेदहि सारखेच असणार असें ओघानेंच येतें; परंतु पंजाच्या ठेवणीचा आपल्या शास्त्रकारांनीं फार त्रोटक विचार केला आहे. उदाहरणार्थ " कपिकर सदृशौ " म्हणजे चिंचोळा, मिसमिशीत, अणीदार अग्रांच्या बोटांचा असा हात होय. म्हणजे पाश्चिमात्यांच्या सायकिक सारखा. दुसरा "व्याघ्रोपम" म्हणजे हाताचा तळवा रुंद, मऊ, थोडासा वाटोळा व बोटें जाड, वक्र, गांठाळ असा म्हणजे पाश्चात्यांच्या फिलॉसफीकसारखा; तिसरा "शूर्पाकार" म्हणजे सुपासारखा फताडा व राठ म्हणजे पाश्चात्यांच्या एलेमेंटरीसारखा. तसेंच अण्वाकार ( कोनिक ) विषम ( मिक्सड ) पत्राकार, व मंडलाकार वगैरे भेद सांपडतात; पण त्यांच्या आकृति दिलेल्या नसून त्यांचीं फलेंहि फारच त्रोटक दिलेलीं आहेत. तेव्हां वर्णनावरून व फलावरून त्यांच्या आकृति तयार केल्या तरी त्या पाश्चात्यांनीं निरीक्षण करून दिलेल्या आकृतींसारख्याच होणार व एवढा खटाटोप करूनहि दोहोंचें सार एकच निघत असल्याकारणानें पाश्चात्यांनीं श्रमपूर्वक दिलेल्या आकृतींचा व त्यांच्या फलांचा आपण विचार करूं. म्हणजे त्यांत दोहोंकडील शास्त्रज्ञांच्या निरीक्षणाचा निष्कर्ष निघेल, व आपलें कामहि थोडक्यांत व सोपें होईल. ही पंजाची ठेवण चेहऱ्याप्रमाणेंच निरनिराळ्या समूहांत निरनिराळ्या तऱ्हेची असते. पण जसें निग्रो, चिनी, जपानी, रशियन, इटालिअन, जर्मन, इंडिअन, अमेरिकन, इंग्लिश, फ्रेंच, मद्रासी, बंगाली, पंजाबी, गुजराथी, महाराष्ट्रीयन वगैरे लोक त्यांच्या रंगा-

रूपावरून ओळखतो, परंतु असें जरी असलें तरी त्यांचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां जसें चिनी जपानी, तिबेरीअन वगैरे एका वर्गात; इंडिअन, युरोपिअन एका वर्गात आणि नीग्रो एका वर्गात असें जसें त्यांचें ढोबळ वर्गीकरण होतें, म्हणजे प्रत्येक समूहाची एका विशिष्ट प्रकारची सार्वत्रिक भिन्न ठेवण असूनहि ह्या अनेक भेदांचा पुन्हां जसें कांहीं थोड्याशा विशिष्ट टाइप्समध्यें समावेश होतो, त्यांचा त्याचप्रमाणें गुणवैशिष्ठ्याला अनुसरून थोडक्याशा फरकानें त्यांच्या पंजाच्या ठेवणीहि भिन्न असतात व वरीलप्रमाणें बोटांच्या व तळव्याच्या मिश्रणानें चेहऱ्याप्रमाणें ह्या हातांच्या ठेवणींतहि अनेक भेद उद्भवतात. तथापि असें जरी असलें तरी त्यांचे बारकाईनें नीट निरीक्षण वर्गीकरण केल्यास त्यांचाही पुढील सात प्रकारच्या आकारामध्यें समावेश होतो असें निदर्शनास आलें आहे, व ते पुढीलप्रमाणें आहेत.

१ दि एलेमेंटरी ऑर, नेसेसरी हँड—साधा अथवा मामुली.

२ दि स्पॅच्युलेट ऑर, आक्टिव्ह हॅन्ड—प्रहत म्हणजे अर्धवर्तुलाकार अग्रांचा अथवा उद्यमशील.

३ दि कोनिकल ऑर आर्टिस्टिक हॅन्ड—निमुळता अथवा कुशल,

४ दि स्क्वेअर ऑर युसफुल हॅन्ड—चौकोनि अथवा उपयुक्त (व्यवहारोपयोगी).

५ दि नॉटी ऑर फिलॉसफिक हॅन्ड—तात्त्विक अथवा स्फीत.

६ दि पॉइन्टेड ऑर सायकीक हॅन्ड—अणीदार अथवा आध्यात्मप्रधान.

७ दि मिक्स हॅन्ड— मिश्रहात.

ह्या ठिकाणीं आपल्या सामुद्रिकांतील खरोखर "कपिकर" सारखे वर दिलेले प्रतिशब्द येथें यावयास पाहिजेत; पण त्यांवरून वाचकांना नीट बोध होणार नाहीं, व घोटाळा होईल म्हणून प्रत्येक

(टाइपचा) आकाराचा त्याच्या स्वभावाच्या नांवावरूनच बोध होऊन त्याची पूर्ण कल्पना प्रतिबिंबित होईल. अशा प्रतिशब्दांची येथें मुद्दाम योजना केली आहे. मिश्र हाताला विशिष्ट आकार नसून तें सर्वांचें मिश्रणच आहे व ह्यांत कशाचाही अंतर्भाव होईल; पण तो देण्याचें कारण इतकेंच कीं, सहाच टाइप्स (प्रकार) आहेत असें येथें जर सांगितलें व ह्या आकृतिविरहित निरनिराळ्या आकारांच्या मिश्रणाचे हात ह्या विषयांच्या विद्यार्थ्यांच्या पाहण्यांत आले, तर ह्याचें फळ काय दिलें आहे तें पुस्तकांत पहावयास जातील व त्यांना हा प्रकार आढळला नाहीं कीं त्यांचा गोंधळ होईल. तेव्हां तसें न होतां ह्या मिश्र हाताची कल्पना त्यांच्या डोक्यांत रहावी व हाताच्या निरनिराळ्या विभागांचा नीट अभ्यास करून त्यांच्या स्वरूपावरून योग्य निष्कर्ष काढून अशा हाताच्या माणसाचा स्वभाव व भाग्य वर्णन करण्याची कल्पना बुजूं नये, त्यांचें निरीक्षण रहावें व सूक्ष्म दृष्टी यावी येवढाच हा भेद ह्या ठिकाणीं देण्याचा उद्देश आहे; तरी ह्या सहा टाईप्सबरोबरच मागील विभागांचें वैयक्तिक वर्णनहि काळजीपूर्वक वाचल्यास व त्याचा अभ्यास ठेवल्यास त्या विषयाच्या पुढील भागांत प्रवेश होण्यास त्यांना बिलकूल त्रास पडणार नाहीं.

# प्रकरण ५ वें, ६ वें.

## साधा अथवा मामुली ( एलेमेंटरी ऑर नेसेसरी ) हँड.

ह्याला हें नांव देण्याचें कारण हा आकार अगदीं खालच्या दर्जाच्या बुद्धिमत्तेच्या लोकांत आढळतो असा कीं, ज्यांची बुद्धि केवळ आयुष्यांतील तात्पुरत्या गरजा भागविण्याइतकीच असते. ह्याचा

बाह्य आकार पुढीलप्रमाणें असतो. बोटें आंखूड व जाड असून ताठर असतात. आंगठा आखूड आणि बहुधा मागच्या बाजूस झुकलेला असतो व तळवा फार रुंद, जाड व कठीण असतो. साधारणपणें बोटांपेक्षां तळवा लांब असतो. ह्या हातावर द्रव्यरेषा बहुधा बिलकूलच नसते.

**स्वभावधर्म**—मंदबुद्धीचा असतो आणि पदार्थांच्या दृश्य आकाराखेरीज त्याचे गुणधर्म व इतर गोष्टी समजून घेण्याची त्यांच्यांत बिलकूल पात्रता नसते. हे परंपरागत चालत आलेल्या चालीरीतींना आणि रूढीला चिकटून राहणारे असतात. मंदबुद्धीमुळें व तर्कशक्तीची त्यांच्याशी फारकत असल्यामुळें त्यांच्या नेहमींच्या अंगवळणीं पडलेल्या धंद्याखेरीज इतर कामाला ते निरुपयोगी असून अजगरवृत्तीचे जड व मूढ असे असतात. त्यांना कल्पना व सारासार विचार करण्याची शक्ति नसते. असले लोक केवळ जगण्यासाठीं म्हणूनच शारीरिक किंवा बौद्धिक जे काय श्रम करावे लागतील तेवढेंच करणारे असतात. युद्धामध्यें सन्मान किंवा वैभव याकरितां ते कधींहि लढावयाचे नाहींत तर आत्मसंरक्षणासाठीं नाइलाज म्हणूनच लढणारे असे असतात व तेंहि कौशल्यानें न लढतां हल्ल्याच्या झुंझीसारखे किंवा बकऱ्याच्या मुसंडीसारखे लढतात. त्यांची वागणूक ' पीच्छेसे आये तो आगे चली ' याप्रमाणें वहिवाटीला अनुसरून असावयाची; पण आज्ञाधारकता, सारासारविचार कर्तव्यजागृति याला अनुसरून म्हणून वागतांना ते कधींहि आढळावयाचे नाहींत. कारण या गोष्टींचा त्यांच्या ठिकाणीं धडधडींत अभाव असतो. असल्या लोकांना आपण कसें सुधारावें याची उपजतच बुद्धि नसल्याकारणानें शिक्षण म्हणजे कांहीं तरी मूर्खपणा आहे असें ते समजतात; तसें नच समजलें तर शिकणें म्हणजे कांहीं तरी अपराध किंवा पाप करणें आहे अशी त्यांची समजूत असते ( नाशीक

आणि नगर या जिल्ह्यांतील ज्या भागाला तिकडे डांगण व महाल-देश असें म्हणतात व ज्यांत कोळी लोकांची वस्ती आहे त्यांतील शेतकऱ्यांचे निरनिराळ्या प्रकारचें बरेच हात पाहिले व ते याच नमुन्याचे असून त्यांची रहाणी व स्वभावधर्म वरीलप्रमाणें आढळेल. ) ह्या प्रकारचा उत्तम नमुना म्हटला म्हणजे लापलांडर्स होत. जे रहा-तात म्हणण्यापेक्षां पृथ्वीचे पाठीवर त्याचें अस्तित्व आढळतें असें म्हटलें असतां जास्त शोभेल, कारण आयुष्याची इतिकर्तव्यता म्हणजे काय हें उच्च ध्येय त्यांच्या स्वप्नांतसुद्धां कधीं येत नाहीं, म्हणजे त्यांना ते अगदीं पारखे असतात. इतका शुद्ध टाइप दुसऱ्या जातींत फारच क्वचित् आढळतो; पण त्याच्या खालोखाल खालच्या दर्जाचे तार्तार, स्लाव्ह व आपल्याकडील कातकरी, वडारी, भिल्ल वगैरे लोकांत हा बराच आढळतो. इतरत्र जड आणि अल्पबुद्ध लोकांच्या हातांची ठेवण थोड्याशा मिश्र स्थितींत आढळते. अशा ठेवणीच्या लोकांना फक्त गाण्याची आवड असते. ते मनाचे दुबळे आणि कौटुंबिक सुखदु:खांत नेहमीं बुडलेले असतात. जशी ह्या हाताची ठेवण असून ह्या बाह्य आकाराबरोबरच त्यांची मनोरचना, रहाणी वगैरे कशी असते हें सांगितलें आहे, त्यावरून ह्या हाताचे लोक ओळखण्यास कोणतीहि अडचण वाटणार नाहीं. आतां आपण नंबर ७ च्या हाताच्या ठेवणीचा विचार करूं. ही ठेवण दि स्पॅच्युलेट ऑर ॲक्टिव्ह हँड अर्धवर्तुलाकार अग्राचा अथवा उद्योगी हात.

## दि स्पॅच्युलेट ऑर ॲक्टिव्ह हँड अर्थात् उद्योगी हात.

**ठेवण:**—ह्या हातांच्या बोटांचीं अग्रें अथवा शेवटचीं पेरीं " स्पॅ-च्युला " म्हणजे इंग्रजी औषधविक्रीच्या दुकानांत बाटलींतून औषधें काढण्यास तीं मिश्र करतांना जी एक पातळ व लवचीक सुरी उप-योगांत आणतात, तिच्या आकारासारखी जवळ जवळ असतात

आणि हाताचा अंगठा बराच मोठा असतो, हें त्या टाइपच्या बाह्य आकृतीचें मुख्य लक्षण आहे.

**गुणधर्म**:—ह्या हाताचा प्रमुख धर्म म्हणजे उद्योग, चळवळ उत्साह हे होत आणि जितका जितका हा कठीण व चिवट असेल तितके तितके तो हे धर्म त्याचे ठिकाणीं विशेष रितीनें असलेले आढळतात. अशा ठेवणीचा माणूस निश्चयी, आत्मविश्वासी आणि जरूरीपेक्षां जास्त संग्रह करण्याची इच्छा असणारा असा असतो आणि ह्याच ठिकाणीं पहिल्या प्रकारच्या " सर्वसाधारण " एलेमेंटरी हातांत व ह्यांत फरक असलेला दिसतो. उद्यमशील ( ॲक्टिव्ह हॅन्ड ) हाताचा माणूस गरजेपेक्षां जास्तीची हांव असलेला तर पहिल्यास गरज भागली कीं पुरे. ह्या ठेवणीच्या माणसाला नाजूकपणापेक्षां उद्योग करणें बरें वाटतें. ह्याचें प्रेम वरकांती नसतें. जर ह्या ठेवणीच्या माणसाचा अंगठा लहान असेल तर तो नानातऱ्हेचे उद्योग करण्याचा प्रयत्न करील; परंतु त्याच्या अनिश्चित स्वभावामुळें त्याचे बेत तडीस नेण्यास असमर्थ होतो व त्यामुळें त्याचे सगळे बेत फसतात. तो पुष्कळ समुद्रपर्यटणें करील पण तीं सर्व निरर्थक व निर्हेतुक असतात. तो उद्योगी असतो, पण रिकामा × × आणि भिंतीला तुंबड्या लावी, ह्याप्रमाणें त्याचे उद्योग असतात; परंतु हा लहान अंगठा भरदार असून दुसरें म्हणजे तर्काचें ( लॉजिक ) पेर लांब असेल तर त्याचे कांहीं प्रयत्न तडीस जातात. कारण त्याचे थोडेसे प्रयत्न मग योग्य दिशेला धरून असतात. ह्या हाताचीं बोटें साफ स्मूथ असल्यास तो माणूस त्याच्या भोंवतालच्या सुखसाधनांच्या गोष्टींची आवड असणारा, छानछोकी करणारा ( फॅशनेबल ) असतो. कलेमधील स्वाभाविक धर्माकडे लक्ष वेधणारा व चिकाटीचा असतो. त्याला घोडे, कुत्रीं, समुद्रपर्यटन, कृषिशास्त्र, यंत्रशास्त्र, युद्धकलामीमांसा, बुद्धिमत्ता व हुकमत गाजविणें ह्यांची फार आवड

असते. म्हणजे ज्या ज्या ठिकाणीं मन रमेल, मनाला उद्योग लागेल अशा सर्व गोष्टींची त्याला आवड असते असें म्हटलें असतां जास्त सयुक्तिक होईल. असलीं माणसें बहुधा गायनवादनपटु असतात आणि जेव्हां अशी वस्तुस्थिति आढळते, तेव्हां ते उत्तम नटहि असतात, पण लहरी आणि आत्मप्रशंसक असतात. ह्या हातांतील बोटांचा पहिला सांधा जर गांठाला असेल तर सारासारविचारशक्ति चांगली असून त्याला राजकीय विषयाची फार आवड असते व समूहवैशिष्ट्याच्या स्वातंत्र्याची आवड असणारा असा असतो. ह्या हाताचे दोन्ही सांधे गांठाळ असल्यास ते उत्तम इंजिनियर व संशोधक असतात. तळवा जर मऊ असला तर असला माणूस ( सूर्यवंशी ) उशीरा उठणारा आणि परंपरागत संवयीचा असतो. सुखानें प्रवास करण्याची त्याला हौस असते; पण विशेषतः प्रवासवर्णनें व प्रवाशांच्या गोष्टी ऐकण्याची त्याला फार आवड असते. जर ह्या बोटांचीं अग्रें अगदीं थेट ' स्पॅच्युला ' सारखीं असलीं तर ह्या आधिक्यामुळें त्याचे उद्योग त्रासदायक होतात. इतकेंच नव्हे तर कामाकरितां इतरांवर जुलूम करतो. त्यांच्या वागणुकीला व विचाराला कांहीं धरबंद नसतो व ते फार तंटेखोर असतात. त्याला जर पहिला सांधा गांठाळ व अंगठा लहान याची जोड मिळेल, तर निग्रहशक्तीच्या अभावामुळें त्याला संशोधनांत व शास्त्रीयशोध लावण्यांत हटकून अपयश येतें. ह्या ठेवणीचे लोक त्यांच्यापुढील गुणामुळें वसाहत करण्याला फार लायक असतात. ज्या ठिकाणीं त्यांना लागणारे जिन्नस भरपूर निपजतात अशा प्रदेशांत त्यांचें मन रमतें व त्यांची जन्मभूमि दाट वस्तीची असून त्यांना लागणाऱ्या वस्तूंचें जर तेथें दुर्भिक्ष असलें तर शारीरिक व इतर श्रमाची आवड असल्यामुळें त्यासाठीं ते देशत्याग करण्यास एका पायावर तयार असतात. ते विषयी नसतात. आत्मविश्वासी व निर्जनतेची त्यांना फारशी दिक्कत

नसल्यामुळें व उपयुक्त कलेंत ते प्रवीण असल्याकारणानें त्यांना जन्मभूमि सोडण्याला यातायात पडत नाहीं व ह्या सर्व गुणांमुळें ते दुसरे प्रदेश शोधून काढून आपल्या कर्तबगारीवर ते भरभराटीला आणून सोडतात. हे मोठे गणिती असतात. चैन करण्यापेक्षां पैशाची ऊब यांना अधिक सुखावह असते. वस्तूच्या गुणापेक्षां तिच्या प्रमाणाकडे ( आधिक्याकडे ) यांच लक्ष असतें आणि व्यापारानें गजबजलेलें, स्वच्छ व व्यवस्थित रीतीनें वसलेले अशा शहरांत रहाण्याची त्यांना आवड असते. हे लोक न्यायी, कांटेतोल असून त्यांची भाषा जोरदार असते व थोडेसे त्रासदायक असतात. ते क्षुल्लक गोष्टींना जुमानणारे, संकटांना तोंड देणारे, स्वमताचा बाणा बाळगणारे आणि हक्काकरतां भांडण्यास तयार असलेले, गुप्त संस्थांचे व इतर पंथांचे अनुयायी, तसेंच बातमीदार असतात व पुराणमताभिमानी असतात. उत्तर अमेरिकन, स्कॉच ह्यांच्यांत हा टाइप प्रामुख्येंकरून आढळतो. इंग्लिश लोकहि ह्याच सदरांत येतात; पण त्यांत थोडासा फरक आहे. आपले महाराष्ट्रीय याच वर्गांतले होत. मारवाडी, कच्छी, मेमन वगैरे लोकहि ह्याच सदरांत येतात; पण त्यांचा टाइप थोडासा भिन्न आहे. हे लोक शारीरिक कष्ट करणारे, धाडसी, व्यावहारिक दूरदर्शी असतात आणि उत्साह, जोम, चळवळ कष्ट आणि दीर्घोद्योग हीच त्यांची अथपासून इतिपर्यंत जपमाला असते. असले सगळे मोठे लोक ह्याच हाताच्या ठेवणीच्या सदरांतील होत असें समजावें. समजावें म्हणण्यापेक्षां त्यांच्या हाताची ठेवण अशी असते. आतां आपण तिसऱ्या म्हणजे निमूळत्या व कुशल कोनिकल ऑर आर्टिस्टिक हातांकडे वळूं.

## निमूळता व कुशल हात

**ठेवण**---ह्या हाताची ठेवण व गुणधर्म इतर हाताच्या अगदीं

उलट आहे. तथापि यांत तीन भेद आहेत, व त्याला अनुसरूनंच त्यांचे स्वभावधर्म आहेत. **पहिला प्रकार** असा आहे कीं, तळवा भरदार पण मध्यम आकाराचा, लवचीक आणि अंगठा लहान असतो. एकंदरींत ह्या हाताची ठेवण फारच मनोहर असते. **दुसरा प्रकार** रूंद, जाड व आंखूड असा तळवा व अंगठा मोठा अशी याची ठेवण असते. तसेंच ह्या ठेवणीच्या माणसाला द्रव्याची, मोठेपणाची व आपण उदयाला यावें अशी फार इच्छा अथवा हांव असते. **तिसरा प्रकार**—तळवा प्रशस्त, फार जाड व मजबूत असा असतो आणि त्याचें मुख्य लक्षण म्हणजे मनुष्य विषयी असतो. ह्या ठेवणीचे लोक स्फुरणानें कामें करणारे असून यांत्रिक व शारीरिक चिकाटीच्या कामाला ते अत्यंत निरुपयोगी असतात. पण पहिल्या ठेवणीचा माणूस मनापासून झटणारा, दुसरा लबाडीनें किंवा अंगकुचराईनें आणि तिसऱ्या प्रकारचा माणूस त्याच्या मनाला ज्या बाजूनें सुख होईल तें काम करावयाचें हा हेतु मनांत ठेवून कोणत्याहि उद्योगाला लागणारा असें असतात. वरील तिन्ही प्रकारानें कदाचित् वाचकांचा घोटाळा होईल म्हणून ह्या हाताच्या ठेवणीचे थोडेसें अधिक स्पष्टीकरण करणें जरूर आहे. ह्या ठेवणीच्या हाताचीं बोटें किंचित् रुंद असून अगदीं तळाच्या पेऱ्यापासून प्रमाणांत बारीक होत गेलेलीं असतात म्हणजे तळाला रुंद असून टोंकाला अगदीं प्रमाणांत निमुळतीं होत गेलेलीं असतात. अंगठा बहुधा लहान व तळवा चांगला भरदार असतो. असलीं माणसें बहुधा हिशेबी किंवा कार्यकारणाचा विचार करून वागणारीं नसून लहरीला येईल त्याप्रमाणें वागणारीं असतात, व बाह्य देखाव्याला भुलणारीं असतात. वस्तूच्या उपयुक्ततेपेक्षां तिच्या शोभेवरच ते तिचा स्वीकार करितात. त्यांच्या अंतःकरणाला जेणेंकरून समाधान होईल, अशा आराम, नावीन्य, असलेल्या व मनमुराद वागावयाला सांपडेल अशा गोष्टींकडे त्यांचें मन

वेधलेलें असतें, पण त्याचबरोबर पोकळ डौल बाळगणारे, आपला कोणी उपहास वगैरे करील काय म्हणून मनांत भिणारे, उत्साही व बाह्यात्कारी नम्र असे असतात. ह्या घटकेला जर आनंदाच्या शिखरावर ते असले तर लागलीच दुसऱ्या क्षणाला दुःखाच्या दरींत आदळावयाचे अशा क्षणिक लहरी स्वभावाचे ते असतात. संसारांत फार गढलेले, लार्ड क्लाइव्हसाखे विश्वासघातकी, उसनी माया आणणारे, हलक्या मनाचे अथवा क्षुद्र वृत्तीचे, भडभडे, बोलतांना इतर आविर्भावानें ते लोकांच्या मनावर ठसविणारे असे असतात. हात जरा कठीण असेल तर, ज्याच्यामागें त्याचे शिपाई अंधळ्यासारखे जिवाची अथवा यशाची यत्किंचित् दिक्कत न बाळगतां जयश्री व सन्मान मिळविण्याच्या हेतूनें मेंढरासारखे जातात. असा मनुष्य बाजीराव, नेपोलियनप्रमाणें अथवा श्रीशिवरायाप्रमाणें तो सेनानी होतो. ह्या ठेवणीचा **आणखी एक असा प्रकार** आढळतो. कीं, तळवा मोठा, अंगठा लहान, बोटें नितळ, मऊ व अगदीं निमगोल अशी असते व असें असलें की तो मनोविकाराचा दास असतो. व त्याचे ठिकाणीं आत्मसंयम बिलकूल नसतो. सुख हेंच त्याचें दैवत व सौंदर्य हेंच त्याचें आराधन असतें. त्यानें एखादें काम हातीं घेतल्यास त्यांत तो वेडावून जातो पण तो शत्रु उत्पन्न होऊं देत नाहीं. उदार, मोकळ्या अंतःकरणाचा व खर्चीक असतो. दूषणाला भिणारा, मित्रोपकारी व दयाळू असतो. हे लोक जोंपर्यंत त्यांच्या सुखाच्या आड कायदा येत नाहीं तोंपर्यंत ते कधींहि कायद्याचें उल्लंघन करावयाचे नाहींत; कारण ते बंड करण्याच्या प्रवृत्तीचे नसतात. परंतु तसे अडथळे आल्यास त्यांची मजल प्रजासत्तावादी, समाजवादी व अ. निहीलिस्ट बनण्यापर्यंत जाते व तीं कामें ते मोठ्या उत्सुकतेनें करतात. त्या हाताचा तळवा मोटा, चिवट, तळवा व बोटांची पेरीं फारच जाड व मोठीं अशी असलीं तर असा माणूस विषयी, आळशी, हेकट, मनावर ताबा असलेला,

लुच्चा, ठक व थाप्या असा असतो. असो. अतां आपण चौकोनी अथवा उपयोगी "दि स्क्वेअर ऑर युसफुल हँड" याचा विचार करूं.

## चौकोनी अथवा उपयोगी हात.

रत्नांचे जणु ताटवे चमकती सिंहासनीं छानसे ।
झाले लोलुप-मोर तें बघुनिया सौंदर्य निस्तेजसें ॥
प्रेमानें परिचारिकाद्वय उभ्या जोडून हस्तास त्या ।
मध्यें श्रीगणराज मंगल कुरु शोभे तया प्रार्थित्या ॥ १ ॥
विद्यावंत जगीं तुझ्यासम दुजा कोणीहि ना सांपडे ।
विघ्नांतें निवटून अन्य न सदां तूं वारिशी सांकडें ।
दासाची विनती महागणपति सन्मान्य आतां करी ।
ग्रंथा देउनि पुष्टि लेखनकला तूं वाढवी सत्वरी ॥ २ ॥

**हाताची ठेवण**—ह्या ठेवणीचा तळवा बराच रुंद व बोटें गांठाळ असतात; पण दोन्हीहि सांधे गांठाळ असतात असें मात्र समजूं नये. एक किंवा दोन्ही सांधे गांठाळ असूं शकतात; पण बहुधा दुसरे म्हणजे तळाचे सांधे गांठाळ असतात. तसेंच बोटें निमुळत्या कोनिकल किंवा अणकुचीदार-पॉइन्टेडच्या आकारासारखीं गोल नसून त्याला चारी बाजूनीं कडा असून चौकोनी दिसतात. अशीं तळापासून तो शेंवटपर्यंत चौकोनी असतात. तसेंच अंगठा मुळाशीं कांहींसा मोठा असून ( म्हणजे शुक्राचा उंचवटा भरदार असलेला ) तळवा मध्यम, जाड, खड्डा असलेला व चिवट असा असतो.

**स्वभावधर्म**—ह्या हाताच्या ठेवणीचा मुख्य धर्म म्हटला म्हणजे दूरदर्शीत्व, व्यवस्थितपणा, चिकाटी आणि प्रमाणशीरपणा. ह्या हाताच्या माणसाचे पदार्थांच्या शोभेपेक्षां उपयुक्ततेकडे अधिक लक्ष असतें. त्यांचा मोठा नाद म्हणजे वस्तूंची जुळणीक, वर्गीकरण करणें, व्यवस्था लावणें आणि रूपरेखा आंखणें हा असतो. जगांतील अद्वि-

तीय वस्तूंची त्यांना फार आवड असून बाहेरून सारख्या दिसणाऱ्या वस्तूंतील वैषम्य व विषम दिसणाऱ्या वस्तूंतील साम्य शोधून काढण्याची त्यांना उपजत बुद्धि असते. ते मोठ्या शिस्तीचे असून व्यक्तीच्या कल्याणाकरितां समाजांतील चांगल्या चालीरीतींचा अवलंब करतात आणि सदसद्विवेकाला पटणाऱ्या गोष्टींचे ते व्हाते आणि इतर व्यक्तींशीं समान दर्जानें वागणारे, त्यांना मान देणारे असे असून सामाजिक विषयाचे, समाजिक चालीरीतींचे फार भोक्ते असतात व त्यांना योग्य वळण देण्याकरितां व त्यांच्या सुखाभिवृद्धीकरितां परिश्रम करणारे असतात. ह्या ठेवणीच्या माणसाची व्यवस्थितपणाबद्दल फारच ख्याति असते, त्यांचें कोठार कितीहि चिकार भरलेलें असो, त्यांचें पुस्तकालय केवढेंहि असो; पण त्यांतली प्रत्येक वस्तु झाडुनपुसुन नीटनेटकी लावलेली व त्यासोबत त्याची यादी असावयाची व अशा माणसाला झोपेंत जरी विचारलें तरी त्याच्या संग्रहांतील वाटेल ती वस्तु तो बिनचूक सांगावयाचा. नियमितपणाबद्दल त्याचें थोडक्यांत वर्णन द्यावयाचें असेल तर रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलीक, बेंजामीन कालीना यांचीं उदाहरणें दिलीं म्हणजे बस्स आहेत. ह्या ठेवणीचे लोक वादनकुशल असतात. त्यांतल्या त्यांत तें पेटीसारखीं वाद्यें वाजविण्यांत निष्णात असतात. अशा वेळीं त्यांचीं बोटें नाजुक, चौकोनी, लहान अंगठा व सांधे किंचित् फुगीर अशी त्यांची ठेवण असते. हे लोक वक्ते, बहुश्रुत असून चांगलें आदरातिथ्य करणारे असतात. त्यांच्या फार दाट ओळखी असतात; पण स्नेही थोडे असतात. ज्यांचीं बोटें गांठाळ नसतात व सांधे नितळ असतात अशीं माणसें नीतिशास्त्र, तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र यांचे भोक्ते असून त्यांतील रहस्य शोधण्याची त्यांना इच्छा असते. अशा हाताचा माणूस फार तैलबुद्धीचा असतो. दोन्ही सांधे गांठाळ असल्यास त्याला वनस्पतीशास्त्र, भूगर्भ, इतिहास, कायदा, गणित करणें

व शेतकी यांची आवड असून त्यांचा पद्धतशीर व्यासंग व सुसंबद्ध व सुव्यवस्थित मांडणी करण्याची त्यांस उत्तम हतोटी असते; परंतु आंगठा लहान असून चंद्राचा उंचवटा चांगला असल्यास त्यांची गूढ शास्त्रांत विलक्षण गति असते व तो न्यायी आणि अत्यंत विश्वासू असतो. ह्या आकाराचें फाजील आधिक्य असल्यास ते कोत्या बुद्धीचें लक्षण होय. ह्या ठेवणीला आंखूड नखाची जोड मिळाल्यास ह्या ठेवणीचे गुणधर्म जास्त अनुभवाला येतात. ह्याचें वर्णन जितकें द्यावें तितकें थोडेंच होईल; परंतु सांप्रत आपल्या कामापुरतें झालें असल्या-कारणानें आपण आतां हाताच्या ठेवणीकडे वळूं.

## स्फीत, विचारी अथवा शोधक हस्त.
## दि नॉटी ॲण्ड फिलॉसॉफिक हँड

ह्या ठेवणीच्या प्रकृतिस्वभावाचें नीट विचारपूर्वक अवलोकन केल्यास पुढीलप्रमाणें त्यांत दोन प्रकार दृष्टीस पडतात. एक, विषयी व त्यांच्या कल्पना पदार्थांच्या बाह्य आकारावरून बनलेल्या आणि दुसरे सदसद्विवेकाला अनुसरून उत्पन्न होणाऱ्या अशा प्रकृतीचे असतात.

**ठेवण**— ठेवणीचा नीट विचार करतां बाह्य आकार इतर ठेव-णीहून फार निराळा असून प्रत्येकाच्या चटदिशी ध्यानांत येण्या-सारखा आहे. मोटा लवचीक, तळवा बोटाचे दोन्ही सांधे गांठाळ असून त्याचे बाहेरील पेरें चौकोनी व निमूळत्या अशा दोन्ही मिश्र-णाचें असें असतें म्हणजे लांबोड्या व वांकड्या आकाराचीं बोटांचीं शेवटचीं अग्रें असतात व त्यामुळें तीं कुरूप दिसतात. हेंच ह्या ठेवणीचें विशिष्टत्व होय. ह्याचा आंगठा मोठा असून दोन्ही पेरीं अगदीं सारखीं असतात व तें त्याचे ठिकाणीं इच्छाशक्ति—वुइल, व सारासार विचारशक्ति—कॉमन सेन्स हीं दोन्ही अगदीं सारखी असल्याचें द्योतक होय.

**स्वभावधर्मः**—पृथक्करणशक्ति, तत्त्वज्ञान, उपदेश, सार काढण्याची शक्ति, स्वातंत्र्य, प्रजासत्ताकवादी, संशोधन आणि अगदीं खरेंखरें सत्य काढण्याच्या मार्गाचे असतात. बोटें गांठाळ असल्याकारणानें त्यांना हिशेब व पद्धति ह्यांची जोड मिळते. यांचें वाङ्मय सुस्पष्ट व विशद असून उपयुक्त असें असतें व भाषा झोकदार आणि विशिष्ट पद्धतीला धरून असते व ते खऱ्या शास्त्रीय विषयाचे व्यासंगी असतात. प्रत्येक गोष्टीचें कारण समजून घेण्याची त्यांना संवय असते. मग ते शारीरिक असोत अथवा मानसीक असोत. त्यांनीं स्वतःच मतें बनविलेलीं असतात आणि त्यांबद्दल ते दुसऱ्याच्या मतांची यत्किंचितही पर्वा करीत नाहींत. त्यांची धार्मिक व सामाजिक मतें केवळ त्यांनीं केलेल्या काळजीपूर्वक विचाराअंतीं व चिकित्सेनें जो परिणाम त्यांच्या लक्षांत आला असेल त्यावरच बनविलेलीं असतात. हे लोक तर्कप्रधान असतात पण धर्माचे बाबतींत मात्र हे उलट असतात; कारण तेथें तर्कापेक्षां स्फूर्तीला प्राधान्य असतें, ह्या हाताचे लोक बहुधा समाजांत नास्तीक म्हणून निरनिराळ्या स्वरूपानें प्रसिद्ध असतात. ते समाजाचें व्यक्तिशः किंवा वस्तूचें बारकाईनें निरीक्षण करीत नाहींत. पण ज्या विषयाकडे ते लक्ष देतील त्याचा धागान्धागा उकलून काढण्याचें त्यांच्यांत सामर्थ्य असतें. त्यामुळें राज्यनियंत्रणांतील गुणदोष चटकन् लक्षांत येतात आणि म्हणून ते कायदेकानू करण्यास योग्य असतात. ते उपजत न्यायी असतात, धर्मभोळे नसतात. सामाजिक आणि धार्मिक स्वातंत्र्याचे चाहते, सुख लालसा मध्यम असणारे असें असतात. जर ठेवणीचा हात लहान असेल तर त्याचे सर्व विचार आणि तर्क मानसिक असतात आणि समाजाच्या दिसून येणाऱ्या बाह्यस्वरूपावरून कल्पना बांधणारे असे असतात. आणि तळवा जर फार मोठा व अंगठा प्रमाणशीर असल्यास त्यांचे विचार आणि तर्क बौद्धिक असतात व

सामाजिक निरीक्षण व त्याचा निष्कर्ष पहिल्यासारखाच असतो. त्या ठेवणीच्या लोकांचे सर्व कारभार सारासार विचार व आत्मिकबल यावर चाललेले असतात. परंतु ह्याच ठेवणीचे लोक एका ठिकाणीं बरेच रहात असले तर ते अमर्याद संशयग्रस्त मतस्वातंत्र्याचे चहाते, व काल्पनिक तर्कांचें, विचारांचें तेथें बरेंच प्राबल्य दृष्टीस पडतें. आतां आपण शेवटच्या म्हणजे सहाव्या ठेवणीचा विचार करूं;

## हाताची नमुनेदार ठेवण

आपण आतां ज्या हाताच्या ठेवणीचा किंवा विशिष्टाकृतीचा विचार करणार आहोंत, ती ठेवण आपण मागील दिलेल्या सर्व ठेवणींत अत्यंत मनोहर व सुकुमार अशी आहे ( ज्याला आपण कपिकरसदृशी असें म्हणतों ); पण फलाच्या दृष्टीनें जर आपण याचा विचार केला तर खेदाची गोष्ट अशी कीं, त्याच्या बाह्य आकाराच्या उलट तो तितकाच व्यवहाराच्या दृष्टीनें कुचकामाचा आहे. पाश्चात्यांच्या पॉइन्टेड ( अणकुचीदार ) ह्या शब्दानें जसा त्यांच्या बोटांच्या ठेवणीचा नीट बोध होतो तसाच आपल्या ' कपिकर ' या नांवानें ठेवणीचा व उपयुक्ततेचा पूर्ण बोध ( आपल्या एकाच नांवानें ) होत आहे, तसा मात्र पाश्चात्यांच्या दोन्हींहि नांवांनीं होत नाहीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. ही ठेवण अत्यंत क्वचित आढळते आणि आढळण्यास ती ओळखण्यास मुळींच त्रास पडत नाहीं.

## आणीदार अथवा अध्यात्मप्रधान हात
## पॉइन्टेड किंवा सायकिक हॅंड

**ठेवण**—फार लहान, नाजूक, पातळ तळवा, नितळ, सुरेख, लंब आणि आणीदार अशीं बोटें, किंचित फुगीर पेरीं आणि बहुधा चिमुकलासा सुबक असा अंगठा अशी याची ठेवण असते.

**गुणधर्म**—ह्या ठेवणीचे लोक सुंदर ध्येयाचें साम्राज्य, स्वप्नाचें माहेरघर व कल्पनातरंगाचें आगर होत. ते स्वतःच्या लहरीनें आणि कल्पनेनें वागणारे असतात. जगांतील कोणतीही वस्तु व ध्येय यांच्यापेक्षां ते आपणास फारच उच्च प्रतीचे समजत असल्यामुळें त्यांना कशावरही आपली हुकमत चालविण्याची इच्छा नसते. ते कीर्तीसाठीं करावे लागणारे श्रम करण्यास असमर्थ असतात; पण एकदां त्यांच्या कल्पनेनें कोणतीहि गोष्ट सत्य व योग्य आहे असें घेतल्यास त्याच्या करितां ते मृत्यूहि पत्करण्यास तयार असतात. ह्या जातीचे लोक म्हटलें म्हणजे खिश्चन्स होत; पण त्याहीपेक्षां थोडेसे सरस म्हटले म्हणजे मूर आणि मुसलमान जाती होत. ते आपल्या देवाकरितां, धर्माकरितां व जनावराप्रमाणें तुटून पडण्याला मागें घेत नाहींत. ते ज्यांत कांहीं वस्तुतः उपयोगी होईल अशा कामाकडे दुर्लक्ष करतील; पण एखादें अचाट काम हातीं घेऊन त्याच्या मागें लागतील. डेस बॅरोल्सच्या निरिक्षणांत असें आढळून आलें आहे कीं, ह्या लोकांत आकर्षणशक्ति व भविष्यदृष्टी असते व त्याचें कारण त्यांचीं बोटें साफ असल्याकारणानें त्यांतून वाहणाऱ्या विद्युत्प्रवाहाला अडथळा येत नाहीं व गांठाळ बोटें असल्याकारणानें तो इतर ठेवणींत स्वाभाविकपणेंच उत्पन्न होतो. अनुवंशिक संस्काराच्या दृष्टीनें पाहिलें असतां ह्या ठेवणीच्या माणसांतून ते गुणधर्म न उतरतां ह्या ठेवणीच्या सर्व माणसांचे गुणधर्म सारखेच असतात असें आढळतें व ते व्यवहाराला निरुपयोगी व विचित्र चालीरीतीचे असतात आणि जगामध्यें ते त्याच्या अद्‌भुत सामर्थ्यामुळें सर्व जातीच्या लोकांना फार आदरणीय असतात. हीं बोटें फारच अणीदार असल्यास ते लोक ढोंगी व फसवे असतात. आपल्या लोकांत ही ठेवण विशेषेंकरून आढळते. कारण आपल्यांत योगी, अध्यात्म वगैरे पंथाचे बरेच लोक असून त्यांतील बरेचसे लोक मनाचे दुबळे असतात. ते

ह्या पंथांतील ढोंगी, व दांभिक लोकांनीं सांगितलेल्या तत्त्वांची छाननी अथवा संशोधन केल्याशिवाय त्यांवर विश्वास ठेवतात व त्यामुळें वरील प्रकारच्या लोकांच्या सहजीं जाळ्यांत सांपडून त्याचें भक्ष्य बनतात. ज्या ठिकाणीं अशा ठेवणीच्या लोकांची दाट वस्ती असते व त्यांच्या हातांत राज्यसूत्रें असतात, असलीं राज्यें धर्मोपदेशकांच्या सल्ल्यानें व जुन्यापुराण्या समाजाप्रमाणें चाललेलीं असतात. असले लोक मन आणि आत्मा यांच्या तंत्रानें चालणारे असतात. त्यांचे मनोविकार फार तीव्र असून ते क्षणांत उसळणारे असतात. चैतन्य उत्पन्न करणारें काव्य करण्याची त्यांना बुद्धी असते. त्याचे मनोविकार प्रसृत करण्याच्या त्यांच्या विलक्षण शक्तीमुळें त्यांचे जे अनुयायी बहुधा फार बुद्धिमान आणि अत्यंत शांत, सुशिक्षित आणि अशिक्षित आहेत अशा सर्व तऱ्हेच्या व सर्व दर्जाच्या लोकांवर त्यांचें विलक्षण वजन असतें. ह्या हातांचा खरा उपयोग म्हटला म्हणजे ह्या माणसांनीं समाजांत उत्पन्न केलेलें चैतन्य होय; परंतु त्याला इतर ठेवणींची जोड नसेल तर हें तारूं कोणीकडे भडकेल याचा नेम नाहीं. ह्या ठेवणीच्या हाताचा पहिला सांधा गांठाळ असेल तर तें स्थित्यंतर दाखवितें; परंतु ज्या टोंकापासून त्यांनीं उलट खालीं असेल त्याच्या अगदीं उलट टोंकाला तें सांपडावयाचें. हे लोक धर्मवेडे, तऱ्हेवाईक व प्रचलित पंथांतील कोणत्याही पंथाला चिकटून न राहणारे व विशिष्ट धार्मिक कल्पनांचे ते उत्पादक असतात. दोन्ही सांधे गांठाळ असल्यास त्यांची ही अध्यात्मिकशक्ति कमी होते; कारण त्यांच्यांत अनुमान, प्रमाण व कार्यकारणभाव यांची भेसळ होते. अशा वेळीं हाताचा अंगठा मोठा असला तर बरा; नाहीं तर ते असमाधानी, संशयी, भीतिग्रस्त होतात. केव्हां केव्हां ठेवणीचा तळवा कठीण असलेला आढळतो व तें नाचणारे, गारुडी. जादुगारी यांचें द्योतक असतें. ह्याप्रमाणें ह्या ठेवणीचा

स्वभावधर्म असतो. म्हणजे निमुळता ( कोनिकल ) हात कला, आणि अनुमान चौकोनी ( स्क्वेअर हात ) नियम आणि व्यवस्था, स्फीत ( नॉटी हात ) मानवी तर्क किंवा सारासार विचार यांचे प्रवर्तक असून ह्या पॉइन्टेड ( अणीदार ) हाताकडे अत्युच्च ईश्वरी शक्तीचा उगम शोधून काढण्याची कामगिरी सोंपविली आहे. कारण बुद्धीला अगम्य अशा ठिकाणीं प्रवेश करण्याचें त्याचें खरें रहस्य शोधून काढून त्याचा चोहोंकडे प्रसार करण्याचें अद्भुत सामर्थ्य ह्यांच्या ठिकाणीं असतें. असो. ह्याप्रमाणें ह्या हाताच्या ठेवणीचे सहा प्रकार असून त्यांचे बाह्य आकार व स्वभावधर्म कशा प्रकारचे असतात ह्याचें आपण विवेचन केलें. आतां आपण ह्या हातांच्या मिश्रस्थितीचा थोडासा विचार करूं, कारण त्याचे योगानें वाचकांना मिश्र स्थितीची कल्पना येण्यास सुलभ होईल.

## मिश्र हात [ मिक्स हँड ]

ह्या हाताचें वर्णन करणें व ठेवणीचें स्वरूप समजावून देणें अत्यंत कठीण व फार त्रासाचें आहे. ह्या मिश्र हाताचें खरें स्वरूप देणें म्हणजे ज्या हाताच्या ठेवणीची नीट कल्पना करतां येत नाहीं अशी जी ठेवण त्याला मिश्र हात असें समजावें. कारण त्यांच्यांत कोणत्याहि टाइपचें मिश्रण असतें व तें इतकें बेमालुम असतें कीं, तें ठरविणें मोठ्या मुष्कीलीचें व गोंधळून सोडणारें असतें. उदारणार्थ, निमुळत्या अग्रांचा कोनिक हात एखादे वेळीं असा आढळेल कीं, त्याचीं बोटें निमुळतीं होत होत अणीदार सारखीं असतील. चौकोनी बोटें स्पॅच्युलेटसारखीं भासतील आणि अशा वेळीं फार गोंधळ होऊन सामुद्रिकांच्या फलें सांगण्याच्या बाबतींत फार घोंटाळा होईल; तेव्हां अशा वेळीं मागें दिलेल्या तळव्यांच्या

बोटांचीं दिलेलीं फलें नीट लक्षांत ठेवल्यास त्यांचा बिलकूल घोंटाळा होणार नाहीं हें त्यांनीं नीट ध्यानांत ठेवावें. कारण हेच ह्या ठशांचे दुवे होत व त्यामुळें ह्या मिश्रणाचें खरें स्वरूप लक्षांत येण्यास मदत होईल. ह्या मिश्र हाताच्या लोकांना व्यापारी व न्यायाधीशांना लागणारी बुद्धी असते. ते हरहुन्नरी कलांमध्यें निष्णात असतात. उदाहरणार्थ, कोरींव, कातींव कामें, रोषणाईचीं कामें व सैन्याच्या आघाडीची व्यवस्था करणें, बातम्या पोंचविणें वगैरे कामांत ते प्रवीण असतात. व्यवहारांत ज्यांना आपण "एक धड ना भाराभर चिंध्या" अशा तऱ्हेचे लोक समजतों, त्यांच्या हाताची अशी ठेवण असते. अशा लोकांची प्रत्येक कलेंत विविक्षित मर्यादेपर्यंत गति असते; पण ते कशांतहि निष्णात असत नाहींत. त्यांची बुद्धि-मत्ता वाटेल त्या विषयांत चालते; पण मर्यादित. ते ज्या समूहांत वावरत असतील त्यांत त्वरित तद्रूप होतात, त्यांत मिसळून जातात असा ह्या मिश्र हाताचा स्वभावधर्म आहे.

**मामुली:**—नेसेसरी व निमूळता ह्यांच्या मिश्रणाचे गुणधर्म पुढीलप्रमाणें आहेत. विश्वास ठेवण्यास अयोग्य, चंचल, आडदांड वागणुकीचे, दुसऱ्याच्या सुखदु:खाबद्दल सहानुभूति नसलेले, धर्म-भोळे व शारीरिक दु:ख सहन न करवणारे म्हणजे हळवे असतात. असा यांचा स्वभाव असतो. ह्याची ठेवण—मामुली ठेवणीचा तळवा जसा रुंद असतो तसा नसून तळवा अरुंद व मऊ, बोटें जाड व नितळ, अंगठा लठ्ठ व निमुळता, पंजा उघडण्यास त्यांना जितका वेळ व श्रम लागतात त्यापेक्षां तो मिटतांना कमी लागतात. म्हणजे उघडण्यापेक्षां मिटणें सोपें जातें. अशा यांच्या ठेवणीच्या खुणा आहेत. हे लोक अप्पलपोटे व आधाशी असतात. कोणत्याही तऱ्हेच्या व्यापारास व हस्तकौशल्याच्या धंद्यास ते निरुपयोगी अस-

तात. ज्यू लोकांतील अगदीं खालच्या दर्जाच्या व्यापारी लोकांत ह्या मिश्रणाच्या ठेवणीची पूर्ण वाढ झालेली आढळते.

**मामुली:**—अणिदार ( सायकिक ) ह्या दोन मिश्रणांची मिळून हातांची ठेवण असल्यास त्याचे गुणधर्म खालीं लिहिल्याप्रमाणें आढळतात. सुख आणि चैनीची इच्छा असलेले, निरुपद्रवी व दुबळे असतात. कोणतीही कृत्यें करतांना विशिष्ट हेतुरहित तीं ते करीत असल्यामुळें नेहमीं त्यांची फसगत होते. त्यांची व्यापारांत गति चालत नाहीं, व ते अत्यंत निरुपद्रवी, एकांतप्रिय व सहनशील असे असतात.

**चौकोनी:**—व निमुळता यांच्या मिश्रणानें मनुष्य लबाड, ढोंगी व ठक असतो.

**चौकोनी:**—आणि वर्तुलार्ध यांच्या मिश्रणाचे धर्म पुढील-प्रमाणें आहेत.—उत्साही, व्यवस्थित, युक्तिबाज व मुत्सद्दी असतात. उपपत्ति, शास्त्र आणि मांडणी हीं पायाशुद्ध असते. ते कुशाग्रबुद्धीचे, अत्यंत व्यवहारचतुर, व अनुभवी असतात. याप्रमाणें या मिश्रहातांची स्थिति असते व त्याच्या केलेल्या दिग्दर्शनाप्रमाणेंच इतर अनेक मिश्रणांचे मिश्रधर्म असतात, व त्यांचे अभ्यासानें ज्ञान होईल. आतां आपणांस स्त्रियांच्या हाताच्या ठेवणीचा विचार करावयास पाहिजे. कारण पुरुषांच्या हाताच्या ठेवणींत व स्त्रियांच्या हाताच्या ठेवणींत बराच फरक आहे. आपल्या शास्त्रकारांनीं तर स्त्रियांचीं सर्व फलें अगदीं स्वतंत्र दिलीं आहेत, पण आपण त्यांतील तात्त्विक म्हणून जेवढा फरक असेल तेवढ्याचाच येथें विचार करूं.

---

# प्रकरण ७ वें

## स्त्रियांचा हस्त

आतांपर्यंत सांगितलेलीं फळें स्त्री व पुरुष या दोघांनाहि सारखींच लागूं आहेत. नीट विचार केला तर दोघांच्या शरीराच्या ठेवणींत व स्वभावधर्मांत महत्त्वाचें अंतर असलेलें दृष्टीस पडतें; पण त्यांत अशी मौज आहे कीं, तें अंतर गाड्याच्या चाकांप्रमाणें परस्परावलंबी असून परस्परपोषक असें आहे.

स्त्रिया जास्त संसारासक्त व दक्ष, कष्टाळू, सोशिक, अप्रबुद्ध, चंचल, कांगावी, कामांध, भेकड, ममताळु व सुकुमार अशा प्रकृतिस्वभावाच्या असलेल्या दृष्टीस पडतात. तसेंच त्यांचे ठिकाणीं शिशुसंगोपनाची उपजतबुद्धि असते व त्यांना व्यावहारिक उमज लवकर येतो. तसेंच पुरुष राकट, आडदांड, विषयी, धीट, शूर, उदार, गंभीर, प्रगल्भ व कलाक असे असून स्त्रियांसारखे कष्टाळू व सोशिक नसतात व ह्या फरकाप्रमाणेंच त्यांच्या व्यावहारिक कामगिरींतहि अंतर दिसतें. पुरुष कमाई करणारा, तर स्त्री त्याची व्यवस्था लावणारी; पुरुष धर्म व नीतीच्या तत्त्वांचा उपदेश करणारा, तर स्त्री स्वतःच्या आचरणानें तीं तत्त्वें अमलांत आणून जगाला त्याचे धडे घालून देणारी; पुरुष शास्त्रीय व सारासारदृष्टीनें कोणत्याहि गोष्टीचा विचारा करणारा, तर स्त्री व्यावहारिक व कल्पनेनें विचार करणारी; पुरुष उत्पादक, तर स्त्री संवर्धक. अशा तऱ्हेची ही परस्परावलंबी व पोषक अशी कामगिरी आहे व ह्या फरकाला अनुसरूनच त्यांच्या हातांच्या ठेवणींतहि फरक असतो. स्त्रियांचा हात बहुधा नरम, लवचिक, लहान व साफ असतो ( गांठाळ नसतो ) त्यामुळें त्यांच्यांत चौकोनी, गांठाळ व चापट ह्या ठेवणी क्वचित् आढळतात.

स्त्रियांचे साधारणपणें मोठ्या अंगठ्याच्या व लहान अंगठ्याच्या असे दोन विभाग होतात. मोठ्या अंगठ्याची स्त्री शहाणी, चतुर व बुद्धिमान् असते आणि ती स्तुतिप्रिय किंवा मत्सरी नसल्यामुळें तिच्याजवळ वगवशीला चालत नाहीं. लहान अंगठा असल्यास, ती मत्सरी व चंचल असते. ह्या अंगठ्याला दुसऱ्या वाईट चिन्हांची जोड मिळाल्यास त्या स्त्रीची वागणूक वाईट, अनिश्चित, चिडचिडी व गैदी असते व तिच्या तोंडांत तीळसुद्धां भिजत नाहीं, म्हणजे तिच्याजवळ कांहीं गुप्त रहात नाहीं. तिच्या अंतःकरणांत प्रेम नसतें, पण विषयविकार असतो. मामुली ( ठेवण ) स्त्रियांच्यामध्यें सांपडतच नाहीं म्हटला तरी चालेल. कारण परमेश्वरानें पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या शरीराची ठेवण भिन्न ठेविली असून त्यांना मातृपदाच्या कर्तव्याची उपजत जाणीव व ज्ञान असतें. ह्याची पुरुषाला बिलकूल गरज असत नाहीं व हें ज्ञान ह्या ठेवणीच्या माणसांत बिलकूल सांपडत नाहीं आणि त्याची तर स्त्रियांना जरूरी असल्याकारणानें ही परमेश्वरी निसर्गसिद्ध योजना आहे. ज्या ठिकाणीं ह्या ठेवणीच्या लोकांची बरीच वसती असते, अशा ठिकाणीं स्त्रियांकडे सर्व सूत्रें असून त्यांचे पति व इतर नातेवाईक ह्यांच्या तंत्रानें चालत असलेले आढळतात. स्त्रियांचा हात ( निमूळता ), मऊ, जाड व लहान असा असला तर त्यांचें आयुष्य पांखरासारखें थाटमाट, प्रेम व सुख यांत गढलेलें असून त्यांना कांहींहि ध्येय नसतें. स्त्रियांच्या हातांची ठेवण स्पॉश्चुलेट टाइपची असून अंगठा लहान असल्यास त्या प्रेमळ, स्नेहाला उत्तम, चलाख व गंभीर असतात व त्यांना व्यायामाची, गुरांची व शिवणाटिपणाची फार आवड असून इतर मंडळींपेक्षां मुलांच्या शुश्रूषेंत त्या फार दक्ष असतात. ठेवण चौकोनी असून अंगठा लहान असल्यास त्या गृहकृत्यांत दक्ष, नियमित व व्यवस्थित असून त्यांना आयुष्यांतील कर्तव्यांची योग्य

जाणीव असते व त्यांना लौकिकाची चाड नसते; पण अंगठा मोठा असल्यास सत्तेचा दुरुपयोग करणारी, खड्या आवाजाची, जुलमी, उतावीळ अशी असते. नाजुक, अणीदार अशी बोटें, लहान अंगठा व लहान लवचिक तळवा अशी ठेवण असल्यास ती उन्मत्त असते व तिच्या मनांत येईल तें ती करण्यास प्रवृत्त होते. मग कार्यकारणाचा त्यांचेजवळ बिलकूल विचार नसतो. पण त्या शुद्ध अंतःकरणाच्या असतात. अशा प्रकारचे पुरुष व स्त्रिया यांच्यांत अंतर आहे व स्वभाववर्णन करतांना देखील पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या स्वभावाचें चित्र रेखाटतेवेळीं फार काळजी घेऊन दक्षतेनें फलें सांगत जावींत; कारण तीं ओळखण्यास फार कठीण आहेत. असो. आतांपर्यंत आपण पंजाच्या साही मुख्य विभागांचा क्रमशः विचार केला. आतां आपणांस उपविभागांकडे वळलें पाहिजे. परंतु त्याला सुरुवात करण्यापूर्वीं हातांच्या निरनिराळ्या स्वभावसिद्ध हालचालींवरूनहि मनुष्याच्या स्वभावाचें अनुमान बांधतां येतें. त्याचें वाचकांकरितां येथें थोडेसें दिग्दर्शन करून मग उपविभागाकडे आपण वळूं.

## प्रकरण ८ वें

### पाश्चात्य पद्धति

#### हातांची नैसर्गिक ठेवण व हालचाल.

मुठी घट्ट मिटून बसण्याची संवय असल्यास तो मनुष्य खोलबुद्धीचा व खोटें बोलणारा असतो. चालतांना देखील अशा मुठी मिटण्याची संवय असल्यास तें भित्रेपणा व धनलोभाचें द्योतक होय. हेच हात चालतांना सतत उघडे असल्यास तें औदार्य व निष्कपटीपणाचें द्योतक होय. हे हात दोन्ही बाजूला लुल्यासारखे व अव्यवस्थित रीतीनें टाकण्याची संवय असल्यास तें चांचल्य, आळशीपणा व

संशयी स्वभावाचें द्योतक होय. चालतांना हात आवळून धरून हाताला झोंके देत चालण्याची संवय असल्यास तें तापट स्वभावाचें द्योतक होय. ह्याच हातास विशेष झोके न देतां बेतानें हात हालविण्याची संवय असल्यास तें शांत व प्रौढपणाचें द्योतक आहे व हेच हात बिलकूल न हालवितां अगदीं ताठ धरून चालण्याची संवय असल्यास तें बढाईखोरपणा व खोटेंपणाचें द्योतक होय. मनुष्य स्वस्थ बसला असतांना त्याला बोटें एकमेकांवर घांसण्याची संवय असल्यास तें हलक्या व मनोराज्यी स्वभावाचें द्योतक होय. तसेंच वरचेवर मुठी मिटणारा व उघडणारा व इतर चाळे करणारा असा असल्यास तो मोटा ठक व घातकी असतो. असें हें साधारण अनुमान आहे व येथें यापेक्षां जास्त उहापोह करण्याचें कारण नाहीं. तर्जनीच्या खालीं इंग्रजी ४ च्या आंकड्यासारख्या खुणेनें दाखविलेलें तळव्याचें टोंक व बोटांच्या तळांची जागा हा गुरूचा उंचवटा होय. मधल्या बोटाच्या तळाशीं असलेला शनीचा उंचवटा होय. अनामिकेच्या तळाशीं रवीचा व कनिष्ठिकेच्या तळाशीं बुधाचा उंचवटा आहे. बुधाच्या उंचवट्याखालीं **अंतःकरणरेषा** व **मस्तकरेषा** यांच्यामध्यें मंगळाचा उंचवटा आहे. ह्या उंचवट्याशिवाय प्लेन ऑफ मार्स ( मंगलभूमि ) म्हणून या मंगळाचा विभाग असून तो तळव्याचा मध्य प्रदेश म्हणजे **आयुष्यरेषा, मस्तकरेषा,** व चंद्र आणि मंगळ यांच्या उंचवट्यामधला सर्व भाग होय.

**रेषा—आयुष्यरेषा**–( लाईन ऑफ लाइफ् ) ही रेषा अंगठा व तर्जनी यांच्यामधून निघून शुक्राचे उंचवट्यास पळसा घालून मनगटाकडे गेलेली असते. ती आयुष्यरेषा होय.

**बुद्धिरेषा**—ही बहुधा आयुष्यरेषेला मिळालेली असते तरी ती आयुष्यरेषेच्या शेवटापासून निघून कनिष्ठिकेकडील तळाशीं गेलेली असते.

**अंतःकरण रेषा**—ही रेषा गुरूचे अथवा शनीचे उंचवटच्यापासून निघून रवी, शनी, रवी व बुध ह्यांच्या उंचवटचाला वळसा घालून पंज्याच्या शेवटास जाते ती होय.

**लाईन ऑफ फॉरच्यून**—( **दैव** अथवा **धनरेषा** )– ही रेषा आयुष्यरेषा, मनगट व चंद्राचा उंचवटा ह्यापैकीं कोठूनहि निघून मधल्या बोटाच्या तळाशीं शनीचा उंचवटा आहे त्याकडे जाणारी जी रेषा ती होय.

**आरोग्यरेषा**—ही आयुष्य रेषा मनगटापासून निघून तिरकी मंगळाचे उंचवटच्यानजीक किंवा चंद्राचे उंचवटच्याचे माथ्यावर मस्तक रेषेला जाऊन भिडते व बुधाचे उंचवटच्यावर जाते. तिला आरोग्यरेषा म्हणतात.

**दि लाईन ऑफ आर्ट ॲण्ड ब्रिलिअन्सी** ( **रवी अथवा कलारेषा** )—ही रेषा मस्तकरेषा व आरोग्यरेषा ज्या ठिकाणीं मिळतात त्या त्रिकोणांतून उत्पन्न होऊन अनामिकेच्या तळाशीं असलेल्या रवीच्या उंचवटच्यावर जाते, तिला विद्यारेखा म्हणतात.

**गर्डल व्हीनस**—( **शुक्रकंकण** ) ) हें अर्ध वर्तुल कंकण, तर्जनी व मधलें बोट ह्यांमधून निघून शनी व रवी यांचे उंचवटे पोटांत घेऊन अनामिका व करांगुली ह्यांच्यामध्यें घुसलेलें असतें.

**व्हायालास्कॉव्हा ऑर मिल्की वे**—**आकाशगंगा**—ही रेषा मनगटापासून निघून फक्त चंद्राचा उंचवटा आक्रमिते.

**दि मार्शल ऑर मार्स लाईन**(**मंगलरेषा** )—ही रेषा आयुष्यरेषेच्या आंत तिला समांतर अशी असते. ज्याला आपण प्लेन ऑफ मार्स किंवा मंगलभूमि म्हणतों त्याला ट्रॅंगल–**त्रिकोण** असेंहि म्हणतात. हा धनरेषा, मस्तकरेषा, व बुध अथवा आरोग्यरेषा या तीन रेषांचा बनलेला असतो.

**क्वाड्रँगल-चतुष्कोण**—हा अंतःकरणरेषा, मस्तकरेषा, धनरेषा व रवी अथवा विद्यारेषा या रेषांनीं बनलेला असतो.

**मणिबंध आयुष्यकंकण**--हें पंजाच्या बुडाशीं मनगटावर असणाऱ्या रेषांचें होय. वरील रेषांपैकीं कांहीं मुख्य रेषांना पुढील टोपण नांवें आहेत.

**आयुष्यरेषेला**—व्हाया-( **आत्मरेषा** )-लाईन म्हणतात.

**मस्तक रेषेला नॅचरल**-( **स्वाभाविक** ) लाईन म्हणतात.

**अंतःकरणरेषेला मेंटल**-( **मानसिक** ) लाइन म्हणतात.

**धनरेषेला सॅटरनीअन**-( **शनीची** ) लाइन म्हणतात.

**विद्यारेषाला अपालोनीअन**-( रवीची रेषा ) लाइन म्हणतात.

प्राचीन व पाश्चात्य सामुद्रिकांनीं चार बोटांच्या १२ पेऱ्यांवर मिळून बारा राशी वाटून दिल्या असून त्यांचा उपयोग कोणती गोष्ट कोणत्या काळीं म्हणजे ऋतूंत घडतील हें सांगण्याचे कामीं उपयोग करीत. परंतु अर्वाचीन शास्त्रज्ञ यांचा उपयोग करीत नाहींत. आतां आपण पौर्वात्य पद्धतीच्या नकाशाचा विचार करूं.

## प्राचीनपद्धतीच्या रेषा

आपल्यामध्यें उंचवटे नाहींत. तेव्हां आपण रेषांचा विचार करूं. रेषा मनगटापासून निघून पाश्चात्यांच्या शुक्राच्या उंचवट्यास वळसा घालून तर्जनी व आंगठा यांच्यामध्यें ज्या तीन मुख्य रेषा जातात त्याला गोत्र, द्रव्य व आयुष्यरेषा असें म्हणतात. ह्यांतली तिसरी जी आयुष्यरेषा तिलाच आत्मरेषा म्हणतात. म्हणजे पाश्चात्यांची लाइफ लाइन ती हीच होय. दोघांचीं नांवें व रेषा बरोबर जमत आहेत. तसेंच त्याच्या आंत आपली द्रव्यरेषा आहे ती पाश्चात्यांची मार्शल अथवा सिस्टर लाईन होय. आपली तिसरी गोत्ररेषा मात्र त्यांच्यांत नाहीं; तथापि तिसरी रेषा क्वचित् आढळते, असा त्यांचा शोध आहे. परंतु आत्मरेषेलाच आपल्या इकडे

पुरुषरेषा असें म्हणतात व तिला आयुष्याची रेषा असें म्हणण्याचा प्रघात नाहींसा झाला आहे. ह्या आत्मरेखेच्या जवळून निघून पाश्चात्यांच्या चंद्राच्या उंचवट्याकडे जाणारी म्हणजे पाश्चात्यांची हेड लाइन हीच आपली स्त्रीरेखा होय.

पाश्चात्यांची जी हार्ट लाइन ती आपली हल्लीं प्रचारांत असलेली आयुष्यरेषा होय. (प्रचार म्हणजे हल्लीं आपलेकडील सामुद्रिक लोक मानतात ती.)

आपली जी धनरेषा तीच पाश्चात्यांची फॉरच्यून लाइन होय. ह्या रेषेंत बिलकूल मतभेद नाहीं.

आपली जी कनिष्ठोर्ध्व रेखा ती पाश्चात्यांची हेल्थ लाईन होय.

आपली जी अनामोर्ध्व रेखा ती पाश्चात्यांची लाइन आफ् आर्ट होय. ह्याशिवाय आपल्या तर्जन्योर्ध्व व अंगुष्ठोर्ध्व व अंगुष्ठतर्जन्योर्ध्व ह्या रेखा पाश्चात्यांत नाहींत व त्यांची आकाशगंगा-लाइन ऑफ लास्गिव्हा-आपल्यांत नाहीं. बोटांमध्यें शंख, चक्र, पद्म व शुक्तिका हीं आपल्याकडे आहेत, तीं नकाशांत बोटांमध्यें दाखविलीं आहेत. शिवाय आंगठ्यांतील यव चिन्ह पाश्चात्यांत नाहीं. ह्याप्रमाणें पौर्वात्य व पाश्चात्य पद्धतीच्या वरील नकाशावरून पूर्ण बोध होईल असें मानण्यास हरकत नाहीं. तेव्हां आतां आपण पाश्चात्यांच्या उंचवट्याचा विचार करूं. कारण ते फार महत्त्वाचे असे तिकडे मानिलेले आहेत.

## प्रकरण ९ वें

### उंचवटे

प्रत्येक उंचवट्याचीं फळें सांगण्यापूर्वी ह्या निरनिराळ्या ठेवणी अथव स्वरूप यांविषयीं विचार केला पाहिजे. म्हणजे पुढच्या फळांची

## चिन्हें, उंचवटे आणि हातावरील मुख्य रेषा.



कल्पना करण्यास बरें पडेल. हाताच्या आकृतीमध्यें प्रत्येक ग्रहाच्या उंचवट्याच्या जागा दिल्या आहेत त्या त्या ग्रहांच्या (फलज्यो-



तिषांतील ) दर्शक आहेत म्हणून दिलेल्या आहेत. हातांमध्यें जो उंचवटा सर्वांत चांगला उठावदार असेल त्याचा मनुष्याचे वागणुकीवर मुख्य अंमल असतो व त्याचे खालोखाल असणाऱ्या उंचवट्याचे त्याच्यापेक्षां कमी गुणधर्म आढळतात. तेव्हां हातांतील हे उंचवटे नीट पाहून मग स्वभाववर्णन करावें. क्वचित् एकच

उंचवटा उठावदार आढळतो त्यावेळीं त्या ग्रहाच्या अमलाचें शुद्ध स्वरूप दृष्टीस पडतें व त्याचें वर्णन करण्यास सोपें असतें. हातामध्यें कोणताही उंचवटा विशेष उठावदार नसून सर्वच उंचवटे सारखे असल्यास त्यांची विशिष्ट ठराविक तऱ्हेची वागणूक असलेली दृष्टीस पडते. जर हे उंचवटे मुळींच नसून त्यांच्या जागा सपाट किंवा त्या जागीं खड्डे आढळल्यास त्या माणसांत एकहि उत्कट गुण नसतो व त्याला कोणत्याही विशिष्ट गुणाचा विकास करतां येत नाहीं व त्याचें आयुष्य ताळतंत्ररहित असतें.

एखाद्याच्या हातांतील उंचवटा उंच असण्याचे ऐवजीं जर तो रुंद आणि पसरलेला असला किंवा त्याच्यावर बारीक रेषा असल्या तर त्याचें फल, उंचवटा फाजील वाढलेला असल्यास जें असते तेंच समजावें. ह्या उंचवट्यावर बारीक रेषांचें जाळें असल्यास त्या उंचवट्याच्या गुणधर्मांचा त्याचे ठिकाणीं इतका अतिरेक होतो कीं, त्याचे ते सद्गुण अतिरेकामुळें निरुपयोगी ठरतात. हींच लक्षणें उंचवटा फाजील वाढला असतांनाहि समजावींत. कारण उंचवट्याच्या आधिक्यामुळें त्या गुणाचा विकास होण्याचे ऐवजीं अतिरेक झालेला असतो. ह्या उंचवट्यावर एक रेषा असणें चांगलें, दोन असणें मध्यम व तीन किंवा तिहींपेक्षां जास्त असल्यास वाईट असें समजावें. जर उंचवट्यावर—विशेषत: शनी व रवीच्या उंचवट्यावर—आडव्या व उभ्या अशा रेषा असल्यास त्या वाईट समजाव्या. ह्या आडव्या व उभ्या रेषा जर बारीक असतील तर त्या जखमेचें द्योतक होत. त्या गुरूचे उंचवट्यावर असल्यास डोक्यास, शनीचे उंचवट्यावर असल्यास छातीला, रवीचे उंचवट्यावरील हातांना, बुधाचे उंचवट्यावरील पायांना व शुक्राचे उंचवट्यावरील इतर भागांस जखम दर्शवितात. म्हणजे ह्या उंचवट्याचीं फलें सांगतांना त्यांवरील रेषांचाहि विचार करावयास पाहिजे. कारण त्याचे योगानें त्यांच्या

फलांत बराच फरक पडतो. कांहीं कांहीं वेळेला हे उंचवटे आपली जागा सोडून दुसऱ्या उंचवट्याशेजारीं असलेले दृष्टीस पडतात व त्या वेळीं दोन्हींहि उंचवट्याचे मिश्रधर्म त्याचे ठिकाणीं आढळतात. तसेंच फलें सांगतांना उंचवटे, बोटें व हाताची ठेवण इतक्या गोष्टींचीं फलें लक्षांत घेऊन फलें सांगावींत. आतां प्रत्येक उंचवट्याचीं थोडक्यांत पण सविस्तर फलें सांगतों. कारण वरील दिलेल्या माहितीवरून जरी फलांचीं अनुमानें करितां येण्यासारखीं असलीं तरी प्रत्येक उंचवट्याच्या विशिष्ट फलांची माहिती असल्याशिवाय असें अनुमान करणें कठीण आहे व त्यासाठीं त्यांचे विशिष्ट गुणधर्म येथें देणें जरूर आहे. तेव्हां आतां आपण त्यांचा विचार करूं.

## गुरूचा उंचवटा

गुरूचा उंचवटा चांगला उठावदार असल्यास तो धार्मिक, महत्त्वाकांक्षी, सन्माननीय व निसर्गाची आवड असलेला, लोकांचें मनोरंजन करणारा, हौशी असा असतो. असले लोक मोठ्यानें बोलणारे, फाजील घमेंडीचे, न्यायी व समतोल बुद्धीचे व स्तुतिप्रिय असतात. त्यांची रहाणी चांगली असून बहुधा त्यांचा विवाह लवकर होतो. त्यांचें शरीर बांधेसूद असून ते देखणे असतात.

उंचवट्याची फाजील वाढ झालेली असल्यास मनुष्य उद्धट, जुलमी असा असतो व ह्याला अणीदार बोटांची जोड मिळाल्यास तो धर्मभोळा असतो व हें अप्पलपोटेंपणाचें लक्षण होय.

उंचवटा मुळींच नसल्यास अगर तेथें खड्डा असल्यास तो आळशी, धर्मभ्रष्ट, हलकट व व्यसनी असतो.

हातांमध्यें गुरूच्या उंचवट्याला शनीच्या उंचवट्याची जोड मिळाल्यास त्यांचें आयुष्य यशस्वी होतें. रवीच्या उंचवट्याची जोड मिळाल्यास तें संपात्ति व भाग्याचें लक्षण होय. बुधाच्या उंचवट्याची जोड मिळाल्यास तत्त्वज्ञान व शास्त्रें यांची आवड

असते. कवितांची त्यांना गोडी असून ते सद्वर्तनी व हुशार असतात व वैद्यकीच्या धंद्यांत चांगलें यश संपादन करतात. वाईट हातांत जर हें गुरु-बुधाचें मिश्रण झालें तर ते बढाई, थापेबाजी, ढोंगधतुरे आणि अनीति यांचें दर्शक असतें. मंगळाच्या उंचवटयाची जोड मिळाल्यास तो धीट व हिंमतबाज असतो. असले लोक आत्मविश्वासी, यशस्वी व नांवलौकिक मिळविण्याची आवड असणारे असें असतात. वाईट हातांत हें मिश्रण असल्यास तें उर्मटपणा, क्रौर्य, बंड करण्याची प्रवृत्ति आणि ताळतंत्ररहित अशा वागणुकीचें द्योतक होय. गुरूला चंद्राच्या उंचवटयाची जोड मिळाल्यास तो माणूस सन्माननीय, न्यायी व दयाळू असतो व शुक्राच्या उंचवटयाची जोड मिळाल्यास मनुष्य मिळून मिसळून वागणारा, साधाभोळा, उल्हासी, आस्थेवाईक, उदार आणि चैनी असा असतो. जर वाईट हातांत हें मिश्रण असेल तर तो नेभळा, दुबळ्या मनाचा, चंचल आणि जारकर्मी असा असतो; ह्याप्रमाणें गुरूच्या उंचवट्याच्या निरनिराळ्या स्थितींची व इतर उंचवट्यांशीं होणाऱ्या मिश्रणांचीं फळें आहेत. आतां शनीच्या उंचवट्याचा विचार करूं.

## शनीचा उंचवटा

शनीचें ( उंचवटयाचें ) प्राधान्यत्व दर्शविणाऱ्या हाताची ठेवण पुढीलप्रमाणें आढळते. लांब पंजा, हडकुळीं बोटें, त्यांतल्या त्यांत मधलें बोट जास्त लांब असून नखाचें पहिलें पेरें चांगलें भरदार असतें. उंचवटा भरदार नसल्यास तो रेषांनीं चांगला आच्छादिलेला असतो. हा शनीचा हात वाईट असल्यास हाताचें कातडें कठीण व खरबरीत असून मनगट जाड असतें.

शनीच्या उंचवटयाचें प्राधान्य ज्या हातांत असतें तो माणूस बरी अगर वाईट, कोणतीहि गोष्ट असो, तिची फारच खबरदारी घेणारा असा असतो. केव्हां केव्हां ह्या खबरदारीचा अतिरेक होतो.

हे लोक बारीकसारीक गोष्टीची काळजी वाहणारे, मनाला लावून घेणारे ( सेन्सेटिव्ह ), गूढ विद्येची आवड असलेले, नास्तिक "ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" या मताचे, चिडचिडे, दीन, भित्रे, एकान्तप्रिय असे असून बहारदारीच्या गाण्यापेक्षां त्यांना नीरस असें गाणें आवडतें. त्यांना शेतकी, बागाईत व खनिज यांची आवड असते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ज्या ज्या वस्तूंचा जमिनीशीं संबंध येईल असे सर्व धंदे, कला, अथवा पदार्थांची त्यांना आवड असते. ते बहुधा अविवाहित राहातात. ते एककल्ली, स्वसामर्थ्याची फाजील जाणीव असलेले आणि त्यांच्याबद्दल कोणाचें कांहींहि मत असो; त्याची ते बिलकूल पर्वा करीत नाहींत. हा उंचवटा क्वचितच फाजील वाढलेला दृष्टीस पडतो. कारण अशी वाढ असली कीं, जवळ जवळ तें नाशाचें द्योतक असतें. पण ह्याची फाजील वाढ झालेली दिसल्यास तो दुःख, खुनशीपणा, नास्तिकता आणि जिवावर उदार होऊन वाद किंवा अडथळा करण्यास सरसावणारा व आत्महत्यारी असा असतो. ह्या उंचवटचाला शुक्राच्या उठावदार उंचवटचाची जर जोड मिळाली तर ह्या दुर्गुणामध्यें पुष्कळच फरक होतो. शनीचा उंचवटा हातांत नसल्यास तो मनुष्य जगांत निर्माल्यवत् असतो. कारण दुर्दैव त्याच्या हात धुऊन मागें लागलेलें असतें व त्यामुळें त्याचे सर्व मनोविकार मारलेले असतात आणि त्यामुळें तो मेंगा बनलेला असतो. परंतु हातांत शनीचा उंचवटा नसून जर भनरेषा चांगली उठावदार असली तर त्याचें दुर्दैव कमी करण्यास तिची फार मदत होते. जर हा शनीचा उंचवटा आपली जागा सोडून गुरूच्या उंचवटचाकडे झुकलेला असला तर गुरु आपली जागा सोडून शनीचे उंचवटचाकडे झुकला असतांना जीं त्याचीं फलें असतात तींच याचीं होत. म्हणजे गंभीर मुद्रा आणि आवाज, शास्त्रें, पुराणें व इतर वाङ्मय यांत प्रावीण्य मिळविण्याची

इच्छा असते. ह्या शनीच्या उंचवट्याला जर गुरूच्या उठावदार उंचवट्याची जोड मिळाली तर तें शांत व सौम्य स्वभावाचें दर्शक होय. वाईट हात असल्यास त्यांना योग्य संधीचा उपयोग करून घेतां येत नाहीं. ते दीन, अपस्मारी आणि गाजरपारखी असे असतात. ह्याच शनीच्या उंचवट्यास बुधाच्या उंचवट्याची जोड मिळाल्यास तो पुराणवस्तुसंशोधक, आवडीचा विषय म्हणून एकाद्या शास्त्राचा व्यासंग करणारा, वैद्यशास्त्रांत नैसर्गिक गति असलेला आणि विविध विषयांची माहिती मिळालेला असा चौकस व बहुश्रुत असा असतो. हे लोक निवड व वर्गीकरण करण्यांत फार हुशार असून सुखी असतात. हात वाईट असला तरी हे शेवटचे गुण त्यांच्यांत सांपडतात; पण बाकीच्या गुणांच्या ऐवजीं दुर्मुखलेलीं, ठक, सूड घेणारीं, चोर व ढोंगी अशीं तीं माणसें असतात. ह्या शनीला मंगळाच्या उंचवट्याची जोड मिळाल्यास तो फाजील थट्टेखोरपणा, अधिकारावांचून सत्ता गाजवणारा, उद्धट, निर्लज्ज व मत्सरी असा असतो. शुक्राच्या व शनीच्या उंचवट्याची जोडी असल्यास ते गूढविद्या, धार्मिक व पवित्र कार्य, सारासारविचार व आत्मसंयम यांची आवड असणारा असा असतो. हात वाईट असला तर तें तऱ्हेवाईकपणा व भांडखोरपणाचें द्योतक होय. ह्या दोन्ही उंचवट्यांपैकीं शनीचा उंचवटा जास्त उठावदार असला तर तें ताठा व मत्सर व परदारगामित्वाचें द्योतक होय. ह्या शनीच्या उंचवट्याला चंद्राच्या उठावदार उंचवट्याची जोड मिळाल्यास त्याची गूढविद्येमध्यें उपजत विलक्षण गति असलेली आढळते. ह्या ठिकाणीं विशेष महत्त्वाची ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे ती ही कीं, हे लोक बहुधा अत्यंत कुरूप, खोडाळ आणि नानातऱ्हेच्या शारिरीक व्याधींमुळें शरीरावर, तोंडावर व हातांवर काळे डाग असलेले असे असतात.

## रवीचा उंचवटा ( दि माऊन्ट ऑफ आपोलो )

त्या रवीचें ( उंचवट्याचें ) प्राधान्य दर्शविणाऱ्या हाताची ठेवण खालीलप्रमाणें सांपडते. हाताचा तळवा व बोटें हीं दोन्ही सारख्या लांबीचीं असून बोटें नितळ व त्यांचीं अग्रें मिश्र असून तीं किंचित् चौकोनी असतात. तर्काचें पेरें चांगलें भरदार असून उंचवट्यावर एक फार खोल किंवा तीन ठळक अशा रेषा असतात. ज्यांच्या हातांत हा उंचवटा उठावदार असतो तीं माणसें कलाभिज्ञ असतात व ते कीर्तिमान, संपत्तिमान, बुद्धिमान, तरतरीत, उदार असे असतात. ह्या उंचवट्याचे लोक दुसऱ्याचें अनुकरण करणारे व स्वतःसंशोधक असे असून नेहमीं मोठमोठाले शोध लावणारे असे असतात. ते तापट, उदार व उपकारी वृत्तीचे असतात. तथापि त्यांना कोणाशीं फार सलोखा करावासा वाटत नाहीं व लोकाविषयीं त्यांना मोठा अभिमान असतो व कोणत्याहि तेजस्वी वस्तूची त्यांना आवड असते. उदा० रत्नें किंवा थाटामाटानें पूजोपचार वगैरे करणारे असे धार्मिक असतात. पण ते अंधश्रद्धमात्र नसतात. ह्या लोकांना जगाच्या पुढें चमकण्याची फार हौस असते. पण खोट्या स्तुतीची त्यांना बिलकूल आवड नसते. ते अज्ञ लोकांची समजूत घालण्याच्या भरीस पडत नाहींत व अनुयायांची पूर्ण सहानुभूति असल्याखेरीज ते त्यांना आपलें हृद्गत उकलून दाखवीत नाहींत. पण त्यांना वैवाहिक सौख्य मात्र नसतें. कारण त्यांची सौंदर्याची व्याख्या जगाच्या विरहीत असते. त्या रवीच्या उंचवट्याची फाजील वाढ झालेली असली तर तो उधळ्या, चैनी, मत्सरी व कारणाशिवाय रागवणारा असा असतो. असले लोक बढाईखोर असतात; पण त्यांच्या सभोंवतालच्या सर्व लोकांपेक्षां ते हुषार असून कवी, चितारी, गायनवादनकुशल व उत्तम नट असतात. त्या उंचवट्याची फाजील वाढ झालेली असल्यास बहुधा हाताची

ठेवण पुढीलप्रमाणें आढळते. वेडींवाकडीं बोटें ( स्पॉश्चुलेटेड ) व मऊ हात, उंचवट्यावर जाळीं आणि तर्काचें पेरें लहान व इच्छेचें ( वुइल ) पेरें मोठें असतें. हा उंचवटा दोन्हींहि हातांत नसल्यास तो माणूस निर्बुद्ध व जड असतो. जर त्या रवीच्या उंचवट्याला बुधाच्या उंचवट्याची जोड मिळेल तर तें न्याय, शाश्वतबुद्धि, दूरदृष्टी, शास्त्रीय संशोधनाची आवड व मितभाषण याचें द्योतक होय. त्या रवीला चन्द्राची जोड मिळेल तर तें समंजसपणा, कल्पनाशक्ति आणि कोमलांतःकरणाचें निदर्शक असतें. आणि शुक्ररवीची जोड असल्यास तें मिठ्ठास व हांजीहांजीखोरपणाचें द्योतक होय.

## बुधाचा उंचवटा ( दि माउन्ट ऑफ मर्क्युरी )

बुधाच्या उंचवट्याचें प्राधान्य असलेल्या हाताची ठेवण पुढीलप्रमाणें सांपडते. लांब व नितळ बोटें असून त्यांचीं अग्रें कठीण असलीं तर स्पॉश्चुलेट आकाराची किंवा अग्रें फारच मऊ असून निरनिराळ्या मिश्र आकारांचीं अशीं असतात. करांगुली लांब असून केव्हां केव्हां ती अणीदार असलेली आढळते व बुधाच्या उंचवट्यावर एक खोल रेषा असते. हातांत त्या उंचवट्याचें प्राधान्य असल्यास तें शास्त्रें, बुद्धिमत्ता, हुरूप, बोलण्याची हातोटी असणें, व्यापार, हुन्नर, सट्टा यांत नैसर्गिक गतीचें द्योतक होय. त्यांचे आचारविचार प्रमाणशीर असतात व त्यांना प्रवासाची फार आवड असते. वक्तृत्व हा ह्याचा मुख्य धर्म होय. हा उंचवटा उठावदार असून अणीदार बोटें असल्यास तें अमोघ वक्तृत्वाचें द्योतक होय. चौकोनी बोटाची जोड मिळाल्यास मुद्देसूद व विशद असें वक्तत्व असतें. स्पॉश्चुलेट ठेवणीची जोड मिळाल्यास त्याचें प्रतिपादन फार जोरदार असतें. लांब बोटें असल्यास पाल्हाळिक व आखूड बोटें असल्यास मुद्देसूद विवेचन असतें. रवीच्या उंचवट्याचें प्राधान्य असणाऱ्या वक्त्याच्या व

बुधाच्या वक्त्याच्या भाषणांत असें अंतर असतें कीं, तो रवीचा सडेतोड व उघड आरोप करणारा असून, बुधाचा माणूस वरून साखर पेरणारा असा मिठा ठक असतो. आणि ह्या उंचवट्याच्या ह्या गुणामुळें मोठमोठे कायदेपंडित निर्माण करण्याचें ह्यांत सामर्थ्य असतें; म्हणजे ते कायदेपंडीत असतात व ह्याला आखूड नखांची जोड मिळाल्यास हा गुण प्राधान्येंकरून सांपडतो. असले लोक खेळाडू असून कौशल्याच्या खेळांत तर ते फारच तरबेज असतात. शास्त्राच्या अखंड व्यासंगानें ते कोणत्याहि विषयांत फार निष्णात होतात व ह्यांच्यांत उपजतच भविष्यसूचक दृष्टी असते. त्यामुळें त्यांना सूचक स्वप्नें पडतात किंवा पुढें होणाऱ्या गोष्टींचें अगोदर ज्ञान होतें. त्यांना विषयसुखाची गोडी नसते. ते बहुधा आनंदी व दुसरें महत्त्वाचें काम नसल्यास मुलांशीं खेळण्याची त्यांना फार आवड असते. असले लोक बहुधा लवकर विवाह करतात व आपली भागीदारीण आपल्याला साजेशी पसंत करतात.

जर हातांत ह्या उंचवट्याची फाजील वाढ झालेली असेल तर तें शौर्य, लबाडी, ढोंग व ठकबाजी यांचें द्योतक होय. असले लोक बहुधा टाणेटुणे करणारे व अंधश्रद्धाळू असतात. ह्या उंचवट्याचें आधिक्य असलें तर बहुधा लांब वेडीवाकडीं बोटें आणि तीं बहिर्गत अशीं आढळतात. मऊ हात असल्यास उंचवट्यावर बऱ्याच जाळ्यामारख्या रेषा असून इच्छेचें पेरें जरा लांब असतें. उंचवटा मुळींच नसल्यास तो व्यापार व शास्त्रीय विषयाला निरुपयोगी असतो. हा उंचवटा साधारण असल्यास तो मनुष्य शांत व निश्चयी असतो. हा उंचवटा आपली जागा सोडून रवीकडे झुकला असल्यास तें चांगलें चिन्ह आहे. कारण तें शनीच्या उंचवट्याचे सर्व दुष्परिणाम नाहींसें करितें व उलट बाजूला झुकला असल्यास व्यापार दर्शवितो. हा बुधाचा उंचवटा चांगला उठावदार असून हातावर रवीची रेषा

चांगली असल्यास त्याला सट्टयांत पैसे मिळतात. ह्याला शुक्राच्या उंचवट्याची जोड मिळाल्यास तो विनोदी, आनंदी व सहानुभूतीचा असा असतो. शनीची व बुधाची फार मैत्री आहे. कारण शनीचे म्हणून जे जे दुष्परिणाम असतात, ते ह्याच्या जोडीनें ढळतात. व ह्या बुधाची लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे हातांतील इतर उंचवट्यांना ह्याची सहसा जोड मिळत नाहीं.

## मंगळाचा उंचवटा ( दि माउन्ट ऑफ मार्स )

ह्या मंगळाचें प्राधान्य असणाऱ्या हाताची ठेवण पुढीलप्रमाणें आढळते. तळवा कठीण, बोटें मोठीं, विशेषतः बोटांचीं तिसरीं पेरीं लांब असतात आणि अंगठ्याचें पहिलें बुइलचें पेरें लांब व दुसरें पेरें आंखूड आणि तळव्याचा मध्यभाग रेषांनीं व्याप्त असतो. ह्या उंचवट्याचें वर्णन करणें जरा कठीण आहे, कारण त्याचें स्वरूप इतर उंचवट्यासारखें साधें नाहीं. ह्या उंचवट्याचे दोन भाग आहेत. एक मंगळाचा उंचवटा व दुसरी त्याची भूमि ( प्लेन ऑफ मार्स ) असे आहेत. सध्यां आपण उंचवट्याचा विचार करूं. धैर्य, शांतपणा, प्रसंगावधान, निश्चय, अहंकार, प्रतिकार व हुकमत चालविण्याची शक्ति हे त्या उंचवट्याचे प्रधान गुणधर्म आहेत. हा उंचवटा चांगला उठावदार असून रेषांनीं व्याप्त नसल्यास व अंगठा लांब असल्यास तो फार आत्मसंयमी असतो. तसेंच मोठ्या आवाजाचा, तापट, विषयासक्त व उधळ्या असा असतो. ह्या लोकांचीं नेहमीं उशिरां लग्नें होतात. ते शुक्राच्या गुणधर्माची स्त्री पसंत करतात. कारण शुक्राचें व ह्याचें फार सख्य आहे. ह्या उंचवट्याची फार फाजील वाढ होऊन तो चोहोंकडे पसरला असल्यास किंवा त्यावर रेषांचा थवा असल्यास तो क्रोधी, अन्यायी, उद्धट, अडदांड, निष्ठुर व क्रूर असतो. ह्या उंचवट्यावरील रेषा नेहमीं

तापटपणाचें द्योतक होय व त्याला तिखटमीठ लावून गोष्टी सांगण्याची संवय असते. मंगलभूमि जर फाजील वाढलेली असेल व त्यावर रेषा असतील तर त्याला भांडणाची, द्वंद्वाची व युद्धाची फार हौस असते. विशेषतः आंखूड नखें असल्यास ह्याचें प्राधान्यत्व जास्त दिसून येतें. ह्या उंचवट्याची विशेष वाढ झाली असतांना अंतःकरणरेषा फार वाईट असून ती मस्तकरेषेस मिळालेली असते, व आयुष्यरेषा रक्तवर्ण असून अंगठा आखूड व वाकडा असतो. हा मंगळाचा उंचवटा बिलकूल हातावर नसल्यास तो भेकड आणि पोरकट असतो. रवी–मंगळांची जोड असल्यास तें कलेमधील टापटीप दर्शवितें आणि त्याच्या कृतींत जोर व सत्य असतें. ह्या मंगळाच्या उंच-वट्यास चंद्राची जोड मिळाल्यास तें जलप्रवासाची आवड उत्पन्न करतें. शुक्राची जोड मिळाल्यास गायनवादन व नर्तन ह्यांची त्यास आवड असून तो विषयासक्त असतो. बुध–मंगळांची जोड जमल्यास बोलण्यांत फार गडबड, उतावीळपणा, वाद करण्याची आवड, शब्दांच्या कोट्या व मस्करी करण्याची त्याला हौस असते. ह्या मंगळाच्या उंचवट्यास शनीच्या उंचवट्याची जोड मिळाली तर तो स्वमताभिमानी असून नीतीची त्याची ओळख नसते. शनीच्या गुणांना ह्याच्यायोगानें चांगलीच पुष्टी मिळते.

## चंद्राचा उंचवटा ( दि माऊन्ट ऑफ दि मून )

चंद्राच्या उंचवट्याची प्रामुख्यदर्शक हाताची ठेवण पुढीलप्रमाणें असते. हे हात बहुधा फुगीर व मऊ असतात. बोटें आखूड, नितळ आणि अणिदार असून अंगठ्याचें दुसरें पेरें लहान असतें. ह्याचे सर्व उत्तम गुण ज्या माणसांत असतात त्याच्या हातांत हा उंचवटा मनगटाकडे अथवा मधोमध फुगलेला असतो. जर ह्याचा मध्यभाग फारच फुगलेला असेल तर ते त्वचांतर्गत अशक्तता दर्शवितात.

टोंकाला फुगलेला असल्यास ते पित्तप्रकृति, संधिवात आणि खोकला उत्पन्न करतात. हात कठीण असल्यास आपल्या कल्पनेच्या भरांत आपल्या हातानें स्वत:वर संकट ओढून घेतो. ह्याला स्पॉश्चुलेट बोटांची जोड मिळाल्यास तो सदैव हवेंत मनोरे बांधणारा असतो. ह्या उंचवटयाचें व अणिदार बोटांचें फार साधर्म्य असल्यामुळें अशीं बोटें असल्यास ह्या उंचवटयाचे गुणधर्म विशेष रीतीनें दृग्गोचर होतात. परंतु चौकोनी बोटांची त्यास जोड मिळाल्यास त्याचें लक्ष कल्पना आणि वस्तुस्थिति यांची सांगड घालण्यांत गुंततें व त्यांत त्याला यश न आल्यामुळें तो नेहमीं उदास असतो व हीं बोटें बरींच लांब असल्यास त्यांत आणखी असंतोषाची भर पडते. कल्पना, औदासीन्य, ब्रह्मचर्य, आध्यात्मिक, काव्य आणि एकांतप्रियता हे ह्याचे मुख्य धर्म आहेत. असले लोक चंचल, अप्पलपोटे आणि आळशी असतात. त्यांच्या एकांतप्रियतेमुळें त्यांची अंतर्दृष्टी विकास पावते व त्याच्या योगानें त्यांना सूचक स्वप्नें पडूं लागतात आणि भविष्यदृष्टी उत्पन्न होते. त्यांना जलपर्यटनाची फार हौस असते. ते धार्मिक असतात असें म्हणण्यापेक्षां गूढसंशोधक असतात. ते मोठे कवी असतात; परंतु त्यांना आत्मविश्वास नसतो व भाषणानें त्यांना आपलें मनोगत दुसऱ्याला समजावून देण्याची हातोटी नसते. त्यांचे विवाह नेहमींच्या पद्धतीला सोडून चमत्कारिक रीतीनें होतात. हा उंचवटा फार वाढला असल्याच तो चंचल, अडाणी, चिडचिडा, असंतोषी, धर्मभोळा आणि चुक्या करणारा असतो. असल्या लोकांना डोकेंदुखीची व्यथा असते व त्यांना दु:खद आणि करुणापर स्थितीचा विचार करण्यामध्यें थोडेंसें सुख वाटतें. हा उंचवटा उंच असण्याऐवजीं फार लांब असल्यास तें एकांतप्रियता व विचारी स्वभावाचें द्योतक आहे. हा उंचवटा मुळींच नसल्यास त्याला विचारशक्ति नसून तो अप्रबुद्ध व मंदबुद्धीचा असतो. चंद्राचा व बुधाचा हे

दोन्ही उंचवटे सारखे असल्यास ते शास्त्रांत प्रावीण्य देऊन मनुष्याला प्रसिद्धीला आणतात. शुक्राची या चंद्राच्या उंचवट्याला जोड मिळाल्यास नाटकें, शृंगार वगैरे मनरंजनाच्या गोष्टींच्या तो नादीं असतो. शनीची व याची जोडी असल्यास तो भित्रा, अप्पलपोट्या असा असून त्याला अपचनाचा विकार असतो.

## शुक्राचा उंचवटा ( दि माऊन्ट ऑफ व्हीनस. )

ह्या उंचवट्याचें प्राधान्य दर्शविणाऱ्या हाताचा आकार पुढीलप्रमाणें आढळतो. हात लठ्ठ असून उंच, सखल असा, बोटें व अंगठा आंखूड असून नितळ असतात. हा उंचवटा बिघडला असल्यास तळवा फारच मऊ, बोटें अणीदार अशीं असून तो रेषांनीं आच्छादलेला असतो. मंगळाची रेषा आयुष्यरेषेच्या आंत उमटलेली असते आणि आकाशगंगा हातावर उमटलेली दृष्टीस पडते. सौंदर्य, नाचरंग, गाणें व बजावणें, रसिकता, कोमलता आणि सदोदित सुखोपभोग आणि चैनीची लालसा हे त्याचे मुख्य धर्म होत. खरोखर हा उंचवटा म्हणजे संगीताचा साठाच होय. प्रख्यात व गायनपटु गवयांच्या हातांत हा हटकून उठावदार असलेला सांपडावयाचाच. ह्याचें सौंदर्य गुरूच्या उंचवट्याच्या उलट म्हणजे स्त्रियांच्या सौंदर्याच्या धर्तीचें असतें. ह्या उंचवट्याचे लोक सुखी व मंडळीचे हव्यासी असतात. स्तुतिप्रिय, भांडणतंट्यांत पाय मागें घेणारे व रंगेल असे असून ते नेभळे असतात. संगीत, चित्रकला व काव्य यांत त्यांची नैसर्गिक गति असते. मग ते तीं वाढवोत कीं न वाढवोत. त्या उंचवट्याची फाजील वाढ झालेली असल्यास तो व्यभिचारी, व्यसनी, बढाईखोर व बडबड्या असा असतो. हा उंचवटा मुळींच नसल्यास तो आळशी, कठोर, मंदबुद्धी असतो. ह्याच्यावर मुळींच रेषा नसल्यास तें ब्रह्मचर्याचें दर्शक आहे. पण बहुधा तो

माणूस अल्पायु असतो. अशा तऱ्हेचे हे पाश्चात्यांचे उंचवटे असून त्यांचे स्वभावधर्म व पंजाच्या ठेवणी वरीलप्रमाणें आहेत. आतां आपण हस्तरेषांचा विचार करूं.

## हस्तरेषा

रेषांच्या फलांचा व मुख्य रेषांचा विचार करण्यापूर्वी पौर्वात्य व पाश्चात्य या दोघांनीं या रेषा साधारणतः किती प्रकारच्या असतात व त्यांचें स्वरूप कसें असतें आणि त्या त्या स्वरूपांचीं फलें काय असतात ह्याचें प्रथम नीट दिग्दर्शन केलें पाहिजे. कारण मुख्य मुख्य रेषांचीं दिलेलीं बरींवाईट फलें त्यांच्या ह्या स्वरूपावर फार अवलंबून असतात; आणि त्यांचें हें स्वरूप अगोदर ध्यानांत घ्यावयास पाहिजे. म्हणजे रेषांच्या फलासंबंधीं वाचकांचा बिलकूल घोटाळा होणार नाहीं. पुढें येणाऱ्या रेषांचीं निरनिराळीं स्वरूपें नीट ध्यानांत यावीं एवढ्याकरितां पुढें त्यांचा नकाशा देणार आहों. त्यांवरून त्यांची नीट कल्पना येण्यास बरीच मदत होईल. असो. आतां आपण ह्या रेषांच्या स्वरूपासंबंधीं पौर्वात्यांचें काय मत आहे तें पाहूं.

## पौर्वात्य पद्धति

रेखा अप्यनुरेखाश्च उपरेखाश्च सूक्ष्मगाः
प्राणिकर्मानुसारेण देहजाः फलसूचकाः
स्वरूपानुगुणं तासां फलं वाच्यं मनीषिणा
विरुद्धफलयोर्योगे प्रबलस्यैव संभवः
तदेकफलयोर्योगे प्राबल्यं परिकीर्तयेत्

प्रथम मुख्य रेषा, दुय्यम रेषा, त्यांच्याहून लहान व त्यांहून सूक्ष्म रेषा अशा चार प्रकारच्या रेषा असून प्राण्याच्या कर्माप्रमाणें

जीं जीं सुखदु:खें त्याच्या वाट्याला यावयाचीं असतील तीं तीं फळें ह्या रेषा सुचवीत असतात व तीं त्यांच्या स्वरूपांवरून व साधक-बाधक प्रमाणांवरून सांगावीत असें सांगितलें आहे. नंतर रेषा फार असणें व कमी असणें असें त्याचें,

रेखाभिर्बहुभिः क्लेशं स्वल्पाभिर्धनहीनता
रक्ताभिः सुखमाप्नोति कृष्णाभिः क्लेशतां व्रजेत्

मुख्य दोन भाग करून त्यांचीं फळें निर्धनता, दुःख व अल्पायुष्य अशीं सांगून मग ते रेषांच्या वर्णाकडे वळले आहेत. ह्या वर्णांचे गुणधर्म मागें सांगितले असल्याकारणानें पुन्हा येथें देत नाहीं; तरी ते पहावे व ते पुष्कळ तऱ्हेचे असून त्यांचीं निरनिराळीं फळें देऊन मग रेषा कशी असावी हें त्यांनीं सांगितलें आहे.

अच्छिन्ना गंभीरा पूर्णा रक्ताब्जदलनिभामृदुला
अन्तर्वृत्ता स्निग्धा कररेखा शस्यते पुंसाम्

न तुटलेली, सरळ, पूर्ण लांबीची, रुंदट नसून रेखीव व तेजस्वी अशी असणारी रेषा चांगली असें मानिलें आहे. नंतर

पल्लविता विच्छिन्ना विषमाः पुरुषाः समःस्फुटितरूक्षाः
विक्षिप्ताश्च विवर्णा हरिताः कृष्णाः पुनरशुभाः
पल्लवितायां क्लेशश्छिन्नायां जीवितस्य संदेहः
विषमायां धननाशः पुरुषाणां कदशनंतस्याम्
लघ्व्यापुनर्नराणां लघुरिह दीर्घायदीर्घयावंशः
परिभिन्नो विज्ञेयः प्रतिभिन्नायाच्छिन्नयाच्छिन्नः
याति शाखान्विता वल्ली यद्वदायुष्यरेखिका
पूर्णा शतायुषं दद्यादंतरे मध्यमायुषं
कुरुते पुरुषं कंचित्सच्छिद्राकानजां मृतिं

सकंटकत्वे विपदो नीरंध्रत्वे तु जीवनं
रेखान्वितात्यविधवां कुर्यात्संभोगिनीं स्त्रियं
रेखायुग्मात्यंतलग्ना सुखभोगप्रदाशुभा

टोंकाला फाट्यांचा झुबका झालेली, तुटलेली, असम व वेडी-वांकडी असलेली रेषा वाईट व त्याचीं फळें अनुक्रमें क्लेश, अल्पायु धननाश अशीं दिलीं आहेत. नंतर लहान, दीर्घ लांब, खंडित व एकांतून एक निघालेल्या, तुपाराच्या डाहळ्यासारख्या, वेलीसारख्या, सांखळीसारख्या, सच्छिद्र व फाटयाच्या रेषा असतात आणि अल्प संतति, पुष्कळ संतति, संतति थोडी जगणें व मुलींच न जगणें, वेलीसारखी छिद्ररहित किंवा जोड रेषा असल्यास चांगली व अस्पष्ट आणि सांखळीसारखी असल्यास वाईट असें त्यांच्या फळांचें साधारण दिग्दर्शन आहे.

## पाश्चात्य पद्धति.

हातांतील रेपा सुस्पष्ट, ठळक, नीट व उत्तम वर्णाच्या असून रुंदट व फिक्कट अशा नसाव्यात. तसेंच त्यांना फाटे फुटलेले नसावेत. त्या भग्न, विषम किंवा दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेनें दूषित झालेल्या नसाव्यात. कारण त्या अडथळ्यामुळें अथवा वैगुण्यामुळें तिच्या मूळच्या स्वरूपांत व फलांत बराच फरक पडतो. प्रथम त्यांनीं रेषांच्या ( पेल लाइन्स, रेड लाइन्स, यलो लाइन्स, लिव्हिड लाइन्स ) वर्ण-संबंधीं फलें दिलीं आहेत. ( व हीं फळें वर लिहिल्याप्रमाणें पूर्वीच्या प्रकरणांत दिलीं आहेत तीं पहावींत. ) या रेपांचे मुख्य रेषा ( मेन-लाइन्स ), दुय्यम रेपा ( सेकंडरी लाइन्स ), उपरेषा ( मायनॉर लाइन्स ), सूक्ष्म रेषा ( हेअरी लाइन्स ), विपुल रेषा ( व्हेरी मेनी लाइन्स ), अल्परेषा ( फ्यु लाइन्स ); रेखाभाव ( नो लाइन्स ), सरळ व चांगल्या रंगाची ( नीट ॲन्ड वेल कलर्ड ), पल्लवित

( टॅसल्ड टर्मिनेशन्स ), सकंटक ( फोर्क्ड टर्मिनेशन्स ), भग्नरेषा ( ब्रोकन लाईन्स ), शाखान्वित ( असेंडींग एन्ड डिसेंडींग ब्रांचेस ), विक्षिप्त ( वेव्ही लाईन्स ), पातळ व जाड ( थिन अॅन्ड ब्रॉड ), रश्मिजाल ( कॅपिलिअर्ड लाइन्स ), व रेखायुग्म ( सिस्टर लाइन्स ) असे सोळा प्रकार केले आहेत. याप्रमाणें रेषांचें वर्गीकरण, स्वरूप व फलानुमान आहे. नंतर त्यांनीं ह्या रेषांसंबंधीं असा एक ढोबळ नियम दिला आहे कीं, जन्म दिवसां असल्यास उजव्या हातांतील रेषा स्पष्ट व ठळक असतात आणि रात्रींचा जन्म असल्यास उजव्या व डाव्या हातावरील रेषा जास्त ठळक व स्पष्ट असतात. दुसरा असा नियम आढळतो कीं, जन्म दिवसां असल्यास त्याचें पित्याशीं फार साम्य असतें व रात्रींचा जन्म असल्यास मातेशीं साम्य असलेलें आढळतें. तसेंच रेषा चांगली जरी असली तरी उंचवटे बिघडलेले असल्यास तिच्या गुणधर्मांत वैगुण्य येतें.

( ब्लॅक स्पॉट्स् ऑन ए लाइन ) बिंदुयुक्त रेषा असल्यास तें स्नायुगत रोगाचें दर्शक ( नर्व्हस डिझीज ) असतें व हे बिंदु ज्या रेषेवर असतील व ती रेषा ज्या ज्या अवयवाची निदर्शक असेल तो शरीराचा अवयव दूषित आहे असें समजावें.

( रेषांचें स्थित्यंतर ) ह्या रेषांसंबंधीं अशी गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, ह्या रेषा वाढतात, आंखूड होतात व पार नाहींशा होतात. अशी स्थिति असल्यामुळें मनुष्याचें इतर भविष्य सांगण्याचें तर दूरच राहिलें; पण स्वभावचित्रहि रेखाटावयास पंचाईत होईल असें वाटण्याचा संभव आहे, पण रेषांमध्यें कितीहि जरी फरक झाले तरी त्याच्या कायम स्वरूपाच्या निदर्शक खुणांमध्यें कांहींहि फरक होत नाहीं व त्यांमुळें ह्या निरर्थक भीतीचें कारण नाहीं. रेषांचे हे

होणारे फरक आपल्या शास्त्रज्ञांना माहीत होते, हें मागील लेखांकांत दिलेंच आहे. तसेंच रेषांचीं फलें सांगतांना तीं एका हातांतील रेषेवरून न सांगतांना दोन्ही हातांतील रेषा विचारांत घ्याव्यात; विशेषत: वाईट फल सांगतांना ज्यास्त काळजी घ्यावी. कारण एका हातांतील रेषेवरून फक्त संकटांचा तेवढाच बोध होतो; पण तें संकट अमुकच काळीं येईल किंवा तें खात्रीनेंच येईल हें सांगतां येत नाहीं. तर हातांतील इतर रेषा, उंचवटयाची स्थिति व पंजाची ठेवण इतक्या गोष्टी विचारांत घेऊन होणारें अनुमान व त्याचा काल निश्चित करावा. म्हणजे अनुमान व अनुभव ह्यांत बिलकूल तफावत पडणार नाहीं.

रेखायुग्म अथवा जोड रेषा जेव्हां मुख्य रेषेला समांतर अशा तितक्याच लांबीच्या जोडरेषेचा आधार मिळतो, त्या वेळीं ती दुसरी रेषा त्या मुख्यरेषेचें फळ द्विगुणीत करतें अथवा त्याचें अनुभवास येणारें फल अगदीं निश्चित असतें किंवा त्याचे होणारे परिणाम वाईट असल्यास त्याचा होणारा परिणाम तितका जाणवत नाहीं. उदाहरणार्थ, मुख्यरेषा तुटलेली असून त्याची जोड रेषा तुटलेली नसली तर त्या मुख्यरेषेच्या होणाऱ्या वाईट फलांचा परिणाम ही जोड रेषा होऊं देत नाहीं; परंतु जर का ह्या दोन्हीहि रेषा तुटलेल्या असल्या तर मात्र मुख्य रेषेनें दाखविलेलें वाईट फल हटकून मिळणार असें समजावें व चांगलें असल्यास अधिक चांगलें होईल असें समजावें.

**व्हेरी मेनी लाइन्स इन दि पाम:**–( बहू रेखा ) जर हाताचा तळवा जाळ्याप्रमाणें आडव्या उभ्या बारीक रेषांनीं फार आच्छादिलेला असला, तर तें स्वत:विषयीं व भोंवतालच्या परिस्थितीविषयीं असमाधान उत्पन्न करितें व त्याचें मन नेहमीं उदास असतें; आणि

तळवा मृदु असून जर पंजाची ठेवण स्पॅश्चुलेट असली तर ह्या रेषा नेहमीं चिंता व शरीरप्रकृतीची कुरकुर ह्याचें द्योतक होत.

**फोर्क अॅट दि एन्ड ऑफ ए लाईन:**—(सकंटक रेषा) रेषेच्या शेवटीं फाटे फुटले असल्यास ती चांगली खूण असून मूळच्या रेषेचें फल ते वृद्धिंगत करितात.

**टॅसल्ड अॅट एन्ड:**—( पल्लवित रेषा ) रेषेच्या शेवटीं घुमाऱ्या सारखे किंवा झुबक्यासारखे बारीक बारीक फाटे फुटलेले असतात. तें दुबळेपणाचें द्योतक असून तें चिन्ह चांगलें नव्हे.

**असेंडिंग अॅन्ड डिसेंडिंग ब्रँचेस:**—( शाखान्वित रेषा ) कोणत्याहि महत्त्वाच्या रेषेला वर फाटे फुटलेले असल्यास चांगले व खालीं फुटलेले असल्यास वाईट. वरील रेषा ज्या रेषेला फुटलेल्या असतील त्याचे गुणधर्म बरेच वाढवितात. उदाहरणार्थ अंत:करण रेषेला हे फाटे असल्यास तें प्रेम आणि भक्ति यांची वृद्धि करतें. मस्तक रेषेवरील बुद्धिमत्ता व हुशारी, धन रेषेस असल्यास तें दैव यांची वृद्धि करतें. बहुधा ह्या शाखा रेषेच्या टोंकाला किंवा प्रारंभाला असतात.

**चेन्ड लाइन्स:**—( सच्छिद्र रेषा ) साखळीसारखी रेषा असल्यास ती अडचणी, भांडणें वगैरे प्रसंग आणिते.

**वेव्ही लाइन्स:**—( विक्षिप्त रेषा ) वक्र रेषा असल्यास तें दुर्दैवाचें द्योतक आहे, तसेंच भग्न रेषा ( ब्रोकन लाइन्स ) असल्यास त्याचें फल फार वाईट असतें.

**कॅपिलरीज्:**—( रश्मीजाल ) जेव्हां रेषा सरळ एकेरी निघण्याचेऐवजीं पुष्कळ सूक्ष्म रेषांची बनलेली असते ( फवाऱ्यासारखी ) व अग्राला एक झालेली असते अशी रेषा असणें वाईट होय. ह्याप्रमाणें पाश्चात्यांनीं १२ भाग किंवा प्रकार केले असून त्यांचीं फलें वर दिल्याप्रमाणें आहेत. पाश्चात्यांचा बिंदुयुक्त रेषा हा भाग

आपल्यामध्यें नाहीं. असो. आतां आपण मुख्य रेषांकडे वळूं. कारण रेषांचीं निरनिराळीं स्वरूपें व त्यांचे गुणधर्म यांची आपणांस पूर्ण माहिती झाली आहे; परंतु आतां विस्तार बराच झाला असल्यामुळें त्याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

## आयुष्यरेषा–विचार

**पूर्वमायुः परीक्षेत पश्चाल्लक्षणमीरयेत्**
**आयुर्हीननराणां तु लक्षणं किं प्रयोजनं**

मुख्य रेषा चार आहेत. " पुंस्त्र्यायुर्धनरेखास्तु चतस्रः प्रसराः करे " असे दोहोंकडील शास्त्रज्ञ मानतात. तथापि कांहीं ग्रंथकारांच्या मतें या तीनच मानणें जास्त सयुक्तिक होय. कारण धन रेषा जरी बऱ्याच हातांवर सांपडत असली तरी आयुष्य रेषा, बुद्धिरेषा व अंतःकरण रेषा ह्या तीन रेषा जशा यच्चयावत मनुष्याच्या हातांवर असतात व ह्याला अपवाद म्हणून एखादें उदाहरण पाहूं गेलों असतां सांपडणें जसें फार दुर्मीळ असतें, तसें मात्र धनरेषेचें नाहीं. तिचें अस्तित्व पुष्कळ हातांवर आढळत नाहीं म्हणून चार मुख्य रेषा मानण्यापेक्षां त्या तीनच मानणें जास्त सयुक्तिक होय. परंतु त्याबरोबरच ही चौथी रेषा दुय्यम प्रतीची आहे असें मात्र कोणीच समजत नाहींत. कारण ढोबळ दृष्टीनें त्याचा विचार करितां ह्या चार रेषा बहुधा पुष्कळांच्या हातांवर आढळतात आणि म्हणूनच दोहोंकडील सर्व शास्त्रज्ञांनीं मुख्य रेषांचा उल्लेख करितांना तीनच्याऐवजीं चार असाच केला आहे. ह्या चार मुख्य रेषांत आयुष्यरेषाही अत्यंत महत्त्वाची होय. कारण कोणत्याही प्राण्यांचें जीवीत, मरण, सुखदुःख, लाभालाभ वगैरे गोष्टी

त्याच्या अस्तित्वावर अवलंबून असतात आणि कोणाच्याहि आयुष्याबद्दल आपण जेव्हां जेव्हां बोलत असतों तेव्हां तेव्हां हें आयुष्य त्या त्या व्यक्तीच्या अस्तित्वाचें दर्शक असतें, तेव्हां आयुष्य म्हणजे प्राण्याचें अस्तित्व, व वरील श्लोकांत नमूद केल्याप्रमाणें त्या अस्तित्वाच्या अभावीं इतर सर्व लक्षणें कुचकामाचीं ठरत असल्यामुळें, इतर गोष्टींचा विचार करण्याच्या अगोदर त्या आयुष्याचा विचार करावयास पाहिजे, व ह्या चार रेषांत आयुष्यरेषा ही त्याची निदर्शक असल्याकारणानें सर्व रेषांमध्यें ती अत्यंत महत्त्वाची गणली गेली आहे, आणि त्यामुळें आपणांस ह्या रेषेचा प्रथम विचार करणें भाग आहे.

## आयुष्य . रेषा

त्या शास्त्रातही आयुष्यरेषा जितकी महत्त्वाची आहे तितकीच ही आयुष्य रेषा कोणती ह्याबद्दल दोहोंकडील शास्त्रज्ञांमध्यें असलेला विरोध आकृती व नकाशा यावरून दिसून येईल. पाश्चात्यांची जी अंतःकरणरेषा ती पौर्वात्यांची आयुष्यरेषा होय, व पौर्वात्यांची जी आत्मरेषा ती पाश्चात्यांची आयुष्यरेषा होय. तेव्हां ह्यांतली कोणती आयुष्यरेषा मानावी हा मोठा बिकट प्रश्न उद्भवतो व तो समाधानकारक रीतीनें सुटल्याखेरीज त्यासंबंधींचें अनुमान करणें धोक्याचें होय. शिवाय आयुष्याचाच अंदाज आपणांस बांधतां आला नाहीं तर मग त्यांच्या इतर सुखदुःखांचा विचार करून तरी काय उपयोग ? असा दुहेरी पेच आपणांस पडतो. तेव्हां आपणहि ह्या प्रश्नांचा स्वानुभव व शास्त्र अशा दोन्ही दृष्टीनें विचार करूं; म्हणजे त्यांचा उलगडा होण्यास फारसें कठीण जाणार नाहीं. परंतु आज आपण येथें फक्त दोहोंकडील शास्त्रज्ञांनीं नमूद करून ठेविलेल्या अनुभवांची तुलना करीत असल्याकारणानें, हा तुलनात्मक विचार होऊन जाई

तोंपर्यंत स्वानुभवाच्या दृष्टीनें विचार करितां येत नाहीं; त्यामुळें तूर्त आपण एकाच दृष्टीनें विचार करूं, व भविष्यकथनाच्या भागाचे वेळीं स्वानुभवाच्या दृष्टीनें आपण त्याचा सांगोपांग विचार करूं.

पौर्वात्य पद्धति.

स्त्रीरेखोत्तरहस्तस्य मध्ये तिर्यक्प्रसारिणी
पूर्णाहस्तांतमारभ्य तर्जनीमध्यमांतरे
याति शाखान्विता वल्ली यद्वदायुष्यरेखिका
आपाणिकरमूलात् सा भागान्निःसृत्यांगुष्ठतर्जनीमध्ये
आद्या भवंति तिस्रो गोद्रव्यायुषा रेखाः
ऊनाप्युनायुषं कुर्यात् रेखा चांगुष्ठमूलगाः
अल्पायुषे लघुच्छिन्ना दीर्घच्छिन्ना महायुषे

स्त्री रेखेच्या उत्तरेकडे असलेली व मूठ मिटली असतां तिच्या बाहेरील बाजूनें निघून करांगुलीच्या आनामिका व मधलें बोट यांच्या कडेनें जाऊन तर्जनी व मधलें बोट ह्यांच्यामध्यें जी रेषा जाते तिला आयुष्य रेषा असें म्हणतात. शिवाय या रेषेची अशी विशिष्ट खूण दिलेली आहे कीं, ही वेलीसारखी असते व तिला फांद्या फुटलेल्या असतात व हीच रेषा आयुष्याची म्हणून आपल्याकडे लोकांत व शास्त्रांत रूढ झालेली आहे. परंतु मनुष्याचें आयुष्य सर्वस्वीं ह्याच रेषेवर रहावें असा आपल्या शास्त्रकारांचा आशय दिसत नाहीं; कारण त्यांनीं रेषेशिवाय मनगटापासून निघून तर्जनी व अंगठा ह्यांमध्यें जाणाऱ्या अशा तीन रेषा असतात. व अनुक्रमें गोत्र रेषा द्रव्य रेषा, व आयुष्य रेषा असें म्हणतात असें सांगितलें आहे. ह्यांतील " आद्याः " ह्या शब्दानें अनुक्रम न धरितां नेहमींच्या मुख्य तीन रेषा असें मानल्यास आपण धरलेल्या आयुष्य रेषेस

त्याचा विरोध येणार नाहीं, असें कोणी म्हणतील; परंतु त्याला अशी अडचण येते कीं, ह्या तिन्ही रेषा अंगठा व तर्जनी ह्यांच्यामध्यें जातात असें त्यांनीं सांगितलें आहे व ह्या व्याख्येस अनुसरून विचार करावयाचा. आपल्या आयुष्याच्या व्याख्येप्रमाणें ही रेषा, अंगठा व तर्जनीं ह्यांमध्यें जात नाहीं असें आपले शास्त्रकारच सांगत आहेत. बरें रेषा जाते असें जरी आपण धरलें तरी दुसरी अडचण अशी उद्भवते कीं, आपल्या स्त्रीरेषेला द्रव्यरेषा मानावें लागेल व ही द्रव्योत्पादक रेषा आहे असें कुठेंहीं सांगितलेलें नाहीं. शिवाय ही रेषा मनगटापासून निघत नाहीं व आपल्या आयुष्यरेषेप्रमाणें हाताच्या इकडल्याही टोकापासून ( मुठीच्या बुडा-पासून ) निघत नाहीं. आतां राहिली धन रेषा; पण ती पहिल्या तीन मुख्य रेषांत येत नाहीं व दुसरें ती कधींच अंगठा व तर्जनी यांच्यामध्यें जात नाहीं आणि करमूल . म्हणजे मनगट असेंच मानलें जातें, व मुठीच्या टोंकाला करमूल असें मानीत नाहींत. इतकें विरोध त्या " आद्या " शब्दाचा अर्थ मुख्य असा घेतला असतांना येतात. तेव्हां त्या आद्या शब्दाचा अर्थ क्रमानें असाच घेतला पाहिजे. त्याशिवाय दुसरा आधार असा आहे कीं, अंग-ठ्याच्या बुडाशीं जर लहानलहान पुष्कळ रेषा असतील तर तो अल्पायु समजावा. तसेंच लहान व छिन्नभिन्न रेषा असतील तरीही अल्पायु व मोठ्या रेषा छिन्नभिन्न असतील तर मध्यमायु समजावा असें सांगितलें आहे. म्हणजे आंगठ्यांजवळच्या रेषाहि आयुष्याचा विचार करितांना पहाव्यात असें आपल्या शास्त्रकारांनीं सांगितलें आहे. यावरून वरील श्लोकाचा आपण सरळ अर्थ घेऊन आद्य म्हणजे क्रमानें शुक्राचे उंच वट्याला वळसा घालणाऱ्या तीन रेषा असा करणेंच बरोबर आहे. त्याशिवाय त्याचा मेळ बसत नाहीं. तेव्हां पश्चात्यांची जी आयुष्यरेषा

तीच आपल्या ग्रंथाप्रमाणें आयुष्यरेषा होय असें स्पष्टपणें दिसतें. आतां येथें तीन रेषा असतात असें सांगितलें आहे. तेव्हां पाश्चात्यांची जी आयुष्यरेषा तीच ही आपली गोत्राची रेषा व ह्याच्या पुढें क्रमानें रेषा असून त्या द्रव्य व आयुष्य रेषा कशावरून नसतील, असा एक प्रश्न येईल. परंतु पाश्चात्यांची आयुष्य व आपली आत्मरेखा ही आंगठ्याकडील रेषांची शेवटची मर्यादा असून त्याच्याबाहेर अशा आकाराच्या रेषा आढळत नाहींत. तर सर्व रेषा आंतच असतात. त्यांची मार्शल लाईन ही त्या रेषेच्या आंतच आहे. तेव्हां ही तिसरी 'रेषा,' जिला आपण आत्मरेखा म्हणतों तीच ही रेषा होय असें मानावें लागतें व तिच्या आंत द्रव्यरेषा ( म्हणजे पाश्चात्यांची मार्शल लाईन, कारण हिच्यावरूनही ते सांपत्तीक स्थितीचा विचार करतात ) व तिच्या आंत गोत्ररेषा असते. असें धरल्यावांचून गत्यंतरच नाहीं. पाश्चात्यांच्याकडे ह्या रेषेला व्हायटल लाइन असें म्हणतात व हें आपल्या आत्मरेखेचें भाषांतर असें मानण्यास हरकत नाहीं. तसेंच पाश्चात्य लोक आयुष्याचा विचार करतांना हार्ट लाईनचा, अंतःकरण रेषेचा विचार करतात. म्हणजे आयुष्याचा विचार करितांना दोहोंकडे ह्या दोन्हीही रेषा विचारांत घेतात एवढें निर्विवाद दिसतें. तसेंच आंगठ्याजवळील रेषेस ज्याअर्थी "आत्मरेखा" "व्हायटल्" लाईन असें म्हणतात व तिलाच आयुष्य रेषा असें नांव दोहोंकडे असलेलें आढळतें, त्याअर्थी हीच मुख्य रेषा असून अंतःकरण रेषेची तिला जोड द्यावयाची असा त्याचा निष्कर्ष निघतो. आतां आपल्याकडे ह्या दोन रेषांमध्यें अंतःकरणरेषेलाच आयुष्यरेषा असें प्राधान्येकरून केव्हां समजावयास लागले त्याचा नीट उलगडा होत नाहीं; पण मानतात एवढें मात्र खरें. आतां त्याला कांहीं अनुभवजन्य आधार असेल

असें तूर्त आपण गृहीत धरून आपल्या पद्धतीप्रमाणें त्याचीं काय काय फलें दिलीं आहेत, त्यांचा विचार करूं.

पुंसामायुर्भागे प्रत्येकं पंचविंशतिः शरदाम्
कल्प्याः कनिष्ठिकांगुलिमूलादिह तर्जनीपरतः।
तर्जनीमूलपर्यांप्तं कनिष्ठादिक्रमेण तत्
आयुश्च विंशतेः षट्कं रक्तरेखा च दृश्यते ॥

प्रत्येक बोटाला २५ वर्षें याप्रमाणें करांगलीपासून तर्जनीपर्यंत शंभर वर्षें समजावींत. म्हणजे करांगुलीला पंचवीस, कनिष्ठिकेपर्यंत पन्नास, मध्यमपर्यंत पंचाहत्तर व तर्जनीपर्यंत शंभर वर्षें हा त्याचा हिशेब आहे. हीच रेषा नीट, बारीक्, अखंड व तांबूसवर्णी असेल तर एकशेंवीस १२० वर्षें आयुष्य समजावें असें सांगितलें आहे. नंतर ही रेषा——

पूर्णा शतायुषं दद्यादंतरे मध्यमायुषं
कुरुते पुरुषं केचित्सच्छिद्राकालजां मृतिं
सकंटकत्वे विपदो नीरंध्रत्वे तु जीवनं

पुरी असेल तर शंभर वर्षें व कमी असेल तर त्या मानानें कमी आयुष्य असतें असें सांगितलें आहे. ही रेषा सांखळीसारखी असून फाटे असल्यास अकालीं मृत्यू येतो व नुसते फाटे फुटलेले असल्यास संकटें येतात. परंतु तीं जर साखळीसारखी नसेल तर अपमृत्यू टळतो असें सांगितलें आहे. यानंतर ह्या प्रमाणाशिवाय ही रेषा अमुक लांब असल्यास त्यांवरून अमुक इतकीं वर्षें आयुष्य असेल असें निरनिराळें अनुमान दिलें आहे.

यदा रेखांतरैर्भिन्ना स्वयं भिन्ना च दृश्यते
तदा सम्यग्विजानीयात् गंडकालं विशेषतः

ज्या वेळीं ही आयुष्यरेषा तुटत तुटत गेलेली असते किंवा दुसऱ्या रेषांनीं छेदली गेलेली असते, तेव्हां ते ते काल हिशेबानें गंडांतराचे समजावेत.

अनामिका पर्वमूले कनिष्ठादिक्रमेण तु
आयुर्दशैव वर्षाणि सामुद्रवचनं यथा ।
आयुर्बले भवेद्रेखाऽनामिकामूलसंस्थिता
त्रिदशं च त्रिषष्ठिश्च आयुर्बलविनाशनं ॥

जर आयुष्यरेषा करांगुलीच्या मूळापासून निघून कनिष्ठिकेच्या मूळापर्यंतच आलेली असेल तर त्याचें आयुष्य दहाच वर्षे असें समजावें. असें सामुद्रवचन आहे. हीच आयुष्यरेषा ह्याच्यापेक्षां थोडी लांब असल्यास त्याचें आयुष्य ३० किंवा ६३ वर्षे समजावें.

आयुर्बले भवेद्रेखा मध्यमामूलसंस्थिता
पंचसप्तति वर्षाणि ह्यायुषो बलमुच्यते ।
मध्यमामूलपर्यंतमायुरेखा न दृश्यते
चतुर्दशचतुर्विंशदायुर्बलविनाशनम् ॥

जर आयुष्यरेषा मधल्या बोटाच्या मुळापर्यंत असेल तर पंचाहत्तर वर्षे आयुष्य समजावें व हीच रेषा थोडी कमी असल्यास त्याचें आयुष्य एक्कावन्न किंवा एकसष्ट वर्षे समजावें.

वरील श्लोकांत नमूद केलेल्या आयुर्मर्यादा एक तर हिशेबाला व पद्धतीला सोडून आहेत. शिवाय त्यांतल्या थोड्याशा फरकामुळें आयुष्याच्या संख्यामर्यादेमधील अंतर, तसेंच 'विवाह' हें पद घालून दिलेलें अंतर हीं दोन्ही प्रमाणरहित असून तीस, त्रेसष्ट, किंवा दहा असें सांगितलें आहे. आयुष्याच्या निदानाच्या मानानें तें पूर्वपश्चिम टोंकाइतकें घरसोडीचें अनिश्चित असल्यामुळें त्या नियमावर भरंवसा

ठेवतां येत नाहीं व अनुभवजन्य नियम आहेत असेंहि दिसत नाहीं. कारण तसें असतें तर त्या नियमांत जास्त निश्चितता पाहिजे होती. तेव्हां त्यांनीं दिलेलें पहिलें पंचवीस वर्षांचें निदान सरळ असून शंभर वर्षांची त्यावरून केलेली कल्पना जास्त सयुक्तिक आहे व तीच रेषा चांगली असल्यास मनुष्य परमायू असतो असें जें सांगितलें आहे तें पटण्यासारखें आहे. असो. ह्यानंतर ही रेषा जर तिचा नेहमींचा क्रम सोडून ( म्हणजे चढत चढत तर्जनी आणि मधलें बोट ह्या दोहोंमध्यें जाणें ) खालीं झुकलेली असली, तर तिचें फल पुढील-प्रमाणें दिलें आहे.

**सा नम्राचेदधोभागे कनिष्ठादिक्रमेण तु ।**
**वृक्षादुन्नतदेशाद्वा वाहनात्पतनं भवेत् ॥**

ही आयुष्यरेषा जर वाकलेली असेल म्हणजे बुधरेषेकडे झुकली असेल असा माणूस उंचावरून, झाडावरून किंवा घोडा वगैरे वाहना-वरून पडतो असें त्याचें फल आहे. ह्याप्रमाणें आपल्या पौर्वात्यांचें ह्या आयुष्यरेषेसंबंधीचें निदान आहे. आतां आपण पाश्चात्त्य पद्धतीचा विचार करूं.

---

# प्रकरण १० वें

## आयुष्यरेषा ( लाइफ लाईन. ) पाश्चात्त्यपद्धति

ही रेषा जशी एखादी नदी एखाद्या टेंकडीला वळसा घालून जाते, त्याप्रमाणें शुक्राच्या उंचवट्याला पूर्णपणें वळसा घालणारी, लांब, सडक अशी असून, फार रुंद, अत्यंत मनोहर अशी नसावी. तशीच ती बांकदार असून तुटलेली व दुसऱ्या आडव्या रेषांनीं छेद-लेली किंवा इतर तऱ्हेनें बिघडलेली नसावी आणि अशा तऱ्हेची

आयुष्यरेषा असली तर ती दीर्घायुष्य, आरोग्य, सद्वर्तन आणि सुस्वभाव ह्यांची निदर्शक होय.

ही रेषा निस्तेज व फार रुंद असल्यास ती अनारोग्य, दुष्टप्रवृत्ति, दुबळा व मत्सरी स्वभाव ह्यांचें द्योतक होय. तसेंच ही रेषा जाड व लाल असल्यास तें क्रोधी व पशुवृत्तींचें द्योतक होय. सांखळी-सारखी असल्यास ती नाजूक प्रकृतीची दर्शक आहे. ही रेषा मध्या-वर पातळ व इतर रेषांनीं व्याप्त असली तर ती त्या वयांत अना-रोग्य दाखविते. आणि जर ती रेषा अथपासून इतिपर्यंत जाडच असेल तर तें चंचल व तऱ्हेवाईक स्वभावाचें द्योतक होय.

**आयुष्यविचार**—आयुर्मर्यादेचें प्रमाण ठरविणें हें त्या रेषेचें मुख्य काम होय. आकृती दिली आहे ( पृ. १७० ) त्याप्रमाणें रेषेचे पांच पांच किंवा दहा दहा वर्षांचे प्रमाण-पद्धतीनें विभाग पाडावेत, म्हणजे आयुष्यांतले आजार किंवा इतर गंडांतरें यांचा तीं केव्हां येतील हें सांगण्यास चांगलीच मदत होईल. उदाहरणार्थ, समजा कीं, ४० च्या आंकड्याजवळ ही रेषा तुटलेली आढळली, तर ४० व्या वर्षीं त्या माणसाला आजार आहे असें आपल्याला सांगतां येईल, किंवा पन्नासाच्या आंकड्याजवळ ही रेषा एकदम संपलेली आढळली तर तें मृत्यूचें निदर्शक होय, असें समजावें. आतां कोणी अशी शंका काढतील कीं, प्रत्येकाच्या हातांतील ह्या आयुष्यरेषेच्या लांबीचें प्रमाण कमीजास्त असणार तर हें मापण्याचें प्रमाण ठरविणें कठीण आहे. परंतु हें सकृद्दर्शनीं जितकें कठीण वाटतें तितकें तें कठीण नाहीं. आपण मनगटापासून आंगठ्यापर्यंत सबंध शुक्राच्या उंचवट्याचें बरोबर पांच पांच वर्षांचे असे वीस विभाग पाडावेत व त्या मानानें जितक्या लांबीपर्यंत ही रेषा असेल तितकीच त्या त्या व्यक्तीची आयुष्यमर्यादा धरावी व त्याप्रमाणें आपलें अनुमान बसवावें; म्हणजे घोंटाळा होणार नाहीं. परंतु हें प्रमाण ठरवतांना फार काळजी

ध्यावी. कारण ह्यांत चूक झाल्यास फार घोंटाळा होण्याचा संभव आहे. असो. एकंदरींत ही रेषा दोन्ही हातांत पहावी व दोहोंकडील तिच्या लांबीच्या प्रमाणावर आयुष्याचें निदान ठरवावें. ती आंखुड असल्यास अल्पायु व लांब असल्यास दीर्घायु समजावा. त्याचप्रमाणें एका हातांत आंखुड व दुसऱ्या हातांत लांब असल्यास तें मोठ्या दुखण्याचें चिन्ह समजावें; असें ह्याचें अनुमानप्रमाण आहे. ही रेषा ज्या ज्या ठिकाणीं तुटलेली असेल तो तो काल दुखण्याचा समजावा. जर ही रेषा दोन्ही हातांत तुटलेली असेल तर त्या वेळीं मृत्यु येण्याचा फार संभव असतो. विशेषतः ही तुटलेली रेषा शुक्राच्या उंचवट्याकडे झुकलेली असेल तेव्हां तर फारच भीति असते. " मिस्टरीज डी ला मेन, पॅरीस १८७४ " ह्या पुस्तकांत त्या ग्रंथकर्त्यानें त्या रेषेवरील निरनिराळ्या आघातांसंबंधीं ( ब्रॅक्स ) आपला अनुभव पुढीलप्रमाणें नमूद करून ठेविला आहे. तो म्हणतो कीं, माझ्या वाचकांना ह्या ठिकाणीं इतकें निक्षून सांगितलें पाहिजे कीं, हा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. तो असा कीं, पहिली गोष्ट आपल्याला ध्यानांत ठेवावयाची ती ही कीं, कोणतीहि खूण अथवा चिन्ह दोन्ही हातांवर असलें पाहिजे. त्यांतल्यात्यांत ह्या आयुष्यरेषेवरून रोग व गडांतरें ह्यांचें अनुमान करितांना तर ह्याच्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. एका हातांत ही रेषा तुटलेली किंवा खंड पडलेली आढळल्यास तें फक्त आजाराचें दर्शक होय आणि ह्याचप्रमाणें एका हातांत ही रेषा पंचविसावे वर्षीं थांबत असली आणि दुसऱ्यांत जर संपत नसेल तर तें मृत्यूचें वर्ष खास नव्हे असें समजावें. कांहीं दिवसांपूर्वीं मी एकाचे दोन्ही हात पाहिले तेव्हां एका हातांत ही रेषा सदतिसावे वर्षीं संपत होती. आणि दुसऱ्या हातांत ती एके चाळीसावे वर्षीं संपत होती. तेव्हां त्या गृहस्थाला असें सांगितलें कीं, सदतिसावे वर्षीं तुला भयंकर दुखणें

येईल व तें एकेचाळीस वर्षांपर्यंत तसेंच वाढत जाऊन त्या वर्षी त्यांत तुझा अंत होईल. तेव्हां तो गृहस्थ बराच आजारी असून त्या वेळीं त्याला एकुणचाळीसावें वर्ष सुरू होतें असें त्यानें सांगितलें आणि खरोखरच पुढें दोन वर्षांनीं त्या गृहस्थाचा अंत झाला. ह्या सर्व गोष्टींचा फार काळजीपूर्वक विचार करून मात्र भविष्य सांगत जावें. नाहींतर शास्त्रज्ञाच्या पदरांत मूर्खपणा येऊन पृच्छकाचे मनावर त्याचा फार अनिष्ट असा परिणाम होण्याचा संभव असतो.

**आकस्मिक मृत्यू**—ही रेषा मध्येंच फाटा फुटून पुनः त्याला समांतर अशा बारीक रेषा असल्यास तें आकस्मिक मृत्यूचें चिन्ह होय. जर ही आयुष्यरेषा तुटून पायऱ्याप्रमाणें ओळीनें, सारखी होत गेलेली असेल तर तें अनारोग्याचें लक्षण समजावें. जर आयुष्य-रेषा तुटलेली असून ती चौकोनांनीं जुळलेली असेल तर तें भयंकर दुखण्यांतून वांचण्याचें लक्षण होय. चौकोन ही खूण नेहमीं संकटा-पासून बचाव करणारी आहे. तसेंच ह्या तुटलेल्या रेषा कात्रींनीं जोडलेल्या असतील तर त्यांचेंहि फल चौकोनाप्रमाणेंच ( आजारां-तून मुक्तता ) समजावें. जर ही आयुष्यरेषा दुहेरी असेल तर ती वरील सर्व दुष्परिणामांचा परिहार करून मनुष्याला सुख आणि समाधान ह्यांची जोड करून देते. ( परंतु ही मार्शल लाईन नव्हे. हिच्याशिवायही आयुष्यरेषेला संरक्षक म्हणून ही रेषा असते व तिच्याबद्दल पुढें विचार करूं.

**फोर्क्ड ऑर टॅसल्ड**—( सकंटक किंवा पल्लवित रेषा ) आयुष्य रेषा ही नेहमीं ह्या शाखांपासून अलिप्त असावी. जर ही रेषा अग्राला पल्लवित असेल तर तें लहानपणीं दारिद्य व पैशाचें नुकसान करतें. लहानपणीं झालें नसल्यास म्हातारपणीं तरी तें खात्रीनें होतें. जर ही आयुष्यरेषा आरंभालाच सकंटक ( फोर्क्ड ) असेल तर तें बढाई व तऱ्हेवाईकपणाचें चिन्ह होय. जर हे कंटक स्वच्छ व साधे

असतील तर तें न्यायप्रियता व पवित्रतेचें द्योतक होय. जर ते कंटक शेवटाला पल्लवाचे जागीं असतील तर तें म्हातारपणीं दारिद्र्यामुळेंच काबाडकष्टांचें द्योतक होय. जर ह्या पल्लवितांचा एक फवारा चंद्राचे उंचवट्यावर गेला तर त्रासामुळें म्हातारचळ लागतो. जर ह्या आयुष्यरेषेला ह्या ठिकाणीं फांटा फुटून मस्तकरेषे-वर जाईल तर तो शब्दाचा धड असतो. तसेंच हें या ठिकाणीं त्याला आंतील बाजूस फाटा फुटलेला असल्यास त्याच्या बोलण्यांत बिलकूल मेळ नाहीं. आयुष्यरेषेला मधोमध फाटा फुटला असल्यास किंवा आरंभालाच तो सकंटक असल्यास प्रयत्नांतील कसूरीनें येणाऱ्या अपयशामुळें तो नाउमेद होतो.

**रेज ॲक्रॉस दि हॅन्ड, व वरी लाइन्स** ( आडवे फाटे व कष्टदायक रेषा )—–शुक्राच्या उंचवट्यावरून निघणाऱ्या आडव्या रेषा जर आयुष्यरेषेला छेदून जात असतील तर तें कष्टाचें व त्रासाचें चिन्ह समजावें. जर एक फाटा आडवा सरळ जाऊन अंत:करणरेषेला मिळत असेल तर तें स्त्रीसंबंधींच्या प्रेमांत व्यत्यय आणितें. ह्याच रेषेवर व ह्या ठिकाणीं जर बेट झालेलें असेल तर ह्या प्रेमकलहाचा फार अतिरेक होऊन नामुष्की होण्याचा संभव असतो. ही रेषा ज्या ठिकाणीं आयुष्यरेषेला छेदते त्याच ठिकाणीं आयुष्यरेषेला फाटा फुटून तो ह्या रेषेला छेदीत असेल तर तो विवाहसौख्य देत नाहीं. केव्हां केव्हां तर घटस्फोट करण्याची पाळी येते. जर शुक्राच्या उंचवट्यावरून एक रेषा निघून आयुष्य रेषेला छेदन करील तर त्या सुमाराला तें विवाहाचें द्योतक चिन्ह असतें. बहुधा हे आडवे फांटे आजाराचें द्योतक असतात व ते ज्या ज्या ठिकाणीं आयुष्यरेषेला छेदीत असतील त्या त्या वेळेला ते आजार दर्शवितात. त्याचप्रमाणें ज्या उंचवट्यापासून अथवा रेषेपासून ते निघत असतील त्या त्या कारणांनीं त्या त्या आजा-

राचा उगम होतो. जसें अंतःकरणरेषेपासून हा फाटा निघालेला असल्यास मानसिक व्यथा, मस्तकरेषेपासून असल्यास डोक्याचे किंवा मेंदूचे रोग, मंगळाचे उंचवट्यापासून असल्यास विषयविकारापासून, अशा तऱ्हेनें त्याचा उलगडा होतो. गुरूच्या उंचवट्यापासून जर हा फांटा निघाला असेल तें यश, महत्त्वाकांक्षा, उदात्त ध्येय इत्यादि गोष्टींत अपयश दाखवितें व ही रेषा आकस्मिक रीतीनें पण वरचेवर हातावर उमटते असें आढळलें आहे.

**असेंडिंग अॅन्ड डिसेंडिंग ब्रांचेस** ( शाखान्वित रेषा ):—जर ह्या रेषेला वरजाणाऱ्या ऊर्ध्वगति शाखा असतील तर त्या महत्त्वाकांक्षा दाखवितात; पण बहुधां तें संपत्तीचें चिन्ह आहे; पण जर ह्या शाखा दुसऱ्या रेषांना छेदून गेलेल्या असतील तर तें स्वपराक्रमावर उदयाला येण्याचें द्योतक असतें. ह्या शाखा जर अधोगति असतील तर तें संपत्ति आणि आरोग्य ह्यांच्या हानीचें द्योतक समजावें.

जर ही आयुष्यरेषा हाताच्या बाहेरील अंगापासून न निघतां गुरूच्या उंचवट्याखालूनच निघेल तर तें जबर महत्त्वाकांक्षेचें द्योतक असून, यश व सन्मानाचेंहि द्योतक होय. जर आयुष्यरेषा, मस्तकरेषा व अंतःकरणरेषा ह्या तिन्ही एकत्र जुळत्या असतील तर तें दुर्दैवाचें द्योतक असून त्यास कष्टमय व भयंकर रीतीनें मृत्यू येतो. जर ह्या आयुष्यरेषेवर कात्री असून कात्री त्याच रेषेच्या शाखांनीं छेदली गेलेली असेल, तर मृत्यूच्या धास्तीनें मनुष्य वाळत जातो. तसेंच ही आयुष्यरेषा बाकी नीट असून शेवटाला तिला कात्री असल्यास तें म्हातारपणीं अनन्वित आपत्ति आणितें. तसेंच रेषेच्या आरंभालाच ही कात्री असल्यास तें बालपणीं अपघात सुचवितें. जर एक रेषा मंगळापासून निघून आयुष्यरेषेला छेदीत असेल तर तें जखम दर्शवितें. रवीच्या उंचवट्यावर जर एक फांटा येऊन मिळेल तर तें

किर्तीचें द्योतक समजावें. जर हा फांटा थोडा अस्पष्ट असेल तर एखाद्या मोठ्या दुर्गुणामुळें त्याला वैगुण्य येतें. ह्या रेषेवर जर हीं वर्तुळें व बिंदू असले तर पूर्वींचे लोक हें खुनी वृत्तीचें व अंधतेचें चिन्ह समजत; पण अंधळेपणाचा मात्र अनुभव येतो. जर ही आयुष्यरेषा व मस्तकरेषा जुळलेल्या नसून अलग असतील तर तें निष्काळजीपणा व अडाणीपणाचें द्योतक होय. तसेंच तो फाजील आत्मविश्वासी ( घमेंड ) आणि कोणत्याही गोष्टींत फार ताणून धरणारा असा असतो. विशेषतः ह्या दोन रेषांमधील जागा तंतुमय रेषांच्या जाळ्यांनीं आच्छादलेली असून ह्या दोन्ही रेषा मोठ्या व लाल असल्यास हे गुण प्राधान्येंकरून सांपडतात.

जर ही आयुष्यरेषा शुक्राच्या उंचवट्याला मोठा वळसा मारून चंद्राचे उंचवट्याला भिडली असेल तर दीर्घायुष्याचें लक्षण समजावें. मागें सांगितल्याप्रमाणें जर ही आयुष्यरेषा तुटलेली असून तिला मंगळाच्या रेषेची जोड असून तें सुटलेलें अग्र धनरेषेनें जोडलें गेलें असेल, तर तें एखादें मोठें संकट येऊन त्यांतून केवळ दैवानें सुटून जाण्याचें चिन्ह समजावें. अगदीं जवळून गेलेली असेल तर तें अपयशाचें द्योतक होय.

## दि लाइन ऑफ मार्स—( रेषायुग्म )

कांहीं हातांवर ह्या आयुष्यरेषेच्या आंतून तिला समांतर अशी दुसरी रेषा असते. हिला जोडरेषा किंवा रेषायुग्म असें म्हणतात. ही रेषा मुख्यत्वेंकरून आयुष्यरेषेंतील वैगुण्याचा परिहार करिते. हिला योध्याची अथवा लढवय्याची रेषा असेंहि म्हणतात. कारण ही युद्धकलेंत प्रावीण्य संपादन करून देणारी असते; मात्र ती तांबूस रंगाची, स्पष्ट व नीट असली पाहिजे. तशीच ती संपत्ति आणि भाग्य देते; परंतु त्याचबरोबर हीं माणसें अत्यंत क्रोधी असतात व

ही ज्या वेळीं उद्भवते त्या वेळेला त्यांचे स्त्रियांशीं प्रेमसंबंध जडतात असा एका शास्त्रज्ञाचा अनुभव आहे. ही जितकी लांब असेल तितके दिवस हिचा अम्मल चालतो.

ह्याप्रमाणें दोहोंकडील शास्त्रज्ञांचे ह्या आयुष्यरेषेचे अनुभव आहेत. आतां मनुष्याच्या शरीरावर जे पिटक येतात त्यांचें फल प्रथम सांगू.

## प्रकरण ११ वें

### ॥ अथ पिटक लक्षणं ॥

सितरक्तपीतकृष्णा विप्रादीनां क्रमेण पिटका ये ।
ते क्रमशः प्रोक्तफला वर्णानां नाग्रजातानां ॥ १ ॥

अर्थ—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादि चार जातींस अनुक्रमानें पांढरे, तांबडे, पिवळे आणि काळे या रंगांचे फोड किंवा फुटकुळ्या ( पिटक ) फलें देतात. म्हणजे ब्राह्मणांस पांढऱ्या, क्षत्रियास पांढऱ्या व तांबड्या, वैश्यास पांढऱ्या, तांबड्या व पिवळ्या आणि शूद्रास चारही रंगांच्या फुटकुळ्यांचीं फलें मिळतात.

सुस्निग्धव्यक्तशोभाः शिरसि धनचयं मूर्ध्नि सौभाग्यमारा-
द्दौर्भाग्यं भ्रूयुगोत्थः प्रियजनघटनामाशु दुःशीलतां च ।
तन्मध्योत्थाश्च शोकं नयनपुटगता नेत्रयोरिष्टदृष्टिं
प्रव्रज्यां शंखदेशेश्रुजलनिपतनस्थानगाश्चातिचिंतां ॥ २ ॥

अर्थ—मस्तकावर, स्निग्ध ( अरुक्ष ) व स्पष्टकांति असे पिटक होतील तर धनवृद्धी होते. मूर्ध्नि ( मुखपृष्ठ किंवा केशांत ) वर पिकट होतील तर सौभाग्यप्राप्ति लौकर होते. दोन्ही भिवयावर पिटक होतील तर दुर्भाग्याचें लक्षण समजावें. भिवयांच्यामध्यें पिटक होतील

तर प्रेमाचीं माणसें भेटतात व दुःख नाहींसें होतें. डोळ्याच्या पापण्यांवर पिटक होतील तर दुःख होतें. डोळ्यावर पिटक झाल्यास इष्टदर्शन, शंखदेशावर प्रव्रज्या ( सर्वसंगपरित्याग ), डोळ्यातून पाणी येतें त्या ठिकाणीं पिटक होतील तर अतिशय काळजीचे प्रसंग येतात.

घ्राणागंडे वसनंसुतदाश्चोष्ठयोरन्नलाभं
कुर्युस्तद्वच्चिबुकतलगाभूरिवित्तं ललाटे ।
हन्वोरेवंगलकृतपदाभूषणान्यन्नपाने
श्रोत्रेतद्भूषणगणमपि ज्ञानमात्मस्वरूपं ॥ ३ ॥

अर्थ—नाकावर पिटक होतील तर वस्तुलाभ, गालांवर पुत्रप्राप्ति, वरच्या ओठावर व खालच्या ओठाच्या खालच्या भागावर पिटक होतील तर अन्नलाभ, कपाळावर पुष्कळ धनाची प्राप्ति, हनुवटीवर द्रव्यलाभ, गळ्यावर अलंकार व अन्नपान यांची प्राप्ती, कानांवर पिटक होतील तर कर्णभूषणें मिळतात व आत्मस्वरूप ज्ञानाची प्राप्ती होते.

शिरःसंधिग्रीवाहृदयकुचपार्श्वोरासिगता
अयो घातं घातं सुततनय लाभं शुचमपि ।
प्रियप्राप्तिं स्कंधेप्यटनमथ भिक्षार्थमसकृ-
द्विनाशं कक्षोत्था विदधति धनानां बहुविधं ॥ ४ ॥

अर्थ—शिरःसंधि, मान, हृदय, स्तन, कुशी, उर यांवर पिटक झाले तर अनुक्रमानें लोहानें ताडन, घात, सुतलाभ, पुत्रलाभ, शोक, मित्रलाभ हीं फलें मिळतात. खांद्यावर पिटक झाले तर वारंवार भिक्षार्थ फिरावें लागतें. काखेवर पिटक झाले तर धनाचा अनेक प्रकारें नाश होतो.

**दुःखशत्रुनिचयस्य विघातं पृष्ठबाहुयुगजार चयंति ।**
**संयमं च मणिबंधनजाता भूषणाप्तमुपबाहुयुगोत्थाः ॥ ५ ॥**

अर्थ—पाठीवर पिटक झाले तर दुःखाचा नाश होईल. दोन्ही बाहूंवर झाले तर शत्रूंचा नाश करतात. मणिबंध [ हस्तमूल ] यावर झाले तर हस्तबंधन करितात. बाहूंजवळ झाले तर भूषणें, अलंकार मिळतील.

**धनाप्तिं सौभाग्यं शुचमपि करांगुल्युदरगाः**
**सुपानान्नं नाभौ तदध इह चौरैर्धनहृतिं ।**
**धनं धान्यं वस्तौ युवतिमथ मेढ्रे सुतनयान्**
**धनं सौभाग्यं वा गुदवृषणजाता विदधति ॥ ६ ॥**

अर्थ—हातास पिटक झालें असता धनप्राप्ति होते. अंगुलीस पिटक झाले तर सौभाग्यप्राप्ति होते. पोटास पिटक झाले तर दुःख होतें. बेंबीवर पिटक झाले उत्तम अन्नपान मिळतें. बेंबीच्या खालीं पिटक झाले तर द्रव्य चोरीस जातें. (बस्ति) गर्भाशयावर पिटक आलें तर धनधान्यप्राप्ति होते. शिश्नावर पिटक झाले तर स्त्रीलाभ व पुत्रलाभ होतो. गुदावर पिटक झाले तर धनप्राप्ति होते. वृषणावर पिटक झाले तर सौभाग्य प्राप्त होतें.

**ऊर्वोर्यानांगनालाभं जान्वोः शत्रुजनात् क्षतं ।**
**शस्त्रेण जंघयोर्गुल्फेऽध्वबंधक्लेशदायिनः ॥ ७ ॥**

अर्थ—मांड्यावर पिटक झाले तर वाहन व स्त्री यांचा लाभ, ढोंपरावर शत्रुजनापासून नाश, पोटऱ्यावर शस्त्रानें नाश, गुल्फावर पिटक झाले तर मार्गामध्यें बंधन प्राप्त होतें.

**स्फिक्पार्ष्णिपादजाता धननाशागम्यगमनमध्वानं ।**
**बंधनमंगुलिनिचयेंगुष्ठे च ज्ञातिलोकतः पूजां ॥ ८ ॥**

अर्थः—कुल्यांवर पिटक झाले तर धननाश, खोटेवर अगम्यागमन, पायांवर प्रवास हे होतात. अंगुलिसमूहावर बंधन, अंगुष्ठावर पिकट झाले तर स्वजातिलोकांपासून सन्मान हीं होतात.

उत्पातगंड पिटका दक्षिणतो वामतस्त्वभीघाताः ।
धन्या भवंति पुंसां तद्विपरीतास्तु नारीणां ॥ ९ ॥

अर्थः—अंगस्फुरणादि उत्पात, तिलकादि चिन्ह, पिटक हे उजव्या अंगावर व प्रहार, जखम इत्यादि डाव्या अंगावर पुरुषास शुभ समजावे. याहून विपरीत स्त्रियांस शुभ होत. म्हणजे अंगस्फुरणादि डाव्या अंगावर व प्रहारादि उजव्या अंगावर स्त्रियांस शुभ होत.

इति पिटकविभागः प्रोक्त आमूर्धतोयं
व्रणतिलकविभागोप्येवमेव प्रकल्प्यः ।
भवति मशकलक्ष्मावर्तजन्मापि तद्वत्
निगदितफलकारि प्राणिनां देहसंस्थं ॥ १० ॥

अर्थः—या पूर्वोक्त प्रकारानें पिटकांचा प्रकार मस्तकापासून पायांपर्यंत सांगितला. जखम व तिलक यांचाहि प्रकार पिटकांप्रमाणेंच जाणावा. प्राण्यांच्या अंगांवर असणारे मशक ( चिन्ह ) लक्ष्म ( केश येण्याची जागा नसून केशसमुदाय येणें ), आवर्त ( केशांचा भोंवरा ) हीं जन्मकालींच जरी असलीं तथापि त्यांचीं फलें पिटकांसारखींच समजावीं.

बृहत्संहितेंतील हा पिटक लक्षणाध्याय येवढ्याच करितां दिला आहे कीं याचा संबंध शरीरावरील खूण दर्शवून त्याचे फल दाखविणारा आहे.

---

## ॥ अथ शाकुनोत्तराध्यायः ॥

**दिग्देशचेष्टास्वरवासरर्क्षमुहूर्तहोराकरणोदयाशान् ।**
**चरस्थिरोन्मिश्रबलाबलं च बुध्वा फलानि प्रवदे द्रुतज्ञः ॥१॥**

अर्थः—अंगारितादि दिशा, शुभाशुभस्थान, व्यापार, दीप्तादि शब्द, वार, नक्षत्र, शिवादिमुहूर्त, होरा, बवादिकरण, लग्न, नवांश, द्रेष्काणादि, चर, स्थिर, द्विस्वभाव, शकुनांचें बलाबल हीं जाणून पक्षादि शब्द जाणणारानें फळें सांगावीं.

**द्विविधं कथयंति संस्थिता नामागामिस्थिरसंज्ञितं च कार्यं ।**
**नृपदूतचरान्यदेशजातान्यभिघातः स्वजनादिचागमाख्यं ॥ २ ॥**

अर्थः—संस्थित म्ह० प्रश्नकर्ते, यांचीं चर आणि स्थिर अशीं प्रश्नकार्यें असतात. राजा, दूत हेर, परदेश यासंबंधीं उपद्रव, बंधु-सुहृदादिकांचे येणें यासंबंधीं प्रश्न असतात.

**उद्बद्धसंग्रहणभोजनचौरवन्हिवर्षोत्सवात्मजवधाः कलहो भयं च**
**वर्गः स्थिरोयमुदयेंदुयुते स्थिरर्क्षे विंद्यास्थिरं चरगृहेच चरं यदुक्तं**

अर्थः—उद्बंध ( टांगलेले ), संयोग, सहभोजन, चोर, अग्नि, वृष्टि, विवाहादि उत्सव, अपत्य, मरण, कलह, भय यांसंबंधीं प्रश्न स्थिरलग्नीं, स्थिरनक्षत्रीं व स्थिरराशीस चंद्र असतां झाला, तर तो स्थिरफल ( याचें फल झालें आहे किंवा आजच होणार आहे ) समजावा. चरलग्नीं, चरनक्षत्रीं, चरराशींस चंद्र असतां प्रश्न होईल तर तो चरफल पुढें व्हावयाचें आहे, असें समजावें.

**स्थिरप्रदेशोपलमंदिरेषु सुरालये भूजलसंनिधौ च ।**
**स्थिराणि कार्याणि चराणि यानि चलप्रदेशादिषु चागमाय ॥४॥**

अर्थः—स्थिर प्रदेश, पाषाण, गृह, देवालय, भूमि, जलसमीप

भाग या स्थानीं शकुन झाले तर कार्यें स्थिर (झालीं किंवा आज होतील) असें सांगावें. चल प्रदेशांत शकुन झाले तर कार्य पुढें होईल असें जाणावें.

आप्योदयर्क्षक्षणदिग्जलेषु पक्षावसानेषुच ये प्रदीप्ताः ।
सर्वेपि ते वृष्टि कराःरुवंतः शांतोपिवृष्टिंकुरुतेंबुचारी ॥ ५ ॥

अर्थः—जललग्न. जलनक्षत्र, जलमुहूर्त, जलदिशा (पश्चिम) व अमावास्या, पौर्णिमा यांच्या ठायीं स्थित व प्रदीप्त असे जे शकुन ते सर्व वृष्टि करणारे होत. उदकचारी शांतहि शकुनवृष्टि करतो.

आग्नेयदिग्लग्न मुहूर्तदेशेष्वर्कप्रदीप्तोग्निभयायरौति ।
विष्ट्यांयमर्क्षोदयकंटकेषुनिष्पत्रवृक्षीषुचमोषकृत्स्यात् ॥ ६ ॥

अर्थः—आग्नेयदिशा, क्रूरग्रहाचें लग्न, आग्नेय मुहूर्त, कृत्तिका नक्षत्र उग्रदेश यांच्या ठायीं अर्क प्रदीप्त. शकुन झाला तर अग्निभय होतें. कल्याणी, शनीचीं लग्नें (मकर, कुंभ) काट्यांचा वृक्ष, पानें नसलेलें झाड अगर वेली यांच्या ठायीं शकुन झाला तर चोरी होईल.

ग्राम्यःप्रदीप्तःस्वरचेष्टिताभ्यामुग्रोरुवन्कंटकिनिस्थितश्च ।
भौमर्क्षलग्नेयदिनैर्ऋतीचस्थितोभितश्चेत्कलहायदृष्टः ॥ ७ ॥

अर्थः—गांवांत झालेला शब्द व चेष्टा यांहीं दीप्त, उग्रशब्द करणारा, काट्याच्या झाडावर राहिलेला, मंगळाच्या लग्नीं (मेष, वृश्चिक) झालेला, निर्ऋतीस स्थिती असा शकुन संमुख पाहिला तर कलह होतो.

लग्नेथवेंदोर्भृगुभांशसंस्थे विदिक् स्थितोधोवदनश्चरौति ।
दीप्तःसचे त्संग्रहणं करोति योन्या तया याविदिशि प्रदिष्टा ॥८॥

अर्थः—चंद्राचे लग्नीं (कर्क), शुक्राचे राशीस व नवांशीं शकुन आग्नेयादि विदिशांत राहून अधोमुख शब्द करील व दीप्त असेल तर

स्त्रीचें ग्रहण करील, ज्या विदेशीं जी योनी ( उत्पत्ति ) सांगितली तिचें ग्रहण ( संयोग ) करतो.

**पुंराशिलग्ने विषमे तिथौच दिक्स्थःप्रदीप्तःशकुनोवराक्षः ।**
**वाच्यं तदा संग्रहणं नराणांमिश्रेभवेत् षंढकसं प्रयोगः ॥९॥**

**अर्थः**— पुरुषराशी, विषम लग्न व विषम तिथि यांच्या ठायीं प्रदीप्तदिशेस राहणारा शकुन पुरुषाख्य जाणावा. तसा झाला तर पुरुषांचे संग्रहण ( संयोग ) होईल असें सांगावें. मिश्र असल्यास नपुंसक योग होईल.

**एवंरवेःक्षेत्र नवांश लग्ने लग्ने स्थितेवा स्वयमेव सूर्ये ।**
**दीप्तोभिधत्ते शकुनो विवासंपुंसः प्रधानस्यहि कारणंतत् ॥१०॥**

**अर्थः**—जर सूर्याचा राशी ( सिंह ) त्याचा नवांश व तात्कालिक लग्न अगर लग्नीं सूर्य अगर दीप्त शकुन होईल तर मुख्य पुरुषाचे प्रवासाचें हेंच कारण होय ( प्रवास ) होईल.

**प्रारभ्यमाणेषुचसर्वकार्येष्वर्कान्विताद्धादृणयेद्विलग्नं ।**
**संपद्विपच्चेतियथाक्रमेणसंपद्विपद्धापितथैववाच्या ॥ ११ ॥**

**अर्थः**— सर्व कार्यांच्या आरंभीं सूर्य असलेल्या राशीपासून लग्न मोजावें. १ जन्म, २ संपत्, ३ विपत् इ. जें येईल त्याप्रमाणें संपत् किंवा विपत् असें लग्नाचें फल सांगावें.

**काणेनाक्ष्णादक्षिणेनैतिसूर्येचंद्रेलग्नात्द्वादशेचेतरेण ।**
**लग्नस्थेर्केपापदृष्टेंध एवकुब्जःस्वर्क्षेश्रोत्रहीनोजडोवा ॥१२॥**

**अर्थः**—प्रश्नसमयीं जें लग्न त्यापासून १२ व्या स्थानीं सूर्य असेल तर ज्याचा संयोग होईल तो उजव्या डोळ्यानें काणा असेल. बाराव्या स्थानीं चंद्र असेल तर डाव्या डोळ्यानें काणा असेल. चंद्र

सूर्य दोन्ही बारावे असतील तर अंध असेल. स्वराशीस ( सिंह ) सूर्य असेल तर कर्णहीन ( बधिर ) किंवा जड ( मूर्ख ) असेल.

**क्रूरःषष्ठेक्रूरदृष्टोविलग्नाद्यस्मिन्राशौतद्गृहांगेव्रणःस्यात् ।**
**एवंप्रोक्तंयन्मयाजन्मकालेचिन्हंरूपंतत्तदस्मिन्विचिंत्यं ॥१३॥**

**अर्थः**—प्रश्नलग्नापासून ६ वा पापग्रह व त्यावर पापग्रहाची दृष्टी असेल तर षष्ठस्थानस्थ राशी काल पुरुषाच्या ज्या अंगीं असेल त्या अंगीं व्रण असेल. जें मीं जन्मकालीं चिन्ह सांगितलें तें येथेंहि पहावें.

**द्व्यक्षरंचरगृहांशकोदयेनामचचास्यतुरक्षरंस्थिरे ॥**
**नामयुग्ममपिचाद्विमूर्तिषुत्र्यक्षरंभवतिचास्यपंचभिः ॥ १४ ॥**

**अर्थः**—चर लग्नीं चर नवांश असेल तर येणाराचे किंवा प्रश्नकर्त्याचें दोन अक्षरांचें नांव आहे असें सांगावें. स्थिरलग्नीं स्थिर नवांश असेल तर चार अक्षरांचें नांव आहे. द्विस्वभावलग्नीं द्विस्वभानवांश असेल तर दोन नांवें आहेत. पहिलें तीन अक्षरांचे व दुसरें पाच अक्षरांचें असें सांगावें.

**काद्यास्तुवर्णाकुजशुक्रसौम्यजीवार्कजानांक्रमशःप्रदिष्टाः ।**
**वर्णाष्टकंयादिचशीतरश्मेरवेरकारात्क्रमशःस्वरास्युः ॥१५॥**
**नामानिचाग्न्यंबुकुमारविष्णुशक्रेंद्रपत्नीचतुराननानां**
**तुल्यानि सूर्यात्क्रमशोविचिंत्यद्वित्र्यादिवर्णैर्घटयेत्स्वबुत्ध्या**

**अर्थः**—क इत्यादि वर्ण मंगळ, शुक्र, बुध, गुरु, शनि यांचे अनुक्रमानें सांगितले आहेत. म्हणजे क ख ग घ ङ यांचा मंगळ; च छ ज झ ञ यांचा शुक्र; ट ठ ड ढ ण यांचा बुध; त थ द ध न यांचा गुरु; प फ ब भ म यांचा शनि; य र ल व श ष स ह या आठ वर्णांचा चंद्र व अ आ इत्यादि सोळा स्वरांचा स्वामी सूर्य समजावा. सूर्यापासून अनुक्रमानें अग्नि, उदक, कुमार, विष्णू, इंद्र,

इंद्राणि, ब्रह्मा या सात देवता सात ग्रहांच्या आहेत. सूर्यादि ग्रहांचा स्वतःच्या बुद्धीनें विचार करून त्यादि वर्णांचीं नांवें योजावीं.

वयांसितेषांस्तनपान बाल्यवतस्थिता यौवनमध्यवृद्धाः ।
अतीववृद्धा इतिचंद्रभौमज्ञशुक्र जीवार्कशनैश्वराणां ॥१७॥

अर्थः- -चंद्र शिशु, भौम ६ वर्षांपर्यंत, बुधव्रतस्थ १६ पर्यंत, शुक्र ३० वर्षांपर्यंत, गुरु ५० वर्षांपर्यंत, शनि ८० वर्षांपर्यंत अशीं त्यांचीं वर्षें आहेत. प्रश्नकालीं जो ग्रह असेल त्याचें वय सांगावें.

वर श्लोक १२ मध्यें दिलेल्या जन्म, संपत् इत्यादि नक्षत्रांची माहिती अथर्ववेदांतर्गत नक्षत्रजातकांत आहे ती पुढें देत आहों.

## प्रकरण १२ वें.

# अथर्ववेदांतर्गत नक्षत्र-जातक

जन्म संपत् विपत् क्षेम्यः प्रत्वरः साधकस्तथा ।
नैधनो मित्रवर्गश्च परमो मैत्र एव च ॥
दशमंजन्मनक्षत्रात्कर्मनक्षत्रमुच्यते ।
एकोनविंशतिं चैव गर्भाधानकमुच्यते ॥
द्वितीयैकादशंविंशमेषसंपत्करोगणः ।
तृतीयमेकविंशं तु द्वादशं तु विपत्करम् ॥
क्षेम्यं चतुर्थं द्वाविंशं तथायच्च त्रयोदशम् ।
साधकं तु चतुर्विंशं षष्ठ पंचदशं च यत् ॥

नैधनं पंचविंशंतु षोडषं सप्तमं तथा ।
मैत्रे सप्तदशं विद्यात् षड्विंशमितिचाष्टमं ॥
सप्तविंशं परं मैत्रं नव अष्टादशंच यत् ।

याप्रमाणें २७ नक्षत्रांची वर्गवारी केली आहे ती अशी-

| | | |
|---|---|---|
| १ जन्मनक्षत्र | १० कर्मनक्षत्र | १९ आधान |
| २ संपत् | ११ संपत् | २० संपत् |
| ३ विपत् | १२ विपत् | २१ विपत् |
| ४ क्षेम्य | १३ क्षेम्य | २२ क्षेम्य |
| ५ प्रत्वर | १४ प्रत्वर | २३ प्रत्वर |
| ६ साधक | १५ साधक | २४ साधक |
| ७ नैधन | १६ निधन | २५ निधन |
| ८ मित्र | १७ मैत्र | २६ मैत्र |
| ९ परम मित्र | १८ परम मैत्र | २७ परम मैत्र |

नक्षत्रांचीं फलें येणेंप्रमाणें:—

जन्मभं जन्मनक्षत्रं दशमं कर्म संज्ञकम् ।
एकोनविंशमाधानं त्रयो विंशं विनाशभम् ॥
अष्टादशंच नक्षत्रं सामुदायिक संज्ञकम् ।
संघातिकंच विज्ञेयं ऋक्षं षोडषमत्रहि ॥
षड्विंशं राज्यजात्यंच जातिनाम स्वजातिभम् ।
देशभं देशनामर्क्षं राज्यर्क्षमभिषेककम् ॥
पंचविंशति जातिश्च सप्तविंशाभिषेककम् ।
षड्विंशतितमं देशं जन्मऋक्षानि शोधयेत् ॥

**इत्येवं नवधिष्ण्यानां वेधं दृष्टिं विचिंतयेत् ।**
**ज्ञाति देशाभिषेकैश्च नवधिष्ण्यानि भूपतेः ॥**
**वेधं ज्ञात्वा फलंब्रूहि क्रूरे हानिं शुभे शुभम् ।**

ज्या नक्षत्रांत जन्म झालेला असतो तें जन्मनक्षत्र, त्यापासून १० वें कर्म, १९ वें आधान, २३ वें विनाश, १८ वें सामुदायिक, १६ वें संघातिक, २६ वें राज्यजाति, याप्रमाणें नक्षत्रें आहेत. हीं राजादिकांचें भविष्य पाहतांना अगर उच्च राजयोगी पुढाऱ्यासंबंधीं भविष्य पाहतांना उपयोगांत आणावीं.

सामान्य लोकांसंबंधीं

**जन्मभं कर्म आधानं विनाशं सामुदायकम् ।**
**संघातिकमिदं धिष्ण्यं षट्कं सार्वजनीयकम् ॥**

याप्रमाणें जन्म, कर्म, आधान, विनाश, सामुदायिक व संघातिक हीं उपयोगांत आणावीं. या सर्व नक्षत्रांचीं फलें अनुक्रमें खालीलप्रमाणें:——

**मृत्युः स्याज्जन्मभे विद्धे कर्मभे क्लेश एवच ।**
**आधानर्क्षे प्रवासः स्यात् विनाशे बंधुविग्रहः ॥**
**सामुदायिक भेऽनिष्टं हानिः सांघातिके तथा ।**
**जातिभे कुलनाशश्च बंधनं चाभिषेकभे ॥**
**देशर्क्षे देशभङ्गश्च क्रूरैरेवं शुभैः शुभम् ।**
**उपग्रह समायुक्ते मृत्युर्भवति नान्यथा ॥**
**शुभग्रहेण युक्तं चेत् विपरीतं फलं भवेत् ॥**

जन्मनक्षत्र विद्ध अगर पापग्रहयुक्त झालें असतां मृत्यु अगर मृत्युसमपीडा, कर्मनक्षत्र तसें असतां क्लेश, आधाननक्षत्रीं, प्रवास, भ्रमण, विनाशनक्षत्रीं कलह, भावंडांशीं वितुष्ट, कुटुंब आप्तवर्गाशीं

वैर, स्वतंत्रता, वेगळेपणा, सामुदायिकनक्षत्रीं अशुभफल, क्लेश व व्यग्रता, संघातिकनक्षत्रीं हानी, द्रव्यनाश, पराधीनता, जातिनक्षत्रीं स्वकुळाचा नाश, दुःख, अभिषेकनक्षत्रीं बंधन, हाल, अपघात, शत्रुपीडा, याप्रमाणें फळें मिळतात.

क्रूर ग्रहाचा वेध अगर युति झाली असतां अशुभफलें व शुभग्रह वेधयुति झाली असतां शुभफलें मिळतात.

जन्मकर्मादि नक्षत्रांपैकीं ज्या नक्षत्रास क्रूरग्रह वेध करीत असेल, त्या नक्षत्रीं पापग्रह व उपग्रह असल्यास मृत्यु अगर मृत्यु-समपीडा होते. परंतु जन्मकर्मादि नक्षत्रीं शुभग्रह असतां अशुभफल-नाश होतो.

जन्मनक्षत्रास शुभग्रहाचा वेध झाला असतां व्याधी, रोग, आजार यांचा नाश होतो व सौख्य मिळतें. परंतु क्रूरग्रह वेध झाला असतां धननाश, दारिद्र्य, कर्ज, मानसिक क्लेश होतात. विनाश, सामुदायिक, संघातिक या तिन्ही नक्षत्रांस एकाच वेळीं क्रूर ग्रहाचा वेध झाल्यास अपमृत्यूचें भय जाणावें.

ज्या नक्षत्रावर सूर्य असतो त्यापासून ५ व्या नक्षत्रीं विद्युन्मुख, ८ व्या शूल, १४ व्या सन्निपात, १८ व्या केतु, २१ व्या उल्का, २२ व्या कंप, २३ व्या वज्र, २४ व्या निर्घात याप्रमाणें आठ उपग्रह असतात.

कोणत्याही नक्षत्रावर ग्रह असतांना तो, क्रूर विद्ध, क्रूरयुक्त, उपग्रहयुक्त, क्रूरग्रहदृष्ट असा असल्यास अशुभफल देतो. ग्रह-वेधांचीं फलें व अशुभनक्षत्रयुक्तत्वाचीं फलें नरपतिजयचर्येंत खालील-प्रमाणें दिलीं आहेतः—

अर्कवेधो मनस्तापो द्रव्यहानिश्च भूसुते ।
रोगपीडाकरःसौरी राहू केतूच विघ्नदौ ॥

**चंद्रे मिश्रफलं पुंसां रतिलाभश्च भार्गवे ।**
**बुधवेधे भवेत् प्रज्ञा जीवः सर्वफलप्रदः ॥**

सारांश काय कीं, नक्षत्रपद्धति ही सूक्ष्म असून त्या पद्धतीनें फलें जास्त सूक्ष्मकालदिग्दर्शनासह काढतां येतात. वरील जन्म, संपत् वगैरेपैकीं संपत्, क्षेम्य, साधक, मैत्र व परममैत्र हीं ५ नक्षत्रें शुभ-फल देणारीं होत.

संपत् नक्षत्रीं गुरु, शुक्र वगैरे येतात त्यावेळीं सांपत्तिक भरभराट, द्रव्यलाभ, स्थावर लाभ, उत्कर्ष वगैरे गोष्टी घडावयाच्या व याच-प्रमाणें इतर शुभनक्षत्रीं फल मिळावयाचें.

जन्म, विपत्, प्रत्वर उर्फ अरि, नैधन या नक्षत्रांत ज्यावेळीं पापग्रह भ्रमण करितात त्या त्या वेळीं शरीरकष्ट, हाल, अपमान, संकटें, हानि, अपकीर्ति, रोग, द्रव्यनाश वगैरे गोष्टी घडावयाच्या.

या सर्व गोष्टी झाल्या, पण या पद्धतीचीं फलें पाहतांना नक्षत्रें कोठून पहावयाचीं असा प्रश्न उद्भवतो. कारण जन्मतः चंद्र ज्या नक्षत्रांत असेल तें प्रथमचें नक्षत्र धरावयाचें किंवा जन्मकालीं पूर्व-क्षितिजस्थ उदित असलेल्या राशींत म्हणजे जन्मलग्नांत, जन्मवेळेस कोणतें नक्षत्र आहे, तें पाहून तें पहिलें नक्षत्र म्हणजे जन्मनक्षत्र धरावयाचें. आमच्या मतें जन्मकालीं उदित असणाऱ्या जन्मलग्नांत-र्गत नक्षत्रालाच विशेष महत्त्व दिलें पाहिजे. कारण चंद्र १ दिवस एका नक्षत्रांत राहत असल्यामुळें निरनिराळ्या जन्मकालाच्या वेळीं त्याची नक्षत्रात्मक स्थिति एकच राहणार. पण जन्मलग्नांतर्गत नक्षत्र घेतल्यानें ही स्थिति राहत नाहीं, व म्हणूनच जन्मकाळचें चंद्रनक्षत्र न घेतां, जन्मकालीन जन्मलग्नांतर्गत नक्षत्रच घेतलें पाहिजे व त्यावरूनच वर दिलेलीं फलें पाहिलीं पाहिजेत. असो.

---

# साखळींतील दुवा

आतांपर्यंतच्या एकंदर ११ विभागांत सामुद्रिक शास्त्राविषयीं जीं ग्रन्थोक्त महत्त्वाचीं वचनें प्रसिद्ध केलीं त्यांत **अङ्गविद्या** ह्या वराहसंहितेंतील अध्यायाचाहि समावेश केला. अर्थात् त्याच विचार-सरणीस अनुसरून **पिटकलक्षणहि** त्यांत समाविष्ट करणें अवश्य होतें. पिटक म्हणजे 'पुळी.' शरिराच्या कोणत्याहि भागावर पुळी किंवा पुटकुळी उत्पन्न होऊन ती कांहीं काळपर्यंतच किंवा कायमची शरीरावर राहिली, म्हणजे त्या पुटकुळीचा संबन्ध सामुद्रिक शास्त्राशीं येतो. पुष्कळांना असें वाटण्याचा संभव आहे कीं, **शारी-रिक लक्षणें**,-मग तीं तळहाताच्या रेषा ह्या रूपाचीं असोत; किंवा डोकें, डोळे, कान, इत्यादि अवयवांची ठेवण अशांपैकीं असोत, त्यांचा संबन्ध सामुद्रिक शास्त्राशीं येऊं शकेल. परंतु अङ्गविद्या म्हणजे प्रश्न करणारा अमुक अवयवास स्पर्श करील तर त्याचें फल अमुक सांगावें असें प्रतिपादन हें **सामुद्रिकशास्त्र** कसें ठरतें? तें प्रश्न-ज्योतिष किंवा शकुनवंती म्हणून ठरेल. तर याचा खुलासा असा कीं **हस्तरेषा, शीर्षरचना, नेत्रविकास** इत्यादि अवयवांचें **स्वरूप** या सर्व घटनेचा संबन्ध मनोवृत्तीशीं अथवा मनोव्यापाराशीं आहे. ह्या मनोव्यापारांचें शास्त्र तें मानसशास्त्र. ह्याला इंग्रजींत Psychology म्हणतात. मानसशास्त्र हा शब्द नवीन आहे. मानसशास्त्राला आपल्या इकडील जुना शब्द **योगशास्त्र** किंवा **चित्तवृत्तिशास्त्र** हा होय. ह्या शास्त्राची अगदीं सामान्य तरी माहिती वाचकास असावी. त्याशिवाय त्याला रहस्य समजणार नाहीं व ढोंगी, धूर्त किंवा ठक कोण हें त्याच्या लक्षांत येणार नाहीं.

मनुष्याच्या डोक्याची जी कठीण कवटी तिच्या आंत लिब-लिबीत असा पदार्थ आहे. त्याचा रंग पिवळसर आहे. मध्यें मध्यें

गुलाबी छटाहि मारते. डोक्यावर जेथें जेथें केंस उगवतात त्या त्या ठिकाणीं कवटीच्या खालीं हा लिबलिबीत पदार्थ आहे. त्याला चुण्या किंवा सुरकुत्या असतात. शास्त्रीय शब्द "वलये" असा आहे. ह्या वलयांमध्यें विकार आणि विचार यांची शक्ति राहते. ह्या पदार्थाला मेन्दू म्हणतात हें ऐकून तरी पुष्कळांना माहीत आहे. पुरुषांची शेंडी ( शिखा ) ज्या ठिकाणीं पूर्वी राखलेली असे त्या ठिकाणच्या कवटीच्या आंत मेन्दूचा एक फार महत्त्वाचा विभाग आहे. ह्या विभागाला "शिरोब्रह्म" ( Cerebellum ) म्हणतात. तेथूनच मेन्दूंतील मज्जाधातूचे लहानमोठे, जाड बारीक असे नानाप्रकारचे दोर, तंतू, रज्जू निघून त्यांचे असंख्य फांटे सर्व शरीरभर पसरलेले आहेत. श्वासोच्छ्वास, हृदयाची धडधड, रक्ताचें अभिसरण, अन्नाचें पचन, मलमूत्रांचें निःसरण इत्यादि ज्या अनेक आरोग्यरक्षक व आरोग्यवर्धक क्रिया शरीरांत चालू असतात, त्या सर्व क्रियांचें चालकत्व मेन्दू आणि मज्जारज्जू ह्यांचेकडे असतें. **जीवनशक्ति** आणि **जीवनव्यापार** ह्यांचें मुख्य स्थान मेंदू आणि शारीरिक क्रिया घडवून आणण्याचें त्याचें साधन मज्जारज्जू होत. काळीज हा रक्ताचा सांठा आहे. त्यांतून शुद्ध लाल रक्ताचा प्रवाह बाहेर पडतो, आणि नीळसर अशुद्धरक्ताचा प्रवाह तेथें परत येतो. अशुद्ध रक्ताचें शुद्धीकरण फुप्फुस नांवाच्या अवयवाच्या आंतील भागामध्यें चालू असतें. हा अवयव स्पंजासारखा परंतु पांढऱ्या लालसर रंगाचा असून तो छातीमध्यें स्तनांच्या ठिकाणीं दोन्ही बाजूंस असतो. रक्ताचें शुद्धीकरण आणि अभिसरण हें अर्थातच मज्जारज्जूंतून निघणाऱ्या तंतूंच्या योगानें घडून येतें. याप्रमाणें प्रत्येक शारीरिक क्रियेवर मज्जातंतूंचा अंमल आहे. तसेंच मज्जतंतू-वर मज्जारज्जूंचा आणि त्यांच्यावर मेन्दूचा अधिकार चालतो. वास्तविक सांगावयाचें म्हणजे सर्व शारीरिक क्रिया मेन्दूच्या व्यापा-

राच्या धोरणानेंच चालू होतात आणि चालत असतात, व मेन्दूच्या धोरणामुळेंच त्यांची क्रिया मन्द किंवा जोरानें चालते, किंवा बन्दहि पडते. पचनक्रिया थांबली अथवा मन्द झाली म्हणजे रक्त बिघडतें. रोग उत्पन्न होतात आणि रक्ताचें अभिसरण, किंवा श्वासोच्छ्वासाचा व्यापार अगदीं थांबला म्हणजे भयंकर मूर्च्छा अथवा मृत्युच येतो.. ह्याप्रमाणें मेन्दूंतील व्यापार आणि श्वासोच्छ्वास, रुधिराभिसरण इत्यादि शारीरिक क्रिया त्यांचा अत्यन्त निकट संबंध आहे. सामुद्रिकच काय पण जीवनशास्त्र, वैद्यशास्त्र आणि मानसशास्त्र ह्यांच्या अभ्यासकानें वरील व्यापारांचें पक्कें स्मरण ठेवावें म्हणजे अभ्यासामध्यें अडचणी फारशा भासणार नाहींत. मेन्दूवर पूर्णपणें अंमल आपल्या मनाचा, मनोविकारांचा, किंवा मनोवृत्तींचा आहे. ह्या मनोवृत्ति बहुतकरून बेफाम, उच्छृंखल आणि स्वैर असतात. ह्यावरून येवढी गोष्ट निश्चित ठरली कीं रक्ताभिसरण, श्वासोच्छ्वास आणि पचनादिक्रिया ह्यांच्यावर शेवटचें नियन्त्रण मनाचें आहे.

हस्तरेषा किंवा अवयवांची विशेष प्रकारची ठेवण अथवा घडण हे प्रकार शारीरिक क्रियांच्या धोरणानेंच झालेले असतात. म्हणूनच हस्तरेषांवरून किंवा अवयवांच्या विशेष प्रकारच्या ठेवणीवरून शारीरिक व्यापार कोणत्या मनोवृत्तींचे निदर्शक आहेत हें बिनचूक कळतें व कळलेंच पाहिजे. हाच सामुद्रिक शास्त्राचा पाया होय.

मेन्दू हें केवळ मनाचेंच स्थान आहे असें नसून तें जीवनशक्तीचेंहि स्थान आहे. मन आणि जीवनशक्ति त्या दोन्ही शक्ति परस्पर अगदीं एकत्र निगडित म्हणजे बान्धलेल्या असल्या तरी जीवनशक्ति ही स्वतंत्रपणें सुद्धां शरीराचे सर्वसंरक्षक आणि पोषक व्यापार चालवूं शकते हेंहि लक्षांत ठेवावें. जीवनशक्ति आणि मनोवृत्ति त्यांचा परस्परांशीं आणि शरीराशींहि संबंध आहे व

मनोवृत्ति किंवा स्वभावधर्म ह्यांच्या खळबळीमुळें शरीरावर अनेक परिणाम घडूं शकतात येवढें वाचकांनीं पक्कें ध्यानांत ठेविलें म्हणजे बराच कार्यभाग होईल.

मनुष्याच्या स्वभावापैकीं कांहीं मनोवृत्ति स्थिर असतात. स्थिर मनोवृत्ति म्हणजेच जो स्वभावधर्म कोणत्याहि मनुष्याच्या बाल्य, यौवन, प्रौढत्व आणि वार्धक्य ह्या वयाच्या सर्व अवस्थांमध्यें कायम राहतो, तो स्थिर स्वभाव, तीच स्थिर मनोवृत्ति. उद्दामपणा व नम्रपणा, क्रूरपणा व दया, दुष्टबुद्धि व सौजन्य, आंतल्या गांठीचा व भाबडा, अट्टल बदमाष आणि सालस, विश्वासघातकी आणि प्रामणिकवृत्ति, ढोंग व प्रांजलपणा, दुराग्रहि व विचारी इत्यादि वृत्तींच्या जोडयांपैकीं एक किंवा अनेक जोडयांचें कमी अधिक मिश्रण प्रत्येक मनुष्यांत असतें. ज्याच्या स्वभावांत नीचपणाचा भाग ज्यास्त त्याला आपण बदमाष म्हणतों. ह्याशिवाय विषय-सुखाची कमी, मध्यम किंवा बेसुमार लालसा ही एक बलवत्तर शक्ति आहे. ह्याप्रमाणें जीवनशक्ति आणि स्वभावधर्म ह्यांचें वास्तव्य मेन्दूंत असतें. त्यामुळें रुधिराभिसरण आणि पचनक्रिया ह्यांच्यावर निश्चितपणें परिणाम घडतो. ह्याचा अभ्यास करावयाचा असल्यास जीवनशास्त्र ( बायॉलजी ); इन्द्रियविज्ञान ( फिजिऑलजी ) ह्यांचा अभ्यास करून मगच मानसशास्त्र ( सायकॉलजी ) याचा अभ्यास केला तरच ह्या गोष्टींचा पूर्ण अनुभव घेतां येऊन बराच उलगडा होईल. केवळ मानसशास्त्राच्याच अभ्यासानें फारसा कार्यभाग होणार नाहीं. तथापि मनोवृत्ति आणि जीवनशक्ति ह्यांचा परिणाम रक्तावर व पचनक्रियेवर जो घडतो त्याचेंच प्रतिबिंब हस्तरेषा आणि शरिराची ठेवण ह्यांच्यामध्यें उमटतें असें वाचकांनीं मानसशास्त्राचा सखोल अभ्यास स्वत: केला नाहीं तोंपर्यंत गृहीत धरून तें सत्य मानूनच चाललें पाहिजे. नाहींतर वरील तिन्हीं शास्त्रांचा अभ्यास

क्रमानें करण्यास त्यांनीं सुरवात करून तो सर्व अभ्यासक्रम संपविला पाहिजे.

स्थिरस्वभावहि एकदम दृष्टोत्पत्तीस येतोच असें नाहीं. पुष्कळ वेळां दुष्टस्वभाव ल्हानपणीं गुप्त असतो. तो तारुण्यांत किंवा प्रौढ अवस्थेंत पूर्णपणें प्रकट होतो. त्याला अनुसरूनच हस्तरेषा अधिक अधिक स्पष्ट होत जातात. म्हणून सामुद्रिक अभ्यासूनें हस्तरेषांचा अभ्यास बारकाईनें व सावकाश केला पाहिजे. रेषांप्रमाणेंच तीळ, **मस, पुळी** हे प्रकार स्वभाव आणि त्याच्या स्थित्यन्तराचें द्योतक आहेत, म्हणून सामुद्रिक शास्त्राच्या प्राथमिक क्रमामध्यें पिटक-लक्षणांचा अन्तर्भाव केला पाहिजे.

मनुष्य हा पुष्कळ वेळां विचार करितांना आणि विशेषेंकरून बोलतांना हातवारे फार करतो. गवई गातांना डावा हात कानावर ठेवतांना पुष्कळांनीं पाहिलें असेल. तसेंच माना डोलविणें, एकच बोट उचलून हासडा देणें, टेबलावर, जमिनीवर हात आपटणें हेहि प्रकार बोलतांना नेहमीं चालतात. वकील, विशेषतः बॅरिस्टर, अॅड-व्होकेट, अथवा नामांकित वक्ता कसे नानातऱ्हेचे अंगविक्षेप करतो, तिकडेहि शेकडों लोकांचें लक्ष न वळतहि वेधलें गेलें असेल. लाजाळू मुली बोलतांना पायाचीं बोटें उगाचच चाळवीत असतात. किंवा वर्गामध्यें विद्यार्थ्याला शिक्षकानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर जर ताबडतोब आठवलें नाहीं तर तो विद्यार्थी वर्गाच्या वरच्या बाजूस किंवा रस्त्याकडे पाहतो व कोटाच्या गुंडयांवरून बोटें फिरवितो. तेव्हां अंगविद्येमध्यें जर असें लिहिलें कीं विद्यार्थ्यास प्रश्न विचारला असतां जर तो पटईकडे पाहील तर त्याला उत्तर आठवत नाहीं असें समजावें. असें लिहिलें तर कांहीं चूक होणार नाहीं. हाच प्रकार अंगविद्येच्या अध्यायांत आहे. सर्वसाधारणपणें मनुष्याचे विचार त्याला न कळत ज्या गोष्टीवरून, ज्या अंगविक्षेपा-

वरून अथवा ज्या धोरणावरून लक्षांत येतात, त्याचेंच विवेचन अंगविद्याध्यायांत आहे; आणि वरील विवेचनावरून तें सर्व सयुक्तिक आहे अशीच वाचकांची खात्री होईल.

अङ्गविद्या, पिटकलक्षण, इत्यादि प्रकरणांवरून आपल्या भारतीयांनीं प्राचीन काळीं मानसशास्त्रांत किती विलक्षण प्रगती केलेली होती तें ध्यानांत येईल. जो प्रकार अङ्गविद्येचा तसाच किंवा त्यापेक्षांहि चमत्कार सामुद्रिकांत आहेत. हस्तसामुद्रिकामध्यें त्यांनीं विलक्षण शोध केले आहेत. ज्याप्रमाणें एकाच जातीच्या झाडाला हजारों पानें असलीं तरी त्यांपैकीं दोन सुद्धां पानें अगदीं एकसारखीं कधीं सांपडणार नाहींत. आपणांस आंब्याचें पान, जांभळाचें पान, किंवा फणसाचें पान निरनिराळें ओळखतां येतें. परंतु एकाच आंब्याच्या झाडावर जीं हजारों पानें दिसतात, तीं आंब्याचीं म्हणून ओळखतां आलीं तरी त्यांतील दोन तरी पानें एकसारखीं असतात काय? असत नाहींत, आणि असावयाचींहि नाहींत. तोच प्रकार मनुष्यांच्या हातांचा. प्रत्येक मनुष्याचा तोण्डावळा जसा निराळा तसा प्रत्येक मनुष्याच्या हाताची ठेवण आणि त्यावरील रेषा ह्यांत फरक असतोच.

असें वाटण्याचा संभव आहे कीं दोन उत्तम गणिती, किंवा उत्तम वक्ते ह्यांचे हात पाहिले तर त्यावरील रेषा सारख्या असल्या पाहिजेत. परंतु विचारांतीं तसें असेलच असें म्हणतां येणार नाहीं. गणितविषयक बुद्धि किंवा वक्तृत्व, अथवा गायननैपुण्य ह्यांच्या खुणा जमतील. पण नुसता बुद्धिविषयक भागच मेन्दूंत नसतो; स्वभावाचे जे इतर धर्म वर सांगितले, त्याचा आणि जीवनशक्तीचा जोर किती त्याचा विचार केला तर दोन गणिती, दोन गायक, दोन उत्तम सेनापति ह्यांच्या हस्तरेषांमध्यें सादृश्य नाहीं असेंच पुष्कळ वेळां आढळेल. एक सेनापति उदार, शरण आलेल्यांवर दया

करणारा, आणि दुसरा तैमूरलंग, नादिरशहा त्यांच्याप्रमाणें क्रूरात्मा, अशा जोडींचे हात तपासले तर त्यांत सारखेपणा कसा आढळेल? दोन अत्यंत सुन्दर युवतींच्या हस्तरेषांतहि ह्याच कारणामुळें सारखेपणा असणें फारसें संभवनीय नाहीं.

एका ग्रन्थकारानें असा प्रश्न उपस्थित केला कीं, हस्तरेषांप्रमाणेंच चेहऱ्यावरूनहि स्वभाव ओळखतां येईल कीं नाहीं. त्या ग्रन्थकाराचें मत असें कीं, चेहऱ्यावरून स्वभाव ओळखण्यांत पुष्कळ वेळां चुकी होईल. त्याचें कारण तो असें सांगतो कीं, ढोंगी मनुष्य आपला खरा स्वभाव चेहऱ्यावर उमटूं देत नाहीं. त्या ग्रन्थकाराचें हें म्हणणें खोटें नव्हे. तथापि चेहरा म्हणजे "मुखमुद्रा" अथवा तोण्डावरील हास्यगांभीर्यादि आविर्भाव येवढाच अर्थ नाहीं. चेहरा म्हणजे डोक्याची ठेवण, हनुवटी, डोळ्यांतील तेज, चंचलता, किंवा क्रूरता, दांतांची रचना, ओठांची जाडी ह्यांमध्यें कोणताही ढोंगी मनुष्य बदल करूं शकत नाहीं. चेहऱ्यामध्यें वरील गोष्टीकडे लक्ष दिलें तर चेहऱ्यावरूनहि स्वभाव बिनचूक ओळखतां येतो. परंतु सोईच्या आणि सूक्ष्म अभ्यासाच्या दृष्टीनें हस्तरेषा आणि अङ्गुलिमुद्रा, ( अर्थात् बोटांवरील रेषांचे ठसे ) ह्यांच्याशिवाय सामुद्रिक शास्त्रास दुसरा भक्कम आणि निश्चित आधार नाहीं. म्हणून सामुद्रिक म्हणजे हस्तसामुद्रिक इतका संकुचित अर्थ ठरला.

हस्तरेषांमध्यें बदल होतो कीं नाहीं असा दुसरा प्रश्न आहे. आपल्याकडे "रेषा उमटली" अशी म्हण आहे. तिच्यावरून रेषांमध्यें कांहीं बुजून नाहींशा होतात आणि दुसऱ्या कांहीं नवीन दृष्टोत्पत्तीस येतात ही गोष्ट सामान्य लोकांतहि प्रसिद्ध आहे. अगदीं खालच्या प्रतीच्या किंवा सर्वसाधारण लोकांचा जो अनुभव त्या अनुभवाच्या अनुरोधानेंच म्हणी प्रचारांत येतात. आणि सामुद्रिक शास्त्रज्ञांचाहि अनुभव वरील म्हणीला धरूनच आहे. स्टीफन्सन् ह्या पाश्चात्य ग्रन्थ-

कारानें असें प्रतिपादन केलें आहे कीं, आनंद-प्रद अथवा दुःखप्रद किंवा भीतिप्रद अशा प्रसंगामध्यें ज्या प्रसंगाच्या अनुभवानें एखाद्याच्या मनावर कायमचा परिणाम होतो त्या प्रसंगाची निदर्शक खूण त्याच्या तळहातावर नवीन उमटते. समजा कीं, एकाद्या भित्र्या माणसाचा पाय विषारी नागाच्या अगदीं जवळ पडला हें त्या भित्र्याच्या एकदम दृष्टोत्पत्तीस आलें आणि त्याच्या आंगाला दरदरून घामहि सुटला, परंतु नागानें त्याला दंश न केल्यामुळें तो बचावला. अशा स्थितींत ह्या प्रसंगाची आठवण त्याला अगदीं कायमची राहिली तर त्या बचावलेल्या भित्र्या मनुष्याच्या हातावर नवीन खूण अथवा रेषा उमटेल.

स्टीफन्सनचें हें ह्मणणें योग्य दिसत नाहीं. हातावरील खुणांत किंवा रेषांत केव्हां केव्हां फरक पडतो हें खरें, पण भीतिप्रद किंवा दुःखप्रद प्रसंगाच्या अनुभवाची आठवण ताजी राहणें इतका ज्याचा हळुवार स्वभाव असतो त्या माणसाच्या हातावरील रेषा पालटतात हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण मग धीट माणसाच्या हातावरील रेषा कायम राहतात असा त्याचा अर्थ होईल. परंतु रेषापालट हा धीट आणि भित्रा, स्थिर आणि तापट, धिमा आणि धांदल्या अशा सर्वच प्रकारच्या मनुष्यांमध्यें झालेला आढळतो. त्याचा उलगडा स्टीफन्सनच्या विचारसरणीनें होणार नाहीं. म्हणून ही विचारसरणी मान्य करतां येत नाहीं.



## प्रकरण १३ वें

# आंगठ्याचें महत्त्व

चेहऱ्यामध्यें जसें नाकाला महत्त्व तसें हस्तसामुद्रिक शास्त्रांत आंगठ्याला महत्व आहे असें एक ग्रन्थकार म्हणतो, त्यांत सत्याचा भाग पुष्कळच आहे. अंगुष्ठ फल दर्शन ग्रंथांतून आहे. केवळ पाश्चात्य ग्रन्थांच्या आधारानेंच आपल्याकडे कांहीं लेखकांनीं सामुद्रिकावर लेख लिहिलेले आहेत. त्यांतील तळहातावरील रेषासंबंधानें लिहिलेले लेख वाचून हस्तसामुद्रिक म्हणजे केवळ हस्तरेषा सामुद्रिक असेंच बऱ्याच अभ्यासूंचें मत झालेलें दिसतें, पण तें बरोबर नाहीं. हस्तसामुद्रिकामध्यें सर्वच गोष्टींकडे लक्ष पुरवावें लागतें ( १ ) हाताच्या पंजाची ठेवण, ( २ ) त्याचा टणकपणा, मऊपणा, ( ३ ) बोटांचे सांधे आणि आकार, ( ४ ) बोटांचीं पेरीं ( ५ ) आंगठ्याची रचना आणि मग ( ६ ) तळहातावरील रेषा व उंचवटे असा सर्व गोष्टींचा विचार पद्धतशीर केला पाहिजे.

आंगठ्याची रचना पंजाच्या धोरणानेंच असतें. ओबडधोबड पंजांतील आंगठा बहुतेक तसाच असतो. चतुरस्त्र किंवा उद्योगशील ( useful ), व चिपिटाग्र ( spatulate ) अशा पंजांतील आंगठे त्या वळणाचेच असतात. आंगठा हा कर्तबगारीचा द्योतक आहे. आंगठ्या शिवाय बाकीच्या चारही बोटांना प्रत्येकीं तीन पेरीं असतात. परंतु हातापायांच्या आंगठ्यांना मात्र पेरीं दोनच. नख ज्या पेऱ्यामध्यें असतें तें **अग्र**, त्याच्या खालचें पेरें तें **मधील** आणि त्याच्याहि खालच्या भागाला **अंगुष्ठमूळ** अशीं नावें आहेत. अंगुष्ठमूळ हा एक उंचवटा आहे. तो स्पष्ट असेल तर त्या मनुष्याला त्याच्या मनाप्रमाणें प्रेमपात्रें मिळतात.

हा उंचवटा प्रेमाधिष्ठान या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. मधलें पेरें हें अकलेचें निदर्शक आहे. ज्याच्या आंगठ्याचें हें पेरें जाड लांब असेल तो मनुष्य अशी युक्ति लढवितो की यंव? हें पेरें युक्ति प्रयुक्तींचें स्थान आहे. पेरें मात्र त्या मानानें खंबीर असलें पाहिजे. हें पेरें किरकोळ असेल तर युक्तिही किरकोळच, पेरें बारीकच परंतु लांबट असेल तरी युक्ति किरकोळच पण यश अधिक. एवंच मधलें पेरें लांबट असेल तर बचाव होतो. तरी सांधा विशविशीत नसावा. सांधा मजबूत, मधलें पेरें लांब व त्या मानानें जाड आणि अग्र पेरेंहि त्यामानानेंच लांब व जाड असें असलें तर तो मनुष्य बलाढ्य, शहाणा आणि कीर्तिमानच होईल.

अग्रपर्व म्हणजे टोंकाचें जें पेरें त्याच्यावरून मनुष्याचा स्वभाव किती दृढनिश्चयी आहे तें कळतें. तें पेरें उगीच बारीक, दुबळें व आखूड असलें तर बोलावयासच नको. मनाचा दुबळेपणा, धरसोड, बोलांत बोल नाहीं, दुसऱ्या कोणाच्या तरी तंत्रानेंच चालणारा, स्वतः बुद्धि चालविण्याची शक्तिच नाहीं अशा प्रकारचा तो असावयाचा. अशा माणसाचा आयुष्यक्रम कसा असणार तें सांगण्याचें कारण नाहीं. परंतु टोंकाचें पेरें टणक असेल तर असा दुबळा मनुष्यहि प्रसंगीं एकदम असा निश्चय प्रकट करतो कीं आश्चर्यच करावें. त्याचें कारण हेंच कीं पेरें टणक असेल तर मनुष्य लेचापेचा असूनहि इमानी असतो. टोंकाचें पेरें बारीक आंखूड असूनहि मधलें पेरें जर ठीकठाक असेल तर मनुष्य बोलण्यांत कोटिबाज पण प्रसंगांत दगाबाज असा प्रकार होतो. अक्कल हुशारी पुष्कळ पण कुवत यथातथा, यामुळें " सभेंत **वक्ता, पण रणांत मागोता** " अशी स्थिति होते. ह्या प्रकारचे पुढारी हरहमेष आढळतात. किंबहुना असल्या पुढाऱ्याचें धोरणच हें कीं " तोबऱ्याला पुढें आणि लगामाला मागें, अशीच वागणूक ठेवावयाची.

ह्याच्या उलट स्वभावाच्या लोकांचांहि वाण नाहीं. ज्यांच्या आंगठ्याचें अग्र बळकट व त्यामानानें जाड, व मोठें असतें. त्यांचा निश्चय दांडगा, उत्साह जाज्वल्य, एकदम पुढें उडी, मग शेंडी तुटो पारंबी तुटो. परंतु मधलें पेरें जर आखूड तोकडें असलें तर निश्च-यामध्यें दुराग्रह आणि तर्कटीपणा ह्यांचाच अंश अधिक, त्यामुळें उत्साह असून उपयोग नाहीं आणि कर्तबगारी असून यश नाहीं असा प्रकार होतो. लोकांना पटेल असा युक्तिवाद करतां येत नसला तर निर्धाराला आडमुठेपणाचें स्वरूप येतें आणि मनुष्य लोकांच्या कुचेष्टेस पात्र होतो. परंतु नुसती बडबड करून प्रसंगीं माघार घेणाऱ्या अवसानघातकी आचरटांपेक्षां हा प्रकार उत्तम.

अंगुष्ठाग्र बरेंच रुंद्ट असेल परंतु त्या मानानें लांबट नसेल, तर मनुष्य हट्टी असतो, कारण त्याला बुद्धिचें पाठबळ नसतें. परंतु तो धडाडीनेंच निभाऊन जातो. आणि जर पंजा चतुरस्र जातीचा असेल तर बुद्धिकौशल्याचा उणेपणा बराच भरून निघतो. तथापि अग्र लांबट परंतु फारच रुंद असें असेल तर अशा माणसापासून भीतिच ज्यास्त. तो कोणत्या वेळेस काय करील त्याचा नियम नाहीं. वृत्ति आसुरी किंवा राक्षसी, नीच, जुलमी, दुष्ट लोक ह्या मासल्याचे असतात. अशा माणसांच्या आंगठ्याचें टोंक घस्मर, टणक आणि लठ्ठ आकाराचें असतें. खुंटीचा शेंडा जसा जाड वाटोळा असतो त्याप्रमाणें त्यांच्या आंगठ्याचा शेंडा दिसतो. असा आंगठा पाहिलाच पाहिजे. कल्पनेनें लक्षांत चांगलेसें येणार नाहीं. हे लोक महा भयं-कर असतात. निर्ढावलेल्या गुन्हेगारांमध्यें अशा आंगठ्याचे लोक सांपडू शकतील. 'आंगठ्यांतील हे दोष तळहातावरील रेषांमुळेंहि कमजास्त होतात.

आंगठ्याचा सांधा घटमुट नसेल तर अग्र मागील बाजूस वळूं शकतें. असें असेल तर मनुष्य हट्टी परंतु व्यसनी. विषयासक्त असतो.

त्यांतच बुद्धीच्या पेऱ्याचा जोर कमी असला तर स्त्रीविषयक आसक्तीला मर्यादाच राहत नाहीं. असा मनुष्य खादाडहि असतो व त्या पायीं तो द्रव्याची उधळपट्टी करण्यासही मागें पुढें पहात नाहीं. अर्थात् अंगुष्ठाग्र फार रुंद, टणक आणि लडदू असें असणें हा प्रकार हितकर नव्हे इतकें लक्षांत राहिलें तरी पुरें. त्याला लडदू आंगठा ( अथवा Clubbed thumb ) असें नांव दिलें आहे.

लडदू आंगठ्याच्या उलट प्रकार क्षुद्र अंगुष्ठाचा होय. म्हणजे त्याचें टोंक आणि मधलें पेरें, दोन्हीं किचकट किंवा तोकडीं, किरकोळच. अर्थ इतकाच कीं अशा इसमांचा निश्चय तर ढिलाच, परंतु अकलेच्या नांवानेंहि शून्यच. तोकडीं याचा अर्थ इतर बोटांच्या मानानें तीं तोकडीं, लहानसर असतात येवढेंच "घडिघडि बिघडे हा निश्चयो अन्तरीचा" हें उद्गार समर्थांनीं अशा लोकांना उद्देशन काढले असतील काय ?

एवच नुसतीं पेरींच लांब व जाड असून फारसा उपयोग नाहीं, तर त्यांचा सांधाहि भक्कम असला पाहिजे. म्हणजे टोंक मागें वाकविलें असतां आंगठा किंवा बोट मागें फार वाकूं नये. आंगठ्याला वांकण असलें तर मनुष्य स्वतःच्या मताविषयीं व शक्तिविषयीं साशंक असतो. एखाद्याच्या आंगठ्याचें टोंक स्वाभाविकपणेंच आंत म्हणजे तळहाताच्या बाजूस वळलेलें असतें. असा मनुष्य -इतर बाजूहि घसरलेल्या असतील तर—अतिशय लोभी किंवा कंजुष असतो. वांकणी अंगठ्याचा मनुष्य आपलें ऐकतो असें वाटेल; पण तो वेळेस बदलणार नाहीं असें मात्र नाहीं.

उलट, ज्याच्या पेरांचा सांधा भक्कम असेल त्याचें मन वळविणें कठिण असलें तरी तो वचनाचा धड असतो, कधीं बदलणारा नव्हे. आणि वर लिहिल्याप्रमाणें अंगुष्ठाग्र जर प्रमाणशीर लांबीचें व जाडीचें असेल, तर तो मनुष्य निश्चयी व विश्वासार्ह समजावा. अशा

भक्कम पेरांच्या माणसाचे जिवलग मित्र फारसे नसतात, कारण त्याचें मित्रत्व जोडण्यास वेळच ज्यास्त लागतो. " आज गळ्यांत गळा, उद्यां मागल्या मागें पळा " असा लटपटीचा खेळ असा मनुष्य कधीं खेळत नाहीं. परंतु ह्यांची वृत्ति थोडी आढ्यतेची असते. अशी माणसें आपण होऊन दुसऱ्याशीं बोलणारच नाहींत.

परंतु वांकणी आंगठ्याचा मनुष्य अघळपघळ बोलेल. आगगाडींत शेजारच्यापाशीं बोलण्यांत अगदीं समरस होईल व मित्र पुष्कळ जोडील. हा प्रकार सामान्य व्यवहारांत ठीक आहे. बुवांच्या भोंवतीं जो भक्तांचा गोतावळा जमतो त्यांत ह्या वांकणी आंगठ्याच्या भक्तांचीच संख्या जास्त भरेल. हे लोक थोडे बुद्धिवादी असल्यानें आपला मूर्खपणा हा धोरणांचाच एक प्रकार आहे असेंहि प्रतिपादन करण्यास मागें पुढें पाहणार नाहींत. अर्थात खुंटाळ पेऱ्याच्या इसमाच्या उलटच हा गृहस्थ असतो. वर सांगितलेंच आहे कीं खुंटाळ पेऱ्याचा इसम महाभयंकर असतो. जे पुरे धीट आणि मजबूत असतील त्यांनींच खुंटाळ इसमाशीं प्रसंग करावा. इतरांनीं त्या फंदांत पडूं नये. खुंटाळ मनुष्य एकदम एकेरीवर येऊन मारामारी करूं लागतो. परंतु तळहाताच्या रेषा व्यवस्थित असतील तर मात्र खुंटाळाचा क्रोधाग्नि थोडा शांत असतो.

आंगठ्याचा असाहि एक प्रकारचा आढळतो कीं त्यांचें टोंक अथवा शेंडा सर्व साधारण पद्धतीचा परंतु मधलें पेरें मात्र अगदीं आवळलेलें, किंवा सिंहकटि सारखें मध्येंच बारीक असें असतें. हाहि प्रकार चांगल्यापैकीं नाहीं. आंवळ पेऱ्याचा म्हणजे ज्यांचें मधलें पेरें आंवळलेलें अशा पेऱ्याचा मनुष्य कोटिक्रमांत थोडी बहुत लबाडी करतो किंवा पाचपेंच लढवितो. म्हणून एकंदरीनें पाहतां आंगठ्याचा हाहि प्रकार दुबळ्यांतच जमा.

आंगठ्याच्या आकाराचे व घडणीचे प्रकार आतांपर्यंत सामान्यतःच वर्णिलेले आहेत.

**योग्य प्रकारचा** आंगठा असा पाहिजे कीं, त्याच्या दोन्ही पेऱ्यांची **जाडी** व **लांबी** प्रमाणशीर पाहिजे. कोणतेंच पेरें मध्येंच बारीक किंवा ओबड धोबड असूं नये.

मधला सांधाहि लिवलिवीत नसून ताठर असावा. म्हणजे मधील पेरें चातुर्य व बोलण्याची छाप यांच्या उत्कर्षाचें गमक असतें, आणि टोंकाचें पेरें निश्चय, निर्धार आणि धाडस ह्यांचें ज्ञापक असतें.

लिवलिवीत, किरकोळ, आंखूड व आंवळ पेरांचे आंगठे चांगले नव्हेत, आणि त्यांत तर खुंटाळ आंगठा तर फार वाईट.

असें आहे तरी देखील केवळ एका आंगठ्यावरून मनुष्य अमुकच प्रकारचा आहे अशी आपली समजूत करून घेऊं नये. ही गोष्ट पुनः पुनः सांगण्याचें कारण इतकेंच कीं हें धोरण सामुद्रिक शास्त्राच्या रहस्यापैकीं एक रहस्य आहे. आंगठा, पंजाची ठेवण आणि तलरेषा ह्या सर्वांचा मेळ पाहूनच निर्णय करावा. उदाहरणार्थ,

ज्या इसमाचा आंगठा खुंटाळ ठेवणीचा आहे अशा इसमाचा पंजा सुद्धां जर धोबड रचनेचा ( म्हणजे Elementary ) असेल तर तो इसम तडकाफडकी खून करण्याच्या प्रवृत्तीचा असण्याचा बराच संभव आहे असें Cheiro हा शास्त्रज्ञ म्हणतो. तसेंच—

आंगठा लिवलिवीत पेराचा परंतु बुद्धिरेषा जर ठीक असेल तर तो मनुष्य वाया जाणार नाहीं. पुष्कळ वेळा आपल्याच धोरणानें वागेल. त्याचप्रमाणें—आंगठ्याचें टोंक ठीक कणखर असलें म्हणजे निर्धार जबर; परंतु पंजा मऊ असला तर निश्चय तडीस नेण्यांत विलंब होतो. तसेंच हस्तरेषा वाईट परंतु आंगठ्याचीं दोन्हीं पेरीं यथायोग्य असतील तर हानीचे प्रसंग निभावले जातील.

# हातांचीं बोटें

आंगठ्याच्या खालोखाल हाताच्या बोटांचा आकार, जाडी, लांबी, सांध्यांचा जोरकसपणा इत्यादि गोष्टींना महत्त्व आहे. प्रत्येक बोटाला तीन तीन पेरीं असतात, परंतु आंगठ्याला बाह्यत: फक्त दोनच असतात हें सर्वांना दिसून येईलच. यापैकीं नखाचें पेरें तें पहिलें, त्याच्या खालचें मधलें आणि तळहाताजवळचें जें पेरें तें तिसरें, असें मानण्याचा परिपाठ आहे. कांहींचीं बोटें सारखीं **सळनळीत** असतात, म्हणजे सांध्यामध्यें जाड नसतात किंवा नखाचें पेरेंहि निमुळतें वगैरे नसतें. दुसऱ्या प्रकारचीं बोटें अशीं **लठ्ठ** असतात कीं, त्यांतील तिसरें तळहातानजीकचें पेरें फारच जाड, नंतर मधलें कमी, आणि पहिलें त्या मानानें बारीक असतें, तिसऱ्या प्रकारचीं बोटें **गांठाळ** म्हणजे त्यांचे सांधेच फक्त जाड परंतु पेऱ्याचा इतर भाग बारीक असतो.

आंगठ्याप्रमाणें हाताचीं बोटेंहि पाठीकडे फारच वांकवतां येण्यासारखीं असलीं तर तो मनुष्य हट्टी आग्रही नसतो; परंतु त्याच्यानें एकाच गोष्टीचा पिच्छा पुरविण्याचें मात्र काम होत नाहीं. तिसऱ्या अथवा तळच्या पेऱ्याला लागूनच तळहातावर **प्रत्येक बोटाच्या मुळाशीं टणक भाग** असतो. त्याला **उंचवटा** असें नांव आहे.

ह्या उंचवट्यांना इंग्लिश शास्त्रामध्यें ( Mounts ) म्हणतात. हे उंचवटे बरेच **टणक** व **जाडी** असावे, सपाट असूं नयेत असें पाश्चात्यांचें मत आहे.

**प्राचीन ग्रंथांतही " उन्नतं, मांसलं " अशा प्रकारचे भाग सांगितले आहेत.** तेंच पाश्चात्यांचे उंचवटे म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

# पंजा

हाताचा पंजा कांहीं लोकांचा भला मोठा असतो, तर कांहींचा ल्हान असतो. पंजा फार मोठा असेल तर तो मनुष्य बारीक मारीक तपशीलाकडे लक्ष पुरवितो. नक्षी काम करणारांचे पंजे मोठ्यापैकीं असतात. तथापि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, ज्याच्या हातून अवाढव्य पूल, भव्य इमारती इ० कामें झालीं आहेत त्याच्या हाताचे पंजे मोठे असल्याचे आढळत नाहीं. परंतु एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी अशी कीं, मोठें हस्ताक्षर ज्यांचें असेल, त्याचा पंजा मोठा नसतो. परंतु ज्याच्या हाताचा पंजा मोठा आहे त्याचें हस्ताक्षर बारीक असते, असें एका ग्रन्थकारानें म्हटलें आहे.

# हाताच्या बोटांची लांबी आणि आकारमान

बोटें जाडजूड असली म्हणजे तीं आखूडच असतात. आंखूड बोटांचा मनुष्य अविचारी, तडफड्या स्वभावाचा असतो; वेळेवर जें कार्य त्याच्या मनांत येईल त्याप्रमाणें मागें पुढें न पाहतां कृति करून मोकळे होण्याकडे त्याची प्रवृत्ति असते. बारीकसारीक तपशीलाकडे पाहतो कोण. हस्तरेषा आणि उंचवटे ह्यांचें आनुकूल्य असेल, तर अशा तडकाफडकी निर्णयाचा फार उपयोग होतो; कारण अशा अनुकूलतेमुळें निर्णय चुकत नाहीं. सेनापति, मुत्सद्दी ह्यांना अशाच तडकाफडकी परंतु अचूक निर्णयाची आवश्यकता असते. परंतु अशी अनुकूलता नसेल तर निर्णय चुकतो व करणें आंलगट येतें. आखूड आणि जाड बोटांचा मनुष्य थोडा बहुत क्रूर असतो हा त्यामध्यें महत्त्वाचा दोष आहे.

बोटांच्या पेरांचे सांधे मजबूत असणें हें एक उत्तम चिन्ह आहे. मजबूत पेरांचा मनुष्य धोरणी असतो, त्यामुळें झटपट निर्णयामध्यें

चुकण्याचा संभव कमी राहतो. परंतु दुसरा उलट दोष असा उत्पन्न होऊं शकतो; कीं घट्टमूट सांध्यांचा मनुष्य भांडखोर, धटिंगण, वाटेल तें दडपून सांगून वेळ मारून नेणारा असतो. एकंदरीनें पाहतां पंजा, बोटें, व पेरीं ह्यांचा टणकपणा हा **कणखर** आणि **आग्रहीवृत्तीचा** द्योतक आहे.

बोटें लांब असलीं म्हणजे तो तपशिलांतच गुरफटून जाणारा असतो. पोषाख चापून चोपून करणें व इतर टापटीपीकडे लक्ष देणें हेंच त्याला आवडतें तो चिडतोहि लवकर आणि खुलतोहि लवकर. लांबबोटांच्या पेरांचे सांधे बळकट असले म्हणजे ह्या तपशीलबाज स्वभावाला थोडे योग्य तें वळण लागतें परंतु एखादाच सांधा बळकट असून मात्र भागत नाहीं. लांब बोटाचीं माणसें चित्रकार निपजोत कीं साहित्यभक्त असोत त्यांचें तपशीलप्रेम त्यांना जेथें तेथें नडेल. त्यापासून त्यांना स्वतःलाच नव्हे तर दुसऱ्यालाहि त्रास होईल. कारण अशीं माणसें स्वभावानें **कमकुवत,** संशयी असतात. दुसरा कांहींहि बोलला तरी तें ह्यांना वांकडें लागतें व तेहि दुसऱ्यास चुकवूं पाहतात; परंतु त्यांत त्यांचा जम बसत नाहीं ही गोष्ट अलाहिदा अशा माणसांचा बचाव त्यांच्या हातावरील रेषा दोरीसूत स्पष्ट असतील तरच होतो. नाहींतर प्रसंगीं त्यांची फार फटफजिती होते.

## बोटांचीं टोंकें

बोटांप्रमाणेंच बोटांच्या टोंकावरूनहि थोडेंसें स्वभावज्ञान होतें. चौकोनी, थबकडा, निमुळता, टोंकदार इत्यादि प्रकार जसे पंजाचे तसेंच ते बोटाचेही आहेत. टोंकें (१) **रुंद व गोल** हा पहिला प्रकार; ह्याला spatulate म्हणतात; (२) रा प्रकार बोथट किंवा चापट टोंकांचा; ह्याला square tips म्हणतात. तिसरा निमुळता अ० Conieal टोंकांचा. आणि चौथा अणकुचीदार किंवा

Pointed टोंकांचा. बोटांच्या टोंकांवरूनच हातांच्या पंजांचे प्रकार बसविले आहेत, इकडे लक्ष दिल्यास टोंकांचा संबंध स्वभावज्ञानाच्या कामीं कमी नाहीं असें दिसून येईल.

गोल टोंकाच्या बोटांचा मनुष्य कांहींतरी उपयुक्त कामांतच गुंत-लेला असतो; व्यापार, शेतकी, उद्योगधंदा ह्याच्याकडे त्याचें चित्त वेधतें. परंतु स्वभाव परिज्ञानांत एकांगीपणा उपयोगी नाहीं. पंजाचा आकार, बोटांची लांबी, जाडी, आंगठ्याची ठेवण, सांध्याची मजबुती, आणि टोंकांचें स्वरूप ह्या सर्वांचा तुलनेनें विचार करावा तेव्हां अडाखा बरोबर येईल. गांठाळ सांध्याची अशा बोटाच्या मनुष्याला मोठी मदत होते. व त्याच्या उद्योगधंद्याला शास्त्रीय स्वरूप येतें.

टोंकें चापट ( square ) असलीं तर काम कसोशीनें करण्याचा स्वभाव असतो. उद्योगधंदा असो, शास्त्राभ्यास असो, वाङ्मय कार्य असो त्यांत हा मनुष्य बुद्धि चालवून त्याला व्यवस्थित नमुनेदार स्वरूप देईल. विचारपूर्वक त्याचे नियमहि ठरवील. व्यवस्था आणि नियमबद्धता असें धोरण चापट टोंकांचीं बोटें असणाऱ्या मनुष्याचें असतें. विचारांत संगतवारपणा आणि कल्पनेंत निश्चितता असतें. अशा बोटांचेहि सांधे बळकट असावे म्हणजे उत्तम. बजवय्या गुणि-जनांच्या बोटांचीं टोंकें चापटच असतात.

निमुळतीं टोंकें असलीं म्हणजे मनुष्य कलाकुसरीचा भोक्ता असतो. Romance कडे म्हणजे उच्च प्रकारच्या कलोपासनेकडे त्याचें लक्ष गुंततें. निष्ठुर अशा ऐहिक व्यवहारापेक्षां काल्पनिक सौंदर्यांत तो गुंग असतो. आणि अणकुचीदार टोंकांच्या बोटांचा मनुष्य तर ह्याच दिशेंत परंतु त्याहिपेक्षां पुढें असतो. तो कल्पनेंच्या सौंदर्यांत, कल्पनासृष्टीच्याच आनंदांत तल्लीन राहतो. किंवा धार्मिक वृत्तीकडे झुकला तर त्याबाबतींतहि त्याचें धर्मप्रेम अनावर होतें. ह्याप्रमाणेंच बोटांच्या टोंकांवरूनहि स्वभावाची अटकळ बांधतां येते.

आतां आपणांस हस्तरेखा–प्रक्रियेकडे वळावयाचें आहे. आम्हीं त्यासंबंधानें जरा विस्तृत विवेचन करीत आहों त्याचें कारण असें कीं आमच्या वाचकांपैकीं पुष्कळ अभ्यासू आणि शोधक आहेत. हल्लींचें युगच असें आहे कीं त्यांत ढोंगालाहि उत्तेजन मिळतें, आणि खऱ्या शास्त्राची गळेचेपी होतें. जनते मध्यें संशोधक, व विचारी वर्ग हा भोळसर वर्गाच्या तुलनेनें संख्येनें फारच कमी असणार. भोळसर लोकांना नादीं लावणारें पुष्कळ लोक आहेत. पण त्यांचा तो मार्ग केवळ थोतांडाचा असल्यानें त्याच्याशी आम्हास कांहीं कर्तव्य नाहीं. जनतेमध्यें उदासीन आणि बेपर्वा वृत्तीचेहि लोक पुष्कळ असतात. त्यामुळें शास्त्राभ्यासाला त्यांचेकडून कांहींच सहाय मिळत नाहीं. त्या कारणानें शास्त्रसंशोधनाची, शास्त्राभ्यासाची सर्व मदार अल्पसंख्यांक जो चिकित्साबुद्धीचा वर्ग त्याच्यावर असते. ज्या काळांमध्यें हा संशोधक वर्ग उद्योगमग्न आणि बराच सुखवस्तु असतो, तेव्हांच शास्त्राला खरें चालन मिळतें. कारण केवळ ज्ञानार्जनासाठीं–द्रव्यासाठींच नव्हे—शास्त्राभ्यास करणारे लोक ह्याच वर्गातून निर्माण होत असतात. परंतु जेव्हां हाच वर्ग उदरभरणाच्या विवंचनेंत गुरफटून जातो. त्या काळांत शास्त्राची गळचेपी होते. हल्लीचा काळ अशाच कठिण काळांपैकीं आहे. आमची तळमळ अभ्यासू वर्गाकरितां विशेष आहे. हाच विचारी वर्ग भोळसर वाचकांना शास्त्रमार्गावर आणण्याचे योग्य कार्य करील.

फलज्योतिषशास्त्राचा जसा मुख्य उपयोग परिस्थिति परिज्ञान आणि भविष्य कथन यांच्याकडे होतो. त्याच प्रमाणें हस्तसामुद्रिकाचाहि होतो. भविष्य हें “ टळ ” आहे कीं “ अटळ ” असा प्रश्न जसा एखादा मनुष्य वारंवार विचारीत असतो तसाच–तोच प्रश्न–सामुद्रिकांतहि उपस्थित होतो. निसर्गाच्या रचनेचे आणि त्याच्या हजारों व्यापारांचें सूक्ष्म ज्ञान मनुष्यास साकल्यानें कधींहि

होत नाहीं. त्याकारणानें भविष्य किंवा परिस्थिति वर्णन फार विचारानें करावें लागतें. भविष्य हा एक बुद्धिबळाचा डाव आहे. ज्याची बुद्धि ज्यास्त चलाख, व सूक्ष्म असेल तोच त्या शास्त्रांत यश मिळवील—अथापि बाकीच्यांनीं सतत प्रयत्न—करावा. त्यांचें ज्ञान कधींहि फुकट जाणार नाहीं. नित्य व्यवहारांत उपयोगी पडेलच.

व्यवहारांत भविष्य याचा अर्थ "भविष्याची संपूर्ण निश्चिति" असा लोक समजत नाहींत. त्याबाबत होणाऱ्या गोष्टींचा "संभव," "**विशेषसंभव**" असा समजतात आणि व्यवहारहि त्याच धोरणानें चालतो. कारण घोर संकटाचें भविष्य खरें ठरण्यानें जी कीर्ति वाढेल त्यापेक्षां भविष्याप्रमाणें संकटकाल उत्पन्न झाला परंतु त्यांतून मनुष्य बचावून गेला, असें जर होईल किंवा मनुष्याचा नाश होण्याचें भविष्य खरें ठरण्यापेक्षां संकटांतून बचावण्याचें त्याला भाग्य लाभलें, तर ती गोष्ट खरोखरच ज्यास्त श्रेयस्कर आहे असेंच पाश्चात्य समजतात. व्यवहार दृष्ट्या ही विचारसरणि ठीक आहे, म्हणून भविष्य "टळ" कीं "अटळ" असा काथ्याकूट करण्यांत कोणींही वेळ फुकट घालवूं नये. संकटकालाची पूर्वसूचना मिळणें हें साधेंत कीं नाहीं येवढेंच पहावें.

**डिमॉस्थेनीस**— ह्या नांवाचा एक अतिविख्यात वक्ता आणि लोकधुरीण पाश्चात्यामध्यें होऊन गेला. तो म्हणतो कीं, "तुम्हीं भविष्य खोटें होईल कीं खरें होईल ह्याची व्यर्थ वाटाघाट करूं नका वाईट भविष्य टळणें शक्य आहे असें समजून प्रयत्नाची पराकाष्ठा करा. उद्योगामध्यें खण्ड पडूं देऊं नका. लोकमान्य टिळकांनीं हाच उपदेश ते १९१८ सालीं इंग्लण्डला गेले त्यावेळीं येथें एका प्रसंगीं केला. लोकमान्यांच्या ह्या महत्वाच्या भाषणाचा सारांश आह्मीं त्याच वेळीं प्रसिद्ध केला आहे. यावर कोणी असें ह्मणूं शकेल कीं जर उद्योग आणि श्रम चुकत नाहींत. जर परिश्रम आणि

प्रयत्न केलेच पाहिजेत, तर शास्त्र तरी कां शिकावें ? शास्त्र शिकण्याची यातायात कां करावी ? असा प्रश्न जर खोंचून अथवा टवाळी करण्याच्या उद्देशानेंच केला असेल तर त्याला उत्तर हें कीं; "नका शिकूं. रडत राऊतास घोड्यावर बसण्याचा कोण आग्रह करतो. संकटांत सांपडाल तेव्हां सामुद्रिकाचें घर धुण्डाळीत जाऊन त्याच्या पायां पडाल." तथापि जो कोणी असा प्रश्न प्रामाणिक बुद्धिनें करित असेल त्यास त्याचें द्यावयाचे खरें उत्तर फार महत्त्वाचें आहे. प्रथम हा विचार कीं शास्त्रजिज्ञासा ही नैसर्गिक प्रवृत्ति आहे. सुस्थिति असो, दुःस्थिति असो. जिज्ञासु हा शास्त्र शिकणारच आणि असेच जिज्ञासु शास्त्राचा अभ्यास करतात.

महत्त्वाची गोष्ट ही कीं, संकटकालाचीं चिन्हें शास्त्रज्ञावांचून इतरांस अगोदर केव्हांहि कळत नाहींत. कोणास विषमज्वर Typhoid पछाडतो, कोणास अपघात होऊन जन्माचा अधु बनवितो किंवा प्राणासहि मुकावें लागतें. कोणास क्षय इत्यादि दुर्धर व्याधि जडतात, परंतु पुढल्या आठवड्यांत अपघात होणार किंवा विषमाची बाधा होणार हें कळत नाहीं. आणि यदा कदाचित् चुकून कल्पना झाली तर त्याच्या प्रतिकाराच्या तयारीस पुरेसा वेळ मिळत नाहीं. किंबहुना प्रतिकाराची व्यवस्थासुद्धां होऊं शकत नाहीं. ही आपत्ति शास्त्रामुळें टळते. व्याधि आणि हानि ह्यांची इशारत शास्त्रामुळें इतक्यापूर्वी मिळते आणि इतकी निश्चित मिळते कीं, प्रतिकाराची पूर्ण योजना आखता येते. आणि इतकें करूनहि आपत्ति कोसळलीच तर तिची तीव्रता कमी होते, व निभावून जाण्याचा संभव उत्पन्न होतो. हाच ज्योतिषाचा म्हणजे फलज्योतिषाचा व सामुद्रिकाचा निष्कर्ष आहे. ह्या विवेचनावरून फलज्योतिषांतील भविष्याच्या मर्यादा अभ्यासूस कळून येतील. " टळ " " अटळ " ह्या सारखे निष्कारणवाद माजणार नाहींत. उद्योग श्रेष्ठ का नशीब

म्हणजे दैव श्रेष्ठ असलें शुष्क चर्वितचर्वण कोणी करणार नाहीं. प्रयत्न हाच आयुष्यक्रमाचा पाया आहे. प्रत्येक मनुष्य हा सबंध जन्मभर प्रयत्न करीतच असतो. उद्योग हेंच त्याचें ध्येय असते. कर्मयोग, उपासनायोग, ज्ञानयोग हे सर्व प्रयत्नावर उभारले आहेत. राजकारण योग हाहि प्रयत्न आहे. परंतु एखादी गोष्ट एका विशिष्ट प्रकारच्या प्रयत्नानें घडली तर त्याच प्रयत्नानें दुसऱ्या प्रकारची गोष्ट घडणार नाहीं. परीक्षा पास व्हावयाची तर ठरीव अभ्यास तत्पूर्वी पूर्ण झालाच पाहिजे, व उपस्थिति पाहिजे. आणि आंग कसकसूं लागलें तर लंघन आणि सारक ह्याचा प्रयोग केला पाहिजे. परंतु कोणी परीक्षेसाठीं लंघन आणि आंग ठणकतें म्हणून पुस्तक पाठ करूं लागला तर तो योग्य प्रयत्न नव्हे. अशाच अयोग्य प्रयत्नानें पुष्कळ वेळां अपयश येतें.

पुष्कळ आणि विशेषतः त्रस्त मनुष्याची प्रवृत्ति दैवच बलवत्तर असून मानवी प्रयत्न व्यर्थ होत असें मानण्याकडे असते, ह्याबद्दल वाद नाहीं. सामान्य मनुष्यें काय म्हणतात किंवा काय समजतात ह्याबद्दल आपण येथें चर्चा करीत नाहीं, तर विद्वान व विचारी लोक काय म्हणतात, तेंच येथें आपणांस पाहावयाचें आहे. लोक नेहमीं उदाहरण म्हणून देत असतात कीं, ' तदा क्लेशैर्न दूयेरन् नल-राम-युधिष्ठिराः ॥ म्हणजे नल राजा, श्रीरामचन्द्र, आणि पाण्डव यांना खडतर कष्ट झाले ते दैवयोगामुळेंच नाहीं काय? तेथें प्रयत्न कां लटके पडले? ह्या संबंधानें प्रयत्नवादी म्हणतो कीं नल हा शत्रूच्या कपटामुळें फसला, परंतु त्यास राज्य परत मिळालें तें त्याच्या प्रयत्नामुळेंच मिळालें. श्रीरामचन्द्र आणि पांडव यांनीं तर आपलें राज्य दुर्दैवावर मात करून अर्थात् युद्ध करून प्रयत्नानेंच मिळविलें. ह्या जगामध्यें दैव आणि प्रयत्न म्हणजे पुरुषकार ह्या दोहोंना पूर्ण वाव ठेवला आहे. सृष्टीचें दुर्लंघ्य नियम, शत्रूचें कपट,

नीचपणा आणि विश्वासघात, आपला भित्रेपणा व आळस ह्या गोष्टी मनुष्यास नडतात. साहस, पराक्रम, ज्ञान, दक्षता, वेळचेवेळीं काम करणें, नौकरांचें इमान ह्या गोष्टी म्हणजे ज्यामध्यें लौकिक आणि कीर्ति आहे त्या बाबतींत प्रयत्न श्रेष्ठ आणि कपट, दुबळेपणा, व अज्ञान ह्या नडिक गोष्टी आहेत. अचानक संपत्ति मिळणें ह्यांत कीर्ति नाहीं. पण पराक्रमाळा, दराऱ्याला भिऊन शत्रूनें अचानक पळ काढणें ह्यांत पुरुषार्थ आहे. ह्यावरून काय तें ध्यानांत येईल. भविष्याचें बिनचूक ज्ञान हा आपला इमानी अधिकारी आहे. देखरेखाधिकारी ज्याप्रमाणें सेनापतीस शत्रूच्या गुप्त हालचालीची बातमी देतो, त्याप्रमाणें फलज्योतिष आणि सामुद्रिक हे इमानी अधिकारी आहेत. त्यांच्यापासून आपत्तीचा काळ अगोदर कळला तर घाबरण्याचें कारण काय? उलट प्रयत्न करण्यास सवड मिळते हा काय लहान सहान फायदा? घात होतो तो घाबरटपणानें होतो, प्रयत्नानें फायदाच होईल. नुकसान कधीं होणार नाहीं. ह्यापेक्षां भविष्यज्ञान संपादन करण्याच्या आवश्यकतेविषयीं अधिक काय सांगावयास पाहिजे? मनुष्य सर्वज्ञ नाहीं व सर्व शक्तिमानहि नाहीं; त्यामुळेंच दैवाला अवसर मिळाला आहे. झाड झाडोरा, पशुपक्षी, कृमि, कीटक हे दैवाधीन परंतु मनुष्य हा स्वतंत्र बुद्धीचा असूनही दैवाच्या कचाट्यांत सांपडतो. अशी असंख्य उदाहरणें आहेत. तथापि दैवाधीन स्थिति लक्षांत घेऊन प्रत्येकानें जोराचा उद्योग केला पाहिजे. भविष्य आणि सामुद्रिक हे ज्ञानशक्तीचें वैशिष्ट्य आहे आणि म्हणूनच तें प्रत्येक चतुर मनुष्यानें शिकलें पाहिजे असो.

बाह्य आकार आणि स्वभाव ह्यांत साम्य कितपत असतें ह्या बद्दलचा हा एक प्रश्न आहे. कारण ज्याला आपण सौंदर्य किंवा रेखीव बांधा म्हणतों तसा बाह्य आकार असणारी व्यक्ति सुस्वभावी असतेच असें मात्र नव्हे. अत्यंत रूपवती स्त्रियांमध्यें सुद्धां दुष्टपणा

ओतप्रोत भरलेला आढळतो. आणि कुरूप म्हणून गणल्या गेलेल्या स्त्रिया शीलवती असल्याचा अनुभव येतो. असें कां असावें हा प्रश्न महत्त्वाचा आहे. त्याचें उत्तर असें कीं बाह्य सौंदर्य किंवा बाह्यतः साधारण स्वरूप हें स्वभावाचें खरें निदर्शक नाहीं. डोळे, नजरेची ढब, चालण्याची लकब, दातांची ठेवण, हातांच्या पंजाची रचना ह्याच गोष्टीवरून स्वभाव कळून येतो. डोळ्यांतील पाणी आणि पाहण्याची तऱ्हा, हंसण्याचा प्रकार ह्यावरून स्वभावाचें जें धोरण बांधतां येतें तें सहसा चुकत नाहीं. त्यालाच निश्चिति हस्तसामुद्रिकाच्या ज्ञानानें येते, हा अनुभव रोकडा आहे. हात पाहून अमुक वेळेला तुझा पगार वाढेल किंवा तुझा विवाह होईल, अथवा तुला संतति होईल हें भविष्य सांगणें व कळणें हें सूक्ष्म सामुद्रिक आहे; परंतु अमुक मनुष्य हुषार आहे, कीं गबाळ आहे, भाबडा आहे कीं पक्का बिलंदर आहे, सालस आहे कीं लफंगा आहे; बुद्धिमान आहे किंवा शंख आहे, सरळ स्वभावाचा आहे किंवा हलकट, नीच आहे; हें बऱ्याच अंशीं कळलें तरी काय फायदा थोडा झाला ? ह्या शास्त्रांत प्राविण्य संपादन झाल्यावर कुण्डलीची अथवा फलज्योतिषाची जरूर नाहीं. परंतु प्रथमावस्थेमध्यें मात्र जिज्ञासूनें सामुद्रिक आणि कुण्डलीज्ञान यांचा एकत्र अभ्यास केला पाहिजे.

हाताप्रमाणेंच मस्तकरचनाशास्त्र अथवा मस्तिष्क शास्त्र हेंहि महत्त्वाचें शास्त्र आहे. त्याचाहि कांहीं भाग विदित असणें आवश्यक आहे. ह्याप्रमाणें कुण्डली ज्ञान, हस्तसामुद्रिक, आणि मस्तिष्क शास्त्र ह्यांपैकीं एकाचें तरी उत्तम ज्ञान आणि बाकीच्याचा बऱ्याच अंशानें अभ्यास वाचकांनीं करावा म्हणूनच आमचा प्रयत्न आहे. परंतु ह्या शास्त्राचा खरा उपयोग हा कीं, आपल्या स्वभावांत किंवा वागणुकींत जे कांहीं दोष किंवा वैगुण्य असेल तर ते अगदीं नाहींसे

व्हावें किंवा बरेंच कमी व्हावें. भित्रेपणा, विस्मृति, आळस, हें दुर्गुण कोणासहि नकोच असतात, मग तो कशाहि स्वभावाचा असो. परंतु मनोदौर्बल्याचा नाश हा भाग मानस–प्रक्रियेचा आहे. प्रत्यक्ष सामुद्रिकाचा नव्हे-असो.

" फ्युजिऑनॉमिया " हा ग्रंथ ॲरिस्टॉटलनें संस्कृत पुस्तकांच्या आधारें लिहिला, त्याकाळीं देखील हीं पुस्तकें दुर्मिळ झालीं होतीं. ॲरिस्टॉटलची माहिती अर्थातच अपुरी आहे. कारण आज जे कांहीं संस्कृत ग्रन्थ त्रोटक कां होईनात पण उपलब्ध आहेत त्यांचे तुलनेनें 'फ्युजिऑनॉमिया' हा ग्रंथ अपूर्ण आहे. तथापि देखील त्या ग्रन्थावरून पाहतां एक गोष्ट उघड दिसते ती ही कीं——

" ज्ञानसम्पादन, विशिष्ट व्यायाम, आणि अगदीं सामान्य प्रतीची योगप्रक्रिया, ह्यांचें अनुसरण करीत गेल्यास थोड्या वर्षांनींच बोटांची किंवा तळहाताची ठेवण सुद्धां बदलू शकते. मृदु बोटें हीं बरींच जोरकस होतात. सान्धे देखील जास्त टणक होतात, बोटांचीं टोकें सपाट किंवा गोल सुद्धां बनतात. तसेंच हातावरील रेषाहि व्यवस्थित होऊं शकतात. परंतु असें होण्याला देखील समाजाची घडी थोडीं निराळी असावी लागते. जेथें सिनेमा नाटकें, तमाश, उल्लूपणा, दारु, ताडी, नीरा, सट्टेबाजी त्यांचा उदोउदो, धूमधडाका सुरू आहे तेथें तेथें विशिष्ट व्यायाम आणि सर्वसामान्यहि योगप्रक्रिया घडणें असंभवनीय आहे. बेछुट चैनबाजी, कर्जबाजारीपणा, देणें बुडविण्याची खोड विश्वासघात ह्यांचा त्याग केल्याशिवाय शरीर आणि मन ह्यांची सुधारणा कधींहि होणार नाहीं.

## बान्धेसूद आंगलोट

आपल्या शास्त्राप्रमाणें बान्धेसूद किंवा सुलक्षणी मनुष्याच्या शरीरावयवांची रचना पुढें लिहिल्याप्रमाणें असते.

सर्वच शरीर, तसाच तोण्डावळा, जबडा, उरोभाग, पाठ, हे भाग भव्य असले पाहिजेत. आवाजहि मोठा असावा. मांड्या, नितंब, छाती, गर्दन, तालु हे भाग भरगच्च दिसावे. बाहू, एकंदर पाय, हनुवटी, कान, कपाळ, हे भव्य आणि दुरुस्त असावे; बोटें, माण्डया भुजदण्ड, श्वासक्रिया, डोळे, जीभ, विस्तृत म्हणजे लांब असावे, कातडी, केश, नखें, डोळे, दांत हे तुळतुळीत पाणीदार असावे. छातीचीं व पाठीची हाडें मांसांत रुपलेलीं असावीं. ओठ, नखें, डोळ्यांचे कोपरे हे लाल, आणि जीभ, तळहात, तळपाय हे आरक्त असावे. केंस, भिवया, पापण्या, बुबुळें काळीं असावीं. दांत पांढरे स्वच्छ चकचकीत असावे. कान मागें झुकलेले असावे, कानांचीं भोकें असतात तो भाग आणि नाकाचा शेंडा हे निमूळते असावे. चालणें जलद, खांदे भरदार, मान गरगरीत, स्तनांतर प्रशस्त, पावलें कमानदार, नखें लहान, वाटोळीं असावीं. जिवणी प्रमाणबद्ध, नाक सरळ असावें. ओठ जाड नसावेच पण पातळहि नसावे. श्वासोच्छ्वास व पावलें दबदार, कपाळ अर्धचन्द्राप्रमाणें, सान्धे घट्ट व मजबूत, डोक्याचा माथा गोल, हनुवटी भव्य परंतु उगाच पुढें आलेली नसावी. इतर शरीरव्यापार प्रकृतीधर्माप्रमाणें होत असावे. याबद्दचा मूलाधार खाली दिला आहे.

तथा साराण्यष्टौ त्वग्रक्तमांसमेदोऽस्थिमज्जशुक्रसत्वात्मकान्युत्तरोत्तरवराणि बलमानज्ञानार्थमुपदिश्यन्ते । अपि च । न मुह्येद्देहमात्रदर्शनादेव भिशगयमुपचयेन महाशरीरत्वाद्वा बलवानयं कृशत्वादल्पशरीरत्वाद्वाल्पबल इति । तच्चोभयप्यन्यथा दृष्टं गजसिंहे ॥

तत्र सर्वैः सारैरुपेतो भवत्यतिबलः परमगौरवयुक्तः क्लेशक्षमः सर्वारम्भेष्वात्मनि प्रत्याशावान् कल्याणाभिनिवेशी स्थिरशरीरः सुसमाहितगतिः सानुनादस्निग्धगम्भीरमहास्वरः

सुखैश्वर्यवित्तोपभोगसम्मानभाङ्मन्दजरामयः प्रायस्तुल्यगुणविस्तीर्णापत्योदीर्घायुश्च। तद्विपरीतस्त्वसारः । मध्यो मध्यगुणः ॥

प्रमाणं पुनः स्वांगुलैः पादांगुष्ठप्रदेशिन्यौ द्व्यङ्गुलायते तिस्रोऽन्याः क्रमेणोत्तरोत्तरं पञ्चमभागहीनास्तन्नखहीना वा। चतुरङ्गुलायताः पृथक् प्रपदपादतलपार्ष्णयः षट्पञ्चचतुरङ्गुलविस्तृताश्चतुर्दशैवायामेन पादश्चतुर्दशैव परिणाहेन । तथा गुल्फौ जंघामध्यं च। चतुरङ्गुलोत्सेधःपादः । अष्टादशायामा जंघाऊरुश्च । चतुरङ्गुलंजानु । त्रिंशदङ्गुलपरिणाह ऊरुः। षडायामेन ॥

मुष्कमेद्रावष्टपञ्चपरिणाहौ। षोडशविस्तारा कटी पञ्चाशत्परिणाहा। दशांगुलं बस्तिशिरः। द्वादशांगुलमुदरम् । दशविस्तारे द्वादशायामे पार्श्वे। द्वादशोत्सेधं त्रिकम् । अष्टादशोत्सेधं पृष्ठम्। द्वादशकं स्तनान्तरम्। द्व्यंङगुलं स्तनपर्यन्तम् । चतुर्विंशत्यङ्गुलविशालं द्वादशोत्सेधमुरः । द्व्यङ्गुलं हृदयम्। अष्टकौ स्कन्धे कक्षे च । षट्कावंसौ। षोडशकौ प्रबाहू । पञ्चदशकौ प्रपार्णौ। द्वादशांगुलौ पाणी। तत्रापि पञ्चांगुला मध्यमांगुलिः। ततोऽर्धांगुलहीने प्रदेशिन्यनामिके । सार्धत्र्यङ्गुलौ कनिष्ठिकांगुष्ठौ। चतुरङ्गुलोत्सेधा द्वाविंशतिपरिणाहा-शिरोधरा। द्वादशोत्सेधं चतुर्विंशतिपरिणाहमाननम् ॥

पञ्चांगुलमास्यम्। चतुरंगुलं पृथक् चिबुकोष्ठनासाटष्ट्यन्तर कर्णललाटम्। त्रिभागांगुलविस्तारा नासापुटमर्यादा। द्वंगुलायतमंगुष्ठोदरविस्तृतं नेत्रम्। तत्रशुक्लात्तृतीयांशं कृष्णम् । कृष्णान्नवमांशामसूरदलमात्रा दृष्टिः। षडंगुलोत्सेधं द्वात्रिंशत्परिणाहं शिर इति। सर्वं पुनः शरीरमंगुलानि चतुरशीतिः। तदायामवि-

स्तारसमं सममुच्यते। तत्र यथोक्त परिमाणमिष्टमनिष्टं हीनमधिकं वा। तथा ह्रस्वदीर्घगौरकृष्णरोमारोमस्थूलकृशं चेति ॥

इष्टं पुनर्महाशरीरदर्शनवदनहनुस्तनाग्रपृष्ठस्वरमुपचितोरुस्फिक्कटीवक्षोग्रीवातालुकमुभयगुणपाणिपादचिबुककर्णललाटम्। सूक्ष्मास्थिदन्तनखांगुलिपर्वकेशम्। दीर्घांगुलिसक्थिबाहुच्छ्वासेक्षितनेत्रजिव्हम्। विस्तीर्णास्याधरोष्ठजिव्हाललाटकर्णपीठवक्षोऽप्रमेदग्रीवाकेशम्। स्निग्धत्वक्चकरजनयनस्वनम्। स्थिरेन्द्रियत्वङ्नखकेशपार्श्वम्। गम्भीराभिसन्धिस्वरम्। गूढजत्रुपृष्ठवंशदन्तमूलम्। रक्ततात्वोष्ठनखनेत्रान्तमाताम्रजिव्हाहस्तपादतलम्। कृष्णकेशभ्रूनेत्रपक्ष्मतारकम्। शुक्लशुक्लमण्डलदशनचारितमुन्नतचित्तस्कन्धललाटोदरमुखनखपादम्। नीचैर्बद्धकर्णस्तननासाग्रचङ्क्रमणम्। घनस्कन्धकन्धरादन्तांगुलित्वक्सौहार्दम्। तनुनखमध्यजिव्हम्। वृत्तास्फिग्ग्रीवानखम्। समपृष्ठदन्तललाटेक्षितम्। तथानुपूर्ववृतावूरू। दक्षिणावर्तनाभिः। प्रकृष्टान्तरौ स्तनौ भ्रुवौ च। कूर्माकृतयो नखाः पादौ च। ऋज्वास्यं नासावंशश्च। अनुल्बणे हनूवेषश्च। श्लक्ष्णं तालु जिव्हा च। नातिस्थूलकृशावोष्ठौ देहबन्धश्च। सस्पन्दं हृदयं शंखौ मन्ये च। सोष्मतालुपादोदरं निश्वासश्च। पृष्ठतोऽवनतौ रोमशौ च कर्णौ। ईषत्प्रलम्बिन्यौ भ्रुवौ बलिनं सुश्लिष्टसंध्यर्धचंद्राकृतिललाटमातपत्रोपमं शिरः। नैकमूला मृदवः केशाः। दृढं गूढं सिरास्थिसन्धिप्रकृतियुक्तानि वातमूत्रपुरीषगुह्यानि। हसितरुदितानि च चेष्टितानि। तथा स्नातानुलिप्तमधः प्रसृतानुपूर्व्याशुष्यदिष्टं शरीरमिति। भवति चात्र ॥

उत्तरोत्तरसुक्षेत्रं गर्भाद्भवति नीरुजम्। आयामज्ञानविज्ञानैर्वर्धमानं शनैश्शुभम् ॥ इति सर्व गुणोपेतेशरीरे शरदांशतम्। आयुरैश्वर्यमिष्टाश्च सर्वं भावाः प्रतिष्ठिताः ॥

अनुत्सेकमदैन्यं च सुखं दुःखं च सेवते । सत्ववांस्तभ्यमानस्तु राजसा नैव तामसः ॥ दानशीलदयासत्यब्रह्मचर्यकृतज्ञताः रसायनानि मैत्री च पुण्यायुर्वृद्धिकृद्गणः ॥

## प्रकरण १४ वें

# सिंहावलोकन.

आतांपर्यंत हाताच्या पंजाचें वर्णन अनेक प्रकारानें केलें. परंतु त्याची रूपरेषा पक्की मनांत ठसल्याशिवाय ह्या शास्त्राचें रहस्य उकलणार नाहीं; म्हणून त्याच्या रूपरेषेचें सिंहावलोकन अवश्य आहे. तें करूं.

प्रथमतः आपल्याला सहजासहजीं मनुष्याचा पंजाच दिसण्याजोगा असतो, हाताच्या रेषा सहजगत्त्या दिसत नाहींत. परंतु हाताचा पंजा हस्तस्पर्शाच्या किंवा हस्तान्दोलनाच्या निमित्तानें अथवा हस्तन्दोलन न करितां सुद्धां लांबून देखील पहातां येतो. त्यावरून साधारणपणें तो ( १ ) दुर्बल आहे किंवा ( २ ) प्रशस्त, उमटशीत, दणगट परंतु मांसल आहे कीं काय तें समजतें. तितक्यांतच सन्धि साधून हस्तांदोलन न केलें तर तो ( १ ) विसविशीत मऊ अथवा पातळ आहे, किंवा ( २ ) टणक, राठ व जाड आहे अथवा ( ३ ) मांसल परंतु चिवट आहे तें कळतें. ह्यांत ( १ ) पहिला प्रकार दौबल्य, भित्रेपणा, घाबरटपणा दर्शवितो. (२) दुसरा स्वार्थी, मतलबी स्वभावाचें गमक असतो आणि ( ३ ) तिसरा मात्र यथायोग्य स्वभावाचा द्योतक असतो. पंजाचीं बोटेंहि किडकिडीत, किंवा ओबडधोबड व फार टणक नसावींत. मांसलच परंतु सांध्यांमध्यें मात्र टणक असावींत. त्याचप्रमाणें पेरीं लांब आणि मुळांशीं

जाड असली म्हणजे बोटांमध्यें फटी पडत नाहींत. तसेंच आंगठाहि मजबूत, लांब पेरांचा व बळकट सांध्याचा असावा.

हाताचे प्रकार सहा आहेत पहिला घोबड. व रांठ, ( २ ) दुसरा उद्योगप्रवण व सळनळीत बोटांचा, ह्यांचीं टोकें मोठीं परंतु वाटोळीं असतात. (३) तिसरा प्रकार चौकोनी किंवा उपयुक्त, (४) ग्रन्थिल; ह्याच्या बोटांचे सांधे ठसठशीत व पेरीं टणक व जाड असतात. ( ५ ) निमुळता, आणि ( ६ ) अणकुचीदार.

आपल्याकडे स्त्रियांचा हात पहाण्याचा प्रसंग येणें क्वचित्. त्यातूनहि हस्तस्पर्शादि प्रचार फार कमी, परंतु इतकें ध्यानांत ठेवावें कीं, हे सर्व प्रकार स्त्रियांच्या हाताच्या पंजामध्यें जरी आहेत, तरी एकंदरीत तुलनेनें स्त्रियांचा पंजा मऊ, विसविशीत असावयाचा. निसर्गाची रचनाच तशी आहे. अपवाद म्हणून जसा स्त्रीपार्टी नटांचा पंजा मऊ लुसलुशीत असतो, तसाच एखाद्या स्त्रीचा पंजाहि राठ नसेल असें नाहीं. परंतु हे सर्व अपवाद; आणि अपवादानेंच नियम ठरत असतो. ह्याप्रमाणें केवळ हाताच्या पंजावरून सुद्धां स्वभावाचा बराच बिनचूक अजमास करतां येतो.

## स्वभाव किंवा प्रकृतिधर्म.

सामुद्रिकाचा मुख्य हेतु स्वभावज्ञान हा आहे. आपणास जर स्वभावज्ञान नसेल, मग तें स्वतःचें असो, इतरांचें असो, तर आपल्याहातून अगणित चुका होतात, हा अनुभव सर्वांचा आहे. प्रथमतः स्वतःचा स्वभाव आपल्या स्वतःस कळला आणि तो शक्य तितका बिनचूक कळला तरच व्यवहारांत यशाची शक्यता आहे. परंतु असें समजूं नये कीं जे वैभवांत लोळत आहेत, चैन भोगीत आहे. बोवाबाजी किंवा गुरुबाजी चालवीत आहेत त्या सर्वांनाच त्यांचा स्वतःचा स्वभाव त्यांना कळलेला असतो. त्यांना इतकें

मात्र कळत असतें कीं, इतर लोक मूर्ख, वेडगळ, आशाळभूत आहेत आणि आपण त्यांना थापा देऊन बेछूट झुलवूं शकतों. आम्ही जें स्वभाव ज्ञान म्हणतों तो हा प्रकार नव्हे. कोटिक्रमानें प्रतिपक्षास ताबडतोब निरुत्तर करणारा वक्ता, उलट तपासणी मध्यें असाधारण कौशल्य दाखविणारा वकील, चिकित्सा आणि शस्त्रकर्म ह्यांत निपुण असा डॉक्टर अथवा भिषक् ह्यांना मनमुराद पैसा मिळतो हेंहि आपण पाहतों. परंतु ह्या गोष्टी स्वभावज्ञानानेंच होतात असें नाहीं. त्या कशा होतात, कां होतात, ह्याच्याकडे लक्षच नसतें. हीच वस्तुस्थिति सर्वत्र आढळते. यश जोंपर्यंत मिळत असतें तोंपर्यंत विचारच करीत नाहीं. परंतु यश मिळत नसलें, जेथें तेथें थपडाच बसत असल्या तर मनुष्य हतबुद्ध होतो, गांगरून जातो. अशा स्थितींतहि त्यास विचार सुचत नाहीं. मिळून काय सर्व गोष्टी व यशापयश हें स्वाभाविकपणें होतें, स्वभावज्ञानानें होत नाहीं. हाच मुद्दा वाचकांचे मनावर ठसविण्याचा आमचा उद्देश आहे.

पण स्वभावाचें ज्ञान करून घेण्याचा उद्देश काय आणि उपयोग तरी कोणता ? असा प्रश्न सहज येणारच तर त्याचें उत्तर असें कीं, आपणास आपल्या स्वभावाचें म्हणजे गुणदोषाचें जर यथायोग्य ज्ञान झालेलें असलें तर अपयशाच्या हानीचा जोर कमी करतां येतो. आपला स्वभाव कळून मग जर दुसऱ्याचा स्वभाव यथातथ्यच कळला तर व्यवहारांत आपली फसवणूक होत नाहीं, आणि अपरिहार्यपणेंच जर दुष्टांच्या आणि लोभी लोकांच्या सहवासांत राहण्याचा प्रसंग आला, तर आपला बचाव युक्तीनें करून घेण्याचा मार्ग आपणास सुचतो. मूळ स्वभाव बदलणें कठिण हें खरें, तरी तो देखील बऱ्याच अंशीं बदलतां येतो; परंतु स्वभावांत पालट घडवून आणणें हें मानसशास्त्राच्या कक्षेमध्यें येतें. स्वभावपालट हा विषय

सामुद्रिकाचा नाहीं. तथापि तो ह्या शास्त्राशीं संलग्न असल्यानें मानसशास्त्राचाहि थोडीबहुत माहिती असणें क्रमप्राप्तच आहे.

स्वभाव किंवा प्रकृति धर्म ह्याचें विवेचन पूर्वींच्या सर्व शास्त्रांतून थोडेंबहुत देण्याचा परिपाठच आहे, त्याप्रमाणें सुश्रुताचार्यांच्या ग्रन्थांत पुढीलप्रमाणें माहिती आढळते. ही माहिती संक्षिप्तच पण महत्त्वाची आहे.

**" तत्र यः प्रजागरूकः शीतद्वेषी दुर्भगः स्तेनो मत्सरी–अनार्यो गान्धर्वचित्तः स्फुटित–करचरणोऽल्परूक्षश्मश्रुनखकेशः, क्रोधी, दन्तनखखादी च भवति "** ( शारीर. अ. ४ )

कांहीं लोकांच्या अंगाची कातडी रूक्ष असते. डोकें व दाढी यांच्या जागीं केंस कमी आणि तेहि भरभरीत, मऊपणा अगदीं नाहीं असे असतात. अशांच्या पायाला भेगाहि पडतात; हे लोक झोंपेमध्यें दांत कडकड चावतात व बरळतात देखील. असे लोक उगीचच जाग्रणेंहि करतात. अशीं बाह्यचिन्हें ज्यांच्या ठिकाणीं आढळतील त्यांना थंडी सोसवत नाहीं. ते अपेशी, हाताळ, मत्सरी, दुष्ट, वतारलेले, रागीट असे––असल्यामुळें चक्रमपणाकडे त्यांचा कल असतो. अशा प्रकारचा मनुष्य वाळकुंडा असतो त्याचें मज्जारज्जू ताटलेले असतात, आणि तोः––

**अधृतिरदृढसौहृदः कृतघ्नः**
**कृशपरुषो धमनीततः प्रलापी ॥**
**द्रुतगतिरटनो ऽनवस्थितात्मा,**
**वियदपि गच्छति संभ्रमेण सुप्तः ॥ १ ॥**
**अव्यवस्थित मतिश्चल दृष्टिः ।**
**मन्द–रत्न–धनसंचय–मित्रः ॥**
**किंचिदेव विलपत्यनिबद्धम् ।**
**मारुतप्रकृतिरेष मनुष्यः ॥ २ ॥**

तो जलद चालणारा, भटक्या, वाटेल त्या ठिकाणीं पाहिजे तसें असंबद्ध बडबडणारा असा असतो. स्वभाव धांदरट, अव्यवस्थित, भ्रान्तिष्ट आणि नजर कावरीबावरी असते. अशी स्थिति असल्यावर मग अशांच्या जवळ द्रव्यसंचय नसायचा आणि त्यांना मित्र फार नसावयाचे हें न सांगतांहि कळेल. ह्यांना वातप्रकृतीचे लोक असें नांव आहे.

नंतर पित्तप्रकृति मनुष्याचें वर्णन दिलें आहे तें असें.

स्वेदनो दुर्गन्धः प्रीतशिथिलाङ्गः ताम्रनखनयन तालु जिह्वौष्ठ पाणी पादतलो वलीपलितखालित्यजुष्टः बहुभृगुष्णोद्वेषी क्षिप्रकोपप्रसादो मध्यमबलो मध्यमायुश्च भवति ॥

मेधावी निपुणमतिर्विगृह्य वक्ता ।
तेजस्वी समितिषु दुर्निवार वीर्यः ॥
न भयात्प्रणमेदनतेष्वमृदु : ।
प्रणतेष्वपि सान्त्वनदानरुचिः ॥
भवतीह सदा व्यवस्थितास्यगतिः ।
स भवेदिह पित्तप्रकृतिः ॥

पित्तप्रकृतीच्या मनुष्याला घाम फार येतो व त्याला वास मारतो. त्याची कातडी पीतगौर, आवाजांत विसविशीत, नखें, डोळे, जीभ, ओठ, तळहात व पाय तांबूस, वृद्धपणीं सुरकुत्या फार, डोक्याला टक्कल पडतें. त्याला कढत पदार्थ नकोसे वाटतात पण तो फार खाणारा असा असतो.

स्वभाव तापट, राग झटकन् येतो पण शांतही लवकर होतो. शरीराचें स्नायु फारसे बळकट नसतात. अर्थात् दीर्घायुष्य त्या मानानें कमी.

परंतु पित्तप्रकृतीचा मनुष्य बुद्धिमान, युक्तिमान्, विषय प्रतिपादनाची खुबी जाणणारा; स्वाभिमानी असतो. तो कोणत्याहि

जमावापुढें जावो. आपल्या कर्तबगारीनें त्यांच्यावर छाप ठेऊन यावयाचाच. त्याला कोणाचीहि भीति वाटत नाहीं. तो ताठर प्रतिस्पर्ध्याची हटकून रग जिरवितो. परंतु त्याच्याशीं नम्रपणाची वागणूक ठेविली तर तो नम्र वागणारांना सौजन्यानेंच वागवितो.

हें वर्णन पित्त प्रकृति मनुष्याचें आहे; आतां कफप्रकृतीचें वर्णन—

दुर्वेन्दीवर निस्त्रिंशानामन्यतमवर्णः सुभगः प्रियदर्शनः कृतज्ञः धृतिमान् सहिष्णुरलोलुपः बलवांश्चिरग्राही दृढवैरश्च भवति ।

म्हणजे कफप्रकृतीचा मनुष्य शामवर्ण परंतु रुबाबदार, धाडसी, बलवान्, काटक, परंतु लढण्यामध्यें बांके असतात. एकंदरींत कफ प्रकृति मनुष्याचा कल सदाचरणाकडे असतो.

वर जरी तीन प्रकारचें वर्णन दिलें आहे, तरी पित्त किंवा वात-प्रकृति मनुष्य केवळ वर सांगितल्याप्रमाणें एकाच विशिष्ट प्रकृतीचा नसतो. प्रत्येकामध्यें प्रकृतीचें मिश्रणच असतें म्हणून वात, पित्त, किंवा कफ प्रकृति म्हणजे तडफडचा, तापट, धिमा अशा प्रकारचा स्वभाव बऱ्याच अंशानें एखाद्याचा आहे इतकाच इत्यर्थ समजावा व त्यावरून अनेक मनुष्यांची चालचलणूक सूक्ष्मपणानें हेरून धोरणानें स्वभाव ओळखावयाचा असतो. म्हणजे नौकर, शेजारी किंवा स्नेही कसा असेल तें ध्यानांत येईल.

हें वर्णन स्वभावांचे तीन वर्ग ठरवून त्या अनुरोधानें केलेलें आहे. पण त्याहिपेक्षां निराळी परंतु त्याप्रमाणेंच सोपी अशी दुसरीहि पद्धति पूर्वींच्या ग्रंथकारांनीं सांगितली आहे. तिचा विशेष म्हणजे ठळक गुणावगुणांचें द्योतक असें नांव द्यावयाचें, उदाहरणार्थः—

दिसण्यांत क्रूर, रागीट, मत्सरी एकटाच खोलींत बसून बकाबक खाणारा व कपटी अशा मनुष्यास आसुरी मनुष्य म्हणतात.

तीव्रवृत्ति व कष्टाळू, भयंकर कपटी पण भित्रा अशा माणसास सर्पवृत्ति म्हणावें.

माणूसघाण्या, दुष्ट, मत्सरी, आचारभ्रष्ट अशा मनुष्यास राक्षसी स्वभावाचा म्हणतात.

तशाच प्रकारानें पिशाचवृत्ति, प्रेतवृत्ति अशीं नांवेंहि स्वभावानुरूप पडलेलीं असतात.

## इंद्रियादिकांचें अधिष्ठान

ह्या शास्त्राचें मूलतत्व शरीरामध्यें जेथें प्रत्यक्षत: अनुभवास येतें तो भाग मेंदू हा आहे. त्याचें थोडें विवेचन मागील भागांत केलेंच आहे. त्यांत पान २१८ मध्यें ( Corebellum ) हा शब्द दोषानें पडला आहे, तेथें ( Cerebrum ) असें वाचावें. स्वभावाचा परिपोष आणि त्यांत इष्ट असा फेरबदल घडविण्याचें शास्त्र " **मानस योग** " हें आहे. त्याच्या अभ्यासाला मेंदूची रचना, त्याचीं कार्यें आणि कार्यसाधनें ह्यांची माहिती अवश्य आहे. सामुद्रिकशास्त्राशींही त्याचा संबंध असल्यानें ती येथें देणें अवश्य वाटतें. मेंदूचा रंग पांढुरका म्हणून पूर्वी सांगितलें, पण पांढुरका म्हणजे चुन्याच्या सारखा नव्हे, तो बदामी पांढुरका असतो. ह्या विवेचनांतलि प्रत्येक गोष्ट वाचकानें ध्यानांत ठेवावी. चुण्या, सुरकुत्या अथवा " वलयें " ह्यांनीं युक्त असा जो मेन्दूचा भाग म्हणजे ज्याला " **वलयांकित** " म्हणतात तो भाग कपाळाच्या आंतील बाजूस, आणि डोक्यावरील कवटी, तशींच दोन्ही कानशिलें, त्याचप्रमाणें शेण्डीवरून मानेकडे चाचपलें असतां 'मान आणि डोकें ह्यांच्यामध्यें एक खळगी बोटांना लागते ती अशा सर्व भागांच्या आंतील बाजूस आहे. मान आणि डोकें ह्यांच्यामध्यें असणाऱ्या खळगीस " **शीर्षमूल** " हें नांव दिलें आहे. वलयाङ्कित मेन्दू हाच मुख्य मेन्दू. ह्या मुख्य अथवा " वल-

याङ्कित " मेन्दूचें दृश्य कुरड याप्रमाणें दिसतें. डोकीची वरील करवटी कापून टाकली असतां मुख्य मेन्दूचा जो भाग दिसतो तो वरचा अथवा " **उपरितन** " भाग, आणि कपाळाच्या खालपासून दोन्ही कानशिलें, शीर्षमूल ह्या ठिकाणांतून मस्तकाचा आडवा छेद करून पाहिल्यास मेन्दूचा " **खालचा भाग** " दिसतो त्याला " **मस्तिष्कतल** " हें नांव दिलें आहे.

नाकाच्या मुळापासून कपाळाच्या मधोमध डोक्यापर्यंत व डोक्याच्यावरून मधोमध शेंडींतून मागें शीर्षतलापर्यंत एक दोरा करून ताणून धरून ती रेषा ध्यानांत ठेवावी. ह्या रेषेच्या अनुरोधानें **वलयांकित** मुख्य मेन्दूचे दोन विभाग तुटक झाल्याप्रमाणें दिसतात. डाव्या कानशिलाकडील तो डावा विभाग (शास्त्रीय भाषेंत वाम मस्तिष्कार्ध ) आणि उजवीकडील तो उजवा ( अथवा दक्षिण मस्तिष्कार्ध ) असे प्रमुख विभाग आहेत. ह्याच्याशिवाय आणखी दोन उपविभाग दोन्ही कानशिलाजवळ आहेत. त्यांपैकीं एक भिवईच्या मागील टोंकापासून कानाच्या वरच्या बाजूपर्यंत ह्याला आरंभापाशीं एक " दुबेळका " आहे. ( ह्याला Fissure sylvius म्हणतात ) ह्या विभाग रेषेच्या थोडें वर पासून डोक्याच्या वर शेण्डीपर्यंत पोहोंचणारा असा दुसरा तिरकस विभाग आहे. ( त्याला Fissure of Rolando म्हणतात ) ह्याप्रमाणें प्रत्येक मस्तिष्कार्धामध्यें " **दुबेळका** " आणि " **तिरकस** " असे दोन उपविभाग होतात. हे विभाग स्पष्ट आहेत, पण तुटक नाहींत.

मस्तिष्कतलाच्या मागील म्हणजे मानेकडील बाजूच्या खालीं मेन्दूचा **दुसरा प्रकार** आहे. त्याची रचना अथवा स्वरूप वलयाङ्कित नसून " तन्तुमय " आहे. हा मेन्दू बारीक दोऱ्याच्या लांबट गुण्डाळीप्रमाणें दिसतो. ( त्याला Cerebellum म्हणतात. ) आपल्याकडे त्याला ' **तन्तुमय मस्तिष्क** ' ' म्हटल्यास यथायोग्य

होईल.' 'तन्तुमय मस्तिष्काचा वर्ण पाढुरका तपकिरी असतो. तन्तुमय मस्तिष्क आणि कानशिलाच्या आंतील मेन्दूचा विभाग ह्यांच्यामध्यें मेन्दूचाच तिसरा प्रकार आहे.

हा मज्जामय असून जास्त घट्ट, चपटा आणि लांबट आहे. ह्याला "मज्जाकूर्च "असें नांव अन्वर्थ होईल. पाश्चात्य शास्त्रांत ह्याचें नांव madulla spinalis असें आहे. ह्या मज्जाकूर्चाचा जो भाग कानशिलाजवळ आहे तो फार पसरट असून तो मानेच्या मागें पाठीच्या मणक्याकडे निमुळता होत जाऊन शेवटीं दोराप्रमाणें झाला आहे. मज्जकूर्चाचें महत्व अगदीं विशिष्ट प्रकारचें आहे.

मेन्दूच्या रक्षणासाठीं एकावर एक अशीं तीन अस्तरणें असून शेवटीं कवटीचें अतिशय टणक असें कवच आहे. कारण शरीरामध्यें जो जो अवयव अतिशय महत्त्वाचा त्या त्या अवयवांच्या सुरक्षितेसाठीं फार बन्दोबस्त केलेला असतो. ह्यावरून मेन्दूचें महत्त्व किती आहे ते लक्षांत येईल.

बारीक बारीक दोऱ्या एकत्र मिळून ज्याप्रमाणें एक मोठी रस्सी होते, त्याप्रमाणेंच मज्जाकूर्चाचा खालचा निमुळता भाग सरासरी अर्ध्या पाऊण इंची जाडीच्या दोराप्रमाणें चार पेडी आहे ह्याचे दोन सारखे भाग लांब चिरफळ्याप्रमाणें होतात. हा दोर केवळ मज्जामय म्हणजे हाडांच्या आंत जो गाभा असतो त्याच्याशीं सदृश आहे. म्हणूनच ह्याला **मज्जारज्जू हें नांव दिलें आहे.** मज्जारज्जूच्या आंतील गाभा तपकिरी आहे; परंतु त्याचा बाह्यवर्ण पांढरा व किंचित् अरुण असा आहे. ह्याप्रमाणें मेन्दूचे प्रकार लक्षांत राहाण्यासाठीं पुनः देऊं.

( १ ) कवटीच्या आंतील वलयाङ्कित मेन्दू ( Cerebrum ); ह्याचे डावा व उजवा असे विभाग अथवा मस्तिष्कार्धे दोन आहेत.

( २ ) रा प्रकार " तन्तुमय मस्तिष्क " ( cerebellum ) हा गुण्डाळीप्रमाणें असून वलयांकित मस्तिकाच्या खालीं आहे.

( ३ ) रा प्रकार मज्जाकूर्च ( Medulla spinalis ) हा वरच्या बाजूस फार पसरट पण खालीं निमुळता; पुढें दोराप्रमाणें आहे.

## अनूक्य प्रणालि

मानेच्या वरील टोंकापासून पाठीचा कणा सुरू होतो. पाठीचा कणा म्हणजे एकांत एक अडकविलेले असे अनेक हाडांचे—मणके आहेत. ते सर्व सारखे नाहींत, लहान मोठे आहेत. परंतु त्या प्रत्येकाच्या मधोमध एकेक बरेंच मोठें छिद्र असतें. मज्जाकूर्चाचा दोर मानेंतील आणि पाठीच्या कण्यांतील प्रत्येक मणक्याच्या छिद्रांतून मानेपासून अगदीं नितंबाच्यां खालपर्यंत गेला आहे. त्यामुळें कण्यांतील ह्या मणक्यांची एक माळच बनली आहे. ह्या मणक्यांतून गेलेल्या दोराला " पृष्ठवंश रज्जू " म्हणतात. ह्या पृष्ठरज्जूंतून हजारों मज्जातंतू कण्याच्या छिद्रांतून निघून शरीरांत सर्वत्र पसरलेले आहेत. जुन्या वैद्यक ग्रंथांत ह्या मज्जरज्जूंना **वातवह तंतू** किंवा " **धमनी** " असें नांव आहे व योग ग्रन्थात " नाडी " असें म्हटलें आहे. हे रज्जू कमरेंतून दोन्ही पायांमध्यें शिरले आहेत. त्याचा आकार लहान दोरीयेवढा मोठा आहे. पण त्यांतूनहि बारीक तंतू निघून दोन्ही पायांत पसरले आहेत.

पायाप्रमाणें मानेंतील रज्जूंतून दोन शाखा दोन्ही बाहूंमध्यें शिरून त्यांचे तंतू तसेच सर्वत्र पसरलेले आहेत. मज्जाकूर्चांतील रज्जूपासून ज्या शाखा उपशाखा, व त्यांचे अपरिमित तंतू शरीरभर पसरले आहेत. त्या सर्वांना " **अनूक्य प्रणालि** " असें **शास्त्रीय** नांव दिलें आहे. **अनूक्य प्रणालि** म्हणजे मेन्दू—मज्जाकूर्च—आणि त्याच्या यच्चावत् शाखा इत्यादिकांचा समूह; इंग्रजीमध्यें ह्या समूहाला

( ceretro-spinal-nervous system ) असें फार लांबलचक नांव आहे.

## धारणाप्रणालि

मज्जाकूर्चांतील रज्जुप्रमाणेंच मज्जातन्तूंचाच हा दुसरा एक समूह आहे. ह्या तन्तूंचेंहि मूळ मेन्दूमध्येंच आहे. परंतु हे तन्तू पाठीच्या कण्यांत शिरलेले नाहींत. पाठीच्या कण्याच्या बाहेर दोन्हीं बाजूस पण त्याला लागूनच धारणातन्तूंचे ताणे मानेपासून खाल-पर्यंत गेले आहेत. ह्या तन्तूंना ठिकठिकाणीं गांठीं आहेत, त्यांना मज्जाकन्द ( ganglia ) म्हणतात. त्यांचे अगदीं बारीक तन्तू ह्या कन्दांतून निघून शरीरभर पसरले आहेत. धारणातन्तूंचा विशेष हा कीं शरीरामध्यें ठिकठिकाणीं त्यांच्या गुंफा म्हणजे जाळीं बनलेलीं आहेत; ह्या जाळ्यांना मज्जाचक्रें म्हणतात. योगमार्गांत ह्या चक्रांचें सामर्थ्य वर्णिलें आहे.

## मेन्दू व मज्जारज्जू ह्यांचीं कार्यें

हा विषय सांगण्याकरितांच वरील वर्णन आवश्यक झालें. कव-टीच्या आंतील वलयाङ्कित मेन्दूचा जो पृष्ठभाग आहे त्यांत ठिक-ठिकाणीं शरीरावयवांच्या हालचाली करण्याची जी शक्ति आहे. त्या शक्तींचीं केन्द्रें आहेत व हातपाय बोटें यांचें चलन, डोळ्यांचीं पातीं, बुबुळें, मान, पाठीचा कणा, तोण्डाचा जबडा, ओठ, जीभ अशा अनेक बाह्य अवयवांची जी हालचाल आपण करतों त्या हालचालींच्या उत्पादक शक्तींचीं केन्द्रें ( उपरितन ) मेन्दूमध्यें त्याच्या डाव्याउजव्या अशा दोन्हीं विभागांत आहेत. दुबेळक्याच्या रेषेजवळ शब्द ऐकूं येण्याचा ( श्रवण ) केन्द्र आहे. त्याच्यावरच्या बाजूस थोडा मागें दृष्टि केन्द्र—आहे. दुबेळक्याच्या तोण्डाशींच रुचि आणि वाणी—( म्हणजे भाषण ) ह्यांचा केन्द्र आणि नाकाच्या

मूळ प्रदेशाजवळ वास घेण्याचा **गन्धकेन्द्र** आहे. हीं केन्द्रें ज्ञानेन्द्रियाचीं आहेत. हालचालीच्या केन्द्रांना कर्मेन्द्रियांचीं केन्द्रें म्हणतात.

हालचाली केवळ हातपाय इत्यादि बाह्येन्द्रियांच्याच होतात असें नसून, हृदयाची धडधड श्वासोच्छ्वास, अन्नपचन, मलोत्सर्ग रुधिराभिसरण, पित्तोत्पत्ति इत्यादि जिवंत शरीराच्या आंतील शेकडों व्यापार चालविण्याची सुद्धां शेकडों केन्द्रें आहेत. केन्द्रें म्हणजे शरीर व्यापार **सुरू होण्याची, चालविण्याची** किंवा आंखडता घेण्याची, बन्द करण्याची **प्रेरणा जेथून** मिळते तीं स्थानें. हीं सूक्ष्म असतात. अशीं केन्द्रें मेन्दूमध्यें तर आहेतच, पण **धारणातन्तूंचीं** जीं **चक्रें** आणि जे **मज्जाकन्द** (ganglio) आहेत त्यांतहि अशीं केन्द्रें आहेत. ज्या व्यापारांची प्रेरणा प्रत्यक्ष मेन्दूकडून किंवा पाठीच्या कण्यांतील रज्जूंतून मिळते त्यांचेंच ज्ञान आपणांस होण्याचा **संभव** असतो. हेंच **प्रत्यक्षज्ञानः** आणि शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध ह्यांचीं केन्द्रें, भाषणादि कार्यें, **हातपायाच्या हालचाली, त्यांचीं केन्द्रें हीं प्रत्यक्ष ज्ञानाचीं साधनें** आहेत. **धारणातन्तूच्या समूहाला** इंग्रजींमध्यें Automatic किंवा Sympathetic nervous system **म्हणतात. कांहीं क्रिया प्रथमतः मुद्दाम बुद्धिपुरःसर** आणि **वारंवार** कराव्या लागतात. मुलें चालण्याचा प्रयत्न करतात. मोठीं माणसें—टायपिस्टचें, कंपाझिटरचें, काम शिकतांना, लिहिण्यास, सतार वाजविण्यास शिकतांना फार—सावकाश लक्ष लावून, लक्षपूर्वक क्रिया चालवीत—असतात. परंतु पुढें सवयीनें त्या गोष्टी इतक्या **आपोआप व न कळत** होतात कीं जणों काय जन्मापासूनच तीं मनुष्यें त्या सहज करीत आलीं आहेत. त्याहि **प्रवर्तित** क्रियाच होत.

ह्याप्रमाणें ह्या मज्जारज्जूचे आणि केन्द्रांचे प्रकार आहेत. (१) **ज्ञानोत्पादक,** (२) **क्रियोत्पादक.** त्यांत **ऐच्छिक** म्हणजे **बुद्धि-**

पुरस्सर घडणाऱ्या क्रिया आणि अनैच्छिक म्हणजे न कळत आपोआप घडणाऱ्या असे दोन प्रकार. तिसरा Reflex म्हणजे प्रवर्तितक्रिया ह्याप्रमाणें व्यवस्था आहे.

या नंतर दोऱ्याच्या लांबट गुण्डाळीप्रमाणें जो मेन्दूचा ( Cerebellum ) प्रकार आहे त्याच्या कार्यांत—शब्द, स्पर्श, रूप इत्यादिकांचा संबंध नाहीं. पण त्याच्या अगदीं आंत त्याचा जो गाभा आहे त्याला धक्का लागला तर मात्र, क्लेश वेदना फार होतात. एरवीं स्पर्शज्ञानाचा संबंध नाहीं. ज्ञानेंद्रियाचीं कार्यें ह्या "अपरमस्तिष्का" कडून होत नाहींत व अवयवाच्या हालचालीशींहि त्याचा प्रत्यक्ष संबंध नाहीं. पण अनेक अवयवांच्या हालचालींचें परम्पराशीं व्यवस्थित सहकार्य घडवून आणणें हें काम ह्या मेन्दूच्या द्वारानें होतें. त्या कारणानें ह्या मेन्दूवर जेव्हां अनिष्ट परिणाम होतो. तेव्हां हालचाली होतात परंतु विशिष्ट धोरणानें होत नाहींत. वेड्यासारख्या होतात. शरीराचा तोल संभाळण्याचें कार्यहि ह्या मेन्दूकडून होतें. म्हणून हा विभाग अशक्त झाला किंवा त्याला इजा झाली तर तोल संभाळतां येत नाहीं आणि हालचालींत एकसूत्रता रहात नाहीं.

आतां तिसरा प्रकार मज्जाकूर्चाचा. मेन्दूचा हा प्रकार अत्यंत महत्त्वाचा आहे. जीं जीं कार्यें मस्तकाच्या आंतील मेन्दूकडून होतात त्यांपैकीं अत्यंत महत्त्वाचीं कार्यें मज्जाकूर्चा ( Medulla ) कडून होतात. परंतु प्राणधारणाला आवश्यक अशा सर्व क्रियांचें नियन्त्रण धारणातन्तूंच्यामार्फत बहुतेक शरिराच्या आंतच चालूं असतें. त्या कारणानें आपणांस त्या व्यापारांचें प्रत्यक्ष ज्ञान होऊं शकत नाहीं. आपण श्वासोच्छ्वास करतो; पण फुप्फुसामध्यें त्या वायूची काय क्रिया चालते; त्यानंतर हृदयांत म्हणजे रक्ताशयामध्यें अशुद्ध रक्त

कोणत्या प्रकारानें व कोणत्या मार्गानें येतें; आणिशुद्ध तांबडें रक्त रोहिण्यांतून अथवा रक्तवाहिन्यांतून कसें खेळतें; अन्नपचन कसें घडून येतें; आंतड्यांची हालचाल कोणत्या रीतीनें चालते इत्यादि जे शेंकडों व्यापार, शरीराचीं जीं शेंकडों कार्यें निरंतर चालत असतात; त्यांचें ज्ञान आपणांस प्रत्यक्ष होत नाहीं. ज्या शारीरिक क्रियांचें ज्ञान प्रत्यक्ष होऊं शकत नाहीं त्या क्रियांना **अनैच्छिक व्यापार** म्हणतात; आणि हे अनैच्छिक व्यापार धारणातंतूमार्फत चालतात. हे व्यापार आपल्या इच्छेवर अवलंबून नसतात; आणि ज्यांच्या द्वारानें ह्या क्रिया घडतात ते धारणातंतू पाठीच्या कण्यांतून न शिरतां, त्याच्या बाहेरून स्वतंत्र पण थेट मेन्दूंतून निघून जीवनविषयक कार्यें चालवीत असतात. पृष्ठरज्जू, ज्ञानतन्तू व धारणातन्तू ह्या सर्वांना **धमन्या** हें नांव आहे. **शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध** ह्यांचें ज्ञान ह्या बाह्य मज्जादोरकांच्या म्हणजे बाह्य धमन्यांच्या द्वारानें होतें, त्यांतहि जिला Pneumogastric Nerve किंवा Vagus म्हणतात, ती धमनी जाड असून महत्त्वाची आहे. ह्या धमनीच्या द्वारानें श्वासोच्छ्वास चालतो, पित्तप्रवाह वाहतो, अन्नरस निर्माण होतो, हृदयक्रिया चालते, फुप्फुसें जोरानें कार्य करितात. इतक्या विविध क्रिया ज्या धमनीनें होतात तिचें नांव **प्राणवह धमनी** असें आहे. ज्या क्रिया **आपोआप** चालतात व ज्या आपण बुद्धिपुरःसर **इच्छेनुरूप** करतों त्यांचे **क्रियाकारी** आणि **ज्ञानोत्पादी** असे भेद केले आहेत. त्यांतहि कांहीं क्रियांना Reflex **प्रवर्तित क्रिया** म्हणतात. म्हणजे त्या आपोआप घडत नाहींत. एकाद्याला रक्त पाहिल्याबरोबर चक्कर येते, किंवा घाण आल्याबरोबर वांति होते, किंवा भुताची गोष्ट ऐकल्याबरोबर छाती धडधडूं लागते. ह्या सर्व **प्रवर्तित** (Reflex) क्रिया होत. त्याचप्रमाणें कांहीं क्रिया जोरानें चालविण्याची किंवा बन्द करण्याची शक्तीहि आपल्या मेन्दूंतील केन्द्रांना आहे.

# मेंन्दूचे व्यापार

मेन्दूचे जे तीन प्रकार आहेत त्यांचे परस्परांशीं पूर्ण सहकार्य आहे. **स्पर्शज्ञान** हा जो त्वचेचा मुख्यधर्म त्याचें कारण सर्व शरीराच्या अणुरेणूमध्यें मज्जातन्तूंचें अत्यंत सूक्ष्म असें जाळें पसरलेलें आहे. त्यांपैकीं कोणत्याहि तन्तूला कोणत्याहि पदार्थाचा स्पर्श झाला तर त्या **स्पर्शाची जाणीव** मज्जा तंन्तुतून मेंन्दूकडे तत्काळ जाऊन पोहोचते आणि **कार्याच्या चालनाची प्रेरणा**हि त्याच तन्तूतून मिळते. ह्याच प्रमाणें शब्द, रूप, रस, गंन्ध; शीत, उष्ण; कठिण, मृदु, इत्यादि गुणांच्या अस्तित्वाची मेन्दूला जाणीव होते ती जाणीव करून देणाऱ्या तन्तूंना **प्रत्यग्वाही** ( afferent ) म्हणतात आणि त्यासंबंधानें **चालना** देणाऱ्या तन्तूंना किंवा तन्तूंच्या भागाला **पुरोवाही** ( efferent ) म्हणतात. **प्रत्यग्वाही** आणि **पुरोवाही** तन्तूंची कार्यें कोणतीं तें अवश्य ध्यानांत ठेविलें पाहिजे. सर्वांत महत्त्वाचें प्रत्यक्ष ज्ञान म्हणजे शब्द–स्पर्श–रूप–रस–गन्ध शीतोष्ण ज्ञान इ० होय. त्यांतहि शेंकडों प्रकार आहे. शब्द–कोमल, तीव्र, मध्यम असतो, तसेंच, रूप–हें सुंदर, भेसूर, आदरणीय, तिरस्करणीय वाटतें; तेच प्रकार इतरज्ञानांत आहेत. रंग हें एक प्रकारचें रूपच होय असे ज्ञानाचे प्रकार अगणित आहेत ते किती वर्णावे ?

पृष्ठवंशांतुन जाणारा जो मज्जारज्जू त्याच्याकडूनहि स्वतंत्रपणें प्रतिवर्तित ( Reflex ) कार्यें घडतात. अनेक प्रयोगांनीं असें सिद्ध झालें आहे कीं, मुख्य मेंदूपर्यंत जाणीव न जातांहि **वंशरज्जूकडून आपोआप** घडणारीं शारीरिक कार्यें परस्पर होतात, म्हणजे धारणातंतूकडून ( अथवा Sympathetic तंतूकडून ) जशीं अनैच्छिक कार्यें घडतात तशींच तीं कांहीं वेळां **पृष्ठवंशर**ज्जूकडूनहि घडूं शकतात. पचनक्रिया, उत्सर्गक्रिया ह्यांचा संबंध वंशरज्जूशीं विशेष आहे.

Medulla ( म्हणजे मज्जाकूर्च ) ह्याच्यामध्यें जी **शक्ति** आहे तीच **प्राणशक्ति.** वलयांकित मेन्दूशिवाय प्राणी बराच वेळ जगूं शकतो, परंतु **मज्जाकूर्चाला** थोडीशी इजा झाली तरी प्राण जातो. ही अत्यंत महत्वाची गोष्ट आहे. ह्याच कारणानें मनाची गूढ शक्ति ( Medulla मध्यें ) मज्जाकूर्चामध्यें राहत असली पाहिजे असें कांहीं आधुनिक विज्ञानशास्त्रज्ञ म्हणतात. पृष्ठवंशरज्जूची उत्पत्ति ( Medulla तून ) मज्जाकूर्चांतूनच आहे. आणि **आपोआप घडणाऱ्या** बऱ्याच क्रिया तेथूनहि होऊं शकतात. ह्या कारणानें **आपोआप कार्य करणारी** सुप्त **शक्ति** मज्जाकूर्चामध्येंहि अधिष्ठित असली पाहिजे असें अनुमान होतें. व **संमोहन** (ह्म० हायप्नॉटिझमच्या) सिद्धीचा उगम मज्जाकूर्चांतच आहे हेंहि स्पष्ट दिसतें.

अपरमस्तिष्काचीं कार्यें वर सांगितलींच आहेत. आतां ( वलयाङ्कित म्हणजे ) मोठ्या मेन्दूचीं कार्यें सांगितलीं पाहिजेत. ज्ञानपूर्वक अथवा **बुद्धिपुरःसर** घडणाऱ्या क्रियांचें वास्तविक अधिष्ठान **महामस्तिष्क** हेंच होय. शारीरिक क्रियाहि महामस्तिष्काकडून घडतात. परंतु आपोआप उठणाऱ्या **शारीरिक** आणि मानसिक ऊर्मिचें अधिष्ठान मानेतील (Medulla) मज्जाकूर्च आहे. ह्या विचाराप्रमाणें **काम, क्रोध, लोभ,** ( अर्थात् **हव्यास** ) ह्या ज्या मनुष्याच्या **पाशवी** वासना त्याचें अधिष्ठान अथवा त्यांचा उगमहि (Medulla तूनच) मज्जाकूर्चांतच असला पाहिजे. मोह, उन्माद, मत्सर हें **स्वरूप** वरील त्रयींचेंच. अर्थात् असा निष्कर्ष निघतो कीं ज्या स्वार्थी वासनांच्या जोरावर जगाची रहाटी चालली आहे त्या मज्जाकूर्चांतून प्रकट होतात. महामस्तिष्काचें कार्य **विचार** आणि **नियन्त्रण** हें होय. **स्मृति, बुद्धि, विवेक,** आणि **नियन्त्रण** ह्या क्रिया महामस्तिष्काच्या द्वारानें होतात. म्हणूनच **महामस्तिष्क** ( ह्म० Cerebrum ) **हेंच**

**मनाचें आणि इच्छाशक्तीचें अधिष्ठान** असलें पाहिजे. मन ( Mind ) ही वस्तु काय त्याचा उलगडा पाश्चात्यांना अद्यापिहि **नीटसा** झाला नाहीं. **अहंकार** म्हणजे "**मी आहे**" ही जाणीव प्रत्येक जिवंत प्राण्याला आहे. हाच व्यक्तीचा आरंभ. अहंकार जर न मानला तर विचार आणि ज्ञान हा सर्वच व्यवहार थांबला; म्हणून **अहंकाराचें अस्तित्व** मानल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. इच्छा म्हणजे काय हें आपल्यास कळतें. अमुक वस्तु हवी, अमुक नको, अमुक पुरे झाली, अमुक ज्यास्त पाहिजे इत्यादि ह्या प्रकारच्या प्रयत्नांचें किंवा क्रियांचें जें बीज तीच इच्छा-शक्ति. इच्छा आणि **वासना** ह्यांत थोडा फरक केला पाहिजे. **विषयोपभोगाची** जी **लालसा** ती वासना आणि तिच्या पूर्तते करतां प्रयत्न करण्याची जी प्रवृत्ति ती इच्छा. हिला Will असें म्हणतात. पुष्कळ वेळां हा फरक आपण करीत नाहीं, आणि मानीतहि नाहीं. ह्या दृष्टीनें **वासना** आणि **मनोविकार** हे एकच.

एकंदरीनें निष्कर्ष असा निघतो कीं:—

( १ ) शारीरिक क्रिया यथायोग्य रीतीनें चालविणाऱ्या शक्तीचीं केन्द्रस्थानें पृष्ठ वंशरज्जु आणि मज्जाकेन्द्रं रज्जू अथवा धारणा रज्जू ( Auto motor nerves ) ह्यांच्यामध्यें आहेत. ऐच्छिक आणि अनैच्छिक व्यापार ह्याच केंद्राच्या द्वारें चालतात.

( २ ) त्याच शक्तीचीं परंतु जास्त जोरदार अशीं स्थानें **मज्जाकूर्च** ( अथवा **Medulla** Spinalis ) ह्याच्यामध्यें आहेत. कारण पृष्ठवंशरज्जूचें मूळ मज्जाकूर्चांत असतें.

( ३ ) शरीराचा तोल सांभाळण्याचें कार्य करणारी आणि निरनिराळ्या शरीरव्यापारांचें सहकार्य घडवून आणणारी शक्तीही तन्तुमय मेन्दूमध्यें ( म्हणजे Cerebellum मध्यें ) असतें.

( ४ ) ज्ञानेंद्रियांच्या शक्तींचीं केंद्रस्थानें **वलयाङ्कित** मेन्दू-मध्यें ( म्हणजे कवटीच्या आंतील मेन्दूमध्यें ) असतात. मेन्दूच्या ह्याच विभागाला इंग्रजींमध्यें Cerebrum म्हणतात.

( ५ ) मेन्दूचे मुख्य भाग शिरोब्रह्म ( Cerebrum ) आणि मज्जाकूर्च ( Medulla spinalis ) हेच आहेत.

शिरोब्रह्मामध्यें आणि मज्जाकूर्चामध्यें मिळून ज्ञानशक्ति आणि कार्यशक्ति ह्यांचीं हजारों केन्द्रें आहेत, म्हणून मानस–योगशास्त्रांत मेन्दूला **सहस्रदलचक्र** असें नांव दिलें आहे.

**मन-इन्द्रियें**—वासना, विकार, भावना, संवेदना, संज्ञा किंवा संबोध इत्यादि निरनिराळया केन्द्रांचे अनेक **गट** शिरोब्रह्मांत आहेत. आणि त्यांतील **कांहीं गटांशीं** सहकार्य करणाऱ्या केन्द्रांचे तशाच प्रकारचे दुसरे केन्द्र मज्जाकूर्चामध्यें आहेत. परंतु मानसिक व्यापारांचें मुख्य कार्य शिरोब्रह्मांतील केन्द्रांकडून होतें.

**मनः**—अनेक संकल्प-विकल्पांची घटना करणारी जी शक्ति तिचें नांव **मन**. ह्याचें मुख्य स्थान शिरोब्रह्म ( Cerebrum. )

**बुद्धिः**—ज्ञान आणि युक्तायुक्त-विचार ह्यांची जी शक्ति ती बुद्धि; हिलाच विवेकशक्ति म्हणतात.

युक्ति, धोरण, योजना हेंहि प्रकार बुद्धीचेच.

संवेदना ( Sensations ) म्हणजे शब्द–स्पर्श–रूप–रस–गन्ध ह्यांचें ज्ञान होण्यापूर्वीं कांहीं शारीरिक व्यापार होऊन मेन्दूवर जे एक किंवा अनेक परिणाम अथवा संस्कार घडतात, ह्या संस्कारांचें जें कार्य ती संवेदना.

संवेदनाचें नांव इंग्लिशमध्यें Feelings असें असून संस्कारांचें नांव impressions असें आहे.

**अनुभव**—संस्कार आणि संवेदना ह्यांच्यामुळें जें तत्कालिक ज्ञान होतें तो **अनुभव**. अनुभवालाच प्रत्यक्ष ज्ञान असें म्हणतात.

अनुभव–ज्ञान हें मेन्दूमध्यें टिकून राहिलें म्हणजे त्याला **स्मृति** किंवा **स्मरण** ह्या नांवानें आपण ओळखतों.

आयुष्यामध्यें मनुष्य जगतो तो कांहींतरी मिळविण्याकरितां जगतो. त्याला जें मिळवावयाचें असतें तें त्याचें ध्येय किंवा प्राप्तव्य; लाखो, कोट्यावधि मनुष्यांचें ध्येय इन्द्रियजन्य सुख ( Pleasure ) हें आहे. ह्यांतच स्त्रीसुख, चैनबाजी, द्रव्येच्छा ह्यांचा समावेश होतो. ह्या ध्येयाची जी जोरदार इच्छा असते तिला **विकार** किंवा **वासना** म्हणतात. काम अथवा विषयवासना आणि द्रव्यलोभ हे मुख्य विकार. विषयभोग आणि द्रव्यप्राप्ति ह्या कार्यांत व्यत्यय आणणाऱ्या कोणत्याहि गोष्टींचा जो भयंकर द्वेष आणि त्याचें जें दृश्यस्वरूप तोच **क्रोध.** म्हणून **काम, क्रोध** आणि **लोभ** हे महत्त्वाचे मनोविकार ठरले आणि त्यांच्याच अनुषंगानें उन्मत्तपणा आणि मत्सर हेहि मनोविकारांत गणले गेले. लोभ अनेक प्रकारचा असतो. कीर्तिलोभ, अधिकारलोभ, महत्त्वलोभ म्हणजे महत्त्वाकांक्षा हेहि लोभाचेच प्रकार आहेत. परंतु त्यांतलें त्यांत सत्कीर्ति आणि स्वातंत्र्य ह्यांचा लोभ किंवा हव्यास त्याला गौरवाचें स्थान आहे. त्याचप्रमाणें विषयसुखामध्येंहि गाढ स्त्रीप्रेम, आपत्यप्रेम, मित्रप्रेम, स्वकीयप्रेम आणि देशप्रेम ह्यांनाहि गौरवाचें स्थान मिळालें आहे.

ज्या विकारांना गौरवाचें अथवा आदराचें स्थान मिळालेलें आहे, त्यांना उच्च भावना ( किंवा Sentiments ) असें म्हणतात; आणि त्यांच्यापेक्षां कमी दर्जाचें जे कोमल मृदुविभाव त्यांना Emotions म्हणतात.

तळमळ, दया, वात्सल्य, न्यायबुद्धि ह्या उच्च मनोवृत्ति आहेत आणि क्रूरपणा, निर्दयता, विश्वासघात ह्या अत्यंत नीच मनोवृत्ति आहेत. नीच मनोवृत्तींचा उगम क्रोध आणि लोभ ह्या विकारांच्या

अत्यंत निकृष्ट घटनेपासून होतो आणि नंतर त्याच विकारांचें स्थान ह्या दुष्ट मनोवृत्ति बळकावून बसतात.

**निश्चय, उद्योग** आणि **धीटपणा** ह्या देखील मनोवृत्तीच आहेत; परंतु त्यांचें स्वरूप इतकें प्राकृतिक आहे कीं, त्यांचें स्थान शिरोब्रह्मांत आहे किंवा मज्जाकूर्चांत आहे, याचा निश्चय करणें कठीण आहे. तथापि ह्या प्रचंड शक्तींचें सहाय्य ज्या **विकारांना** किंवा उच्च भावनेला होईल, त्यांचाच पगडा त्या मनुष्याच्या आयुष्यक्रमावर होईल ह्यांत कोणताहि संशय नाहीं. वर्तुणुकीच्या ज्या प्रकाराचा संबन्ध स्वभावाशीं अगदीं जखडलेला असतो त्याला "**प्राकृतिक**" म्हणतात. प्रामाणिक–अप्रामाणिक; धीट–भित्रा, उद्योगी-आळशी हे वर्तणुकीचे प्रकार प्राकृतिक आहेत. असे अनेक प्रकार स्वाभाविक आहेत. मानस–शास्त्राचा लक्षपूर्वक अभ्यास करून निश्चयानें आणि उद्योगानें आपल्या स्वभावांतील व्यंगें दूर करण्याचा ज्यांचा निर्धार झाला असेल, त्यांना ह्यापेक्षां कांहीं अधिक माहिती असली पाहिजे.

शारीरिक क्रिया पृष्ठवंशरज्जू आणि मज्जाकेन्द्र अथवा **धारणारज्जू** ह्यांच्या द्वारानें चालतात. ज्ञानेन्द्रियांच्या क्रिया मेन्दूतूनच परस्पर चालतात. अर्थात् शारीरिक क्रियांतील व्यंग ज्याला दूर करणें असेल त्यानें **मज्जाकूर्च** आणि आणि **धारणारज्जू** ह्यांच्यावर ताबा मिळविला पाहिजे. शरीराचे स्नायु बळकट करण्याला ज्याप्रमाणें व्यायामाची अत्यंत आवश्यकता असते, परंतु तोहि व्यायाम **सतत नियमानें** कित्येक वर्षें घेतला पाहिजे, आणि तो घेत असतांना खाण्यापिण्याचें आणि व्यवस्थित वागणुकीचें धोरण संभाळलें पाहिजे. मग मानसिक क्रिया सुधारण्याचा व्यायाम हा तर शरीर व्यायामापेक्षां श्रेष्ठ, परंतु दोन्ही बरोबरच घ्यावे लागतात; आणि तसे ते घेत गेल्यास कार्य लवकर होतें. शारीरिक क्रियांच्या द्वारें स्वभाव व आरोग्य सुधारून घेण्यामध्यें फायदा हा आहे कीं, ह्याला

खर्च नाहीं, धोका नाहीं, पुनः आरोग्य बिघडण्याची भीति नाहीं. दुबळेपणा नाहीं, म्हातारपण नाहीं, कोणतेंहि व्यंग नाहीं. कांहीं नाहीं. परंतु एक अट आहे ती अशी कीं, पथ्य संभाळलें पाहिजे. ह्याचा अर्थ इतकाच कीं, खाण्यापिण्यांत अतिरेक करावयाचा नाहीं. आणि मद्यपान, परस्त्रीचा अभिलाष हेहि दुराचार करतां उपयोगी नाहीं. ह्यामुळें नुसती शारीरिक क्रियाच सुधारते असें नसून बुद्धि, स्मृति इत्यादि मानसिक शक्ति वृद्धिंगत होऊन दुष्ट लोकांवर वचक बसवितां येतो.

तथापि एक हा मुद्दा लक्षांत ठेविला पाहिजे. तो हा कीं, ही गोष्ट साधणें म्हणजे परसांतली भाजी खुडणें नव्हे; उतावळ्या, धांदरट अशा माणसांनीं एकदम हा उद्योग करूं नये; कारण नुसत्या वाचनानें त्यांना तें साधेल असें नाहीं. ह्याला अभ्यासू, निश्चयी, चरितार्थाची विवंचना नसणारा आणि ज्याला दुर्धर रोग जडला नाहीं असा मनुष्य पाहिजे. म्हणजे त्यानें अभ्यासपूर्वक बरेच परिश्रम केले तर त्याला साध्य होईल.

आतां हा ताबा मिळवावा कसा असा प्रश्न उत्पन्न होतो. व कित्येकवेळां असें होणें अशक्यहि वाटतें. असें वाटूं नये म्हणूनच सखोल अभ्यासाची अवश्यकता आहे. वैद्यकीचा किंवा डाक्टरीचा अभ्यास करण्यास जर चारपांच वर्षें आणि त्यानंतर कित्येक वर्षें अनुभव घेण्यांत घालवावीं लागतात, मग हें ज्ञान तर वैद्यकीच्याही पुढचें आहे. अर्धें अधिक शरीराचें ज्ञान, शरीररचनेचें, शरीरव्यापारांचें उत्तम ज्ञान करून घ्यावें आणि मग मानसशास्त्राचा अभ्यास करून अनुभव घेत घेत प्राविण्य मिळवावें. हें शास्त्र उभयविध आहे. रसायन, वैद्यक, यन्त्रशास्त्र याप्रमाणेंच शब्दज्ञान आणि अनुभवज्ञान असा मिलाफ ह्यांत आहे.

स्वभाव सुधारणें; स्मृति, बुद्धि, युक्ति ह्यांचा लाभ होणें, ह्याचें

साधन स्वयंसूचना Auto suggestion हें आहे. स्वयंसूचना म्हणजे आपल्याच मनाची आपणास पाहिजे असणारी गोष्ट झालीच आहे अशी खात्री करून देणें. ही खात्री अभ्यासावाचून आणि व्यवस्थित वागणूक ठेवल्यावाचून व्हावयाची नाहीं. म्हणून जिज्ञासू असतील त्यांनीं शारीर शास्त्राचा साधारणपणें आणि मज्जातंतू प्रकरणाचा वर दाखविलेल्या धोरणानें अभ्यास करावा. उगीच दुसऱ्याच बारीकसारीक माहितीची कांहीं जरूर नाहीं. मानसशास्त्राला जी माहिती अवश्य आहे, तिची रूपरेषा येवढ्याच करितां येथें सांगितली आहे.

## ॥ अभ्यास--दार्ढ्यमपरः स्वभावः ॥

वरील सर्व विवेचनाचा हेतु हाच कीं, इच्छा धरून प्रयत्न करणाराच्या इच्छा पूर्ण व्हाव्या. हातावरील चिन्हें शुभ आहेत कां अशुभ आहेत ह्याचें ज्ञान एवढी खटपट करून कां मिळवावयाचें? समजा एखाद्याच्या हातावरील चिन्हें—रेषा फारच अशुभ आहेत. तर हें समजून तरी उपयोग कोणता? अशुभाचा परिणाम जर कमी करतां आला नाहीं तर उगाच यातायात कशाला? यातायातीपासून जर कांहीं फायदेशीर गोष्टी घडून येण्याची आशा असेल तरच कोणी परिश्रम करील. अगोदर शुभाशुभ चिन्हें ठरविण्यासाठीं शास्त्र उत्तम तऱ्हेनें शिकलें पाहिजे; त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला पाहिजे; आणि मग जर इच्छेच्या अथवा हेतूच्या उलट कांहीं होणार असा संभव असेल, तर प्रतिकाराचाही उद्योग केला पाहिजे. इष्ट साध्य होण्यासाठीं **भगीरथ प्रयत्न, योग्य मार्गानें, अवश्य तितका कालपर्यंत** केला पाहिजे, म्हणजे ती गोष्ट सिद्ध होईल असें मानलें जातें. पण आपला प्रयत्न **योग्य दिशेनें, पाहिजे**

तितक्या जोरानें आणि अवश्य तितका वेळ होत नाहीं; हीच नेहमीं उणीव असते, असेंही सांगण्यांत येतें; म्हणूनच पुष्कळ गोष्टी पाहिजे त्या वेळीं घडून येत नाहींत असा निर्वाळा या कामीं दिला जातो. परंतु हें लक्षांत ठेवावें कीं, निरंतर प्रयत्न चालू असावा. ह्या जन्मीं जें ज्ञान आपल्यास अशक्य, अलभ्य वाटेल त्याचा अभ्यास सतत चालू ठेवल्यास पुढील जन्मीं तेंच ज्ञान आपल्यास उपजत फलद्रूप होईल. कारण ह्या जन्मींचा जो प्रयत्न, जो दृढाभ्यास तोच स्वभाव. Habit is second Nature. हा स्वभाव पालट ह्या जन्मींहि आपल्यास अनुभवास सांपडणें शक्य आहे. आणि पुढील जन्म तर आहेच आहे, त्यांत संशयच नको.

## स्वभाव आणि त्यांत पालट

आईबापांच्या स्वभावाच्या धर्तीवरच सामान्यतः मुलांचा चेहरा, आंगलोट, ढब, अक्कल, आवडनिवड इत्यादि गोष्टी असतात, असा बहुतेकांच्या नित्यानुभव आहे. क्वचित् एकट्या आईप्रमाणें, क्वचित् बापाप्रमाणें मुलांचा बांधा असतो. केव्हां केव्हां मामा, आईचा बाप दोहोंकडील कोणत्या तरी पूर्वजाप्रमाणेंहि असतो. बांधा जसा उपजत त्याचप्रमाणें, बुद्धि, वृत्ति, युक्ति, कौशल्य हे गुण त्याचप्रमाणें, दुष्टपणा, आळस, अप्पलपोटेपणा हेहि दुर्गुण उपजत असतात. हे सद्गुण जेव्हां जोरदार असतात, तेव्हां परिस्थिति, संगति, धाकदपटशा ह्यांचा उलट परिणाम फारसा होत नाहीं, आणि झाला तर अगदीं थोडावेळ टिकतो. कांहीं प्रसंगीं तर तो मुळींच होत नाहीं. परंतु पुष्कळ मनुष्यामध्यें सद्गुण किंवा दुर्गुण हे इतक्या जोरदार दर्जाचे नसतातच. ते दोन्ही साधारणतः दुर्बलच असतात. आणि म्हणूनच सुशिक्षणानें, सवयीनें, सुसंगतिनें मनुष्य बराच सुधारतो; आणि कुशिक्षणानें, खोट्या शिक्षणानें, गुरुबाजीनें,

बोवा बाजीनें, म्हणजे कुसंगतिनें मनुष्य बिघडतो. सुशिक्षण हें लहानपणीं म्हणजे २५ व्या वर्षापर्यंत जितक्या निश्चितपणानें देतां येतें किंवा मिळवितां येतें तितक्या ठामपणानें तें पुढें मिळत नाहीं. म्हणून २९–३० ह्या वेळीं जो स्वभाव ठरतो तोच सर्व आयुष्यभर कायम राहतो. ह्याला अपवाद आढळतील; पण थोडे आणि ते थोडे म्हणूनच वरील सामान्य नियम सिद्ध होतो

स्वभाव, सवयी बदलल्या म्हणजे मग हातावरील रेषा चिन्हें बदलूं लागतात. कांहीं जुनीं चिन्हें बुजून जातात. कांहींवेळां नवीन रेषा उमटतात, हें पूर्वी सांगितलेंच आहे. वाईट स्वभाव बदलण्याचा सतत प्रयत्न म्हणजे हातावरील चिन्हेंहि बदललेलीं दिसतील. रेषांमध्यें बदल घडलेला स्पष्टपणें दिसणें हीच बदललेल्या स्वभावाची कसोटी आहे. डाव्या आंगठ्यावरील रेषा ह्या शारीरिक व्यक्ति-महत्त्वाच्या निदर्शक आहेत, त्या न बदलल्या तरी त्याचा बुद्धि-मत्व आणि स्वभावपालट ह्याच्याशीं निश्चित असा संबंध नाहीं. देहयष्टि आणि बरेचसे गुणावगुण हे मनुष्य आपणाबरोबर उपजतच घेऊन येतो. ह्या सर्व सामग्रीला

## अनुवंशिक सामग्री

म्हणतात. स्वभावांतील ही महत्त्वाची एक बाब आहे. तशीच दुसरी. दुसरी महत्त्वाची बाब जिला (Environment म्हणजे) **स्वयंस्फूर्त संग्रहण** म्हणतात ती होय. ह्यांत शिक्षण, स्वतःचा प्रयत्न, संगति ह्यांचा अंतर्भाव होतो. दारूबाजाचीं मुलें बिघडण्याचा संभव असतो, गायकाचीं मुलें गायनकला लवकर हस्तगत करून घेतात, विद्वानांचीं मुलें पुष्कळ अंशीं विद्वानच निपजतात. ह्यांत आनुवंशिक सामग्रीचा संबंध अगदींच नसतो असें नाहीं. पण त्या मानानें शिक्षण, संगति, आणि प्रयत्न ह्यांचा वाटा जास्त असतो. असें शास्त्रज्ञांनीं पुष्कळ अनुभव घेऊन ठरविलें आहे. "स्वभावास औषध नाहीं" अशी म्हण

आहे ती कांहीं खोटी नव्हे. तथापि ह्या म्हणीचा अर्थ येवढाच समजावयाचा कीं, स्वभाव एकदा दृढ बनला म्हणजे मग त्याला औषध नाहीं. त्याला औषध एकच—ते म्हणजे दुःस्वभावाला शासन हेंच. अपराध्यास शिक्षा करावी किंवा शिक्षण द्यावें हाहि हल्लीं एक वाद उपस्थित झालेला आहे. परंतु तें कसेंहि असलें तरी अगदीं निर्ढावलेल्या दुष्ट गुन्हेगाराला शिक्षेवांचून दुसरें कोणतेंही औषध लागू पडलेलें नाहीं. परंतु बाकीच्या गुन्हेगारांचा स्वभाव म्हणजे गुन्हेगारीची प्रवृत्ति बदलूं शकते. म्हणूनच कुमार्गगामी स्त्रियाहि सच्छील बनलेल्या आहेत आणि चोर, उचले ह्यांची मनोवृत्तीहि पालटलेली आहे. मग अशा तऱ्हेचा अनुभविक सिद्धान्त इतर बाबतींतहि शास्त्रज्ञांनीं लाविलेला आहे; तो हा कीं, मानसशास्त्राच्या प्रात्यक्षिक अभ्यासानें आपल्या स्वभावांतील व्यंगें आपणांस दूर करतां येतील. येवढ्यासाठींच मानसशास्त्र ज्यावर अधिष्ठित झालें आहे, तें **मस्तिष्क** आणि **धमनी** ( किंवा मज्जारज्जू ) ह्यांच्या संबंधाचें आविष्करण थोडक्यांत करणें आवश्यक झालें.

## इषारा

परंतु एका मुद्द्यासंबन्धानें मात्र एक जोराचा **इषारा** देऊन ठेवणें अत्यंत अवश्य आहे. समर्थ रामदास, श्रीतुकाराम, लोकमान्य टिळक, महर्षि पटवर्धन ह्यांच्यासारख्या लोकोत्तर व्यक्तींचा जो सुस्वभाव तो सुस्वभाव आपल्यामध्यें उत्पन्न करणें हेंच मानस-योगाचें खरें ध्येय आहे. तथापि केवळ त्याच ध्येयाच्या सिद्धीसाठीं कसा प्रयत्न करावा तें **सांगण्याचा ह्या लेखाचा मुळींच उद्देश नाहीं;** ते ध्येय अत्यंत उच्च होय. प्रस्तुतचे विवेचन कारितांना कोणत्याहि प्रकारें अत्युच्च ध्येयाशीं तर विरोधी नाहींच; पण सर्व सामान्य जनतेस सुसह्य असे **प्रापंचिक ध्येयच** दृष्टीपुढें ठेविलें आहे. प्रपंच करीत असतां जें सुख मिळतें तें प्रत्येकास पाहिजे असतें. **आरोग्य, विद्या,**

द्रव्य, स्त्रीसुख, मानसन्मान ह्या गोष्टी कोणास नको आहेत? म्हणूनच श्रीतुकारामांचें ध्येय ह्या लेखांमध्यें नाहीं. परंतु प्रापंचिक ध्येयहि साधण्याचा मार्ग एकच नाहीं. आरोग्याकरितां कोणी वनस्पतींचा काढा घेतो, तर कोणी अभक्ष्य पदार्थ, लिव्हर एक्स्ट्रॅक्ट, Glandular serum, ह्या अनन्वित प्राणिहत्त्या करून मिळविलेल्या उपायांचा अवलंब करितो; कोणी द्रव्यप्राप्ति-करितां चातुर्यानें धंदा करून सतत परिश्रमानें व परवित्ताचा अभिलाष न धरितां संपत्ति मिळवितो; तर कोणी खोटे हिशेब, खोटे दस्तऐवज, बनावट, जॉइंट स्टॉककंपन्या, कर्जबुडवेपणा इत्यादि प्रकारच्या ठगबाजीनें व साळसूदपणाच्या ढोंगानें केंसानें गळे कापतो, किंवा त्याच्याहि पुढें जाऊन प्रत्यक्ष खून करून तो पच-वितो. कोणी सुंदर स्त्रीच्या समागमासाठीं उत्सुक असूनहि शक्य तितकी उत्तम स्त्री शोधून तिच्याबरोबर वैवाहिक सुख अनुभवितो, तर कोणी आधुनिक दुराचारी संस्थानिकांप्रमाणें सुंदर तरूण स्त्रियांवर खुशाल वाटेल तसा जुलूम करून आपली विषयवासना तृप्त करून घेतो. आरोग्य, विद्या इत्यादि मिळावण्याची मनोवृत्ति सर्वत्र सारखीच, पण ती मनोवृत्ति उत्पन्न करण्याचे मार्ग आणि नंतर त्यांचा उप-योग करण्याची दिशा ही अत्यंत भिन्न आहेत. निरपराधी प्राणी, मग तो पशु पक्षी किंवा मनुष्य असो, त्याला क्लेश न देतां आपली जीवनयात्रा चालवितां यावी, स्वसंरक्षणार्थ आणि दुर्बलांच्या रक्षणार्थ पाहिजे तितकी शक्ति आणि अक्कल प्रत्येकांत असावी आणि तिचा त्यानें योग्य उपयोग करून दुष्टांच्या जुलमाला प्रतिबंध करावा, यासाठीं प्रचंड आत्मिकबल-शक्ति-पाहिजे. आम्ही स्वभावांत बदल करूं इच्छितों तों ह्या दृष्टीनें आहे, म्हणूनच आमच्या हेतूप्रमाणें वागणारानें स्वच्छता ठेऊन व्यायाम, शक्यतितका विद्याभ्यास करणें, धंद्यामध्यें, न फसण्याची शक्य ती दक्षता बाळगून दुसऱ्यास न

फसविणें; ठग, चोर, बदमाष ह्यांना आपल्या प्रामाणिकपणाचा फायदा मिळूं न देणें, मद्यप्राशन न करणें, जे ब्राह्मण व वारकरी असतील त्यांनीं मांसाहार कोणत्याही कारणानें न करणें, ह्याप्रमाणें वर्तणूक ठेवणारालाच आमच्या लेखांतील धोरणाचा उपयोग होईल. अशी वागणूक ठेवणें हें मुळींच अवघड नाहीं असें आमचे ठाम मत आहे.

---

## प्रकरण १९ वें

# हाताच्या पंजांचे प्रकार

पूर्वीं हाताच्या पंजांच्या निरनिराळ्या स्वरूपांचें वर्णन आलेलें आहेच; तरी सुद्धां ह्या महत्त्वाच्या गोष्टींचा अधिक विस्तृत विचार करणें अवश्य दिसतें. कारण प्रथम हाताचा पंजाच दृष्टीत्पत्तीस येतो, आणि त्याच्यावरच इतर तपशिलाचे धागेदोरे अवलम्बून असतात, म्हणून क्वचित पुनरुक्ति पत्करूनहि ह्या प्रकरणाचा खुलासेवार विचार करण्याचें योजिलें आहे. हाताच्या पंजांचे मुख्य प्रकार सहा आहेत ते असे:——

**हस्ताः षोढास्तु विज्ञेयाश्चिपिटाः पट्टिकाङ्गुलाः ॥**
**चतुरस्रतलाश्चाथ निम्नाग्रा घनपर्वकाः ॥**
**मृदुसूच्यङ्गुलाश्चैव संकीर्णा अग्रहस्तकाः ।**
**अङ्गुल्यालोच्य द्रष्टव्या अङ्गुष्टसहिताः क्रमात् ॥**

चिपिट हात, कष्टाळू, काबाडी, जंगली किंवा मजुरांचा असतो, चतुरस्र किंवा व्यवहारी हात व्यवहारचतुरांचा असतो, पट्टाङ्गुल—बोटें लांबट परंतु टोंकें चपटीं असा हात कणखर, उद्योगी लोकांचा असतो. निम्नाग्र म्हणजे निमुळता हाहि प्रकार आढळतो. घनपर्व म्हणजे दणगट पेरांचा आणि अणकुचीदार बोटांचा; हा हात नाजुकप्रकृति लोकांचा असतो. शिवाय मिश्रस्वरूपाचे हात तर शेंकडों लोकांचे असतात.

## कष्टाळू किंवा चिपिट हात

हाताचा अशा प्रकारचा पंजा हा काबाडी, जंगली, किंवा मजूर वर्गांपैकीं लोकांत आढळतो. हाताचा तळवा फार जाड, बोटें जाड आणि आखूड. त्यांतही बोटांचीं व आंगठ्याचें टोक जाड ओबडधोबड असतें, ओबडधोबडपणा हेंच अशा हाताचें वैशिष्ट्य. ज्या वर्गांत बुद्धिचेंच काम पडत नाहीं, डोक्याचा उपयोगच करण्याची ज्या लोकांना संवय नाहीं, नेहमीं हतोडा, विळा, कुदळ, फावडे ह्यांच्याशींच काम, अशा लोकांचे हात फार बोजड ओबडधोबड असतात. हात जितका जाड व टणक तितकें बुद्धिचें काम कमी. त्यामुळें त्यांचें जें ठरलेलें काम असते, तेवढेंच तें करूं शकतात. ह्या लोकांस सैन्यांत घेतलें तर उडव बन्दूक की उडवली ह्यापेक्षां तें कांहीं जाणत नाहींत. कोणत्याहि कामांत कसब काय तें त्यांना कांहींच कळत नाहीं; त्यांना उच्च प्रकारची करमणूक किंवा मौज ह्यापैकीं कांहींच कळत नाहीं. घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणें त्यांची स्थिति असते.

तथापि जनावरेंहि जर नादप्रिय असतात तर अशा लोकांनाहि डफ, तुणतुणें, ढोल इत्यादि वाद्यें किंवा सनईचे साधे सूर आवडतात असा अनुभव येतो; अशा अनेक कारणांकरितां अशा वर्गांतील लोकांची नेहमीं आबाळ होते. ते झाडलोट, घरकाम ह्या पलिकडे कोणत्याच कामाच्या उपयोगी नाहींत असा थोडा चुकीचा समज मात्र फैलावलेला असतो.

## चौरस हात अथवा व्यवहारी हात

ज्यांच्या हाताचा तळवा मांसल, चौकोनी असून बोटेंही ठोसर असतात, असे लोक उद्योगी, धोरणी, व्यवस्थित व नेहमीं कामांत गढलेले असे असावयाचे. त्यांचें लक्ष वस्तूच्या सौंदर्याकडे फारसें

नसतें; वस्तू उपयोगी आहे कीं नाहीं येवढेंच ते पहिल्यानें पाहतात, मग बाकीच्या गोष्टी. चौरस-हाताचीं मनुष्यें शिस्तीचीं फार भोक्तीं असतात. त्यांनाहि मजा करावीशीं वाटते. पण ते मजेचा अतिरेक कधीं करणार नाहींत.

चौरस हात म्हणजे तळहात जाड, थोडा खोलगट परंतु बोटें व पेरीं चांगलीं पुष्ट असतात. आंगठा भक्कम असून मुळाशीं जाड असतो. पण पेरीं तितकीशीं स्पष्ट नसतात. असे लोक कधीं आपल्या कामांत आळस करावयाचे नाहींत. म्हणून ते जर नौकरी पेशांत असले तरच उत्तम. त्यांना दूरदृष्टि थोडी कमी; म्हणून अशांना नौकर म्हणूनच नेमावें, म्हणजे ठरलेलें काम व्यवस्थेनें व वेळच्यावेळीं व्हावयाचेंच. हे मालकाचा अपमान कधीं करावयाचे नाहींत; त्याचा मानच ठेवतील.

चौरसहाताचे व्यवहारी लोक बोलण्याचालण्यांत भरमसाट बडबड करावयाचे नाहींत किंवा चेहराहि उगाचच हंसरा अथवा दुःखी-कष्टी करावयाचे नाहींत. ह्या स्वभावाला अनुसरूनच त्यांचा पोषाक असतो. त्यांत नटवेपणा आढळावयाचा नाहीं. त्यांना महत्त्वाकांक्षा असते पण तिचा गाजावाजा व उगीच धडपड नाहीं. सर्व कारभार संथ. त्यांचें धोरण कामावर. तथापि त्यांच्यांत एक दोष असतो, तो हा कीं, इतरांची ते थोडी अवाच्यासवा स्तुति करितात, व त्यांच्या कामाची कोणीं प्रशंसा केली कीं खुष होतात. ह्यांना चैनीची आवड नसते, त्यामुळें कष्टाळू लोकांतच ह्यांची गणना होते.

चौरसहाती नौकर मालकाला मान देतो, त्याचें कारण तो मालक असतो म्हणूनच; मालकामध्यें बुद्धिमत्ता, किंवा दुसरा एखादा गुण असल्याकारणानें मालकावर खुष असणें हें योग्य असला विचार तो मनांतच आणीत नाहीं. चौरस व्यवहारी माणसाच्या बोटांचीं पेरीं

वटमुट असलीं म्हणजे अशा मनुष्याचे गुण पूर्णपणें दृष्टोत्पत्तीस येतात. त्याच्याजवळ कितीहि जिनसा असू द्या त्या सर्व तो व्यवस्थित ठेवील, इतकेंच नव्हे हवी ती जिन्नस नेमकी काढून देईल. मात्र त्यांची व्यवस्था इतरांच्या लवकर ध्यानांत यावयाची नाहीं. त्यांना आपल्या नीटनेटक्या व्यवस्थेचा अभिमानच वाटतो. खेळ, व्यायाम यांची त्यांना आवड असते, पण ती बेतानेंच. सर्व गोष्टींत बातबेत हेंच धोरण. हाच स्वभाव "चौरसी" माणसाचा असतो येवढें पक्कें ध्यानांत ठेवावें.

"चौरसी" मनुष्याच्या बोटांचीं पेरीं थोडीं बारीक आणि बोटेंहि साधारणपणें कमीजाड असतील तर तो मनुष्य तबला, सारंगी, हार्मोनियम इत्यादि वाद्यें वाजविण्यांत कुशल असतो.

चौरस हाताच्या मनुष्याचीं नखें भसाडीं नसावींत व अगदीं लहान किंवा पिचलेलीं अशींहि नसावींत, म्हणजे त्यांच्या गुणांची प्रचीति तावडतोब येईल.

## पट्टाङ्गुल ( मेहनती हात )

ह्याला इंग्रजी पद्धतीमध्यें ( Spatulate ) स्पॅच्युलेट म्हणतात. असे हात असले म्हणजे त्याचीं बोटें चांगलीं जाड, लांब, परंतु टोकें हातोड्यानें ठोकल्याप्रमाणें बोथट असतात. ह्या हाताचें वैशिष्ट्य असें कीं, मनुष्याच्या अंगांत धडाडी, हालचाल, तरतरी खूप असते. बोटांना शोभेल असा आंगठा जाड असतो. किंवा असावा. पेरीं स्पष्ट असावीं. असल्या हाताचीं माणसें दृढनिश्चयी, आत्मविश्वासू आणि हुषार असतात. त्यांना दुसऱ्याच्या सल्लामसलतीची अपेक्षाच नसते. हात जितका कणखर तितका निश्चयाचा व तरतरीचा गुण स्पष्ट नजरेस येतो. त्याच्या वागणुकींत नाजुकपणा किंवा उगीचच बोभाटा नसतो. त्याच्यामध्यें काव्य, कादम्बरी,

मनोराज्य इत्यादि गुणावगुण जे छानछोकी तरुणांत आढळतात, त्यांना " पट्टाङ्गुल " हाताच्या माणसांच्या ठिकाणीं थारा नसतो.

पट्टाङ्गुल किंवा चतुरस्र हातांच्या मनुष्यामध्यें आंगठ्याच्या घडणीचें महत्त्व जास्त. बाकीचा पंजा साधारणपणें यथास्थित पण आंगठा दुबळा, विशविशीत असेल, तर मनुष्याला जितकें यश लाभावयाचें त्याच्या तिसऱ्या हिश्शानेंहि लाभावयाचें नाहीं. **योग्य योजना**, परिश्रम, चिकाटी हे जे यशाचे निश्चित मार्ग त्यांची किल्ली आंगठ्याच्या घडणींत आहे. पंजा कसाहि असो त्याच्या गुणांचा बहुतेक जोर आंगठ्यांत असतो. म्हणूनच आंगठा दाखविणें, म्हणजे दुसऱ्याला चांगलेंच बनविणें असा अर्थ प्रचारांत आला. आंगठ्याच्या दुबळेपणामुळें येणारें अपयश थोडें तरी कमी होण्याचाहि संभव असतो. तो असा कीं, आंगठ्यामध्यें दोनच पेरीं असतात, त्यांपैकीं दोन्ही पेरीं ठसठशीत असलीं तर कामच झालें; पण निदान दुसरें ( म्हणजे नख असलेलें ) पेरें जरी चांगलें घसघशीत असलें तरी मनुष्याच्या योजनेमध्यें विघ्नें येत नाहींत. टोंकाच्या म्हणजे नख असलेल्या आंगठ्याच्या पेऱ्यांत धोरण, युक्ति ह्यांचा सांठा असतो. तो ऐनवेळीं उपयोगाला येतो.

आतां इतर बोटांचा विचार असा कीं, काटक बोटांचा मनुष्य तसाच कडक स्वभावाचा असतो. आणि बोटें थोडींबहुत मृदु लिवलिवीत असलीं कीं, स्वभावांतहि तसाच मऊपणा असतो; किंवा त्याला कलाकौशल्याची तरी आवड असते. शेतकी, यान्त्रिकविद्या, संस्थेचा कारभार इत्यादिकांत देखील त्याची बुद्धि चांगली चालते. वादनाचाहि त्यांना थोडा नाद असतो. पण अशीं माणसें स्वतःच्या तोऱ्यांतच गर्क असतात. त्यांना उणेपणा खपत नाहीं, आपल्याला अवश्य तितकें द्रव्य जिकडे मिळेल त्या देशांत ते जातील, व वाटेल तो उद्योगधंदा करतील. त्यांना कोणी मदतीस

नसलें तरी आपलें अडलें असें ते म्हणणार नाहींत; तसेंच काम रेटीत नेतील.

चतुरस्त्र व्यवहारी हाताच्या मनुष्याप्रमाणें "पट्टाङ्गुल" म्हणजे मेहनती हाताच्या माणसांतहि व्यवस्थितपणा फार आढळतो. त्यांना काम पुष्कळ झालेलें आवडतें मग कामाचा दर्जा थोडा कमी असेना! नेहमीं वेळच्या वेळींच काम उरकलें पाहिजे हा त्यांचा खाक्या. व्यवस्थितपणा आणि कडकपणा स्वभावांत असल्यानें असले लोक सैन्यांत फार उपयोगी पडतात. लष्करी शिस्त, कामाची सक्ति, काटकपणा आणि नेहमीं ज्याना काहीतरी उद्योग पाहिजे अशा स्वभावाचीं माणसेंच उत्तम शिपाईबाण्याचीं निपजतात. त्यांचेकडे काम सोपवून दिलें कीं तें झालें नाहीं अशी रडकथा ते सांगणार नाहींत. म्हणून हाताचे पंजे तपासूनच अंमलदार लष्करभरती करतात. सैन्यामध्यें पलटणीचे जे यशस्वी सेनानायक असतात, त्यांचे पंजे "पट्टाङ्गुल" आणि आंगटे भक्कम असतातच. ह्याचा पडताळा अवश्य पहावा. गुप्तमण्डळींतहि असे लोक आढळावयाचे कारण ह्यांना स्वातंत्र्याची आवड अनावर असते.

लष्करांत शिरण्याची ज्यांना संधि नाहीं, ते शिकार करणें, बंदुकीनें नेम मारणें ह्यांत कालक्रमणा करतात, आणि अगदींच कांहीं काम नसलें तर आपल्या कुळाचा उच्चपणा लोकांस सांगत राहून तो इतरांच्या नजरेंत भरेल असे प्रयत्न करितात. एवंच हाणाहाणी व धामधूम हा अशा लोकांचा मुख्य पेशा असतो. अभ्यासूनें आंगठ्याच्या रचनेकडे मात्र बारीक लक्ष पुरवावें, नाहींतर आडाखा चुकेल.

मेहनती हाताच्या मनुष्याची शिस्त फार कडक असते. तो स्वतः तर उद्योगी आणि कसून मेहनत करणारा असतोच, पण दुसऱ्याकडूनहि काम चोपून घेतो व आपले हक्क हिरावले जाऊं

नयेत म्हणून फार जपतो. इंग्लिश, अमेरिकन हे लोक बहुतेक अशाच हाताचे असतात. त्यामुळें इंग्रज वाह्यात–बाष्कळ–बडबड करीत नाहीं. काम तडीला नेऊनच तो प्रश्नाचें उत्तर देतो.

" पट्टाङ्गुल " हात हा टणकच असावा. हा जर लिबलिबीत असेल तर मेहनत होईल, पण फलप्राप्ति नाहीं. आळसाचें प्राबल्य माजेल. म्हणून पञ्जा चाचपून तो कितपत कडक आहे तें पहावें. त्याचप्रमाणें आंगठा व बोटांचीं पेरीं हीं देखील तपासावींत. बोटाचीं पेरीं जर कणखर नसतील तर योजलेली मसलत फसण्याचा संभव जास्त.

मेहनती म्हणजे " पट्टाङ्गुल " मनुष्याची धर्मश्रद्धा रोखठोक अनुभवावर आणि बुद्धीवर आधारलेली असते. भलत्याच लफंग्याच्या जाळ्यांत तो सांपडावयाचा नाहीं.

हाताच्या पंजाचीं वर्णनें पूर्वींच्या प्रकरणांत आलीं आहेत, तरी सुद्धां हस्तसामुद्रिक शास्त्रांत हाताच्या पंजाचें महत्त्व अतिशय; त्या कारणानें द्विरुक्ति पतकरूनहि निरनिराळ्या ग्रंथकारांचीं मतें देणें अवश्य आहे. त्यामुळें विषयाचा उलगडा उत्तम होतो व वाचकांच्या शंकांचें समाधानहि योग्य प्रकारें होतें; परंतु शंका प्रदर्शित करतांना त्यांनीं हाताचे ठसे उत्तम वठलेले असे मिळविले पाहिजेत; ज्या माणसांत कांहीं वैशिष्ट्य असेल त्यांच्याच हाताचे ठसे जितकें कार्य करूं शकतील तितकें सामान्य अशीं हजारों माणसें यांच्या हाताच्या ठशानें शिक्षणाच्या दृष्टीनें तितकेंसें कार्य फलद्रूप होत नाहीं.

महत्त्वाच्या बाबतींत आणखी एक विशेष प्रकारचा पंजा आढळतो, त्याला पाश्चात्य ( knotty नॉटी ) ग्रंथियुक्त हस्त म्हणतात. ह्यालाच आपल्या शास्त्रांत ' घनपर्व ' हें नांव आहे. या जातीच्या पंजाचा तळवा विस्तृत, जाड, परंतु टणक नसून चिवट असतो. बोटाचीं पेरीं आणि सांधे उगीच गुबगुबीत असे नसून अगदीं प्रमाण-

शीर मजबूत असतात. बोटांचीं टोंकें मात्र फताडीं नसून निमूळतीं असतात. सर्वप्रकारच्या हस्तरचनेंत हा " घनपर्व " हस्त श्रेष्ठ होय. विशेष हा कीं बोटें कणखर परंतु प्रमाणसूत अशीं मोठीं आकर्षक अशीं असतात.

**गुणधर्म** —असा पञ्जा ज्या मनुष्याच्या हाताचा असेल तो मनुष्य कोणत्याहि गोष्टीचा कार्यकारणभाव तत्काळ ओळखतो व त्यावर उत्तमोत्तम उपाययोजना करूं शकतो. त्याच्या विचारांत शहाणपण दृष्टोत्पत्तीस येतें. तो स्वावलंबी, लोकमतास मान देणारा आणि सत्यान्वेषी असावयाचा. बोटांचीं पेरींच अशीं यथायोग्य असतात, कीं पहाणाराचे मनांत त्या गृहस्थाविषयीं आदरभाव उत्पन्न होतो. कारण " घनपर्व " हाताचा मनुष्य युक्तिप्रयुक्ति लढवून कार्य यशस्वी करण्यांत कोणासहि हार जात नाहीं. ह्या शास्त्रांत बोटांमध्यें आंगठ्याची योग्यता फारच मानतात. त्याहि दृष्टीनें " घनपर्व " हाताचा आंगठाहि अगदीं ठाकठीक असतो. दोन्ही पेरीं सारखीं योग्य तऱ्हेनें जुळलेलीं, ओबडधोबड नाहींत, हड-कुळींहि नाहींत अशीं आणि टोंक सरळ अणकुचीदार असें असतें. ज्या शहाणपणाचा काम—फत्ते ह्या दृष्टीनें उपयोग, असा कांहीं मनसुबा हा मनुष्य रचतो. इतरांतील गुणदोष बरोबर ओळखून गुणांचा मात्र उपयोग करून घेण्याची कला त्याला उपजत साध-लेली असते. " व्यवहारी " हाताचाहि मनुष्य धोरणी असतो, पण काम करण्याची चतुराई ही या " घनपर्व " हातांचे माणसांत अधिक आढळते. शिवाय एरवीं बैठकींमध्यें वाक्पाण्डित्य करणें, सुभाषितें योग्यवेळीं पुढें झोंकून देऊन लोकांवर छाप बसविणें हेंहि अशा माणसांनाच साधतें.

हीं माणसें फार शोधक व चौकस असतात. कोणतीहि गूढ गोष्ट असो ती आपल्या बुद्धीच्या आटोक्याचे बाहेर असणार नाहीं

अशी त्यांची खात्री असते. सर्व भानगडींतील धागेदोरे आपल्या बुद्धीनें हे लोक यथास्थितपणें उकलतात. श्रद्धा, कल्पनाशक्ति, मायापाश ह्या सर्व गोष्टी त्यांच्या धोरणाच्या कक्षेंतच राहतात, भलतीकडे वहावत नाहींत.

कोणी कसाहि मनुष्य विक्षिप्त का असेना त्याचा आपल्याला उपयोग होणार, अशाच दृष्टीनें असे लोक विचार करितात. काय करावें आमच्या पक्षांतील माणसेंच वाईट अशी कुरकुर हे लोक कधीं करीत नाहींत, कारण त्यांचा आत्मविश्वास दांडगा असतो. तपशिलाच्या बाबींचा विचार करतांना ध्येयावरील ह्यांची दृष्टी ढळत नाहीं. म्हणून यांना कोणीहि मनुष्य सहकारी चालतो; आणि कोणत्याहि परिस्थितीमध्यें त्यांच्या कामांत खण्ड पडत नाहीं. समता आणि लोकशाही ह्यांचे हे चाहाते असतात आणि जुलमाचा मनापासून तिटकारा करितात.

अशा जातीच्या हाताचें रहस्य त्यांच्या बोटांच्या पेऱ्यांत आणि सान्ध्यांत असतें. पेरीं आणि सान्धे याची रचना जिथल्या तिथें हेंच रहस्य. व्यावहारिक हाताचीं पेरीं मजबूत असतात, पण ठाकठीकीचीं नसतात. तसेंच उपयोगी, उद्योगी अथवा पट्टाङ्गुल हाताचीं बोटें घटमुठ पण सळनळीत असतात. त्यांच्यांत आकर्षकता नसते.

धोरण, विशेष कौशल्य आणि अचाट युक्ति यांचा उगम बोटांचीं पेरीं आणि सान्धे यांच्या रचनेंत असतो.

## अंगुष्ठ

आंगठ्याची महती सर्व शास्त्रज्ञांनीं वर्णिली आहे. एका शास्त्रज्ञानें लिहिलें आहे कीं, हाताच्या योगानें मनुष्यानें आपलें श्रेष्ठत्व स्थापन केलें आणि आंगठ्यामुळें कर्तबगार पुरुषाला मनुष्यांमध्यें अग्रेसरत्व प्राप्त झालें.

आंगठ्याचे भाग तीन. त्यांत पहिला मूळाचा उंचवटा, दुसरा, प्रत्येक बोटाला पेरीं तीन असतात, पण आंगठ्याला उघड दिसणारीं पेरीं दोनच. तिसरें पेरें उंचवट्यांत रुतलेलें असतें. तें दिसत नाहीं. मूळ उंचवटा हा चैनी वृत्तीचा द्योतक आहे. बुद्धि आणि मुत्सद्दीपणा यांच्याशीं त्याचा संबंध नाहीं. आंगठ्याच्या दोन पेरांपैकीं उंचवट्याला लागून असलेलें जें खालचें पेरें तें तारतम्य, कोटिक्रमाची शक्ति आणि युक्तीचे आडाखे यांचें द्योतक असतात. हें पेरें मजबूत नसेल, तर मनुष्याची तर्कशक्ति कमकुवत आहे, असें समजावें. इच्छा कितीहि बळकट्तर असो, प्रसंगीं कोटिक्रम लढविण्याचें कार्य त्याला साधणार नाहीं. ह्याप्रमाणें पहिल्या पेऱ्याचें शक्तिकार्य दृष्टिपुढें ठेवावें.

दुसरें पेरें नखाचें. ह्यावरून अचूक निर्णय देण्याची शक्ति किती तें कळतें. इच्छाशक्ति, निर्धार, आणि अचूक निकाल ह्यांचा साठा त्या मनुष्याच्या मेंदूंत कितपत आहे, तें या बाह्य चिन्हावरून ओळखतां येतें.

नखाचें पेरें बारीक, किरकोळ, बाळकुंडें आखूड असलें तर तो माणूस डळमळीत वागतो. निश्चय बिनचूक तर नसतोच पण ठामहि नसतो. सगळाच कारभार डळमळीत. केव्हां कोणीकडे झुकेल त्याचा नियम नाहीं. अशा माणसाचा उपयोग कोणालाच होत नाहीं. कारण तो परधार्जिणा असतो. कोणीहि कान पकडावा आणि कामाला जुंपावें ही स्थिति. मन नेहमीं संशयाकुल. जो कोणी कांहीं सांगेल तें खरें असेल असें त्याला वाटतें. नखाचें पेरें दुर्बळ पण खालचें पेरें जर जरा बरें असेल तर दुर्बल पेऱ्याचा मनुष्य केव्हां केव्हां विशेष कर्तबगारी करून दाखवितो. अशा वेळीं तो श्रमाची पर्वा करीत नाहीं. अगदीं जिवापाड परिश्रम करितो. पण असे प्रसंग क्वचित्.

नखाचें पेरें किरकोळ पण खालचें पेरें जर चांगलें व्यवस्थित वडणींचें असेल, तर निश्चयाची उणीव अक्कलेनें भरून निघते. एकदम ठाम निर्धार नाहीं. पण युक्तीनें तेंच काम हळुहळू सुतीं लागतें. परंतु उलट, नखाचें पेरें लांबट आणि खालचें पेरें आखुड, किचकट असें असेल तर त्याचा निश्चय ठाम; पण तो बरोबर, यथायोग्य असेल असें नाहीं. कारण त्याला तारतम्याची आणि धोरणाची जोड नाहीं. असा मनुष्य डळमळीत नसतो, पण अतिरेकी, उगाचच हट्टास पेटणारा असा असतो. यावरून बोध असा कीं, कोणतेंहि एकच पेरें चांगलें आणि दुसरें किरकोळ असल्यापासून उपयोग नाहीं. पेरें जर वाईट असावयाचेंच तर तें आंगठ्यापैकीं कोणतेंच वाईट असूं नये. निदान अगदीं किरकोळ, बेडौल, दुबळें असें तरी असूं नये.

हाताचीं इतर बोटें व्यवस्थित असलीं तरच एखादे वेळीं आंगठ्याचें एकादें पेरें कमकुवत असलें तर खपतें. म्हणजे इतर चारही बोटें एका बाजूस आणि एकटा आंगठा एका बाजूस अशी स्थिति आहे. आंगठ्यांचीं दोन्हीं पेरीं जर चांगलीं ठसठसीत असलीं, तर तळहातावरील वाईट रेषांपासूनहि भीतिचें कारण नाहीं. म्हणून अभ्यासूनें प्रथम आंगठ्याकडे लक्ष पुरवावें.

इतर बोटें लांबट, किरकोळ पण आंगठ्याचें पेरें लांब नसून थोकडें पण रुंदट असेल तर तेंहि चांगलें नव्हे; असा मनुष्य हेकट, दुराग्रही असतो. पण इतर बोटें सुदृढ असतील तर हा हेकटपणा आंगलट येत नाहीं. नखाचें पेरें इतर बोटाच्या मानानें फारच रुंद असेल इतकें कीं, आंगठा कुरूपच वाटेल, तर तो मनुष्य फार जहाल, भयंकर असतो. अशा आंगठ्याला **नागफणी** आंगठा म्हणतात. म्हणजे नखाचें पेरें नागाच्या फणीसारखे जाड व रुंद, आणि खालच्या पेऱ्याचा भाग बारीक, त्याचप्रमाणें इतर बोटेंहि त्या मानानें भरगच्च नव्हेत असें असेल तर **नागफणी** आंगठ्याचा इसम भयानकच सम-

जावा. तो कोणत्या वेळीं काय करील त्याचा भरवंसा नाहीं, येवढेंच लक्षांत ठेवावें; परंतु अशा माणसाच्या हाताचा तळवा जर टणक नसेल, तर मनुष्य भयंकर, पण त्याच्यापासून घातपाताचा संभव कमी.

नखाचें पेरें पाठीकडे म्हणजे नखाच्या बाजूकडे वळलेलें असलें, म्हणजे मनुष्य उधळ्या, चैनी असतो. खंक होऊन बसण्याइतकी उधळपट्टी करतो. परंतु जर खालचें पेरें व्यवस्थित असेल आणि इतर बोटांचे सांधे, पेरीं हीं ठीक असतील तर उधळपट्टी आवावयांत राहील. ह्या उधळपट्टीचा बोटांच्या मुळाशीं असलेल्या उंचवट्याशीं संबन्ध असतो.

ह्यावरून अभ्यासूच्या हें ध्यानांत येईल कीं, हातावरील रेषांइतकें व इतर बोटांच्याइतकें महत्त्व एकट्या आंगठ्याचें आहे. हातावरील रेषा तपासण्यास संधि न मिळाली तर नुसता हाताचा पंजाच दाबून पहावा व नंतर आंगठा तपासावा. त्याच्या दोन्ही पेऱ्यांपैकीं आखूड कोणतें लांबट कोणतें, कां दोन्ही आखूड किंवा दोन्ही लांब तें पहावें म्हणजे झालें. ह्या कामाला साधारणपणें दोन मिनिटें पुरे होतात. दोन्ही पेरीं आखूड तो आखूड आंगठ्याचा. विशेषेंकरून तळचें पेरें जर फारच किरकोळ किंवा आखूड असेल तर तो मनुष्य अपेशी ठरतो. कारण तो ऐनवेळीं गोंधळून जातो. त्याला प्रसंगावधान रहात नाहीं.

याच्या उलट दोन्ही पेरीं लांबलचक असतील तर मनुष्य आग्रही पण हिमतीचा, आर्जवशक्ति कमी त्यामुळें हुकुमबाज आणि आपल्याच बळावर भिस्त ठेवणारा असतो.



# रेखा-निदर्शन

तळहातावर ज्या रेषा स्पष्ट-अस्पष्ट, रेखीव, वाकड्या-तिकड्या, अशा अनेक प्रकारच्या दिसतात, त्यांसंबंधीं पाश्चात्य पद्धतीमध्यें कांहीं विशेष धोरण दिसत नाहीं. परंतु प्राच्यशास्त्रांत तें कांहीं तरी दिसतें. आंगठा आणि तर्जनी ह्यांच्यामधून निघून तळहातामधून **आडवी** जाणारी जी रेषा तिला पाश्चात्य ग्रंथांत "**शीर्षरेषा**" ( Line of Head ) असें नांव दिलें आहे, आणि करांगुलीच्या खालीं असलेल्या उंचवट्याच्या बाजूनें निघून तशीच वर तर्जनीच्या उंचवट्याच्याकडे जाणारी दुसरी जी **आडवी** रेषा तिला "**हृदय-रेषा**" म्हणजे Line of Heart म्हटलें आहे. शिवाय मनगटाच्या मध्यभागांतून निघून "**शीर्षरेषे**" च्या मूलस्थानाकडे जाणारी जी मुख्य रेषा तिला ते Line of Life असें नांव देतात. ह्याच तीन रेषा मुख्य महत्त्वाच्या आहेत. परंतु ह्यांमध्यें विभागणी कशी त्याचें तत्त्व पाश्चात्य ग्रंथांत नाहीं.

आपल्या ग्रंथकारांचें धोरण स्पष्ट आहे. मनगटावर एक आडवी-रेषा असते तिला "**मणिबन्ध**" रेषा म्हणतात. त्यामुळें रेषांचे दोन विभाग सोईवार झालेले आहेत. तळहाताच्या मधून ज्या रेषा जातात त्यांना "**तिर्यक्**" रेषा असें अन्वर्थ नांव आपल्या शास्त्र-कारांनीं दिलेलें आहे. आणि मणिबन्ध मूळांतून ज्या रेषा निघतात, त्यांना शास्त्रकार "**ऊर्ध्वरेषा**" म्हणतात. ह्याप्रमाणें **तिर्यक्रेषा** आणि **ऊर्ध्वरेषा** असे दोन विभाग केले म्हणजे सोय तर होतेच. शास्त्रांतील तत्त्वाचा थोडा उलगडाहि होतो. पाश्चात्य शास्त्रांत **उंचवटे** हा एक प्रकार आहे. त्यांना माउन्ट्स् (mounts) म्हणतात. हे **उंचवटे** प्रत्येक बोटाच्या मुळाशीं तळहाताच्या सीमेजवळ दिस-तात. हे वास्तविक पाहतां उंच, टणक असले तरच त्यांचें नांव सार्थ

होतें. आणि ते तसे असले म्हणजे शुभकारक असतात. ह्या उंच-वट्यांना आपल्या शास्त्रांत " उच्छ्राय " असें नांव आहे, परंतु त्यांना फारसें महत्त्व नाहीं. पाश्चात्य ग्रंथांत तर्जनीच्या ठिकाणीं " गुरु ", मधल्या बोटाच्या ठिकाणीं **शनि**, अनामिकेस **रवि**, आणि करांगुळींत बुध, आंगठ्याच्या मुळाशीं शुक्र, अशी ग्रहांचीं स्थानें मानलीं आहेत. हीं अशीं कां मानलीं तें कोणीहि पाश्चात्य ग्रंथकार सांगत नाहीं. अनुभवानें मानलीं असें म्हणावें तर असा कोणता अनुभव कीं तो " गुरूचाच " किंवा शनीचाच असला पाहिजे. म्हणून पाश्चात्य ग्रंथातील हा भाग चिंतनीय आहे.

## पूर्वाचार्यांची परंपरा

ह्या शास्त्रासंबंधानें आपल्याइकडील पूर्वीच्या विद्वानांनीं अनेक प्रकारचे जे शोध केलेले आहेत, त्यांचेंच फल आजचें सामुद्रिकशास्त्र हें होय. पाश्चात्यांचे जे आधुनिक शोध आहेत, ते आपल्याच शास्त्रानुरोधानें केलेले आहेत. पाश्चिमात्यांनीं आमच्याच शास्त्रांतील शोध समजाऊन घेऊन ते आपले म्हणून प्रसिद्ध केलेले असतात. अशा प्रकारचे खरे खोटे आक्षेप घेण्याचा शिरस्ता अलीकडे पडलेला आहे. म्हणून त्याबद्दलचा पुरावा देणें अवश्य आहे. **इंग्लंडमधील युरोपियनांपैकीं** 'Cheiro' ( कायरो ) हें टोपण नांव घेतलेले सामुद्रिकशास्त्रांत निष्णात आहेत. त्यांपैकीं एकाचें नांव स्टीफनसन् हें असून दुसरा ' कायरो ' हा उमराव घराण्यापैकीं आहे. तो लिहितो कीं, " मी हिंदुस्थानांत असतांना ह्या गूढ शास्त्रामध्यें प्राचीन काळापासून ज्यांच्या अनेक पिढ्यांत प्रावीण्य नांदत आहे अशी चोहोंकडे प्रसिद्धि अशा " जोशी " घराण्यांतील ब्राह्मण पण्डितांनीं मला त्यांच्या जवळील एक ग्रंथ पाहण्याची परवानगी दिली. ह्या पण्डितांशीं दृढपरिचय होण्याचें भाग्य मला लाभलें आणि त्यामुळें त्या पंडितांनीं मला तो ग्रंथ लक्षपूर्वक वाचून पाहण्याचीच

नव्हे तर त्यांतून उतारे करून घेण्याचीहि मोकळीक दिली. हल्लीं हिंदुस्थानची हेटाळणीच होते; परंतु त्या देशाचा जो कीर्तिप्रद प्राचीनकाळ त्या प्राचीनकाळींच हा अपूर्व ग्रंथ निर्माण झाला ".

" During my stay in India, I was permitted by some Brahmin Pandits descendants of the Joshi family–famous from time immemorial for their knowledge in occult subjects with whom it was my good fortune to become intimately acquainted, to examine and make extracts from an extraordinary book on the subject which they regarded as almost sacred, and which belonged to the great past of the now despised Hindustan.

ही अभिमानास्पद माहिती "कायरो" यानें कृतज्ञतापूर्वक नमूद करून ठेविली आहे. तेव्हां त्याबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाहीं. शिवाय ही हकीकत एका युरोपियनानें लिहिलेली आहे ह्या गोष्टीला अतिशय महत्त्व आहे. जे लोक दुसऱ्या राष्ट्रांतील कोणत्याही उत्कृष्ट गोष्टीलाही चांगलें म्हणण्यास तयार नसतात, त्यांच्यापैकीं एकानें प्रत्यक्ष अनुभवानें लिहिलेला अनुभव हें यांतील अभिमानास्पद वैशिष्ट्य आहे.



प्रकरण १६ वें

# प्राचीन ग्रंथांतील सामुद्रिक विचार

सामुद्रिक शास्त्राबाबतचे कांहीं श्लोक खालीं देत आहों.

अथातः संप्रवक्ष्यामि हस्तरेखाविचारणम् ।
दक्षिणे पुरुषं ज्ञेयं वामे वामकरे शुभम् ॥ १ ॥
शिवोक्तं तत्र सामुद्रं हस्तरेखाशुभाशुभम् ।
यस्य विज्ञानमात्रेण पुरुषो न हि शोचति ॥ २ ॥
यस्य मीनसमारेखा कर्मसिद्धिश्च जायते ।
धनाढ्यस्तु स विज्ञेयो बहुपुत्रो न संशयः ॥ ३ ॥
तुला ग्रामं तथा वज्रं करमध्ये च दृश्यते ।
तस्य वाणिज्यसिद्धिः स्यात्पुरुषस्य न संशयः ॥ ४ ॥
पद्मचापादिखड्गं च अष्टकोणादि दृश्यते ।
स्त्रियश्च पुरुषस्यापि धनवान् स सुखी नरः ॥ ५ ॥
शंखचक्रध्वजाकारो मालाकारश्च दृश्यते ।
सर्वविद्याप्रदानेन बुद्धिमान् स सुखी नरः ॥ ६ ॥
त्रिशूलकरमध्ये तु येन राज्यं प्रवर्तते ।
यज्ञे धर्मे च दाने च देवविप्रप्रपूजकः ॥ ७ ॥
शक्तितोमरबाणश्च करमध्ये च दृश्यते ।
रथचक्रध्वजाकारः स च राज्यं लभेन्नरः ॥ ८ ॥
अंकुशं कुंडलं चक्रं यस्य पाणितले भवेत् ।
तस्य राज्यं महाश्रेष्ठ सामुद्रवचनं यथा ॥ ९ ॥
गिरिकंकणयोनीनां नर मुंडघटादिकम् ।
करे वै यस्य चिन्हानि राजमंत्री भवेन्नरः ॥ १० ॥

रविचंद्रलतानेत्र अष्टकोण त्रिकोणकम् ।
मंदिरं गजअश्वानां चिन्हे धनसुखी नरः ॥ ११ ॥
अंगुष्ठोदरमध्यस्थो यवो यस्य विराजते ।
उत्पन्नभक्ष्यभोगी स्यात्स नरःसुखमेधते ॥ १२ ॥
मध्यमा तर्जनीमूले यवो यस्य प्रदृश्यते ।
धनवान् सुखभोगी स्यात् स नरः सुखमेधते ॥ १३ ॥

स्त्रियांचा डावा व पुरुषांचा उजवा हात पहावा, असें कांहींचें मत आहे; परंतु ही गोष्ट बरोबर नाहीं. स्त्री असो अगर पुरुष असो सामुद्रिक पाहतांना प्रत्येकाच्या दोन्ही हातांवरील रेषा व चिन्हें पाहून शुभाशुभ फलांचा निर्णय करावा. हाच शास्त्रोक्त फलनिर्णयाचा मार्ग आहे. हातांवरील रेषा व त्यावरून पहावयाच्या गोष्टी खाली दिल्याप्रमाणें:—

( १ ) **हाताच्या मध्यभागापासून मधल्या बोटापर्यंत** वर समोर जाणारी जी रेषा ती **धनरेषा किंवा भाग्यरेषा** होय. या रेषेवरून सांपत्तिक ऐश्वर्याचा बोध होतो.

( २ ) **हाताच्या मध्यभागापासून आंगठ्याकडे** जाणारी जी **रेषा ती आयुष्यरेषा होय.** या रेषेवरून आयुष्य, रोग, गंडांतरें, आजार वगैरे गोष्टी समजतात.

( ३ ) **करांगुली खालून, आंगठा** व त्याच्या शेजारचे बोटाचे मध्यभागीं जाणारी जी रेषा ती **अंतःकरणरेषा होय.** या रेषेवरून स्वभाव, आचारविचार, मनःस्थिति वगैरे गोष्टी समजतात.

( ४ ) **अंतःकरणरेषेच्या खालीं** तशीच जी आडवी रेषा दिसते, ती **मस्तकरेषा समजावी.**

( ५ ) **करांगुलीच्या खालीं असणाऱ्या** आडव्या रेषा प्रापंचिक सुख, विवाहयोग व कौटुंबिक सुख दर्शवितात.

( ६ ) मंगळ व चंद्र या दोघांचे स्थळामधील जागेत आडव्या रेषांवरून भावंडाचें सुख पाहण्याचा प्रघात आहे. त्याचप्रमाणें पराक्रम आणि यशाच्या गोष्टी पहाव्या.

( ७ ) रवीच्या स्थानावरील रेषांवरून बुद्धि व यश या गोष्टी पाहातात.

( ८ ) शुक्राच्या स्थानावरील रेषांवरून स्त्रीसौख्य, संतति यांचा विचार होतो.

( ९ ) गुरूच्या स्थानावर मान—सन्मान व ऐश्वर्ययोग कळतो.

कोणत्याही स्थानावर रेषा स्पष्ट व स्थान उठावदार असेल, तर त्यावरून होणाऱ्या गोष्टींचें फल सुखकारक मिळतें. तसें नसल्यास अशुभ. धनरेषा, आयुष्यरेषा वगैरे रेषा स्पष्ट उठावदार व दुसऱ्या कोणत्याहि छेदकारक रेषांनीं भंग न पावलेल्या अशा असल्यास त्या मनुष्यास सर्व प्रकारचें सौख्य मिळतें. व्यापारधंदा, नोकरी वगैरेंमध्यें यश व फायदा होतो. आंगठ्यावर यवाकार चिन्ह असल्यास यशस्वी होतो. धनरेषा व आयुष्यरेषा यांना वरच्या बाजूला बारीक अशा सूक्ष्म रेषा उत्कर्षकारक व भरभराट घडवून आणणाऱ्या असतात. खालच्या बाजूस असल्यास त्या गोष्टीसंबधी त्रास, कष्ट, नुकसान, अपमान असे प्रकार होतात. छेदकारक रेषा संकटें उत्पन्न करतात. आयुष्यांत केव्हां काय याचा निर्णय करावयाचा असेल तेव्हां संबंध रेषेला जर संबंध आयुष्य तर एक चतुर्थांश किंवा एक-अष्टमांश भागाला कोणता काल येतो हें पाहून निर्णय करावा. हातांवर शंख, चक्र, पालखी, त्रिकोण, चतुष्कोण, वज्र, सूर्य, मत्स्य, मंदिर वगैरे असल्यास तो मनुष्य श्रीमान् व संपन्न होतो. मात्र धनरेषा बलवान् पाहिजे हें केव्हांही लक्षांत ठेवावें.

( १ ) रवीचें स्थान उठावदार व एक किंवा दोनच स्पष्ट रेषांनीं युक्त असेल तर मोठ्या उच्च दर्जाच्या श्रीमान् लोकांची

मैत्री व भाग्य जोरदार असून सांपत्तिक सुख निरंतर मिळेल. आयुष्याच्या २२–२३ वर्षापासून उत्कर्षाला सुरुवात होईल व आयुष्याचा मध्यकाल फार सुखांत जाणार असें समजावें.

( २ ) चंद्राचें स्थान उठावदार असेल तर निष्काळजीपणा, जबाबदारी फारशी राहाणार नाहीं. चैनीच्या गोष्टी व ऐषआरामांत काल जाईल. त्यावर स्पष्ट रेषा असून ती धनरेषेला मिळत असेल तर स्वतंत्र उद्योगापासून लाभ चांगला होईल. तीच रेषा रवीच्या उंचवटयाकडे जाईल तर नोकरीमध्यें फायदा व अधिकारप्राप्ति असा काल २० ते २८ वर्षेपर्यंत. पुढें उत्तरोत्तर प्रगति, प्रवास व यात्रा पुष्कळ; परदेशगमन.

( ३ ) मंगळाचें स्थान उठावदार असल्यास धाडसाचीं कार्यें घडतील. महत्त्वाकांक्षी, तापट व स्वाभिमानी वृत्ति राहून उद्योगांत यश मिळवील. सर्वांवर छाप राहील. उतावळिपणा विशेष. मंगळावर स्पष्टरेषा अगर दुसरें एकादें चिन्ह असल्यास सत्ताधारी होतो. हाताखालीं नोकरचाकर राहातात. वाहनाचें सौख्य मिळतें. पण खर्चिक फार असतो. याचा भाग्योदय वय वर्षें २७ ते ४२ पर्यंत होतो.

( ४ ) बुधाच्या स्थानांतील श्रेष्ठ योगामुळें बुद्धीची तीव्रता राहून कोणत्याही कार्यांत त्याचें तेज चमकतें व पुढें येतो. बुद्धीच्या जोरावर सर्वांस आपलेसें करून यश मिळवितो. उंचवटयावर आडव्या तिडव्या बऱ्याच रेषा असल्यास स्वभाव भित्रा, पराधीन असतो. त्याचा भाग्योदय ३१ ते ३७ वर्षापर्यंत होतो.

( ५ ) गुरूचें स्थान उठावदार असल्यास त्यास सर्व प्रकारचें सुख मिळून स्वभाव शांत, ईश्वरनिष्ठ व दयाळू असतो. नेहमीं आनंदी राहतो. सज्जन लोकांची मैत्री, श्रीमंतीचा योग स्वपराक्रमानें येतो.

याचा भाग्योदय वयोवर्ष १७–१८ पासून सुरू होऊन ४५ ते ५४ हा काल अत्यंत महत्त्वाचा व सर्वश्रेष्ठ जातो. सर्वांत गुरूचें स्थान चांगलें असेल तर तो एखाद्या पेढीचा, संस्थेचा, कंपनीचा अगर ज्यांत पैशाची देवघेव व जबाबदारी जास्त असून मानसन्मान आहे व ज्यांत नोकरचाकर हाताखालीं आहेत. अशा संस्थेचा चालक असतो किंवा मोठा अधिकारी होतो. सार्वजनिक संस्थांत पुढारीपण मिळवितो, राष्ट्राधिकारी होतो.

( ६ ) शुक्राचें स्थान चांगलें असल्यास प्रापंचिक सौख्य फार चांगलें मिळतें. यावरून एकच रेषा, बुध, चंद्र अगर गुरूवर जाईल तर मोठा व्यापारी अगर श्रीमान होतो. राजाकडून अगर लोकांकडून मान मिळतो. सांपत्तिक भरभराट फार होते व आरोग्य राहतें. याचा भाग्योदय वय वर्षें २६ ते २८ पर्यंत उत्तरोत्तर होत जातो.

( ७ ) शनी हें स्थान उत्तम असल्यास तो बडा नोकरदार होतो अगर जमीनदार होतो व याचा भाग्योदय ३७ ते ५० वर्षेंपर्यंत होऊन आयुष्याच्या अखेरीस सौख्य मिळतें. कारखानदारांच्या हातावरही असाच योग असतो.

कोणत्याही ग्रहाचें स्थान चांगलें नसून अनेक बारीकबारीक रेषांनीं युक्त असल्यास वरील फलांच्या उलट फलें मिळतात, व त्या स्थानावरून समजणाऱ्या गोष्टींत क्लेश होतील.

हातांवरील रेषा ह्या जन्मापासून आयुष्याचे अखेरपर्यंत सर्वच्या सर्व जशाच्या तशा कायम असतात असें, कोणीही समजूं नये. कारण जन्मकालीं हातावर ज्या रेषा असतात त्यापेक्षां निराळ्या व नवीन अशा रेषा आयुष्यांत निरनिराळ्या वेळीं उत्पन्न होतात असा अनुभव आहे. ज्याप्रमाणें नवीन रेषा उत्पन्न होतात त्याचप्रमाणें हातावर असलेल्या कांहीं सूक्ष्मरेषा कालांतरानें लुप्त होतात असेंही दृष्टोत्पत्तीस येतें. सामुद्रिकतिलक ग्रंथांत असें स्पष्ट सांगितलें

आहे कीं, वयाच्या १६ ते २२ वर्षापर्यंत हातावरील रेषा व चिन्हें पूर्णत्वास जातात. या पूर्णत्वास येणाऱ्या रेषा मात्र आयुष्य अखेर-पर्यंत कायम असतात आणि त्यांचे परिणाम अखंड आणि जन्मभर राहतात. हातावरील महत्त्वाच्या रेषा ह्या कायम असतात, पण त्यांच्याशीं संबंध असणाऱ्या सूक्ष्म व तुटक रेषा मात्र कमजास्त होतात आणि त्यामुळेंच जन्मकालच्या हस्तरेषा आणि सुमारें २४।२५ वर्षांच्या वेळेच्या हस्तरेषा यांत तफावत पडते. ही गोष्ट कोणीही आपल्या हातावरील रेषांचें सूक्ष्म निरीक्षण नेहमीं केल्यास त्यास आढळून येईल.

प्रत्येक स्थानावरून निघणाऱ्या रेषा ऊर्ध्वगामी असतां त्यांचें फल उत्तम मिळतें.

कोणत्याही व्यक्तीच्या हस्तरेषा, त्यांचें मूलस्थान आणि त्या-वरील निरनिराळीं चिन्हें या सर्वांचा फार बारकाईनें विचार करून नंतर त्यासंबंधींचें फल सांगणें श्रेयस्कर होय. केवळ स्थानावरून फलें सांगितल्यास तीं सर्वस्वी बरोबर उतरणार नाहींत; कारण स्थानफल चांगलें असतांही जर त्याच्यावर एखादें चिन्ह असेल तर त्या फलाचा शुभाशुभ असा कमजास्तपणा होतो असा अनुभव आहे. हातावर कांहीं कांहीं रेषा अशा विलक्षण असतात कीं, त्या रेषांच्या उदयकालापासून अस्तकालापर्यंत त्या व्यक्तींची भरभराट होते व तो काल फार ऐश्वर्यांत जातो. आणि ती रेषा अस्तंगत झाली म्हणजे पुनः अडचणीचा, हीनतेचा व अनिष्ट प्रकारच्या काळजीचा काल येतो. ह्या अशा तऱ्हेच्या रेषा मंगळ, चंद्र आणि शुक्र यांच्या स्थानीं उत्पन्न होऊन त्यांची गति गुरूच्या, शुक्राच्या, रवीच्या किंवा बुधाच्या स्थानीं असते. जशा शुभदायक रेषा उत्पन्न होतात तशाच अशुभफलदायकही उत्पन्न होतात म्हणून दोन्ही हातांवरील रेषा पाहून शुभाशुभ फलाचा निर्णय करावा लागतो.

## सूक्ष्म दृष्ट्या ग्रहस्थानांचीं शुभ फलें.

रविः—राजासारखें ऐश्वर्य, मानसन्मानाची प्राप्ति, नौकरचाकर व सत्ता यांची प्राप्ति. विशेष अधिकार व द्रव्यलाभ, वडील भावंड ऐश्वर्यवान्.

चंद्रः—मनाची स्थिति उत्तम. परदेशांत कीर्ति, प्रवास अतिशय व त्यापासून फायदा. श्रीमान् लोकांची मैत्री, भगिनीसुख, धनवान्.

मंगळः—अचाट पराक्रम व धाडसी कामें, कॉन्ट्रॅक्टरच्या धंद्यांत यश, यांत्रिक कामांत तीव्रबुद्धि, अधिकारी व श्रेष्ठ प्रकारचा पुढारी.

बुध, गुरु, शुक्रः—विद्या व बुद्धि श्रेष्ठ, नांवलौकिक व कीर्तिमान, सांपत्तिक स्थिति जोरदार. स्वपराक्रमानें भाग्य उदयास आणणारा, आयुष्याच्या मध्यभागीं कमालीचा द्रव्यलाभ. स्त्री व संतति यांनीं युक्त. स्त्रीकडून फायदा, यशस्वी, निश्चयी, स्वावलंबी, ग्रंथकार व प्रसिद्ध.

शनिः—स्थावर इस्टेटीची प्राप्ति, वादविवादपटु, न्यायाधीश अगर वकील. स्वार्थसाधु, फटकून वागणारा, याचप्रमाणें उच्च फलें पुरुषांना मिळतील.

चंद्र, शनि व शुक्राचें स्थान वाईट असल्यास त्या मनुष्यास नेहमीं चिंताव्यग्रता व द्रव्याची आणि धंद्याची अडचण पडून वारंवार शारीरकष्ट होतात, सांपत्तिक स्थिति फारच कमकुवत राहाते. कोणत्याच प्रकारें समाधान नाहीं. प्रकृतीला वातविकारामुळें पीडा होते.

मंगळ, रवीचें स्थान वाईट असल्यास कोणत्याही महत्त्वाच्या व धाडसाच्या कार्यांत फारसें यश येत नाहीं, अडथळे व स्थीरता राहून अपमानाचे प्रसंग उद्भवतात, शारीरिक पीडा उष्ण विकारापासून होते व नेत्रांस त्रास होतो.

बुध व गुरु यांच्या अशुभ स्थानाचें फलही निर्धनता व काळजी असेंच आहे.

---

## प्रकरण १७ वें.



तुलनेच्या दृष्टीनें पाहिलें असतां पूर्वी आपण दोहोंकडील आयुष्यरेषेचा नीट विचार केला हें जरी खरें असलें, तरी रेषांच्या दृष्टीनें पाहिलें असतां त्या निरनिराळ्या दोन रेषांचें तें वर्णन झालें असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. व आतां त्याची दुरुस्ती करावयाची म्हणजे पुन्हां एकदां व्युत्क्रमाचा मार्ग स्वीकारला पाहिजे. म्हणजे पहिल्या खेपेस आपण जसा पाश्चात्त्यांच्या आयुष्यरेषेचा म्हणजे आपल्या आत्मरेषेचा व आपल्या आयुष्यरेषेचा म्हणजे त्यांच्या हार्ट लाइनचा विचार केला तसाच आतां अगोदर त्यांच्या हार्ट लाइनचा म्हणजे आपल्या आयुष्यरेषेचा व आपल्या आत्मरेषेचा म्हणजे त्यांच्या आयुष्यरेषेचा विचार करूं. म्हणजे मागील झालेली उलटापालट आपोआप नाहींशी होऊन त्यानंतर दोघांचाहि विरोध नाहीं अशा बाकीच्या रेषांचा तुलनात्मक विचार करण्यास पुन्हां पूर्वीप्रमाणें ठीक पडेल. तेव्हां आतां आपण पाश्चिमात्त्यांच्या अंतःकरणरेषेचा म्हणजे आपल्या आयुष्यरेषेचा विचार करूं.

### पाश्चात्य पद्धतींतील

## अंतःकरण रेषा (हार्ट लाइन)

जर ही अंतःकरणरेषा तांबूस, सरळ अशी असून गुरूच्या उंचवटयाजवळून निघून करांगुलीच्या पलीकडे हाताच्या अगदीं बाहेरल्या अंगापर्यंत गेलेली असेल व ती रुंद, फिकी, जाड व रक्तवर्णाची नसून उठावदार अशी असेल तर तें प्रेमळ स्वभाव, सदय अंतःकरण, आरोग्य आणि न्यायबुद्धीचें द्योतक होय. त्या रेषेच्या लांबीवर मनुष्याच्या प्रेमाचें प्रमाण मापतां येतें. ती जितकी लांब असेल तितका तो मनुष्य जास्त प्रेमळ असतो व आंखुड असल्यास निष्ठुर-

तेचें प्रमाण अधिक सांपडतें. जर ही रेषा गुरूच्या उंचवटयाऐवजीं शनीच्या उंचवटयावरून निघेल तर त्याचें प्रेम शुद्ध नसून कामुक असतें. जर ही अंतःकरणरेषा फार रेंखीव अशी आढळेल तर प्रेमातिरेकामुळें मत्सर उत्पन्न होऊन त्यापासून त्रास होतो. विशेषतः ह्याला चंद्राच्या उंचवटयाची जोड मिळाल्यास हे परिणाम जास्त अनुभवास येतात. जर ही रेषा सांखळीसारखी असेल तर तो मनुष्य अत्यंत नखरेबाज असतो आणि हातांतील इतर चिन्हें वाईट असून जर ही रेषा सांपडली तर ते हृद्रोगा (हार्ट पाल्पीटेशन) चें द्योतक होय. जर ह्या रेषेचा वर्ण तुकतुकीत तांबडा असेल तर तें जमदग्नीसारख्या अंतःकरणाचें द्योतक असतें. हीच रेषा जर फिकट, रुंद आणि सांखळीसारखी असेल तर तो पाषाणहृदयी व 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत्' अशा पंथाचा असतो. ही रेषा जर पिंवळी किंवा निळसर असेल तर तें यकृताच्या ( लिव्हर ) विकाराचें द्योतक होय. जर ही अंतःकरणरेषा मस्तकरेषेच्या अगदीं जवळून तिला समांतर अशी शेवटपर्यंत जाईल तर तें मत्सरी, लोभी, ढोंगी व दुस्वभावाचें द्योतक होय. जर ह्या आयुष्यरेषेला शनीच्या उंचवट्याखालून एकदम सुरवात झाली असेल व शाखा व कंटक व यांनीं रहित अशी असेल तर तें अल्पायुष्य व आकस्मिक मृत्यूचें द्योतक होय. जर ही रेषा फार बारीक अशी शेवटपर्यंत हातांतून गेलेली असेल तर तें निर्दयतेचें द्योतक असून कधीं कधीं खुनापर्यंत त्याची मजल जाते. जर ही रेषा नेहमींप्रमाणें गुरु व शनी यांच्या उंचवट्यांकडे न झुकतां सरळच पहिल्या व दुसऱ्या तर्जनी व मधलें बोट यांच्यामध्यें नाहींशी झालेली दिसेल तर तें कष्टमय दीर्घायुष्याचें द्योतक होय. जर ही अंतःकरणरेषा लांब असून त्याला शुक्राच्या कंकणाची व चंद्राच्या मोठ्या उंचवटयाची जोड मिळेल तर तो अकारण मत्सराला बळी पडणारा असतो. एखाद्याच्या हातांत जर ही अंतःकरणरेषा मुळींच नसेल

तर तें विश्वासघातकी व लफंगेपणाचें द्योतक समजावें आणि त्याची बुद्धी दुष्ट असते. त्याला जर चांगल्या आरोग्यरेषेची जोड मिळाली नाहीं तर त्याला हृद्रोग होतो आणि बाळपणांतच आकस्मिक, भयंकर असा मृत्यु येतो. ही रेषा जर बरेच ठिकाणीं भग्न झालेली असेल तर तो मनुष्य चंचल असतो व बहुधा हे लोक स्त्रीद्वेषी असतात. ही रेषा एकाच ठिकाणीं तुटलेली असल्यास तें मानसिक दौर्बल्याचें लक्षण समजावें. त्यालाच जर उंचवट्याची जोड मिळाली तर त्या त्या उंचवट्याच्या कमीअधिक बऱ्यावाईट, स्थितीप्रमाणें त्यांत प्रकार होतात. त्याला शनीच्या उंचवट्याच्या फाजील वाढीची जोड मिळाल्यास ती अपघाताची खूण समजावी. शनी व रवीचे उंचवट्याची समान फाजील वाढ झालेली असून जर अशा रेषेची त्याला जोड मिळाली तर तो मनुष्य मूर्ख असतो. नुसत्या रवीची व ह्या रेषेची जोडी असल्यास तो गर्विष्ठ असतो व ह्या रेषेला बुधाच्या उंचवट्याची जोड मिळाल्यास तें लोभी व मूर्खपणाचें द्योतक समजावें. जर ह्या रेषेला पुष्कळ लहान सहान आडव्या रेषा छेदीत असतील तर त्याचें यकृत व काळीज नाजुक असल्यामुळें ह्या दोन इंद्रियांचे त्याला नेहमीं उपद्रव होतात. म्हणजे त्याला ह्या विभागांच्या बिघाडामुळें शरीराला त्रास होतो. जर ही रेषा शेवटाला दुभंग होऊन ती तीन फाट्यांनीं गुरूच्या उंचवट्यावर जात असेल तर हें उत्तम लक्षण समजावें. कारण तें संपत्ति व उत्तम दैवाचें द्योतक असतें. कोणताहि फांटा जरी ह्या गुरूच्या उंचवट्यावर जात असला तर तें शुभ लक्षण समजावें. इतकेंच नव्हे तर हे फांटे जरी गुरूच्या व शनीच्या बोटांमध्यें जात असले ( तर्जनी व मधलें बोट ) तरी देखील ते संपत्ति मिळवून देतात. परंतु ती संपत्ति धीरे धीरे मिळते. परंतु जर ह्यांतील एक फांटा गुरूचे उंचवट्यावर व एक शनीचे उंचवट्यावर जाईल तर मात्र त्याला अप-

यश येतें. त्याच्या हातून बऱ्याच चुका होतात व तो धर्मभोळा असतो. जर ही रेषा गुरूच्या उंचवटयावर फांटयाशिवाय उथळ अशी असली तर मनुष्याला दारिद्य येण्याची फार भीति असते. जर ही रेषा करांगुलीच्या खालच्या बाजूस वरलिप्रमाणें आढळेल तर ती अपयश देते. ह्या गुरूवरचे फाटे मनुष्याला उत्साह व जोम देतात. जर ही रेषा अथपासून इतिपर्यंत शाखारहित असेल तर तो प्रेमळ नसून निष्ठुर असतो. जर धनरेषा फार चांगली नसून ही अंतःकरणरेषा तर्जनीला नुसता स्पर्श करीत असेल तर हातीं घेतलेल्या सर्व कृत्यांमध्यें त्याला अपयश येतें. त्या रेषेवर जर एक खोल ओरखड्यासारखी आडवी रेषा असेल तर त्याचा मेंदू विकृत असतो. जर ही रेषा तर्जनीभोंवतीं वळसा घालीत असेल, तर अशा माणसांची उपजतच गूढ विद्यांत गति असते व त्या त्याला लवकर अवगत होतात. जर ही रेषा गुरूच्या किंवा शनीच्या उंचवटयाचे खालीं मस्तकरेषेला मिळत असेल तर ती अपघातानें आकस्मिक रीतीनें मृत्यु येईल असें सुचवितें. पण ही खूण दोन्ही हातांवर पाहिजे. ( हा पाश्चात्त्यांचा अपघाताचा नियम व आपल्या शास्त्रकारांनीं "सा नम्रा चेदधोभागे" हा दिलेला नियम एकच असून दोघेहि अपघातच सांगत आहेत. ) जर ही रेषा अंतःकरणरेषेकडे झुकलेली असून तिच्या टोकाला कात्रीसारखे दोन फाटे असतील तर ते विवाहापासून अत्यंत त्रास किंवा अंतःकरणाला उद्वेग येईल असा मानसिक त्रास ह्याचें दर्शक होत. जर स्त्रीचे हातांत एक फाटा आयुष्यरेषेंतून निघून अंतःकरणरेषेस छेदून शनीचे उंचवटयाखालीं येईल तर तो अत्यंत वाईट समजावा. कारण तो प्रसूतीमध्यें अत्यंत धोके देतो. केव्हां केव्हां तर प्राणघातापर्यंत मजल जाते. जर चतुष्कोणांतून रेषा निघून त्या अंतःकरणरेषेला छेदीत असतील तर तें शास्त्र, संशोधन, जिज्ञासा, ह्याचें दर्शक असतें; पण बहुधा त्याचे

हातून कांहींएक न झाल्यामुळें तो माणूस शेवटीं कुचकामी ठरतो. जर त्या अंतःकरणरेषेपासून एकदम थांबण्यासारखी एक वक्र रेषा निघून चंद्राचे उंचवट्यावर जाईल तर अशी रेषा हातावर असल्यास तें खुनीवृत्तीचें व प्रवृत्तीचें निदर्शक असतें. ह्याप्रमाणें पाश्चात्त्यांच्या अंतःकरणरेषेचें स्वरूप व फलें दिलेलीं आहेत. ह्या रेषेच्या स्वरूपाची तुलना केली असतां पौर्वात्यांचें व पाश्चात्यांचें दिलेलें स्वरूप अगदीं तंतोतंत जुळतें. हिचा वेलीसारखा शाखायुक्त ( आसेंडिंग ॲन्ड डिसेंडिंग ब्रांचेस ), सकंटक ( फोर्क्ड ), भग्न ( ब्रोकन ), खालीं झुकलेली ( टर्न्ड डाऊन ) वगैरे तिचीं दिलेलीं सर्व स्वरूपें अगदीं तंतोतंत जुळत आहेत. फलाच्या दृष्टीनेंहि विचार केल्यास ह्या रेषेवरून दोघेहि अपघात, अपमृत्यु सुचवितात. अशी स्थिति असून मात्र दोघांमध्यें वर सांगितल्याप्रमाणें विरोध आहे. असो.

आतां आपण आपल्या आत्मरेषेकडे वळूं. परंतु ह्या रेषेचा आपल्याकडे स्वतंत्र विचार केला नसून स्त्रीरेषा व पुरुषरेषा ह्या दोहोंचा मिळून संकलित विचार केलेला आहे. त्याचें कारण ह्या दोन्ही रेषा स्त्रीपुरुषांच्या अथवा दंपत्याच्या रेषा असें आपल्याकडे समजतात व त्याला अनुरूप असाच फलनिर्देष दिलेला आहे. स्त्रीरेषेवरून पित्याचा विचार करतात, म्हणून तिला पितृरेषा व पुरुषरेषेवरून मातेचा विचार करतात म्हणून तिला मातृरेषा अशीं यांनाहि दुसरी नांवें कांहीं जणांनीं दिलेलीं आहेत. परंतु ज्या श्लोकांत हें वर्णन दिलेलें आहे, तेथें अमुक पित्याची व अमुक मातेची रेषा समजावी असा खुलासा नाहीं. पण स्त्रीरेखा कोणती व पुरुषरेखा कोणती हें मात्र स्पष्ट सांगितलें आहे.

**अंगुष्ठ करमध्यें तु रेखा ऋज्वायता भवेत्**
**संपूर्णहस्तपर्याप्ता सा सीमा पौरुषे स्मृता**
**अंगुष्ठानामिकामध्ये तेजसांतःप्रसारिणी**
**वायव्यंतप्रसमरा स्त्रीसीमा भागरूपिणी**

अंगठा आणि हात यांच्या मधून निघून जी ठळक व सर्व हात-भर रेषा असते तिला पुरुषरेषा म्हणतात व अंगठा आणि अनामिका ह्यांच्यामध्यें वायव्याग्नेय जाते तिला स्त्रीरेषा म्हणतात. ( साधारण-पणें ही स्त्रीरेषा हेड लाइन इतकीच लांब असते व तिचा नेहमींचा झोंकहि त्या दिशांकडे असतो ) तेव्हां या दोन श्लोकांवरून स्त्रीरेषा कोणती व पुरुषरेषा कोणती हें स्पष्ट सांगितलें आहे. आणि असा खुलासा त्याच्या उलट नावें दिलेल्या पितृमातृरेषांसंबंधानें नाहीं. आतां याचीं फलें पुढीलप्रमाणें आहेत. परंतु त्यांत दोन विभाग केले पाहिजेत. एक श्लोकावरून निघणारा अर्थ व दुसरा टीका-कारांनीं ( त्याला कांहीं दुसरा मिळाला असल्यास त्या आधारावर ) केलेला विस्तार होय. प्रथम आपण सरळ अर्थ देऊं आणि मग त्याचा टीकार्थ देऊं.

तयोःसंगे हि दांपत्यं वियोगे तु वियोगता
पुंप्रजा पौरुषाधिक्ये स्त्र्याधिक्ये स्त्रीप्रजास्मृता
यदन्यतरसंपृक्तिस्तथैव व्यभिचारिता।
विच्छेदे तु पुनः कर्म वत्यंतम कृतं भवेत्
मालिन्ये रोगबाहुल्यं शैथिल्येत्वमभंगता
वैवाहिकफलं चैव सीमा रेखाद्वयोद्भवम्

ह्या स्त्रीपुरुषरेषा जर अंगठा आणि तर्जनी यांच्यामध्यें नीट जुळलेल्या असल्या, तर त्या जोडप्यांत चांगलें प्रेम असून तें शेवट-पर्यंत टिकतें व त्या जुळलेल्या नसल्या तर त्यांचें प्रेम रहात नाहीं. पुरुषरेषा जर स्त्रीरेषेच्यापुढें गेलेली असली ( अधिक लांब असली ) तर पुरुषसंतति अधिक होते व स्त्रीरेषा अधिक असल्यास कन्यासं-तति जास्त होते व दोन्ही सारख्या असल्यास संतति समप्रमाणांत असते. ( पण टीकाकारांनीं अशी स्थिति असतां मुळींच संतति नसते

असें सांगितलें आहे. ) जर ह्या रेषा इतर रेषांनीं व्याप्त असल्या तर ते व्यभिचारी असतात. ( स्त्रीरेषा व्याप्त असल्यास स्त्री, पुरुषरेषा व्याप्त असल्यास पुरुष कुमार्गी असतो असें समजावें. ) तसेंच ह्या रेषा इतर रेषांनीं व्याप्त असल्या तर याचा अर्थ असा घ्यावयास पाहिजे कीं, ज्या ठिकाणीं ह्या रेषा ( तर्जनी व अंगठा ) एकमेकांस मिळतात, तेवढाच भाग घ्यावयाचा. शिवाय ह्या रेषा एकमेकांशीं अलग असल्याशिवाय हें फल अनुभवाला येणार नाहीं. कारण त्या जर एकत्र असतील तर पुरुषरेषा व स्त्रीरेषा ओळखणें मुष्किलीचें होईल व दोन्ही रेषा विलग धरल्या म्हणजे त्यांत रहाणारी जागा इतर बारीक रेषांना व्यापण्यास सापडेल व त्या कोणत्या रेषेस व्यापतात हेंहि ओळखितां येईल. जर ह्या रेषा तुटलेल्या असतील तर दोन विवाह होतात. ह्या रेषा अस्पष्ट असल्यास रोगी असतो व वेडीवांकडी असल्यास विकलगात्र होतो. ह्याप्रमाणें ह्या दोन्ही रेषांचीं फलें आहेत. टीकाकारांनीं ह्या रेषेवरून आणखी पुढील निष्कर्ष काढला आहे. ह्या दोन्ही रेषांस दुसऱ्या आडव्या रेषांचा संबंध असून त्यांत तुटक रेषा असल्यास त्यांचा विवाह होणार नाहीं व झाला तरी उपयोग होणार नाहीं. पुढें गेलेल्या रेषेस कात्री असल्यास संतति भग्न होते ( म्हणजे जगत नाहीं ). फांटा असल्यास दत्तक संतति जगेल. तुटक असल्यास परसंतति असते. स्त्री-पुरुषरेषामध्यें कात्री असल्यास विवाहसुख नसतें. पुरुषरेषेस कात्री असल्यास त्याची स्त्री वाममार्गी असते. पुरुषरेषा विच्छिन्न झाली असल्यास त्याची स्त्री विधवा होते व पुनर्विवाह लावते. स्त्रीचे हातांत पुरुषरेषा स्त्रीरेषेंत मिळाली असल्यास तिचा नवरा बाहेरख्याली असतो. ही मिळालेली रेघ शेवटपर्यंत असल्यास सवत असते, विच्छिन्न असल्यास ती अल्पायु असून तिचा पति दुसरा विवाह करतो. ह्याप्रमाणें विवाहफलें दिलीं आहेत. त्याशिवाय पितृरेषा संपूर्ण असल्यास

चांगलें व ती अर्धी असल्यास वाईट सांगितलें आहे. ह्यापेक्षां आपल्या शास्त्रकारांनीं ह्या रेषेबद्दल विशेष विवेचन केलें नसल्यामुळें येथेंच आपल्याकडील स्त्रीपुरुषरेषांचा विचार संपला, म्हणजे आपल्या पद्धतीनें पहिल्या तीन रेषांचा व पाश्चत्यांच्या दोन रेषांचा विचार संपला; तेव्हां पाश्चात्य पद्धतीप्रमाणें ज्या तिसऱ्या म्हणजे मस्तक-रेषेचा विचार करावयाचा राहिला आहे तिचा आपण विचार करूं.

---

## पाश्चात्त्य पद्धति

## शीर्षरेषा ( हेड लाईन )

ही रेषा तिच्या आरंभासच अंगठा व तर्जनी ह्यांमध्यें मिळालेली असली पाहिजे. नंतर रंगदार, स्पष्ट शाखारहित, न तुटलेली आणि सीधी अशी निघून चंद्राचे उंचवट्याचे माथ्यावर जाणारी अशी असली म्हणजे अक्कल, सारासार निवड करण्याची शक्ति, हुषारी व उत्तम प्रकारचें मनःसामर्थ्य देते. ही रेषा रुंद किंवा फिकट असल्यास मनुष्य दुर्बळ व निर्बुद्ध असतो. ही रेषा आंखूड म्हणजे मंगळाच्या प्रदेशापर्यंत असल्यास त्याच्या कल्पना पुष्कळ असून तो चंचल असतो. ही जर शनीचे उंचवट्याखालीं संपत असेल तर तें लहान वयांत अकस्मात मृत्यू येण्याचें चिन्ह समजावें. ही रेषा सांखळी-सारखी असल्यास त्यांचीं मतें अनिश्चित असून बुद्धि अशाश्वत असते. ही रेषा लांब व फार बारीक असल्यास तें विश्वासघातकीपणा व धर्मभ्रष्टता यांचें द्योतक होय. तसेंच ही रेषा विषम म्हणजे जाड बारीक अशी असून पीळ घातल्यासारखी व वाईट रंगाची अशी असल्यास त्याचें यकृत ( लिव्हर ) अशक्त असून त्याच्या अंगांत पाणी नसतें. असले लोक बहुधा लोभी असतात. ही रेषा लांब असल्यास या मनुष्याच्या वागणुकींत वैशिष्ट्य असतें. पुष्कळ आडव्या उभ्या

रेषांनीं आच्छादिलेल्या हातांत जर ही रेषा लांब असली तर तो आत्मसंयमी, अडीअडचणी अथवा संकटाचे वेळीं शांतवृत्ति असणारा, आणि आडव्याउभ्या रेषांनीं उत्पन्न होणाऱ्या विचार-तरंगांतून मुख्य तें सार निवडून काढण्याची पात्रता ज्यांत असते अशा खंबीर डोक्याचा (मेंदूचा) तो असतो. ही रेषा जर फार लांब असली म्हणजे तळव्याच्या दुसऱ्या टोंकाला पोंचलेली असली तर तो फाजील विचारी व हिशेबी असून क्षुद्र व फार लोभी असतो. अशा रेषेच्या माणसाचा हात जर मऊ असला किंवा गुरू आणि रवी यांपैकीं एकाची फाजील वाढ झालेली असल्यास त्याच्या चिक्कूपणास बराच आळा पडतो. जर ही रेषा आयुष्यरेषेला मिळण्याच्या ऐवजीं शनीच्या उंचवट्याखालून निघेल तर त्या मनुष्याची बुद्धि प्रौढ वयांत परिपक्व झालेली असून त्याचें शिक्षण उशीरां झालेलें असतें असें खात्रीनें समजावें. किंवा ही शीर्षरेषा व आयुष्यरेषा या दोन्हीहि आखूड असल्या तर तें आकस्मिक मृत्यूचें लक्षण समजावें. अंतःकरणरेषा बारीक व आखूड असून जर ही रेषा मंगळाचे उंचवट्याकडे गेलेली असेल तर स्वतःच्या धोरणाच्या (हिशेबाच्या) चुकीमुळें त्याला नेहमीं संकटाशीं व अडीअडचणीशीं झुंजावें लागतें. परंतु जर त्याला उत्तम धन-रेषेची जोड मिळाली तर वरील संकटें बरींच कमी होतात. असले लोक बहुधा उदार असतात. परंतु तें औदार्य जेणेंकरून स्वतःच्या मनाला संतोष वाटेल अशाच ठिकाणीं असतें आणि तें नेहमीं व्यवहारापेक्षां ,पढीक ज्ञानाला धरून असतें. ही रेषा अंतःकरणरेषेच्या अगदीं जवळ नसावी, त्यांत नियमित अंतर असावें. तसें नसून ती शेवटपर्यंत अंतःकरणरेषेच्या अगदीं जवळून गेलेली असल्यास तो हृदय-रोगी असतो. वाचकांनीं पक्कें लक्षांत ठेवावें कीं, जर ही रेषा चांगली असली तर ती हातांतील इतर वाईट चिन्हांचा होणारा दुष्ट

परिणाम टाळते. आणि त्या शीर्षरेषेला मंगळाच्या उंचवटयाची जोड मिळेल तर हें दोहोंचें मिश्रण त्या व्यक्तीला उत्साह, चिकाटी, आवांका व वाईट गोष्टीच्या दुष्परिणामाबरोबर झगडण्याचें सामर्थ्य येतें. जर ही रेषा शनीचे उंचवटयाखालीं एकदम थांबेल तर तें बुद्धिमांद्याचें व तारुण्यांत मृत्यूचें चिन्ह समजावें. रवीच्या उंचवटया-खालीं थांबल्यास तो अनिश्चित स्वभावाचा व मताचा असतो. जर ही रेषा आरंभालाच आयुष्यरेषेला किंचित् चिकटलेली असून तळ-हातांत जाण्याचे पूर्वींच जर वेगळी झालेली असेल तर तो मनुष्य भित्रा असून त्याला आत्मविश्वास नसतो. आणि ह्या दोन अवगुणांमुळें त्याचें आयुष्य फुकट जातें. हातांत इतर रेषा चांगल्या असून जर ही रेषा वरीलप्रमाणें सांपडली तरी देखील हे दुर्गुण आपला अंमल बसविल्याखेरीज रहात नसल्यामुळें त्याला जगामध्यें आपल्या बुद्धि-सामर्थ्याचें तेज दाखवून यश संपादन करण्यास फार कठीण जातें. जर ही रेषा माथ्यावर बारीक ( इंच अर्धा इंच लांबीपर्यंत ) असेल तर तो मज्जातंतु विकारी असतो किंवा अशा तऱ्हेचे रोग त्याला होतात. जर ही रेषा प्रारंभापासूनच आयुष्यरेषेपासून अलग असून नीट सरळ जात असली तर तें बुद्धिमत्ता, आत्मविश्वास आणि स्वतःच्या इच्छेप्रमाणें वागणारा ह्याचा दर्शक असून ह्याला लांब अंगठ्याची जोड मिळाली तर महत्त्वाकांक्षेची त्यांत भर पडते. ही रेषा अशीच आयुष्यरेषेपासून वेगळी असून आंखूड व बिघडलेली असल्यास निष्काळजीपणा, मात्सर्य व फसवेगिरीचें द्योतक असतें. बहुधा अशा लोकांची रेषा बिघडलेली असते. जर ही रेषा वरील-प्रमाणेंच अलग असून शाखा किंवा इतर दुसऱ्या चिन्हांनीं जुळलेली असेल तर तें दुष्ट व लहरी स्वभावाचें लक्षण समजावें. जर ह्या रेषा कातरीनीं जुळलेल्या असतील तर तें संसारसुख लागूं देत नाहीं. हातांत इतर चिन्हें चांगलीं असून देखील जर ही खूण असेल तर त्यांची

वागणूक रीतीभातींना सोडून असते व कोणत्याही गोष्टीचा झट्दिशीं निकाल देण्याची त्याला खोड असून त्याच्या त्या निकालांत बहुधा चुक्या असतात. त्यालाच जर शनीमंगळ यांच्या उंचवटयांच्या फाजील वाढीची जोड मिळेल, तर तें अदूरदर्शित्वाचें व धिटाईचें द्योतक असतें. परंतु ही वाढ जर मर्यादित असली तर त्याची नटांना ( काम करणाऱ्या माणसांना ) मदत होते. कारण त्याची ह्या लोकांना अवश्य असणारें धारिष्ट व उत्साहादि गुण वृद्धिंगत करण्याची शक्ति व मुद्देसूद भाषण करण्याची शैली व आत्मविश्वास ह्यांची जोड करून देण्याचें सामर्थ्य ह्या चिन्हांत असतें. जर ही अशीच अलग रेषा लांब असेल तर त्याची वागणूक अव्यवहार्य असते व अत्यंत घाइघाईनें बोलण्याची त्याला संवय असल्यामुळें तें समजण्याला त्रासदायक असतें.

जर ही रेषा सरळ चंद्राचे उंचवट्याचे माथ्यावर किंवा मंगळाच्या उंचवट्याच्या पायथ्याशीं न जातां थोडीशी वांकडी होऊन चंद्राचे उंचवट्यावर येईल तर तें कल्पनातरंग व मनोराज्याचें द्योतक असून, त्याला आयुष्याच्या इतिकर्तव्यतेची खरी जाणीव नसते. ही रेषा जर चंद्राचे उंचवट्यांत बरीच लांबपर्यंत घुसलेली असेल तर तो रहस्य शोधणाऱ्यामागें असतो. जर दोन्ही हातांत ह्या रेषेनें आरोग्यरेषा छेदलेली असेल, तर त्याच्या ह्या नादाचें पर्यवसान वेडांत होण्यापर्यंत जातें. हातांतील इतर चिन्हें चांगलीं असून जर ही रेषा चंद्राचे उंचवट्यावर आली असेल तर तें काव्यशक्ति, गूढशास्त्रांचें संशोधन, धर्मभोळेपणा, आणि परमार्थप्रवृत्तीचें द्योतक असतें. जर चंद्राचा उंचवटा रेघांनीं व्याप्त असेल तर त्याची वाङ्मयांत उत्तम गति असते. ही रेषा चंद्राच्या उंचवट्यावर आली असतांना बहुधां त्या माणसाला वेड लागण्याचा फार संभव असतो आणि बहुधा हें वेड आनुवंशिक असून तें टाळणें दुरापास्त असतें.

तसेंच ही रेषा ज्या ज्या उंचवटयाकडे झुकलेली असेल त्या त्या प्रमाणें त्याचे विचार असतात. जर ही रेषा बुधाचे उंचवटयाकडे झुकलेली असेल, तर त्याचा नैसर्गिक कल व्यापाराकडे असून त्यांत तो चांगलें नशीब काढतो. जर रवीचा उंचवटयाकडे झुकलेली असेल तर कीर्ति मिळविण्याची त्याची नेहमीं धडपड चाललेली असते. जर ही रेषा बुध आणि रवि ह्या दोन उंचवटयांच्यामध्यें घुसलेली असेल तर शास्त्रशुद्ध पद्धतीनें तो कलेमध्यें प्रावीण्य मिळवितो; परंतु ही रेषा थेट एखाद्या उंचवटयावर गेलेली असल्यास वरील गुणांचा त्यांच्या ठिकाणीं नुसता आभास असतो. उदाहरणार्थ, गुरूच्या उंचवटयावर गेलेली असल्यास ती गूढविद्या; रवीवर कला व शनीवर धर्मवेडाचें दर्शक असतें. जर ही रेषा अंतःकरणरेषेकडे वळलेली असली तर तो मनाचा दुबळा असल्यामुळें, त्याच्या सारासारविचार शक्तीवर इतर विकारांचें जास्त प्राबल्य असतें. जर ही रेषा अंतःकरणरेषेस स्पर्श करील तर तें अल्पायुत्वाचें द्योतक असतें. जर ही रेषेस छेदून शनीचे उंचवटयावर जात असेल ( संपेल ) तर डोक्यास जखम ( आघात ) होऊन मृत्यु येतो आणि ह्याचा अनुभव घेऊन पाहतां बरोबर आला. जर ही रेषा अंतःकरणरेषेंत मिळून त्या पुढें जोरानें जातील तर त्याचें एकाद्या व्यक्तीशीं अत्यंत प्रेम जडून प्रेमातिरेकामुळें त्याचें पर्यवसान वेडांत होतें. जर ही रेषा आंगठयाकडे झुकलेली असेल तर तो फाजील आत्मविश्वासी असतो व त्यामुळें स्वतःवर संकटें ओढून घेतो. ही रेषा भग्न झालेली असेल तर ती डोक्यास जखम दाखविते. मधल्या बोटाखालीं तुटलेली असून तुटलेलें अग्र जर लोंबतें असेल तर वरील अनुभव हटकून आलाच पाहिजे; पण ह्याला जर हातावरील इतर वाईट चिन्हांची जोड मिळेल, तर ही खूण हातावर जरी असली तरी तो फांशीला जातो किंवा त्याचें डोकें कोणत्या तरी कारणानें नाहींसें होतें. जर ही रेषा बऱ्याच ठिकाणीं

तुटलेली असली तर त्याला डोकेंदुखीची व्यथा असते व त्यामुळें त्याची स्मरणशक्ति व विचारओघ ही दोन्ही नाहींशीं झालेलीं असतात. जर ही रेषा आरंभापासून शेवटपर्यंत भेगाळल्यासारखी असली व इतर वाईट चिन्हांची त्याला जोड मिळाली, तर तें हटकून वेड लागण्याचें लक्षण होय; पण जर ह्या रेषेला रेखायुग्माची (सिस्टर लाईन) जोड मिळेल तर तें उत्तम नशिबाचें व वडिलार्जित इस्टेटीचें द्योतक होय. जर ह्या रेषेला शेवटाला फांटे फुटून त्यांपैकीं एक फांटा चंद्राचे उंचवटच्यांवर गेलेला असेल तर तें खात्रीनें ढोंग, लबाडी, आणि फसवेगिरीचें लक्षण समजावें. जरी अशा माणसाच्या हातांतील इतर लक्षणें चांगलीं असलीं तरी तो ठक असून वेळ मारून नेण्याला लागणाऱ्या फसवेगिरीच्या बौद्धिक साधनसामुग्रीचा त्याचे जवळ भरपूर पुरवठा असतो. ह्या फांट्याला जर आखूड नखांची जोड मिळेल तर त्याला दुसऱ्याच्या भाषणास विरोध करण्याची व आपलें मत प्रतिपादन करण्याची हौस असते. जर ह्या रेषेच्या फाट्यांत आणखी धुमारे फुटून त्यांपैकीं एक धुमारा हाताच्या एका टोंकापर्यंत व दुसरा धुमारा थेट मनगटाला जाऊन पोंचेल तर त्याला उपजत कवित्व व त्याचें मर्म जाणण्याची पात्रता असते व त्याच्या काव्याची व्यवहारांत उपयुक्तता सिद्ध करून देण्याचें त्याच्यांत सामर्थ्य असतें. (पोवाडे, लावण्या वगैरे कविता करून जे लोकांच्या मनोवृत्ति उचंबळवितात असे शाहीर वगैरेसारखे कवि). जर ह्या फांटायुक्त रेषेला रवीच्या रेषेची जोड मिळाली तर तो माणूस दूरदृष्टी व साधकबाधक प्रमाणाशीं विचार करणारा असतो. जर ह्या दोन फाट्यांपैकीं एक चंद्रावर व एक अंतःकरणरेषेवर जाईल तर तो प्रेमाकरितां सर्वस्वाचा त्याग करतो. ही रेषा अशीच असून जर धनरेषा अंतःकरणरेषेपाशीं

येऊन थांबत असेल तर मग ह्यांत विशेषच भर पडते. जर ही शीर्ष-रेषा इतर लहान लहान रेषांनीं छेदली गेलेली असेल तर तें अल्पायुत्वाचें लक्षण समजावें. हेंहि आयुष्य नेहमीं डोकेंदुखी व इतर दुखण्यांनीं व्याप्त असें असतें. जर ह्या शीर्षरेषेच्या मधोमध लहान रेषांचें जाळें असेल तर तो अप्रामाणिक असतो. जर ह्या रेषेच्या माथ्यावर कात्री असेल तर मृत्यू जवळ आला आहे असें समजावें. ह्या ठिकाणीं ही रेषा तुटलेली असल्यास ती डोक्यास भयंकर जखम दाखविते.

## प्रकरण १८ वें



# धनरेषा-विवेचन

जर ही रेषा गांठाळ असेल तर खून करण्याकडे प्रवृत्ति असते; पण ही गांठ जर फिकट असेल तर ती भूतकालवाचक परिणाम दाखविते व ती जर तांबडी आणि खोल असेल तर ती भविष्यकालीन प्रवृत्तीची द्योतक समजावी. जर ही रेषा रश्मिजालासारखी असली तर तो मनुष्य सुस्वभावी व सज्जन असतो. जर ह्या शीर्षरेषेपासून एक रेषा निघून तर्जनीपर्यंत जाईल तर तो फाजील घमेंडखोर व गर्विष्ठ असल्यामुळें दुसऱ्याचे मनांतून उतरतो. तसेंच ही रेषा जर धनरेषेला मिळेल तरीहि तें वाईट लक्षण समजावें. याप्रमाणें या तिन्ही रेषांबद्दल दोघांची वरीलप्रमाणें अनुमानें आहेत. आतां ह्या मुख्य रेषांपैकीं ज्या एकच रेषेचा विचार राहिला तिचा व इतर दुय्यम प्रतीच्या रेषांचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

या जगामध्यें जीवित्वाच्या खालोखाल वित्ताचें महत्त्व असल्यामुळेंच " प्रपंचीं वित्त " ही म्हण पडली आहे. कारण जीवित व वित्त हीं प्रपंचाच्या गाड्याचीं दोन चाकेंच होत. प्रपंचांत प्रथम

आयुष्याची अत्यंत जरूरी असते व देवानें तें दिल्यास पुढें या जगाची यात्रा सुखानें होण्यास धनाची फार अवश्यकता असते, अर्थात तें धन नसल्यास मनुष्याचें सर्व आयुष्य निर्माल्यवत् होतें. " धनरेषा " ही, मुख्यत: द्रव्य मिळेल कीं नाहीं याची निदर्शक असल्यामुळें हातामध्यें आयुष्याचे खालोखाल ही धनरेषाच महत्त्वाची धरली पाहिजे. तेव्हां अशा ह्या व्यवहारोपयोगी महत्त्वाच्या रेषेचा आपण सविस्तर विचार करूं.

## धनरेषा विचार ( पौर्वात्य पद्धति. )

करमूलं समारभ्यस्त्र्यायुष्यांसोर्ध्वमूर्छिता
मध्यमानामिका संधिप्रापिकाऋजुरेखिका

मनगटापासून एक रेषा निघून स्त्रीरेषा व आयुष्यरेषा यांच्यावरून मधलें बोट आणि अनामिका या. दोहोंच्या संधीमध्यें ( या दोन बोटांमध्यें ) जी रेषा येते, तिला धन-जीवन-रेषा असें म्हणतात. अशी हिची एक व्याख्या असून तिची दुसरी व्याख्या पुढीलप्रमाणें आहे:—

रेखाया मणिबंधोत्था गतामध्यांगुलीकरे
गतापाणितले या च योर्ध्व पाणितलें स्थिता
स्त्रीणां पुंसां तथा साम्यं राज्याय च सुखाय च

तळहातावर मनगटापासून निघून सरळ थेट मधल्या बोटावर जाणारी जी ऊर्ध्व म्हणजे उभी रेषा तिला धनरेषा असें म्हणावें. त्याचप्रमाणें ही ऊर्ध्वरेषा नुसती हातावरच असते असें नसून ती तळपायावरहि असते, असा त्यांनीं आपला स्वानुभव नमूद करून ठेविला आहे, व त्या अनुभवावरून ( तळपायावर रेषा हें आपणां सर्वांना माहित आहेच ) एक चांगला निष्कर्ष निघण्यासारखा असून त्यामुळें कांहीं शास्त्रज्ञांच्या एका शंकेला आपोआप उत्तर मिळून त्यांचें

निरसन होईल. पण त्याचा आपण शेवटीं विचार करूं. ही धनरेषा मग स्त्रीचे हातांत असो, कीं पुरुषाचे हातांत असो, ती राज्य वगैरे सुखदायक सर्व गोष्टी मिळवून देते. याप्रमाणें हिची व्याख्या दिली असून पुढीलप्रमाणें ती कशी असावी, हें सांगून त्याबरोबरच तिचीं फळेंहि दिलेलीं आहेत.

पुत्रपौत्रादि संपन्ना चोर्ध्वरेखा सुखप्रदा
सोर्ध्वरेखा विशेषेण राज्यलाभकरी भवेत्
धनजीवनदाज्ञेया तत्पूर्णत्वे महाधनी
खंडिता दुष्टफलदा क्षीणाक्षीणफलप्रदा

ही धनरेषा चांगली असल्यास विशेषतः राज्य मिळवून देतें; पण ही संसाराचें जीवन जें धन तें मिळवून देऊन कुबेरासारखा संपत्तिमान् बनविते, आणि ती सर्व सुखाची समृद्धि करणारी असल्यामुळें हिला द्रव्याचा झरा ('धनजीवन') असें नांव ठेविलें आहे. ही धनरेषा फारच चांगली असतांना जशी राज्य संपादन करून देते, तशीच ती तुटलेली किंवा क्षीण—अस्पष्ट—अशी असेल तर दारिद्र्य, चिंता, अपयश, वगैरे गोष्टी घडविते.

आदिमध्यांतभागेषु यत्रारब्धा तदादिगा
यत्रैव पर्यवस्येत तावद्धनमुदीरयेत्
आयुर्योगे जीवनांतं स्त्रीयोगे तु सुखावधि
संयुक्त रेखानुरूपं धनप्राप्तिनिमित्तकम्

या धनरेषेचे आदि, मध्य आणि अंत्य असे तीन विभाग करावेत व ज्या ठिकाणापासून तिचा प्रारंभ होईल त्या मानानें आयुष्याच्या त्या त्या वयांत धनप्राप्तीला (पैसे) मिळण्याला आरंभ होतो, व ज्या ठिकाणीं ती संपेल तेथें (त्या वयांत) द्रव्यार्जनाचा शेवट होतो. ही रेषा आयुष्यरेषेला मिळालेली असल्यास तो शेवट-

पर्यंत द्रव्यार्जन करितो व स्त्रीरेषेपर्यंत असल्यास मध्यम वयापर्यंत द्रव्यार्जन करितो असें सांगितलें आहे. ( स्त्री जिवंत असेपर्यंत द्रव्यार्जन करितो असाहि अर्थ कोणी कोणी करितात. )

सर्वथा तादृशी रेखा नास्ति यस्य करांतरे (ले !)
वराटिकापि तद्धस्ते क्षणमात्रं न तिष्ठति
परं त्वितरसद्योग लक्षणैर्धनप्राप्नुयात्

नंतर हें द्रव्य मिळण्याचीं साधनें ओळखण्याची रीति पुढीलप्रमाणें दिली आहे. ह्या धनरेषेला जी जी रेषा मिळाली असेल त्याप्रमाणें त्या त्या साधनाच्या द्वारें हें द्रव्य प्राप्त होतें असें सांगितलें आहे. उदाहरणार्थ, जर धनरेषेला हलरेखा ( नांगर ) मिळाली असेल तर शेतीवर, विद्यारेषा मिळाली असल्यास विद्वत्तेवर (मास्तर, प्रोफेसर, वर्तमानपत्रकार, वकील वगैरे ), मुद्रारेखा ( राजचिन्ह किंवा किरीटरेखा मिळाली असल्यास सरकारी नोकरीनें, पितृरेखा असल्यास वडिलार्जित धनलाभ, धनरेषा आणि पुरुषरेषा मिळाली असल्यास किंवा पुरुषरेषा आणि धनरेषा आरंभापासून वेगळाल्या असून जर त्या चौकोन, त्रिकोण वगैरे चिन्हांनीं जोडल्या गेल्या असल्यास स्वकष्टार्जितापासून उदरनिर्वाह होतो. सिंहासनरेखा मिळाली असल्यास राजा होतो, तुळारेखा ( तराजू ) मिळाली असअसल्यास वाणिज्या ( व्यापार ) पासून, आयुधरेखा ( हत्यारें ) मिळाली असल्यास शिल्पविद्येपासून, शकटरेखा ( गाडी ) मिळाली असल्यास वाहनापासून ( मोटार, तांगा, छकडे वगैरे हांकून ) नौकारेखा मिळाल्यास जलयानापासून, त्रिशूल, डमरू, वगैरे रेखा मिळाल्यास भिक्षुक किंवा धर्माधिकारी ( बिशप ) आचार्य होतो. अशा तऱ्हेनें ज्या ज्या चिन्हांचा हिच्याशीं संयोग झाला असेल त्या त्याप्रमाणें फलसाधन समजावें. वर सांगितल्याप्रमाणें एखाद्याच्या हातांत

एक कपर्दिकही रहात नसून हातांत इतर दुसरीं चांगलीं चिन्हें असल्यास त्याच्या उदरनिर्वाहास पंचाईत पडत नाहीं. याप्रमाणें हे धनोत्पादनाचे योग दिले असून शेवटीं धनहीनाचे योग पुढीलप्रमाणें सांगितले आहेत.

तिर्यक्चेत्कर्तरी रेखा धनभंगं विनिर्दिशेत्
कर्तरीत्रितयं प्रोक्तं महादारिद्र्यसंज्ञकं
अभावे धनरेखाया धनीति न हि कीर्त्यते
व्ययोहि सुमहान् भूयादेश जीवननिर्णयः

त्या धनरेषेंत जर कात्री असेल तर द्रव्यार्जनाला फार अडचणी येतात व त्या जर तीन कात्र्या असल्या तर तें मूर्तिमंत दारिद्र्यच समजावे. आणि जर हातांत मुळीं धनरेषाच नसेल तर त्याला पैसा मुळीं मिळणारच नाहीं. इतकेंच नव्हे तर तो गर्भश्रीमंत जरी असला तरी देखील दरिद्री होईल असें समजावें. ह्याप्रमाणें आपल्या पौर्वात्यांनीं या धनरेषेची रूपरेषा देऊन मनुष्याचा साधारण उपजीविकाक्रम ही धनरेषा ज्या ज्या स्थितींत आढळेल, त्या त्याप्रमाणें ओळखण्याला सांगितली आहे. नंतर मग ही रेषा नुसती मनगटापासून थेट मधल्या बोटाकडे जाते का, ह्याच्यापेक्षां कांहीं निरनिराळ्या स्थितींत सांपडतात त्याचाही विचार केला असून तिचा एकंदर क्रम पाहिला असतां तो पुढीलप्रमाणें दिसतो. साधारणपणें ती आत्मरेषेच्या बाहेरील भागावर वाटेल तिथें आढळू शकते, असा त्याचा निष्कर्ष निघतो. पण ह्या धनरेषेचें मुख्य लक्षण असें आहे कीं, ती मनगटापासून निघावयाची व सरळ समोर जावयाची; परंतु ही अगदीं टोकाला वळलेली सांपडून तिला फांटे फुटलेले आढळल्यास वरील व्याख्येस त्याच्यायोगानें कांहींहि बाध येत नाहीं. कारण ऊर्ध्वरेषा हें तिचें खरें नांव आहे व त्या नांवाप्रमाणें तिची स्थिति

असली म्हणजे झालें. आतां ह्या धनरेषेचा आपण बारकाईनें विचार करूं लागलों असतां आपल्या शास्त्रकारांनीं ह्या धनरेषेंतच इतर रेषांचाहि समावेश करून त्यांचाहि धनरेषेबरोबरच विचार करून टाकलेला आहे असें आढळून येतें व त्याचें कारण सर्व गोष्टी थोड-क्यांत सूत्रमयभाषेंत आणून त्यांना अतिसंक्षेप रूप देण्याची आपली पद्धत हें होय. पण सूक्ष्म विचार न केल्यास त्याचें खरें स्वरूप विकृत होतें व ग्रंथकाराचा आशय एका बाजूस राहतो. पाश्चात्यांची पद्धति सूत्रात्मक नाहीं. त्यांनीं धनरेषेचा व ह्या स्पष्ट रेषांचा भेद दाखविला आहे. ह्या इतर रेषा हातावर असतांनाच धनरेषा हातावर सांपडते व त्या वेळीं ह्या इतर रेषांचें फल द्विगुणीत मिळतें. तसेंच धनोत्पादकता हा इतर रेषांचा मुख्य गुण नसून त्यांचीं निरनिराळीं विशिष्ट फलें दिलेलीं आहेत. तेव्हां ह्या रेषांचा धनरेषेंत समावेश करणें बरोबर नव्हे. आपल्या पौर्वात्यांनीं जरी तसा भेद दाखविलेला नाहीं तरी पाश्चात्यांनीं हातावरील इतर रेषांचीं दिलेली स्थिति व आपल्याकडील रेषांची स्थिति एकच असून त्या रेषा म्हणजे धन-रेषेचीं निरनिराळीं स्वरूपें नसून त्या धनरेषेहून अगदीं निराळ्या आहेत, असें त्यांच्या स्वरूपावरून स्पष्टपणें ध्यानांत येतें. ह्या इतर रेषांचा व धनरेषेचा घोंटाळा उत्पन्न करणारा एकच शब्द आहे व तो " ऊर्ध्वरेषा " हा होय. धनरेषेची व ह्या रेषांची व्याख्या देतांना ऊर्ध्व हा एकच शब्द जरी सर्व ठिकाणीं वापरला आहे, तरी त्याचा हेतु इतकाच कीं, ह्या रेषाहि धनरेषेसारख्या ऊर्ध्वगतीच असतात म्हणून योजिला आहे. पण ह्या ऊर्ध्व शब्दानें असा घोंटाळा होण्याचा संभव असल्या कारणानें शास्त्रकारांनीं ह्या धनरेषेची व्याख्या देतांना **मनगटापासून निघून थेट सरळ मधल्या बोटावर जाणारी जी ती धनरेषा** असा स्पष्ट खुलासा केला आहे. आणि ह्या व्याख्येप्रमाणें ( इतर रेषा जरी ऊर्ध्वगती असल्या तरी ) इतर

रेषा आणि धनरेषा ह्यामध्यें असलेला भेद स्पष्टपणें नजरेला येऊन ह्या सकृद्दर्शनीं होणारा घोंटाळा आपोआप नाहींसा होऊन ह्या दोहोंच्या निरनिराळ्या व्याख्यांवरून व फलांवरून आपणांस त्यांचें सहजीं वर्गीकरण करतां येतें. परंतु ह्या प्रकणांरत ह्या रेषांचा विचार कर्तव्य नसल्यामुळें फक्त धनरेषेचा आणखी थोडासा विचार करून मग पाश्चिमात्यांच्या पद्धतीकडे वळूं.

निष्क्रान्ता मणिबंधात्प्राप्ता यदि मध्यमांगुली रेखा
नृपतिं सेनाधिपतिं सा कुरुते वा तथाचार्यम्
मध्यमामूलपर्यंत ऊर्ध्वरेखा च दृश्यते
पुत्रपौत्रादि संपन्नो धनवान् स सुखी नरः

ही रेषा जर मधल्या बोटावर जाईल तर तो राजा, सेनापति किंवा आचार्य होतो असें एकाचें मत आहे. दुसऱ्याचें मत असें आहे कीं, प्रापंचिक सुखाला लागणाऱ्या सर्व गोष्टी म्हणजे धन-धान्य, वगैरेनीं तो युक्त होऊन सुखी व धनाढ्य होईल. परंतु अशा तऱ्हेचें फल मिळण्यास ह्या धनरेषेंत वर दिलेल्या दोषाशिवाय आणखी पुढीलप्रमाणें दोष असतां कामा नयेत.

नच्छिन्ना न स्फुटिता दीर्घतरा विगतपल्लवापूर्णा
ऊर्ध्वरेखा कुरुते सहस्रजन पोषमेकोपि
सा ब्राह्मणस्य रेखा वेदकरी क्षत्रियस्य राज्यकरी
वैश्यस्य महार्थकरी सौख्यकरी भवति शूद्रस्य

जर ही रेषा तुटलेली, फुटलेली, फार लांब, शाखायुक्त अशी नसेल तर वरीलप्रमाणें तो हजारांचा पोशिंदा होतो असें सांगितलें आहे. पण त्याच्यांत त्यांनीं चातुर्वर्ण्याला अनुलक्षून पुढीलप्रमाणें भेद केला आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र

यांना अनुलक्षून ग्रंथकार सांगतात कीं, ही रेषा जर ब्राह्मणाचे हातावर असेल तर विद्वत्ता, क्षत्रियाचे हातावर असेल तर राज्य, वैश्याला विपुल संपत्ति व शूद्राला सुखदायी होते. सदरहू वर्गीकरण त्यांनीं व्यवहाराच्या दृष्टीनें केलें आहे तें ठीक आहे; पण त्यांत थोडा फरक आहे. कारण धनरेषेवरून धन मिळेल कीं नाहीं इतकाच बोध होतो; तिचा विद्वत्तेशीं कांहींहि संबंध नाहीं. तेव्हां व्यवहाराला अनुसरून जरी आपण त्यांचें वर्गीकरण केलें तरी त्यायोगानें हें धन मिळण्याचें साधन कोणतें असावें, एवढेंच आपल्याला जाणतां येईल. पण ती ब्राह्मणाच्या हातावर असली कीं विद्वान होईल असें किंवा वेदपारंगत होईल असें म्हणणें चिंतनीय होईल. कारण धनरेषेचा व विद्वत्तेचा कांहींहि संबंध नाहीं. हा श्लोक ज्या वेळीं रचिला गेला त्या वेळीं चातुर्वर्ण्य व्याख्या जरी जारीनें अमलांत असली तरी त्या वेळीं देखील धनरेषा ही विद्वत्ता किंवा द्रव्याशिवाय इतर सुखांची दर्शक होती असें म्हणणें योग्य नव्हते. चातुर्वर्ण्याला धरून त्याचें वर्गीकरण करणें झाल्यास तें पुढीलप्रमाणें केल्यास जास्त संयुक्तिक होईल असें आम्हांस वाटतें. ही रेषा ब्राह्मणाच्या हातावर असल्यास विद्येवर, क्षत्रियाचे हातावर असल्यास शौर्य किंवा शिपाईगिरीवर, वैश्याचे हातावर असल्यास व्यापार, उदीम, आणि शूद्रास नोकरीच्या योगानें द्रव्य मिळेल; परंतु हल्लींच्या काळीं हेंहि वर्गीकरण चूक ठरेल. कारण आतां वर्णव्यवस्थेचें बंधन राहिलेलें नाहीं. तेव्हां हें उपजीवनाचें साधन जाणणें झाल्यास आपल्या शास्त्रकारांनीं दिलेला ,जो पहिला नियम ( म्हणजे या धनरेषेशीं संयुक्त होणाऱ्या इतर चिन्हांवरून ) तो अगदीं बरोबर असून त्याच्या योगानें मात्र हीं द्रव्यप्राप्तीच्या मार्गाची कल्पना कोणत्याहि कालांत अथवा स्थितींत आपणांस करितां येईल. याप्रमाणें या धनरेषेचीं फलें दिलीं असून त्यांनीं त्यापुढेंही तिच्या नेहमींच्या स्वरूपाशिवाय

जरा निराळ्या स्थितींत आढळते, असें सांगून तशी ती आढळल्यास तिचीं पुढीलप्रमाणें त्यांनीं विशिष्ट फलें दिलेलीं आहेत.

रेखा मणिबंधाद्यदियात्यंगुष्ठप्रदेशिनी मध्यम्
ऋद्धियुतं ख्यापयति विद्यां विचक्षणं पुरुषम्
रेखान्वित्यं विधवां कुर्यात्संभोगिनीं. स्त्रियं
रेखायुग्मात्यंत लग्नासुखभोगप्रदाशुभा
चेदंगुष्ठं गच्छति सैव ततो वितुनते महीशत्वम्
यदि सैव तर्जनी वा साम्राज्यं मंत्रिपदमथवा

ही ऊर्ध्व रेषा मनगटापासून निघून आंगठा व तर्जनी यांचे मध्यें जाईल तर त्याच्या येथें ऋद्धिसिद्धि पाणी भरतील व तो महाज्ञानी होईल. अशीच जोड रेषा स्त्रीचे हातावर असेल तर तो उत्कृष्ट सौभाग्य योग होतो व हें रेखायुग्म ( सिस्टर लाईन्स ) प्रथमपासून शेवटपर्यंत सारखें असेल तर तिला नानाप्रकारचीं सुखें उपभोगण्यास मिळतील. हीच रेषा जर आंगठ्यावर जाईल तर तो राजा होईल. व तर्जनीवर जाईल तर तो सम्राट किंवा त्याचा मुख्य प्रधान होईल. याप्रमाणें आपल्या शास्त्रकारांनीं ह्या धनरेषेचा आपला स्वानुभव नमूद करून ठेविला आहे. आतां पाश्चात्त्यांनीं याबद्दल काय विचार केला आहे तें पाहूं.

## पाश्चात्य पद्धति

## धनरेषा ( वेल्थ लाईन. )

पाश्चात्यांनीं ह्या रेषेला, फेट लाइन, वेल्थ लाइन, लाइन ऑफ सॅटर्न, फॉरच्यून लाईन अशीं नावें दिलीं असून तिचीं उगमस्थानें पुढील-प्रमाणें धरलेलीं आहेत. १ आयुष्यरेषेपासून, २ मनगटापासून, ३ चंद्राचे उंचवट्यावर कोठूनही, ४ तळव्याच्या मध्यांतून व ५ कधीं

कधीं अंतःकरणरेषेपासूनही निघते. अशा इतक्या ठिकाणांपासून तिचा उगम असतो. ह्या रेषेवर जगांतील सर्व व्यवहार; सुखदुःखें, यश, अपयश संकटें वगैरे गोष्टी फार अवलंबून असतात असें सांगितलें असून ह्या ठिकाणीं तें महत्त्व व शास्त्राची प्राचीनता व सत्यत्व समजावून देण्याकरितां केरोनें तर आपल्या श्रीकविकुलगुरु कालिदासाच्या शाकुंतल नाटकांतील खालील उतारा दिला आहेः—

From Sakuntala ( 1st century, B. C. ) Act V.

Priest:-Soothsayers have predicted that your first-born will have universal dominion. " Now, if the hermit's daughter brings forth a son with the discus or mark of empire in the lines of his right hand, you must admit her immediately into your royal apartments with great rejoicings, if not then determine to send her back as soon as possible to her father "

King:-I bow to the decision of my spiritual adviser.

प्रथम ख्रिस्ती शकापूर्वी एक शतक अगोदर कालिदासानें रचिलेल्या शाकुंतल नांवाच्या संस्कृत नाटकांतील हा उतारा आहे असें लिहिलें आहे. म्हणजे त्याला आज मितीला २००० वर्षें झालीं. कालिदास हा ६ व्या शतकांतील जरी धरला तरी १४०० वर्षें होतात.

पुरोहित म्हणतोः–ज्याअर्थीं भविष्यवाद्यांनीं तुझा पहिला मुलगा चक्रवर्ती होईल असें ठाम वर्तविलें आहे, त्याअर्थी, हे राजा, ही ऋषीकन्या प्रसूत होईपर्यंत तुझ्या येथें राहूं दे. कारण तिला होणाऱ्या मुलाच्या उजव्या हातांतील रेषांत चक्रवर्तित्वाची खूण जर सांपडली तर तूं तिला आपल्या अंतःपुरांत मोठ्या आनंदानें ठेवून घे आणि

मुलाच्या हातांत चक्रवर्तित्वाची खूण जर नसली तर तिला ताबडतोब तिच्या पितृगृहीं आश्रमांत पाठवून दे. नंतर राजानें पुरोहिताला " यथा गुरुभ्यो रोचते " असें म्हणून संमति देऊन शकुंतलेला ठेवून घेतलें. ह्याचें संस्कृत मूळ कोणाला पहावयाचें असल्यास तें शाकुंतल नाटकाच्या पाचव्या अंकाच्या शेवटीं २९ व्या श्लोकाचे पुढें आहे तें पहावें. मूळ संस्कृतांत नुसतीं चक्रवर्तीचीं लक्षणें एवढाच निर्देश आहे. " उजव्या हातांतील रेषांत असणारी खूण " (The mark of empire in the lines of his right hand) असा नाहीं. सदरहू उताऱ्यावरून त्या शास्त्रावर लोकांचा किती जबर विश्वास होता याची चांगलीच साक्ष पटते. हाताचे जे सहा प्रकार मागें सांगितले आहेत त्यांपैकीं पहिले तीन वर्ग सामान्य चौकोन आणि प्रहताग्र ह्या तीन ठेवणींत धनरेषेचें महत्त्व नाहीं. कारण ती जरी नसली तरी अशा ठेवणींच्या माणसांचें आयुष्य चांगलें सुखांत जातें. पण दुसऱ्या तीन प्रकारांत ह्या धनरेषेचें फार महत्व आहे. ती जर ह्या ठेवणींच्या माणसांच्या हातांत आढळली नाहीं तर त्यांचें आयुष्य कष्टांत जातें; पण एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, पहिल्या तीन प्रकारच्या हातावर जर धनरेषा उत्तम असली तर ती दुसऱ्या तीन ठेवणींपेक्षां किती तरी पटीनें अधिक फल देते. कारण त्या रेषेशिवाय चालतें. दुसऱ्या धनरेषेच्या बऱ्यावाईट स्थितीवरच त्यांचें भाग्य अवलंबून असतें. तेव्हां ह्या विषयांतील नवशिक्यांनीं पहिल्या तीन ठेवणींत ही धनरेषा आढळली नाहीं किंवा चांगली नसली तरी भाग्य सांगण्याचे बाबतींत कचरण्याचें बिलकूल कारण नाहीं व दुसऱ्या तीन ठेवणींत ही धनरेषा फारच उत्तम आढळली तरी तो माणूस मोठा कुबेर होईल, अशीहि कल्पना करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

ही रेषा जर आयुष्यरेषेपासून निघाली तर तें व्यक्तीच्या अंगच्या

गुणांवर दैव निघण्याचें चिन्ह होय. जर ही रेषा मनगटापासून निघा-
लेली असली तर तो दैववान् असतो. विशेषतः शनीचे उंचवट्या-
वर जर ही चांगली उमटलेली असली तर हें लक्षण खात्रीनेंच आढ-
ळतें; परंतु हीच रेषा त्याच दिशेनें मंगळाच्या मैदानांतून ( प्लेन
ऑफ मार्स ) जर उठावदार झालेली असली तर मात्र आयुष्य त्रास-
दायक, संकटमय अशा स्थितींत जातें. आणि ही रेषा तशीच
शनीचे उंचवट्याचे पुढें जाऊन बोटांत घुसली असली तर मग
विशेषच त्रास होतो. जर ही रेषा चंद्राचे उंचवट्यावरून निघेल
व ती थेट शनीचे उंचवट्यावर जाईल तर त्याला बराच पैसा
मिळतो; पण तो स्त्रियांचीं हांजी हांजी करून मिळविलेला असतो.
ही रेषा बहुधा सार्वजनिक करमणुकी करणाऱ्या माणसांच्या हातांत
आढळते. जर हीच चंद्रावरील रेषा अंतःकरणरेषेपर्यंत जाऊन मग
तींत सामील होऊन नंतर गुरूचे उंचवट्यावर जाईल तर तो निःसंशय
लग्नामुळें ( सासऱ्याकडून ) धन मिळण्याचा योग्य समजावा किंवा
लग्न झाल्यानंतर भरभराट होईल असें जाणावें. जर ही चंद्राच्या
उंचवट्यावरील रेषा उंचवट्याच्या अगदीं बुडापासून निघून थेट
शनीचे उंचवट्यावर जाईल तर त्याला भविष्यसृष्टी किंवा वाक्सिद्धी
असते. जर ही धनरेषा शनीचे उंचवट्यावर जाण्याच्याऐवजीं इतर
दुसऱ्या उंचटयावर जाईल तर धनोत्पादन विशिष्ट तऱ्हेनेंच होतें.
जर ती बुधावर गेलेली असेल तर व्यापार, शास्त्र आणि वक्तृत्व
ह्या गुणावर त्याला पैसे मिळतात. रवीच्या उंचवट्यावर जर ही
रेषा गेलेली असेल तर कला किंवा सावकारीपासून आणि जर गुरूवर
गेलेली असेल तर तो लोकांचा पुढारी होऊन त्याला फार मोठा
सन्मान मिळतो. असल्या माणसांत विलक्षण उत्साह व महत्त्वाकांक्षा
असते व मनांत योजिलेले हेतू तडीस नेण्यानें संकटाच्या, जोखमीच्या
व आणीबाणीच्या प्रसंगाला तोंड देऊन त्यातून पार पडण्याचें विल-

क्षण सामर्थ्य असल्यामुळें, प्रजासत्ताक राष्ट्रांना अशीं माणसें फार उपयोगी असतात आणि द्रव्याचे योगानें त्यांच्या मनाचें समाधान होतें.

**रेषेच्या लांबीवरून निदानाची पद्धतिः**—जर ही रेषा शनीचे उंचवट्यावर न थांबतां ती मधल्या बोटाच्या मधल्या पेऱ्यापर्यंत जाईल तर ती इतर चिन्हाच्या बऱ्यावाईट मिश्रणाप्रमाणें फार मोठ्या भाग्याचें किंवा दारिद्र्याचें द्योतक होय. उदाहरणार्थ, चांगल्या हातांत ही रेषा फार मोठें भाग्य दाखवील; पण जर शनीचे उंचवट्यावर एक लाल खोल रेषा असेल आणि बोटांच्या पहिल्या पेऱ्यावर तारा असेल तर तें दुर्दैवाचें लक्षण समजावें. त्याचा अंत फांशीनें किंवा आघातानें होतो. जर ही रेषा तळव्याच्या बुडापासून किंवा मनगटांतून निघेल व तळव्याच्या आणि बोटांच्या सांध्यांतच जाऊन थांबेल तर तें दारिद्र्याचें लक्षण समजावें. जर हीच रेषा अंतःकरण-रेषेपर्यंत जाऊन थांबेल तर काळजाच्या विकारानें किंवा प्रेमी माणसानें फसविल्यामुळें संकट येतें. मस्तकरेषेवर थांबेल तर मस्तकविकारानें किंवा हिशेबी धोरण चुकल्यामुळें संकट येतें. हिच्या आंखूडपणावर पुढील निदानें बांधलीं आहेत. जर ही धनरेषा फक्त मस्तकरेषेवरूनच निघालेली असेल तर कष्ट, दुःख आणि अनारोग्य अशा स्थितींत आयुष्य जातें; पण मस्तकरेषा फारच चांगली असल्यास म्हातारपणीं तो आपल्या बुद्धिमत्तेवर द्रव्य मिळवितो. जर ही रेषा याहूनहि आखूड म्हणजे अंतःकरण रेषा व मस्तकरेषा यांच्यामधून निघालेली असेल तर त्याला तुरुंगवास भोगावा लागतो.

हिच्यावरून कालमर्यादेचें निदान पुढीलप्रमाणें बांधतात. आरंभापासून तों शीर्षरेषेपर्यंत ३० वर्षें, शीर्षरेषेपासून अंतःकरणरेषेपर्यंत ३० तें ४५ आणि तेथून तिच्या शेंवटापर्यंत बाकीचें सर्व आयुष्य समजावें. जसें आपल्या मस्तकरेषा व अंतःकरणरेषा या दोन्हींमध्यें जर ही धनरेषा तुटलेली किंवा संपलेली आढळली तर आपल्याला

३० आणि ४० च्या दरम्यान द्रव्याची उणीव पडेल असें सांगतां येईल आणि ह्या धनरेषेला ज्या चिन्हांची जोड मिळाली असेल त्यावरून त्या आपत्तीचें स्वरूप व कारण यांचें निदान करितां येईल. त्याचप्रमाणें ह्या दुर्दैवाचें कारण बहुधा मनुष्याच्या उजव्या हातांतील धनरेषेच्या स्वरूपावरून सांगतां येतें. आणि डाव्या हातावरून तें अगदीं नेमकें कोणत्या काळीं व वेळेला घडेल हें सांगतां येतें.

ही धनरेषा अगदीं सरळ गेलेली असून तिच्या दोन्ही बाजूनीं ऊर्ध्वगति शाखा शेवटपर्यंत गेलेल्या असतील, तर तें सावकाशपणें गरीबींतून भाग्यास चढत जाण्याचें लक्षण समजावें. जर ही रेषा आंगठ्याला पिळ घातल्यासारखी व शेवटाला अगदीं सरळ अशी असली तर त्याचें बालपण गरिबींत व शेवट सुखांत होतो. जर ही रेषा अंतःकरणरेषेच्यावर अगदीं सरळ होऊन व तिचा रंग चांगला असेल तर तें नेहमीं म्हातारपणीं शास्त्रीय शोधानें द्रव्य मिळवून देतें, आणि अशा माणसाची व्यापारांत बागाईत, शेती, इन्जिअरिंग (स्थापत्य शास्त्र) ह्यांच्यांत प्रगति चालते. ही धनरेषा जर दुभंगलेली आणि पिळवटलेली असली तर ती विषयभोगाच्या अतिरेकामुळें त्याची प्रकृति बिघडेल असें दर्शवितें. नुसतीच पिळवटलेली असली तर ती नेहमीं भांडणें दाखविते आणि जर ही रेषा चांगली असली तर आयुष्यरेषा बिघडल्यापासून होणारे दुष्परिणाम नाहींसे करिते. ही रेषा वेडीवांकडी व तुटक अशी असलीं तर ती नशिबांत वरचेवर स्थित्यंतर घडविते. ही रेषा मंगलप्रदेशांत तुटलेली असेल तर ती नैतिक आणि शारीरिक असे आयुष्यांत दोन्ही प्रकारचे झगडे दाखविते, आणि शनीचा, मंगळचा व चंद्राचा ह्यांपैकीं एखादा उंचवटा चांगला सुधारलेला असल्यास हिचे बरेच दुष्परिणाम नाहींसे करतो. पुष्कळ रेषांनीं आणि उपरेषांनीं हात गजबजलेला असून जर ही धनरेषा विशिष्ट अशा स्थितींत पण स्पष्ट असेल तर असा माणूस मनाला फार

लावून घेणारा आणि चिडचिडा असतो. ही धनरेषा चांगली सुधारलेली असल्यास ती आयुष्य वाढविण्यास मदत करिते. जर ही आरंभालाच तुटलेली असली तर त्याचें तीस वर्षेपर्यंतचें आयुष्य गरीबींत जाते. पण ही रेषा उंचवटच्यावर ताऱ्यास संपत असेल तर त्याला आरंभीं संकटें येऊन मग नशीब उदयाला येतें. हात इतर चिन्हांनीं चांगला सुधारलेला असून जर धनरेषा वरीलप्रमाणें आढळेल तर येणारीं संकटें बहुधा आपल्या आप्तसंबंधीं माणसांच्यामुळें आलेलीं असतात. जर ही धनरेषा शनीच्या उंचवटच्यावर इतर बऱ्याच बारीक रेषांनीं छेदली गेलेली असेल तर ती संबंध आयुष्य अखंड चैनींत व सुखांत गेल्यावर म्हातारपणीं फार कष्ट दाखविते यांत बिलकूल शंका नाहीं. धनरेषा शुक्राच्या उंचवटच्यावरून येणाऱ्या रेषेनें छेदली गेलेली असेल तर त्याच्या दुर्दैवाला एखादी स्त्री कारणीभूत असते. रेषेला आरंभाला दोन फांटे फुटून फक्त शुक्राचे उंचवटच्यावर गेलेली असल्यास स्वतःच्या अडाणीपणामुळें भांडणें होऊन द्रव्यार्जनांत व्यत्यय येतो, पण जर ही रेषा नीट गेलेली असली तर बऱ्याच झगडच्यानंतर शेवटीं त्याची महत्त्वाकांक्षा तडीस जाते; पण जर ही मुख्य रेषा तुटलेली असली किंवा वेडीवांकडी असली तर त्याच्या मूर्खपणाची कमाल होऊन न टळणारें असें त्याचें दुर्दैव ओढवतें. ही धनरेषा जर दुहेरी ( रेषायुग्म ) असेल तर ती फार चांगली; पण त्यांपैकीं एक जर शुक्राचे उंचवटच्यावरून निघेल व दुसरी चंद्राचे उंचवटच्यावरून निघेल तर त्यांचें आयुष्य मोठें चमत्कारिक, निरनिराळ्या प्रसंगांनीं भरलेलें व कोणाला कल्पनाहि करितां येणार नाहीं अशा तऱ्हेचें असतें. तथापि त्या जोड रेषा जर एकसारख्या जाऊन शेवटीं निरनिराळ्या उंचवटच्यांवर जातील तर त्याच्या आयुष्यांत दोन धंदे होऊन त्याची फार भरभराट होते. जर ही रेषा तुटलेली किंवा लहान लहान तुकड्यांची बनलेली असेल तर क्लेश.

अशा मनुष्याचें आयुष्य फार अनिश्चित आणि यश आणि अपयश, संपत्ति आणि विपत्ति यांची सारखी भरती आणि ओहोटी चाललेली असावयाची. जर ह्या रेषेवर कात्री असेल तर ती माणसाच्या स्थितींत त्या त्या वयाच्या सुमारास स्थित्यंतर घडविते. जर अगदीं रेषेच्या मधोमध असेल तर तें दुर्दैवाचें लक्षण समजावें व ती खूण शीर्षरेषेच्या जवळ पडत असल्यामुळें मस्तकविकार, मित्राचा मृत्यु व अनारोग्य होण्याचीं कारणें असतात आणि जर ही रेषा हातांत मुळींच नसली तर त्याचें आयुष्य अगदीं सर्वसाधारण असून धड चांगलें ना वाईट अशा स्थितींत जातें व त्याला समाजांत बिलकूल दर्जा नसतो. याप्रमाणें पाश्चात्त्यांचे ह्या रेषेसंबंधीं अनुभव आहेत. दोघांच्या दृष्टीनें विचार केला तर ह्या धनरेषेसंबंधीं ती कोणती याबद्दल बिलकूल मतभेद नसून तिचें नांवहि एकच आहे, त्याप्रमाणेंच ती हातांवर उठावदार असणें अथवा मुळींच नसणें, तशीच ती तुटलेली असणें वगैरेहि गोष्टींत एकवाक्यता आहे. त्यांतल्या त्यांत ह्या धनरेषेवर कात्री असली तर तिचें फल फार वाईट आहे. हिचें शनीचे उंचवट्याकडे व इतर उंचवट्यांकडे झुकणें, तसेंच ही दुहेरी असणें व हिचा आखूडपणा आणि लांबी यावरून निरनिराळीं अनुमानें बांधणें वगैरे इतर गोष्टींतहीं अगदीं सारखेपणा आहे असें आपणांस दिसून येतें. असो. आतां ह्या धनरेषेचा ठोकळ विचार संपला व त्याबरोबरच हातांतील मुख्य असलेल्या चारी रेषांचाहि विचार संपला. तेव्हां आपणांस आतां उपरेषांकडे ( दुय्यम प्रतींच्या रेषांकडे ) वळावयास बिलकूल हरकत नाहीं. म्हणून त्यांचा विचार पुढील प्रकरणांत केलेला आहे.

---

## प्रकरण १९ वें.

# अनुरेखा.

**रेखा अप्यनुरेखाश्च उपरेखांश्च सूक्ष्मगाः**

आतांपर्यंत आपण मुख्य रेषांचा विचार केला. आतां त्यांच्या पोटविभागांचा विचार करावयाचा म्हणजे त्याचे अनुरेखा, उपरेखा व सूक्ष्मरेखा असे तीन विभाग पडतात. अनुरेखा ह्या मुख्य रेषांचे खालोखाल आढळतात व त्याचे खालोखाल उपरेषा अथवा चिन्हें सांपडणारीं असून तिसऱ्या सूक्ष्म म्हणजे ( " चान्स साईन्स " ) अगदीं क्वचित् आढळणाऱ्या होत व त्या दुय्यम प्रतीच्या रेषांतच हातावरील बोटांचाहि अंतर्भाव होतो. ह्याप्रमाणें हे रेषांचे विभाग आहेत; त्यांपैकीं आपण मुख्य रेषांचा विचार केलाच आहे, तेव्हां आतां आपण त्याचा दुसरा दुय्यम विभाग जो अनुरेखा त्याच्याकडे वळूं.

**" अनामिकोर्ध्व रेखा." पार्वात्य–पद्धात.**

**अनामिकोर्ध्व रेखायां व्यवसायो धनागमः ।**
**सुखदुःखेन जीवेन पुत्रपौत्रगृहादिषु ॥**
**करमूलान्निर्याता यदिरेखानामिकांगुलीमेति ।**
**विदधाति सार्थवाहं सार्थाढ्यं नृपतिमान्यं ॥**

मनगटापासून निघून सरळ अनामिकेवर म्हणजे करांगुलीच्या शेजारच्या बोटावर जाणाऱ्या रेषेस अनामोर्ध्व रेषा म्हणतात व ही ज्याच्या हातावर असेल तो व्याजबट्टा करणारा सावकार किंवा मालाची नेआण करणारा व्यापारी ( इम्पोर्ट एक्सपोर्ट ) होऊन मुलेंबाळें, घरदार यांचा उपभोग घेणारा, राजदरबारीं मान मिळणारा व ज्याच्या संसारांत सुखदुःखें हीं दोन्ही समान असतात असा व्यापारी होतो. असें ह्या रेषेचें फल आहे. आतां पाश्चात्यांकडे वळूं.

## पाश्चात्य-पद्धति.

## दि सन् लाईन-अनामिकोर्ध्वरेषा.

ही रेषा आयुष्यरेषेपासून, चंद्राचे उंचवटयावरून मनगटापासून, मस्तकरेषेपासून, मंगळाच्या मैदानांतून ( प्लेन ऑफ मार्स ) व अंतः-करण रेषेपासून इतक्या ठिकाणांहून निघते. ह्या रेषेचें मुख्य लक्षण कीर्ति, संपत्ति, कौशल्य व यश हीं होत. त्याला गुरूच्या किंवा बुधाच्या उंचवटयाची जोड मिळाल्यास तो कलेमध्यें प्रावीण्य मिळवून उदयास येतो, त्या रेषेला धनरेषेची जोड असल्याशिवाय या रेषेच्या फळाचा उपयोग होत नाहीं. कलेवर उदयाला आलेल्या दैववान् माणसांचे हातांत नेहमीं ह्या दोहोंची जोडी आढळते. अनामिका व मस्तकरेषा या दोन्ही लांब असून, जर ही रेषा हातांत असेल तर असा माणूस नेहमीं त्याला अवगत असलेल्या कलेचा व्यवहारांत उपयोग करून घेऊन पैसे मिळवितो. हीं रेषा तुटक असल्यास एक घड ना भाराभर चिंध्या अशी त्याची स्थिति असते. ह्या रेषेस शनीचे उंचवटयावरून एक रेषा येऊन छेदील, तर तें दारिद्र्याचें लक्षण समजावें. उलट बुधाचे उंचवटयावरून एक रेषा येऊन छेदील तर तें श्रीमंतीचें लक्षण समजावें. ही रेषा जर हातावर मुळींच नसेल, तर तो कोणत्याहि कलेंत प्रसिद्धी मिळविणार नाहीं. ही मंगळाचे मैदानांतून निघाल्यास पुष्कळ आपत्तींशीं झगडल्यावर मग यश येतें; परंतु ती सरळ रवीचे उंचवटयावर गेलेली असली पाहिजे. जर ही रेषा मस्तक-रेषेपासून निघेल तर तें आयुष्याच्या मध्यापासून व स्वतःच्या बुद्धिमत्तेच्याच जोरावर प्रसिद्धीला येण्याचें चिन्ह होय. ही रेषा अंतःकरणरेषेपासून निघाल्यास तें उतारवयांत सुख मिळण्याचें चिन्ह समजावें व ही रेषाच नसून ह्या रवीच्या उंचवटयावर जर बारीक बारीक रेषा असतील, तर तें म्हातारपण दुःखांत जाण्याचें लक्षण समजावें. अनामिका जर जवळ जवळ मधल्या बोटा-

इतकी लांब असेल व रविरेषा धनरेषेपेक्षां ठळक आणि मस्तकरेषा झुकती अशी असेल तर तें जुगारीपणाचें द्योतक होय. ही रेषा जर मनगटापासून निघून धनरेषेशी समांतर अशी थेट मधल्या बोटावर जाईल, तर त्याला वाटेल त्या कामांत यश येऊन विपुल संपत्ति, कीर्ति व मान मिळतो. हें फल व आपल्या शास्त्रकारांचें ह्या रेषेचें फल अगदी ततांतत एक आहे. आता आपण दुय्यमरेषा नं. २ ( कनिष्ठोर्ध्वरेखा ) इचा विचार करूं.

## कनिष्ठोर्ध्वरेषा-आरोग्यरेषा.

### पौर्वात्य-पद्धति

निष्क्रम्य पाणितलात्प्राप्नोति कनिष्ठिकांगुलीं रेखा।
धनकनकाढ्यं श्रेष्ठिनमिह कुरुते सायशोनिष्ठं ।
येषां पाणावूर्ध्वं रेखा कनिष्ठामूलसंस्थिता ।
ते नराः परदेशेषु शतमायुर्भजंति वै ।।

तळव्यापासून निघून करांगुलीपर्यंत जाणारी जी रेषा ती कनिष्ठोर्ध्व-रेषा होय. ही ज्याच्या हातावर असते अशा माणसास व्यापारांत चांगलें यश मिळून तो मोठा कोट्यधिश ( व्यापारी ) होतो. हीच रेषा जर करांगुलीच्या तळापर्यंत असेल तर अशीं माणसें शतायु होऊन त्यांचें सर्व आयुष्य परदेशांत जातें. असें हिचें फल आहे.

### आरोग्यरेषा ( कनिष्ठोर्ध्वरेषा ).

### पाश्चात्य-पद्धति.

ह्या रेषेला तिकडे हेल्थ लाइन अथवा लाइन ऑफ लीव्हर असें म्हणतात. म्हणजे हिच्या नांवावरूनच ती आरोग्याचें थर्मामीटर आहे असें शास्त्रकारांचें मत आहे, असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. विशेषतः ती यकृताची स्थिति बरोबर दाखविते; तसेंच अपचनाचे विकार वगैरेची ती दर्शक आहे. ही रेषा तळव्यांतून निघून करांगु-

लीकडे जाते, असेंच तिचें त्यांनीं आपल्याप्रमाणें ढोबळ वर्णन दिलें आहे; तरी पण ती मनगटापासून आयुष्यरेषेजवळून निघून तिला चिकटून किंवा अलग अशी करांगुलीकडे जाते; किंवा चंद्राचे उंचवट्यावरून अगदीं तळव्याचे कडेनें निघून चंद्रकोरीसारखा वांक घेऊन करांगुलीकडे जाते. अशा हिच्या हातावर ओळखण्याच्या दोन तऱ्हेच्या खुणा दिल्या असून, तिचीं फळें पुढीलप्रमाणें दिलीं आहेत. हिचा वर्ण उत्तम असून ती न तुटलेली अशी असेल तर ती आरोग्य, विलक्षण स्मरणशक्ती व धंद्यांत यश यांची द्योतक होय. जर ही तुटलेली किंवा बुधाचे उंचवट्याजवळ तिला फांटे फुटलेली अशी दिसेल, तरी ती वृद्धापकाळीं भयंकर दुखणें येईल असें सुचवितें. ही रेषा जर आयुष्यरेषेपासून निघेल तर ती काळजाच्या अशक्ततेचें द्योतक समजावें. ही अंतःकरणरेषेवर एकदम थांबल्यासारखी दिसेल तर तें हृदयविकाराचें खात्रीचें चिन्ह समजावें. ही रेषा निरनिराळ्या रंगांची असून मस्तकरेषेवर जर लाल असेल तर तें अर्धांगवायू होण्याचें चिन्ह समजावें. जर ही रेषा टोंकाला लाल असेल तर ते कपाळदुखी, मध्यें असेल तर ज्वररोग व आरंभाला असेल तर हृदयविकाराचें तें दर्शक होय. जर ही रेषा सर्वंधच लाल असेल तर गर्विष्ठपणाचें व पशुतुल्य स्वभावाचें द्योतक समजावें. तसेंच ही रेषा पिळवटलेली व नागमोडीसारखी असेल, तर तें पित्तविकाराचें व अप्रामाणिकपणाचें द्योतक होय. जर ह्या रेषेच्या टोंकाला दोन फांटे फुटून मस्तकरेषेवर त्रिकोण होईल किंवा फांटे न फुटतां तशीच पुढें जाऊन कात्रीसारखी दिसेल, तर असा माणूस गूढ शास्त्रांचा व्यासंगी असतो. तसेंच ह्या रेषेच्या योगानें धनरेषा, मस्तकरेषा यांचा त्रिकोण होईल, तर असा माणूस निसर्गाचा व त्यांच्या चमत्कारांचा व्यासंगी असून त्याचा तिकडे उपजत कल असून तो अंतर्ज्ञानी असतो. ही रेषा आयुष्यरेषेला कोठेंहि चिकटतां उपयोगी

नाहीं. ती ज्या ज्या ठिकाणीं आयुष्यरेषेस चिकटलेली असेल त्या वेळीं तें आयुष्याला धोका सुचवितें व अशी स्थिति दोन्हीहि हातांवर असल्यास मनुष्य त्या वेळीं दुखण्यांतून वांचणें कठीण असतें. त्याचप्रमाणें त्या रेषेस फांटा फुटून जर तो आयुष्यरेषेला छेदील व त्या ठिकाणीं जर बेट होईल व हें चिन्ह दोन्ही हातांवर सांपडेल तर त्याची जगण्याची आशा बिलकूल धरूं नये. ही रेषा आयुष्यरेषेपासून अलग असल्यास तें दीर्घायुत्वाचें लक्षण होय. ही रेषा चंद्र-कोराप्रमाणें दोन्ही हातांवर असेल तर तें तैलबुद्धीचें व वाक्सिद्धीचें दर्शक होय. ह्यालाच बुधाच्या उंचवट्याची जोड मिळेल तर तें अंतर्ज्ञानदृष्टीचें दर्शक होय. ह्या रेषेलाच जर त्या चंद्राचे उंचवट्याचे बाजूस खालीं बेट असल्यास तें निद्रारोगाचें चिन्ह समजावें. ही रेषा हातावर मुळींच नसल्यास तें सदृढ व निकोप प्रकृतीचें लक्षण समजावें. जर ही रेषा मनगटापासून निघून थेट करांगुलीपर्यंत जाईल तर त्याला व्यापारात चांगलें यश येतें, हें शेवटचें त्या रेषेचें वर्णन व त्याचें दोहोंकडील फल अगदीं एक आहे. याप्रमाणें दोघांनीं या रेषेचीं फलें दिलीं आहेत. आतां आपण मणिबंधरेषेकडे वळूं.

## तर्जन्योर्ध्वरेखा—मणिबंधरेखा.

### पौर्वात्यपद्धति.

तर्जनीमूलपर्यंतमूर्ध्वरेखा च दृश्यते ।
राजदूतो भवेत्तस्य धर्मनाशश्च जायते ॥
मणिबंधं निर्गच्छति रेखा यस्य प्रदेशिनीमूलम् ।
बहुबंधुजनाकीर्णं तस्य पुनर्जायतेऽभिजनः ॥

मनगटाकडून निघून तर्जनीवर जर ही रेषा जाईल तर तो सरकारी नोकर होऊन धर्मभ्रष्ट होईल; हीच रेषा जर मनगटांतून निघेल तर त्याचें कूल मोठें असतें.

### ( पाश्चात्य-पद्धति ) मणिबंध रेषा-तर्जन्योर्ध्वरेषा.

ही रेषा कायदेपांडित्याची दर्शक असून ती त्या विषयांतील मोठा मान मिळवून देते. तसेंच आरंभाला हिला फांटा फुटून तो शुक्राचे उंचवटच्यावर जाऊन ही तशीच पुढें गुरूचे उंचवटच्यावर म्हणजे आपल्या शास्त्रकारांनीं सांगितल्याप्रमाणें तर्जनीच्या मुळापर्यंत जाईल, तर त्याला श्रीमंत घराण्यांतील बायको मिळून तिचेकडून फायदा होतो.

### " विरहरेषा." ( पौर्वात्य पद्धति.)

या करतले कनिष्ठां निर्गत्यांगुष्ठमूलतो याति।
सा रेखा भर्तृघ्नी तद्युक्तां नोद्वहेत् कन्याम् ॥

ही रेषा आंगठच्यापासून निघून थेट करांगुलीवर जाते व अशी गेली असल्यास त्याला हटकून विरहावस्था प्राप्त होते. ( विधुर अथवा विधवा स्थिति येते ). स्त्रीच्या हातावर अशी रेषा असल्यास तिला वैधव्य येईल म्हणून तिचें लग्नच करूं नये असें ग्रंथकारांनीं सांगितलें आहे. पाश्चात्यांनीं ही रेषा अशीच जाते असें सांगितलें आहे; पण तिचें फळ मात्र अगदीं निराळें म्हणजे असा मनुष्य बुद्धिमान् व तरतरीत असतो असें सांगितलें आहे. फलाचे बाबतींत दोघांचा विरोध असल्यामुळें, प्रत्यक्ष हात पाहून खरा अनुभव काय येतो हें पाहण्यासारखें आहे.

### अंगुष्ठोर्ध्वरेखा-विवाह-रेषा.

पौर्वात्य पद्धति--- मनगटापासून निघून अंगठच्यांत रेषा जाईल तर तो राजा होईल.

### पाश्चात्य-पद्धति.

आयुष्यरेषेपासून निघून अंगठच्यांत जाईल तर त्याचे पुष्कळ विवाह होतात व त्याच्यावर आणखी रेषा असल्या तर त्यापासून त्रास होतो.

## पौर्वात्य-पद्धति.

रेखा कनिष्ठिकालेखामध्ये नरस्य यावंत्यः ।
तावन्त्यो महिलाः स्युर्महिलायाः पुनरपि मनुष्याः ॥
कनिष्ठांगुलीमूले तु रेखाः करतलांतगाः ।
सहोदरं सूचयंति पुत्रवत्तत्र निर्णयः ।

मनुष्याच्या हातांवर करांगुली व आयुष्यरेषा यांच्यामध्यें जितक्या रेषा असतील तितके तितके विवाह समजावेत. करांगुलीच्या खालीं तळव्यावर जितक्या रेषा असतील तितकीं भावंडें समजावींत व त्याचा निर्णयसंतान रेषेप्रमाणें करावा.

## विवाहरेखा आणि संतानरेखा.

### ( पाश्चात्य-पद्धति )

पाश्चात्यांनीं या रेषांत आडव्या रेषा व उभ्या रेषा असे दोन विभाग केले असून, आडव्या रेषेवरून विवाह व उभ्या रेषांवरून संतानानिर्णय करतात व आपल्याकडे याच रेषांवरून वरीलप्रमाणें विवाह व भावंडांचा निर्णय करतात. ह्या करांगुलीच्या तळाशीं असलेल्या सर्व रेषांपैकीं ज्या ठळक असतील तेवढ्याच विचारांत घ्याव्या. ही रेषा सरळ, स्पष्ट, बिनतुटकी असून वेडी वांकडी नसावी. ही रेषा वांकडी होऊन जर अंतःकरणरेषेंत मिळेल, तर ही पुरुषाच्या हातांत असल्यास त्याची स्त्री व स्त्रीच्या हातांत असल्यास तिचा पति अगोदर मृत्यु पावतो, व ही वरच्या बाजूस वळलेली असल्यास त्याचें लग्नच होत नाहीं. ह्या रेषेला जर बारीक रेषांचे फाटे फुटलेले असतील, तर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्या दंपत्यांना सुख होत नाहीं. तसेंच ही रेषा तुटलेली वगैरे विषम स्थितींत आढळेल तर त्याला विवाहसुख लागत नाहीं. आतां संततीच्या रेषांचा विचार करूं. ह्या रेषा उभ्या असतात व त्या विवाहरेषेपासून निघतात. ठळक

रेषांवरून पुरुष संतति व अंकुश रेषांवरून स्त्री संतति ओळखावी; परंतु पुरुष संतती स्त्रीच्या हातावरून व स्त्री संतति पुरुषाच्या हातावरून ओळखतां येते. स्पष्ट रेषावरून निरोगी संतती व वेड्यावांकड्या रेषा असल्यास संतति दुर्बल असते. कधीं कधीं ह्या रेषा अंतःकरण रेषेपासून निघतात व अशा वेळीं त्यांचे मुलांवर फार प्रेम असतें. पति व स्त्रीच्या हातावर ह्या रेषा एका वेळीं स्पष्ट अशा क्वचित दृष्टीस पडतात; पण बापाचें प्रेम अधिक असल्यास बापाच्या हातावर व आईचें प्रेम असल्यास आईचे हातावर त्या स्पष्ट असतात. आपल्याकडे संतती अंगठ्याच्या खालीं शुक्राच्या उंचवट्यावरून ओळखतात. पाश्चात्यांत ह्या रेषांचा तसा विचार केलेला नाहीं. फक्त शुक्राचे उंचवट्यावर पुष्कळ रेषा असल्यास तो विषयी असतो व नसल्यास ते विषयपराङ्मुख असतात. पण रेषांच्या आकारमानावरून दोघांचींहि फळें वर्तविण्याची एकच पद्धत असल्यामुळें ह्याच ठिकाणीं आपल्या पद्धतीचाहि विचार करणें बरें, तेव्हां त्याचा विचार करूं.

“ संतानरेखा ” ( पौर्वात्य–पद्धति. )

अंगुष्ठमूलगा रेखाः संतानं सूचयंति ताः ।<br>
सांकुराश्च तया नार्यः पुरुषाः सनराः स्मृताः ॥<br>
गर्भस्रावो ऽतिसूक्ष्मत्वे विच्छेदे बालघातनं ।<br>
दीर्घदीर्घायुषो ज्ञेया अल्पा अल्पायुषः स्मृताः ॥<br>
तदभावे प्रजाभाव इति संतानलक्षणं ।<br>
दंपत्यन्तराभावे तदभावो न्ययान्यथा ॥

अंगठ्याच्याखालीं वरच्या बाजूस असणाऱ्या रेषा संतानसूचक होत. त्या अंकुरयुक्त असल्यास स्त्री प्रजा व त्यांना फांटे असल्यास पुरुष संतती जाणावी. त्या लांब असल्यास दीर्घायु व आंखूड असल्यास अल्पायु करतात. सूक्ष्म असल्यास गर्भस्राव व विच्छिन्न अस-

ल्यास बालमृत्यु दाखवितात. रेषांचा अभाव असल्यास संतती होणार नाहीं. दोघांच्याहि हातांत रेषा असावयास पाहिजेत; एकाच्याच हातावर असतील तर संतती अल्प होणार व उशीरा होते व नसल्यास मुळींच होणार नाहीं. याप्रमाणें त्या रेषासंबंधीं आपल्या शास्त्रकारांचें मत आहे. आतां द्रव्य-संपति रेषेकडे वळूं.

---

## संपत्तिरेषा—द्रव्यरेषा.

आपाणिकरमूलभागान्निसृत्यांगुष्ठतर्जनीमध्ये
आद्या भवन्ति तिस्रो गोत्र द्रव्यायुषां रेषां ॥

मनगटापासून सारख्या तीन रेषा निघून अंगठा व तर्जनी यांच्या-मध्यें जाणाऱ्या ज्या तीन रेषा त्या अनुक्रमें गोत्र, द्रव्य, आयुष्य रेषा होत. पहिली गोत्र रेषा ही पाश्चात्त्यांत नाहीं. ही रेषा हातांत असली तर त्यांचें गोत्र ( कुल ) फार मोठें असतें. दुसरी द्रव्यरेषा ही पाश्चात्यांची मार्स लाईन आहे. आपल्या शास्त्रकारांनीं हिला दिलेल्या नांवावरूनच ही विपुल संपत्तिदर्शक होय. तेव्हां विपुल संपत्ति हेंच तिचें फल. आणि तिसरी रेषा ही आयुष्यरेषा होय. व हीच पाश्चात्यांची आयुष्य रेषा आहे. ती कशी आहे. ह्याचें विवेचन पूर्वीं केलेंच आहे तेव्हां पहिली गोत्र रेषा त्यांच्यांत नाहीं व तिसरी दोघांची एकच आहे, पण तिचा मुख्य रेषेशीं विचार केला असल्या-मुळें वर पौर्वात्य पद्धतीनें विचार झालाच, तेव्हां आतां पाश्चात्य पद्धतीप्रमाणें ह्या रेषेचा विचार करावयाचा राहिला आहे तो करूं.

### (पाश्चात्य—पद्धति) लाईन ऑफ मार्स—द्रव्यरेषा.

ही रेषा क्वचित सांपडते व ती आयुष्य रेषेच्या आंत तिला समांतरसारखी अशी आरंभापासून शेवटपर्यंत जोडीनें जाते व हिला लाईन ऑफ मार्स असें म्हणतात. पण त्यांचेकडे हिचें फळ नुसतेंच द्रव्य असें नसून ती शौर्याची दर्शक आहे. असा माणूस युद्धकलेंत

प्रसिद्धी मिळवितो व यश संपादन करतो; पण ही स्वच्छ व तांबूस अशी असली पाहिजे व अशी असतांना प्रसिद्धीबरोबरच संपत्तीहि मिळवून देते; परंतु अशीं माणसें तामसी असतात. कधीं कधीं तर ह्या वृत्तीचा अतिरेक होऊन तैमूरलंगासारखीं पशूला लाज आणणारीं अशीं कृत्यें त्यांचे हातून होतात, म्हणजे ते इतके क्रूर असतात. ह्याप्रमाणें त्या रेषेचें त्यांनीं फळ दिलेलें आहे. याशिवाय जशी गोत्ररेषा पाश्चात्यांत नाहीं, त्याचप्रमाणें त्यांचेकडील, रिंग ऑफ व्हीनस, २ सालोमन्स रिंग, ३ रिंग ऑफ सॅटर्न, ४ व्हायालास्कीव्हा ह्या अशा चार रेषा आमच्यांत नाहींत. तेव्हां ह्या चारींचा आपण विचार केला म्हणजे ह्या अनुरेखांचें प्रकरण संपलें असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. तेव्हां आतां आपण त्यांचा विचार करूं.

**( पाश्चात्य-पद्धति. ) रिंग ऑफ व्हीनस-शुक्रकंकण.**

ही रेषा तर्जनीपासून निघून कनिष्ठिकेला येऊन मिळते, म्हणजे शनी व रवीच्या उंचवट्याला पोटांत घेऊन अर्धचंद्राकृती अशी असते. ही वाईट हातावर असेल तर असा माणूस बाहेरख्याली व चंचल वृत्तीचा असतो. चांगल्या हातांत ती मनुष्याला उत्साही बनविते व तो टापटिपीचा असतो. हें चिन्ह हातावर असल्यास बहुधा असा माणूस काव्याचा नादी, लाजाळू, तऱ्हेवाईक व दुर्मुखलेला असा असतो. तसेंच ही धनरेषेला व रवीरेषेला छेदून जाईल तर त्याची संपत्ति ख्यालीखुशालींत नाहींशी होते. बुधाचे उंचवट्यावर जाईल तर तो चोर असतो. विवाह रेषेला मिळेल तर स्त्रीसुख लाभत नाहीं अशी हिचीं फलें आहेत.

**व्हायाला स्कीव्हा-आकाशगंगा.**

ही रेषा दोन तऱ्हेनें हातावर दृष्टीस पडते. एक आरोग्यरेषेबरोबर जोडीनें जाते किंवा शुक्राच्या व चंद्राच्या उंचवट्यावर आडवी अशी असते. हिचें सर्वसाधारण फळ अविश्वास, लुच्चेगिरी असें आहे.

विशेषत: हें फळ ती पिळदार असल्यास असते. ही रेषा आरोग्य-रेषेबरोबर जोडीनें बुधाचे उंचवट्यावर जाईल तर ती वक्तृत्व आणि बुद्धिमत्ता यांच्या जोरावर संपत्ति मिळवून देते; पण जर ही आडवी असेल तर ते स्त्रीलंपटतेचें दर्शक होय.

### रिंग ऑफ सॅटन—शनीचें कंकण.

ही रेषा मधल्या बोटाला उंचवट्यावरून वळसा घालते. ही मोठी अपयशी अशी रेषा आहे. अशा माणसांना कधींहि यश येत नसल्याकारणानें त्याचे सर्व धंदे त्यांना अर्धवट सोडून द्यावे लागतात.

### गुरूचें कंकण.

ही रेषा तर्जनीला वळसा घालते. ही रेषा गूढशास्त्रांचे व्यासंगाची द्योतक होय. पण त्यातल्यात्यांत ती त्याची नैसर्गिक बुद्धी ज्या बाबतींत चालते त्याची निदर्शक होय. ह्याप्रमाणें पौर्वात्याच्या व पाश्चात्यांच्या अनुरेखा असून पहिल्या सात एकच आहेत; पण त्यांपैकीं कांहींच्या फलांत फरक आहे.

## प्रकरण २० व.

# सूक्ष्मरेषा

पूर्वींच्या प्रकरणांत आपण अनुरेखांचा विचार केला. तेव्हां आतां क्रमानें आपणांस विचार करावयाचा म्हणजे उपरेषांचा विचार करावयास पाहिजे; पण ह्या उपरेषा म्हणजे चिन्हें होत; तेव्हां चिन्हांचा विचार करण्यापूर्वीं सूक्ष्म रेषांचाच अगोदर विचार करणें सयुक्तिक आहे. कारण चिन्हें जरी रेषांचींच बनत असलीं तरी त्यांचा आकार बदलून तीं रेषांपेक्षां निराळीं दिसतात; पण तशी स्थिति सूक्ष्म रेषांची नाहीं. त्या रेषा सारख्याच असतात; पण त्या अगदीं क्वचित् आढळतात इतकेंच. तेव्हां चिन्हांचा विचार करण्यापूर्वींच त्यांचा विचार

केला असतां हें रेषांचें प्रकरण व्यवस्थित रीतीनें पूर्ण होईल व मग नुसता चिन्हांचाच विचार राहिला. तो करून हें तुलनेचें प्रकरण संपविण्यास आपणांस सोईस्कर होईल. तेव्हां अगोदर आपण या रेषांचाच विचार करूं. ह्या रेषा बहुतेक दोघांच्या सारख्या नाहींत. तथापि अनुरेखाप्रमाणें जितक्या सारख्या असतील तितक्या अगोदर देऊन मग निरनिराळ्या असलेल्या रेषा मागाहून देऊं. त्या सूक्ष्म रेषांमध्यें मुख्य तीन विभाग असून ते दोघांचेहि सारखेच आहेत व ते मनगटापासून निघणाऱ्या, बोटांच्या पेरांकडील, व इतर किरकोळ असे होत. तेव्हां आतां आपण प्रथम त्या मनगटांच्या रेषांचा विचार करूं.

**मणिबंध रेषा-रिस्ट लाईन्स. ( पौर्वात्य पद्धति. )**

**रेखा मणिबंधा यदि यात्यंगुष्ठप्रदेशिनी मध्यम् ।**
**ऋद्धियुतं स्थापयति विज्ञानविचक्षणं पुरुषम् ॥**
**यदि सैव तर्जनीनां साम्राज्यं मंत्रिपदमथवा ।**
**रेखान्वितात्मविभवां कुर्यात् संभोगिनीं स्त्रियं ॥**
**रेखा युग्मात्यंतलग्ना सुखभोगप्रदा शुभा ।**

या मणिबंधरेषा म्हणजे नुसत्या मनगटावर आडव्या असलेल्याच रेषा नव्हत. तर त्यांत मनगटापासून निघून तळव्यांत जाणाऱ्या उभ्या रेषाहि येतात. त्यांत व इतर रेषांत असा फरक आहे कीं, इतर रेषा तळव्यांत कोठूनहि निघालेल्या असल्या तरी चालतात. पण त्या रेषा मात्र मनगटांतूनच, किंवा तळव्याच्या व मनगटाच्या सांध्यापासून निघतात व तळव्यांत कोणत्याही दिशेनें त्या जातात. म्हणून त्यास मणिबंध रेषा असें शास्त्रकारांनीं योग्य नांव देऊन इतर रेषांचा व ह्यांचा घोंटाळा होऊं नये अशी योग्य व्यवस्था केली आहे. या मणिबंध रेषांतील आडव्या रेषांचा थोडासा विचार पूर्वीं केलाच आहे. तेव्हां आतां या मणिबंधरेषांतील उभ्या रेषांच्या दुसऱ्या विभागाचा विचार करावयाचा राहिला

आहे व त्यांचा व आडव्या रेषांचाही राहिलेला आहे. एवढ्याचा येथें विचार करूं. मनगटापासून निघून जर ती रेषा अंगठा व तर्जनी यांच्यामध्यें जाईल, तर महाज्ञानी होऊन त्याच्या येथें ऋद्धिसिद्धी पाणि भरतील. तसेंच हीच रेषा दोन बोटांमध्यें न जातां तर्जनीवर जाईल तर तो सम्राट् किंवा मुख्य प्रधान होतो. तसेंच स्त्रीच्या हातांत अशीच पण जोड रेषा जाईल ( सिस्टर लाईन्स ) तर तिला वैधव्य न येतां सर्व प्रकारचे सुखोपभोग व ऐषाआराम तिला प्राप्त होतात.

**रेखैका मणिबंधे तु राजभोगी भवेन्नरः**
**यदि द्वे स गुणी वक्ता धनवांश्च भविष्यति**
**सुभगैक परीक्षेया यवमाला यस्य पाणिमूले स्यात्**
**स भवति धनधान्ययुतः श्रेष्ठिजनपूजितो मनुजः**
**करमूले यवमाला द्विपरीक्षेया मनोहरा यस्य**
**मनुजः सराजमंत्री विपुलमतिर्जायते मतिमान्**
**त्रिपरीक्षेया व्यक्ता यवमाला यस्य मणिबंधे**
**नियतं महार्थमतिः स सार्वभौमो नराधिपतिः**

मनगटावर एक रेषा असलेला मनुष्य राजभोग भोगतो व दोन असल्यास तो वक्ता व संपत्तिमान होतो. ज्याच्या मनगटावर एक यवमाला असेल तो पुरुष पूज्य होऊन धनधान्यांनीं युक्त होतो. दोन यवमाला असल्यास तो अति बुद्धिमान व राजमंत्री होतो. तीन असल्यास तो खात्रीनें संपत्तिमान व सार्वभौम राजा होतो.

**यदि तिस्रोऽपरमाला मणिबंधादुभयतो विनिःसृत्य**
**परिवेष्टयन्ति पृष्ठं तदधिकतममिह फलं ज्ञेयम्**
**इहताभिः पूर्णाभिः पूर्णां प्राप्नोति संपदं सदर्शी**
**मध्याभिर्वा मध्यां ऱ्हस्वाभिर्वा पुमान् ऱ्हस्वम्**

जर ही यवमाला मनगटाच्या पाठीच्या भागावर जाईल तर त्याचें अधिक फल जाणावें व ती थोडी असल्यास थोडी, मध्यम

असल्यास मध्यम व पूर्ण असल्यास विपुल संपत्ति मिळते. याप्रमाणें या मणिबंध रेषांची आपल्याकडील फलें आहेत. आतां पाश्चात्त्यांच्या फलाकडे वळूं.

## रिस्ट लाइन्स—मणिबंधरेषा. ( पाश्चात्य—पद्धति. )

ह्या रेषा साधारणपणें तीन असून त्यांस आयुष्यकंकण असें म्हणतात व ह्याचें कारण प्रत्येक रेषा २५ ते ३० वर्षांची द्योतक असते. ह्या रेषांबद्दल असा अनुभव आहे, कीं ह्या रेषा चांगल्या असून आयुष्यरेषा जरी आंखूड असली तरी मनुष्य दीर्घायु असतो. तिन्ही रेषा स्पष्ट व ठळक असल्यास ती संपत्ति, आरोग्य, सुदैव यांची दर्शक असून त्याचें आयुष्य सुखांत जातें. पहिली रेषा सांखळीसारखी म्हणजे आपल्या यवमालेप्रमाणें असल्यास त्या मनुष्यास पुष्कळ दीर्घोद्योगानें पैसे मिळतात. जर सर्वच रेषा वाईट असल्यास तो मनुष्य उधळ्या असतो. ह्या रेषेला मध्येंच फांटा फुटून तो धनरेषेस मिळेल तर तें गर्विष्ठपणाचें व खोटेपणाचें लक्षण समजावें. ह्या मणिबंधापासून रेषा निघून चंद्राच्या उंचवट्यावर जातील तर तें जलपर्यटनाचें द्योतक होय. ह्या रेषेची लांबी व आंखुडपणा ह्यांवरून प्रवासाची लांबी सांगतां येते. ही रेषा थेट गुरूवर जाईल तर त्याला मोठें जलपर्यटन घडतें. हीच रेषा शनीच्या उंचवट्याकडे झुकेल पण त्यावर पोंचणार नाहीं अशी स्थिति असल्यास तो प्रवासाहून परत येत नाहीं. हीच रेषा जर आयुष्यरेषेंत घुसून त्यांत जर मिसळेल तर अशा माणसास प्रवासांत मृत्यू येतो. पण ही आयुष्यरेषेबरोबर जोडीनें जाईल तर अशा माणसास प्रवासांत धोके असतात. पण ते फायद्याचे असतात. हीच रेषा जर बुधवार जाईल तर अकस्मात् संपत्ति मिळण्याचें द्योतक होय. हीच रवीवर गेल्यास ती मोठ्या माणसाचा आश्रय दाखविते. हीच रेषा जर आरोग्यरेषेंत मिळेल तर तें दुःख आणि दारिद्र्याचें चिन्ह समजावें. मनगटापासून निघून ही रेषा मस्तकरेषेपर्यंत जाईल

तर तें खालच्या दर्जांतून वरच्या दर्जास पोचण्याचें लक्षण समजावें. हीच रेषा अंतःकरण रेषेस छेदून वर कोणत्याहि उंचवट्यावर जाईल तर तें विपूल संपत्तीचें द्योतक होय. मनगटावर कधीं कधीं चार रेषा सांपडतात व अशा आढळल्यास तो खात्रीनें शंभर वर्षें जगून ऐष-आराम भोगतो. याप्रमाणें दोन्हांचीं या मणिबंधरेषांचीं फलें आहेत. आतां आपण बोटावरील रेषांकडे वळूं.

### " अंगुली रेखा." ( पौर्वात्य–पद्धति.)

अंगुलीनां पृथक् रेखा गण्यते त्रितयं पृथक्
रेखा द्वादशकं सौख्यधनधान्यप्रदायकं
अंगुलीनां पृथक् रेखा कलनेचेत्रयोदश
महादुःखं महाक्लेशः सामुद्रवचनं तथा
अंगुलीनां पृथक् रेखा गणनेचेच्चतुर्दश
महासुखी महाभोगी सामुद्रवचनं यथा
रेखापंचदशे चोरः षोडशे द्यूतवंचकः
पापी सप्तदशे ज्ञेयो धर्मात्माऽष्टादशे भवेत्
ऊनविंशे भवेन्मान्यो गुणज्ञो लोकपूजितः
तपस्वी विंशता ज्ञेयो महात्मा चैकविंशता

प्रत्येक बोटाच्या प्रत्येक पेऱ्यावर एक एक अशा चारी बोटांवर मिळून १२ रेषा असल्यास तो माणूस सुखी असून धनधान्याची समृद्धि असते. त्या १३ भरतील तर दुःखदायक व कष्टदायी असतात. १४ भरतील तर सर्व वस्तूंचे उपभोग घेतो. पंधरा भरतील तर तो चोर असतो. सोळा भरतील तर जुगारी व याचना करणारा असा असतो. सतरा भरतील तर पापी व अठरा भरतील तर तो धर्मनिष्ठ असतो. त्या एकोणीस असतील तर गुणज्ञ व लोकमान्य होतो. वीस असल्यास तपस्वी व एकवीस असल्यास तो महात्मा होतो.

**अंगुलीनां पर्वमध्ये सांगुष्ठं चाग्रपर्व च**
**परित्यज्यांगुली पर्वरेखागणनतो यतः**
**चतुरंगुलिका पर्वाण्यष्टरेखायुतानि चेत्**
**शुभयोगयुतो भूयाद्धनवांश्च भविष्यति**

बोटांचीं अग्रें सोडून पहिलीं दोन दोन पेरीं अशीं चारी बोटांच्या आठी पेऱ्यांवर मिळून जर बत्तीस रेषा असतील ( म्हणजे प्रत्येक पेऱ्यावर चार चार याप्रमाणें ) तर तो धनवान व सुखी होतो.

**तत्रैक त्रिंशतिस्याच्च दुःखवांश्च भविष्यति**
**त्रयस्त्रिंशच्च षट्त्रिंशद्धन लक्ष्मीसहाय्यवान्**

अंगठा आणि बोटें यांचीं अग्रें सोडून बाकीच्या पेरांवर एकतीस रेषा असतील तर तो दुःखी असतो व तेहतीस व छत्तीस असल्यास त्या लक्ष्मीदायक जाणाव्यात. याप्रमाणें या बोटांवरील रेषांची आपल्या-कडील फलें होत. आतां पाश्चात्यांचीं पाहू.

## पाश्चात्य पद्धति.

## दी साईन्स अपॉन् दि फिंगर्स–अंगुली रेषा.

बोटांच्या पहिल्या म्हणजे नखाच्या पेरावर रेषा असतील तर तें दुर्बलतेचें लक्षण समजावें. ह्या पेऱ्यांवर नुसती एक एक खोल रेषा असेल तर तें लहरी स्वभावाचें द्योतक होय. ह्या पेऱ्यावरील रेषांचा व दुसऱ्या पेऱ्यावरील रेषांचा मिलाफ होईल तर तो कांहीं तर्क आणि कांहीं व्यवहार याला अनुसरून काम करतो व तिसऱ्या पेऱ्यांचाहि मिलाफ झाल्यास तो सर्व गोष्टी व्यवहाराला धरून करणारा असा असतो. प्रत्येक पेऱ्यावर बारीक व आंखूड अशी एक एक रेषा असेल तर तें अपघाताचें द्योतक आहे. सबंध बोटांवर लांब लांब रेषा असल्यास तें उत्साही व व्यवस्थितपणाचें द्योतक समजावें व अडव्या रेषा असल्यास त्या त्या फलांत वैगुण्य समजावें.

**तर्जनी**—हिच्या तिसऱ्या पेऱ्यावर आडव्या उभ्या रेषा असतील तर तें वारसाहक्काची धनप्राप्ति दाखविते. दुसऱ्या बोटावर असल्यास मत्सरी असतो व पहिल्या पेऱ्यावर सबंध पेऱ्याला वळसा घातलेल्या अशा रेषा असल्यास तें डोक्याला जखम होण्याचें लक्षण समजावें.

**मध्यमा**—मधलें बोट. शनीच्या उंचवटच्यावरून एक रेषा निघून ती बोटाच्या पेऱ्यांत घुसेल तर तें लष्करी पेशांत भरभराट दाखवितें; पण तीच रेषा चंद्रकोरीप्रमाणें बांक घेईल तर त्यास लढाईत मृत्यू येतो.

**अनामिका**—ह्या बोटावर तिन्ही पेऱ्यांवर मिळून एक सबंध रेषा असेल तर तो मनुष्य फार प्रसिद्धीला येतो. परंतु पुष्कळ रेषा असल्यास त्याला नुकसान येतें व बहुधा त्याला कोणीतरी स्त्री कारण असते. ह्या बोटाच्या तिसऱ्या म्हणजे तळाच्या पेऱ्यावर सरळ रेषा असल्यास तें सौख्य व दूरदर्शीपणाचें द्योतक होय. त्या पेऱ्याच्या एका बाजूस असल्या तर तें मोठें यशाचें लक्षण समजावें. पण त्यांत संपत्तीचा कांहीं संबंध नसतो. त्याच रेषा जर रवीच्या उंचवटच्यावर येतील तर त्याला विपुल संपत्ति मिळते; पण असा माणूस फार बोलका व उद्धट असतो. ह्या तिसऱ्या पेरांतून एक रेषा निघून दुसऱ्या पेरावर जाईल तर असा माणूस सुदैवी, हुषार व सुस्वभावी असतो व ह्यावर अडव्या रेषा असल्या तर ते अडथळे सुचवितात.

**कनिष्ठिका**—अंगुली. ह्या बोटाच्या तिन्ही पेरांवर सबंध एक रेषा असेल तर असा माणूस समतोल असून त्याला शास्त्रांत यश येतें व तीन असल्या तर तो व्यापारविषयक व गूढ शास्त्रांत शोध लावतो, हेंच दुसऱ्या पेरावरील रेषांचेंही समजावें. पण ह्या रेषा अडव्या रेषांनीं छेदल्या गेल्यास तें बाहेरख्यालीपणाचें द्योतक होय. पहिल्या पेऱ्यावर जर खोल रेषा असतील तर प्रकृति अशक्त असते.

हीच तिसऱ्या पेऱ्यांतून दुसऱ्या पेऱ्यांत रेषा जाईल तर तो वक्ता व यशस्वी असतो. त्या रेषेला पीळ असल्यास तो चलाख व स्वतःची बाजू संभाळणारा असा धूर्त असतो. हीच रेषा बुधाचे उंचवट्यावरून निघून पेऱ्यांत जाईल तर तें खात्रीनें भरभराटीचें व यशाचें चिन्ह समजावें. जर तिसऱ्या पेरावर एक जाड रेषा असेल तर तें चौर्यलक्षण होय.

आंगठा—बोटाप्रमाणें आंगठ्यावर रेषा फारशा आढळत नाहींत. तथापि त्या क्वचित् आढळतात. जर नखाच्या पहिल्या पेरावर सबंध पेरभर लांब लांब रेषा असतील तर तो अंतःकरणापासून प्रेम करणारा असतो. तसेंच आंगठ्यावर अडव्या रेषा असणें हें श्रीमंतीचें लक्षण समजावें. जर शुक्राच्या उंचवट्यांतून रेषा निघून अंगठ्याच्या पहिल्या पेऱ्यांत जातील तर तो सर्वांना प्रिय असतो. दोन्ही पेरांच्या सांध्यावर सबंध बोटाला वळसा घालणारी रेषा असल्यास त्याला फांशीनें मृत्यू येतो. याप्रमाणें पाश्चात्यांचीं फलें आहेत. आतां इतर पण फारच क्वचित् सांपडणाऱ्या रेषांचा विचार करूं.

विनांगुष्ठ मधःसच्चेदंगुलीनामृजुद्वयं
संसारी लक्षणं ब्रूते विपरीते विपर्ययः
क्रीडाविद्याभोगपुण्यफलमन्यादिकीर्तितं
सूक्ष्माभ्यामृजुरेखाभ्यां तद्वये भंगसंभवः

अंगठ्यावांचून इतर चारी बोटांच्या तळाच्या पेरावर दोन दोन जुळया रेषा असल्यास त्यांचा संसार सुखानें होतो व त्या बिघडल्यास दुःखावह होतो. करांगुलीच्या तळाशीं दोन रेषा असल्यास बाळपणापासून सुख, अनामिकाच्या खालीं असल्यास विद्या, मधल्या बोटाच्या खालीं असल्यास उपभोग, तर्जनीच्या खालीं असल्यास धार्मिक कृत्यें करून पुण्यसंचय असें यांचें फळ आहे. पण यावर आडव्या रेषा नसाव्यात.

**अंगुष्ठेचोर्ध्वरेखा तु वर्तते नृपतिः शुभा**
**सेनापतिर्धनेशश्च मध्यमायुर्भवेन्नरः**

अंगठ्यामध्यें उभी रेषा असल्यास तो भाग्यशील असतो; पण मध्यमायुषी असतो.

**कनिष्ठा मूल रेखा तु कुर्याच्चैव शतायुषं ।**
**अनामिका मध्यमाभ्यामंतरा लग्नगा सति ॥**

करांगुलीच्या तळाशीं जर एक रेषा असेल तर तो शतायुषी होतो व अशीच रेषा वरून खालीं पडते आहे अशी अनामिका व मधलें बोट यांच्या तळाशीं असेल तर पुरुष असल्यास सत्यवादी, धर्मशील व जगमान्य होईल व स्त्री असल्यास पतिव्रता होईल. या करांगुलीच्या खालीं जितक्या रेषा असतील तितक्यांचीं फलें पुढील-प्रमाणें जाणावीं. एक असल्यास यज्ञकर्ता, दोन असल्यास दाता, तीन असल्यास धर्मशील, चार असल्यास पंडित, पांच असल्यास साधारण ग्रामाधिपति सरदार असा होतो. सहा असल्यास सुखी, सात असल्यास मध्यम सुखी होतो. याप्रमाणें आपलीं फलें झालीं, आतां पाश्चात्यांचीं पाहूं.

## पाश्चात्य पद्धति.

एक रेषा आयुष्यरेषेपासून निघून गुरूचे उंचवट्यावर जाऊन मग वळून शनीचे उंचवट्यावर जाईल तर तो मनुष्य शोकी व गुलहौशी असतो. हा माणूस धार्मिक असल्यास त्याचीं सर्व कृत्यें प्रसिद्धी मिळविण्याच्या हेतूनें चाललेलीं असतात. तसेंच मंगळाचे उंचवट्यापासून एक रेषा निघून ती अंत:करणरेषेला समांतर अशी जाऊन रवीचे उंचवट्यावर जाईल तर त्यांची कीर्ती-करितां फार धडपड चाललेली असते व तो कसेंहि करून ती मिळवितो. अशीं माणसें फार धीट असततात. म्हणून ती रेषा योद्धे, वक्ते, नट यांच्या हातांवर सांपडते. शुक्राचे उंचवट्यावर

ताऱ्यापासून कांहीं रेषा निघाल्यास ते आवडत्या माणसाचा मृत्यू दर्शवितात. शुक्राचे उंचवट्यावरून दोन सारख्या जोड रेषा निघून मंगळाचे उंचवट्यावर गेल्यास एकाच वेळीं दोन माणसांशीं प्रेमविषयक व्यवहार चालू असतात व त्याच्या बुडाशीं तारा असल्यास शेवटीं त्यांत फसगत होते. जर अंतःकरणरेषा सांखळीसारखी असेल व शुक्राचे उंचवट्यांवरून एक रेषा निघून बुधाचेखालीं जाऊन मिळेल तर त्याला कजाग स्त्री मिळून त्यांचें सर्व आयुष्य दुःखांत जातें व ह्यावर बिंदु असल्यास त्यांना विधुरावस्था किंवा वैधव्य प्राप्त होतें. एक रेषा शुक्राचे उंचवट्यावरून निघून जर रविरेषेला छेदील तर तें दुर्दैवाचें लक्षण समजावें. आयुष्यरेषेवर लहान लहान पुष्कळ रेषा असतील ( उभ्या ) तर तें फार त्रासाचें लक्षण समजावें. ह्यावेळीं मित्र शत्रू होतात व ह्याला कारण वादविवाद असतो. ( पण नखें आंखूड पाहिजेत. ) शुक्राचे उंचवट्यावर ताऱ्यापासून निघून शनीचे उंचवट्याखालीं जाऊन जर तिला फाटे फुटतील तर त्याला विवाहापासून सुख लागत नाहीं. जर शुक्राच्या उंचवट्यापासून एक रेषा निघेल व तळव्यांत कोठेंहि एका चौकोनांत तिचा शेवट होईल तर तें व्यभिचारी व कजाग बायकोच्या हातून मिनतवारीनें सुटण्याचें लक्षण समजावें. शुक्राचे उंचवट्यावर ताऱ्यापासून एक रेषा निघून जर ती रवीचे उंचवट्यावर जाईल व शेवटाला एक बारीक रेषा तिला छेदील तर तें जवळच्या श्रीमंत नातलगाचा मृत्यू होऊन वारसाहक्कानें खूप संपत्ति मिळण्याचें चिन्ह समजावें. बुधाचे उंचवट्यावर अडव्या पुष्कळ रेषा असल्यास तो हलक्या कानाचा व चंचल वृत्तीचा असतो. एक रेषा मनगटाकडून निघून शुक्राचे उंचवट्यावरून तळव्यांत जाईल व टोंकाला तारा असेल तर त्याच्या आवडत्या माणसाचा मोठ्या विलक्षण रीतीनें विरह होतो. एक रेषा मस्तक रेषेपासून निघून गुरूच्या उंचवट्यावरून पलीकडे जाऊन

ताऱ्याला मिळेल तर तें तिशीला अपघातानें मृत्यू दाखवितें. जर ह्या पुरुषावर शुक्राचा अंमल असेल तर त्यास विषानें, चंद्राचा असेल तर बुडून, रवीचा असेल तर अग्नीनें, मंगळाचा असेल तर अस्त्र-स्त्रानें, गुरूचा असल्यास घोड्यावरून पडून व बुधाचा असल्यास पैशाचे नुकसानीनें मृत्यु येतो. याप्रमाणें पाश्चात्यांचीं फलें आहेत. येणेंप्रमाणें सूक्ष्म रेषांचा विचार संपला व त्याबरोबरच सर्व रेषांचाहि विचार संपला असल्याकारणानें आतां फक्त उपरेषांचा म्हणजे चिन्हांचा विचार राहिला. तो पुढील प्रकरणांत करूं.

## प्रकरण २१ वें.

God has placed signs in the hands of all men, that everyman may know his work.

प्रत्येक व्यक्तीला या जगांतलें त्याचें कार्य काय आहे हें कळावें म्हणूनच विधात्यानें मनुष्यांच्या हातांवर चिन्हांची योजना केली आहे.

हीं चिन्हें फार महत्त्वाचीं असल्यामुळें ह्यांचेकडे विशेष लक्ष पुरविलें पांहिजे. कारण ह्यांचीं फलें अगदीं स्वतंत्र असून तीं हातांवरील रेषा व उंचवटे यांच्या फलांमध्यें फार फरक करतात. फरक करतात म्हणण्यापेक्षां त्यांचीं फलें बहुतेक नष्टप्राय होऊन त्यांचे-ऐवजीं ह्या चिन्हांचाच अम्मल सुरू होतो असें म्हणणेंच रास्त होय. पण अशींहि चिन्हें हातांवर फारच क्वचित् दृष्टीस पडतात. हीं चिन्हें आपल्याकडे सुमारें १२० पर्यंत आहेत व पाश्चात्यांकडे सुमारें ३२ आहेत. तसेंच त्यांचीं व आपलीं सारखीं अशीं चिन्हें सुमारें १९ असून बाकीच्या चिन्हांपैकीं ग्रह व राशी यांच्या खुणा आढळतात असें दोघांनीं मान्य केलेलें आहे. पण दोघांच्या ह्या ग्रहांच्या व राशींच्या बहुतेक खुणा अगदीं निराळ्या असून त्यांपैकीं पाश्चात्यांच्या खुणा बहुतेक हातांवर सांपडण्यासारख्या

असून त्या तशा सांपडल्याचे उल्लेख त्यांनीं नमूद करून ठेविले आहेत. **आपल्याकडेही ग्रहांच्या, राशींच्या चिन्हांचा व खुणांचा संबंध हातावरील रेषा-चिन्हाशीं पूर्णपणें आहे ही गोष्ट कै० बाबाजीराव पटवर्धन महाडकर ज्योतिषी यांनीं अखिल हिंदुस्थानांत प्रत्यक्षानुभवानें सिद्ध केली आहे.**

आतां ग्रहांचीं व राशींचीं जीं स्वरूपचिन्हें म्हणून दिलीं आहेत तीं हातांवर सांपडणें कष्टप्रद असतें. पहिलीं १९ चिन्हें व हीं ग्रहांचीं व राशींचीं इतकीं चिन्हें सोडून दिलीं तर त्यांशिवाय पाश्चात्त्यांकडे आणखी अधिक चिन्हें नाहींत. त्यांशिवाय आपलेकडे आणखी बरींच चिन्हें आहेत. पण त्यांतलीं कांहीं सांपडणें संभवनीय आहेत व कांहीं सांपडणें अवघड दिसते. या चिन्हांबद्दल कांहीं विशिष्ट नियम दिलेले आहेत काय हें पाहिलें असतां पाश्चात्त्यांनीं तसा नियम दिलेला नाहीं; पण त्यांनाहि आढळलेलीं चिन्हें त्यांनीं तशीच दिलेलीं आहेत. तसेंच आपल्याकडील चिन्हांचा विचार करतां आपल्या शास्त्रकारांनाहि जीं कांहीं आढळलीं तीं त्यांनीं दिलींच आहेत. त्याबद्दलच्या नियमांचीहि त्यांना कल्पना होती असें स्पष्ट होतें. कल्पना म्हणण्यापेक्षां त्यांचा नियमच त्यांनीं बांधला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांनीं नियम बांधला होता असें म्हणण्याचें कारण असें आहे कीं, त्यांनीं ह्या चिन्हांचा उल्लेख करतांना व त्यांचीं फलें देतांनाहि ( धनुर्घटादिका रेखा, मीनसमारेखा, चित्ररेखा विनिर्दिशेत्, सिंहासनादिकं ज्ञेयं रेखातोराजलक्षणं ) चित्ररेषा, धनरेषा, मच्छाकृतिरेषा असे शब्द योजले असून या रेषा राजलक्षणाच्या वगैरे समजाव्या असें सांगितलें आहे. म्हणजे हातांवर असणारीं चिन्हें रेषामयच असतात, व असलीं पाहिजेत असें त्यांनीं ठरविलें असल्याशिवाय अशा रीतीनें त्या चिन्हांचा उल्लेख होणें शक्य नाहीं. तेव्हां हीं चिन्हें हातांवरील रेषांच्या संयोगानें

बनतात व अशा विशिष्ट संयोगालाच चिन्ह म्हणून समजावें व त्याचीं फलेंहि विशिष्ट असतात असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें आहे. आतां असा नियम दिला असतां त्या नियमाला सोडून जी असंभाव्य अशा चिन्हांची यांत भरती झाली ती कां, असा एक प्रश्न उत्पन्न होतो. अशीं कष्टप्रद चिन्हें ग्रंथकारांनीं कशीं दिलीं त्याचा विचार करतां त्यांचें कारण आरंभाला सांगितल्याप्रमाणें सामान्य समजुती हेंच होय, व तें तसें असल्याबद्दल स्पष्ट दिसतें. उदाहरणार्थ, गजान्त लक्ष्मी ही राजाच्या येथें असते तशीच इतर राजधारणाचीं चिन्हें जीं जीं राजाला अवश्य असतात तीं त्याच्या हातावर असलींच पाहिजेत. शूर असल्यास त्याच्या हातांत एकादें हत्यार असलेंच पाहिजे. धार्मिक असल्यास तसलीं चिन्हें, दरिद्री असल्यास तसलीं चिन्हें असलींच पाहिजेत अशा समजुतीवर तीं त्यांनीं दिलीं असावी; पण त्या वेळीं त्यांची अशी एक नजरचूक झाली कीं हीं चिन्हें रेखांच्या संयोगानें बनतात हें जें शास्त्रीय तत्त्व त्या नियमाला अनुसरून तरी आपण देत असलेलीं चिन्हें आहेत काय हें पहाण्याचें त्यांच्या लक्षांत राहिलें नाहीं व त्यामुळें हत्ती, घोडा, सिंहासन वगैरे राज-लक्षणें; देवालय, गोपुर हीं संतलक्षणें; तरवार, भाला बर्ची, इत्यादि आयुधें हीं शौर्यलक्षणें; हलादिक हीं कृषीचीं; वीणा ही गायनाचीं, पुस्तकें पांडित्याचीं, गाढव, म्हैस, घुबड, उंट, वगैरे दारिद्र्याचीं; अशीं जीं जीं चिन्हें ज्या ज्या फलांचीं दर्शक म्हणून त्या वेळीं समजूत होती तीं तीं सर्व ह्या ग्रंथांत त्यांनीं दिलीं व त्याच्या शेवटीं ह्या ह्या रेषांवरून हीं हीं फलें समजावीं असें सामान्यतः सांगून दिलें. पण आपण देत असलेलीं हीं घोडा, गाढव, कोल्हा, नंदीबैल अशीं ह्या रेषांचीं चिन्हें होणें शक्य आहे काय, एवढा जर विचार केला असतां तर हा विरोध त्यांचे लक्षांत येऊन त्यांनीं नियमाला धरून व हातावर आढळणारीं तेवढींच चिन्हें दिलीं असतीं; पण चिकित्सक प्रवृत्तिकडे

दुर्लक्ष झाल्यामुळें असें होणें स्वाभाविक आहे व त्याप्रमाणें झालें आहे. तथापि तीं त्यांना आढळलीं असें मानून आपण चालूं व आपल्याला तीं तशीं आढळल्यास आपला गैरसमज किंवा दोष कबूल करूं व आढळलीं नाहींत तर तसें निर्धारानें व निःशंकपणें लिखितकरूं. पण आजपर्यंतच्या आमच्या अनुभवास ह्यांतलें एकहि चिन्ह आढळलें नाहीं. त्यावरून हीं असलीं चिन्हें सांपडणें अशक्य दिसतें. असो. आतां आपण हीं चिन्हें कशीं असतात व त्यांचीं फलें काय काय आहेत त्यांकडे वळूं. या चिन्हांची दोहोंकडील तुलना क्रमशः देतां येणें शक्य नाहीं व याचें कारण असें आहे कीं, आपल्याकडे या चिन्हांचा एक एक समूह ( ग्रूप ) करून त्यांचीं फलें दिलीं आहेत. तेव्हां त्यांतील एक एक वेगळें काढून दोहोंची तुलना करणें त्रासाचें आहे. येथें फक्त दोहोंकडील सारख्या चिन्हांची तेवढीच तुलना करून बाकीचीं आपल्याकडील राहिलेलीं चिन्हें व त्यांचीं फलें देऊन मग पाश्चात्त्यांचीं चिन्हें व फलें देण्याचें आम्हीं योजिलें आहे व त्याप्रमाणें आतां आपण प्रथम सारख्या चिन्हांचा विचार करूं.

## पौर्वात्त्य पद्धति.

१ **बिंदु**—ह्या बिंदूचे आपल्याकडे तीन प्रकार केले आहेत, ते लहान ठिपके, तीळ व माष म्हणजे उडीदाच्या आकाराचा बिंदु, हा माष नेहमींच काळा असतो. तसें मात्र तिळाचें नसतें. ते काळे, लाल, धुरकट, पांढरे अशा रंगाचे असतात. हे बिंदु आपल्याकडे शरीराचे इतर भागांवर व नखावर असतांना काय काय फलें मिळतात याचा विशेष उहापोह केलेला आहे, तसें हातावरील बिंदूचें विवरण केलेलें नाहीं. त्यांनीं फक्त एके ठिकाणींच उल्लेख केलेला आहे व तो पुढीलप्रमाणें आहे. स्त्रीच्या डाव्या हातावर तीळ असल्यास तिला पहिला मुलगाच होतो. तसेंच हा बिंदु उडदाच्या

आकारासारखा तळव्यावर असेल तर तो मनुष्य फार बुद्धिवान् व सर्वविद्याप्रवीण होतो. नखावरील बिंदूचें वर्णन मागें दिलेंच आहे. शरिराच्या इतर भागांचा येथें कांहीं संबंध नसल्यामुळें त्यांचीं फलें येथें देण्याचें प्रयोजन नाहीं.

## पाश्चात्त्यांच्या पद्धति.

दि स्पॉट–बिंदु—हे बिंदू कोणत्याहि वर्णाचे असतात व ते शरिराच्या हाताच्या कोणत्याहि भागावर आढळतात व ते नेहमीं दुःखाचें दर्शक असतात. तें रेषेवर असल्यास बहुधा जखम होण्याचें द्योतक असतात. मस्तकरेषेवर आढळल्यास तें डोक्याला जखम होण्याचें दर्शक असतें, पण बहुधा तो माणूस अप्रबुद्ध असतो. पण हे बिंदू पांढरे असून तें अंतःकरणरेषेवर असल्यास तें प्रेमबद्धतेचें (स्त्रीलंपट) व मस्तकरेषेवर असल्यास तें शास्त्रीय शोधाचें दर्शक होय. हेच ठिपके तांबडे असल्यास जखमा, काळे व निळसर असल्यास तें रोगाचें–बहुधा लाजाळूपणाचें–द्योतक होय. ह्या सर्व वर्णांत पांढरे ठिपके त्रासदायक नसतात असें समजावें. तसेंच हे ठिपके बुधाच्या उंचवटयावर असल्यास शास्त्रीय शोध, व विवाहरेषेवर तीळ असल्यास विकारावस्था दाखविते. रवीच्या उंचवटयावर असल्यास वाङ्मय व शनीचे उंचवटयावर असल्यास तें एखाद्या गोष्टींत बुद्धीमत्तेच्या जोरावर अचुक अंदाज बांधण्यांत विलक्षण यश मिळवून देतें. याप्रमाणें पाश्चात्त्यांचें या बिंदूचें फल आहे. (प्रकरण ११ वे पिटक लक्षण पहा.) आतां वर्तुळाचा विचार करूं.

## पौर्वात्त्य पद्धति.

२ चक्र अथवा वर्तुळ—हीं वर्तुळें आपल्याकडे पांच तऱ्हेचीं सांगितलीं आहेत. एक वाटोळें, आपण नेहमीं काढतों तसें व दुसरें कंकण म्हणजे बांगडीसारखें व तिसरें ठिपक्याचें व माळेसारखें लांबट अशीं तीन वर्तुळें होत. ह्यांशिवाय ज्याला आपण चक्र म्हणतों तें

वर्तुळच होय. पण ह्या वर्तुळांत तीन तऱ्हा केलेल्या आहेत. एक हातावरील व दुसरी बोटांवरील. हातावरील चक्रांत दोन तऱ्हा–एक साधी वर्तुळासारखीच; त्याला हातावरील चक्र म्हणतात. दुसऱ्या वर्तुळास चित्ररेखा व रथचक्र म्हणतात. पहिल्या वर्तुळामध्यें गाडीच्या चाकासारख्या चारच अऱ्या असतात व चक्राच्या भोंवतालीं ठिपके असतात. व दुसऱ्यांत चारापेक्षां जास्त अऱ्या असून ठिपके नसतात. तिसरी रविरेषा. त्यांत मध्यें बिंदु असून भोंवतालीं वर्तुळ असतें. त्याशिवाय बोटावरील चक्र हें एकाच रेषेचें वेटोळें असतें. त्याचप्रमाणें त्या वर्तुळाचे आपल्याइकडे इतके प्रकार कल्पिले आहेत, तसें पाश्चात्त्यांत माहीत. त्यांचेकडे फक्त साधे वर्तुळ व रविरेषा असे दोनच प्रकार आहेत. त्यांचीं फलें पुढीलप्रमाणें दिलीं आहेत. वर्तुळ कंकण-माला व चक्र असल्यास प्रभुत्व व राजलक्षण समजावें. चित्ररेखा असल्यास पांडित्यलक्षण समजावें. व रथचक्र असल्यास देशाधिपति होईल. आतां बोटांवरील चक्राचा मात्र पुढीलप्रमाणें बराच विचार केलेला आहे.

एकचक्रः सदाभोगी द्विचक्रो राजपूजितः
धनाढ्यस्तु त्रिभिश्चक्रैश्चतुश्चक्रो दरिद्रकः
विलासी पंचचक्रेण षट्चक्रेण सकामुकः
सप्तचक्रेण शुभवान् अष्टचक्रेण रोगवान्
भूपालो नवचक्रेण दशचक्रेण योगवान्
एवं चक्रफलं दृश्यं सामुद्रवचनं यथा

एक चक्राचा सुखोपभोगी, दोन चक्रें असणारा राजपूजित, तीन असणारा धनाढ्य, चार चक्रांचा दरिद्री, पांच असणारा विलासी, सहा चक्रांचा कामुक, सांत चक्रांचा यशस्वी, आंठ चक्रांचा रोगी, नऊ चक्रांचा भूपाल व दहांचा योगी अशी या वर्तुलांचीं आपल्या-कडील फलें आहेत.

## पाश्चात्त्य पद्धति.

दि सर्कल (वर्तुळ)— हें वर्तुळ फार कमी सांपडणारें व अशुभ असें मानलें आहे; पण तें फक्त रवीच्या उंचवट्यावर तेवढें शुभ मानतात. ह्या उंचवट्यावर हें असल्यास तें यश व भरभराट दाखवितें. हें चंद्राचे उंचवट्यावर आढळल्यास ती पाण्यांत बुडून मृत्यु येण्याच्या संकटाची खूण समजावी. कोणत्याही रेषेवर असणें वाईट. अंतःकरणरेषेवर असल्यास त्याचें हार्ट वुईक असतें आणि मस्तकरेषेवर एक असल्यास व आयुष्यरेषेवर दोन असल्यास अंधत्वाचें द्योतक होय. ह्याप्रमाणें पाश्चात्यांचीं ह्या वर्तुळाचीं फलें आहेत. आतां आपण कर्तर म्हणजे कात्री (क्रॉस) या चिन्हाचीं काय फलें दिलीं आहेत तीं पाहूं.

## पौर्वात्त्य पद्धति.

३ कात्री —ह्या कात्रीचे आपल्याकडे तीन प्रकार केले आहेत. त्यांच्यासंबंधीं आतां विचार. वास्तविक एकमेकांवर दोन रेषा अडल्या असल्या म्हणजे कात्री झाली; पण तिच्या प्रत्येक स्थितीचें फळ आपल्याकडे दिलें आहे. ते प्रकार—गोपूररेखा, विद्यारेखा व कर्तरी असे आहेत व ह्यांचीं फलें अनुक्रमें येणेप्रमाणें आहेत. गोपूररेखा धार्मिकता, विद्यारेखा, पांडित्य व कात्री वाईट अशी धरली असून ही धनरेषेवर असल्यास त्यास पैशाची ठोकर लागते व तीन कात्र्या असल्यास तो दरिद्री समजावा.

## पाश्चात्त्य पद्धति

कात्री क्रॉसः—कात्री हें चिन्हहि वर्तुळाप्रमाणेंच अशुभ असून तें त्रास, निराशा वगैरेचें द्योतक होय; पण वर्तुळ ज्याप्रमाणें रवीच्या उंचवट्यावर शुभफल देतें, त्याचप्रमाणें हें चिन्ह गुरूवर असल्यास शुभ फल देतें. व ते लग्नाच्या योगानें भाग्य मिळण्याचें द्योतक होय. हें चिन्ह बहुतेक; असलेल्या परिस्थितींत फरक होण्याचें लक्षण

समजावें. रविरेषेवर कात्री असल्यास तें संपत्तीचें दर्शक समजावें. बुधाच्या उंचवट्यावर असल्यास तें अप्रामाणिकपणाचें व चोरटेपणाचें. मंगळाचे असल्यास तें तंटेखोर व उद्धटपणाचें. चंद्राचे उंचवट्यावर असल्यास खोटेपणाचें. मस्तकरेषेवर असल्यास मृत्यूचें व ह्या ठिकाणीं ती रेषा तुटलेली असल्यास मृत्युवत् जखमेचें द्योतक समजावें. या कात्रींत मिस्टिक क्रॉस म्हणून एक भाग केला असून हें चिन्ह अंतःकरण व मस्तकरेषा यांच्यामध्यें असतें; व तसें असलें म्हणजे गूढशास्त्रांत त्याची उपजत मति चालते हें त्याचें फल आहे. याप्रमाणें त्यांचीं फलें आहेत. आतां ताऱ्याचा विचार करूं.

पौर्वात्य पद्धति

४ तारा-फुली— या चिन्हांत आपलेकडे कांहीं भेद केले नसून हें शुभ चिन्ह असून संपत्ति हें त्यांचें दर्शक आहे. इतकेंच त्याबद्दल आपल्या शास्त्रकारांनीं लिहिलें आहे.

पाश्चात्त्य पद्धति

४ स्टार-( तारा )—हें चिन्ह कांहीं ठिकाणीं जरी वाईट फल देतें तरी हें शुभ चिन्ह असून बहुतेक ग्रंथकार हें शुभ चिन्ह मानतात; पण याचें फल बहुतेक अटळ असतें. हें चिन्ह गुरूचे उंचवट्यावर असलें तर महत्त्वाकांक्षा, सुदैव, सन्मान व यश यांचें द्योतक असतें व ह्याला जर कात्रीची जोड मिळेल तर तें भाग्यशाली, विवाहाचें व त्यापासून मोठ्या योग्यतेस चढण्याचें द्योतक समजावें. शनीच्या उंचवट्यावर मात्र हें फार वाईट फल देतें. त्याच्या योगानें खुनासारखे फौजदारी गुन्हे त्याचे हातून होऊन तो फासावर लटकला जातो रवीच्या उंचवट्यावर हें चिन्ह असल्यास तें संपत्तीदर्शक असतें; पण ह्याचे जोडीला रविरेषा नसेल तर संपत्ति मिळते; पण सुख लागत नाहीं. व रविरेषा किंवा इतर रेषांची जोड मिळाल्यास त्यास संपत्ति, सुख व कीर्ति हीं सर्व मिळतात. बुधाचे

व मंगळाचे उंचवट्यावर कात्रीचीं व ह्याचीं फलें एकच होत. शुक्राचे उंचवटयावर बाहेरख्यालींत पैसे गमाविण्याचें द्योतक होय. हें चिन्ह चारी बोटांपैकीं कोणत्याहि बोटाच्या पहिल्या पेरावर, विशेषतः मधल्या बोटावर, असल्यास तें आकस्मिक भाग्याचें किंवा वेडाचें लक्षण समजावें. तिसऱ्या पेरावर असल्यास तें खुनाचें द्योतक समजावें. चंद्राच्या उंचवटयावर असल्यास तें जलोदराचें व प्रवासरेषेवर असल्यास बुडून मृत्यूचें द्योतक होय. हें चिन्ह तळव्याचे मधोमध असल्यास तो बाईलबुद्धीचा असतो. हें चिन्ह रविरेषेच्या तळास असल्यास तें तारुण्यांत आईबापांकडून नुकसान पोंचवितें. तसेंच ह्याच्याच जोडीला शुक्राचे उंचवटयावर आणखी एक तारा असेल तर त्याचे लहानपणीं आईबाप मरतात. ह्याप्रमाणें पाश्चात्यांनीं ह्याचीं फलें दिलीं असून हें महत्त्वाचें चिन्ह मानलें आहे. आतां आपण चौकोनाकडे वळूं.

पौर्वात्त्य पद्धति

९ **चौकोन ( चत्वर )**--चौकोनाचे आपल्याकडे तीन प्रकार केले आहेत, ते समचौकोन, विषम चौकोन व दीर्घ चौकोन होत आणि त्यांचीं फळें शिल्पी किंवा सेवक अशीं आहेत.

पाश्चात्त्य पद्धति

९ **दि स्केअर ( चौकोन )**—हें चिन्ह सारासारविचार, शांतचित्त व निर्विकार न्यायबुद्धीचें द्योतक असून तें ज्या ठिकाणीं असेल त्या फलाची वृद्धि करते. हें नेहमींच अगदीं बरोबर चौकोनी असतें असें नाहीं; तर त्याचें कोण विषमहि असतात व हे नेहमीं वाईट चिन्हावर असल्यास त्याच्या दुष्परिणामापासून माणसाचें रक्षण करतें. उदाहरणार्थ, आयुष्यरेषा तुटलेली असून त्यावर हें चिन्ह असल्यास तें आजारांतून बरें होण्याचें लक्षण समजावें. धनरेषा बिघडली असून त्यावर हें चिन्ह असल्यास, सांपत्तिक

अडचणींतून बाहेर काढतें. तसेंच शनीच्या उंचवट्यावर तारा असून त्याचेभोंवतीं जर चौकोन असेल तर त्याला वाईट फलांतून ( खुनांतून ) वांचवतें. तसेंच आपल्या चित्ररेखेप्रमाणें चौकोनाच्या चारी बाजूंस जर चार तांबडे टिपके असतील तर तें आगीपासून निवारण करतें; परंतु ह्या चौकोनाचे एकाच ठिकाणीं वाईट फल मिळतें तें शुक्राचे उंचवट्यावर होय. ह्या उंचवट्यावर आयुष्यरेषेच्या आंत तिला चिकटून हें चिन्ह असल्यास तें तुरुंगवासाचें द्योतक होय. आतां आपण त्रिकोणाचा विचार करूं.

## पौर्वात्य पद्धति

६ **त्रिकोण**--ह्या त्रिकोणाचें फल धनवान व सुखी असें दिलें आहे. आपल्याकडे ह्या त्रिकोणाशिवाय पंचकोण, अष्टकोण असे आणखी दोन दिलें असून त्यांचीं फलें वरीलप्रमाणेंच आहेत. शिवाय त्याचे हातून धर्मार्थ जलाशय बांधण्याचें काम होतें.

## पाश्चात्य पद्धति

६ दि ट्रँगल ( **त्रिकोण** )--हे चिन्ह स्वतंत्र रीतीनें हातावरील तीन रेषांचें मिळून बनतें व हें नेहमीं शास्त्रप्रवृत्तीचें द्योतक असतें. गुरूवर असल्यास तो मुत्सद्दी असतो. शनीवर असल्यास गूढशास्त्र, रवीवर असल्यास कलाप्रवीण असतो. बुधावर असल्यास राजकारणकुशल व मंगळावर असल्यास युद्धविशारद असतो. चंद्रावर असल्यास गूढशास्त्रें आणि शुक्रावर असल्यास आंकडेशास्त्री असतो. पण चंद्राचे उंचवट्यावर पाण्याचें भय दाखवितो. आतां आपण शास्त्रकारांनीं याबद्दल काय विचार केला आहे तो पाहूं.

## पौर्वात्यपद्धति.

६ **यव**--या यवाबद्दल आपल्याकडे जास्त विचार केलेला आहे. विशेषतः तो अंगठ्यांत असल्यास यशस्वी असतो; पण

हातामध्यें असल्यास मिष्टान्नभोजी भिक्षुक होतो. याचीं बोटांवरील फलें खालीलप्रमाणें आहेत. चारी बोटांवर यव असल्यास तो राजा होतो. तसेंच आंगठ्याच्या मुळाच्या पेऱ्यावर पुत्रसंतति आणि विद्वत्ता यांचा व मध्यें असल्यास श्रीमंतीचा तो द्योतक होय. तसेंच या अंगठ्याच्या बुडाशीं एक यवमाला असेल तर धनवान, दोन असतील तर राजपूजित व तीन असल्यास राजा किंवा मंत्री. ( पण ज्याचा खजिना नेहमीं भरलेला असतो असा ) होतो. याप्रमाणें याचीं फलें आहेत.

पाश्चात्य पद्धति

७ दि आयर्लंड ( यव )—हें चिन्ह त्यांचेकडे वाईट धरलेलें आहे. हें अंतःकरणरेषेवर असल्यास ते व्यभिचाराचें द्योतक होय. आयुष्यरेषेवर असल्यास आजार व मस्तकरेषेवर असल्यास जुगारांत अपयश घेण्याचें द्योतक समजावें; किंवा आयुष्यरेषा आजार दाखवीत असून मस्तकरेषेवर हें चिन्ह असेल तर तें मेंदूचे विकार दाखवितें. आरोग्यरेषेवर असल्यास अपचन व यकृताचे विकाराचें तें दर्शक आहे. धनरेषेवर जर हें असेल तर तें व्यभिचारात्मक विषय-सुख देतें; पण जर हें तुटलेलें असेल तर प्रेमातिरेकानें अतिशय दुःख होतें. ह्या धनरेषेच्या आरंभीच जर हें चिन्ह असेल तर तें दुर्दैवाचें लक्षण समजावें. बहुधा तें आईचा किंवा बापाचा बाल्यावस्थेंत किंवा तारुण्यांत मृत्यु दर्शवितें. म्हणजे धनरेषेवर धनाचा, रविरेषेवर कीर्तीचा, मंगळावर पैसे व सुख, मस्तकरेषेवर बुद्धीचा, अंतःकरणरेषेवर प्रेमाचा व आरोग्यरेषेवर आरोग्याचा नाश करते अशीं याचीं वाईट फलें दिलीं आहेत. तळव्याशिवाय बोटावर व अंगठ्यावर हें चिन्ह असल्याचा त्यांचेकडे उल्लेख नाहीं व त्याचा त्यांनीं विचारहि केला नाहीं. आतां लता हे जे चिन्ह त्याचीं फलें काय दिलीं आहेत तीं पाहूं

पौर्वात्य पद्धति

८ लता–हें शाखेसारखें चिन्ह असून तें शनीच्या व रवीच्या उंचवटयाच्या मध्यें पण शनीला चिकटून असतें व हें विद्वत्तेचें द्योतक चिन्ह आहे असें आपल्या शास्त्रकारांनीं सांगितलें आहे.

पाश्चात्य पद्धति

८ लता ( ब्रँच )–हें चिन्हहि ज्या ठिकाणीं असेल त्याचे गुणधर्म वाढवण्यास चौकोनाप्रमाणें मदत करतें; पण बहुधा ही रेषा वर आढळते. ही अंतःकरणरेषेवर असल्यास तो मायाळू व श्रद्धाळू असतो. मस्तकरेषेवर असल्यास अत्यंत स्वार्थी, आयुष्यरेषेवर असल्यास तीव्र बुद्धी, आरोग्य, दीर्घायुष्य आणि धनरेषेवर असल्यास सुख ह्याचीं तीं दर्शक होत. हीं लतेचीं फळें झालीं. आतां त्रिशूळाचीं फळें कशीं काय दिलीं आहेत तीं पाहूं.

पौर्वात्य पद्धति.

९ त्रिशूळ–' त्रिशूलादौ निर्धनं च ' असें एका ग्रंथकारानें याचें फल दिलें आहे. तर दुसऱ्यानें पुढीलप्रमाणें दिलें आहे:—

त्रिशूलकरमध्ये तु तेन राजा भविष्यति ।
यज्ञे धर्मे च दाने च द्विजदेवप्रपूजने ।
निरतः पुत्रवांश्चैव प्रतिष्ठाता शिवस्य च ।

हें चिन्ह हातांत असल्यास याजक, धार्मिक, दाता, देवब्राह्मणपूजासक्त, पुत्रसंतति असलेला असा राजा होईल किंवा हीन असल्यास राजाश्रय मिळून सुखानें राहील.

पाश्चात्य पद्धति.

९ ट्रायडेन्ट ( त्रिशूल )—हातावर हा त्रिशूल रवीचे उंचवटयावर असतो व अशा वेळीं त्या माणसास संपत्ति मिळविण्याची फार इच्छा असते; तथापि हा त्रिशूल अंतःकरणरेषेपासून निघालेला

असेल व त्याचीं अग्रें बारीक असतील तर तें निःसंशय भरभराटीचें लक्षण होय. त्याला संपत्ति व कीर्ति मिळते तसेंच हा रेषेला चिकटून नसला व रवीचे उंचवटच्यावर जरी असला तरी त्याचें तेंच फल समजावें. हा शुभयोग आहे.

पौर्वात्त्य पद्धति.

१०–११ चंद्र व रवि–हीं रवि-चंद्राची प्रत्यक्ष चिन्हें हातावर असलीं तर तो भाग्यशाली असतो.

पाश्चात्त्य पद्धति.

१०–११ दि सन् एण्ड मून ( रविचंद्र )–हें रवीचें व चंद्राचें चिन्ह त्या त्या उंचवटच्यावर आढळल्यास त्यांचें फल वाढवितें. पण ही चंद्रकोर आयुष्यरेषा, मस्तकरेषा, व आरोग्यरेषा यांचेमध्यें सांपडते व तिचीं फलें पुढीलप्रमाणें आहेत. ही मस्तकरेषेला चिकटलेली असल्यास तें ( स्वतःच्याच मूर्खपणामुळें ) अपघातानें मृत्यू येण्याचें लक्षणं समजावें. ही आरोग्यरेषेला चिकटलेली असल्यास तें आरोग्य व यशाचें दर्शक होय आणि मधोमध असल्यास तें छांदिष्ट व पशुतुल्य आचरणाचें द्योतक होय.

पौर्वात्य पद्धति.

१२ पाश–ह्या जाळीच्या चिन्हाचें फल जीवहिंसाकर. पाश म्हणजे तो पारधी, कसाई वगैरे असतो असें दिलें आहे. ह्यापेक्षां ह्याचा कांहीं विचार केलेला नाहीं.

पाश्चात्त्य पद्धति.

१२ ग्रील ( पाश )—हें चिन्ह नेहमींच अडथळे दाखवितें, पण त्याचीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं फलें असतात. गुरूवर असल्यास तो धर्मभोळा, खुळचट, मानापमानाच्या नादीं लागणारा असा असतो. शनीवर हें चिन्ह दुर्दैव दाखवितें. रवीवर बढाई, चुका व मूर्खता यांचें द्योतक होय. बुधावर लुच्चेगिरी, चौर्य,

व थापेबाजी; चंद्राचे उंचवटयावर असमाधान, औदासीन्य आणि कोणत्याहि वस्तूबद्दल कुकल्पना घेण्याकडे मनाचा कल असणें यांचें दर्शक होय. शुक्राचे उंचवटयावर असतां तो स्त्रीलंपट असतो.

१३ काकपद--पाश्चात्यांनीं नुसता शब्द जरी वापरला असला तरी त्यांचा तो एँगलच होय. त्यांचा त्रिकोण व एँगलमध्यें इतकाच फरक कीं, हे एँगल्स हातावरील मोठया रेषांचेच तेवढे केलेले आहेत व तें स्वतंत्र चिन्ह नाहीं, येवढाच ह्यांत फरक आहे. शिवाय त्याला तिसरी रेषा नसली तरी चालते. म्हणून एँगल धरण्यास हरकत नाहीं व त्याचीं फलेंहि स्वतंत्र दिलीं आहेत. ह्या काकपदाचीं चिन्हें खालीलप्रमाणें आहेत.

आलिखितं काकपदं धनरेखायां तु सदृशतो यस्य ।
अर्जयति धनानि पुनस्तत्क्षणमपि सव्ययं कुरुते ।
यस्यांगुष्ठाधस्तात्काकपदं भवंति विस्पष्टम् ।
स नरः पश्चिमकाले शूलेन विपद्यते सद्यः ॥

धनरेषेवर हें काकपद असल्यास तो खूप पैसा मिळवितो; पण तो खर्चिक असल्यामुळें त्याचेजवळ कांहीं रहात नाहीं. तसेंच आंगठ्याचे बुडाशीं हें असल्यास त्यास म्हातारपणीं शूलानें मृत्यु येतो, अशीं त्यांचीं आपल्या शास्त्रकारांनीं फलें दिलीं आहेत. आतां पाश्चात्त्यांच्या अँगलकडे वळूं, पण हें काकपद नव्हे, तर तें मस्तकरेषा व आयुष्य या दोन रेषांतील तळव्याची जी जागा त्याला अँगल असें म्हणतात. हें चिन्ह आपल्याकडे अधिक निराळ्या तऱ्हेनें विचार केलेलें आहे.

### पाश्चात्त्य पद्धति

दि अँगल (काकपद)--जर ह्याचे कोन सम असतील तर संपत्ति, आरोग्य, बुद्धिमत्ता यांचें दर्शक होय; व हे कोन विषम असल्यास तो मनुष्य मंदबुद्धि व हलक्या स्वभावाचा असतो. त्या

अँगलच्या आरोग्यरेषेनें तीन कोण बनतात. जर हा कोण रुंद असेल तर तें औदार्य व अरुंद असल्यास भित्रेपणाचें व दारिद्र्याचें द्योतक होय.

पौर्वात्त्य पद्धति

१४ रज्जू रेषा, १५ तंतू रेषा—रज्जूरेषेंत दोन भेद आहेत. एक सर्पासारखी व दुसरी दोरीसारखी. पहिल्याप्रमाणें असल्यास तो मनुष्य दुष्ट स्वभावाचा असतो आणि दुसरीप्रमाणें असल्यास व्यापारी होतो. तंतूसारख्या हाताच्या बारीक रेषा असल्यास तो दुःखी असतो. याप्रमाणें या चिन्हांचीं फळें आहेत.

पाश्चात्त्य पद्धति

१४ चेन्स ( रज्जूरेखा )–१५ हेअर लाइन्स (तंतू रेषा)–ही साखळी बहुधा धनरेषेवर असते व ती अंतःकरणरेषेच्या ठिकाणीं धनरेषेवर असल्यास काळजी व दुःख दाखविते. तसेंच तंतूरेषा हीं कष्ट व दुःख दाखवितात. ' याप्रमाणें या पंधरा चिन्हांचा आपण फलांसह विचार केला.

ग्रहांच्या व राशींच्या खुणा बहुधा सांपडतात व तीं चिन्हे ज्या वेळीं हातांत असतात त्या वेळीं हात अगदीं साधा असतो व ज्या त्या ग्रहांची त्या त्या उंचवटयावर बहुधा खुण असते. परंतु ग्रंथकारांच्या पहाण्यांत अशीं पुढील उदाहरणें आहेत. बुधाचें चिन्ह गुरूवर असल्यास त्याचे अंगीं औदार्य असून तो उत्तम व्यवस्थापक असतो. चंद्राचे चिन्ह गुरुवर असल्यास त्याला मंत्रतंत्राची फार आवड असते व बुधाची खूण रवीवर असल्यास तो प्रसिद्धी आणि वक्तृत्व देतो. कुंभ राशीचें चिन्ह हातावर असल्यास त्याला खात्रीनें पडून मृत्यू येतो व शनीची खूण असल्यास तो मनुष्य अत्यंत दुष्ट असून विषप्रयोगानें दुसऱ्याचा घात करणारा असतो. आतां आपल्याकडील राहिलेल्या चिन्हांचा विचार करूं. ह्या चिन्हांचे आम्हीं दोन वर्ग केले असून एक हातावर सांपडण्याचा संभव

असलेलीं व दुसरी अशक्यतेंतील व हीं दोन्हीहि नकाशांत दाखविलीं आहेत. तीं ओळखीनें देऊन त्यांच्या फलांची थोडक्यांत माहिती देतों.

पौर्वात्त्य चिन्हें फलांसह.

१ हत्ती, २ घोडा, ३ पालखी ४ छत्री, ५ चवरी, ६ वाहन व ७ सिंहासन हीं राजलक्षणें होत.

८ चंद्र, ९ सूर्य, १० गोपूर ११ देवालय हीं धार्मिक चिन्हें होत.

१२ धनुष्य, १३ भाला, १४ बाण, १५ अंकुश, १६ त्रिशूल, १७ खड्ग १८ शूल व १९ गदा हीं शूरलक्षणें समजावीं.

२० मासा, २१ मच्छपुच्छ, २२ मकर, २३ खेकडा हीं भाग्यलक्षणें समजावीं.

२४ तराजू, २५ सर्परेखा, २६ रज्जू हीं वाणिज्य दाखवितात.

२७ बकऱ्याचें तोंड, मांसविक्रय करणारे, २८ नांगर शेतीचें लक्षण.

२९ पर्वत, ३० राजवाडा, ३१ घर, ३२ ग्रामरेषा हीं संस्थानाधिपति होण्याचीं लक्षणें होत.

३३ मुकुट, ३४ पुस्तक, ३५ वेली, ३६ कल्पवृक्ष, ३७ चित्ररेखा, ३८ ध्वज, ३९ माळा, ४० विद्यारेखा हीं विद्वत्तेचीं लक्षणें समजावीं.

४१ कलश–संपत्तीचे, ४२ वीणा–गाण्याचें, ४३ पाश–जीवहिंसा, ४४ पानपात्र–मद्यप्राशन, ४५ समचतुष्कोण, ४६ दीर्घ-चतुष्कोण, ४७ विषम चतुष्कोण, ४८ पंचकोण. ४९ अष्टकोण, हीं सैन्यसेवक लक्षणें होत. ५० तटाक, ५१ कूप, ५२ कोट हीं देशाधिपतीचीं लक्षणें समजावीं.

५३ नरमस्तक हें चौर्य लक्षण, ५४ यव मिष्टान्नभोजन, ५५ चक्र, ५६ शंख, ५७ पद्म, ५८ शिंप, ५९ यज्ञस्तंभ, ६० वेदिका, ६१ स्वस्तिक, ६२ त्रिकोण, ६३ वर्तुळ, ६४ माष, ६५ तीळ,

६६–६७ डमरू, ६८ घंटा, ६९ रथ, ७० रथचक्र, ७१ नौका, ७२ वज्र ह्या सुखाच्या रेषा समजाव्या.

७३ राक्षसाचें तोंड, पिशाच्च लक्षण, ७४ योनिदारिद्र्य, ७५ कुंडल, ७६ कंकण, ७७ नेत्र, ७८ परशु, ७९ शक्ति, ८० तोमर, ८१ तारा, ८२ हरीण, ८३ तोरण, ८४ कट्यार, ८५ कांसव, ८६ शकट, ८७ दंड, ८८ काकपद, ८९ श्रीवत्सचिन्ह, ९० ताक घुसळण्याची रवी, ९१ विमान, ९२ कात्री, ९३ मुद्रा, ९४ दरवाजा, ९५ पंखा, ९६ सुरी, ९७ हस्तीदंत, ९८ बिल्ववृक्ष, ९९ भुंगा, १०० पादतल, १०१ बैल हीं शुभ लक्षणें समजावीं.

१०२ गाढव, १०३ उंट, १०४ रेडा, १०५ कोल्हा, १०६ घुबड, १०७ बेडूक, १०८ भोरा, १०९ कुत्रा, ११० उंदीर, १११ कावळा, ११२ लांडगा, ११३ विंचू हीं दारिद्र्यलक्षणें होत.

११४ नंद्यावर्त, ११५ समुद्र, ११६ झारी, ११७ कमंडलू, ११८ कंकपक्षी, ११९ मोरचेल, १२० पुष्प, १२१ भूषण, व बोटावरील चिन्हे हीं शुभ लक्षणें होत. ह्यांशिवाय चामराची जोडी, तळव्यावरील यव, बोटावरील व हातांवरील शंख असे करून पुन्हां तींच तींच चिन्हें सांगितलीं आहेत, म्हणून तीं येथें दिलीं नाहींत. या चिन्हांमध्यें चक्राचा व त्रिशूलाचा जसा थोडासा जास्त विचार केला आहे, तसाच शंखाच्या शिंपेचा विचार केलेला असून त्यांचीं फलें अनुक्रम एक, चार, सहा, सात, आठ व नऊ हे शुभ व दोन, तीन, पांच असे शंख असणें अशुभ असें सांगितलें. शिंपा कितीहि असल्या तरी त्या चांगल्याच. एक व चार असल्यास सद्-गुणी, दोन शिंपेचा वक्ता, तीन शिंपेचा धनवान व पुढें दहापर्यंत भाग्यशाली. याप्रमाणें यांचीं फलें आहेत. ह्या चिन्हांपैकीं दोन-तृतियांश चिन्हें लक्षांत येण्यास कठीण आहेत. व बाकीच्यापैकीं शंख, चक्र, पद्म, त्रिशूल, मासा, ध्वजा वगैरे दहा पांच चिन्हें

प्रचारांत आहेत व तीं समजण्यासारखीं अशींच आहेत. याप्रमाणें या शास्त्राची दोहोंकडील स्थिति असून त्याचा आतांपर्यंत बहुतेक सांगोपांग विचार केला आहे. आतां यापुढें स्वभावपरीक्षा आणि ह्या शास्त्राचें उद्दिष्ट या संबंधीं थोडा विचार करून आपल्याकडील महत्त्वाचा असा जो सामुद्रिक लक्षणासंबंधींचा ग्रंथ याचें मूळासह मराठी भाषांतर देऊं म्हणजे तीं वचनें अभ्यासूंना मुखोद्गत करतां येतील.

---

## प्रकरण २२ वें

## स्वभावपरीक्षा

आतांपर्यंत जें प्रतिपादन केलें त्यांत हस्तरेषा, अंगुष्ठ, बोटें, तळहातावरील उंचवटे इत्यादि प्रकारावरून मनुष्याचा स्वभाव, आणि त्याची भूत, वर्तमान आणि भविष्य कालीन परिस्थिति ह्यांचेंप्रतिबिंब हस्तरेषांच्या द्वारें निःसंशयपणें कसें उमटतें हें लक्षांत आलें असेल. मनुष्याचा बान्धा हें त्याचा स्वभाव व चालचलणूक ह्यांचें द्योतक खरें; परंतु त्यांत थोडी तर आहे. ती ही कीं बान्धा पाहून स्वभाव निश्चितपणें ओळखण्यास चातुर्य आणि अनुभव फार लागतो. त्यापेक्षां फारच थोडया अनुभवानें चेहेऱ्यावरून स्वभाव जाणतां येईल. परंतु खोटें बोलून, थापा देऊन, बदमाष मनुष्य आपला हेतु छपवूं शकतो, त्याप्रमाणें चेहेऱ्यावर निरनिराळे आविर्भाव लबाडीनें उत्पन्न करून धूर्त मनुष्य वाटेल त्यास हातोहात फसवितो. म्हणून चेहेऱ्यावरून स्वभावाची पारख करण्यांत धोका फार आहे. एकाच परिस्थितींत मनुष्याचा चेहरा खरी वस्तुस्थिति प्रदर्शित करतो. ती परिस्थिति म्हणजे गाढ निद्रा. गाढ निद्रा लागली म्हणजे मात्र निद्रित मनुष्याचा चेहेरा बऱ्याच अंशीं सत्यकथा कथन करूं शकेल.

हस्तरेषांना जें अत्यंत महत्त्व आहे तें या साठींच कीं नेहमीच्या कोणत्याहि परिस्थितिमध्यें तळहातावरील मुख्य रेषांमध्यें पालट पडत नाहीं; हातावरील बारीकसारीक रेषा अगदीं थोड्या प्रमाणावर कमजास्त होत असल्या तरी मुख्य रेषा कायम असतात, असे मानण्यास हरकत नाहीं. म्हणून तळहातावरील रेषांवरून स्वभावज्ञान करून घेणें आणि त्या अनुरोधानें भविष्य सांगणें ही एक महत्त्वाची उपयुक्त गुरुकिल्ली आहे ह्यांत संदेह नाहीं.

सौंदर्याशीं सुस्वभावाचें साहचर्य कां नसावें हा प्रश्न पुष्कळांना सुचला असेल. वास्तविक पाहतां तरुण लावण्यवती स्त्रिया सुस्वभावी नसतातच असें कधींहि समजूं नये. कारण सती सीता, सावित्री, रुक्मिणी, सुलोचना, मंदोदरी, तारामती इत्यादि शेंकडो आर्य स्त्रियांचें सौंदर्य आणि त्याचप्रमाणें निःसंदेह पावित्र्य भरत खण्डांत तरी दुमदुमून राहिलें आहे. परंतु त्याचप्रमाणें युरोपांतील कॅथेराईन पार, क्लियोपात्रा, आणि आपल्या इकडील आनंदीबाई ह्या जितक्या सौंदर्यशालिनी तितक्याच धूर्त, कपटी आणि दुष्ट होत्या, हेंहि प्रसिद्धच आहे. ह्याविषयीं उल्लेख पूर्वीं केलाच आहे. निरनिराळ्या प्रकारच्या सौंदर्यांत फरक आहे हें त्याचें मुख्य कारण आहे. नाक, ओंठ, हनुवटी आणि केशकलाप ह्यांच्या रचनेंतील नाजुकपणा आणि प्रमाणबद्धता ह्यांत जो फरक आहे, तो एकदम लक्षांत येत नाहीं. गौरवर्ण, आरक्त कपोल, कमलाप्रमाणें आकर्षक नेत्र ह्यांच्यावरच पाहणाराची दृष्टि खिळून राहते आणि नासिका, ओष्ठप्रान्त, हनुवटि, आणि दन्तपंक्ति ह्या ज्या स्वभावनिदर्शक गोष्टी ह्यांच्याकडे पाहणारांचें दुर्लक्ष होतें. आणि शिवाय धूर्त स्त्रिया जास्त नखरेल असल्यानें तर त्यांचे हावभाव व सौंदर्य ताबडतोब डोळ्यांत भरून जाऊन पहाणारा गुंग होऊन स्वभाव जाणण्याला पूर्णपणें नालायक होतो. ह्यामुळें सौंदर्य आणि सुस्वभाव ह्यांचें साहचर्य आपल्या

ध्यानांत येणें ही गोष्ट कठिण झालेली आहे. म्हणून त्या भानगडींत न पडणें चांगलें, कारण हस्तरेषा हें साधन त्यांपेक्षां फारच निश्चित असें आहे.

हाताच्या पंजांतील प्रत्येक बाब विशिष्ट कारणाची ओळख पटवून देणारी आहे. पंजांतील अस्थिचीच गोष्ट घ्या. एकंदर पंजाच्या आकारानुरूपच त्यांतील प्रत्येक हाडाचा आकार व रचना असते. ती इतकी कीं, त्यांतील कोणतेंही एकच लहानसें हाड दृष्टीस पडलें तरी अस्थितज्ज्ञ सर्व हाडांची रचना ताबडतोब बनवून दाखवितो. प्रत्येक बोटांत तीन तीन पेरीं, परंतु आंगठ्यांत दोनच मिळून सर्व बोटांत चौदा पेरीं आहेत. तसेंच तळहातांत फक्त पांच आणि मनगटांत आठ अशीं विशिष्ट आणि प्रमाणशीर आकाराचीं १३ हाडें आहेत आणि बोटांचीं पेरीं १४ मिळून प्रत्येक पंजामध्यें हाडें २७ असतात.

अस्थिच्यावर स्नायूंचें आवरण असतें. स्नायु म्हणजे मांसमय दोरकांचा जाडजूड पिंड. ह्यांचा आकार मध्यें जाड किंवा चापट आणि दोन्ही टोंकांकडे निमुळता असा असतो. हे स्नायु अतिशय चिवट आणि कांहीं अंशीं रबराप्रमाणें स्थितिस्थापक असतात. प्राण्यांची काय आणि मनुष्याची काय सर्व शक्ति स्नायुमध्येंच अधिष्ठित असते. जोरदार स्नायु असणारा मनुष्यच मोठमोठीं ओझीं उचलूं शकतो. पिळदार दंड, भरगच्च मांड्या आणि तुस्त पोटऱ्या असें आपण म्हणतों त्याचें कारण तेथील स्नायूंचीच घटना तशी असतें. हाताच्या बोटाची उघड झांप व हालचाल आपल्यास करतां येतें. त्याचें कारण स्नायु हेच. फार काय स्नायुशिवाय कोणालाहि हालचाल करितां येणार नाहीं. स्नायु ढिले आणि कमजोर झाले कीं, सर्व शक्ति आटपलीच. तळहात भक्कम असणें, आणि बोटांचीं पेरीं जाड, चिवट पण कणखर असणें हा परिणाम बळकट स्नायूंचा

आहे. बोटें विशविशीत हें लक्षण वाईट; कां तर स्नायु कमजोर, बोटांच्या मुळाशीं असणारे उंचवटे चांगले आहेत, किंवा चांगले उंचवटे नाहींत, असें आपण म्हणतों. अशी स्थिति कशामुळें ? तर तेथील स्नायु पोंचट असतात म्हणून. हाताच्या पंजांतील स्नायु पोंचट असले तर सर्व शरिरांतीलच स्नायु दुबळे आहेत म्हणून समजावें. आणि ज्याच्या शरिरांतील स्नायु बेंगरूळ तो मनुष्य कर्तबगार तरी कसा असेल. स्नायूमुळें हाताची किंमत आणि सर्व शरीर कपड्यांनीं झांकलें असलें तरी तळहातावरून सर्व शरिराच्या स्थितीचें ज्ञान होतें. हाडें कमजोर म्हणजे स्नायु कमजोर, आणि स्नायु ढिले म्हणजे शरीर ढिलें असा क्रमच आहे.

## पञ्जांतील रक्तवाहिन्या.

स्नायूंचें पोषण रक्तवाहिन्यांमुळें होतें. ह्या रक्तवाहिन्यांपैकीं कांहीं निळसर आणि बाकीच्या लालभडक असतात. निळसर आणि लाल हा भेद जेथें रक्तवाहिन्या कोळ्याच्या जाळ्यांतील तंतूपेक्षांहि बारीक असतात तेथें दिसत नाहीं. परंतु निळसर शिरा जेथें जाडी असतात तेथें निळसर छटा स्पष्ट दिसते. तळहाताची मागील बाजू, उघडा दण्ड आणि मनगट व कोपर ह्यांच्यामधील भागांतील निळसर शिरा स्पष्ट दिसतात. पण लालभडक शिरा कातडीवरून दिसत नाहींत. निळसर रक्ताच्या शिरा निळसर आणि लालभडक रक्ताच्या लालसर असतात. लाल रक्त हें अगदीं शुद्ध असतें, आणि निळसर रक्त अशुद्ध असतें. निळसर रक्तवाहिन्यांना ' नीला ' शिरा किंवा नुसतेंच " नीला " म्हणतात आणि लालभडक शुद्ध रक्त वाहिनीला " रोहिणी " शिरा म्हणतात. हीं नांवें जुन्या आयुर्वेद ग्रन्थांमध्यें आहेत. ' नीले 'ला इंग्रजीमध्यें Vein ( व्हेन, ) आणि " रोहिणीला "ला Artery ( आर्टरी ) अशीं नांवें आहेत. इंग्र-

जीतील Vein आणि Artery ह्या संज्ञा अगदीं यथार्थ नाहींत परंतु तो प्रश्न वैद्यशास्त्राचा आहे.

कोपर आणि मनगट ह्यांच्यामधील हाताच्या भागाला " अरत्नि " असें नांव आहे. अरत्निमध्यें एकमेकांस जुळून असणारीं अशीं दोन लांब हाडें आहेत. आंगठ्याच्या बाजूकडील लांब अस्थिला " प्रकोष्ठ " Radius किंवा वरच्या बाजूचें आणि करंगळीच्या म्हणजे खालच्या बाजूच्या अस्थिला " कूर्पर " (ulna) अशीं नांवें योजण्यास हरकत नाहीं. 'प्रकोष्ठ' आणि 'कूर्पर' ह्यांच्या शेजारून दोन ठसठशीत रक्तवाहिन्या " नीला " आणि " रोहिणी ' तळ हातामध्यें जातात आणि तेथें त्यांना अनेक बारीक बारीक फाटे फुटून ते सर्व स्नायूमध्यें शिरून त्यांचें पोषण करतात. आंगठ्याजवळील हाडाच्या बाजूनें येणारी " रोहिणी " रक्त वाहिनी, आणि खालच्या हाडाच्या बाजूनें येणारीं दुसरी रोहिणी रक्तवाहिनी ह्यां तळहातामध्यें एकत्र येऊन त्यांची एक कमान बनते, तिला " तलहस्त चाप " ( म्हणजे Palmer Arch ) म्हणतात. हातावरील मुख्य रेषा ह्या उभय रक्तवाहिन्यांच्या धोरणानें उत्पन्न होतात.

पंजा अथवा तळहात याचें आणखी एक वैशिष्टच आहे तें हें कीं, ज्ञानतन्तूंच्या अथवा मज्जतन्तूंच्या सूक्ष्म धाग्यांचें जें जाळें कातडीच्या आंतून शरिराच्या सर्व अणूअणूंतून पसरलेलें आहे, त्या तन्तूंच्या योगानें ज्या प्रकारचें स्पर्शज्ञान होतें त्याप्रकारचें स्पर्शाच्या सूक्ष्म छटांचें ज्ञान हातांच्या बोटांशिवाय शरीराच्या इतर भागांत होत नाहीं. जिभेला मात्र स्पर्श ज्ञान आहे पण तें फक्त रुचिचें. स्पर्शज्ञानाचा उत्तमोत्तम झरा अशा दृष्टिनें अग्र हस्ताचें म्हणजे पंजाचें महत्त्व अतुलनीय आहे. ह्या संबंधानें ज्यास्त विवेचन येथें आवश्यक नाहीं. परंतु येथें हें सांगितलें पाहिजे कीं, ज्ञानतन्तू

अथवा मज्जातन्तू ह्यांचा संबंध प्रत्यक्ष मेन्दूशीं आणि मज्जाकूर्चाशीं ( Medulla शीं ) आहे. आणि रक्तवाहिन्यांचा मेन्दूशीं जो संबंध आहे तो केवळ ज्ञानतंतूंच्या द्वारानेंच. आजारी असलेल्या रोग्याची नाडी म्हणून जी रक्तवाहिनी वैद्य तपासतात ती नाडी आंगठ्याच्या मूळ प्रदेशांत जी " रोहिणी " शिरा असते तीच. ह्याप्रमाणें अग्र हस्तामध्यें रक्तवाहिनी ही तळ हाताच्या आंत पसरलेले ज्ञानतन्तू-प्रमाणेंच अत्यंत श्रेष्ठ अशी बाब आहे. ज्वरामध्यें इतर भागापेक्षां हातांची आग विशेष होते, त्याचें कारण तेथें रक्तवाहिन्यांची आणि ज्ञान-तंन्तूंची अतिशय गर्दी झालेली असते हें होय. म्हणूनच मेन्दूच्या शक्तीचें आणि विकाराचें प्रतिबिंब तळहात, बोटें, आणि आंगठा ह्याच्यामध्यें विशेष पडावें हें सहाजिकच आहे. शब्द, रूप, रस, गन्ध आणि स्पर्श ह्या सर्व प्रकारच्या विषयज्ञानांत स्पर्शज्ञानाचा दर्जा सर्वांपेक्षां उच्च आहे, कारण दुःख, क्लेश, यातना यांचा स्पर्श-ज्ञानाशीं विशेष संबंध असतो.

मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्ण-सुखदुःखदाः ॥

ह्या अनुभवजन्य उक्तीनें श्रीभगवंतांनींहि स्पर्शेन्द्रियाचें श्रेष्ठत्व उत्तम रीतीनें वर्णिलें आहे. ज्ञानतंतूंच्या योगानें स्पर्शज्ञान आणि शीतोष्ण-सुखदुःख यांचें ज्ञान कसें होतें हा विषय इंद्रिय-विज्ञान शास्त्राचा आहे. तरी त्याचें थोडक्यांत वर्णन असें कीं, हें ज्ञान-तंतू स्नायूंच्या आधारानें स्नायूंच्या आंत आणि कातडीच्याहि आंत पसरलेले असतात. तथापि ज्या ठिकाणीं रक्तवाहिन्यांची संख्या अधिक त्या ठिकाणी मज्जातंतूंचीहि संख्या अधिक असते. ह्या कारणानें बोटांचें स्पर्शज्ञान फारच सूक्ष्म झालेलें आहे.

ज्यांनीं हातांच्या रेषा आणि त्यांचें शास्त्र ह्यांचा मुळींच अभ्यास केलेला नाहीं, त्यांना सुद्धां एक गोष्ट स्पष्टपणें आढळून आली ती ही कीं, अग्र हस्त घटमुठ असलेला मनुष्य धडाकेबाज असतो. बेडर

असतो. अति नाजुक हाताचे स्त्री-पुरुष बऱ्याच अंशीं मित्रे असतात. ज्यांचीं बोटें लांब तो युक्तिबाज असतो, परंतु ज्यांचीं बोटें अगदीं आखूड ते लोक निरुपयोगी ठरतात. पंजा मऊ असणारे स्त्री पुरुष विनोदी परंतु नाटकी पद्धतीचे, आणि बोटांचे सांधे व्यवस्थित असलेलीं माणसें जरा उदार स्वभावाचींच निपजतात. हा आपला अनुभव जॉन गॉल ( John Gaule ) ह्या लेखकानें लिहिला आहे.

ह्याच्या उलट असेंहि आढळून आलेलें आहे कीं, हाताची रचना आणि आकार ह्यांच्यावरून ज्या मनुष्याचा स्वभाव कांहीं विशेष प्रकारचा असावा असें ठरलें, त्याच मनुष्याला असें कांहीं परिश्रमाचें काम करावयास लाविलें कीं, तें त्याच्या स्वभावाच्या अगदीं उलट ! अर्थात् ही सक्तीच होती. परंतु त्या योगानें हाताचा आकार फारसा बदलला नाहीं. परंतु त्यांवरील कांहीं लहान रेषांमध्यें बऱ्याच कालानें फरक पडलेला आढळून आला.

हे फरक कां पडावे असा प्रश्न उत्पन्न होतो. त्याला उत्तर असें दिसतें कीं, मनुष्याची राहणी पालटली म्हणजे विचार पालटतात; आणि विचार बदलले कीं, रक्तवाहिन्यांतील प्रवाह कमी जास्त होतो; आणि ती स्थिति बऱ्याच कालपर्यंत सतत चालू राहिली तर त्या योगानें स्वभावांतहि बदल होतो; आणि त्या कारणानें रेषाहि केव्हां केव्हां बदलतात. एब्यूल इव्हान्स ( Ebule Evans ) ह्या संशोधकानें अशी उपपत्ति दिली आहे कीं, मज्जातंतूंमध्यें एक प्रकारचा रस असतो आणि ह्या रसामध्यें विशेष प्रकारची शक्ति असते; त्यामुळें रसावर नाना प्रकारचे परिणाम घडून गेल्यानें त्या रसाच्या शक्तिमध्येंहि फरक पडतो. तळहातामध्यें मज्जातंतूंची संख्या अतिशय असल्याकारणानें तेथें ( म्हणजे हाताच्या पंजामध्यें ) हा तन्तुरस फार मोठ्या प्रमाणांत साचून वाहतो. हस्तरेषा हा ह्या रसाचा विशेष परिणाम आहे. पाण्याची धार जरी सतत एकाद्या दगडावर

पडत राहिली तरी त्या दगडाला देखील खळगा पडतो. मग हाताच्या कातडीची कथा काय? म्हणून तळहातावर व बोटांवर ज्या रेषा उत्पन्न झालेल्या असतात त्या रेषा ह्या तन्तूरसामुळेंच उद्भवतात असा इव्हान्सच्या म्हणण्याचा आशय आहे. आपल्या इकडील वैद्यक ग्रन्थांमध्यें मज्जारज्जू व मज्जादोरक ह्यांतून " अणिष्ठ " रस वाहतो असें सांगितलेंहि आहे. आणि पृष्ठवंशरज्जूमध्यें हा रस भरून राहिला असतो असें Spinal cord चें Puncture केल्यानें हल्लीं अनुभवासहि येतें. म्हणून तेवढयावरून Evans ची सर्व उपपत्ति अगदीं बरोबर नसली तरी विचारार्ह खास आहे.

बऱ्याच वर्षांपूर्वींपर्यंत खुद्द युरोपमध्येंहि फलज्योतिष आणि सामुद्रिक शास्त्र यांच्यावर विश्वास ठेवणारांना अज्ञानी, ढोंगी असा आहेर विद्वान् पण्डिताकडून वारंवार होत असे. त्यामुळें दोन्ही शास्त्रांची पुष्कळच कुचंबणा झाली, आणि पुष्कळ संशोधकांस दोन्ही शास्त्रांच्या सत्यतेविषयीं अनेक लेख लिहावे लागले. हे लेख इतके विस्तृत आहेत कीं ते सर्व एकत्र छापले तर त्यांची निदान ४००।५०० पृष्ठें तरी भरतील. त्या सर्व लेखांमध्यें मुख्य प्रतिपादन हें आहे कीं, प्राचीन काळचे सर्व विद्वान्—अरिस्टॉटल्, केप्लर, कोपर्निकस्, बाल्झॅक ( Balzac ) कीं ज्यांचे इतर शास्त्रावरील ग्रंथ आजहि सर्वमान्य आहेत असे—शास्त्रज्ञ फलज्योतिष आणि सामुद्रिक शास्त्रावर विश्वास ठेवणारे होते. ग्रहांचें आकर्षण जर सर्व पृथ्वीवर आणि एकमेकांवर घडत आहे, तर मनुष्य प्राणीच त्यांतून कसा सुटेल ? त्याच्यावरहि ग्रहांचा परिणाम होत असलाच पाहिजे. शिवाय, हस्तरेषा आणि मेन्दू ह्यांचा परस्पर जन्यजनक संबंध जर बऱ्याच अंशानें सिद्ध होत आहे तर सामुद्रिक शास्त्र तरी खोटें कसें ?

आमचें तर म्हणणें वरील प्रतिपादनाला सर्वस्वी अनुकूल आहे. शारिरिक शास्त्रावरून मेन्दू आणि हस्तरेषा ह्यांचा जो संबंध सिद्ध

होतो तो आम्हीं वर थोडक्यांत वर्णन केलाच, सामुद्रिक शास्त्राच्या सत्यतेला मुख्यप्रमाण हेंच आहे. ज्याप्रमाणें संमोहनविद्या, मनोदय संदेश, ( हायप्नॉटिझम्, टेलेपॅथी ) जीवात्म्याचें स्वतंत्र अस्तित्व इत्यादि प्रकारांचें संशोधन करण्यासाठीं ( Psychical Resuarch Society ) म्हणजे जीवात्म्याच्या गूढ शक्तिच्या संशोधनाचें मण्डळ त्यांनीं साठवर्षांपूर्वीच स्थापन करून पुष्कळ पुरावा गोळा केला, अनेक प्रयोग स्वत: केले, ( भौतिक शास्त्रज्ञांतील ऑलिव्हर लॉज सारखे अग्रेसर ज्या सोसायटिचे सभासद आहेत. ) त्याप्रमाणेंच स्वतंत्र संस्था न काढतांही अशा सर्वव्यापी संशोधनांत सामुद्रिक शास्त्राचाही अंतर्भाव आपोआप झालेला आहे.

## हातावरील ग्रहस्थानें व चिन्हें.

हस्तसामुद्रिकाचा विचार करतांना पहिल्या प्रथम जी गोष्ट लक्षांत येते किंवा प्रत्येकानें लक्षांत ठेवावयास पाहिजे ती ही कीं, एकासारखा हुबेहूब व तंतोतंत दुसरा हात पहावयास सांपडत नाहीं. ज्याप्रमाणें कोट्यवधि जनसंख्येंत एकासारखा दुसऱ्याच्या चेहऱ्याचा अगदीं तंतोतंत सारखेपणा आढळत नाहीं, त्याचप्रमाणें हाताचेंही आहे. एकाच वयाचीं अनेक मनुष्यें आपण पाहिलीं; तर त्यांत उंचीच्या दृष्टीनें सारखीं माणसें सांपडतील. कारण उंचीचें प्रमाण सामान्यत: ४ ते ५॥–५॥। फुटांपर्यंत असू शकते. तशा रीतीनें उंची जुळली तरी प्रत्येकाचा चेहरा, नाक, डोळे, कान इत्यादिकांमध्यें कांहींना कांहीं तरी निराळेपणा असतोच असतो; हें आपल्या नेहमीं प्रत्ययास येते. त्याचप्रमाणें वर्णासंबंधीं. हात आणि पाय यांच्या लांबी रुंदीच्या प्रमाणाचे बाबतींतही हाच अनुभव आहे. मस्तकाचें प्रमाण, त्याची ठेवण आणि आकार यांचा विचार केला आणि एकासारखें हुबेहूब असे त्याच्याचसारखें मस्तक शोधू गेलों तरी तें सापडूं शकत नाहीं. याच्याहीपेक्षां अधिक निरानिराळे व भिन्नभिन्न प्रकार हस्तरेषांत आढळतात आणि त्यामुळेंच एका हातासारखा हात व त्यावरील जशाच्या तशा रेषा सापडूं शकत नाहींत.

हातांतील आंगठ्याचा प्रकारही असाच आश्चर्यकारक आहे. हिंदुस्थानांतील आणि पाश्चिमात्य देशांतील सर्व तुरुंगांतून कैदी लोकांच्या हाताचे आणि विशेषतः दोन्ही हातांच्या आंगठ्यांचे ठसे तुरुंगांत प्रवेश करतांना सक्तीनें घेतात आणि त्यावरून कैद्यांच्या विचारांची, मानसिक स्थितीची, नैसर्गिक प्रवृत्तीची आणि त्याच्या एकंदर हालचालीची परिस्थिति अजमावतात. या कामाकरितां ब्रिटिश सरकारचें एक स्वतंत्र मोठें कायम खातें निरीक्षणाचें काम करीत असतें. त्यांच्या एकंदर परिशीलनाचा व निरीक्षणाचा अनुभव असा आहे कीं, एका हाताच्या व बोटांच्या ठशासारखा हुबेहूब दुसरा ठसा उपलब्ध होत नाहीं. त्यांत कांहींना कांहीं तरी कमजास्तपणा व फेरबदल असतोच. यावरून एकच गोष्ट सिद्ध होते, ती ही कीं, प्रत्येक हातांत, रेषांत, बोटाच्या आकारांत व त्यावरील रेषांत आणि हस्तरेषांत अगदीं निराळेपणा असतो.

प्रत्येक हातावर ग्रहांचीं स्थानें किंवा जागा ठरलेल्या आहेत. त्या उजव्या हातावरील खालीं दिल्या असून त्याचा मध्यभाग ही ह्या ग्रहाची मुख्य जागा होय. त्याची व्याप्ति कोठपर्यंत हे त्याच्या आसपासच्या ग्रहांच्या जागेच्या अनुषंगानें व तारतम्यानें ठरवावें.

( १ ) **शनीचें स्थान**—मधल्या बोटाच्या मूळाखालीं हातावर आहे.

( २ ) **गुरूचें स्थान**—तर्जनीच्या ( आंगठा व मधलें बोट यांच्यामध्यें ) मूळाखालीं हातावर आहे.

( ३ ) **रवीचें स्थान**—अनामिकेच्या ( मधलें बोट व करांगुली यांच्या मधलें बोट ) मूळाखालीं हातावर.

( ४ ) **बुधाचें स्थान**—करांगुलीच्या मूळाखालीं हातावर आहे.

( ५ ) **मंगळाचें स्थान**—करांगुली मूल आणि त्याच्या खालीं मणिबंध मूल याच्याबरोबर मध्यावर हातावर आहे.

( ६ ) **चंद्राचें स्थान**—धनरेषेच्या डाव्या बाजूस कोपऱ्यावर आहे.

( ७ ) **शुक्राचें स्थान**—धनरेषेच्या उजव्या बाजूस अंगुष्टमूलाचे खालीं हातावर आहे.

( ८ ) **राहूचें स्थान**—धनरेषेच्या मूळाशीं मणिबंध रेषेसन्मुख आहे.

ह्या प्रत्येक ग्रहाच्या स्थानाला किंवा जागेला त्या त्या ग्रहाचा उंचवटा असेंही म्हणतात. ह्या ग्रहस्थानावर त्रिकोण, चक्र, तीळ वगैरे चिन्हें शुभ.

# शास्त्राचें उद्दिष्ट

सामुद्रिक शास्त्र काय किंवा फलज्योतिष शास्त्र काय, दोहोंचाहि उपयोग मनुष्याच्या उत्कर्षाकरितांच केला पाहिजे. तरच त्या शास्त्राचें साफल्य आहे. अमुक लाभ कां झाला किंवा अमुक संकट कां ओढवलें, अथवा अमुक व्याधि कां उद्भवला असा प्रश्न फलज्योतिष्यास केला तर तो कुण्डली पाहून सांगेल कीं, तुमच्या कुण्डलींत अमुक ग्रहांचा अमुक योग आहे. सामुद्रिक शास्त्रज्ञास तोच प्रश्न केला तर तोहि हस्तरेषांपैकीं लाभ हानि दर्शक रेषा पाहून लाभ-हानीचें वर्ष अमुक होतें अगर आहे, म्हणून अशा प्रकारचा योग घडला असेंच सांगेल. त्याचप्रमाणें संकटकाल केव्हां संपणार त्याचेंहि उत्तर दोन्ही शास्त्रांच्या सहायानें मिळेल. परंतु आमच्यामतें शास्त्राचा उपयोग येवढ्यानेंच संपूर्णतः करतां आला असें नाहीं. एखाद्या दुर्धरव्याधिग्रस्तास ज्योतिषशास्त्रज्ञाकडून समजलें कीं, तो दुर्धरव्याधि राहु मंगल शनि इत्यादि पापग्रहांच्या अत्यंत अशुभ योगामुळें उत्पन्न झाला असून तो जरा जडच जाईल. जड जाईल हें म्हणण्याचा हेतु इतकाच कीं रोग अगदीं असाध्य स्थितीस पोहोंचला असला तरी सुज्ञ भिषग्वर ( डॉक्टर ) तितकी कठोर वस्तुस्थिति रोग्याला तर राहोच परंतु निकट आप्तांनाहि भयप्रद वाटेल अशा रीतीनें सांगत नाहीं. तोच प्रकार फलज्योतिषाचा. फलज्योतिषशास्त्रज्ञहि व्याधि असाध्य आहे किंवा रोगी दगावणार असें सांगत नाहीं, आणि त्यानें सांगूंहि नये.

हा सर्व प्रकार फलज्योतिषानें किंवा सामुद्रिक शास्त्रानें अमुक प्रकारच्या लाभ-हानीचें कारण असें असें आहे हें कळूं शकतें हें सिद्ध करण्यास पुरेसा आहे. वास्तविक हें सिद्ध करण्याचा

जरूरीच नाहीं. कारण ह्या गोष्टी सिद्ध आहेत म्हणूनच तर शास्त्रें लिहिलीं. सिद्ध करण्याला सामुग्री निराळी आणि शास्त्र खरें आहे हें ठरलें म्हणजे त्याच्या शिक्षणक्रमाची रचना निराळी. ही दुसऱ्या प्रकारची माहिती जास्त देऊन आणि शास्त्राच्या सिद्धतेची अवश्य तितकी माहिती सांगून प्रस्तुतच्या "**सामुद्रिक शिक्षकाची**" आखणी केली आहे. परंतु अमुक रेषेच्या किंवा रेषांच्या अशुभ घटनेमुळें तुमची बुद्धि मंद आहे किंवा तुम्हांला स्मृति कमी आहे अथवा आरोग्य कमी आहे. असें निदर्शनास आलें तर **उपाय काय,** हा येथें प्रश्न आहे. अशा दुर्दैवी परिस्थितीवर कांहीं इलाज असूं शकतच नाहीं कीं काय ह्याच अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करण्याचें येथें योजिलें आहे. ज्यांच्या हस्तरेषा **नमुनेदार,** खोल, नीट, योग्य दिशेकडे गेलेल्या, आणि त्यामुळें भाग्यशालित्व दर्शक अशा असतील त्यांचा प्रश्नच नाहीं. आरोग्यशाली, शक्तिमान्, बुद्धिमान् आणि यशस्वी अशा पुरुषांचा वरील प्रश्नाशीं प्रत्यक्ष संबंध येत नाहीं. त्यामुळें याचा ते विचारही करणार नाहींत. परंतु ग्रन्थ लिहावयाचा त्याचा उपयोग मुख्यत्वेंकरून नडलेले किंवा पीडलेले लोक आणि अडलेले जिज्ञासू असतील अशांनाच होणार आहे. हा भाग कोणत्याच पुस्तकांत अशा दृष्टीनें लिहिलेला असल्याचें आमच्या पाहण्यांत आले नाहीं. कारण वैद्यकांतील शारीर शास्त्र, सांख्यांतील मानसविज्ञान, आणि योगातील प्राथमिक प्रणालि, ह्यांच्या आधारावर आम्हीं आपल्या स्वतःच्या पद्धतीनें ,हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करीत आहोंत. त्याकरितांच मस्तिष्क आणि मज्जारज्जू ह्यांच्या रचनेची थोडी माहिती ह्या पूर्वीं जी सांगितली तिच्या परिभाषेचा संबंध पुढील विवेचनाशीं येतो म्हणून ती परिभाषा ( इंग्लिश पारिभाषिक शब्दांसह ) येथें देतों. ह्या संबंधीं तांत्रिक

किंवा त्रोटक विवेचन पूर्वी पान २५१ ते २६२ ह्या पानांमध्यें आलेलें आहे. तें चांगलें लक्षांत राहीपर्यंत पुनः पुनः पहावें.

ह्या वर्णनावरून मनुष्याच्या मेन्दूचे मुख्य विभाग, त्यांची रचना, त्या रचनेचें स्वरूप, मुख्य विभागापासून निघणारे उपविभाग ह्यांचें चलाऊ ज्ञान झालें तरी तूर्त पुढील विवेचन समजण्यास अडचण येणार नाहीं.

मस्तकाच्या कवटीच्या आंतील वलयाङ्कित मेन्दू.... .... Cerebrum.
( महामस्तिष्क )

शीर्षमूल = मस्तक आणि कणा ह्यांचा सांधा.

मस्तिष्कतल....Base of the Brain.

वाम मस्तिष्कार्ध...Left Lobe.

दक्षिण मस्तिष्कार्ध......Right Lobe.

दुर्वेळका ( भ्रूप्रान्तस्थ ).... .... Fissure of Sylvius.

तिरकस छेद.....Fissure of Rolando.

( तन्तुमय ) अपरमस्तिष्क Cerebellum.

मज्जाकूर्च.... ....Medulla Spinalis.

मज्जारज्जू....Nerve, (Cord).

पृष्ठवंशरज्जू. अनूक्य ......Spinal Cord.

वलयें किंवा चुण्या...Convolutions.

अनूक्य प्रणालि...Cerebro: Spinal. System.

धारणा प्रणालि...Automatic or Sympathetic System.

मज्जाकन्द.....Ganglion
अनेक Ganglia.

प्रत्यग्वाही....Afferent.

पुरोवाही....Efferent.

प्रतिप्रवर्तित....Reflex.

नाडीचक्र....Plexus.

अनैच्छिक....Involuntary.

ऐच्छिक ( बुद्धिपुरःसर ).... .... Voluntary.

ज्ञानोत्पादक....Sensory.

क्रियाकारी.... .... ....Motor.

प्राणवहधमनी.... ....Vagus अथवा Pneumo Gastric Nerve.

जाणीव.... .... ....Feeling.

नियमन.... .... Inhibition.
नियन्त्रण.... .... ....Control.
संमोहन.... ....Hypnotism.
वासना, लालसा.... . Urge, Striving.
हव्यास, तृष्णा......Horme, Libido.
प्रणोदन ... ....Conation.
मन.... .... .... ....Mind.
चित्त ( चिन्तन )....Thought.
बुद्धि ( विचार )....Judgment.
अहंकार.... .... .. .. ....Ego.
संवेदना.... ....Sensation.
संबोध.... ....Perception.
संस्कार.... ....Impression.
अनुवंश.... .... ....Heredity
स्थितिसंघर्ष...... ....Environment.
उच्च भावना.....Sentiment.
मृदुविभाव.... ....Emotion.
विषयसुख.... ....Pleasure.
मनोविकार.... ....Passions.
विकृतिकन्द्र (वैकृत) Complex.
मज्जाकेन्द्र Nerve-Centres.
ज्ञानकेन्द्र } ( Sensory and
क्रियाकेन्द्र } Motor centres.

## जीवनकार्य ( Vital Activity )

प्राणधारणाचे जे जे व्यापार, जीवनाच्या ज्या ज्या क्रिया, जिवंत शरीराच्या साधनानें होतात किंवा घडतात त्या क्रिया कृमिकीटकादि क्षुद्र जीव, मत्स्यादिक जलचर, सर्पादिक सरपटणारे जीव, पोपट, गरुड इत्यादि पक्षी, चतुष्पादादिक ग्राम्य किंवा हिंस्र पशु, यांच्यापासून ते रानटी मानव आणि तेथून सुसंघटित समाजांतील मानव ह्या सर्वांच्या पर्यंत अगदीं सारख्या घडत असतात. अत्यंत हीन अशा कृमिपासून ते उच्च अशा मनुष्यजातीपर्यंत जीवसमुदायाची एक अतिशय दीर्घ अशी साखळी बनली आहे. अगदीं हीन जीवांमध्यें मस्तिष्क हा अवयव जवळ जवळ नाहीं म्हणण्याइतका क्षुद्र असतो आणि मनुष्यांमध्यें तर मस्तिष्क–( विशेषतः वळयाङ्कित मस्तिष्क ) ही

एक अतिशय महत्त्वाची बाब होऊन बसली आहे. मनुष्याचा मेंदू त्याच्या आकाराच्या मानानें मोठा आणि वजनदार आहे.

तथापि कीटकाची जीवनक्रिया आणि मनुष्याची जीवनक्रिया ह्यांमध्यें तत्त्वतः फरक पडणार नाहीं. अशा समान धोरणानेंच सर्व जीवनक्रिया आपोआप होत असते अथवा घडत असते. ही क्रिया घडवून आणण्याचें मुख्य साधन अथवा प्रेरकयन्त्र मज्जाकूर्च म्हणजे Medulla आणि अनुक्य हा भाग होय. रक्ताशय (अ० Heart), श्वासोच्छ्वासाचा भाता (अ० फुप्फुसें), त्याचप्रमाणें पचनाचीं इंद्रियें आणि चलनवलनाचे स्नायु हे सर्व अवयव मनुष्याइतक्या पूर्णविकासित अवस्थेंत जरी कृमि-कीटकादिकांमध्यें नसले तरी अपूर्ण अवस्थेंत कां होईना पण असतात; त्या कारणानें जीवंत प्राण्यांमध्यें श्वासोच्छ्वास, रसाभिसरण, रुधिराभिसरण, अन्नपचन, उत्सर्ग आणि निद्रा इत्यादि सर्व व्यवहार नीट व्यवस्थित होत असतात. परंतु हे व्यवहार करण्याची शक्ति मनुष्यांमध्यें मज्जारज्जूंतून, किंवा हीन कोटींतील जीवामध्यें तशा स्वरूपाच्या अपूर्ण अवयवांतूनच उत्पन्न होते.

सांगण्याचा मुद्दा असा कीं ही शक्तिहीन प्राणी असो, कीं मनुष्य प्राणी असो कोणीहि परंतु आपल्या स्वतःच्या इच्छेनें उत्पन्न करूं शकत नाहीं; म्हणूनच श्वासोच्छ्वास ( Respiration ), रुधिराभिसरण ( Circulation ), अन्नपचन ( Digestion ), इत्यादि क्रियांना स्वयंप्रेरित व्यापार (Automatic action) असें नांव आहे. ह्या क्रिया मज्जाकूर्चामार्फतच चालतात. मनुष्य इच्छाशक्तीनें हातपाय हलवितो, तोंड उघडतो, डोळ्याच्या पापण्या पाहिजे त्याप्रमाणें चाळवितो, त्यांची हालचाल करतो. ही सर्व हालचाल–तो आपण होऊन करतो; परंतु हृदयाचें ठोके, अन्नाचें पचन, श्वासाचें परिवर्तन, रक्ताचें अभिसरण ह्यांपैकीं कोणतीहि क्रिया

त्याच्या इच्छेनें चालत नाहीं. महत्त्वाची गोष्ट ती हीच आहे. आपण श्वासोच्छ्वास बन्द करूं, परंतु श्वास आंत घेतल्यावर त्याचें कार्य आपणांस थांबविता येत नाहीं. म्हणून पहिली गोष्ट ध्यानांत धरावयाची ती ही कीं:—

१. जीवनव्यापार चालणें किंवा बन्द होणें हें कोणत्याही प्राण्याच्या इच्छेवर अवलंबून नाहीं.

२. इतर गोष्टींमध्यें मात्र पशु, पक्षी इत्यादि जीव आणि मनुष्य प्राणी ह्यांत फार फरक आहे. तो असा—

३. इतर प्राण्यांची वागण्याची किंवा जगण्याची तऱ्हा सदा सर्वकाळ अगदीं एकाच पद्धतीची असते. तिच्यामध्यें केव्हांहि बदल होत नाहीं. म्हणजे प्रत्येक प्राण्याचें अन्न ठरलेलें; तें मिळविण्याची त्याची त्याची पद्धति ठरलेली; राहण्याची जागा तयार करण्याची तऱ्हा तीच; स्वभाव तोच ( मग तो कसाहि असो; ) आवडीनिवडी त्याच त्याच; विचार अगदीं कमी पण तेच; आणि ते व्यक्त करण्याचे प्रकारहि तेच तेच; त्यांत फरक नाहीं. विचार हीन व्हावयाचे नाहींत, आणि उच्चहि व्हावयाचे नाहींत. असा प्रकार पशुपक्ष्यादिकांचा आहे.

४. पण वरील पहिली अथवा प्राथमिक बाब सोडली तर मनुष्याची. सर्वच तऱ्हा प्रथमारंभीं पशु-पक्ष्यादिकांप्रमाणें असणें संभवनीय आहे आणि क्रमप्राप्तहि आहे. ही स्थिति रानटी अवस्थेंतील. परंतु त्या स्थितीपासून आतांपर्यंत मनुष्याचीं प्रत्येक गोष्टींत कितीतरी स्थित्यन्तरें होऊन गेलेलीं आहेत. अन्न, राहणी, संभाषणादि प्रकार, करमणूक, अभ्यास, युक्त्या, विचार आणि ज्ञान ह्या गोष्टींत येवढा भयंकर फरक पडला आहे कीं तेथें अक्कल काम करीत नाहीं. हा फरक मनुष्याच्या मेन्दूच्या रचनेंत जसजसा फरक पडत गेला तसतसा त्या धर्तीवर होत गेला. बाकीच्या प्राण्यांच्या मेन्दूची स्थिति

कायम राहावी आणि मनुष्याच्या मेन्दूची मात्र रचना बदलावी हा केवढा चमत्कार? मनुष्याचें धोरण बदलल्याकारणानें मेन्दूंत फरक पडला किंवा मेन्दूंत फरक पडल्यानें धोरणांत म्हणजे विचारांत फरक पडला, हा प्रश्न वाचकांनीं मनाशीं सोडवून पहावा. प्रयत्न केल्यानें प्रश्न सुटेल. सर्वच गोष्टी खुल्या सांगण्यानें प्रगति होत नाहीं.

ह्या सूक्ष्म विचारांतच सर्वशास्त्रांचें बीज आहे. मनुष्य फार प्राचीन काळीं, लाखों वर्षांपूर्वी पशुप्रमाणें होता. पण तो श्रीराम, श्रीतुकाराम, श्रीशिवाजीमहाराज अशा उच्च कोटिपर्यंत कसा पोहोंचला? ह्याचें उत्तर असें कीं, मनुष्य बदलत चालला आहे, त्याचा स्वभावहि बदलू शकतो, नव्हे बदलत आहे. तो प्रथम दुर्दैवी, अज्ञान होता. पण पुढें तो पुष्कळ सज्ञान आणि सुदैवी झाला आहे. म्हणून आतांच्या दुःखितांनीं निराश होऊं नये.

ही नुसती कोरडी आशा नव्हे. रोगी, व्याधिग्रस्त मनुष्य निरोगी बनण्याची आशा ठेवीत नाहीं काय? तीहि आशा कोरडीच असें आपण कां समजत नाहीं? त्याचें कारण असें सांगाल कीं, वैद्यराज, डॉक्टर ह्यांच्या अचूक चिकित्सेमुळें आरोग्याचा लाभ होतो. हें खरें आहे, परंतु सर्वांनांच तो होतो काय? नाहीं. मग तो कां होत नाहीं? त्याचें कारण फार खोल आहे. तूर्त इतकेंच म्हणूं कीं, कांहींना अपयश आलें तरी बऱ्याच व्याधितांना गुण येतो असें दिसतें म्हणूनच आशा वाटते.

आतां वैद्यशास्त्राप्रमाणें ह्याहि—ह्या मानसतन्त्राचाहि अनुभव येतो. तो अनुभव येणें कसें शक्य आहे त्याची कांहीं प्राथमिक माहिती अवश्य आहे, ती थोडक्यांत तरी सांगितली पाहिजे.

जीवन व्यापारामध्यें **मज्जाकूर्च** ( Medulla ) आणि पृष्ठवंशरज्जू ह्यांना फार महत्त्व आहे. तें इतकें कीं **मज्जाकूर्च** हा अवयव जीवनशक्तीचा राजा, मुख्य नियामक असें म्हटलें तरी चालेल. ह्या

**राजाचा राजदण्ड** म्हणजे **पृष्ठवंशरज्जू**. पाठीच्या दोन्ही बाजूकडे ज्या बरगडया आहेत त्यांच्या दिशेनें पृष्ठवंशरज्जूंतूनच त्याला दोन्ही बाजूंकडे फांटे फुटलेले आहेत. डाव्या बाजूकडे जितके फाटे तितकेच उजव्या बाजूकडेहि आहेत. एक डावीकडील **शाखा** आणि त्याच्या उलट बाजूस उजवेकडील **शाखा** अशी त्याची **एकेक जोडी** आहे असें स्पष्ट दिसतें. प्रत्येक जोडीला अनेक उपशाखा, आणि शेकडों अनुशाखा असून त्यांतून सहस्रावधिच नव्हे तर अपरिमित सूक्ष्म तन्तू सर्व शरीरभर पसरले आहेत. आणि जीवनक्रियेची व ज्ञान संबोधाचीं कार्येंहि त्यांच्याकडून सतत चाललेलीं असतात. आपल्याला जें स्पर्शज्ञान होतें तें कातडींतून होत असतें, कारण पृष्ठवंशरज्जूंतून निघणाऱ्या शाखा उपशाखा इत्यादिकांतून क्रमाक्रमानें निघालेले असंख्य सूक्ष्म तंतू आपल्या कातडीच्या आंत सर्वत्र पसरलेले आहेत.

हेंच मज्जातन्तू केवळ कातडींतच आहेत असें नसून, स्नायु म्हणजे रबराप्रमाणें चिवट अशा मांसतन्तूंनीं बनलेले मोठमोठे मांसपिण्ड, रक्ताशयादि आशय, आंतडी, इत्यादि अवयवांतूनहि ते पसरलेले आहेत. हेच तंतू त्या अवयवांकडून होणारीं कार्येंकरून घेत असतात. पृष्ठवंशरज्जू मार्फत जीवनव्यापार चालू रहातात असें म्हणण्याचें कारण हेंच

पृष्ठवंशरज्जूला सहायक असे जे दुसरे रज्जू आहेत, त्यांत पृष्ठ-वंशाच्या बाहेर दोन्ही बाजूकडे परंतु त्याला लागून प्रत्येक बाजूस एकेक ह्याप्रमाणें दोन धारणारज्जू आहेत तसेंच प्रत्यक्ष मस्तिष्काच्या तळांतून डाव्या आणि उजव्या बाजूंतून निघणाऱ्या मज्जा-रज्जूंच्या **बारा जोड्या** ( Pairs ) आहेत. त्यांचा संबंध देखील मज्जाकूर्च ( Medulla ) ह्या मुख्य चालकाशीं आहेच. ह्याप्रमाणें जीवन व्यापाराच्या चालनाचें आणि नियन्त्रणाचें सर्व कार्य पृष्ठवंश-रज्जू ( Spinal Cord ) **धारणारज्जू** ( Automatic nerves )

आणि मस्तिष्कजन्य नसा ( Cranial Nerves ) ह्यांच्या साहायानें मज्जाकूर्च हा राजा करूं शकतो.

जीवनकार्यामध्यें नुसत्या क्रियाच नव्हेत तर कांहीं संवेदनांचाहि अन्तर्भाव होतो. ह्या संवेदनांपैकीं कांहीं सार्वत्रिक आहेत. आराम किंवा थकवा वाटणें, समाधान पावणें, बेचैन होणें किंवा कसेसें वाटणें, दुःख होणें ह्या संवेदना सार्वत्रिक आहेत. म्हणजे शरीराच्या विशिष्ट अवयवांशीं त्या संलग्न नाहींत.

क्षुधा, तृषा, तृप्ति, एखादा अवयव दुखणें, कळ येणें, टोंचणें, तसेंच ठणका, आग, उष्ण, थंड हें ज्ञान विशिष्ट आहे. त्यांत स्पर्श-ज्ञानाशीं संबंध असणाऱ्या अशाच संवेदना पुष्कळ आहेत.

मस्तिष्कातील—नसांच्या ज्या बारा जोड्या सांगितल्या त्यांत चौथी Trochlearis ट्रॉक्लियारिस् जोडी, पांचवी ( Trigeminus ट्रायजेमिनस् ) जोडी, नववी ( Glasso Pharyngeal ग्लासो फॅरिंजिअल ) जोडी, आणि दहावी ( Pneumo gastric अथवा Vagus ) जोडी ह्या मुख्य आहेत. आपल्या अत्यंत प्राचीन अशा आयुर्वेदामध्येंही अशाच जोड्या वर्णिल्या आहेत. त्यांना धमन्या म्हणतात. त्या जोड्या पंधरा आहेत. हल्लीं पाश्चात्य शास्त्रज्ञ बारा जोड्या मानतात. आयुर्वेदीय धमन्यांच्या जोड्या आणि पाश्चात्यांच्या मस्तिष्कजन्य जोड्या ह्या सर्वथैव एक नाहींत. त्यांचे प्रकार थोडे भिन्न भिन्न असले तरी आयुर्वेद शारीरामध्यें ज्या धमन्यांच्या जोड्या वर्णिल्या आहेत त्यांत Phrenic, Vagus, Glosso pharyngeal, Trigeminus ह्यांपैकीं कांहीं उप-धमन्या अथवा आधुनिक भाषेंतील मज्जादोरक, मज्जारज्जू अथवा नसा ह्यांचा अंतर्भाव होतो. नाडी, नसा किंवा रज्जू ह्यांच्यापासून दोरक आणि दोरकापासून तन्तु ह्याप्रमाणें अधिकाधिक सूक्ष्मता पावून ज्ञानतंतू आणि क्रियातन्तू ह्यांचा प्रसार सर्व शरीरांत झाला आहे.

त्याचप्रमाणें रक्तवाहिन्यांचाहि प्रसार आहे. तथापि **शरीराच्या** यच्चयावत् अवयवांवर आणि जीवनसंबंधि त्यांच्या व्यापारांवर **नियन्त्रण** मज्जारज्जूंनेंच अथवा नसांचेंच आहे, आणि ह्या सर्व नसा पृष्ठवंशरज्जूंतुन निघालेल्या आहेत किंवा पृष्ठवंशरज्जूशी त्यांचा संबंध तरी आहे; तसाच पृष्ठवंश रज्जू **मज्जाकूर्चाचाच** निमुळता भाग आहे, अर्थात जीवनव्यापारांचें नियन्त्रण, **मज्जाकूर्च**, **धारणा-तंतू** आणि **मस्तिष्क** जन्य नसा ह्यांच्याद्वारें होत असलें तरी सर्वांचा मुख्य नियंता **मज्जाकूर्च** ( Medulla ) आहे.

जीवन व्यापाराचीं केन्द्रें आहेत त्यांना हल्लीं Plexuses ( प्लेक्ससेस् ) म्हणतात. पूर्वीं त्यांना चक्रें म्हणत. **आधारचक्र, आज्ञाचक्र, स्वाधिष्ठानचक्र,** अशीं जीं अनेक चक्रें योगशास्त्रांत प्रसिद्ध आहेत तींच हल्लींचीं Plexuses अथवा मज्जारज्जूंचीं केन्द्रें ( Nerve centres ) होते. ह्या निरनिराळ्या केन्द्रांतून जीवनाचे जे स्थानिक व्यापार निर्वेधपणें चालतात त्यांची दाद फक्त **मज्जा-कूर्चाला** असते, मुख्य मेन्दूला असतेच असें नाहीं; किंबहुना नसते असें म्हटलें तरी चालेल. एवंच महत्त्वाचे मुद्दे हें कीं—

१ मेन्दूवांचून प्राणी कांहीं काळ तरी जगूं शकतो. परंतु मज्जा-कूर्चाला यत्किंचित्हि धक्का लागला तरी प्राणि क्षणमात्र देखील जीवंत रहात नाहीं.

२ मज्जाकूर्चाकडून होणारें नियन्त्रण पृष्ठवंशरज्जूच्याद्वारा होतें. तथापि पृष्ठवंशरज्जूकडून कांहीं वेळां परस्परच तें कार्य होत असतें.

३ सरपटणाऱ्या प्राण्यांत जीवनकार्य पृष्ठवंशरज्जूकडून अतिशय मोठ्या प्रमाणांत **स्थानिक केन्द्रांकडून परस्पर** होत असतें.

४ त्यापेक्षां कमी प्रमाणांत जनावरामध्यें, आणि—

५ मनुष्यामध्यें तर **स्थानिक केन्द्रांकडून** जीवनकार्यें परस्पर होण्याचें प्रमाण पुष्कळ कमी असतें.

६ म्हणजे मेन्दूची शक्ति जितक्या प्रमाणांत वाढत गेली तितक्या प्रमाणांत स्थानिक केन्द्राकडून स्परस्पर होणारीं कार्यें कमी प्रमाणांत होऊं लागलीं. म्हणून मनुष्यामध्यें **मज्जाकूर्चाच्या** हुकमाशिवाय जीवनकार्यें स्थानिक केन्द्राकडून **परस्पर** अशीं फार होत नाहींत.

७ अर्थात् मनुष्य प्राण्यांत **मज्जाकूर्चाचेंच** महत्त्व फार आहे.

८ परंतु तें फक्त जीवनकार्यांत म्हणजे शारीरिक व्यापार चालविण्यांत आहे.

९· **काम** ( स्त्रीपुरुषसंबन्ध ), लोभ ( म्हणजे अन्नाच्छादन मिळविणें ), क्रोध ( म्हणजे शत्रूवर चाल करणें ), मोह ( म्हणजे अपत्य प्रेम ) ह्यांचा संबंध जीवनव्यापारांचें प्रोत्साहक ह्या नात्यानें **जीवनकार्याशीं** अत्यंत निकट आहे.

१० म्हणूनच मनुष्यांसुद्धा सर्व प्राणीमात्रामध्यें **काम, क्रोध, मोह** हे विकार अथवा प्रोत्साहकशक्ति जीवनकार्याचे आधारस्तंभ होत. ते वाईट नाहींत आणि चांगलेहि नाहींत. त्यांचा चांगले—वाईटपणा फक्त मनुष्यांमध्यें उत्पन्न झाला आहे.

१२ मेन्दूचें सामर्थ्य शारीरिक क्रियांवर **प्रत्यक्षत: जोरानें चालत नाहीं.** पण विचारांमध्यें, युक्ति प्रयुक्तिमध्यें, कोटिक्रमामध्यें तें चालतें. आणि **मज्जकूर्चाचें** सामर्थ्य विचारशक्ति हें नव्हे, त्याकारणानें जेव्हां काम क्रोधादिकांचा विरोध बुद्धिशीं येतो तेव्हां काम क्रोधादिकांचा बरे वाईटपणा ठरविणें प्राप्त होते.

१३ ह्या झगडयामुळेंच मनुष्यांत रानटी आचार, शिष्टाचार, सदाचार, नीति-अनीति, उदात्त, निन्द्य आचरण हे प्रकार उत्पन्न झाले. आणि त्यांचाच परिणाम म्हणून रोग, दारिद्र्य आणि दुर्भाग्य ह्या परिस्थिति उद्भवल्या.

१४ मेन्दूमध्यें कांहीं केन्द्रें अशीं आहेत कीं, त्यांचा संबंध **मज्जाकूर्चा**शीं विशेषच आहे; त्या योगानें

१५ मुख्य धोरण हें निष्पन्न होतें कीं, मेन्दूचें सामर्थ्य वाढवून त्यांचा पगडा **मज्जाकूर्चा**वर बसविला पाहिजे, तरच आरोग्य, शरीरशक्ति, स्मृति, युक्ति, प्रयुक्ति ह्यांचा लाभ होऊन व्याधि, दुर्बलता, दारिद्य इत्यादि उपसर्ग पार नष्ट होतील.

१६ म्हणून जीवनकार्यामध्यें जी जी केन्द्रें आहेत किंवा तन्तु-चक्रें आहेत, त्यांना चालन दिलें असतां जीवनकार्यें योग्य प्रकारानें होऊं शकतात. औषधाची जरूर अत्यंत कमी होते. किंबहुना औषधांची जरूर पडूंच नये हेंच तर त्यांतील ध्येय आहे.

ह्या सर्व विवेचनाचा उपयोग कोणता असा प्रश्न ओघानेंच निघतो. त्याचा उलगडा असा कीं, आपल्या इकडे जें "**योगशास्त्र**" ह्या नांवानें प्रसिद्ध असें जें शास्त्र आहे, त्याच्याशीं याचा अगदीं निकट संबंध पोहोंचतो. हल्लीं योगशास्त्रासंबंधानें गप्पांचा सुकाळ झालेला आहे. **योगावर** पुष्कळ इंग्लिश ग्रंथ 'गप्पांनींच' भरून निघत आहेत. परंतु पुणें जिल्ह्याच्या सुदैवानें "लोणावळें" ह्या सुप्रसिद्ध विहार स्थलाजवळ वनश्रीनें नटलेल्या पर्वत राजींतील एका रम्यस्थळीं श्रीयुत गुणे ऊर्फ "कुवलयानन्द" योगी ह्यांनीं मात्र योगमार्गाचे प्रत्यक्ष प्रयोग सोपपत्तिक रीतीनें समजाऊन देण्याचा क्रम आज पन्धरा वर्षें चालू ठेवलेला आहे; म्हणून त्यांत शिकून कांहीं थोडे तरी योगशास्त्रज्ञ बाहेर पडल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल अशी आशा वाटत आहे.

तथापि श्रीयुत कुवलयानन्द यांच्या पद्धतीचा '**योग**' आणि मागील विवेचनाशीं संबंध जुळणारा '**योग**' ह्यांत थोडा फरक आहे. "श्री कुवलयानन्द" ह्यांची पद्धति "आसनें" आणि "राजयोग–मार्ग" ह्यांच्यावर आधारलेली आहे. आणि ती

पुष्कळच उच्च दर्जाची आहे. परंतु प्रस्तुत विवेचनांतील पद्धति राजयोगाच्या दृष्टीनें त्यांतील एक अल्पसा विभाग आहे. दोहोंची जात एकत्र, परंतु प्रान्त भिन्न असा प्रकार आहे. प्रस्तुत विवेचनाची सरणि मानसशास्त्रांतील पृथक्करण-पद्धतीच्या धोरणावर आहे. राजयोगामध्यें जशी प्रत्यक्ष अनुभव हीच एक कसोटी; त्याच प्रमाणें आमच्या मानसशास्त्रीय पद्धति मध्यें देखील स्वानुभव हीच कसोटी आहे.

अलीकडे मानसशास्त्रासंबंधानें पाश्चात्य पण्डितांनीं नवीन दिशा पतकरली आहे. ह्या नवीन दिशेचे प्रणेते फ्रॉइड, ॲडलर, आणि युंग हें आहेत. त्याचें ऐकमत्य नाहीं, परंतु विचारसरणीची दिशा बरीचशी सारखीच आहे. विचार आणि तदनुरूप आचार ह्यांना " **कामविकारा** " मुळें प्रेरणा मिळते, ही फ्रॉइडची मुख्य कल्पना-ती चुकीची आहे. परंतु आपल्याकडे मात्र ती नवीन नाहीं. त्या-मुळें युरोपांत जसा फ्रॉइडला भाव आला आहे, तसा तो आपल्या इकडे येण्याचा संभव कमी. निवळ फ्रॉइडच्या नांवावर दुसऱ्यास उगाच दम भरणारे मात्र फुकट शेफारून गेले आहेत. शिवाय फ्रॉइडचें मत पुष्कळ अंशीं चुकलेलें आहे. हें सिद्ध करणें कठीण नाहीं. फ्रॉइडच्या मतासंबंधानें **मकडुगल** ह्या विद्वानानें बराच विचार केला आहे, तो विचारणीय आहे. परंतु अनुभवाच्या कसोटीनें तोहि तोकडा पडतो.

स्वयंसूचनेनें किंवा संमोहन प्रयोगानें सूचना देऊन मानसिक व्यथा बऱ्या करण्याचे प्रयोग हल्लीं पूर्णपणें यशस्वी होत आहेत. ह्यांना कांहीं लोक ख्रिश्चन सायन्स म्हणतात. मानसिक व्यथा म्हणजे भीति, चित्तभ्रम व अपरिपूर्ण वासना, घाबरटपणा इत्यादि मनोदौर्बल्यामुळें जे विकार उद्भवतात, त्यांना औषधोपचारांनीं बरें वाटत नाहीं. असे मानासिक व्याधि, संमोहन सूचनेनें बरे होतात.

मनोदौर्बल्यामुळें उत्पन्न होणाऱ्या व्याधींनां (Functional diseases म्हणजे ) मानसव्याधि म्हणतात, आणि व्याधिग्रस्त स्त्रीपुरुषांना कृत्रिम निद्रा आणून त्या स्थितीत त्यांच्या मनोदुर्बलतेचें निराकरण करून त्यांना हल्लींचे युरोपांतील डॉक्टर रोगमुक्त करतात. परंतु ज्यांना ( Organic diseases म्हणजे ) सप्तधातु-गत रोग म्हणतात, आणि जे जन्तूमुळें किंवा आहार विहारांतील अतिरेकामुळें उत्पन्न होतात, त्यांना संमोहन निद्रेंतील सूचनांचा उपयोग बहुतेक होत नाहीं. आणि मानसिक व्याधींवर उपचार केले तरी शारीरिक व्याधिचा प्रश्न सुटलेला नाहीं. मग स्वाभाविक भावनांच्या शुद्धीची गोष्ट तर दूरच.

याप्रमाणें मानसशास्त्रांत प्राविण्य मिळवून नवीन शोध लावणाऱ्या युरोपियन पण्डितांचेहि प्रयत्न लटके पडले आहेत. म्हणूनच ह्यापुढील विवेचन युरोपियन ग्रन्थांमध्यें सांपडणें कठिण आहे. युरोपियन ग्रन्थात आरोग्यशास्त्र आणि स्वच्छता यांच्या नियमांचें अगदीं यथायोग्य वर्णन केलें आहेत. परंतु त्याप्रमाणें वागणाराला खर्च जबर पडतो. कारण स्वच्छ अन्न, स्वच्छ कपडे, स्वच्छ पाणी आणि उत्तम हवाशीर घरें ह्यांची तरतूद गरीब लोकांना करतां येणें आज संभवनीय नाहीं. युरोपियन ग्रन्थकार अत्यंत उच्च अशी राहणी कशी असते ते सांगून मोकळे होतात. ग्रन्थकार थोडच्या खर्चांत व्यवस्था कशी करावी तें सांगत नाहींत. त्याकारणानें आपल्या इकडील गरीब मनुष्य युरोपियन पद्धतीप्रमाणें राहूं शकणार नाहीं, आणि रोगमुक्तहि होणार नाहीं. ही अडचण आपण आपल्या दृष्टी पुढें सतत ठेविली पाहिजे.

म्हणून ह्या अडचणींचा विचार प्रथम केला पाहिजे. आपल्या शरीरावर मनोविकारांचा पगडा आहे, गोष्ट जगजाहीर आहे. आणि उलट शरीराचाहि मनावर तितकाच जरी नाहीं, तरी बऱ्याच

अंशीं ताबा चालतो हेंहि शास्त्रज्ञांस मान्य आहे. अशी वस्तुस्थिति असतांना अमुक विकार मनोदौर्बल्यामुळें उद्भवला म्हणून तो 'मानसोपचारानें' बरा होईल; आणि अमुक व्याधि रोगजंतूमुळें उत्पन्न झाला, किंवा भलत्याच वागणुकीमुळें जडला म्हणून त्याच्यावर औषधोपचारच केला पाहिजे, हें म्हणणें जरी पुष्कळ प्रसंगीं खरें ठरत असलें तरी बुद्धीला पटत नाहीं, आणि तर्काला योग्य वाटत नाहीं. मानसोपचाराचा उपयोग 'त्रिदोषजन्य' किंवा 'जन्तुजन्य' विकारांवर ( म्हणजे Organic स्वरूपाच्या व्याधिवर ) हि झाला पाहिजे असा सिद्धांत कां प्रस्थापित करूं नये ह्याचें कारण पाश्चात्य ग्रंथकार सांगत नाहींत. असें प्रस्थापित होणें अवघड आहे हें मात्र सत्य आहे, तरी सुद्धां दुष्ट सवयीं बदलणें, विस्मृति, आळस, भित्रेपणा, धांदरटपणा ह्या स्वभावदोषांमध्यें देखील बराच फरक इष्ट दिशेनें पडणें शक्यच नव्हे तर साध्यहि आहे. हीच गोष्ट वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा आमचा उद्देश आहे आणि प्रयत्नहि आहे. सामुद्रिक किंवा फलज्योतिषाच्या ज्ञानानें दुर्दैवाचा जोर किती आहे तें कळलें, संकटहि केव्हां उपस्थित होणार तेंहि समजलें तर त्यावर उपाय नको काय? नुसतें हात जोडून स्वस्थ बसणें हा त्याला उपाय नव्हे. म्हणून त्यावर जे अनेक उपाय आहेत ते प्रथम सांगणें अशा रीतीनें प्राप्त होतें.

अगदीं सकृत्दर्शनीं पहिला उपाय सुचतो तो असा कीं वागतांना काळजी घ्यावी, व्यवसायाचें स्थान बदलावें व आपल्या विषयीं सहानुभूतीनें, प्रेमानें, व मित्रत्वानें वागणारीं माणसें जवळ करावीं किंवा त्यांच्या सन्निध आपण जाऊन राहावें.

दुसरा उपाय म्हणजे व्यावहारिकदृष्ट्या तजविजी योजाव्या. चांगला वैद्य, वकील व डॉक्टर कोण ह्यांचा शोध करण्याचें योग्य ठेवावें. खाण्यापिण्यांतील नियमितपणा कडकपणानें पाळावा.

तिसरा उपाय असा कीं आपली भक्ति ज्या देवतेवर असेल किंवा आपलें जें कुळदैवत, इष्ट दैवत, किंवा ग्रामदैवत असेल त्याची उपासना करावी अर्थात् अनिष्टनिरसनार्थ जपानुष्ठान स्वत: करावें किंवा करवावें.

चौथा उपाय स्वयंसूचनेच्या ( म्हणजे auto-suggestion च्या ) शास्त्रीय पद्धतीनें स्वभावांतील दुष्ट सवयींचा बीमोड करून आरोग्य आणि व्यावहारिक ज्ञान संपादन करून जनतेच्या उपयोगी पडणें हा आहे. हातावरील रेषा ह्या स्वभावाच्या योजनेला अनुसरून असतात हें जें मागें अनेक वार सांगितलें त्याचा हेतु हाच. मनोविकार आणि दुष्ट किंवा सुष्ट संवयी म्हणजेच स्वभाव. हा जर स्वयंसूचनेनें पालटतां येणें शक्य आहे, तर मग ज्या कांहीं हस्तरेषा पालटण्याच्या स्थितींत असतील, त्या पालटतील ह्यांत शंका नाहीं. येवढें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जेथें औषधोपचाराचा आणि व्यायामाचा संबंध नाहीं, किंवा जेथें औषधोपचाराचा खर्च आवाक्याच्या बाहेर येईल, तेथें स्वयंसूचनेचा उपचार करणें इष्ट आहे. जेथें औषधोपचार करण्यास चांगला वैद्य किंवा डॉक्टर उपलब्ध असेल आणि खर्च आवाक्याबाहेर होणार नसेल, तेथें औषधोपचारच करावा.

दुसरें असें कीं, जेथें व्याधि दुर्धर असेल व तोहि पराकाष्ठेला पोहोंचला असेल, तेथें स्वयंसूचनेचा उपयोग धीराच्या आणि निश्चयी मनुष्यानेंच करावा. स्वयंसूचनेचा उपचार हा बिनखर्चाचा आणि बिनधोक आहे, पण अगदीं सावकाशीचा आहे. कारण हें कीं, काय वाटतील ते उपाय करा स्वभावांत बदल होणें दुरापास्त असाच अनुभव आला पाहिजे हा नियम आहे, म्हणून अनुल्लंघनीय जो स्वभाव तो बदलावयाचा असेल तर ती गोष्ट केवळ स्वयंसूचनेनेंच शक्य आहे. किंवा ईश्वर भक्तीनेंच शक्य आहे.

# सामुद्रिक तिलक.

सामुद्रिकतिलक या नांवाचा हा प्राचीन हस्तलिखित ग्रंथ शके १८३५ सन १९१३ मध्यें आम्हांस महत्प्रयासानें उपलब्ध झाला. हा ग्रंथ बराच महत्त्वाचा असल्याकारणानें त्यांतील विषय विवेचनाची चिकित्सा आम्ही करूं लागलों. त्यानंतर लो. टिळक बंधमुक्त होऊन परत पुण्यास आल्यावर ज्योतिषसंशोधनकार्य-प्रसंगानें ज्यावेळीं त्यांच्याशीं आमचा विशेष संबंध आला त्यावेळीं त्यांना .हा ग्रंथ आम्हीं दाखविला. त्यांतील बराच भाग वाचून पाहून आणखी अशाच प्रकारचे कांहीं ग्रंथ सांपडतात कीं काय याबद्दल शोध करण्यास सांगून हा ग्रंथ मराठी भाषांतरासह छापून प्रसिद्ध करण्याबद्दल त्यांनीं सांगितलें.

त्यानंतर ५–७ वर्षेपर्यंत अनेक ठिकाणीं सामुद्रिकशास्त्रा-वरील ग्रंथाची चौकशी व पाहणी आम्हीं केली. कांहीं त्रुटित व अर्धवट अशा तऱ्हेचे ग्रंथ पाहण्यास सांपडले पण त्यांत महत्त्वाचा असा भाग मुळींच नव्हता. या बाबतींत आम्ही परप्रांतांतील विद्वा-नांशीं व ज्या ठिकाणीं ग्रंथ असण्याचा संभव अशा संस्थांच्या चालकांशीं विचारविनिमय केला पण सामुद्रिकतिलक या नांवाचा ग्रंथ कोठेंही मिळाला नाहीं. म्हैसूर व मद्रास या भागांत सामु-द्रिकावर कांहीं हस्तलिखित ग्रंथ आहेत पण ते तामिल भाषेंत आहेत असें सांगतात. त्यामुळें परीक्षण करतां आलें नाहीं. शिवाय ज्यांच्याजवळ ते ग्रंथ आहेत असें सांगतात ते लोक, ते ग्रंथ नुसते दाखविण्यासही तयार नाहींत अशी स्थिति आहे.

महाराष्ट्रामध्यें सामुद्रिकावर सामुद्रिकतिलक ग्रंथाखेरीज दुसरा

ग्रंथ उपलब्ध नाहीं. ही स्थिति लक्षांत घेऊन व लो. टिळकांनीं पूर्वी केलेल्या सूचनेला अनुसरून सर्व जनतेला ह्या ग्रंथाचा उपयोग व्हावा यासाठीं ह्या सबंध ग्रंथाचें मूळ आम्ही शके १८४५ च्या आषाढ महिन्यांत आमच्या तत्त्वविचार आणि ज्योतिर्भूषण मासिकाच्या खास अंकांत छापून प्रसिद्ध केलें. ( त्यावेळीं ग्रंथाचें भाषांतर आम्ही दिलेलें नव्हतें.) ह्या गोष्टीस आज १६ वर्षें पूर्ण झालीं. मराठी भाषांतरासह सामुद्रिकतिलक हा उपयुक्त ग्रंथ सामुद्रिकशिक्षणक्रमामध्यें प्रसिद्ध होण्याचा योग सांप्रत आला आहे, याबद्दल आम्हाप्रमाणेंच सर्वांना समाधान वाटेल यांत शंका नाहीं.

सामुद्रिकतिलक ग्रंथामध्यें ज्याप्रमाणें हस्तरेषांवरून भविष्य कथनाचा निर्णय व हस्तरेषांचीं फलें सांगितली आहेत. त्याचप्रमाणें मनुष्य शरीराच्या प्रत्येक अवयवाची आणि विशेषत: अष्टांगांचीं फलेंही दिलेलीं आहेत. त्यांत पायाच्या रेषा म्हणजे पादतलावरील महत्त्वाच्या रेषांचें वर्णन आहे. त्या वर्णनावरून हें सहज लक्षांत येतें कीं, ज्याप्रमाणें हस्तरेषांचें महत्त्व, त्याचप्रमाणें इतर अवयवावरील चिन्हांचें व पादतलस्थ रेषांचेंही वैशिष्ट्य आहे. म्हणून ह्या ग्रंथांत सांगितलेलीं फलें पाहतांना व कोणत्याही व्यक्तीच्या भविष्यकालीन गोष्टींचा विचार करतांना निरनिराळ्या अवयवांच्या फलांचें एकीकरण करून नंतरच फलनिर्णय निश्चित करावा.

ह्या ग्रंथांत मुखपरीक्षा, कर्णपरीक्षा, नेत्रचिकित्सा, मस्तकपरीक्षा व मस्तकावरील रेषा व चिन्हें यांचें वर्णन किंवा चिकित्सा विस्तृत अशी नाहीं. या गोष्टींचेंही प्राधान्य कित्येक वेळां आढळतें. डोळ्याच्या ठेवणीवरून व हालचालीवरूनही पुष्कळ गोष्टी सांगतां येतात. पण तो आपल्यापुढें विषय नाहीं. असो.

---

# अथसामुद्रिक–तिलकः



**" सामुद्र–तिलकं तेभ्यः रहस्यं अद्भुतंपरम् ॥ "**

श्रीगणेशाय नमः ॥ अथ सामुद्रिकातिलकः प्रारभ्यते ॥

(अनुष्टुप्) श्रीसिद्धिबुद्धिसहितं गणाध्यक्षं सरस्वतीम् ।
सीतया सहितं रामं प्रणम्य च (श्री) गुरोःपदे ॥ १ ॥
सामुद्रलक्षणं वक्ष्ये पूर्वशास्त्रानुसारतः ।
वराह–लल्ल–माण्डव्य–नृसिंह–षण्मुखादिभिः ॥ २ ॥
उक्तानि यानि शास्त्राणि सारमाकृष्य यत्नतः ।
सामुद्रं नाम तिलकं रहस्यं चाद्भुतं परम् ॥ ३ ॥

सिद्धिबुद्धिसहित श्रीगणेश, सरस्वती यांना; तसेंच सीतामाईसह श्रीरामचन्द्रांना, आणि गुरुमहाराजांच्या चरणांना वन्दन करून वराह, लल्ल, माण्डव्य, नृसिंह, षणमुख इत्यादि जे पूर्वाचार्य होऊन गेले, त्यांनीं अनेक शास्त्रग्रन्थ लिहून ठेवले आहेत, त्यांच्याच अनुरोधानें त्यांतलि जें सार प्रयत्नानें शोधलें तोच हा **सामुद्रिक तिलक** नांवाचा ग्रन्थ होय. ह्यांत सामुद्रिकशास्त्राचें अतिशय आश्चर्यकारक असें जें रहस्य तें सांठवलेलें आहे. तो ग्रन्थ आतां आम्हीं सांगतों.

आर्या–श्रीपतिनाभिप्रभवः कनकच्छायः प्रयच्छतु शिवं वः ॥
कल्पादिसृष्टिहेतुः पद्मासनसंस्थितो देवः ॥ ४ ॥

श्रीविष्णूच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव, ज्यानें कल्पाच्या आरंभापासून उत्पन्न होत आलेली सर्व सृष्टि घडविली, सुवर्णासमान ज्याची अंगकान्ति आणि जो स्वतः कमलावरच अधिष्ठित आहे तो ब्रह्मदेव तुमचें कल्याण करो.

स्फुरदैक्यलक्षणमपि विलोक्य विलक्षणं वपुर्यस्याः ॥
अविकलशब्दब्रह्मब्रह्मी सा देवता जयति ॥ ५ ॥

ब्रह्मदेवाशीं एकत्वानें राहणें हेंच जिचें स्पष्ट लक्षण, त्रैलोक्य हें जिचेंच स्वरूप किंवा शरीर, विकाररहीत असें जें शब्दब्रह्म हेंहि जिचें मुख्य लक्षण, अशी जी देवी सरस्वती तिचाच सर्वत्र विजय आहे.

पुरुषोत्तमस्य लक्ष्म्या समं निजोत्संगमधिशयानस्य ॥
शुभलक्षणानि दृष्ट्वा क्षणं समुद्रः पुरा दध्यौ ॥ ६ ॥

श्रीविष्णू हे लक्ष्मीला आपल्या अगदीं जवळ म्हणजे अंकावर घेऊन बसले आहेत, अशाप्रकारचें त्यांचें ध्यान समुद्राचार्यानें केलें. तेव्हां त्या उभयतांचीं जीं अंगलक्षणें त्यांना दिसलीं तीं अर्थातच शुभ असणार. म्हणून तीं पाहून त्या लक्षणांवरच समुद्राचार्यानें आपलें शास्त्र रचलें.

भोक्ता त्रिखंडभूमेर्भेत्ता मधुकैटभादिदैत्यानाम् ॥
रूपवशीकृतयाऽसौ क्षणमपि न वियुज्यते लक्ष्म्या ॥ ७ ॥

श्रीविष्णू सामान्य कोटींतील नव्हत. ते सर्व त्रैलाक्याचे मालक, मधुकैटभासारख्या राक्षसांचा चुराडा उडविणारे, असे असतांहि लक्ष्मीच्या अलौकिक लावण्यानें इतके प्रसन्न झाले कीं, तिला ते क्षणभर हि विसंबत नाहींत.

इहेक्षणक्षणजुषन् तदपरमपि हंत भजति श्रीर्देवी ॥
विपरीतलक्षणयुतस्त्रिजगत्यपि किंकरो भवति ॥ ८ ॥

श्रीविष्णु ज्या लक्ष्मीच्या डोळ्याशीं डोळा लावून त्यांतच गुंग झाले, ते स्वतःच सर्वोत्कृष्ट असल्यानें लक्ष्मीहि त्यांचीच सेवा करते ह्यांत नवल काय ? परंतु ज्याच्या ठिकाणीं सर्व लक्षणें उलट असतात तो करंटा जेथें जाईल तेथें गुलामगिरींतच रखडणार.

अथ चेह मध्यलोके सकलेष्वपि सत्सु सृष्टजातेषु ॥
मर्त्यः प्रधानजातो यदा मर्त्यलोकोऽयम् ॥ ९ ॥

आतां ह्या मध्यम लोकांत कोट्यावधि प्रकारची जी सृष्टि आपल्याला दिसते, तिच्यामध्यें हा मनुष्यच श्रेष्ठ आहे असें आढळतें; म्हणूनच ह्या मध्य लोकाला मानुष लोक किंवा मर्त्यलोक म्हणतात.

उत्पत्तिः स्त्रीमूला तस्यापि ततः प्रधानभेदापि ॥
क्रियते लक्षणमनयोर्यदि तदिह स्याज्जनोपकृतिः ॥ १० ॥

सृष्टींतील प्राण्यांची उत्पत्ति स्त्रियांपासूनच होते. आणि जरी तिला कोणी कोणी "प्रधान" असें नांव दिलें, तरी तिचें खरें नांव "प्रकृति". ही स्त्रीच आहे म्हणून प्रकृति आणि पुरुष ह्यांना कसें ओळखावें ही खूण जो सांगेल त्याचा जगावर उपकारच होईल.

इत्थं विचिंत्य सुचिरं स्वहृदि समुद्रेण सम्यगवगम्य ॥
नृस्त्रीलक्षणशास्त्रं रचयांचक्रे तदादिकृत्स्नतया ॥ ११ ॥

समुद्राचार्यानें याप्रमाणें पुष्कळ वेळ विचार करून आपल्या मनामध्यें वरील सर्व गोष्टी चांगल्या तऱ्हेनें आणल्या. आणि त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांच्या शुभाशुभ लक्षणांचा विचार ज्यांत आहे, असें हें शास्त्र तयार केलें.

तदपिच नारदलल्लकवराहमांडव्यषण्मुखप्रमुखैः ॥
रचितं क्वचित्प्रसंगात्पुरुषस्त्रीलक्षणं किंचित् ॥ १२ ॥

हें शास्त्र एकट्या समुद्रानेंच रचलें असें नसून नारद, लल्ल, वराह, माण्डव्य, षण्मुख इत्यादि विद्वानांनींहि त्यावर परिश्रमानें ग्रन्थरचना केली आहे. त्यांतच प्रसंगानुसार स्त्री-पुरुषांची शुभाशुभ लक्षणेंहि सांगितलीं आहेत.

तदनंतरमिह भुवने ख्यातं स्त्रीपुंसोर्लक्षणज्ञानम् ॥
दुर्बोधं तन्महदिति जडमतिभिः खंडतां नीतम् ॥ १३ ॥

त्यानंतर पृथ्वीवर या शास्त्राची फारच प्रसिद्धि झाली आणि त्याला स्त्रीपुरुषलक्षणशास्त्र असें लांबलचक नांव पडलें. परंतु तें शास्त्र

समग्र अभ्यास करण्याला फार अवघड वाटूं लागलें म्हणून अल्पबुद्धि लोकांनीं त्याचे निरनिराळे भाग पाडले; विषय तुटक केले.

श्रीभोजनृपसुमंतप्रभृतीनामग्रतोऽपि विद्यंते ॥
सामुद्रिकशास्त्रानि प्रायो गहनानि तानि परम् ॥ १४ ॥

श्रीभोजराजा, सुमन्त इत्यादि अगदीं अलिकडील विद्वान् राजांच्या ग्रन्थसंग्रहामध्यें देखील ह्या सामुद्रिक शास्त्रावरील अनेक ग्रन्थ होते; तरी एकंदरींत ह्या शास्त्रांत गति होणें सर्व साधारण बुद्धीच्या लोकांना कठिणच पडत असे.

खंडीकृतानि पुनः पिंडीकृत्याखिलानि तान्यधुना ॥
सामुद्रिकशुभाशुभमिह किंचिद्वच्मि संक्षेपात् ॥ १५ ॥

म्हणून पुढें कांहीं अभ्यासूंनीं ते निरनिराळे सर्व विभाग पुनः एकत्र करून त्यांपासून जे जे ग्रन्थ रचले तेच सामुद्रिक ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. म्हणून ते ग्रन्थ पाहून हें सामुद्रिक थोडक्यांत सांगतों.

सामुद्रमंगलक्षणमिति सामुद्रिकमिह देहवतां ॥
प्रथममथ समुद्रः कृतवानिति कीर्त्यते कृतिभिः ॥ १६ ॥

मुद्रा म्हणजे अंगावरील लक्षणें; ह्या अर्थावरून शरीरधारी मनुष्यांच्या लक्षणांचें शास्त्र म्हणून याला "सामुद्रिक" म्हणतात. परंतु कांहीं विद्वानांच्या मतानें "समुद्र" नांवाच्या आचार्यानें हें प्रथम रचलें म्हणून त्याला "सामुद्रिक" हें नांव प्राप्त झालें आहे.

## अथाङ्गानि

ऊरूजठरमुर स्थलबाहुयुगं पृष्ठमुत्तमांगं च ॥
इत्यष्टांगानि नृणां भवति शेषाण्युपांगानि ॥ १७ ॥

दोन मांडया, पोट, छाती, दोन्ही बाहू, पाठ, मस्तक, ह्या शरीराच्या

आठ भागांना अष्टाङ्ग म्हणतात. हीं मुख्य अंगें. बाकीच्या भागांना किंवा अवयवांना उपांगें हें नांव आहे.

पूर्वभवांतरजनितं शुभमशुभमिहापि लक्ष्यते येन ॥
पुरुषस्त्रीणां सद्भिर्निगद्यते लक्षणं तदिदम् ॥ १८ ॥

पूर्वजन्मीं केलेलीं पुण्यकृत्यें किंवा पापकृत्यें ह्यांच्यामुळें या जन्मीं शरीरावर शुभाशुभफलदर्शक अशीं चिन्हें, व लक्षणें उत्पन्न होतात, तीं स्त्री किंवा पुरुष अशा दोहोंच्याहि शरीरावर उमटलेलीं असतात असें विद्वानांनीं लिहिलें तेंच आतां सांगतों.

देहवतां तद्बाह्याभ्यंतरभेदेन जायते द्विविधम् ॥
वर्णस्वरादिबाह्यः पुनरंतः प्रकृतिसत्त्वादि ॥ १९ ॥

हीं लक्षणें मनुष्यांच्या ठिकाणीं कांहीं बाह्य आणि कांहीं अंतस्थ अशीं असतात. बाह्य म्हणजे जीं नेत्रादि इंन्द्रियांच्या योगानें कळतात तीं. आवाज, अंगाच्या कातडीचा वर्ण, हाताचा लहान मोठा आकार हीं बाह्य लक्षणें होत. आणि जीं अनुमानानें ओळखावीं लागतात तीं अन्तस्थ. उमदा स्वभाव, प्रकृति हीं अंतस्थ लक्षणें होत.

आद्यंतदाश्रयतया निखिलेष्वपि लक्षणेषु शारीरम् ॥
मनुजानां तस्मादिह वक्ष्यामि तदेव मुख्यतया ॥ २० ॥

एकंदर सर्व लक्षणांमध्यें बाह्यलक्षणें हीं फक्त शरीरावर दृष्टोत्पत्तीस येतात. त्यांना आधार मनुष्याच्या शरीराचा असावयाचा, म्हणून प्रथम बाह्यलक्षणें कोणतीं तें सांगतों. आणि तींहि मुख्य मुख्य सांगतों.

शारीरावर्तगतिच्छायास्वरवर्णगंधसत्त्वानि ॥
इत्यष्टविधं देहवतां पुरुषस्त्रीलक्षणं भवति ॥ २१ ॥

अंगावरील केंसांचा भोंवरा, चालण्याची ढब, अंगाचा रुक्षपणा

किंवा तेजस्विता, आवाज, अंगाच्या कातडीचा रंग, बोलण्याची धाटणी, अंगाचा वास, आणि एकंदर रुबाब किंवा नेभळटपणा हीं आठ बाह्यांगें. स्त्री व पुरुष ह्या दोन्हींमध्यें तीं असतात.

## ॥ अथ पुरुषानाम् लक्षणम् ॥

### ॥ तत्रादौ शारीरलक्षणम् ॥

इह तावदूर्ध्वमूलो पुंसकल्पतरुर्भवेदधः शाखः ॥
पादतलात्तदिदानीं शारीरलक्षणं वक्ष्ये ॥ २२ ॥

पुरुषाचें वर्णन 'उर्ध्वमूल " इत्यादि शब्दांनीं केलें आहे. व वस्तुतः मूळ खालीं आणि शाखा वर असा प्रकार असावयाचा. परंतु हा पुरुषवृक्ष ( अथवा मानवदेहवृक्ष ) असा आहे कीं, त्याचें मूळ म्हणजे मस्तक हें वर आणि शाखा म्हणजे पाय हे खालीं अशी रचना आहे. वर्णन खालपासून वर पर्यंत करीत जावें असा प्रघात असल्यानें आम्हीं प्रथम पायाच्या तळव्यापासून वर मस्तकापर्यंत क्रमानें लक्षणें सांगतों.

आदौ पदस्य तलमथ रेखांगुष्ठांगुलीनखं पृष्ठम् ॥
गुल्फौ पार्ष्णी जंघायुगुलं रोमाणि जानुयुगम् ॥ २३ ॥

म्हणजे पहिल्यानें पायाचा तळवा, त्यावरील रेषा, मग आंगठा, बोटें, व नखें; मग पृष्ठ भाग उंच असतो तो, मग घोंटा, टांच, दोन्ही पोटऱ्या, त्यांच्यावरील लव, मग दोन्ही गुडघे असा क्रम असतो.

ऊरू तथा कटितटं स्फिग्युग्मं तदनु पायुरथ मुष्कौ ॥
शिस्नं तन्मणिरेतो मूत्रं शोणितमथो बस्तिः ॥ २४ ॥

नंतर दोन्ही माण्ड्या, कमर, दोन्ही बाजूंचे नितंब, गुद, ( पुरुषांचें अण्ड भाग, लिंग, रेत, )तसेंच मूत्र, व ( स्त्रियांचें आर्तव ) मूत्राशय.

नाभिः कुक्षी पार्श्वौ जठरं मध्यं ततश्च वलयोऽस्मिन् ॥
हृदयमुरः कुचचूचुकयुग्मं जत्रुद्वयं स्कंधौ ॥ २५ ॥

त्यांच्या पुढें बेंबी, दोन बगला, दोन्ही कुशी, पोट, मध्यभाग त्यांतील वळ्या, हृदय, ऊर, स्तन त्यांच्या बोण्डशा, गळ्याचें मूळ, दोन खांदे.

अंसौ कक्षे बाहू पाणियुगं तस्य मूलपृष्ठतलम् ॥
मीनाद्याकृतिरेखांगुष्ठांगुलिकं नखाः क्रमशः ॥ २६ ॥

खांद्याचीं टोकें, बगलेच्या खालचा भाग, दोन भुजदण्ड, दोन्ही पंजे, मनगट, तळहात, तळहातावरील रेषा, आंगठा, बोटें, त्यांचीं नखें असाक्रम लागतो. त्यानंतर—

पृष्ठं कृकाटिकाऽथ ग्रीवा चुबुकं सकूर्चहनुगंडम् ॥
वदनोष्ठदशनरसना तालु यतो घंटिकाश्वसितम् ॥ २७ ॥

पाठ, मानेची मागील बाजू, गळा, हनुवटी, जबडा, दोन्ही गाल, मुख, ओठ, दांत, जीभ, टाळू, गळ्याची घांटी, श्वास,

नासापुट मक्षियुगं पक्ष्माणि ततो निमेषरुदिते च ॥
भ्रूशंखकर्णभालं तल्लेखा मस्तके केशः ॥ २८ ॥

नाकपुड्या, डोळे, पापण्या, डोळ्यांची उघड झांप, भिवया, आंख, कान, कपाळ, आठ्या, मस्तक, केंस, केशप्रांत.

इत्यापदतलकेशप्रांतमिहानुक्रमेण शारीरम् ॥
अंगोपांगविभक्तं लक्षणविद्भिर्नृणां ज्ञेयम् ॥ २९ ॥

याप्रमाणें पायाच्या तळव्यापासून आरंभ करून मस्तक, केंस केशप्रान्त येथपर्यंत क्रमानें मनुष्याच्या शरीराचे भाग कोणकोणते होऊं शकतात तें पाहून त्यांतील कांहींना अङ्गें आणि कांहींना उपाङ्गें अशीं नांवें देऊन लक्षण शास्त्रज्ञांनीं विभाग ठरविले आहेत.

---

## ॥ अङ्गोपाङ्गांचे शुभाशुभत्व ॥

अस्वेदमुष्णमरुणं कमलोदकांतिमांसलं श्लक्ष्णम् ॥
स्निग्धं समं पादतलं नृपसंपत्तिं दिशति पुंसाम् ॥ ३० ॥

तळपायाला घाम येऊं नये. ते उष्ण असून लाल असावे. लाल कसे तर कमलाप्रमाणें लाल, मांसल, आणि मऊ असावे. तसेंच ते तुळतुळीत असून फार खोलगट नसावें. असे ज्याच्या पायाचे तळवें तो मनुष्य राजकुलांतील असतो. राजकुलांत उपजलेला नसला तरी तो राजाच होणार.

पादचरस्यापिसचरणतलं यस्य कोमलं तल ॥
पूर्णा स्फुटोर्ध्वरेखा स विश्वविश्वंभराधीशः ॥ ३१ ॥

तो पायीं चालणारा जरी असला तरी तळवे मऊच राहावे असे कीं त्यावरील रेषा उर्ध्व असाव्या, म्हणजे टांचेपासून बोटाकडे जाणाऱ्या असाव्या. त्यांना ऊर्ध्वरेषा म्हणतात. पायावर ऊर्ध्वरेषा असल्या तरी देखील सार्वभौम राजपद लाभतें.

वंशच्छिदे कषायं द्विजहत्यायै विपक्वमृत्सदृशम् ॥
पीतमगम्यारतये कृष्णं स्यान्मद्यपानाय ॥ ३२ ॥

तळवा भुरकटकाळा असला तर त्याचा वंश बुडेल. भाजलेल्या मातीसारखा असेल तर त्याच्या हातून चांगल्यांचा नाश होईल. तळवा पिवळा असला तर अगम्यगमन होतें. अगम्यगमन म्हणजे ज्या स्त्री-पुरुषांचा समागम शास्त्रानें किंवा समाजानें निषिद्ध मानला आहे त्यांचा समागम घडून येतो. आणि काळा असला तर मनुष्य दाऊबाज असतो, किंवा होतो.

पांडुरमखाद्यभक्षणकृते तलं लघुदरिद्रतायै स्यात् ॥
रेखाहीनं कठिनं रूक्षं दुःखाय विस्फुटितम् ॥ ३३ ॥

तळवा पांढऱ्या मातीच्या रंगाप्रमाणें असेल तर तो खाऊं नये तें ( मांसादि पदार्थ ) खाणारा असतो. तळवा पातळ असेल तर दरिद्री होतो. तळपायावर रेषा नाहींत असा किंवा तो टणक खरखरीत असला तर त्याच्या कपाळीं दुःख ठरलेलें.

तलमंतः संक्षिप्तं स्त्रीकार्ये मृत्युमादिशति पुंसाम् ॥
रोगाय विगतमांसं मार्गाय ज्ञेयमुत्कटकम् ॥ ३४ ॥

तळवा आंत ओढलेला असा असेल तर तो पुरुष स्त्रियांचें रक्षण करीत असतांना मृत्यु पावेल. परंतु तळवा मांसल नसेल तर मनुष्य रोगी होईल, आणि तो वर उचलल्या सारखा असेल तर त्या मांणसाला प्रवास पुष्कळ घडेल.

रेखां शंखच्छत्रांकुशकुलिशशशिध्वजादि संस्थानाः ॥
अच्छिन्ना गंभीरा स्फुटास्तले भाग्यदेयवताम् ॥३५॥

तळव्यावरील रेषांचे जे प्रकार त्यांना शंख, छत्र, अंकुश, कुलिश, चन्द्रकोर, ध्वज अशीं नांवें दिलेलीं आहेत.

तीं त्या वस्तूच्या आकाराशीं जुळतात म्हणून दिलीं आहेत. पण ह्या रेषा तुटक्या नसून खोल असाव्या आणि स्पष्ट दिसणाऱ्या असाव्या म्हणजे तो मनुष्य भाग्यशाली असतो.

ताः शंखाद्याकृतयः परिपूर्णा मध्यभेदिता येषाम् ॥
श्रीभोगभाजनं ते भवन्ति पश्चिमे वयसि ॥ ३६ ॥

ह्याच आकृतिमधोमध तुटलेल्या परंतु एकंदरीनें परिपूर्ण अशा असतील तर पूर्वायुष्यांत त्यांचे दिवस चांगले जाणार नाहींत, पण नंतर बरेंच वय उलटल्यावर त्यांना लक्ष्मीचा लाभ होऊन सुख लागेल.

गोधासैरिभजंबुकमूषक सदृशाश्च काककंकसमाः ॥
रेखाःस्युर्यस्य तले तस्य न दूरेऽस्ति दारिद्र्यम् ॥ ३७ ॥

परंतु त्याच रेषांचें स्वरूप घोरपड, रानजनावर, कोल्हा, उंदीर

यांच्या आकृतिसारखें किंवा कावळा, मांसाहारी पक्षी यांच्या सारखें असेल तर अशा माणसापासून दारिद्र्य दूर कसें राहील ?

टीपः—वर ज्या वस्तूंच्या किंवा प्राण्यांच्या आकृति प्रदर्शित केल्या आहेत, त्या प्रत्यक्ष पाहूनच त्यांची ओळख करून घ्यावी. तूर्त ही गोष्ट ध्यानांत मात्र वागवावी.

## आंगठा कसा असावा ?

वृत्तो भुजगफणाकृतिरुत्तुंगो मांसलः शुभोंऽगुष्ठः (पादांगुष्ठ)
सशिरो ऱ्हस्वश्चिपिटो वक्रो विपुलः स पुनरशुभः ॥ ३८ ॥

आंगठा सर्पाच्या फणीप्रमाणें खालचें पेरें गोल, लांबट, फुगीर आणि नखाचें पेरें मध्यें रुंदट पण नखाशीं थोडें निमुळतें अशा आकाराचा असावा, असा आंगठा शुभ. परंतु ज्या आंगठ्यावरील शिरा दिसतात, जो आंखूड, चापट, ज्याचें पुढील पेरें वांकडें किंवा भले गलेलठ्ठ किंवा बारीक असतें तो अशुभ समजावा.

श्लक्ष्णा वृत्ता मृदवो घना दलानीव पादपद्मस्य ॥
ऋजवोंऽगुलयः स्निग्धाः सौख्यमसंख्यान्वितं ददाति ॥३९॥

पायाचीं बोटें खरबरींत नसावीं. तीं गोल, मांसल असून फार टणक नसावीं, अशा बोटांना चरण कमळ-दल म्हणतात. अर्थात्च तीं सरळ, तकतकीत दिसावीं, रुक्ष नसावीं, म्हणजे त्या मनुष्याच्या सुखाला अन्तपार नाहीं. अर्थात् पूर्ण सुखी असतो.

टीप—हें वर्णन केवळ दैवी पुरुषाचें आहे एवढेंच ध्यानांत ठेवावें. सध्याच्या परिस्थितीशीं धोरणानें मेळ घालावा.

विरलाः चिपिटाः शुष्का लघवो वक्राः खराः, पदांगुल्यः
यस्य भवंति शिरालाः स किंकरत्वं करोत्येव ॥ ४० ॥

ज्याच्या बोटामध्यें मोठमोठ्या फटी असतात, जीं चापट, वाळकुंडीं, लहान, वांकडीं तिकडीं, खरखरीत असतात, ज्यांच्यावर शिरा दिसतात; त्यांच्या कपाळीं स्वावलंबनाचें जीवित नसतें.

टीप:—सर्व लक्षणें एकाच मनुष्यांत आढळतील असें नव्हे. परंतु जितकीं जास्त आढळतील त्यामानानें शुभाशुभ ठरवावें.

स्त्रीसंभोगानाप्नोत्यंगुष्ठाद्दीर्घया प्रदेशिन्या ॥
प्रथममशुभं च गृहिणीमरणं वा ऱ्हस्व या च कलिम् ॥४१॥

आंगठ्या जवळचें बोट फार लांब असेल तर स्त्री किंवा पुरुष हे चैनबाज असतात. परंतु प्रमाणापेक्षां आखूड असेल. तर पुरुषाला स्त्रीवियोग, आणि स्त्रीला पुरुषवियोग घडेल, किंवा त्यांच्यांत भांडण तंटे होतील.

· आयतया मध्यमया कार्यविनाशोऽति ऱ्हस्वया दुःखम् ॥
धनया समया पुत्रोत्पत्तिस्तोकं नृणामायुः ॥ ४२ ॥

मधलें बोट प्रमाणाबाहेर लांब असेल तर अपयश, आंखूड असेल तर मनुष्य दुःखी; तेंच बोट जाड म्हणजे खालचे पेरें जास्त जाड, त्यापेक्षां वरचें कमी अशा प्रकारानें सारखें असेल तर पुत्र पुष्कळ, परंतु सळनळीत असेल तर पुत्र कमी, किंवा त्या माणसाचें आयुष्य कमी.

यस्याऽनामा दीर्घा स प्रज्ञाभाजनं भवति मनुजः ॥
ऱ्हस्वा स्याद्यस्य पुनः स कलत्रवियोजितो नियतम् ॥४३॥

ज्याची अनामिका लांब तो मनुष्य बुद्धिमान्, परंतु ती आखूंड असेल तर त्याला वारंवार किंवा कायमचा स्त्रीवियोग घडेल.

दीर्घा कनिष्ठिकाऽपि स्याद्यस्य स्वर्णभाजनं स नरः ।
यदि साऽपि पुनर्लघ्वी परदारपरायणः सततम् ॥ ४४ ॥

करंगळी जास्त लांब असेल तर मनुष्य धनसंचय करणारा असतो, परंतु जास्त आंखूड असेल तर त्या पुरुषांची इतरांच्या बायकांवर वांकडी नजर असते. त्याची वागणूक ठीक नसते.

टीप:—कोणताहि प्रकार ठरवितांना एकाच श्लोकार्थावर भर देऊं नये. इतर शुभाशुभ प्रकार लक्षांत घ्यावे.

यस्य प्रदेशिनी वा कनिष्ठिका वा भवेद् ध्रुवं स्थूला ॥
शिशुभावे तस्य पुनर्जननी पंचत्वमुपयाति ॥ ४५ ॥

ज्या मनुष्याच्या आंगठ्याजवळचें बोट किंवा करंगळी हीं दोन बोटें खूपजाड असतात त्याची आई त्याच्या लहानपणींच मृत्यु पावण्याचा फार संभव असतो.

विमलाः प्रवालरुचयः स्निग्धाः कूर्मोन्नता नखाः श्लक्ष्णाः ॥
मुकुराकाराः सूक्ष्मा सौख्यं यच्छंति मनुजानाम् ॥ ४६ ॥

ज्याच्या बोटांचीं नखें स्वच्छ, गुलाबी रंगाचीं, गुळगुळीत कांसवाच्या पाठीप्रमाणें फुगीर आणि चकचकीत असतात, पण उगाच भसाडीं नसून फुलाच्या कळीप्रमाणें लहान असतात त्याचें आयुष्य सुखांत जातें.

स्थूलैर्नखैर्विदीर्णैशूर्पाकारैखश्च नखदीर्घैः ॥
असितैः सितैर्दरिद्रा भवंति तेजोमृजारहितैः ॥ ४७ ॥

पण उलट बोटाचीं नखें फताडी, बटबटीत, फाटल्यासारखीं लांबट, काळसर किंवा पांढुरकी, निस्तेज अशीं असतील तर त्याला आयुष्यांत दुःखाचे व दारिद्र्याचे प्रसंग वारंवार येतील.

मांसोपचितं स्निग्धं गूढशिरं उत्कटं चरणपृष्ठम् ॥
रोमस्वेदविरहितं पृथुलं कमठोन्नतं शस्तम् ॥ ४८ ॥

आतां पावलाचा पृष्ठभाग कसा असावा असें ह्मणाल तर तो भरगच्च असून खरखरीत नसावा, शिरा दिसूं नयेत. पृष्ठभाग ठसठशीत असावा त्यावर घाम येऊं नये, तो केंसाळ असूं नये. आकार बारीक नसावा परंतु उंच असावा. असें पाऊल शुभ.

अंतर्गूढा गुल्फाः सरोजमुकुलोपमाः श्रियं ददते ॥
सूकरवृत्ते विषमाः शिथिलाः प्रथयंति वधबंधम् ॥ ४९ ॥

पायाचे घोटें फार उंचट असें दिसूं नयेत, उंचीची लकेर असावी, म्हणजे द्रव्य विपुल जमतें. परंतु घोंटे डुकराच्या पायाप्रमाणें दिसत

असले तर वाईट. डुकराच्यासारखे कमजास्ती उंच व पोंचट असे असले तर त्याला घातपात होईल किंवा कैद भोगावी लागेल.

महिषसमानैर्गुल्फैश्चिपिटैर्वा दुःखसंयुताः पुरुषाः ॥
तैरपि रोमोपगतैर्नित्यमपत्येन परिहीनाः ॥ ५० ॥

रेड्याच्या पायाप्रमाणें घोंटा असला किंवा चापट असला तर मनुष्य दुःखी कष्टी असतो; आणि तेथें केंस उत्पन्न झाले तर संतति होणार नाहीं, आणि झाली तर जगणार नाहीं.

कंदः पादांबुरुहस्येव भवेद्यस्य वर्तुला पार्ष्णिः ॥
तन्नरमनुरागादिव नियतं रमयति रमा रामाः ॥ ५१ ॥

ज्या मनुष्याच्या पायाची टांच कन्दाप्रमाणें वाटोळी असते, आणि कन्दाप्रमाणें तजेलेदार दिसते त्याला लक्ष्मीला काय तोटा? ती अनुरक्त स्त्रीप्रमाणें त्याच्या घरीं सदैव नांदते.

समपार्ष्णिः सुखसहितो दीर्घायुः स्यान्नरो महापार्ष्णिः ॥
स्वल्पायुरल्पपार्ष्णिः प्रोन्नतपार्ष्णिर्निजेय : स्यात् ॥ ५२ ॥

ज्याच्या दोन्ही टाचा एकसारख्या असतात तो सुखांत आयुष्य घालवितो. ज्याच्या टाचा मोठ्या भक्कम असतात तो दीर्घायुषी होतो. बारीक टाचा असणारा अल्पायु होतो. ज्याच्या टाचा उंच त्याचा पराजय कधीं होत नाहीं.

लक्ष्मी दिशतिच केसरिमीनव्याघ्रोपमा नृणाम् जंघा ॥
यदिऋक्ष सदृशता स्यात् वधबंधौ निःस्वतां प्रायः ॥ ५३ ॥

मनुष्याच्या पोटऱ्या सिंह, मकर, वाघ ह्यांच्या पोटऱ्याप्रमाणें बळकट असल्या म्हणजे त्याला पैसा अलोट मिळतो, पण पोटऱ्या अस्वलाप्रमाणें हडकुळ्या असल्या तर दारिद्य भोगावें लागतें.

पिशितांतर्गतनलककुरंगजंघोपमा श्रियं पुंसाम् ॥
प्रविरलमृदुतररोमादत्ते क्रमवर्तुला जंघा ॥ ५४ ॥

विरळ नसलेले, मऊ वर्तुळाकार केस पोटऱ्यावर असतील तर ते शुभ. मुंगुस अगर हरिण यांच्यांप्रमाणें पोटऱ्या असतां तो योग श्रीमान करणारा असतो.

स्थूला दीर्घा मार्गं वितरत्युद्बद्धपिंडिका जंघा ॥
श्वशृगालकरभरासभवायसजघोपमास्त्वशुभम्॥ ५५ ॥

पोटऱ्या घस्मर म्हणजे खूप जाडजूड लांबट असल्या, तर वारंवार प्रवास घडतो. पण त्या जर कुत्रा, कोल्हा, तरस, गर्दभ, कावळा यांच्या पायासारख्या बेडौल, किडकिडीत असल्या तर आयुष्यक्रम दुर्दैवी असतो.

ललितानि स्निग्धानि भ्रमरश्यामानि देहरोमाणि ॥
जायंते भूमिभुजां मृदूनि विसतंतुसूक्ष्माणि ॥ ५६ ॥

अंगावरचे केंस तलम, तुळतुळीत, काळेभोर, रेशमाप्रमाणें मऊ असले म्हणजे राज्यैश्वर्य प्राप्त होतें. किंवा मनुष्य राज्यपदी असला तर त्याचे केंस वरीलप्रमाणें दिसतात.

सुभगो रोमयुतः स्याद्विद्वान्घनरोमसंयुतो मनुजः ॥
उद्धतरोमश्च पुनरंगैर्बहुभिश्च वित्तसंकलितः ॥ ५७ ॥

अंगावर असावयास पाहिजे तेथेंच योग्यप्रमाणांत केंस असले तर पुरुषाचा चेहरा आणि स्त्रीचें सौंदर्य खुलून दिसतें. केंस झुबकेदार असलें म्हणजे शरीर तर ऐटदार दिसतेच पण जवळ विद्वत्ता आणि धनहि यथास्थित असतें.

रोमैकैकं नृपतिर्द्वेद्वे श्रोत्रियधनाढ्यबुद्धिमती ॥
त्रित्रीण्येतानि पुनः निःस्वानां मूर्धजेष्वेवम् ॥ ५८ ॥

केसाचें मूळ असतें तेथून एकेकच केस जर निघत असेल तर तो राजा किंवा भूमिपाल होतो. केंस दोन दोन उगवतील तर तो विद्वान्, धनवान्, किंवा बुद्धिमान् असतो. पण तीन तीन केंस उगवले तर दारिद्र्य पाठीमागें लागतें.

टीप--सर्व केशमुळांतून दोन दोन तीन तीन केंस उगवत नाहींत. कांहीं ठिकाणीं एकेक आणि कांहीं ठिकाणीं दोन दोन उगवतात.

रोमरहितः परिव्राट् स्यादधमः स्थूलरुक्षखरलोमा ॥
पापा पिंगलरोमा निःस्वस्फुटिताग्ररोमाऽपि ॥ ५९ ॥

केंस नसतील तर तो मनुष्य गोसावी होईल; केंस राठ, राकट, फार जाडी असे असतील तर तो मनुष्य दुष्ट, नीच असेल, केंस पिंगट तपकिरी असतील तर दरिद्री, तसेंच केसाच्या शेंड्याला फाटे फुटले असतील तरी दरिद्रीच.

कुंजरजानुर्मनुजो भोगयुतः पीनजानुरवनीशः ॥
संश्लिष्टसंधिजानुर्वर्षशतायुर्भवेत्प्रायः ॥ ६० ॥

गुडघे हत्तीच्या गुडघ्याप्रमाणें असले म्हणजे चैनीमध्यें कमी पडत नाहीं. पण ते भरगच्च भरले असले तर राज्याधिकार प्राप्त होतो. गुडघा डळमळीत असूं नये. म्हणजे मनुष्य निरोगी आणि दीर्घायु होतो.

निम्नैः स्त्रीपरवशता शशिवृत्तैर्गूढमांसलै राज्यम् ॥
दीर्घं महद्भिरायुः सुभगत्वं जानुभिः स्वल्पैः ॥ ६१ ॥

गुडघ्याना खळी पडेल तर मनुष्य स्त्रीच्या किंवा परक्याच्या ओंजळीनें पाणी पिणारा होतो. गुडघे अर्धचन्द्राकार किंवा गोलाकार मांसांत रुतलेले असतील तर तो राज्याधिकारी होईल किंवा असेल, गुडघे मोठे लांबट असले तर दीर्घायुषी आणि लहानसर असले तरी भाग्यवान् असतो.

दिशति विदेशे मरणं मनुजानां जानु मांसपरिहीनम् ॥
कुंभनिभं दुर्गतितां तालफलाभं तु बहुदुःखम् ॥ ६२ ॥

गुडघे मांसहीन हडकुळे असतील तर त्या माणसाला परकी देशांत मरण येईल. मडक्यासारखे गुडघे ढेबरे असतील तर दुर्भाग्य, आणि ताडफळाप्रमाणें वेडेवांकडे असले तर तो मनुष्य फार दुःखी होतो.

जानुद्वितयं हीनं यस्य सदा सेवते स वधबंधौ ॥
इदमेव यस्य विषमं स पुनः प्राप्नोति दारिद्र्यम् ॥ ६३ ॥

ज्याचे गुडघे पेबळट त्याला अपघातानें मरण किंवा बन्दिवास घडण्याचा संभव, आणि दोन्ही गुडघ्यांची रचना भलतीच विद्रूप असेल तर द्रारिद्र्य ठेवलेलें.

टीपः—असल्या श्लोकांचा अर्थ तारतम्यानें करावा. कारण कांहीं लक्षणें वाईट असलीं तर दुसरीं कांहीं चांगलीं असतात, म्हणून एकांगीं अनुमान केव्हांही ग्राह्य धरूं नये.

---

## आतां मांड्यांचें वर्णन

ऊरू यस्य समांसे रंभास्तंभभ्रमं वितन्वाते ॥
कोमलततुरोमचिते स जायते भूपतिः प्रायः ॥ ६४ ॥

ज्यांच्या मांड्या मांसपुष्ट, आणि दिसण्यांत केळीच्या खांबाप्रमाणें जाडी आणि गोल अशा असतात आणि ज्यांच्यावरील लव नाजूक व बारीक अशी असते तीं मनुष्यें बहुतकरून राज्यपदाधिकारी किंवा प्रत्यक्ष राजे असतात.

स्निग्धावूरू मृदुलौ क्रमेण पीनौ प्रयच्छतो लक्ष्मीम् ॥
विकचौ स्त्रीवल्लभतां गुणवत्तां संहतौ वृत्ती ॥ ६५ ॥

मांडया तजेलेदार, खरखरीत नाहींत अशा आणि पुष्ट असतील तर द्रव्यप्राप्ती, त्यावर लव नसेल तर स्त्रियांचा शोकी, आणि गोल व भक्कम असतील तो मनुष्य गुणवान् असतो.

स्थूलाग्रौ मध्यनतौ स्यातां मार्गानुसंधिनी पुंसाम् ॥
कठिणे चिपिटे विकटे निर्मांसे दुर्भगत्वाय ॥ ६६ ॥

( मांडया कमरेपाशीं जाड आणि गुडघ्याकडे निमुळत्या असाव्या ) परंतु त्या मध्येंच बारीक आणि गुडघ्याजवळ जाड अस-

तील तर मनुष्य नेहमीं प्रवास करणारा असेल; त्या टणक, चापट आणि विद्रुप वाळकुंडच्या असतील तर तो मनुष्य करंटा असेल.

## कमरेचें वर्णन

यस्य कटिः स्याद्दीर्घा पीना पृथुला भवेत्स वित्ताढ्यः ॥
सिंहकटिर्मनुजेंद्रः शार्दूलकटिश्च भूनाथः ॥ ६७ ॥

कमरेचा भाग लांबट, पुष्ट, जाडजूड असेल तर मनुष्य अतिशय संपत्तिमान् असतो. कमरेचावरील भाग म्हणजे पोट आणि नितंब ह्यांच्यामधील भाग घेराला कमी असावा. सिंहाची किंवा वाघाची कमर असते तसा असावा, म्हणजे तो मनुष्य राज्यपदारूढ होतो किंवा पुष्कळ जमीनीचा मालक असतो.

रोमशकटिर्दरिद्रो ऱ्हस्वकटिर्दुर्भगो भवेत् मनुजः ॥
शुभमर्कटकरभकटिदुःखी संकटकंटिः पापः ॥ ६८ ॥

कमरेचे जागीं केंस पुष्कळ असले, तर दरिद्री. कमरेचा घेर अगदीं लहान असला तरीहि तो मनुष्य दुःखीच राहतो. त्याचप्रमाणें कुत्रा, माकड, तरस ह्यांच्याप्रमाणें कमर ज्याची असेल तोहि दुःखीच असणार. आणि कमर वांकडी हडकुळी असेल तर तो पापकर्मी असतो.

टीपः——कमर ही घेरांत कमी असावी हें खरें, तरी तीं गरगरीत गोल नसावी. लांबट असावी. सिंह, वाघ यांची कमर आणि माकड, कुत्रा ह्यांची कमर ह्यांच्यांतील भेद बारकाईनें पाहून कयास ठरवावा.

मंडूकस्फिङ् नृपतिः सिंहस्फिङ् मंडलद्वयाधिपतिः ॥
धनमांसस्फिग्धनवान्व्याघ्रस्फिङ्मंडलाधीशः ॥ ६९ ॥

कडोसरीचा भाग बेडकाप्रमाणें घट्ट असावा म्हणजे अधिकार प्राप्त होते. सिंहाप्रमाणें तो भाग असेल तर देशाधिपति, मांसल असेल तर धनाढ्य, आणि वाघाच्याप्रमाणें चिवट असेल तर देशाधिपति असेल.

उष्ट्रप्लवंगमस्फिग्धनधान्यविवर्जितः पुमान्नियतम् ॥
अतिपीना स्फिग्निःस्वो ऊर्ध्वस्फिग्व्याघ्रमृत्युः स्यात् ॥ ७० ॥

कडोसरीचा भाग उंट, मर्कट यांच्याप्रमाणें बेडौल असेल तर मनुष्य दरिद्री किंवा भिक्षेकरी असणार. उगाच फारच ढेबरा असेल तरी दरिद्रीच. तेथें उंचवटा स्पष्ट दिसल्यासारखा असेल तर वाघापासून मृत्यू घडेल.

यतमांसो गंभीरः सुकुमारः संवृतः समः शोणः ॥
पायुः शुभो नराणां पुनरशुभो भवति विपरीतः ॥ ७१ ॥

पायु म्हणजे गुह्य भाग मांसल असावा, परंतु तेथील कातडें वाळल्याप्रमाणें टणक नसावें, भाग प्रमाणशीर लालसर असावा म्हणजे सुलक्षण, तसें नसेल, अशुभ.

टीपः——ह्या वर्णनाचा उपयोग व्यवहारांत नाहीं. प्रकाशन दृष्ट्या हा भाग वगळतां येत नाहीं म्हणून त्रोटक दिला आहे.

मुष्का स्वयं प्रलंबा जायंते सुप्रतिष्ठिता यस्य ॥
स भवति भर्ता नियतं भूमेः सप्ताब्धिवलयायाः ॥ ७२ ॥

ज्याचा कोश लांबट, भरदार परंतु लुला नसेल असा मनुष्य लौकिकवान् होतो. फार काय तो भूमीचा मालक तर होईल; परंतु देशाधिपतीहि होईल.

श्लक्ष्णैः समैर्नृपत्वं चिरमायुर्भवति लंबितैः वृषणैः ॥
जलमरणमद्वितीयैर्मनुजानां कुलविनाशोऽपि ॥ ७३ ॥

दोन्ही वृषणें सारखीं, समप्रमाणांत, असलीं तर राज्यपद मिळतें. कोश लांबट असेल तर दीर्घायुष्य लाभते पण वृषण एकच असेल तर जलांत मृत्यु होईल किंवा वंशविच्छेद होईल.

टीपः——अर्थ करतांना एकांगी वचनाबद्दलची दिलेली सावधगिरी बाळगण्याची सूचना लक्षांत ठेवावी.

स्त्रीलोलत्वं विषमैः प्राग्पुत्रो दक्षिणोन्नतैः वृषणैः ॥
वामोन्नतैश्च तैरपि दुःखेन समं भवति दुहिता ॥ ७४ ॥

कोश लहान मोठें असतील तर स्त्रीलंपट; कोश भाग उजवीकडे वर आलेला असेल; किंवा उजवीकडे वर चढत असेल, तर पुत्र संतति प्रथम. आणि डावीकडे चढत असेल तर कन्या संतति प्रथम.

निःस्वाःशुष्कैः स्थूलैरगम्यरमणीरतस्तरंगसमैः ॥
पुनरर्धार्धैर्वृषणैर्भवति न सोऽपि चिरायुरिह पुरुषः ॥ ७५ ॥

कोश सुकलेला असेल तर दारिद्र्य; घोड्याच्या वृषणाप्रमाणें मोठें असतील तर त्याच्या स्त्रीसंभोगाला धरबन्ध राहाणार नाहीं. आणि अर्ध्या अवयवाइतकीं लहान असतील तर तो मनुष्य दीर्घायुषी होणार नाहीं.

शिश्नमनिम्नसमुन्नतमदीर्घलघु संयुतं च तन् मृदुलम् ॥
उष्णं धनधान्यवतामश्लथमथवर्तुलं विशिरम् ॥ ७६ ॥

( अनुत्थित ) अवयव नेहमीं लोंबलेला किंवा उंचट नसावा, फार लांब किंवा थोकडाहि नसावा, ठाकठीक असून टणक, स्पर्शाला थंडगार नसावें म्हणजे मनुष्य धनधान्ययुक्त असतो, तसेंच अवयव शिरशिरीत किंवा शिरांनीं व्याप्त नसावा.

स्थूलग्रंथिरतिसुखी केशनिरूढे महीपतिः शिस्ने ॥
व्याघ्रहयसिंहतुल्ये भोगी स्यादायुषोदैर्घ्ये ॥ ७७ ॥

ज्याचा मणी स्थूल आहे तो अतिशय सुखी, आणि मूलभागीं दाट केंस असतील तर तो भूमिधारक ( म्हणजे जमीनदार ) असेल. आणि वाघ, घोडा, सिंह ह्यांच्याप्रमाणें मणि असेल तर तो पराक्रमी राजा असेल.

स्पष्टशिरानिचितमपि त्वग्हीनं मेहनं भृशं विमलम् ॥
लघु मृदु सुरभिपरिमलं पुंसां सौभाग्यवित्तकरम् ॥ ७८ ॥

इंद्रियावरील शिरा स्पष्ट दिसत असल्या म्हणजे लक्षण अशुभ,

तथापि मणि अनावृत असेल, अतिशय मोठा नसून स्वच्छ, तरतरीत, मऊ असून दुर्गन्धयुक्त नसावा म्हणजें तें लक्षण भाग्यशालित्व

लिंगे लघुनि धनाढ्यो निरपत्यो वा शिरायुतेऽल्पसुत: ॥
दक्षिणनामिते पुत्रा वामनते कन्यकाजनक: ॥ ७९ ॥

इन्द्रिय प्रमाणबद्ध असलें तर धनाढ्य, परंतु त्यावर शिरा फार दिसत असतील तर संतति होणार नाही, किंवा फार कमी संतति होईल. झोक उजवीकडे असेल तर पुत्र संतति आणि डावीकडे असेल तर कन्या सन्ततीचा योग.

य: समचरणनिषण्णो गुल्फौ नतशेफसा परिस्पृशति ॥
स सुखी ज्ञेयो यदि पुनरवनितलं प्रायशो दु:खी ॥ ८० ॥

उकिडवे बसले असतांना विवस्त्र स्थितिमध्यें जर घोट्याला अवयवाचा स्पर्श होऊं शकणार नाहीं तर लक्षण ठीक, त्याला सुख होण्याचा योग, आणि तसें नसेल तर तें लक्षण दु:खप्राप्ति दर्शवितें.

टीप---ह्या आर्येत पाठभेद असल्यानें अर्थ उलट सुलट निघतो. परंतु संगति आणि ग्रन्थाधार ह्यांच्या धोरणानें येथें अर्थ दिला आहे.

स्थूलमधो विनतं स्यात्तीक्ष्णाग्रदीर्घमुन्नतं शिथिलम्
समलं धनहीनानां शिश्नं भुग्नं सदोन्मिषितम् ॥ ८१ ॥

अवयवाचा भाग किंवा अवयवच जर फार स्थूल, नेहमीं वांकलेला, अणकुचीप्रमाणें टोंक असलेला, साधारण असावयाचा त्यापेक्षां कमी दीर्घ, खालीं पडणारा, शिथिल, मळकट, वाकडातिकडा, किंचितच उघडा असा अवयव दु:ख दारिद्र्याचा निदर्शक असतो.

स्थूलशिराभिर्युक्त:च्छिद्रवता प्रजननेन दारिद्र्यम् ॥
अतिकोमलेन लभते नर: प्रमेहादिना मरणम् ॥ ८२ ॥

ह्या श्लोकांतील अर्थ मागें आलेला आहे. म्हणून पुनरुक्ति केली

नाहीं ( ह्यांत जास्त इतकेंच आहे कीं ) अवयव कुलक्षण युक्त असेल तर प्रमेह इत्यादि रोगांनीं मृत्यू येण्याचा संभव आहे.

हरितांजनाभरेखो महामणिर्जायते समोत्तानः ॥
मंथानकपुष्पनिभो यस्य स भर्ता भुवो भवति ॥ ८३ ॥

वरील लक्षणांपैकीं शुभ लक्षणें असून रंग काळसर असला तरी हरकत नाहीं पण तांबूस निळसर असावा ( नुमत्या रंगाचें महत्त्व नाहीं शुभ लक्षणांनीं युक्त पाहिजे ) मन्दाराच्या फुलाप्रमाणें रंग असेल तर राज्याधिकार योग.

मणिभिर्धनिनो रक्तैः स्मेरजपापुष्पसंनिभैर्भूपाः ॥
श्लक्ष्णैः स्निग्धैः सुखिनो मध्योत्तानैश्च पशुमंतः ॥ ८४ ॥

( शुभ लक्षणांसहित ) रंग लालसर असावा. उमलणाऱ्या जास्वंदीच्या फुलाप्रमाणें तांबूस असावा, म्हणजे भूमिधारणाचा योग असतो. सहज दिसण्यांतही ( कोणताहि ) अवयव मोटीव असल्याप्रमाणें दिसावा म्हणजे सुखाचा आणि धान्यपशु इत्यादिकांचा मालक होण्याचा योग असतो.

कलधौतरजतमुक्ताफलप्रवालोपमा महामणयः ॥
येषां भवंति दीप्तास्ते सजलधिभूमिभर्तारः ॥ ८५ ॥

( वरील लक्षणांचाच निराळ्या तऱ्हेनें खुलासा पुनः केला आहे ) पूर्वीं रंग जपा कुसुमाप्रमाणें असावा असें लिहिलें, आतां तप्त सुवर्णाप्रमाणें किंवा पोवळ्याप्रमाणें रंग उत्तम असें सांगतात. त्यांत चकचकीतपणा असावा, म्हणजे असा पुरुष राज्यपदाधिकारी होतो.

दारिद्र्यजुषः परुषैः पुरुषाः श्यामैर्विपांडुभिर्मणिभिः
मध्योन्नतैश्चकन्या जायंते दुःखिनः स्फुटितैः ॥ ८६ ॥

( ह्या श्लोकांत वैशिष्ट्य नाहीं म्हणूनच अर्थ दिला नाहीं )

विद्रुमहेमोपमया महामणौ रेखया धनवान् ॥
दौर्भाग्यवान् समलया धूसरया जायते निःस्वः ॥ ८७ ॥

( नुसता रंग असावा तसा नसला पण ) त्या वरील रेषा जरी पोवळ्याप्रमाणें असली तरी धनसंपत्तीचा लाभ होईल. तीच रेषा मलीन, काळी किंवा धुरकट रंगाची असेल तर दारिद्र्याची पीडा भोगावी लागेल.

वरील बऱ्याच श्लोकांमध्यें कोश आणि अयवय ह्यांच्या शुभाशुभ लक्षणांचें वर्णन दिलेलें आहे. तें कित्येकांस त्रासदायक अथवा चमत्कारिक वाटेल. आणि तें तसें आहेही; कारण त्याचा व्यवहारदृष्ट्या हल्लीं उपयोग नाहीं; इतक्या खोलांत कोणी शिरत नाहीं आणि त्यांत विशेष अर्थहि नाहीं. तथापि ज्या काळांत हे श्लोक लिहिले तो काळ सुमारें १५०० वर्षांपूर्वींचा होता हें लक्षांत आणलें आणि त्या वेळच्या शक, किरातादि राजांच्या चालीरीति ध्यानांत घेतल्या म्हणजे ह्या वर्णनांची त्या लोकांना जरूर होती असें दिसून येईल. इन्द्रियाचें वर्णन झाल्यावर रेताचें वर्णन ओघानेंच आलें म्हणून तें सांगतात.

रेतसि पुष्पसुगंधिनि राजा यज्वा नरः सुरागंधे ॥
मधुगंधे बहुवित्तः सुतधनवान्मीनगंधः स्यात् ॥ ८८ ॥

रेताचा वास फुलांच्या सुवासाप्रमाणें आला तर राज्यपदप्राप्ति, सोमरसाप्रमाणें वास असला तर यज्ञकर्ता. मधाप्रमाणें वास येत असला तर अति संपत्ति मान्, मत्स्याच्या प्रमाणें वास येईल, तर धनप्राप्ति आणि पुत्र प्राप्ति.

( जो पुरुष पूर्णपणें निरोगी आणि मजबूत बांध्याचा असतो त्याच्या रेताला घाण येत नाहीं असें वैद्य शास्त्रज्ञ म्हणतात. )

सुरभिद्रव्यसगंधे श्रियोऽन्यगंधेऽतु दारिद्र्यम् ॥
लाक्ष्यागंधे पुत्री निः संभोगाः पुनः पिशितगंधे ॥ ८९ ॥

( अबीर, बुक्का, इत्यादि ) सुगंध द्रव्याप्रमाणें रेताचा वास असेल तर द्रव्यप्राप्ति, घाणेरडा वास असेल तर दारिद्र्य. लाखेच्या

वासाप्रमाणें वास येईल तर कन्यासंततीं; मांसाप्रमाणें वास येत असेल तर विषय सुख नाहीं. [ येथें ग्रन्थांतील पाठ थोडा संशयास्पद आहे ]

निंबूवर्णेन सुखी दुग्धसवर्णेन रेतसा नृपतिः ॥
धूम्रेण दुःखसहितः स्याद्दुष्टः श्यामवर्णेन ॥ ९० ॥

निंबाप्रमाणें किंचित् पिंवळा शुक्राचा रंग असेल तर सुख, दुधाप्रमाणें पांढरा शुभ्र असेल तर राज्यपद प्राप्ति, धुरकट असेल तर दुःखी, आणि काळसर असेल तो मनुष्य दुष्ट असेल.

यस्य च्यवते रेतो लघुमैथुनगामिनो बहुस्निग्धम् ॥
दीर्घायुः संपात्तिं पुत्रानपि विंदते स पुमान् ॥ ९१ ॥

सहज लीलेनें जो संभोग करूं शकतो, आणि ज्याचें वीर्य योग्यवेळींच उपयोगांत येतें. आणि तें भरपूर चिकट असें असतें, त्या पुरुषास पुत्र संतति, संपत्ति, दीर्घायुष्य ह्यांचा यथेच्छ लाभ होतो. ह्यांच्या उलट—

निपतति शुक्रं स्तोकं चिरमैथुनसंगतस्यापि ॥
दारिद्र्यं सोऽल्पायुः बहुकन्याजनकतां भजते ॥ ९२ ॥

पुष्कळ वेळ संभोग करूनहि ज्याला वीर्य कमीच येतें, त्याला रोग, दारिद्र्य ह्यांच्यामुळें त्रास होऊन आयुष्यहि घटतें. किंवा त्याला मुलीच पुष्कळ होतात.

द्वित्रिचतुर्धाराभिः प्रदक्षिणावर्तयातिमूत्रं स्यात् ॥
पिंजरवर्णं नृपतेः सुखिनो वलितैकधाराढ्यम् ॥ ९३ ॥

लघुशंका करतांना धार, दोन दोन, तीन तीन, चारचार धारांनीं उजव्या बाजूकडे झुकून पडेल, आणि ती यथायोग्य रंगाची असेल तर राजा, आणि एकच धारेनें कमान घेऊन पडेल तरी सुख पावेल.

कृतशब्दमेकधारं नृपस्य मूत्रं द्विधारमाद्यस्य ॥
निःशब्दं बहुधारं तदपि दरिद्रस्य विज्ञेयम् ॥ ९४ ॥

एकाच धारेनें पडतांना शब्द होत असेल तर राज्याधिकार; प्रथम दोन धारा आणि आवाज नाहीं, किंवा पुष्कळ धारांनीं पडत असूनहि शब्द नाहीं असें असेल तर दारिद्य.

येथपर्यंत गुह्य भागांतील अवयवांचा विचार झाला. त्या श्लोकांचें भाषान्तर करण्याचें कारण नव्हतें. परंतु ग्रंथोक्त श्लोक सोडूं नयेत म्हणूनच आशय सामान्यतः सांगितला.

---

## शोणित वर्णन.

स्निग्धप्रवालतुल्यं यस्यांगे भवति शोणितं रुधिरम् ॥
स वहति भुजयां मनुजो निखिलांबुधिमेखलां वसुधाम् ॥ ९५ ॥

ज्या पुरुषाचें रक्त पोवळ्याप्रमाणें ( किंवा डाळिंब फुलाप्रमाणें ) लाल असतें. आणि तें चकाकित आणि दाट असतें तो सर्व समुद्र-वलयांकित पृथ्वीवर आपल्याच पराक्रमानें आपली सत्ता स्थापन करतो.

रुधिरं यस्य शरीरे रक्तांबुजवर्णसंमितं भवति ॥
भुजवल्लिकंकणरणत्कारा तमनुसरति राज्यश्रीः ॥ ९६ ॥

ज्याच्या शरीरांतील रक्त तांबड्या कमळाच्या रंगाप्रमाणें लाल भडक असतें, त्या पुरुषापुढें राज्यश्री हात जोडून उभी राहते.

किंचित्पीतं शोणं शोणितमिह भवति मध्यमे पुंसि ॥
ईषत्कृष्णं रक्तं तत्तु जघन्ये परिज्ञेयम् ॥ ९७ ॥

ज्याला मध्यम सुख लाभावयाचें त्याचें रक्त अगदीं पांढरें शुभ्र नसलें आणि पिवळसर लाल असलें तरी चालेल, परंतु ज्याचें रक्त तांबडें असलें तरी त्यांत काळसरपणा असतो तो पुरुष कनिष्ठ प्रतीचा ठरेल असें समजावें.

शास्ताबस्तिः पुंसां विस्तीर्णा मांसलोन्नता स्निग्धा ॥
शुष्का विकटा कठिना दारिद्र्यं दिशति वा दुःखम् ॥ ९८ ॥

भाग्यशाली पुरुषाचा बस्ति ( म्हणजे इन्द्रियाच्या वरील भाग ) विस्तृत मांसल आणि तुळतुळीत असतो. परंतु ज्याचा बस्ति सुकट बेडौल टणक असा असेल त्याला दुःख दारिद्र्यांत दिवस कण्ठावे लागतात.

श्वशृगालकरभसैरिभतुल्या बस्तिर्नता भवति येषाम् ।।
संकीर्णोत्क्लिन्ना ते धनहीनाः स्युर्नराः प्रायः ।। ९९ ।।

ज्यांचा बस्ति भाग श्वान, शृगाल, लांडगा इत्यादि दुष्ट प्राण्याप्रमाणें असतो, किंवा बस्तिभाग लोंबता, आकारहीन लबलबीत असतो ते लोक बहुत करून दरिद्रीच असावयाचे.

पृथुरुच्चस्थनाभिर्गंभीरा मंडलाकृतिः सौख्यम् ।।
विदधाति धनं मेधां मनुजानां दक्षिणावर्ता ।। १०० ।।

बेंबी खोलगट जागेंत मोठी व वर उचललेली अशी असावी. ती वाटोळी असली तर सौख्यप्राप्ति आणि धनप्राप्ति तर होतेच पण तीचा भोंवरा उजवीकडे असेल तर उत्तम बुद्धिहि प्राप्त होईल.

शतपत्रकार्णिकाभा नाभिःस्याद्यस्य तनुजमात्रस्य ।।
प्राप्नोति सपदि पुमान् स सुवर्णां सार्णवामवनीम् ।। १०१ ।।

बेंबीची रचना आणि घाट कमलाच्या गेंदाप्रमाणें ज्याचा असेल त्या मनुष्याला समुद्रापर्यंतच्या सर्व भूप्रदेशाचें राज्य मिळण्यास विलम्ब लागत नाहीं.

पुंसां नाभिर्दीर्घो यथाक्रमं पार्श्वयोस्तदूर्ध्वमधः ।।
दीर्घायुरीश्वरत्वं गोस्वामित्वं सदा तनुते ।। १०२ ।।

ज्याची बेंबी दोन्ही बाजू, आणि वर व खालीं क्रमानें सारखीच लांब किंवा पसरट असते, तो मनुष्य दीर्घायुषी होतो, सत्ताधारी होतो आणि त्याच्याजवळ गोधनादि संपत्तिहि सदैव असते.

विषमावलिश्चमध्यानैःस्वंदौष्ट्यंकरोति नीचस्था ॥
तुंगा स्वल्पा क्लेशं वामावती नृणां शाठ्यम् ॥१०३॥

बेंबीजवळच्या भागावरील वळया जर संख्येनें विषम ( म्हणजे १–३–५ अशा ) असतील तर मध्यम स्थिति, पण त्या तशाच विषम असून खालच्या बाजूस असतील तर दारिद्र्य आणि दुष्टपणा अनुभवास येईल. वरच्या बाजूस असून जर कमी असतील तर क्लेश आणि डावीकडे वळलेली असेल तर तो मनुष्य स्वभावानें नीच कृत्यें करणारा असतो.

क्षोणिपतिस्तनुकुक्षिः शूरो भोगान्वितश्च समकुक्षिः॥
धनहीन उच्चकुक्षिर्मायावी स्याद्विषमकुक्षिः ॥ १०४ ॥

ज्याच्या बगला अथवा खाका लहान असतील तो राजा होतो. बगला लहान-मोठ्या नसाव्या, सारख्या असाव्या, म्हणजे तो शूर असतो व त्याला सर्व उपभोग मिळतात. बगला उंच असल्या तर मनुष्य निर्धन असतो. कमी जास्त असल्या म्हणजे कपटी असतो.

कुक्षिर्यस्य गभीरा विनिपातं स लभते नरः प्रायः ॥
उत्ताना यस्य पुनः नारीवृत्तेन जीविते सोऽपि ॥ १०५ ॥

ज्याच्या खाका ( बगला ) खोल असतात त्याच्यावर बहुत करून दुर्धर आपत्ति कोसळतात, पण ज्याच्या बगला उथळ त्याचा आयुष्यक्रमहि स्वतंत्र वृत्तीचा असत नाहीं. स्त्रीच्या मेहनतीवर तो उपजीविका करतो.

पार्श्वे मांसोपचिते प्रदक्षिणावर्ते मृदुलरोमाणि ॥
यस्य भवेतां वृत्ते नियतं जगतीपतिः स स्यात् ॥१०६ ॥

ज्याच्या दोन्ही कुशीपृष्ठ भरदार असतात आणि तेथील भोंवरा मऊ केसांचा उजवीकडे फिरलेला असतो; तो राज्याधिकारी होतो.

निम्नैर्भोगवियुक्ताः पार्श्वैः पिशितोर्न्मितिर्धनविहीनाः ॥
स्थूलास्थिभिः पुमांसः कुटिलैः पुरुषैः परप्रेष्याः॥ १०७ ॥

कुशी खोलगट असतील तर उपभोग लाभणार नाहीं. आणि वाळकुंड्या असतील तर दारिद्र्य. कुशीची हाडें जाड असतील तर आंगांत पराक्रम असतो. आणि हाडें वांकडीं तिकडीं असतील तर दुसऱ्याचा ताबेदार होतो.

जठरं यस्य समं स्यादभितः स पुमान्सदा महार्थाढ्यः ॥
सिंहनिभं यस्य पुनः प्राप्नोति स चक्रवर्तित्वम् ॥१०८॥

ज्याचें पोट उंच-सखल नसतें, चोहोबाजूंनीं सारखें असतें त्यांच्या-जवळ विपुल संपत्ति राहते, आणि त्यांतहि ज्याचें पोट सिंहाप्रमाणें थोडें कृशच असतें तो राजाधिराज होतो.

भेकोदरो नरपतिर्वृषभमयूरोदरो भोगी ॥
वृत्तोदरः सुखी स्यान्मीनव्याघ्रोदरः सुभगः ॥ १०९ ॥

पोट बेडकाप्रमाणें पसरट असलें तरी राज्यपद मिळतें. वृषभा-प्रमाणें किंवा मयूराप्रमाणें घाटदार असलें तर स्त्रीचा उपभोग प्राप्त होतो. गोलाकार पोट असलें, किंवा मत्स्य, व्याघ्र ह्यांच्याप्रमाणें असलें तरी देखील सुखप्राप्ति होते.

पिठजठरो दरिद्रो घटजठरो दुर्भगः सदा दुःखी ॥
भुजगजठरो भुजिष्यो बहुभोजी जायते मनुजः ॥ ११० ॥

पोटाला खळगी असली किंवा चापट असलें तर दारिद्र्य, मडक्या-प्रमाणें ढेबर असलें तर निरंतर दुःख; सर्पाप्रमाणें लांबट असलें तर दुसऱ्याचा दास आणि अन्नासाटीं हपापलेला असा तो मनुष्य असतो.

श्ववृकोदरो दरिद्रः शृगालतुल्योदरो दरोपेतः ॥
पापः कृशोदरः स्यान्मृगशिशुसदृशोदरश्चोरः ॥१११॥

कुत्रा, लांडगा, कोल्हा ह्यांच्याप्रमाणें पोट असलेला मनुष्य दरिद्री, व अभागी असतो. वाळलेलें म्हणजे दुष्काळी पोट असलें तर पातकी, आणि हरिणाच्या बच्चाप्रमाणें पोट असलेला मनुष्य चोरी करतो.

जायेत यस्य मध्यं मुसलोदरः सोदरतनुत्वेन ॥
स पुमान्नृपतिर्ज्ञेयो विपर्ययो भवति विपरीते ॥११२ ॥

ज्याच्या पोटाचा मध्यमाग मुसळाप्रमाणें गोल आणि बारीक असतो (म्हणजे छातीच्या तुलनेनें बारीक असतो,) तो पुरुष राज्यपद मिळवितो. ह्याच्या उलट आकाराचे पोट असलेल्या मनुष्याची स्थिति विपरीत होते.

प्रहरणमरणं रमणीभोगानाचार्यपदमनेकसुतान् ॥
एकद्वित्रिचतुर्भिः क्रमेण वालिभिः पुमान्लभते ।;११३ ॥

पोटाला वळ्या असतात. परंतु जर एकच वळी असेल तर हत्याराच्या प्रहरानें मृत्यु. दोन वळ्या असतील तर स्त्रीचा उपभोग, तीन असतील तर विद्वत् धुरंधर, आणि चार वळ्या असतील तर अनेक पुत्रांचा लाभ होतो.

( हें वळीचें वर्णन आणि बेंबीच्या खालीं वळी असेल तर तें वर्णन ह्यांचा घोटाळा करूं नये, ही दोन्ही निरनिराळी आहेत ).

अवलिर्नृपतिः सुखभाक्परदारसहोदरश्च सरलवालिः ॥
विषमवलिः पापरतो नित्यमगम्यागमनमनाः ॥ ११४ ॥

ज्याच्या पोटाला वळी पडतच नाहीं तो राजा असतो किंवा होतो. निदान सुखी तरी असतोच. एकादीच वळी परंतु ती सरळ असेल तर तो दुसऱ्याच्या स्त्रीवर नजर ठेवणारा असतो. ती वांकडी तिकडी असेल तर दुराचारी किंवा नेहमीं बाहेरख्यालींत गुंग असा असतो.

अभ्युन्नतेन मांसोपचितेन सुसंहतेन भूमिभुजः
हृदयेन महार्थजुषः पृथुना दीर्घायुषः पुरुषः ॥ ११५ ॥

छातीचा भाग उंच, पुष्ठ, भरदार असा असेल, तर भूमिधारक म्हणजे जमीनदार असतो. त्यांतच तो, त्याचें हृदय सुस्थिर असलें म्हणजे कमजोर नसलें तर तो पुरुष धीट असतो. आणि छाती पेलेदार असली तर तो पुरुष धनवान् आणि दीर्घायुषी होतो.

स्थूलशिरापरिकलितं खररोमसमन्वितं पुंसाम् ॥
हृदयं पुनः सकंपं निःस्वत्वं शश्वदादत्ते ॥ ११६ ॥

ज्याच्या छातीवर शिरा स्पष्ट दिसत असतील किंवा छातीवरील केंस राठ असतील किंवा ज्या पुरुषाची छाती क्षुल्लक कारणावरूनहि धडधडूं लागते तो जन्मभर दरिद्रींच राहतो.

पृथुलं भवत्युरःस्थलमचलशिलाकठिणमुन्नतं नृपतेः ॥
मृगनाभिपत्रलतासमानमुरो रोमराजिचितम् ॥११७॥

जो मनुष्य राज्यपदावर अधिष्ठित असतो, त्याचें उरःस्थल एखाद्या सपाट शिळेप्रमाणें विस्तृत, कठिण आणि उंचावलेलें असतें. त्याचें हृदय कस्तुरी मृगाच्या नाभीच्या आकाराचें असून आणि त्यावर केसांची लवहि असते.

उरसा समेन धनवान्पीनेन भटस्ततोर्ध्वरोमा स्यात् ॥
निःस्वस्तनुना विषमेणास्त्रमृतिरकिंचनश्च नरः ॥११८॥

वक्षःस्थल सर्वत्र व्यवस्थित आकाराचें असलें म्हणजे धनवान् असतो, आणि तसेंच तें पुष्ट असलें आणि केसांची लव वर झुकलेल्या अग्रांची असली म्हणजे तो पुरुष योद्धा होतो. पण ह्याच्या उलट केशरचना असली व छाती चिमडलेली अशी असली तर अपमृत्यु, दारिद्र्य आणि दुःख ह्याचा पर्वकाळ होतो.

वृत्ताः स्तनाः प्रशस्ताः सुस्निग्धाः कोमलाः समाः पुंसाम् ॥
विषमा परुषा विकटाः प्रायो दुःखाय जायन्ते ॥११९॥

स्तनांचा आकार वर्तुळ असून ते पसरट, स्निग्ध ( म्हणजे रूक्ष नसलेलें ) असून कातडी खरखरीत नसावी, आणि सारख्या आकाराचे असावे. म्हणजे पुरुष भाग्यशाली असतो.

पण तेच लहान मोठें, खरखरीत, वांकडे तिकडे असे असले तर दुर्भाग्य वाट्यास येते.

मांसोपचितैर्भूपाः सुभगाः स्युश्चुचकैरपि द्वंद्वैः ॥
पीनैः सुखिनो विषमायतैः सदा निःस्वतांभाजः ॥१२० ॥

स्तन मांसपूर्ण असले म्हणजे भूमीचा मालक होतो. स्तनांच्या बोण्डशा व्यवस्थित असतील तर भाग्य प्राप्त होतें. परंतु स्तन विषम म्हणजे लहान मोठे, लांबट, अव्यवस्थित असें असले तर अर्थात्च दारिद्र्य असावयाचेंच.

पीनेन धनाधिपतिर्जत्रुयुगेनोन्नतेन भोगी स्यात् ॥
विषमोन्नतेन दुःखी नतास्थिबंधेन धनहीनः ॥ १२१ ॥

जत्रु म्हणजे गळा आणि छाति ह्यांच्या सांध्याचीं हाडें; हीं हाडें मजबूत असतील तर तो पुरुष धनवान् असतो. तीं हाडें उंच असतील तर विषयोपभोग घडेल. तीं हाडें लहान-मोठीं किंवा उंच-सखल असतील तर दुःख, आणि लवलेलीं वांकलेलीं-असतील तर दारिद्र्य हें फल प्राप्त होतें.

स्कंधावनुक्रमनतौ मूले पीनौ समुन्नतौ किंचित् ॥
वृषककुद्समौ ऱ्हस्वौ लक्ष्मीं दृढसंहतीं वहतः ॥ १२२ ॥

खांदे कसे असावेत तें सांगतात. खांदे पुष्ट असून मानेपासून उतरते असावे. मानेजवळचा भाग पुष्ट आणि किंचित् उंचट असावा. म्हणजे फार उंच नसावा. बैलाचें वशिंग जसें दिसतें त्या धर्तीचा परंतु लांबट नव्हे असा आकार असला तर भाग्यलक्ष्मी प्राप्त होते. आणि ती निश्चल राहते.

हुंडवद्दीर्घौ स्कंधौ निर्मांसौ भारवाहकौ पुंसाम् ॥
कुटिलौ कृशावतिनतौ स्वेदकरौ रोमशौ बहुशः ॥१२३॥

बैलाच्या खांद्याप्रमाणें, किंवा मांसरहित असे खांदे ज्या पुरुषाचे असतील तो काबाडकष्ट करणारा किंवा ओझीं उचलणारा हमाल असतो. वांकडे, कृश, वाळकुडे, लबक खाल्लेले, केसाळ असे खांदे असले तर तो मनुष्य दुःखमग्न असतो.

भुग्नौ मांसविहीनावंसौन्नतरोमशौ कृशौ यस्य ॥
निर्लक्षणेन लक्ष्म्या नामापि नाकर्णितं तेन ॥ १२४ ॥

ज्याचे खांदे वांकलेले, मांसरहित म्हणजे हडकुळे, उंच, केस असलेले म्हणजे सुकलेले असे असतील तर तो इतका अभागी असतो कीं, त्यानें जन्मांत लक्ष्मीचें नांव तरी ऐकलें असेल कीं नाहीं असें वाटतें.

अत्युच्छ्रूनावंसौ किंचिद्बाव्होः समुन्नतिं दधतौ ॥
सुश्लिष्टसंधिबंधौ वपुषो धनिशूरयोः स्याताम् ॥१२५ ॥

खांदे उतरते असण्या ऐवजीं अतिशयच चढलेले, इतकें कीं ज्यांच्या भुजदण्डांची बाजू वर उचललेली दिसते आणि ज्यांच्या खांद्यांचें सांधे भरगच्च दिसतात असे पुरुष शूर आणि धनवान् असतात.

मृदुतनुरोमे कक्षे प्रस्वेदमलोज्झिते सुरभिगंधी ॥
पीनोन्नते धनवतामतोऽन्यथा वित्तहीनानाम् ॥१२६ ॥

ज्यांच्या खाकाहि पुष्ट, खळगा नसलेल्या आणि केंस थोडके आणि मऊ असतात. ज्यांच्या खाकेंत घामाचा दुर्गन्ध तर नसतोच, परंतु उलट चांगला वास येतो असें पुरुष भाग्यवान, धनिक असतात. आणि ह्या वर्णनाच्या उलट स्थिती आढळली तर तेथें दारिद्र्य आहे असें समजावें.

बाहू वामविवलितौ वृत्तावाजानुलंबितौ पीनौ ॥
पाणीफणाछत्रांकौ करिकरतुल्यो समौ नृपतेः ॥१२७॥

भुजदण्ड पीळदार आणि पीळ डावीकडे वळलेला, दण्डांतील स्नायु पुष्ट आणि गोटीदार, हात लांब इतकें कीं, उभे राहिल्यास बोटे गुडघ्यापर्यंत पोहोचणारीं असतात. तळ हातावर फणा, छत्र हीं चिन्हें, हातांचा एकंदर आकार हत्तीच्या सोंडेप्रमाणें ऐटदार असे सारखे लांब हात असणारे पुरुष राजे होतात.

गोपुच्छाकृतिपीनं हीनं खरबहुलरोमभिर्दीर्घम् ॥
निर्भग्नशिरासंधि प्रशस्यते भुजयुगं पुंसाम् ॥ १२८ ॥

कांहीं लोकांचे ( पंजे ) गोपुच्छाप्रमाणें लांबट आणि पुष्ट असतात, हातांच्या पंज्यांच्या मागल्या बाजूस मऊ लव असते पण केस राठ किंवा भरपूरहि नसतात. सांध्याच्या शिराहि मासांत गढलेल्या असतात असे बाहु आणि पंजे ज्याचे असतात ते भाग्यवान् असणारच.

दुष्टः स्याद्वक्रभुजो बहुरोमा लघुभुजिष्यः स्यात् ॥
विषमभुजः चौर्यरतिः समपीनभुजो नरोऽदुष्टः ॥१२९॥

बाहुदण्ड उफराटे असेल तर तो मनुष्य दुष्ट असतो; आणि बाहूवर केस पुष्कळ असतील तर धनप्राप्ति आणि नौकर पुष्कळ राहतील. बाहू कमजास्त लांबीचे असतील, तर चोरी करण्याची प्रवृत्ति; परंतु बाहू पुष्ट आणि सारख्या लांबीचे असतील तर तो मनुष्य अदुष्ट म्हणजे सज्जन असतो.

पाणी नृपतेः श्लक्ष्णौ निःस्वेदौ मांसलावथाच्छिद्रौ ॥
अरुणत्वकर्मकठिणावुष्णौ दीर्घांगुलिस्निग्धौ ॥ १३० ॥

जो स्वपराक्रमानें राजा होतो त्याचे बाहू खरखरीत नसावयाचे. पंजा किंवा बाहू ह्यांना घाम येत नाहीं. भुजदण्ड परिपुष्ट असतात आणि त्यांत व्यंग नसतें. तळहात तांबूस असून जरी त्यास काम पडत नसलें तरी ते टणक आणि ऊबदार असतात, हातांचीं बोटेंहि घोटीव व लांब असतात.

विस्तीर्णौ ताम्रनखौ स्यातां कपिवत्करौ धनाढ्यस्य ॥
शार्दूलवद्विरूक्षौ विकृतौ निःस्वस्य निर्मांसौ ॥ १३१ ॥

जो धनसंपन्न असतो, त्याचीं नखें लाल आणि रुंद असतात, बोटें वानराच्या बोटांसारखीं ठसठशीत सांध्याचीं, लांब आणि टणक असतात. परंतु जो दरिद्री आहे त्याचे पंजे वाघाच्या पंजासारखे

रूक्ष, थोकडे, घोबड, विद्रूप, आणि मांसरहित असतात तो दारिद्र्यानें पछाडला जातो.

कच्छपपृष्ठो राजा हयपृष्ठो भोगभाजनं भवति ॥
धनसंपत्तिः सेनाधिपतिः शार्दूलपृष्ठोऽपि ॥ १३२ ॥

राजाची पाठ कांसवाच्या पाठीप्रमाणें विस्तृत आणि मध्यें थोडी उंच असावी किंवा घोडयाच्या पुठ्ठ्याप्रमाणेंहि असली तरी चालेल. अशी पाठ असेल तर सर्व उपभोग त्याला घडतील आणि ऐश्वर्यहि प्राप्त होईल. वाघाच्या पाठीप्रमाणें पाठ असेल तर सैन्याचें अधिपत्य मिळेल, पण—

लभते शिरालपृष्ठो निर्धनतां भुग्नवंशपृष्ठोऽपि ॥
कष्टं रोमशपृष्ठः पृथुपृष्ठो बंधुविच्छेदम् ॥ १३३ ॥

पाठीवर शिरांचें जाळें पसरलेलें असेल, किंवा कण्याचीं हाडें वाकडीं असतील तर कपाळीं दारिद्र्य. पाठीवर केंस पुष्कळ असतील तर जीवन कष्टप्रद होईल. पाठ लांब, रुंद परंतु सपाट असेल, ( मध्यें गोल, उंच नसेल ) तर बन्धुवर्गाचा निःपात होईल.

नियतं कृकाटिका रोमशिरा संयुता नृणां साऽपि ॥
कुरुते कुटिला विकटा विसंकटा रोगदारिद्र्यम् ॥ १३४ ॥

तसेंच मानेच्या पाठीमागची जी बाजू तिला **कृकाटिका** म्हणतात. त्या भागावर केंस, शिरा, इत्यादिकांचा जोजवार असला तरीहि आयुष्य कष्टमय होईल, आणि मानेचा पृष्ठभाग वांकडा, विद्रुप खडबडीत असा असेल तर रोग आणि दारिद्र्य ह्यांनीं जीवित ग्रस्त होऊन जाईल.

## अथाङ्गानि

ऱ्हस्वग्रीवः शस्तो वृत्तग्रीवः सुखी धनी सुभगः ॥
कंबुग्रीवस्तु भवेदेकातपत्रवारणो नृपतिः ॥ १३५ ॥

मान आखूड असावी ( उंटासारखी उंच नसावी ) ती हि

वाटोळी गरगरीत असली तर तो पुरुष भाग्यशाली असतो, आणि इतकें असूनहि खाली फुगीर आणि वर थोडी निमुळती ( म्हणजे " कम्बुग्रीव " ) अशी मान असली तर राज्यवैभव किंवा गजान्त-लक्ष्मी प्राप्त होते.

महिषग्रीवः शूरो लंबग्रीवोऽपि घस्मरः सततम् ॥
पिशुनो वक्रग्रीवः शस्त्रविनाशो मृगग्रीवः ॥ १३६ ॥

टोणग्याच्या मानेप्रमाणें ज्याची गर्दन असते तो शूर असतो, तशीच ती लांबट असली तर अतिशय खादाड होतो. वांकडमान्या मनुष्य दुष्ट आणि हरणाप्रमाणें मान असेल तर हत्याराच्या प्रहारानें मृत्यु येईल.

रासभकरभग्रीवो दुःखी स्याद्दांभिको बकग्रीवः ॥
शुष्कशिरालग्रीवश्चिपिटग्रीवश्च धनहीनः ॥ १३७ ॥

मान गाढवासारखी किंवा उंटासारखी असेल तर जीवित दुःख-मय होईल. बगळ्याप्रमाणें ज्याची मान तो दुष्ट, दांभिक असेल. शिरांनीं भरलेली किंवा वाळकुंडी मान असेल किंवा थबकडी मान असेल तर मनुष्य दरिद्री असेल.

पुण्यवतामिह चुबुकं वृत्तं मांसलमदीर्घलघु मृदुलम् ॥
अतिकृशदीर्घस्थूलं द्विधाग्रभागं दरिद्राणाम् ॥ १३८ ॥

ज्यांची हनुवटी गुटगुटीत ( म्हणजे वाटोळी ) पुष्ट, फार लांबट नाहीं आणि अगदीं लहानहि नाहीं अशी असेल, टणक नसेल तर तो पुण्यवान् असतो. पण हनुवटी फारच लांब, फुगीर, गुबगुबीत, टोंकाला दुबेळका अशी असेल तर तो मनुष्य दरिद्रि समजावा—

हनुयुगुलं संश्लिष्टं चुबुकोभयपार्श्वसंस्थितं पुंसाम् ॥
दीर्घं वक्रं शस्तं पुनरशुभं भवति विपरीतम् ॥ १३९ ॥

तोंडाचा जबडा दुरुस्त, हनुवटीच्या दोन्हीबाजू भरगच्च परंतु थोडा

लांबट बांकदार असा असेल, तर तो शुभ प्राप्ति करतो; परंतु उलट प्रकार असेल तर सर्व विपरीत होतें.

कूर्चं प्रलंबमुज्वलमस्फुटिताग्रं निरंतरं मृदुलम् ॥
स्निग्धं पूर्णं सूक्ष्मं मेचकं विशिष्यते पुंसाम् ॥ १४० ॥

तसेंच केंस लांब सडक, तकतकीत, टोकांला फांटे न फुटलेले आणि मऊ, तुळतुळीत, बारीक आणि काळेभोर असे असले ह्मणजे पुरुषाला विशेष भाग्य प्राप्त होतें.

परदाररताश्चौराः श्मश्रुभिररुणैर्नराः शंखैः ।;
स्थूलै रुक्षैः स्फुटितैः कपिलैः क्लेशान्विताः पुरुषाः ॥ १४१ ॥

ज्याच्या मिशा पिंगट असतात तो चोरी करण्यास प्रवृत्त होतो, आणि दुसऱ्याच्या बायकांनाहि फूस लावून नेतो. आणि ज्यांचीं नखें जाड, रूक्ष, तुटल्यासारखीं आणि कळकट असतात त्यांना दुःख व कष्ट प्राप्त होतात.

अंतर्द्वितीयदशमिह शुक्रोद्रेकोऽधिकक्रमेण नृणाम् ॥
तदयं श्मश्रुद्भेदस्तद्विकृतिः षोडशे वर्षे ॥ १४२ ॥

वीस किंवा एकवीस वर्षांच्या पूर्वीं आणि सोळा वर्षांनंतर पुरुषामध्यें शुक्रोत्पत्ति होते, हा क्रम साधारण आहे. म्हणून सोळा वर्षांनंतर जेव्हां पुरुषाला मिसरूं फुटेल त्या वयांत त्याला शुक्रोत्पत्ति झाली असें समजावें. पण सोळा वर्षापूर्वीं मिशा उगवतील तें रोगट वीर्याचें लक्षण समजावें.

सुखिनः समुन्नतैः स्युः परिपूर्णा भोगिनश्च मांसयुतैः ॥
सिंहद्विपेंद्रतुल्यैर्गंडैर्देशाधिपा धन्याः ॥ १४३ ॥

ज्यांचे गाल उंचावलेले भरगच्च आणि पुष्ट असतात, त्यांची नेहमीं चैनच चालेल. परंतु कांहींचे गाल सिंहासारखे ताठर, किंवा हत्तीसारखे लांब रुंद असतात तेहि भाग्यशाली निपजतात आणि त्यांना अधिकारपद प्राप्त होतें.

निम्नौ यस्य कपोलौ निर्मांसौ स्वल्पकूर्चरोमाणौ ॥
पापास्ते दुःखजुषो भाग्यविहीनाः परप्रेष्याः ॥ १४४ ॥

परंतु याच्या उलट ज्याचे गाल खोल, सुकलेसे, दाढीचे व डोकीचे केस तुरळक असे असलेला मनुष्य दुःखी, भाग्यहीन आणि दुसऱ्याच्या भोंवती नाचणारा असा असतो.

संवृतममलं सूक्ष्मं स्निग्धं सौम्यं समं सुरभिवदनम् ॥
सिंहेभनिभं राज्ञां संपूर्णभोगिनां वेत्ति ॥ १४५ ॥

तोण्डाची जिवणी ( दांत उगाच बाहेर न दिसतील अशी ) रेखीव, स्वच्छ, ओबडधोबड व भेसूर नाहीं अशीं सौम्य, प्रमाणशीर असावी, तोण्डाला घाण येऊं नये, सुगंध असावा जिवणीचा सिंह-किंवा हत्ती यांच्या प्रमाणें आकार असावा म्हणजे तो पुरुष सुख-भोगणारा, आणि राज्य भोगणाराहि असतो.

दोन्ही ओठांनीं निर्दिष्ट होणाऱ्या भागाला " जिवणी " म्हणतात.

जननीमुखानुरूपं मुखकमलं भवति यस्य मनुजस्य ॥
प्रायो धन्यः स पुमान् इत्युक्तमिदं समुद्रस्य ॥ १४६ ॥

मुलाचा तोण्डावळा आईच्या तोंडावळ्याप्रमाणें असावा म्हणजे मुलगा भाग्यवान् असतो, असें सामुद्रिक शास्त्रज्ञ आपला " अनुभव " सांगतात.

दौर्भाग्यवतां पृथलं पुंसां स्त्रीमुखमपत्यरहितानाम् ॥
चतुरस्रं धूर्तानां अतिन्हस्वं भवति कृपणानाम् ॥ १४७ ॥

जे भाग्यहीन असतात त्यांचा तोण्डावळा ओबडधोबड आणि ज्यांना संतति होत नाहीं किंवा झालेली वांचत नाहीं त्यांचें तोण्डहि तसेंच कांहीं चमत्कारिक असतें. ज्याचें तोण्ड चौकोनी दिसतें तो बिलंदर आणि उंचीमध्यें कमी असणारा कंजुष असतो.

भीरुमुखं पापानां निम्नं कुटिलं च पुत्रहीनानाम् ॥
दीर्घं निर्द्रव्याणां भाग्यवतां मंडलं ज्ञेयम् ॥ १४८ ॥

जे पातकी असतात म्हणजे जे गुन्हेगार असतात त्यांची मुद्रा कावरीबावरी असते, आणि जे निपुत्रिक असतात त्यांचें तोण्ड खोलगट किंवा वांकडें असतें, आणि जे दरिद्री असतात त्यांचें तोण्ड लांबट, आणि जे धनाढ्य त्यांचें तोण्ड गोल असतें.

रासभकरभप्लवगव्याघ्रमुखाः दुःखभागिनः पुरुषाः ॥
जिम्हमुखा विकृतमुखाः शुष्कमुखा हयमुखा निःस्वाः॥ १४९॥

तोण्डवळा ( किंवा ढब ) गाढवाप्रमाणें ( अर्थात् निलाजऱ्यासारखी ), किंवा उण्टाप्रमाणें ( बावळी ) किंवा माकड, व्याघ्र ह्यांच्यासारखी ( दुष्ट ) दिसेल, तर तो दुर्दैवी असतो. कांहींचीं तोण्डें वांकडीं, कुरूप, सुकटलेलीं, किंवा घोड्याप्रमाणें दिसतात, ते दरिद्री असतात.

## ओठ

बिंबाधरो धनाढ्यः प्रज्ञावान्पाटलाधरो भवति ॥
प्राप्नं राज्यं लभते प्रवालवर्णाधरस्तु नरः ॥ १५० ॥

ओठ तोण्डल्याप्रमाणें लाल असल्यास धनवान्, गुलाबी असल्यास मनुष्य बुद्धिवान् असतो. ओठ पोवळ्याप्रमाणें रसरशीत दिसतील तर विस्तीर्ण प्रदेशाचा अधिकार प्राप्त होतो.

यस्याधरोत्तरोष्ठौ द्व्यंगुलमानौ सुकोमलौ मसृणौ ॥
मृदुसममसृक्काणौ स जायते प्रायशो धनवान् ॥ १५१ ॥

ज्याचे दोन्ही ओठ दोन अंगुळें असून राठ नसतात किंवा टणक, खरबरीत नसतात आणि सारख्या प्रमाणांत असतात, ज्याचा कोणताहि ओठ लोंबत नाहीं, असा पुरुष धनाढ्य असतो.

पीनौष्ठः सुभगः स्याल्लंबोष्ठो भोगभाजनं मनुजः ॥
अतिविषमोष्ठो भीरुर्लंघ्वोष्ठो दुःखितो भवति ॥ १५२ ॥

ज्याचे ओठ पुष्ट तो भाग्यवान्; ओंठ लांबट असले तर चैन

म्हणजे सुखोपभोग प्राप्त होतो. ओठ लहान मोठे असले किंवा बेढब असले तर मिश्र, आणि ओठ फार लहान असले तर दुःखी होतो.

रूक्षैः कृशैर्विवर्णैः प्रस्फुटितैः खंडितैरातिस्थूलैः ॥
ओष्ठैः सुखधनहीनाः सुदुःखिताः प्रायशः प्रेष्याः ॥ १५३ ॥

अगदीं वाळलेले कृश, काळवंडलेले, फुटलेले, तुटलेले किंवा फारच जाड असे ओठ ज्यांचे असतील त्यांना सुख नाहीं आणि धनहि नाहीं. दुःख तर फारच. शिवाय त्यांना दुसऱ्याची ताबेदारी पतकरावी लागते.

## दांत

कुंदमुकुलोपमाः स्युर्यस्यारुणपीटिकाः सघनाः ॥
दशना स्निग्धा श्लक्ष्णाः सुतीक्ष्णदंष्ट्राः स वित्ताढ्यः ॥ १५४ ॥

उत्तम दांत कोणते तर कुन्दाच्या कळ्यासारखे ( म्हणजे गुलाबी पांढरे ) आणि हिरड्या गुलाबी, घट्ट, सारख्या अशा असाव्या, दांत स्निग्ध, तकतकीत, धार असल्याप्रमाणें तीक्ष्ण दाढा असाव्या असा मनुष्य धनवान् असतो.

धनिनः खरद्विपिरदा निःस्वा भल्लूकवानराखुरदाः ॥
निंद्याः करालद्विपंक्तिशितविषमरूक्षरदाः ॥ १५५ ॥

ज्यांचे दांत गर्दभ किंवा इतर दुष्ट प्राण्यासारखे म्हणजे भाळू, वानर, उंदिर यांच्या दांतासारखे असतात ते मुळचे धनवान् असले तरी दरिद्री होतात. कारण स्वभाव खाष्ट असतो आणि ज्यांचे लहान मोठे दांत हिंस्र प्राण्याप्रमाणें विरळ, अणकुचीदार म्हणजे विक्राळ असतात तेहि तसेच दुष्ट-विक्राळ आहेत असें समजावें.

द्वात्रिंशता नरपतिर्दशनैस्तैरेकविरहितैर्भोगी ॥
स्यात्रिंशता तनुधनोऽष्टाविंशत्या सुखी पुरुषः ॥ १५६ ॥

चांगले दांत असून ते ३२ असतील तर राज्यपद मिळतें, एक

कमी म्हणजे ३१ असले तरी सुख मिळतें, पण ३० च असतील तर संपत्ति अल्प; आणि २८ असले तर दुःखी.

> दारिद्र्यदुःखभाजो नैकत्रिंशत् सदा दशनैः ॥
> ऊर्ध्वमधः शस्तैरपि विहीनसंख्यैर्नरो दुःखी ॥ १५७ ॥

दांत २९ असले तर तो मनुष्य सदैव दुःखच भोगतो. वरचे आणि खालचे दांत चांगले असले तरी त्यांची संख्या तिसापेक्षां कमी असूं नये. तिसापेक्षां कमी असेल तर दुर्भाग्यानें त्रस्त होतो.

> स्यातां द्विजावधिः प्राक् द्वादशके मासि राजदंताख्यौ ॥
> शस्तावूर्ध्वं न शुभौ जन्मन्येवोद्गतौ तद्वत् ॥ १५८ ॥

दांत उगवण्याची वेळ म्हणजे एक वर्ष पुरे होण्याचे आंत असते. एक वर्षानें दांत येतात. त्यांना राजदन्त म्हणतात. एक वर्षानंतर दांत येणें चांगलें नाहीं. ह्याचप्रमाणें जन्मतःच दांत असले तरी वाईटच.

> सर्वे भवंति दशनाः पूर्णे वर्षद्वये जनिप्रभृति ॥
> आसप्तदशप्रांतं निपत्य पुनरुद्गमं यांति ॥ १५९ ॥

ह्याप्रमाणें दांत येऊं लागल्यानंतर मूल दोन वर्षांचें होईपर्यंत सर्व दांत येतात. आणि सुमारें सातव्या वर्षापासून दहाव्या वर्षापर्यंत पहिले दांत पडून पुनः नवीन दांत येतात.

## जिव्हा

> रसना रक्ता दीर्घा सूक्ष्मा मृदुला तनुसमा येषाम् ॥
> मिष्टान्न भोजिनस्ते यदि वा त्रैविद्यवक्तारः ॥ १६० ॥

जीभ लाल, लांब पातळ, मऊ टोंकदार असून वांकडी तिकडी नसावी म्हणजे त्या पुरुषाला मिष्टान्नाची वाण कधींहि पडत नाहीं आणि शिवाय तो वेदशास्त्रवेत्ता असा असतो किंवा होतो.

> संकीर्णाग्रा स्निग्धा रक्तांबुजपत्रसंनिभा रसना ॥
> न स्थूला न च पृथुला यस्य स पृथ्वीपतिर्मनुजः ॥ १६१ ॥

ज्याच्या जिभेचें टोंक थोडें पसरट, तजेलेदार असून जीभ लाल कमळाच्या पाकळीप्रमाणें दिसते, तशीच ती फार जाड नाहीं, फार रुंदहि नाहीं अशी असेल तर तो पुरुष राज्याधिपति होतो.

शौचारप्रव्हासितजिव्हाः सततं भवंति नराः ॥
धनहीनाः शितजिव्हाः पापोपगताः शबलजिव्हाः ॥ १६२ ॥

ज्यांची जीभ स्वच्छ असते ते पुरुष आचरणानें नेहमीच फार योग्य असतात; पण ज्यांची जीभ काळी, भुरकट, किंवा मळकट असते ते पापाचरणी म्हणजे दुराचारी निपजतात.

सूक्ष्मा रूक्षा परुषा समपृथुला मलसमन्विता यस्य ॥
जिव्हा पीता स पुमान् मूर्खो दुःखाकुलः सततम् ॥ १६३ ॥

ज्याची जीभ बारीक, वाळलेली, खरबरीत, जाड, रुंद आणि गलिच्छ, किंवा पिंवळी दिसते, तो मनुष्य मूर्ख आणि नेहमीं दुर्मुखलेला किंवा दुःखमग्न असतो.

## तालु

रक्तांबुजतालुदलो भूमिपतिर्विक्रमी भवति मनुजः ॥
वित्ताढ्यः सिततालुर्गजतालुर्मंडलाधीशः ॥ १६४ ॥

ज्याचा टाळा ( तोण्डाच्या आंतील वरचा भाग ) कमळाप्रमाणें लाल असेल तो पराक्रमी, वैभवशाली असतो. टाळा पांढरा म्हणजे स्वच्छ असला तर धनाढ्य आणि हत्तीच्या टाळ्याप्रमाणें असेल तर चक्रवर्ती राजा होईल.

रूक्षं शबलं परुषं मलान्वितं न प्रशस्यते तालु ॥
कृष्णं कुलनाशकरं नीलं दुःखावहं पुंसाम् ॥ १६५ ॥

टाळू रूक्ष ( म्हणजे कोरडी ) कळकट, खरबरीत, मलीन अशा प्रकारची असूं नये ती अशुभ होय. तशीच टाळू काळी असेल तर कुलक्षय, आणि निळसर असेल तर तो मनुष्य दुःखी असावयाचा.

तालुर्घ्यरुण सवर्णा तीक्ष्णाग्रा घंटिका शुभा स्थूला ॥
लंबा कृष्णा कठिना सूक्ष्मा चिपिटा नृणामशुभा ॥ १६६ ॥

तालु अरुणवर्ण ( म्हणजे गुलाबी ), आणि घांटी टोंकदार आणि ठोसर अशी असली म्हणजे ती शुभ; पण ती लांबट, काळी, टणक, किंवा बारीक, चपटी अशी असली तर ती पुरुषांना अशुभ समजावी, ( स्त्रियांना घांटी नसणें हेंच उत्तम ).

हसितमलक्षितदशनं किंचिद्विकसितकपोलमतिमधुरम् ॥
पुंसां धीरमकम्प्यं प्रायेण स्यात् प्रधानानाम् ॥ १६७ ॥

हसूं आलें तरी ज्यांचे दांत विचकलेले असे दिसत नाहींत, तोण्ड किंचित् उघडलेलें, गाल फुललेले असें गमतीदार हंसणें हें धीर पुरुषाचें अथवा श्रेष्ठ पुरुषाचें लक्षण आहे. ( श्रेष्ठ पुरुष मोठ्यानें हंसत नाहींत, गालांत हंसतात. )

उत्कंपितांसकाशिरः संमीलितलोचनं निपतदश्रु ॥
निकृष्टस्वरमुध्दृतमधमानां स्यादसकृदंते ॥ १६८ ॥

हंसतांना ज्यांचें डोकें खूप हलतें, किंवा बाजूला वळतें, आणि ज्यांचे डोळे हंसतांना मिटतात किंवा ज्यांच्या डोळ्यांना पाणीहि येतें असे लोक ( मध्यम प्रतीचे समजावे. ) आणि जे निकृष्ट प्रतीचे आहेत ते फार मोठ्यानें खो: खो: करून हंसतात.

## नाक

चतुरंगुलप्रमाणा स्थूलपुटांतस्तनुच्छिद्रा ॥
न च पीना न च वलिता चिरायुषां भोगिनां नासा ॥१६९॥

नाकाची लांबी चार अंगुळें, नाकपुड्या फुगीर, परंतु छिद्रें लहान अशा आकाराचें नाक असावें, पण उगीच बोजड किंवा वांकलेलें असूं नये. असें ज्याचें नाक असेल तो दीर्घायुष्य आणि सुखोपभोग मिळवतो.

उन्नतनासः सुभगो गजनासः स्यात्सुखी महार्थाढ्यः ॥
ऋजुनासो भोगयुतश्चिरजीवी शुष्कनासः स्यात् ॥ १७० ॥

ज्याचें नाक मध्येंच उंच असतें तो भाग्यशाली; ( भिवयांच्या मध्यापासून नाकाचें हाड हाताला टणक लागतें त्याला आढें म्हणतात, हें आढें टोंकदार उंच असतें. ) हत्तीच्या ( सोंडेच्या शेवटीं आंकडा असतो ) त्याप्रमाणें नाक असलें तर सुखी असून अलोट पैसा कमावतो, नाक अगदीं सरळ असलें म्हणजे सुखोपभोग मिळतात, चैन चालते. आणि नाकाला कमान असेल तोहि भाग्यशालि होतो.

तिलपुष्पतुल्यनासः शुकनासो भवति भूपतिर्मनुजः ॥
आढ्योऽग्रवक्रनासो लघुनासः शीलधर्मपरः ॥ १७१ ॥

नाक तिळाच्या फुलाप्रमाणें अथवा पोपटाच्या चोचीप्रमाणें बांकदार असेल तर तो भूपति होतो. ज्याच्या नाकाचा शेंडा बांकदार तोहि धन व सुख ह्यांमध्यें मग्न असतो. नाक लहानसर असेल तर सुस्वभावी असतो.

क्रमविस्तीर्णसमुन्नतवंशा नासा महेशितुर्भवति ॥
द्वेधा स्थिताऽग्रगाऽप्यतिदीर्घा ऱ्हस्वा च निःस्वस्य ॥ १७२ ॥

ज्याचें नाक क्रमानें विस्तृत आणि उंच होत जातें तो हजारों लोकांचा पुढारी होतो नाकाचा शेंडा फुटल्यासारखा किंवा फार लांब अथवा फारच तोकडा असा असेल तर तो मनुष्य दरिद्री असावयाचा.

कुंचितया चौर्यरतिर्नासिकया चिपिटया युवतिलोलः ॥
छिन्नानुरूपया स्यादगम्यरमणीरतः पापः ॥ १७३ ॥

नाक आकुंचित किंवा वांकडें असलें तर चौर्याकडे ओढा, नाक चपटें असेल, तर तरुण स्त्रियांकडे वांकडया नजरेनें पाहणारा; आणि आखूड असेल तर इतर पापें करून भलत्याच स्त्रीशीं समागम करील.

विकृता मध्यमहीना स्थूलाग्रा पिच्छिला सदु:खस्य ॥
दक्षिणवक्रा नासा प्रभक्षक्रूरयोर्ज्ञेया ॥ १७४ ॥

नाक वेडेंविद्रें आणि मध्येंच बसकें, किंवा तेलकट, बोजड, शेंडा असलेलें असें ज्याचें असेल तो नेहमीं दु:ख भोगील. नाकाचा शेंडा उजवीकडे वळून वांकडा झालेला असेल तो अभक्ष भक्षण करणारा व क्रूर असा निपजेल.

## शिंका

निऱ्हादि सानुनादं सकृत्क्षुतं भोगिनां धनवतां द्विः ॥
दीर्घायुषां प्रयुक्ता सुसंहतं त्रिर्भवति पुंसाम् ॥ १७५ ॥

जे भाग्यवान् किंवा धनवान् असतात त्यांना एक–दोन शिंका लागोपाठ येतात, आणि त्यांचा आवाज मोठा असून घुमतो. आणि जे दीर्घायुषी असतात त्यांना तीन तीन सुद्धां शिंका लागोपाठ दणदणीत येतात.

स्खलितं लघु च नराणां क्षुतं चतुर्भवति भोगनाशाय ॥
दोषदमतः परः स्यान्निंदितमनिनादसहितमपि ॥ १७६ ॥

जे अभागी असतात त्यांना शिंका चार सुद्धां येतात, पण नाद नाहीं, तुटक्या, पिचपिचीत अशा त्याहिपेक्षां जास्त आल्यास किंवा शिंका छि: छि: अशा नाद रहित आल्यास अशुभ.

## डोळे

अक्षिणी निर्मलनीलस्फटिकारुणमये इव स्निग्धे ॥
स्यातांमंतर्मेचककृशांतशोणे दृशोर्धनिनः ॥ १७७ ॥

ज्याजे डोळे स्वच्छ ( म्हणजे बुबुळाच्या भोंवतालचा भाग पांढरा शभ्र ) असून बुबुळें निळसर, किंवा काळीभोर परंतु स्फटिकाप्रमाणें चकाकणारीं आणि तकतकीत असतात आणि ज्यांचे कोपरे गुलाबी अथवा तांबूस असतात ते पुरुष धनवान् होतात.

हरितालाभैर्नयनैर्जायंते चक्रवर्तिनो नियतम् ॥
नीलोत्पलदलतुल्यैर्विद्वांसो मानिनो मनुजाः ॥ १७८ ॥

हरताळाप्रमाणें पिंगट बुबुळांचे पुरुष राजाधिराज होतात असा नियम दिसून येतो; पण ज्यांचीं बुबुळें निळीं असतील ते विद्वान् आणि स्वाभिमानी असतात. ( हरताळाप्रमाणें म्हणजे मांजराप्रमाणें डोळे असा अर्थ नाहीं. ).

लाक्षारुणैर्नरपतिर्नयनैर्मुक्तासितैः श्रुतज्ञानी ॥
भवति महार्थः पुरुषो मधुकांचनरोचनापिंगैः ॥ १७९ ॥

बुबुळें लाखेप्रमाणें काळसर लाल किंवा लालसर काळीं असल्यास तो भूमिचा मालक होतो, आणि डोळे मोत्याप्रमाणें कान्तिमान् असतील तर घनान्त वेदवेत्ता होतो, तसेंच डोळे पिंगट परंतु आकर्षक आणि वर्ण सोन्याप्रमाणें तेजस्वी असेल तर अतिशय धनवान् होतो.

सेनापतिर्गजाक्षश्चिरजीवी जायते सुदीर्घाक्षः ॥
भोगी विस्तीर्णाक्षः कामी पारावताक्षोऽपि ॥ १८० ॥

दृष्टि गजाप्रमाणें धिमी असली तर सेनापति, आणि फार लांबट असेल तर खूप दीर्घायुषी होतो. त्याच मानानें विशाळ असतील तर सुखोपभोगी, आणि पारव्याप्रमाणें खोंचक असतील तर तो स्त्रीलंपट असेल.

श्यावदृशां सुभगत्वं स्निग्धदृशां भवति भूरिभोगित्वम् ॥
स्थूलदृशां धीमत्वं दीनदृशां धनविहीनत्वम् ॥ १८१ ॥

डोळे काळे असतील तर उत्तम भाग्य, डोळे तुळतुळीत असले तर अतिशय चैनी, नेत्र विशाळ असतील तर बुद्धिमत्ता, पण तेच मलूल असतील तर दुर्भाग्याचा वाटेकरी होईल.

नकुलाक्षा मयूराक्षा जायंते जगति मध्यमाः पुरुषाः ॥
अधमा मंडूकाक्षाः काकाक्षा धूसराक्षाश्च ॥ १८२ ॥

डोळे मुंगसाप्रमाणें, किंवा मोराप्रमाणें असले तर सुख किंवा भाग्य

मध्यम लाभेल, पण डोळे बेडकाप्रमाणें विचित्र किंवा कावळ्याप्रमाणें दुष्ट, मळकट असले तर तो पुरुष मनोवृत्तिनें नीच असतो.

बहुवयसो धूम्राक्षाः समुन्नताक्षा भवंति तनुवयसः ॥
विष्टब्धवर्तुलाक्षाः पुरुषा नातिक्रमंति तारुण्यम् ॥ १८३ ॥

बुबुळें धूसर असलीं तर पुरुष दीर्घायुषी होतो, आणि डोळे बटबटीत असले तर दीर्घायुष्य लाभत नाहीं. आणि बुबुळें चपटीं असतील किंवा गरगरीत नसतील तर मनुष्य अल्पायु होतो.

ऋजु पश्यति सरलमनाः पश्यत्यूर्ध्वं सदैव पुण्याढ्यः ॥
पश्यत्यधः सपापः तिर्यक्पश्यति नरः क्रोधी ॥ १८४ ॥

निष्कपटी मनुष्याच्या दृष्टीमध्यें चलविचल नसते, कोणाच्याहि नजरेस त्याची नजर शांतपणे भिडते. पण ज्याचें मन पापी आहे त्याची नजर चंचल असते; तो दुसऱ्याकडे डोळ्याशीं डोळा भिडवून पाहूं शकत नाहीं, तो एकदम खालीं पाहूं लागतो, आणि तापट मनुष्य संतापला म्हणजे बाजूला कोणीकडे तरी पाहतो.

सततंमअद्धलक्ष्या विघूर्णिता कारणं विना दृष्टिः ॥
यस्य म्लाना रूक्षा स पापकर्मा पुमान्नियतम् ॥ १८५ ॥

कोठेंहि एक ठिकाणीं ज्याची नजर स्थिर राहात नाहीं, कारणावांचूनहि जो कावरा बावरा होतो, किंवा ज्याची नजर मलूल नीरसलेली दिसते, त्या मनुष्याचे बेत दुसऱ्याला फसविण्याचे किंवा घात करण्याचे आहेत असे खात्रीनें समजावें.

अंधो क्रूरः काणः काणादपि केकरेक्षणो मनुजः ॥
काणात्केकरतोऽपि क्रूरतरः कातरो भवति ॥ १८६ ॥

अगोदर आंधळा मनुष्य थोडा बहुत कुढाच असतो, आणि चकणा ( तिरळा ) मनुष्य पक्का कपटी असतो ( म्हणून क्वचित् काणो भवेत् साधुः अशी ह्मणच पडली आहे ) आणि तिरळ्या पेक्षां दोन्हीं बुबुळें नाकाच्या मुळाशीं आणून विलक्षण भेसूर नजरेनें पाहणारा मनुष्य वाईट

असतो. परंतु चकणा किंवा आतां सांगितलेला केकऱ्या नजरेचा मनुष्य यांच्यापेक्षां कावरा बावरा मनुष्य फार दुष्ट असतो.

दुष्टो दारुणदृष्टिः कुक्कटदृष्टिः कलिप्रियो भवति ॥
अहिदृष्टिर्दृग्रोगी बिडालदृष्टिः सदा पापः ॥ १८७ ॥

ज्याची दृष्टि क्रूर तो क्रूरच असतो; कोंबड्याच्या नजरेप्रमाणें ज्याची नजर ( कुरेंबाज ) तो भांडखोर समजावा. सर्पाप्रमाणें ( पिचपिचीत ) डोळ्याचा तो नेत्ररोगी. आणि मांजराप्रमाणें ज्याच्या नजरेंत हावरेपणा स्पष्ट दिसतो, तो दुष्टच असतो.

अतिदुष्टा गृध्राक्षा विषमाक्षाः दुःखिताः परिज्ञेयाः ॥
बकदृक्षाः धनहीना व्याघ्राक्षाः कोपना मनुजाः ॥ १८८ ॥

ज्याची नजर गिधाडाप्रमाणें असेल तो अत्यंत दुष्ट आणि ज्यांची नजर क्षणोक्षणीं बदलते ते अभागी समजावे. ज्यांची दृष्टि बगळ्याप्रमाणें ते दरिद्री; आणि ज्यांची दृष्टि वाघाप्रमाणें ते फार क्रोधी (तापट) असतात.

नित्यं नयनोद्धारः पुंसामत्यंतकृष्णताराणाम् ॥
भूरिस्निग्धदृशां पुनरायुः स्वल्पं भवेत्प्रायः ॥ १८९ ॥

ज्यांचीं बुबुळें अगदीं काळींभोर असतील त्यांना नेहमीं डोळे चाळविण्याचाच चाळा असतो ( अर्थात् त्या धोरणानें त्यांचा स्वभाव असतो ) आणि ज्यांचे डोळे फार तेलकटल्यासारखे दिसतात ते बहुतकरून अल्पायु होतात.

अतिपिंगलैर्विवर्णैर्विभ्रांतैर्लोचनैरशुभाः ॥
अतिहीनारुणरूक्षैः सजलैर्नरा निःस्वाः ॥ १९० ॥

ज्यांचे डोळे फार पिंगट, निस्तेज असतात, जे डोळे एकसारखे इकडे तिकडे फिरवीत असतात त्यांना सुख कमी, तसेंच ज्यांचे डोळे अगदीं दीनवाणें, किंवा फार लाल किंवा कोरडे, रुक्ष व मलीन किंवा पाण्यानें डबडबलेले असतात त्यांना दारिद्र्याची पीडा होते.

इह वदनमर्धरूपं वपुषो यदि वासमग्ररूप मिदम् ॥
तत्रापि वरा नासा ततोऽपिमुख्ये दृशो पुंसाम् ॥ १९१ ॥

स्त्रीचें लावण्य किंवा पुरुषांचा रुबाब पाहण्याचें खरें साधन म्हणजे चेहरा; मग तें साधन अर्धें म्हणा किंवा सगळें कां म्हणाना ! त्यांत पाहावयाचेंच तर प्रथम नाक, त्यांतहि विशेष डोळे, मग दातांची ठेवण ( दांतच फार पुढें म्हणजे बाहेर आलेले असतील तर ती कुरूपताच ).

## पापण्या

सुदृढैः कृष्णैर्नयनच्छदस्थितैर्पक्ष्मभिर्घनैः सूक्ष्मैः ॥
सौभाग्यं चिरमायुर्लभते मनुजो धनेशत्वम् ॥ १९२ ॥

डोळ्यांचीं जीं त्वचेचीं झांकणें आहेत त्यांच्या किनारीवरील केसांना पापण्या म्हणतात. हें केंस काळया रंगाचे, मजबूत, दाट आणि अगदीं बारीक असावे. म्हणजे त्या मनुष्यास दीर्घायुष्य, भाग्य आणि संपत्ति यांचा लाभ होतो.

पक्ष्मभिरधमैर्विरलैः पिंगैः स्थूलैः खरैर्विवर्णैश्च ॥
पक्ष्मततिर्यदिनस्यादगम्यनारीरताः पापाः ॥ १९३ ॥

कनिष्ठ प्रतीच्या पापण्या अशा कीं, त्या विरळ, पिंगट, जाड, राठ आणि विटलेल्या असतात किंवा त्या एका ओळींतहि नसतात. अशा कोणत्याहि प्रकारच्या ज्याच्या पापण्या असतील तो पातकी तर असतोच पण दुसऱ्याच्या स्त्रियाहि पळवून नेतो

अनिमेषो धनरहितः पुरुषः स्यादेकमात्रनिमिषोऽपि ॥
नियतं द्विमात्रनिमिषः परजनमाश्रित्य जीवति सः ॥ १९४ ॥

( डोळ्यांची उघडझांप जागेपणीं एकसारखी चालू असते त्याला " निमेष म्हणतात. ) ही उघडझांप ज्याची एका क्षणांत एकदांहि होत नाहीं तो दरिद्री. क्षणांत एकदां होत असली तरीहि तीच अवस्था. एका क्षणांत दोनदां होईल तर दुसऱ्याच्या आश्रयानें राहिला तरच जगेल.

" क्षण " ह्याबद्दल मुळांमध्यें " मात्रा " असा शब्द आहे. त्याचा अर्थ पुढें दिला आहे.

**धनिनस्त्रिमात्रनिमिषास्तथा चतुर्मात्रनिमिषवंतोऽपि ॥**
**तत्पंचमात्रनिमिषाश्चिरायुषो भोगिनो धनिनः ॥ १९५ ॥**

पण एका क्षणांत ( म्हणजे एका मात्रेइतक्या काळांत ) जर डोळ्याची उघडझांप तीन वेळां होईल तर तो आणि ज्याची चार वेळा होत असेल तोहि मनुष्य धनवान् होईल; आणि एका मात्रेइतक्या वेळांत जर पांच वेळ उघडझांप होईल तर मग काय ? तो मनुष्य संपत्तिमान्, दीर्घायुषी आणि सुखोपभोग घेणारा असा होईल.

**नयनानिमेषैरल्पैर्मध्यैर्दीर्घैश्च जायते पुंसाम् ॥**
**आयुः स्वल्पं मध्यं सुदीर्घमथानुपूर्विकया ॥ १९६ ॥**

डोळ्यांची उघडझांप थोडा वेळ टिकत असली तर अल्पायु. ( उघडझांप होतांना डोळे उघडे राहतात त्या स्थितीला उघडीप म्हणतात ). उघडझांप सारखीच असली तर मध्यम आयुष्य; आणि उघडीप जास्त टिकली तर दीर्घायुष्य असा क्रम समजावा.

आतां " मात्रा " म्हणजे किती वेळ तें सांगतात:—

**जानुप्रदक्षिणीकृतस्य च यावद्घंटिकां करो दत्ते ॥**
**तदिदमिह समयमानं मात्राशब्देन निगदति ॥ १९७ ॥**

गुडघ्यापर्यंत हात नेऊन आणि तेथें फिरवून पुनः गळ्यापर्यंत हात आणावयाचा; असें करण्याला जो काळ लागतो तितक्या काळाला " **मात्रा** " म्हणतात.

" मात्रा " हा कालखण्ड निश्चित नाहीं. सर्व साधारणपणें एका क्षणालाहि " मात्रा " म्हणतात.

## बालकाचें रोदन

मंदरमंथानकमथ्यमानजलराशिघोषगंभीरम् ॥
बालस्य यस्य रुदितं महीं महीयान्स पालयति ॥ १९८ ॥

ज्या बालकाचें रडणें देखील धीर गम्भीर, पाण्याच्या ओघाच्या ध्वनिसारखें नादपूर्ण असेल तें बालक भाग्यशाली निपजणारच. मोठेपणीं तो बालक राज-सत्ताधीश होईल.

बाष्पांबुविनिर्मुक्तं स्निग्धमदीनं च रोदनं शस्तम् ॥
रूक्षं दीनं घर्घरमश्रुयुतं दुःखदं पुंसाम् ॥ १९९ ॥

बालक रडतांना त्याच्या डोळ्यांत पाणी येऊं नये, डोळे देखील चकाकित असावे. रडण्यांत मलूलपणा नसावा. असें रोदन शुभ होय. परंतु कर्कश किंवा घरघरणारें, घोगरे, अश्रुपूर्ण रोदन हें दुःखकारक असतें.

बालेंदुनते वित्तं दीर्घे पृथुलोन्नते सुखं श्यामे ॥
नासावंशविनिर्गतदले इव भ्रूदले दिशतः ॥ २०० ॥

मूल रडतांना देखील त्याचें तोण्ड चन्द्रकोरीप्रमाणें दिसावें. तें सम्पत्तीचें लक्षण असतें. मुखविस्तृत—लांबट किंवा उलाळ होईल तरी शुभच—त्याच्या भिवयाचा भाग देखील नाकाच्या कोरीपासून निघालेल्या शामवर्ण पाकळ्याप्रमाणें दिसावा.

## भिवया

नृणामयुते स्निग्धे मृदुनतरोमान्विते भ्रुवौ शस्ते ॥
हीने स्थूले सूक्ष्मे खरपिंगलरोमके न शुभे ॥ २०१ ॥

पुरुषांच्या भिवया एकमेकीस चिकटलेल्या नसाव्या. तुटक, तुळतुळीत, मऊ असाव्या. भिवयांचे केंस ताठ उभे नसावे. अशा भिवया शुभकारक होत. परंतु कमी केसांच्या, जाड, फारच रुंद किंवा अगदीं बारीक राठ पिंगट रंगाच्या भिवया शुभप्रद नाहींत.

ऱ्हस्वा बहुदुःखानागमम्ययोषिज्जुषां च मध्यनताः ॥
स्तोकायुषामतिनता विषमाः खंडा भुवो दरिद्राणाम् ॥२०२॥

आखूड, किंवा मध्येंच वांकलेल्या अशा भिवया दुःखी मनुष्यांना, किंवा जे अगम्य स्त्रीशीं देखील गमन करणारे असतील त्यांच्या असतात. अल्पायुषीं मनुष्यांच्या भिवया फारच वांकलेल्या असतात. आणि दरिद्री मनुष्यांच्या कमी ज्यास्त जाडीच्या किंवा मध्येंच तुटक्या अशा असतात.

धनवंतः सुखवंतः शिखरैः पुरुषाः समुन्नतैर्विमलैः ॥
निम्नैः पुनर्भवंति द्रव्यसुखापत्यपरिहीनाः ॥ २०३ ॥

( नाकाजवळचा भिवयाचा जो भाग तो शिखर ) भिवयांच्या शिखराचा भाग ज्यांचा उंच आणि स्वच्छ असेल ते पुरुष संपत्तिमान् आणि सुखोपभोगशाली असतात. आणि भिवयांची कमान उलटी ( म्हणजे खोलगट ) असेल तर ते पुरुष दरिद्री, दुःखी, आणि संततिरहित असे असतात.

## कान.

परिपूर्ण कर्णपाली पिप्पलिकाद्यवयवाः सुसंस्थानाः ॥
लघुविवरा विस्तीर्णाः कर्णाः प्रायेण भूमिभुजाम् ॥ २०४ ॥

कानाची पाळ, त्याचप्रमाणें चाफा इत्यादि सर्व भाग मांसल आणि आपआपल्या जागीं घट्ट बसलेले असावे, कानाचें रंध्र भकास नसून बेताचें पाहिजे. कान विस्तृत असावे. अशा प्रकारचे कान जो यशस्वी राजा असतो त्याचे असतात.

आद्यः प्रदीर्घ कर्णः सुखी सुवृत्तः सपीनमृदुकर्णः ॥
मतिमानकुल-श्रवणोथ भूपतिः शंकुकर्णः स्यात् ॥ २०५ ॥

ज्याचे कान विशाल तो श्रेष्ठ असतो; आणि आकारानें रेखीव व पुष्ठ आणि मऊ असे ज्याचे कान तो सुखी असतो. नकुळाप्रमाणें ज्याच्या कानाचा आकार तो बुद्धिमान्, आणि ज्याच्या कानांना टोंक असतें तेहि राजे होतात.

**चिपिटश्रवणो भोगी दीर्घायुर्दीर्घरोमशः श्रवणः ॥**
**अतिपीनमहाभोगश्रवणो जननायको भवति ॥ २०६ ॥**

ज्याचे कान चापट म्हणजे पातळ असतात तो चैनी असतो. कान मोठे असून आतील बाजूस बरेचसे केंस असतील तर दीर्घायुषी होतो. कान भले मोठे आणि चांगलेच पुष्ट असतील तर तो मनुष्य जनतेचा पुढारी होतो.

**ऱ्हस्वैर्निःस्वः कर्णैर्निर्मांसैः पापमृत्यवो मनुजाः ॥**
**व्यालंबितैः शिरालैः क्रूराः स्युः प्रायशः कुटिलैः ॥ २०७ ॥**

कान आंखुड, वाळकुण्डे ( निर्मांस ) असतील तर दरिद्री; आणि शिवाय सुखानें मरण येणार नाहीं. तसेंच कान लिबलिबीत, शिरा स्पष्ट दिसणारे किंवा वांकडे असतील तर मनुष्य क्रूर असतो.

**येषां पृथुलच्छिद्राः कर्णाः स्युः कर्णशुष्कलीहीना ॥**
**स्वल्पायुषो दरिद्रा विलोक्यमाना विरूपास्ते ॥ २०८ ॥**

ज्यांच्या कानाचें रंध्र मकास, आणि कानाला पाळीच नसते ते अल्पायुषी, आणि कान विद्रुप असले तर मग दारिद्र्याहि भोंवतेंच.

## ललाट

**विपुलंचोर्ध्वमस्तकमुन्नतमर्धेंदुसंनिभं राज्यम् ॥**
**प्रदिशत्याचार्यपदं शुक्तिविशालं नृणां भालम् ॥ २०९ ॥**

मस्तक नीट आणि विशाल असावें. तसेंच भालहि विशाल आणि अर्धचन्द्राप्रमाणें स्वच्छ उन्नत असावें म्हणजे राज्यपद लाभतें. शिंपल्या-प्रमाणें तजेलदार असले तर आचार्यपद प्राप्त होणार असें दर्शवितें.

**स्वल्पैर्धर्मप्रवणा धनहीनाः संवृतैस्तथा विषमैः ॥**
**निम्नैः केवलबंधनवधभाजः क्रूरकर्माणः॥ २१० ॥**

कपाळ फार मोठें नसून पण बेताचें असलें तर मनुष्य धर्मशील असतो. परंतु कपाळ अगदीं संकुचित असलें तर निर्धनता; आणि उंच-सखल किंवा खोलगट आणि अरुंद, लहान कपाळाचा मनुष्य दुष्ट स्वभावी आणि दुस-ऱ्याचा घात करणारा असतो.

भालस्थला स्थिताभिः शिराभिरधमाः सदैव पापकराः ॥
अभ्युन्नताभिराढ्यास्ताभिरतिस्वस्तिकाकृतिभिः ॥ २११ ॥

कपाळावर जर अनेक शिरा वाकड्या तिकड्या असतील तर तो मनुष्य हीन व निरंतर पातकें करणारा असतो. परंतु शिरा उंचट नीट अशा किंवा स्वस्तिकाकार असल्या तर अशुभ नाहीं.

रेखाभिर्वर्षशतं पंचभिरायुर्ललाटसंस्थाभिः ॥
पुरुषाणां स्त्रीणां वा कर्मकरत्वं करोति श्रीः ॥ २१२ ॥

कपाळावर पांच रेषा उमटलेल्या असतील तर ती व्यक्ति स्त्री असो किंवा पुरुष असो तिला शतवर्षायुष्य लाभेल. आणि त्यांचे येथें लक्ष्मी दासी म्हणून राबेल.

भालस्थलस्थितेन स्फुटेन रेखाचतुष्टयेन नृणाम् ॥
वर्षाण्यशीतिरायुर्वसुधेशत्वं पुनर्भवति ॥ २१३ ॥

कपाळावर जर चार रेषा स्पष्ट दिसून येत असतील तर त्या मनुष्याला ऐंशी वर्षांचें आयुष्य आणि राज्यपदहि लाभेल.

स्यादायुर्लेखाभिस्तिसृभिर्द्वाभ्यामथैकया नियतम् ॥
शरदां सप्ततिषष्ठिचचत्वारिंशतमपि क्रमशः ॥ २१४ ॥

कपाळावर जर तीन रेषा असतलि, अथवा दोन किंवा एकच रेषा असेल तर क्रमानें त्या मनुष्याचें आयुष्य, सत्तर वर्षें, साठ वर्षें, व चाळीस वर्षें असेल.

भाले रेखाहीने पंचाधिकविंशतिः समाः पुंसाम् ॥
आयुः स्याद् ध्रुवमखिला जायन्ते संपदः सपदि ॥ २१५ ॥

पण कपाळावर एकहि रेषा नसेल. ( आणि दुसरीं अशुभ चिन्हें असतील ) तर त्याचें आयुष्य पंचवीस वर्षांपेक्षां ज्यास्त असणार नाहीं, मग त्याला अलोट संपत्ति असली तरी उपयोग काय ?

यदि वा तिर्यक् दीर्घा तिस्रो रेखाः शतायुषां भाले ॥
भूमिजुषां च चतस्रा पुनरायुः पंचहीनशतम् ॥ २१६ ॥

पण शतवर्षायुष्याचीं चिन्हें असून एकाद्याच्या कपाळावर जर तीन आडव्या लांब रेषा असतील, आणि जमिनीचा मालक असणाऱ्याच्या कपाळावर जर तशाच आडव्या चार रेषा असतील त्याच्या शंभर वर्षांच्या आयुष्यामध्यें पांच वर्षें कमी होतील.

**जीवति वर्षाशीतिः केशांतोपगतदीर्घरेखेण ॥**
**भालेन वर्षनवतिं पुरुषो रेखान्वितेन पुनः ॥ २१७ ॥**

कपाळावरील रेषा डोक्यावरील केशकलापाच्या जवळ असून पुष्कळ लांबलचक असेल तर आयुष्य ऐशीं वर्षेंपर्यंत असेल. तशीच आणखी एक रेषा जर अधिक असेल तर नव्वद वर्षें आयुष्य राहील.

**रेखासप्ततिमायुः पंचैताग्रस्थिता पुनः षष्ठिम् ॥**
**बह्वयो नृणां शतार्धं दशोनमपियत् भृगुर्वदति ॥ २१८ ॥**

अशाप्रकारच्या पांच रेषा कपाळावर असल्या तर आयुष्य साठ किंवा सत्तर वर्षांचें; आणि त्यापेक्षां जास्त असल्या तर मात्र आयुष्य दहा कमी पन्नास म्हणजे चाळीस वर्षांचें असेल.

**भ्रूयुग्मोपगताभिस्त्रिंशद्वर्षाणि जीवति शरीरी ॥**
**विंशत्यब्दं नियतं लेखाभिर्वामवक्राभिः ॥ २१९ ॥**

रेषा दोन्ही भिवयांपर्यंत जाऊन भिडतील तो मनुष्य तीस वर्षें जगेल पण त्याच रेषा डावीकडे वाकड्या वळलेल्या असल्या तर आयुष्य फक्त वीसच वर्षांचें असेल.

**छिन्नाभिरगम्यस्त्रीगामी क्षुद्राभिरपि नरोऽल्पायुः ॥**
**रेखाभिर्मनुजः स्यादित्याह सुमंतविप्रेंद्रः ॥ २२० ॥**

कपाळावरील रेषा मध्यें मध्यें तुटलेल्या असतील तर तो पुरुष अगम्य स्त्रीशीं देखील गमन करील. आणि त्या अगदींच किरकोळ असल्या तर तो अल्पायुषी होईल असें मत ( " समुद्र " मुनीचेंच नव्हे तर ) सुमंताचार्यांचेंहि आहे.

श्रीवत्सकार्मुकाद्या यस्य शिरा रोमभिः कृता भाले ॥
रेखाभिर्वा नृपतिर्भोगी वा जायते सपदि ॥ २२१ ॥

ज्याच्या कपाळावरील शिरांच्या अथवा केसांच्या आकृत्ति श्रीवत्साकार, धनुष्याकार असतील तर अशा रेषांचा मनुष्य सुखांमध्यें तर लोळेलच पण एकाद्या प्रदेशाचा तत्काळ राजाहि होईल.

## मस्तक

मस्तकमिभकुंभनिभं भूमिभुजां मंडलं गजाढ्यानाम् ॥
भोगवतां भवति समं क्रमोन्नतं मंडलेशानाम् ॥ २२२ ॥

कांहीं लोकांचें मस्तक हत्तीच्या गण्डस्थळाप्रमाणें विशाळ असतें. असे पुरुष राजाचेंहि राजे होतात. आणि त्यांच्याजवळ गजान्त लक्ष्मीहि वास करते. मस्तकाच्या बाजू सारख्या असल्या तर सुखोपभोग, आणि क्रमानें मोठया झालेल्या असतील तो पुरुष सार्वभौम होईल.

विकसत्छत्राकारं यस्य शिरो युवतिकुचनिभं वापि ॥
नृपतिः स सार्वभौमो निम्नं वा यस्य स महेशः ॥ २२३ ॥

उघडलेल्या छत्रीप्रमाणें मस्तकाचा पृष्ठभाग असेल किंवा तरुणीच्या कुचाप्रमाणेंच ( मध्येंच थोडा उंच ) असेल तर राज्यपद प्राप्ति आणि तसेंच पण अधिक भव्य असेल तर अधिराजा होईल.

विषमो धनहीनानां करोटिकाभश्चिरायुषो मूर्धा ॥
द्राघिष्ठो दुःखवतां चिपिटो मातापितृघ्नानाम् ॥ २२४ ॥

दरिद्री पुरुषाचें मस्तक व्यवस्थित आकाराचें नसतें. ( कोठें तरी उंच, भलतीचकडे सखल असें असतें ) परंतु जे दीर्घायुषी असतात, त्यांचें मस्तक नारळाप्रमाणें उंच व गोल असते. दुःखी मनुष्याच्या डोक्याची लांबीच ज्यास्त असते आणि घातकी दुष्टाचें डोकें चपटें असतें.

धनविरहितो द्विमौलिः पापरतो मीनमौलिरतिदुःखी ॥
अध्वरुचिर्घटमौलिर्ह्यवनतमौलिः सदानिंद्यः ॥ २२५ ॥

ज्याचें डोकें दुभंगल्यासारखें म्हणजे दोन डोकीं एकत्र जुळल्या-

सारखें असेल तोहि दरिद्रीच असतो. ज्याचें डोकें मत्स्याच्या आकाराचें दिसतें तो पातकी तर असतोच पण अत्यंत दुःखीहि असतो. पालध्या मडक्याप्रमाणें डोकें असलेला मनुष्य नेहमींच प्रवास करतो आणि अधोमुखी मनुष्य तर फारच वाईट.

## मस्तकावरील केस

अस्फुटिताग्रा स्निग्धाः कृष्णा मृदवः समास्तनीयासः ॥
अस्तोकदीर्घबहुला तरंगिणो भूभुजां केशाः ॥ २२६ ॥

केस मऊ, काळेभोर, तुळतुळीत, लांबसडक असून अग्राला फांटे फुटलेले नसावे; भरपूर आणि तलम असावे, म्हणजे मनुष्य भाग्यवान् असतो आणि असेच पण कुरळे असले तर राज्यपद लाभेल.

ऊर्ध्वा रुक्षाः कपिलाः स्थूला विषमाः खरा विभिन्नाग्राः ॥
अतिऱ्हस्वदीर्घकुटिला जटिला विरला दरिद्राणाम् ॥ २२७ ॥

जे दरिद्री असतात त्यांचे केंस उभट, रुक्ष, पिंगट, जाड आणि तेहि कमी ज्यास्त जाडीचे, भरभरीत अथवा अग्रांना फाटे फुटलेले, फार आंखुड किंवा फार लांब. वेडे वांकडे. गुंताळलेले किंवा विरळ असे असतात.

अंगं यद्यत्पुंसां स्त्रीणां वा पिशित विरहितं सूक्ष्मम् ॥
परुषं शिरावनद्धं तत्तदनिष्टं परिज्ञेयम् ॥ २२८ ॥

शरीराचा कोणताहि भाग मग तो स्त्रीचा असो पुरुषाचा असो, फारच बारीक, वाळकुंडा, खरखरीत, शिरांनीं व्यापलेला, केंसाळ असा असेल तर तो अशुभ समजावा.

आयुः परीक्ष्य पूर्वं नृस्त्रीणां लक्षणं तदा ज्ञेयम् ॥
व्यर्थं लक्ष्मज्ञानं लोके क्षीणायुषां यस्यात् ॥ २२९ ॥

प्रथम आयुर्दाय किती तें पाहावें, मग पृच्छक पुरुष किंवा स्त्री असेल त्याप्रमाणें लक्षणें पहावीं. कारण मनुष्य अल्पायुषी असेल तर सुलक्षणांचा तरी उपयोग काय ?

यल्लक्ष्म पुनः शुभं भुवि कररेखाप्रभृतिकं च संवदति ॥
बाह्याभ्यंतरमवरं तत्र समुद्रेण निर्दिष्टम् ॥ २३० ॥

आणि दुसरें असें कीं शरीराचें लक्षण जें शुभाशुभ असेल त्याचा पडताळा हस्तरेषांना अनुसरून पाहावा. तो पडताळा जमला तरच शरीराचें अन्तर्बाह्य लक्षण जें समुद्रमुनिनीं सांगितलेलें असेल त्याप्रमाणें अनुभव येईल.

इति महत्तमे श्रीनृसिंहात्मजदुर्लभराजाविरचिते
सामुद्रतिलके नरलक्षणशास्त्रे शारीरकाधिकारः प्रथमः ॥ १ ॥

सामुद्रिक तिलकांतील शारीराधिकार

समाप्त.

# अथ सामुद्रतिलकांतर्गत

## संहतिसारादिशारीरकाध्यायः ॥

संहतिसारानूकस्नेहोन्मानप्रमाणमानानि ॥
क्षेत्राणि प्रकृतिरथो मिश्रकमेतदपि शारीरम् ॥ २३१ ॥

क्षेत्र किंवा सामुद्रिक दृष्ट्या शरीर म्हणतात तें हें:——अवयवांचा ठाकठीकपणा, बल, स्वभाव ( पूर्वकर्माप्रमाणें ), प्रेमळपणा, उंची, प्रमाणशीर रचना ह्या गोष्टी ज्याच्यामध्यें व्यवस्थित असतात त्याला शरीर हें नांव आहे.

यत्र मिथः श्लिष्टत्वङ्मांसस्नाय्वस्थिसंधिबंधानां ॥
संहननं संघातः संहतिरिति कथ्यते सद्भिः ॥ २३२ ॥

ज्या शरीरामध्यें त्वचा, मांस, स्नायु, अस्थि, सन्धिबन्ध ह्यांचा परास्परांशीं चांगला मिलाफ असतो त्या स्थितीला विद्वान लोक **संहति** म्हणतात.

**यत्राकृष्टमिवांगप्रत्यंगं यस्य दृश्यते देहे ॥**
**स स्थानेन स्वरूपः सुसंहतिर्भवति समहेतुः ॥ २३३ ॥**

ज्याचे सर्व लहानमोठे अवयव एकमेकांना अगदीं व्यवस्थित जोडलेले असे असतात. त्याला अंगलोटाच्या दृष्टीनें सुस्वरूप म्हणतात. यालाच सुसंहति म्हणतात. दोन्हीचा मतलब एकच.

**मांसास्थिसंधिबंधः शिथिलो न कदापि लक्ष्यते यस्य ॥**
**स च संहतिमान्धन्यो दीर्घायुर्जायते नित्यम् ॥ २३४ ॥**

ज्याच्या शरीरांतील मांसल भाग, टंच, सांधे, घट्ट असे असतात, केव्हांहि ढिले नसतात त्यालाच संहति खरी लाभली. तोच धन्य. तोच सदा दीर्घायु होतो.

**संहति रहितोरूक्षः पिशितविहीन' शिरायुतः शिथिलः ॥**
**स्थूलास्थिसंनिवेशो भवति क्लेशावहः पुंसाम् ॥ २३५ ॥**

अशी संहति ज्याच्या शरिरांत नसते; म्हणजे ज्याचें शरीर वाळलेलें, कोरडें रुक्ष, शिरांनीं भरलेलें, ढिलें असें असतें. ज्यांतील हाडें भलत्याच जागीं उगीचच जाड असतात त्याच्या शरीराला क्लेश होतात.

## अथ साराः

**त्वग्रक्तमांसमेदोस्थिमज्जशुक्रान्यनुक्रमेण नृणाम् ॥**
**साराः सप्तभवेयुः समासतस्तत्फलं ब्रूम ः ॥ २३६ ॥**

कातडी, रक्त, मांस, चरबी, हाडें, मज्जा, रेत हे जे शरीराचे घटक त्यांना " सार " असें नांव आहे. हे सात आहेत. ( वैद्यकांतील शारीरशास्त्रांत ह्याच घटकांना सप्त धातु म्हणतात ). आतां त्यांचें फल थोडक्यांत सांगतो.

**स्निग्धत्वचो धनाढ्यस्तनुत्वचस्तीक्ष्णबुद्धयो मनुजाः ॥**
**सुभगा मृदुत्वच स्युः प्रागुक्तचित्वचः सुखिनः ॥ २३७ ॥**

ज्यांची कातडी चमकदार तो धनवान्, कातडी राठ नसली म्हणजे

बुद्धि फार तीव्र असते. मऊ असली तर भाग्यशाली; आणि तिन्ही गुण असले मग सुखाला काय कमी !

रसनोष्ठदंतपीठाकरांघ्रिगुदतालुरोचनांतेन ॥
रक्तेन रक्तसारा धनतनयस्त्री सुखोपेताः ॥ २३८ ॥

जीभ, ओठ, दांत, पाठ, पावलें, गुह्यभाग, तालु आणि नेत्रप्रान्त हे शरीर भाग ज्याचे लाल किंवा लालसर असतील, त्यांना त्या त्या अवयवाला योग्य तें सुख मिळेल. शुद्ध लाल रक्ताचा मनुष्य "रक्तसार" म्हणून ओळखावा. हे सर्व यथा योग्य असले तर धन, पुत्र आणि स्त्री जें सुख पाहिजे तें सर्व मिळतें.

सर्वांगीणेन चितो यथाप्रदेशं धनेन मांसेन ॥
उक्तः स मांससारो विद्याधनरूपपरिकालितः ॥ २३९ ॥

ज्या सर्व अंगातील मांसमय अवयव मांसानें घट्ट पुष्ट असतात, त्याला "**मांससार**" म्हणावें असा मनुष्य विद्या, धन, रूप यांनीं युक्त असतो.

नखदंतदृशि स्निग्धो मेदः सारः सुखान्वितः सुतवान् ॥
स्थूलास्थिरस्थिसारः कांतो विद्यां गतः सबलः ॥ २४० ॥

नखें, दांत आणि डोळे ह्यांच्यामध्यें स्निग्धता ( म्हणजे चिकटपणा, चकचकीतपणा ) असेल तर त्या मनुष्याला **मेदःसार** म्हणतात. मेदःसार म्हणजे ज्याची स्थूलता जोरदार असते असा मनुष्य; हा सुखी आणि पुत्रवान् असतो. ज्याचें हाडपेर मजबूत आणि मोठें असतें तो **अस्थि-सार.** हा मनुष्य दिसण्यांत रेखीव, विद्यासंपन्न आणि बळकट असतोच.

धनशुक्रोपचययुतः सुसंस्थितिर्यो महाबल स्निग्धः ॥
कथितः समज्जसारो बहुतनयस्त्रैणसुखभोगी ॥ २४१ ॥

ज्याचें वीर्य दाट आणि भरपूर, त्याला पुत्र पुष्कळ असतात, आणि तो स्त्रीलंपट तसाच चैनबाज असतो. अशा मनुष्याला कोणी **मज्जसार** म्हणतात. तो ठीकठाक, बलाढ्य आणि स्नेहाचा भुकेला असतो.

**इह भवति शुक्रसारो विद्यासौभाग्यरूपपरिकलितः ॥**
**प्रायेण सप्तसारः सर्वोत्कर्षास्पदः पुरुषः ॥ २४२ ॥**

वर सांगितलेला स्त्रीलंपट आणि चैनी पुरुष हाच खरा **शुक्रसार** म्हटला पाहिजे. याप्रमाणें सप्तसार पुरुषाच्या भाग्यशालित्वाची माहिती आहे. सामान्यतः हे पुरुष विद्या, धन, आंगलोट ह्या बाबतींत भाग्यवानच असतात.

## अथ अनूकम्

**पूर्वं भवेद्यनवरतं सत्वस्वररूपगतिभिरभ्यस्तम् ॥**
**पुनरिह यदनुक्रियते तदनूकं कथ्यते सद्भिः ॥ २४३ ॥**

पूर्वजन्मीं सत्व, स्वर, रूप, गति ह्यांविषयीं जो जो गुण, किंवा जी जी स्थिति जन्मभर टिकते तीच पुढेंहि अन्यजन्मांत त्याच धोरणांत राहते. ह्याला शास्त्रज्ञ " अनूक " म्हणतात.

**सिंहव्याघ्रगरुत्मद्वृषभानूका भवंति ये मनुजाः ॥**
**अप्रतिहतप्रतापा जितारयस्ते नराधीशाः ॥ २४४ ॥**

सिंह, व्याघ्र, गरुड, वृषभ यांच्याप्रमाणें ज्यांचा स्वभाव ते पुरुष अत्यंत पराक्रमी निपजतात. ते भूपति होऊन युद्धांत त्यांना विजय प्राप्त होतो.

**वानरमहिषक्रोडक्रोष्ट्रानूकाः सुखार्थसुतहिताः ॥**
**रासभछागानूका धनहीना दुःखिताः प्रायः ॥ २४५ ॥**

तसेंच वानर, टोणगा, रानडुक्कर, रानकोल्हा ह्यांच्याप्रमाणें ज्यांचा स्वभाव ते सुख, द्रव्य आणि पुत्र ह्यांच्या प्राप्तीसाठीं प्रयत्न करीत असतात आणि त्यांत बऱ्याच अंशीं यशस्वीहि होतात; परंतु गाढव, मेंढा ह्यांची जर योनि असली तर दारिद्र्य, दुःख हींच नशीबीं येतात.

## अथ स्नेहः

**चित्तप्रसक्तिजननप्रीणनमिति कथ्यते ध्रुवं स्नेहः ॥**
**तन्मूलमिह ज्ञेयं सुखसौभाग्यादिकं स्नेहम् ॥ २४६ ॥**

दुसऱ्याच्या चित्ताला आकर्षक होईल असें वर्तन, ( दुसऱ्याला ) संतुष्ट करण्याची हातोटी ह्यालाच स्नेह म्हणतात. आणि ह्या जगांत सुख, भाग्य, द्रव्य इत्यादिकांची प्राप्ति होण्याला खरें कारण जर पाहिलें तर मनुष्याच्या आंगचा विनय आणि सौजन्य हींच होत. हाच "स्नेह."

रसनायां दशनेषु त्वचि लोचनयोर्नखेषु केशेषु ॥
पुण्यवतां प्रायेण स्नेहोऽयं षड्विधो ज्ञेयः ॥ २४७ ॥

हा स्नेह कोठें असतो म्हणाल तर, गोडबोलण्यांत, हास्यांत, हस्तस्पर्शांत, शांत दृष्टींत, नखामध्यें आणि मऊ केसांमध्यें तो असतो. ह्याप्रमाणें जे पुण्यशील असतात त्यांच्यामध्यें स्नेह हा याप्रमाणें सहा प्रकारांनीं आढळतो.

प्रियभाषित्वं रसना स्निग्धश्च सुभाजनं रदस्निग्धः ॥
अतिसौख्यंत्वक्स्निग्धो नियंत भजते भुजिष्यां च ॥२४८॥

प्रियभाषण ह्याला जिह्वास्निग्धत्व म्हणतात तो; तसाच दंतास्निग्ध मनुष्य, त्याचप्रमाणें स्निग्ध त्वचेचे लोक हे सर्व अत्यंत सुखांत नांदतात. दासदासी पदरीं बाळगून सुख भोगतात.

## अथ उन्मान ( वजन )

मंजिष्ठादीनामिव तुलया यत्तोलनं भवति पुंसाम् ॥
उन्मीयतेऽत्र नियतं तदुच्यते सद्भिरुन्मानम् ॥ २४९ ॥

मंजिष्ठ इत्यादि वस्तूंचें जसें आपण वजन ठरवितों, त्याचप्रमाणें मनुष्याचेंहि वजन तराजूमध्यें बसवून ठरवावें; ह्याला उन्मान म्हणतात.

योऽध्यर्धभारदेहः सविश्वविश्वंभरेश्वरो भवति ॥
भारवपुर्यः पुनरिह जगति स कोटिध्वजो भवति ॥ २५० ॥

भार हें एक वजन आहे, तें—

जो मनुष्य वजनांत दोन भार भरतो! तो सर्व समुद्रवलयांकित पृथ्वीचा मालक होतो. ज्याचें वजन एक भार असतें तो देखील कोट्याधीश असतो.

भारार्धं यस्यांगं स सुखाढ्यो भोगभाजनं धनवान् ॥
भारार्धार्धतनुर्यः स दुर्भगो दुःखितः प्रायः ॥ २५१ ॥

अर्धा भार ज्याचें वजन तोहि सुखी, धनवान् होऊन चैनींत राहतो, पण ज्याचें वजन पाव भार इतकें किंवा त्याहून कमी तो दुःखामध्यें खितपतो.

काष्ठेषु मणिषु वज्रेष्वाकर धातुषु तथा निवसनेषु ॥
स्निग्धं यत्तत्तद्वद्गुरु यद्रूक्षं च लघु तदिह ॥ २५२ ॥

लांकूड, रत्नें, हिरा, सोनें इत्यादि खनिज वस्तु; वस्त्र, पात्र ह्यामध्यें कांहीं जिन्नस स्निग्ध, कांहीं रुक्ष, कांहीं हलके, कांहीं जड असतात; त्याचप्रमाणें मनुष्यांतहि भारी हलका असे प्रकार आहेत.

## अथ प्रमाणम् ( उंची, लांबी )

आपार्ष्णितलशिरोंतं यदिह वपुर्मीयते प्रकर्षेण ॥
प्रवदंति तत्प्रमाणं केऽप्यायामं पुनः प्राहुः ॥ २५३ ॥

टाचेंपासून मस्तकावरील उंच भागापर्यंत सूत्र लावून उंची मोजावी. ह्या उंचीला प्रमाण म्हणतात. कोणी लांबी असेंहि म्हणतात.

शतमष्टभिः समधिकं ज्येष्ठः स्यान्मध्यमोऽपिषण्णवतिः ॥
चतुरधिकाशीतिरथांगुलानि दैर्ध्यात्पुमानधमः ॥ २५४ ॥

ज्याची उंची १०८ अंगुळें तो पुरुष उत्तम; ज्याची उंची ९६ अंगुळें तो मध्यम; आणि ज्याची उंची ८४ अंगुळें तो कनिष्ठ, त्याहीपेक्षां कमी तो अधम.

पार्ष्णिगुल्फोपगता चतुरंगुलिका भवेदथो जंघा ॥
दैर्ध्येण चतुर्विंशतिरथोंऽगुलचतुष्टयं जानु ॥ २५५ ॥

टांचेचें माप ४ अंगुळें असावें, आणि पोटरीचें २४ अंगुळें असावें, गुडघ्याचेंहि प्रमाण ४ अंगुळेंच आहे, ह्याप्रमाणें अवयवांचें परस्परांशीं प्रमाण असावें.

आजानुमितातुल्या सक्थिः स्याद् द्वादशांगुलायामा ॥
हस्तार्धमितंनाभ्यायुतमुदरं च कुचसहितम् ॥ २५६ ॥

गुडघ्यापर्यंतचें माप मांडीचें; पोटऱ्याच्या लांबीइतकें तरी तें असावें, बस्ति १२ अंगुळें अंतरावर असावा. तेथून नाभि ६ अंगुळें अंतरावर. स्तनांमधील अंतरहि १२ अंगुळें असावें.

चत्वारि ग्रीवा स्याद्याचुबुककचांतमंगुलानि मुखम् ॥
द्वादश पुंसां भवतीत्यायामोऽष्टाधिकं शतकम् ॥ २५७ ॥

मान ४ अंगुळें हनुवटीपासून मुखापर्यंत, आणि मुखापासून मस्तकापर्यंत १२ अंगुळें अन्तर असतें. ह्याप्रमाणें पायापासून मस्तकापर्यंतच्या उंचीचें माप होतें.

एतदपि नतं केषामष्टोत्तरमुत्तमस्य भवति शतम् ॥
मध्यस्याष्टविहीनं ततो दशोनं जघन्यस्य ॥ २५८ ॥

कांहींचें असेंहि मत आहे कीं, उत्तम पुरुषाची उंची १०८ अंगुळें; मध्यम पुरुषाची १०० आणि कनिष्ठ पुरुषाची उंची ९८ अंगुळें असें प्रमाण मानावें.

इदमायुरतिशयः स्फुटमुत्तममपिचोत्तमे नरे भवति ॥
मध्यं मध्ये हीने तदपि विहीनं परिज्ञेयम् ॥ २५९ ॥

ह्यावरून हें स्पष्ट होतें कीं, उत्तम पुरुषाचें आयुष्य पूर्ण शंभर वर्षें म्हणजे १०८ वर्षें. मध्यमाचें मध्यम आयुष्य आणि कनिष्ठाचें आयुष्य त्या मानानें कमी समजावें.

उत्तममध्यमहीनाः कालक्षेत्रानुमानतो ये स्युः ॥
निजपर्वांगुलिसंख्यानियतं तेषां विबोद्धव्यम् ॥ २६० ॥

वर जें उत्तम, मध्यम, कनिष्ठ असें उंचीचें मान सांगितलें तें ज्यानें त्यानें आपआपल्या पेरांच्या लांबीचीं अंगुळें धरून त्या अंगुळांनीं मोजून पाहावें, मग सार्वत्रिक मापानें मोजावें.

रामो दशरथसूनुर्बलिरपि विंशतिशतांगुलः पूर्वम् ॥
प्रमाणबद्धे द्वावपि पुनरेतो दुःखितौ तदिह ॥ २६१ ॥

पूर्वकाळीं दाशरथि श्रीरामचंद्र, बलिराजा ह्यांची उंची त्याकाळीं देखील १२० अंगुलांपेक्षांही अधिकच होती, ह्या कारणासाठीं त्यांनाहि आयुष्यांत पुष्कळ कष्ट सोसावे लागले. म्हणून उंची कमी तर नसावीच पण जास्तहि नसावी.

## मान म्हणजे शरीरावयव यांचें मापन

जलपूर्णकटाहमध्यासीनस्य चतुर्दिशं नरस्य बहिः ॥
पतति यदंबु द्रोणात्परिणाहत्वेन तन्मानम् ॥ २६२ ॥

पाण्यानें काठोकाठ भरलेल्या हौदामध्यें मनुष्यानें बसावें म्हणजे त्यामुळें जितकें पाणी चोहोंबाजूंनीं बाहेर सांडून हौद जितका रिकामा होईल तितका तो रिकामा भाग त्या मनुष्याचा घेर समजावा.

टीपः—हल्लीं विशिष्ट गुरुत्व ( Specific gravity काढण्याची हीच रीत आहे.

मानोपेतशरीराश्चिरायुषः संपदान्विताः पुरुषाः ॥
तद्धीनाधिक्ययुताः क्लिश्यन्ति पुनः सदा दुःखैः ॥ २६३ ॥

योग्य प्रमाणानें शरीरांतील अवयवांची लांबी रुंदी असली म्हणजे तो पुरुष दीर्घायुषी आणि संपत्तिमान् असतो; परंतु प्रमाणापेक्षां लांबी रुंदी, कमी किंवा जास्त असली तर निरंतर दुःखांत पडतो.

यदि वा तिर्यङ्मानं नरस्य पद्मासनोपविष्टस्य ॥
जानुयुगबाह्यकक्षांतराश्रितं सोऽत्र परिणाहः ॥ २६४ ॥

आसनमांडी घालून बसलें असतां जें आडवें माप घेतात तें किंवा एका गुडघ्यापासून दुसऱ्या गुडघ्यापर्यंत किंवा एका कांखेपासून दुसऱ्या कांखेपर्यंत जें आडवें माप त्याला रुंदी किंवा परीणाह म्हणतात.

आसनतो भालांतं शरीरमध्ये तथोपविष्टस्य ॥
यन्मानं स्यादूर्ध्वं स चोच्छ्रयः कथ्यते सद्भिः ॥ २६५ ॥

मांडीघालून बसलें असतां बैठकीपासून भालप्रदेशापर्यंतच्या शरीराच्यामापाला " **उभें माप,** " किंवा उच्छ्रय असें नांव तज्ज्ञांनीं दिलें आहे.

यस्योच्छ्रयः समः स्यात्परिणाहोदितेन भाग्यवशात् ॥
नियतं जगति प्रायः स पुमान्पुरुषोत्तमो भवति ॥ २६६ ॥

ज्या पुरुषाचें उभें माप, आणि परिणाह हीं दोन्ही मापें समसमान असतात तो पुरुष उत्तम अर्थात् पुरुषोत्तम ह्या संज्ञेस पात्र असतो.

आपार्ष्णिज्येष्ठांतं तलमत्र चतुर्दशांगुलायामम् ॥
विस्तारेण षडंगुलमंगुष्ठो द्व्यंगुलायामः ॥ २६७ ॥

पायाच्या टांचेपासून तळव्याची लांबी १४ अंगुळें असावी. रुंदी ६ अंगुळें असावी, आणि आंगठयाची रुंदी २ अंगुळें असावी.

पंचांगुलपरिणाहः पादश्चाथो नखांगुलं दैर्घ्यात् ॥
सांगुष्ठसमज्येष्ठामध्याततृषोडशांशोना ॥ २६८ ॥

पायाच्या लांबीच्या मानानें पांची नखांची रुंदी ५ अंगुळें असते किंवा असावी. आंगठा आणि शेजारचें बोट हीं दोन्ही लांबीला सारखींच असावीं, आणि मधलें बोट त्यापेक्षां सोळावा हिस्सा कमी इतकें असावें.

अष्टांशोनाऽनामा कनिष्ठिका षष्ठभागपरिहीना ॥
सर्वासामप्यासां नखाः स्वपर्वत्रिभागमिता ॥ २६९ ॥

त्याच्या पलीकडील म्हणजे करंगळीशेजारचें बोट मधल्या बोटापेक्षां आठव्या हिश्यानें कमी, आणि करंगळी सहाव्या हिश्यानें कमी, असें असावें आणि नख त्याच्या पेराच्या तिसऱ्या हिश्याइतकें असावें. ( कोणी अर्ध्याइतकें असलें तरी चालेल असें म्हणतात पण तें बरोबर नाहीं.)

सव्यांगुलपरिणाहा प्रथमांगुलविस्तृतांगुलिर्भवति ।
अष्टाष्टभागहीनाः शेषाः क्रमशः परिज्ञेयाः ॥ २७० ॥

पहिलें बोट जितकें लांब असेल त्याच्यापेक्षां आठव्या हिश्यानें कमी पलीकडचे म्हणजे शेजारचें बोट असावें. ह्याप्रमाणें करंगळीपर्यंतचा क्रम आहे.

जंघांतः परिणाहो ध्रुवमष्टाधिकदशांगुलानि स्यात् ॥
विंशतिरेकोपगतो जानुर्द्वात्रिंशदूरुरपि ॥ २७१ ॥

पोटरीची रुंदी म्हणजे घेर १८ अंगुळांपेक्षां ज्यास्त असावा आणि गुडघ्याची रुंदी २१ अंगुळें असावी. मांडीची रुंदी ३२ अंगुळें असावी.

अष्टादशांगुलमिता विस्तारा जायते कटिः पुंसाम् ॥
नाभेरंतःपरिधिः षट्चत्वारिंशदंगुलकः ॥ २७२ ॥

कमरेची रुंदी १८ अंगुळें धरलेली आहे, परंतु बेंबीपासून जर कमरेचा घेर मोजला तर तो ४६ अंगुळेंसुद्धां कधीं कधीं भरतो.

पुंसां द्वादशकुचयोरभ्यंतरमंडलानि दैर्घ्येण ॥
उरसिजयुगोपरिष्ठात्षडंगुला भवति कक्षांतः ॥ २७३ ॥

पुरुषाच्या दोन्ही स्तनांच्या मधील अन्तर १२ अंगुळें असतें. आणि स्तनांच्यावरील बाजूस ६ अंगुळें उंचीवर काख असते.

विंशतिरुरःस्थलं स्याद्विस्तारादंगुलानि चतुरधिकः ।
पृष्ठया सह परिणाहे षडधिकपंचाशदंगुलकम् ॥ २७४ ॥

पुरुषाच्या छातीचें माप २४ अंगुळें असावें ( हें माप घेतांना चुकी होण्याचा संभव असतो. ) पाठीच्या रुंदीचें माप धरून एकंदर माप ५६ अंगुळांचें होतें.

पर्व प्रथमं बाहोरष्टादशचांगुलानि दैर्घ्येण ॥
षोडशपुनर्द्वितीयं सप्ततलं पंचमध्यमांगुलिका ॥ २७५ ॥

भुजदंडाचा एक भाग १६ अंगुळें आणि दुसरा १८ अंगुळें लांबीचा असतो. पंजाची लांबी मधल्या बोटापर्यंत सात अंगळें असते.

शतसमुदायेन भुजः षट्चत्वारिंशदंगुलानि स्यात् ॥
पंचांगुलविस्तारं पाणितलं शस्त-रेखांतम् ॥ २७६ ॥

शतकाच्या मापानें पाहतां भुजदंडाची लांबी ४६ अंगुळें असते. तळहाताची रुंदी आडव्या रेषांच्या टोंकापर्यंत ५ अंगुळें असते.

मध्यांगुलीविहीना प्रदेशिनी भवति पर्वणोऽर्धेन ॥
तत्सममानाऽनामा कनिष्ठिका पर्वपरिहीना ॥ २७७ ॥

बोटांचीं जीं पेरीं असतात त्यांचें माप घेऊन पाहतां मधल्या बोटां-पेक्षां तर्जनी अर्धे पेराइतकी कमी असते. तितकीच अनामिका असते. परंतु करंगळी मात्र एक पेरानें कमी भरते.

अंगुष्ठस्यायामोंऽगुलानि चत्वारि जायते पुंसाम् ॥
निजपर्वार्धपरिमिता भवंति सर्वेऽपि पाणिनखाः ॥ २७८ ॥

पुरुषाचा आंगठा ४ अंगुळें लांब असावा. आणि नखें पेऱ्याच्या अर्ध्या इतकीं असावीं, म्हणजे त्या बोटाचें नख त्याच्या पेराच्या अर्ध्या-इतकें असावें.

ग्रीवायाः परिणाहोंऽगुलानि चतुरधिकविंशतिः शस्तः ॥
नासापुटद्वयांतर्विस्तारा द्व्यंगुलं मानम् ॥ २७९ ॥

मानेचा घेर २४ अंगुलांचा असल्यास उत्तम. आणि नाकपुड्यांच्या ठिकाणची नाकाची रुंदी मोजली तर २ अंगुळें भरली पाहिजे.

आचुबुकपश्चिमं कचप्रांतं द्वात्रिंशदंगुलो मूर्धा ॥
कर्णद्वयस्य मध्ये पुनरष्टाधिकदशांगुलिकः ॥ २८० ॥

हनुवटीपासून मागील केसांच्या कोरेपर्यंत ३२ अंगुळांचा घेर असतो. आणि एका कानापासून दुसऱ्या कानापर्यंत अंतर १८ अंगुळांचें असतें.

विंशतिवर्षा नारी सपंचविंशः समो नरो योग्यः ॥
जीविततुर्यांशो वा मानोन्मानं प्रमाणानाम् ॥ २८१ ॥

स्त्री-पुरुष संयोगाच्या दृष्टीनें पंचवीस वर्षांच्या तरुणाला वीस वर्षांची स्त्री असावी हा उत्तम पक्ष. तरच त्यांचें जीवित यशस्वी होईल. ह्यांत

कमीजास्त होणें अपरिहार्य असेल तर मान, उन्मान, यांच्यांत जास्तींत जास्ती चतुर्थांशाचा फरक चालेल. ( वयोमानांत मात्र फार फरक नसावा. )

पुंसामिहपरिमाणं स्पष्टं शिष्टैः पुरा विनिर्दिष्टम् ॥
इह पुनरुपयोगात्तेषां दिङ्मात्रमिदं मयाऽप्युक्तम् ॥ २८२ ॥

पुरुषाच्या शरिराची उंची, रुंदी, घेर इत्यादिकांविषयीं •पूर्वींच्या विद्वानांनीं जे ग्रंथ लिहिले आहेत, त्यांचाच पुनः उपयोग करून जें कांहीं थोडें मला सांगतां आलें तें मीं येथें सांगितलें आहे.

## मिश्र लक्षणें

विभवसमृद्धिरपत्यं भोजनलाभः प्रभुत्वमव्याजम् ॥
वयसि कदाचित् प्रथमे भवति स्वल्पायुषां पुंसाम् ॥२८३॥

वैभव, धनधान्य, संतती, सुग्रास भोजन, उच्च प्रतीचा अधिकार ह्या गोष्टी ज्यांना पूर्ववयांतच आयत्या लाभलेल्या असतात, त्या पुढें बहुत करून टिकत नाहींत. कारण अशीं माणसें फार करून अल्पायु असतात.

टीप—ह्यांत ‘ अव्याजम् ’ शब्द महत्त्वाचा आहे. त्याचा अर्थ सर्व उपभोग “ आयते ” मिळणें असा आहे.

अंगानि धीः पटुत्वं शक्तिर्दशनाः शनैर्विशीर्यंते ॥
निखिलेंद्रियाणि येषां चिरायुषस्ते नरा ज्ञेयाः ॥ २८४ ॥

म्हणून ज्याचें शरीर, बुद्धि, चातुर्य, शक्ति, दांत इत्यादि महत्त्वाचीं अंगें एकदम दुर्बल होत नाहींत. ( प्रौढवयानंतर ) त्यांचा अशक्तपणा थोडाथोडा वाढतो, असे लोक दीर्घायु असतात.

शुभलक्षणमंगेभ्यः सौंदर्येणाधिकं मुखं यस्य ॥
स्वज्ञातिप्राधान्यं प्राप्नोति स धान्यधनवत्त्वम् ॥ २८५ ॥

शरिरावरील लक्षणें शुभ, तोंडावळा दिसण्यांत उत्तम, असा प्रकार असेल तर त्याला त्याच्या जातीमध्यें किंवा समाजामध्यें मोठा मान मिळेल, आणि धनधान्यादि विपुल मिळेल.

अतिकृष्णेष्वतिगौरेष्वतिपीतेष्वतिकृशेषु मनुजेषु ॥
अतिदीर्घेष्वतिलघुषु प्रायेण न विद्यते सत्यम् ॥ २८६ ॥

सर्वसाधारणपणें ज्यांना आपण वर्णानें **काळे** आहेत असें समजतों त्यांच्यामध्यें सुद्धां जो काळाच ठरेल, म्हणजे जो अतिशयच काळा असेल, किंवा कमालीचा गोरा असेल, किंवा अतिशयच लठ्ठंभारती असेल, किंवा जो अगदींच किडकिडीत मरतुकडा असेल, अथवा जो अतिशय उंच किंवा अतिशय ठेंगू असेल असे लोक बहुतकरून थापबाज असतात.

टीप—अतिसर्वत्र वर्जयेत् ह्या सिद्धाताचें हें व्यावहारिक उदाहरण आहे. अपवाद असावयाचेच, परंतु अशा लोकांशीं जपून वागावें हें उत्तम.

चपलः पुष्टस्तुंगः रूक्षः पुरुषो घनमांसलः शिरापिहितः ॥
स पुमान्वैतरणाख्यः समुद्रमपि शोषयत्यखिलम् ॥ २८७ ॥

जो धष्टपुष्ट परंतु चपळ, उंच परंतु धडधाकट, ज्याच्या शिरा वर उंच आलेल्या नाहींत असा जो पुरुष ( **मुख्य** शुभलक्षणांनीं युक्त ) असेल तेव्हां त्याला "**वैतरण**" वर्गातील मनुष्य समजावें. हा येवढा उद्योगी असतो कीं तो समुद्र देखील आटवून टाकील !

टीप—असे पुरुष अगदीं क्वचित् आढळतील.

यस्य शरीरंपुष्टिं गृह्णात्यन्नेन येन केनापि ॥
स नरो डुंडुदुबकाख्यः कलयति कल्याणवैराग्यम् ॥ २८८ ॥

ज्या मनुष्याला पाहिजे तें अन्न पचतें इतकेंच नव्हे तर त्याच्या तें आंगीहि लागतें आणि तो पुष्ट होतो, अशा मनुष्याला "डुंडुबक" म्हणावे. हा मनुष्य दुसऱ्याचें हित पाहणारा वैराग्यशाली असा असतो.

सत्वं रजस्तमश्चेमी नराणां त्रयो भवंति गुणाः ॥
क्वचिदेकः क्वचिदपि द्वौ त्रयः समाः क्वापि दृश्यंते ॥ २८९ ॥

सर्वांस माहीतच आहे कीं सत्त्व, रज, आणि तम हे तीन गुण आहेत. निवळ सात्त्विक, निवळ रजोगुणी, किंवा निवळ तमोगुणी अशी

व्यक्ति सांपडत नाहीं. पुष्कळांमध्यें तिन्ही गुणांचें मिश्रण असतें. त्यांत रजोगुण, तमोगुण हेच जास्त असतात. कांहींमध्यें दोहोंचें मिश्रण असतें. एकच गुण असणारा मनुष्य दुर्मिळ आणि तिन्ही गुणांचें साम्य ही स्थिति दुर्घट.

यः सत्वगुणोपेतः स दयालुः सत्यवाक् स्थिरः सरलः ॥
देवगुरुभक्तियुक्तो व्यसनेऽभ्युदये च कृतधैर्यः ॥ २९० ॥

दयाळूपणा, सत्यभाषण, स्थिर बुद्धि, प्रामाणिकपणा, देव, गुरु ह्यांच्या ठिकाणीं भक्ति, सुख दुःखामध्येंहि धैर्य कायम असणें. ह्या खुणा सत्त्वगुणाच्या आहेत.

काव्यकलासु प्रवणः स्वकलत्ररतिः सदा शूरः ॥
प्राणेन युतः सततं रजोधिकः कथ्यते स पुमान् ॥ २९१ ॥

काव्य, कला यांचा भोक्ता, स्वस्त्रीच्याच ठिकाणीं प्रेम, शौर्य, असे गुण जेथें विशेष असतील तेथें रजोगुणाचें महत्त्व समजावें.

तमोन्वितः स्यान्निद्रालुर्वंचकोऽलसः क्रोधी ।
एतैर्मिश्रैर्बहुशो भेदाश्चान्ये नृणां मिश्राः ॥ २९२ ॥

फार झोंपाळू, लुच्चा, आळशी, रागीट, अशा मनुष्याला तमोगुणी म्हणावें. वर लिहिल्याप्रमाणें पुष्कळ व्यक्तींमध्यें रजस्तमांचें जास्त, सत्त्व-गुणाचें कमी प्रमाणांत अशा रीतीनें तिन्ही गुणांचें मिश्रण असतें.

प्राणो रजोगुणः स्यात्प्राप्तोत्कर्षस्तमोगुणः कोपः ॥
पुंसां विशेषतः पुनराख्यास्यामोऽग्रतः सत्वम् ॥ २९३ ॥

मनुष्य उत्कर्षाला चढतो तो रजोगुणांच्या प्रभावामुळें, परंतु फार कोपिष्टपणा, फार आळस हा तमोगुण ठरलेलाच, अशींच माणसें पुष्कळ असतात. सत्वगुणाच्या खुणा पूर्वीं सांगितल्याच आहेत.

देहस्थितेषु सततमशुभेषु शुभेषु लक्षणेषु नृणाम् ॥
ज्ञात्वा तरतमभावं तत्फलमपि निर्दिशेत्प्राज्ञः ॥ २९४ ॥

मागें अनेकवार सांगितलें तेंच मनांत चांगले ठसण्यासाठीं सांगतात

कीं, सर्व शुभलक्षणें एकाच व्यक्तींत असावयाचीं नाहींत. किंवा कोणा एका व्यक्तिमध्यें सर्वच लक्षणें अशुभ असेंहि आढळणार नाहीं. म्हणून शुभाशुभ लक्षणांच्या प्रभावी किंवा मारक शक्तींचें तारतम्य ओळखून चतुर सामुद्रिकानें आपलें मत द्यावें.

टीपः—वास्तविक पहातां संपूर्ण अध्ययन, दीर्घकालीन अनुभव आणि तारतम्याचा निरंतर उपयोग हीच शास्त्राची गुरुकिल्ली आहे; अनुभव आणि तारतम्य ह्यांना जो पारखा तो " पढतमूर्ख " असे समजावें.

बुद्धियुतो यद्दीर्घो यत्क्षुद्रो जायते नरो मूर्खः ॥
पिंगः शुचिः सुशीलः काणाक्षो यदित दाश्चर्यम् ॥ २९५ ॥

अतिशय ठेंगणा असूनहि बुद्धिमान्, उंच असूनहि निर्बुद्ध, मूर्ख, मांजरासारख्या डोळ्यांचा असून देखील पवित्र आणि चकणा असून सुद्धां सदाचारी असा कोणी आढळेल तर आश्चर्याचीच गोष्ट.

टीपः—अर्थ हा कीं, अगदीं ठेंगू मनुष्य कमी बुद्धिमान्, उंच मनुष्य बुद्धिमान्, मांजऱ्या डोळ्यांचा दुष्ट आणि चकणा असणारा लफंगा हा सर्व साधारण नियम.

यद्दंतुरोऽपि मूर्खो रोमयुतो जायते यदाल्पायुः
यन्निष्ठुरः सदाढ्यस्तदद्भुतं जृंभते भुवने ॥ २९६ ॥

तसेंच उत्तम दांतांचा असूनहि मूर्ख, छातीवर केंस असून अल्पायुत्व, तेजस्वी मनुष्य निर्दय असें आढळावयाचें नाहीं. क्वचित् आढळलेंच तर ते अद्भुतच.

नच दुर्भगः सुनेत्रः सुग्रीवो भारवाहको न स्यात् ॥
रुक्षो नास्ति सुभोजीपरुषत्वङ्नास्ति सुखसहितः ॥ २९७ ॥

ज्याचे डोळे पाणीदार अथवा सतेज त्याच्या वाट्यास कधीं दुर्भाग्य यावयाचें नाहीं. ज्याची मान प्रमाणशीर त्याच्या नशिबांत हमाली करण्याचें काम येणें शक्य नाहीं. पण ज्याचें आंग कोरडें, रुक्ष त्याला

सुखानें अन्न मिळणार नाहीं. ज्याचें आंग खरबरीत त्याला सुख लागावयाचें नाहीं.

पृथुपाणिः पृथुपादः पृथुकर्णः पृथुशिराः पृथुस्कंधः ॥
पृथुवक्षाः पृथुजठरः पृथुमालः पूजितः पुरुषः ॥ २९८ ॥

ज्याचें बाहू दीर्घ आणि पुष्ट, पायहि तसेच पुष्ट आणि लांब लचक, कान रुंद ( उंदरासारखे किरकोळ नव्हेत ) मस्तकहि प्रशस्त, खांदे रुंद, छाती विशाल, पोट लांबट, कपाळ विस्तीर्ण असेल तो पुरुष लोकवंद्य होतो.

रक्ताक्षं भजति श्रीः प्रलंबबाहुं भजेदधीशत्वम् ॥
पीनांगं भजति कृषिर्मांसोपचितं च भजति सौभाग्यम् ॥२९९॥

ज्याच्या नेत्रांच्या कोरा आरक्त त्याच्या घरीं लक्ष्मी पाणी भरते. ज्याचे बाहू दीर्घ आणि पुष्ट तो सर्व सत्ताधारी असतो. धष्टपुष्ट मनुष्याचे येथें धान्य विपुल आणि पिळदार शरीराचा मनुष्य भाग्यशाली होतो.

सुश्लिष्टसंधिबंधो यः कश्चिन्मांसलो मृदुः स्निग्धः ॥
अतिसौष्टवः प्रकृत्या स सुखाढ्यो जायते प्रायः ॥ ३०० ॥

ज्याचे सर्वसांधे बळकट असतात, पुष्ट आहेत, रखरखीत नसून कातडी चिवट आहे, शरीर बांधेसुद व निरोगी आहे असा सहसा दरिद्री असावयाचा नाहीं.

टीपः—शरीर उत्तम तर मन उत्तम, आणि मन उत्तम तर संपत्तीला वाण नाहीं अशा प्रकारची ही विचारसरणी आहे. पण याला अपवाद हे असावयाचेच.

स्निग्धांस्तिलको मशकश्चिन्हं वा भवति किमपि चान्यद्यत् ॥
पुंसां दक्षिणभागे तच्छुभमित्याह भोजनृपः ॥ ३०१ ॥

अंगावर कुरूप न दिसणारी अशी खुण, म्हणजे तीळ, पिटक इत्यादि असेल तर ती पुरुषाच्या उजव्या भागांत असावी असें लक्षणशास्त्रज्ञ भोजराज म्हणतात.

नखदंतकेशरोमत्वग्जिव्हालोचनेषुवदनेषु ॥
नास्ति स्नेहो येषामकारणं सत्वमिह तेषाम् ॥ ३०२ ॥

ज्यांचीं नखें, दांत, केंस आंगावरील लव, कातडी, जीभ, डोळे आणि एकंदर चेहरा ह्यांच्यामध्यें स्निग्धता नसेल तर त्याच्या अंगांत सात्त्विक गुण असले तरी पुष्कळवेळा ते निरुपयोगी होतात.

टीपः—स्निग्धता हा गुण असावा असें सांगतात तेव्हां स्निग्धपणा म्हणजे, आर्द्रपणा, तुकतुकीतपणा ही त्यांत प्रामुख्यानें असतात.

इहं भवति सप्तरक्तः षडुन्नतः पंचसूक्ष्मदीर्घो यः ॥
त्रिविपुललघुगंभीरो द्वात्रिंशल्लक्षणः स पुमान् ॥ ३०३ ॥

शरीरांतील सात अवयव लाल असावे, सहा उचलून वर आलेले असे असावे. पांच बारीक आणि पांच लांबलचक असावे, तीन रुंद, भरदार, आणि तीन आखूड आणि तीन गंभीर असावें, हें सर्व एकत्र असणें हे जवळ जवळ असंभवनीय पण असलेच तर त्या पुरुषाला बत्तीस लक्षणी पुरुष म्हणावें.

नखचरणपाणिरसनादशनच्छदतालुलोचनांतेषु ॥
स्याधो रक्तः सप्तसु सप्तांगं स च लभते लक्ष्मीम् ॥ ३०४ ॥

नखें, पायाचा तळवा, तळहात, जीभ, हिरड्या, आंतील टाळा, डोळ्यांचे कोपरे हे सात लाल असावे. तो भाग्यवान् असतो.

षट्कं कक्षा वक्षः कृकाटिका नासिकाक्षवदनानि ॥
यस्येदमुन्नतं स्यादुन्नतयस्तस्य जायंते ॥ ३०५ ॥

कुशी, छाती, मानेच्या पाठीमागील भाग, नाक, डोळे आणि जिवणी हे सहा अवयव उन्नत ( म्हणजे उंचावलेले असे ) असतील त्याची उन्नतीच होणार.

जिवणी उंच ह्याचा अर्थ हनुवटीपेक्षां थोडी पुढें असलेली.

दंतत्त्वक्केशानखपर्वशिरः श्वेतिपंचसूक्ष्माणि ॥
धनलक्षणैरुपेतानि भवंति वै प्रायशः पुंसाम् ॥ ३०६ ॥

दांत, कातडी, केंस, नखें, पेरावरील शिरा हे भाग लहानसर किंवा बारीक असावे. हीं लक्षणें पुरुषांमध्यें भाग्यशालित्व सुचवितात.

नयनकुचांतरनासा हनुभुजामिति यस्य पंचक दीर्घम् ॥
दीर्घायुर्वित्तपरः पराक्रमी जायते स नरः ॥ ३०७ ॥

डोळे, दोन स्तनामधील अन्तर, नाक, हनुवटी, बाहू हीं पांच लांबट असावीं. असा मनुष्य दीर्घायु, धनाढ्य आणि पराक्रमी असतो.

भालमुरोवदनाभिति त्रितयं भूमीश्वरस्य विपुलं स्यात् ॥
ग्रीवाजंघाप्रजनं इतित्रयं भूमिनाथस्यं ॥ ३०८ ॥

कपाळ, छाती, चेहरा हे तीन विस्तृत असावे. असें लक्षण पुष्कळ जमिनीच्या मालकाच्या ठिकाणीं असतें. मान, पोटऱ्या, पुरुषावयव हेहि तीन यथाशास्त्र म्हणजे मान उगीच उंच नसावी, पोटऱ्या सळसळीत नसाव्या, त्याचप्रमाणें इतर हीं लक्षणें भूमिपतिच्या ठिकाणीं असतात.

यस्य स्वरोऽथनाभिः सत्वमिदं च त्रयं गभीरं स्यात् ।
सप्ताम्बुधिकाञ्चीयं भूमिः करदा सदा तस्य ॥ ३०९ ॥

ज्याचा आवाज गंभीर, नाभि गंभीर ( खोलगट ) आणि रुबाब गंभीर असतो त्याच्या सत्तेखालीं भूमिभाग यावयाचाच अशी स्थिती असते.

अन्नं क्षुधि पानं तृषि पथिश्रमे वाहनं भये रक्षा ।
इति भवति यस्य समये धन्यं प्रवदन्ति तं प्राज्ञाः ॥३१०॥

ज्या पुरुषाला भुकेच्यावेळीं ( रुचकर ) अन्न तात्काळ मिळतें, तसेंच तृषा लागली असतां ( व्याकुळ होईपर्यंत वेळ न लागता उत्तम थंडगार पाणी मिळते, चालतांना थकण्याच्या बेतांत येतो तोंच वाहनाची सोय होते. भीतिच्या, धोक्याच्या वेळीं संरक्षणाचें साधन जवळ असतें. अशा अवश्य गोष्टी प्रसंग पडतांच ज्याच्या हाताशीं असतात असाच पुरुष "धन्य" होय असे बुद्धिमन्तांना मान्य झालें आहे.

खालील श्लोकांचा प्रस्तुत शास्त्राशीं संबन्ध बराच दूरचा आहे. म्हणून सर्व श्लोकांचें भाषांतर दिलें नाहीं.

स्मरशास्त्रविनिर्दिष्टाः शशो वृषा हय इति त्रयो भेदाः ।।
जायंते मनुजानां क्रमेण तल्लक्ष्म सुस्पष्टम् ।। ३११ ।।

कामशास्त्रा प्रमाणें स्त्री-पुरुषांचे वर्ग तीन प्रकारचे आहेत. पुरुषांमध्यें शश, वृष आणि हय हे तीन भेद आहेत त्यांचीं लक्षणें स्पष्टच आहेत.

लिंगं षडंगुलं वै अष्टौ वा शशः स पुमान् ।।
नव दश चैकादश वा तदपि पुनर्यस्य स वृषाख्यः ।।३१२।।
द्वादश यल्लिंगं स्यात् त्रयोदशादीनि चांगुलानि स्युः ।।
जातोद्वेस्यमानं हयाख्यमान्निगदितः सोऽपि ।। ३१३ ।।
रतिषु शशवृषहयानां सहमृग्यादीनिति क्रमे प्रीतिः ।।
मेहनवरांगनाडयोः परस्परेण प्रमाणैक्यात् ।। ३१४ ।।
इति श्रीमहत्तमनृसिंहात्मजदुर्लभराजविराचिते
सामुद्रतिलके नरलक्षणशास्त्रे शारीरकाध्यायो द्वितीयः ।।

# अंगप्रत्यंग विचारः

## आतां भोंवरे वगैरे संबंधीं शुभाशुभ.

अंगप्रत्यंगयुतं सकलं शारीरमिदामिति प्रोक्तम् ।।
आवर्तप्रभृतीनामनुक्रमाल्लक्षणं ब्रूमः ।। ३१५ ।।

आतांपर्यंत शरीराचे मोठमोठे अवयव, तसेच लहान सहान अवयव यांचा अकार, वर्ण, मापन, इत्यादिकांसंबंधानें जीं शुभाशुभ लक्षणें शास्त्रकारांनीं वर्णिलीं आहेत, त्या विषयीं चर्चा केली. आतां आंगावरील कातडींत, किंवा केशरचनेमध्यें एक आंगचीच भोंवऱ्या-प्रमाणें आकृति उत्पन्न झालेली दिसते. तिच्यावरून कळणारें शुभा-शुभ सांगतात.

रोमत्वग्बालभवः स्यादावर्तः सदा शुभस्त्रेधा ।।
शस्तो दक्षिणवलितः स्निग्धो व्यक्तः परो न शुभः ।।३१६।।

केंस, लव, अथवा क्वचित् चामडें ह्यांच्यामध्यें भोंवऱ्यासारखी आकृति उत्पन्न होते. त्याविषयींचें शुभप्रकार तीन आहेत. भोंवरा उजवीकडे चक्राकार वळलेला असावा, तो स्निग्ध, आणि स्पष्ट म्हणजे शुभ; ह्याच्या उलट म्हणजे डावीकडे वळलेला, रूक्ष, किंवा अस्पष्ट, असा भोंवरा अशुभ समजावा.

करतलपदश्रुतियुग्मे नाभौ वा त्वग्भवो नृणां वा स्यात् ॥
अपरौ द्वावपि लक्षणविद्भिर्ज्ञेयौ यथास्थानम् ॥ ३१७ ॥

दोन्ही हात, पावलें, कान, बेंबी, ह्यांपैकीं कोणत्याहि ठिकाणीं पुरुषांच्या आंगावर जर भोंवरा ( उजवा, स्निग्ध, स्पष्ट असा ) असेल तर उत्तमच. तसा नसेल, त्यांत कांहीं उणेपणा असेल तर त्याप्रमाणें शुभाशुभ कमीजास्त समजावें.

सव्यापसव्यभागे शिरसि स्याद्यस्य दक्षिणावर्तः ॥
श्वेतातपत्रलक्ष्म्या लक्ष्मीः करवर्तिनी तस्य ॥ ३१८ ॥

मस्तकाच्या उजव्या भागांत किंवा डाव्या भागांत जर उजवे चक्राचा भोंवरा असेल तर ( श्वेतातपत्रलक्ष्मी ) म्हणजे साम्राज्य लक्ष्मी त्याच्या अगदीं मुठींत आली आहे, असें समजावें.

रोमावर्तस्निग्धो भ्रूयुगमध्ये प्रदक्षिणो व्यक्तः ॥
यस्यार्णाख्यः पूर्णः सोऽम्बुधिकांचेर्भुवो भर्ता ॥ ३१९ ॥

जर कोणाच्या दोन्ही भिवयांच्या मध्यें उजवा भोंवरा असून तो स्निग्ध आणि स्पष्ट असेल तर त्या संपूर्ण भोंवऱ्याला " ऊर्णाख्य " असें नांव आहे. असा पुरुष समुद्रवलयांकित पृथ्वीचा अधिपति होतो.

भुजयुग्मे यस्य स्यादावर्तद्वितयमंगदप्रतिमम् ॥
सोऽखिनभूमिं शूरः पुरुषो निजबाहुना वहति ॥ ३२० ॥

ज्याच्या दोन्ही भुजदण्डांच्या ठिकाणीं अशा स्वरूपाच्या भोंवरा किंवा चामडीचीच अशी खूण दिसते कीं, तो एक त्यांच्या दंडावर अलंकारच बान्धला आहे कीं काय असें वाटतें. असा पुरुष आपल्या

बाहुबलानें संपूर्ण पृथ्वीला उचलून धरून आपल्या इच्छेप्रमाणें वागवितो.

यस्य करांभोजयुगे दक्षिणवलिते भवेदतिव्यक्तः ॥
परिचितशौचाचारो धर्मपरः स्यात्स वित्ताढयः ॥ ३२१ ॥

ज्याच्या दोन्ही हातांवर उजव्या चक्राचा भोंवरा अगदीं स्पष्ट दिसत असेल, तर त्याचें आचरण फारच शुद्ध, पवित्र असें जगजाहीर असतें. तो धर्मपरायण तर असतोच पण धनाढ्यहि असतो.

भाग्यवतां पंचांगुलिशिरःसु सौख्याय दक्षिणावर्तः ॥
प्रायः पुंसां वामावर्ता दुःखाय पुनरेते ॥ ३२२ ॥

जे कोणी भाग्यवान् असतात, त्यांच्या हाताच्या बोटांवर किंवा मस्तकावर उजव्या वळणाचा भोंवरा जर स्पष्ट असला, तर अशा पुरुषाला सुखप्राप्ति होते; पण तो भोंवरा जर डाव्या वळणाचा असेल किंवा रूक्षहि असेल तर दुःखेंच पाठीस लागतात, आणि परिणाम दुःखमय असतो.

श्रुतियुगनाभ्यावर्ताः प्रदक्षिणाः श्रेयसे भवंति नृणाम् ॥
चूडावर्तोऽप्येकः श्रेष्ठतरो दक्षिणः शिरसि ॥ ३२३ ॥

दोन्ही कान किंवा बेंबी ह्यांच्यापैकीं कोठेंहि जर उजव्या चक्राचा भोंवरा असेल तर तो त्या पुरुषांना शुभ समजावा, त्याचा परिणाम सौख्यवृद्धि. त्याचप्रमाणें डोक्यावर जेथें शेंडी राखतात, त्या ठिकाणीं केंसाचा भोंवरा असतोच त्याला चूडावर्त म्हणतात. तो वळणानें उजवा असेल तर फारच शुभ.

शीर्षे वामे भागे वामावर्तो भवेत्स्फुटो यस्य ॥
स क्षुत्क्षामो भिक्षां रुक्षां निर्लक्षणो लभते ॥ ३२४ ॥

तसेंच डोक्यामध्यें डाव्या वळणाचा भोंवरा आणि तोहि डोक्याच्या डाव्या अंगास स्पष्टपणें असेल तर काय विचारावें ? हा मनुष्य कुलक्षणी निपजतो. ठिकठिकाणीं भटक्या मारतो, पण पोटाला

मिळत नाहीं, त्यामुळें उपासमारानें थकून जातो. याप्रमाणें त्याचे हाल होतात.

वामो दक्षिणपार्श्वे प्रदक्षिणो वामपार्श्वके यस्य ।।
ननु तस्य चरमकाले भोगो नास्त्यत्र संदेहः ।। ३२५ ।।

बरें, डाव्या वळणाचा भोंवरा उजव्या आंगाकडे म्हणजे उजव्या बाजूकडे असला किंवा उजव्या वळणाचा भोंवरा डाव्या बाजूकडे असला तरी काय ? दगडापेक्षां वीट मऊ इतकेंच. थोडेंबहुत सुख मिळतें पण तें उतार वयांत मिळतें, पण उपयोग काय ?

टीपः—ह्या श्लोकांत उलट सुलट अर्थाचे पाठभेद आहेत.

अंतर्ललाटपट्टे व्यक्तावर्तो ललामवद्यस्य ।।
वामोऽथ दक्षिणो वा सोऽ ल्पायुर्दुःखितो वा स्यात् ।।३२६।।

ज्याच्या भालप्रदेशावर एकादा भोंवरा स्पष्ट दिसणारा असतो; तो त्याच्या कपाळावर अलंकाराप्रमाणें बाह्यात्कारी दिसतो, पण तो भोंवरा डाव्या वळणाचा असो किंवा उजव्या वळणाचा असो; तो मनुष्य दुःखीच राहतो. किंवा अल्पायुषीहि होतो.

यस्यावर्तद्वितयं सुव्यक्तं भवति पादतलमध्ये ।।
नक्तंदिनमतिदीनो भूमिं स भ्रमति मतिहीनः ।। ३२७ ।।

ज्याच्या प्रत्येक पायाच्या तळव्यावर किंवा एकाद्या पायाच्या तळव्यावरहि चामडीचे भोंवरे स्पष्ट दिसणारे असे असतील, त्याची दुरावस्था तर विचारूंच नये. बिकट परिस्थितीमुळें तो अत्यंत दीन होतो; आणि शेवटीं कांहींच सुचेनासें झाल्यानें सर्वत्र उगीचच भटकत फिरतो.

## चालण्याची ढब कशी असावी

सुखसंचारितपादमयूरशार्दूलसिंहगतितुल्या ।।
दीर्घक्रमा सुलीला भोगवतां स्याद्गतिः सुभगा ।। ३२८ ।।

ज्याच्या पायांची रचना उत्तम असून, चालण्याची ऐट मोर, वाघ, सिंह ह्यांच्या चालीप्रमाणें धिमेपणाची असते, पावलें उगीच लगबगीची पडत नाहींत, सहजगत्या पडतात. पावलांच्या झापेंत अंतरहि चांगलें असतें, ते पुरुष भाग्यशाली समजावे, त्यांना भोग प्राप्त होतात.

गतिभिर्भवंति तुल्या या समदद्विरदनकुलहंसानाम् ॥
वृषभस्यापि नरास्ते सततं धर्मार्थकामपराः ॥ ३२९ ॥

ज्यांची चाल, मदोन्मत्त हत्ती, क्रौंचपक्षी किंवा हंसाप्रमाणें झोंकांत असते, निदान मोठ्या धष्टपुष्ट वृषभाप्रमाणें तरी असते, ते पुरुष धार्मिक कामांत गर्क राहतात किंवा व्यवहारांत तरी उत्तम दक्षता दाखवितात; परंतु--

गोमायुकरभरासभशशककृकलासैर्नकुलभेकमृगैः ॥
येषां गतिः समाना ते गतसुखराजसन्मानाः ॥ ३३० ॥

ज्यांच्या पावलांची चाल, कोल्हा, उंट, गर्दभ, मुंगूस, सरडा, ससा, बेडूक किंवा हरिणाप्रमाणें दोषयुक्त असते, ते दुर्दैवी; त्यांना सुख, सन्मान किंवा पदाधिकार प्राप्त होत नाहींत.

विषमा विकटा मंदा लघुक्रमा चंचला द्रुता स्तब्धा ॥
आभ्यंतराऽथ बाह्या लम्रयदा वा गतिर्न शुभा ॥ ३३१ ॥

वर ज्या प्राण्यांचा चालण्याचा तऱ्हा अशुभ दर्शविते म्हणून सांगितलें, त्याचें कारण ती चाल, विषम (म्हणजे एकदां तुरतुर पुनः थंड अशी) किंवा उंटाप्रमाणें टांगा टाकणारी अथवा मंद, तुरतुर, चंचळ, झपाट्यानें उड्या मारीत चालणारी, मध्येंच थांबणारी भित्रेपणा दर्शविणारी म्हणजे पायांत पाय घोंटाळणारी अशी असते ती चाल शुभ नव्हे.

धनिनां गमनं स्तिमितं समाहितं शब्दहीनमस्तब्धम् ॥
ऱ्हस्वप्लुतानुविद्धं विलंबितं स्याद्दरिद्राणाम् ॥ ३३२ ॥

ज्यांना द्रव्य नेहमीं सहज प्राप्त होतें त्यांची चाल जर बारकाईनें पाहिली तर ती ( स्तिमित म्हणजे ) धिमेपणाची, व्यवस्थित ( समाहित ), चालतांना फर्र फर्र असा आवाज न होणारी, आणि उगीच न घुटमळणारी अशी असल्याचें दिसेल. परंतु मूर्ख दुर्दैवी लोकांची चाल, तरतर किंवा धांपा टाकीत जाणारी. रेंगळणारी किंवा रस्त्याच्या एकदां ह्या बाजूकडे, एकदां त्या बाजूकडे निष्कारण वळणारी अशी असते.

## छाया ( तजेला )

छादयति नरस्यांगे लक्षणमन्यत्ततो भवेच्छाया ॥
सा पार्थिवी तथाप्या ज्वलनभवा वायवी व्योमी ॥ ३३३ ॥

मनुष्याच्या बाह्यांगावर थोडीबहुत तजेल्याची झांक असते, तिला छाया म्हणतात. कारण हें कीं तिच्यामुळें मनुष्याचें आंग झांकलें जातें आणि त्या योगानें तो मनुष्य थोडा निराळा दिसूं शकतो. ही छाया ( झांक ) पार्थिव, जलस्वभावी, तैजस, वायुसदृश आणि आकाशगुण अशी पांच प्रकारची असते.

टीपः—छाया पाहणें हें अवघड आहे. लक्षांत ठेवावें इतकेंच.

भवति शुभाशुभफलदा निजतेजस्तन्वती बहिर्देहान् ॥
विमलस्फटिकघटांतर्विलसति सा दीपकलिकेव ॥ ३३४ ॥

ह्या छायेचेंहि शुभाशुभ फल आहेच. कारण तिचें तेज आंत असलें तरी तें शरिराच्या बाहेर कोणत्या तरी भागावर दिसत असतें. कसें म्हणाल तर स्वच्छ शुभ्र कांचेच्या आंत दिवा असतो पण त्याच्यामुळें कांच बाहेरूनहि प्रकाशपूर्ण दिसते.

टीपः—हल्लीं विजेचे ग्लोब शेड असलेले असतात, त्यांना ही उपमा बरोबर शोभते.

स्निग्धद्विजनखलोमत्वक्केशा पार्थिवी स्थिरा छाया ॥
नयनहृदयाभिरामा दत्ते धनधर्मसुखभोगान् ॥ ३३५ ॥

पार्थिव छायाः——दातांचा स्वच्छपणा, तसाच नखांचा, त्वचेचा, केंसाचा आणि कातडीचा तजेला ही पृथ्वी तत्वाची छाया; ती दिसण्यांत-आकर्षक, आणि धन, धर्म ह्यांच्या सुखाचा लाभ देणारी अशी असते.

आप्याभिनवांभोदप्रसन्नजलसंनिभा शुभा छाया ॥
सर्वार्थसिद्धिजननी जनयति सौभाग्यमिह पुंसाम् ॥ ३३६ ॥

आप्य म्हणजे जलस्वभावी जी छाया तिच्यामध्यें आंगाचा तजेला नवीनच ढगांतून वर्षाव होणाऱ्या उदकाप्रमाणें स्वच्छ आणि निर्मळ असतो, अशा छायेच्या मनुष्याचे सर्व हेतू तडीस जातात. आणि मग अर्थात्च त्याला भाग्य लाभतें.

ज्वलनभवा बालार्कप्रवालकनकाग्निपद्मरागनिभा ॥
पौरुषपराक्रमौ जयमर्थं वा तनुभृतां तनुते ॥ ३३७ ॥

अग्निस्वभावी छायेच्या तजेल्याचा वर्ण प्रातःसूर्य, तप्त सुवर्ण, प्रवाळ, माणिक, अग्नि ह्यांच्याप्रमाणें असतो. ह्या पुरुषाच्या ठिकाणीं पौरुष, पराक्रम, जयेच्छा, कार्यसिद्धीची धमक हे गुण वास करितात.

रूक्षा मलिना दीना चला खला मारुती भवेच्छाया ॥
वधबंधबंधनपरा वित्तविनाशं नृणां कुरुते ॥ ३३८ ॥

वायुस्वभावी छायेच्या मनुष्याचें आंग रूक्ष, मळकट, दीन असून चंचलपणा आणि खाष्टपणा ह्यांनीं युक्त असतें, त्याचा परिणाम असा होतो कीं मनुष्य कैदेंत पडून प्रसंगीं प्राणासहि मुकतो, मग त्यांत द्रव्यनाशहि होतो हें सांगणें नको.

स्वच्छा स्फटिकमणिनिभा प्रोद्दामा देहिनामिह व्योमी ॥
प्रायः श्रेयोनिधिसुखधनसुतसौभाग्यदा पुंसाम् ॥ ३३९ ॥

आकाशसदृश छाया हिचे गुणः स्फटिकाप्रमाणें निर्मलता, आणि

आंगांतील जोम प्रदर्शित करण्याची शक्ति हे असतात. परिणाम असा कीं असा मनुष्य प्रायः उत्तम भाग्यपदीं चढतो, किमान पक्षी त्याला द्रव्य, संतति, सुख इत्यादि भाग्य तर लाभतेंच.

अर्काच्युतेंद्रयमशशिसमुद्भवा लक्षणेर्फलैरन्या ॥
पंच पुनस्ताः प्रवदंत्यपरे मम संमतं नैतत् ॥ ३४० ॥

कांहीं लोक पृथिवी, आप, अशीं नांवें छायेला न देतां रवि, विष्णु, इन्द्र, यम, चन्द्रमा अशीं निराळींच नांवें देतात आणि त्यांचीं फळें देखील दुसरींच लिहितात; परंतु तीं फलें आणि त्यांचीं कारणें हीं दोन्हीं समुद्राचार्यांच्या मतानें बरोबर नाहींत.

## आतां आवाजाविषयीं

स्निग्धस्वरोऽनुमोदी निर्ऱ्हादी मांडितः कलो मंदः ॥
तारस्वरश्च विपुलः पुंसां संपत्करः सततम् ॥ ३४१ ॥

आवाजाचे ( स्वराचे ) पुष्कळ प्रकार आहेत, पण त्यांत स्नेहाळू 'ठीक आहे' अशा धर्तीचा, दणदणीत न थांबणारा, मनोहर, संथ, खणखणीत आणि न बसणारा असे जे प्रकार आहेत ते शुभ होत.

दुंदुभिवृषभांबुदगजमृदंगशिखिशंखरथरथांगैः स्यात ॥
यस्य स्वरः समानः स भूपतिर्भवति भोगांढ्यः ॥ ३४२ ॥

नगारा, बैलाची डुरकणी, मेघनाद, हत्तीचा हुंकार मृदंग, मोर, शंख, रथचक्रें असे आवाज आहेत, यांपैकीं ज्या योग्य वस्तूच्या आवाजाशीं एखाद्याचा आवाज मिळता असेल तो भाग्यवान् असा मनुष्य भूमिपति होईल.

भिन्नः क्षीणः क्षामो विकृष्टो गद्गदः स्वरो दीनः ॥
रूक्षो जर्जरितो वा निःस्वानां निस्वनप्रायः ॥ ३४३ ॥

परंतु फुटलेला, थकलेला, गळाठलेला, ओढून निघणारा, रडका, लाचारीचा, कर्कश, जीर्ण, शेळपट अशा तऱ्हेचा आवाज दरिद्रि अभागी यांचा असतो.

वृकबककाकोलूकप्लवगोष्ट्रक्रोष्ट्रासभवराहैः ॥
तुल्यस्वरो न शस्तो विशेषतो हि स्वरो दुष्टः ॥ ३४४ ॥

लांडगा, बगळा, कावळा, घुबड, माकड, उंट, कोल्हा, गर्दभ, डुक्कर यांच्या सारखा जो आवाज तो दुष्ट वृत्तीचा निदर्शक असतो. हे आवाज चांगले नव्हत.

## शरिराचा वास

गंधो वपुषि नराणां प्रजायते नासिकेंद्रियग्राह्यः ॥
श्वासः स्वेदाभिभवो ज्ञेयः स शुभो द्विविधः ॥ ३४५ ॥

प्रत्येक मनुष्याच्या आंगाला वास हा असतो. ( त्यांत कांहीं थोड्या लोकांच्या आंगाचा वास कळून येत नाहीं. बाकी इतरांच्या आंगाला दर्प येतोंच. ) हा दर्प कातडींतून निघणारा घाम, श्वास, आणि तोंण्डांतील भपकारा यांचा असतो. अर्थात् हा नाकाला कळूं शकतो, ह्यांतहि शुभाशुभ आहेच.

कर्पूरागरु–मलयजमृगमदजाती–तमालदलगंधाः ॥
द्विपमदभूमिजगंधाः पुरुषस्यास्ति भोगिनः प्रायः ॥ ३४६ ॥

ह्यांत शुभाशुभाची कांहींच अडचण नाहीं. कापूर, अगरु, चंदन, कस्तुरी, पुष्पें, मद, मृत्तिका अशा सारखा सुगंध शुभ, स्वाभाविक-पणेंच ज्यांच्या शरीराला घाण येत नाहीं, त्यांची उर्जित दशा असणारच.

मत्स्यांडपूतिशोणितनिंबवसाकाकनीडबकगंधाः ॥
दुर्गंधांश्च नरास्ते दुर्भगता–निःस्वताभाजः ॥ ३४७ ॥

मासे, अण्डीं, घाण, रक्त, कडवटतेल, चरबी, कावळे, बगळे, यांच्या घरट्यांतील घाण याप्रमाणें ज्यांच्या आंगाला दुर्गन्ध येतो ते दरिद्री, अभागी हें सांगणें नकोच. [ हा दुर्गन्ध. ज्यांचे दांत अस्वच्छ, किडके आणि खाणें गलिच्छ त्यांच्या आंगाला विशेषच असतो. ]

## वर्ण

गौरः श्यामः कृष्णोवर्णः संभवति देहिनां त्रेधा ॥
आद्यौ द्वावपि शस्तौ शुभो न कृष्णो न संकीर्णः ॥ ३४८ ॥

तसेंच प्रत्येक मनुष्याच्या आंगाचा कोणतातरी स्वाभाविक वर्ण असतो. [ कोणी अगदीं कुळकुळीत काळे, कोणी चाकोलेटी, तपकिरी काळे, कोणी काळसर, कोणी निमगोरे, कोणी गोरे ह्याप्रमाणें वर्ण असतात. युरोपियन लोक अगदीं गोरे आणि सिद्दी अगदीं कुळकुळीत काळे, महाराष्ट्रीय शेतकरी मराठे हे चाकोलेटी काळे; उच्चवर्णीय मराठे आणि ब्राह्मण हे काळसर, निमगोरे किंवा गोरे असतात. ]

कातडीचा रंग गौर काळसर आणि अगदीं काळा ह्याप्रमाणें तीन प्रकारचा आहे; त्यांत पहिले दोन शुभ आणि तिसरा कुळकुळीत काळा हा शुभ नव्हे, किंवा संकीर्ण म्हणजे कांहीं भाग काळा कांहीं उजळ अशी स्थितीहि चांगली नाहीं.

पंकजकिंजल्कनिभो गौरः श्यामः प्रियंगुकुसुमसमः ॥
कृष्णस्तु कज्जलाभः स्निग्धः शुद्धोऽपि नो शस्तः ॥ ३४९ ॥

चुन्यासारखा किंवा कोडासारखा पांढरा रंग हें गोरेपण नव्हे. केतकी, किंवा पांढऱ्या कमळांतील केसराप्रमाणें जो रंग तो आपल्या इकडे गोरा समजतात. त्याचप्रमाणें प्रियंगुच्या फुलाप्रमाणें काळसर, निमगोरा हेहि वर्ण शुभ आहेत. परंतु काजळ, कोळसा ह्यांच्याप्रमाणें कातडीचा वर्ण शुभ नव्हे. कुळकुळीत काळा रंग स्निग्ध असला किंवा त्यांत रोगटपणा नसला तरी ठीक नव्हे.

ह्या अध्यायाचा भाग म्हणून इतर कांहीं ग्रन्थामध्यें थोडे निराळे श्लोक आढळले आहेत ते येथे देतों.

## भुंग्याप्रमाणें दिसणारी खूण

नराणां चैव नारीणां वपुषि भ्रमराकृतिः ।
उभयोरपि फलं तुल्यं वक्ष्ये शास्त्रानुसारतः ॥ ३५० ॥

केव्हां केव्हां स्त्रीपुरुषांच्या शरीरावर भुंग्याप्रमाणें दिसणारी अशी खूण उमटते. तिचें फल कांहीं ग्रन्थांत आहे, जें फल पुरुषांसंबंधानें तेंच स्त्रीसंबंधानेंहि समजावें.

मूर्ध्नि भृंगाद् भवेद्राजा ललाटे सुखमाप्नुयात् ।
भ्रूस्थिते दिशति क्लेशान् कर्णे हानिः प्रजायते ॥ ३५१ ॥

भृंग ही खूण मस्तकावर असेल तर राज्यपद; कपाळावर असेल तर सौख्यप्राप्ति; भिवईमध्यें असेल तर क्लेश, आणि कानाच्या ठिकाणीं असेल तर नुकसान पोहचेल.

हनुप्रदेशे बहु मिष्टभोज्यं स्कन्धप्रदेशेऽपि तथोत्तरं च ।
उरःस्थिते प्राप्तफलप्रकर्षः हस्तेऽथ पृष्ठे शुभमावहेद्वै ॥३५२॥

हनुवटीवर भ्रमरचिन्ह असेल तर मिष्टान्नाचा यथेच्छ लाभ; खांद्यावर असेल तरीहि तसाच लाभ होईल; छातीवर चिन्ह दिसेल असेल त्या स्थितींतहि उत्कर्ष होईल आणि हातावर किंवा पाठीवर दृष्टोत्पत्तीस येईल तर सद्भाग्याचा लाभ.

कटिस्थिते बन्धुजनाभिवृद्धिः जानौ हि सिंहासनसंस्थितिश्च ।
जंघागते क्रामति गुल्मरोगः पाद प्रदेशे भ्रमणंच नित्यम् ॥३५३॥

कमरेच्या ठिकाणीं चिन्ह उमटलें असेल तर आप्त इष्ट पुष्कळ मिळतील; गुडघ्यावर असेल तर राज्यप्राप्ति; परंतु पोटरीवर असेल तर गुल्म रोगाची पीडा होईल, आणि पावलावर चिन्ह असेल तर निरंतर प्रवासच चालेल.

नासामूले भृंगकानुप्रवेशात् नाशं ब्रूते स्वामिनः सर्वतश्च ।
अस्मिन् दृष्टे शीर्षभागे शिखायां यत्नः सर्वः सिध्यतिप्रक्रियायाम् ॥

नाकाच्या मुळाशीं तशी खूण दिसेल तर मालकाला वाईट; असा

नौकर ठेवू नये; मस्तकावर शेंडीच्या ठिकाणी असा भोंवरा किंवा भ्रमर दिसूं लागेल तर ज्या कार्याला मनुष्य हात घालील तें कार्य तडीस जाईल.

नाभौदृष्टे भूमिलाभः बाहौ द्रव्यागमस्तथा ।
ग्रीवायां मित्रलाभश्च नेत्रप्रान्ते सुखं भजेत् ॥ ३५५ ॥

बेंबीजवळ चिन्ह उद्भवेल तर भूमिलाभ घडेल, आणि बाहूवर उद्भवेल तर द्रव्यप्राप्तीचा योग घडेल. गळयाच्या घांटीवर दिसूं लागेल तर मित्रांचा लाभ; आणि डोळ्यांच्या जवळ भ्रमर चिन्ह असेल तरी सुखच् प्राप्त होईल.

लक्षणे भर्तृदुःखाय पुंसि स्त्रीक्लेशकारकः ।
इति गर्गादिभिः प्रोक्ता शरीरे भ्रमराकृतिः ॥ ३५६ ॥

पुरुषांच्या गुप्तभागीं चिन्ह उमटल्यास स्त्रीला दुःखप्राप्ति आणि स्त्रियांच्या ठिकाणीं असल्यास पतीला आपत्तिचा संभव असतो.

फलं नारीषु जानीयात् यदुक्तं नृषु सर्वथा ।
तथापि तच्च विज्ञेयं सव्यासव्य–व्यतिक्रमात् ॥ ३५७ ॥

याप्रमाणें गर्गानें भ्रमराकृतींचीं फलें सांगितलीं आहेत. तीं स्त्री पुरुष ह्या दोहोंनाहि सारखींच आहेत. फक्त पुरुषासंबंधींचें फल त्यांच्या उजव्या बाजूकडे भ्रमर चिन्ह असल्यास प्राप्त होतें, तर स्त्रियांना त्यांच्या डाव्या बाजूकडे तशी खूण असल्यास तें फल प्राप्त होईल असें समजावें.

## सामान्यतः

कुचीरकं दन्तमलावधारिणं सर्वाशिनं निष्ठुरवाक्यभाषिणम् ।
सूर्योदये चास्तमितेच शायिनं विमुञ्चति श्रीः सकृदेव पामरम् ॥

ज्याच्या आंगावरचे कपडे गलिच्छ, जो दांत घाशीत नाहीं, तोण्ड धूत नाहीं; वाटेल तें खातो. विधिनिषेध बाळगीत नाहीं; कोणाशीं सरळ बोलत नाहीं, कठोरच बोलतो; आणि सूर्योदय झाला,

किंवा संध्याकाळ झाली तरी खुशाल घोरत पडतो, अशा आचरटा-पासून लक्ष्मी ही तडक दूर निघून जाते.

## अथ सत्वम्

या अध्यायाच्या शेवटचे श्लोक फार महत्त्वाचे आहेत. त्यांतील विषय **सत्त्व** हा आहे. सत्त्व हा शब्द असा कांहीं अर्थपूर्ण आहे कीं त्यांत अमुक सद्गुण सामावला नाहीं असें नाहीं, तरी त्यांतील मुख्य भाग **न्याय** आणि **पराक्रम** ह्यांनीं विभूषित झालेला असतो. म्हणून पुढील श्लोकांत **सत्त्वाचें** वर्णन आहे.

व्यसने वाभ्युदये वा गतशंकाशोकमुकुलितोत्सुक्यम् ।
उन्मीलितधीरत्वं गंभीरमिह कीर्त्यते सत्वम् ॥ ३५९ ॥

संकटकाल असो किंवा चालता काळ असो, ज्याच्या मनाला दुःख, शंका, भीति शिवतहि नाहींत, नेहमीं उत्साहच वाटतो, धैर्यच स्पष्ट दिसूं लागतें, आणि प्रसंगानुसार वृत्ति गंभीर खोल असते, अशा वर्तनाला कारणीभूत जो गुण तें सत्त्व.

एकमपि सत्वमेतैः सर्वे शंसंति लक्षणैस्तुल्यम् ॥
यस्मिन्सति मनुजानां न कदाचन दुर्लभा लक्ष्मीः ॥३६०॥

कोणीहि असो, सर्व लोक वरील सर्व गुणसमुच्चयाला " सत्त्व " ह्याच नांवानें ओळखून त्याची वाखाणणीच करितात. कारण कोण-ताहि गुण त्याच्याशीं जुळतोच. एक " सत्व " अंगीं असलें म्हणजे लक्ष्मी किंवा महद्भाग्य दूर नाहीं.

त्वचि भोगा देहे सुखमचलं धनमीक्षणेषु सौभाग्यम् ॥
यानं गतौ स्वरे स्यादाज्ञा सत्वे पुनः सर्वम् ॥ ३६१ ॥

सात्त्विक मनुष्याच्या त्वचेला उपभोगाशिवाय कशाचा स्पर्श होत नाहीं. देहाला सुखाशिवाय बात नाहीं, कोठेंहि हात ठेवो तेथें धन ठेवलेलें त्याची जिकडे दृष्टि जाईल तिकडे भाग्य, तो चालूं

लागला कीं वाहन पुढें उभें; जें बोलेल तीच आज्ञा; ह्याप्रमाणें जिकडे तिकडे सत्त्वाचा विजय.

सौभाग्यमिव स्त्रीणां पुरुषाणां भूषणं भवति सत्वम् ॥
तेन विहीना भुवने भजंति परिभवास्पदं प्रायः ॥ ३६२ ॥

ज्याप्रमाणें स्त्रियांना सौभाग्य त्याप्रमाणें पुरुषाला सत्त्व हेंच भूषण आहे. आंगीं सत्त्व नसेल तर तो अभागी तो जेथें कोठें जाईल तेथें त्याला थप्पडच मिळेल.

वर्णः शुभो गतेः स्याद्वर्णादपि शुभतरः स्वरः पुंसाम् ॥
. अतिशुभतमं स्वरादपि सत्वं सत्वाधिका धन्यः ॥ ३६३ ॥

चालण्याच्या ढबीपेक्षां चालणारा रंगानें गौर असला तर जास्त चांगलें, गौरवर्णापेक्षां बोलणें रसाळ असलें तर त्याहून उत्तम. परंतु रसाळ वाणीपेक्षां सत्त्वाचें महत्त्व कितीतरी पटीनें अधिक म्हणून ज्यांच्या आंगीं सत्त्व ते धन्य होत.

वक्त्रानुगतं रूपं रूपानुगतं नृणां यदि च चित्तम् ॥
चित्तानुगतं सत्वं सत्वानुगताः गुणाः प्रायः ॥ ३६४ ॥

सुरूप कुरूप हें तोंडावरून कळतें, आणि जर तोंडावळ्या-प्रमाणेंच मनुष्याचें मन असेल, तर जसें चित्त तसेंच सत्त्व असणारच, आणि एक सत्त्व असलें म्हणजे तेथें सर्व गुण ठेवलेले—

इह सत्वमेव मुख्यं निखिलेष्वपि लक्षणेषु मनुजानाम् ॥
तदभावे तेऽपि पुनः चित्तासाम्यं समुपयांति ॥ ६६५ ॥

याप्रमाणें सर्वत्र सत्त्वच मुख्य आहे; मग बाह्यांगावरील शुभा-शुभ लक्षणें कशींहि असलीं तरी सत्त्वाचें महत्त्व कमी होत नाहीं. सत्त्व नसेल तर मनहि कमजोर होतें, आणि कमजोर मनाप्रमाणें रेषादि बाह्यचिन्हेंहीं बदलण्याचा संभव उत्पन्न होतो.

ननु एषां न मनागपि मनोविकारं कथंचनाभ्येति ॥
आपद्यपि संपद्यपि ते सत्वविभूषिताः पुरुषाः ॥ ३६६ ॥

फार काय ! संपत्ति येवो, की विपत्ति कोसळो, ज्यांचें चित्त केव्हांहि रेंसभर सुद्धां चळत नाहीं किंवा बिघडत नाहीं अशा पुरुषांनाच सत्त्वाढ्य पुरुष समजतात.

शुभलक्षणमप्येकं बाह्यं न विलोक्यते स्फुटं यस्य ॥
अथ दृश्यते पुनः श्रीस्तस्य तदस्ति ध्रुवं सत्वम् ॥ ३६७ ॥

अगदींच क्वचित् परंतु असें ऐकण्यांत येतें कीं बाह्यांगावर शुभलक्षण एक सुद्धां स्पष्टपणें दिसत नाहीं आणि ऐश्वर्य पहावें तों अफाट; मग हा परिणाम कशाचा म्हणून म्हणाल तर हा सत्त्वाचा परिणाम असें खात्रीनें समजावें.

स्थूलतनुर्वा परुषो मृद्वंगः स्वल्पकोऽथ दिर्घाङ्गः ।
भवति स यदि सत्वाढ्यः पूज्योऽसौ खिलगुणाधिकं सत्वम् ॥

मनुष्य आंगानें लठ्ठ असो, किरकोळ असो, त्याचें आंग खरबरीत असो मऊ असो; तो ठेंगणा असो उंच असो, परंतु त्याच्या आंगांत जर सत्त्व असेल तर तो पूज्य आदरणीयच आहे; कारण सर्वांपेक्षां सत्त्वच श्रेष्ठ होय.

शुभलक्षणमंगं यदि सुपूजितं स्यान्नरस्य सत्ववतः ॥
तदुभयसंपर्कादिह सौभाग्ये मंजरीभेदः ॥ ३६९ ॥

बरें सत्त्वविभूषित पुरुषाच्या आंगावर शुभलक्षणें असलीं तर उत्तमच, मग तो तर सामान्य लोकांनाहि पूज्यच वाटेल. सत्त्व आणि शुभलक्षणें ह्यांचा परस्पर मिलाफ झाला तर फुलझाडावर मंजरी उगवली असेंच म्हणावें दुसरें काय ?

इति श्रीमदुत्तमश्रीनृसिंहात्मजाविरचिते सामुद्रतिलके
पुरुषलक्षणे आवर्ताद्यध्यायस्तृतीयः ॥



## अथ क्षेत्राणि

वर्षाणां शतमायुस्तस्य दशैता दशा विभागाः स्युः ॥
क्षेत्राणि दश नराणां प्रोक्तान्येतानि लक्षणं ज्ञेयम् ॥ ३७० ॥

मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षें आहे. त्यांत दहा दहा वर्षांच्या कालखंडाप्रमाणें दहा दशाविभाग पडतात. त्या विभागांना "दशक्षेत्रें" असें म्हणतात; तीं शास्त्रकारांच्या मतानें पुढें लिहिलीं आहेत.

आद्यं पदौ सगुल्फौ सजानुजंङ्घाद्वयं द्वितीयं स्यात् ॥
ऊरू गुह्यं मुष्कद्वितयं क्षेत्रं तृतीयमिदम् ॥ ३७१ ॥

पहिला क्षेत्रभाग घोंट्यापर्यंत पावलें हा; नंतर दुसरा क्षेत्रभाग दोन्ही गुडघे आणि पोटऱ्या; नंतर दोन्ही मांड्या, गुह्य आणि वृषण हा तिसरा

नाभिः कटिश्चतुर्थं पंचममथ जायते पुनर्जठरम् ॥
षष्ठं स्तनान्वितमुरः सप्तममंसौ सजत्रुयुगौ ॥ ३७२ ॥

बेंबी, कंबर हा चौथा, पांचव्या विभागांत एकट्या पोटाचाच समावेश होतो. सहावा विभाग म्हणजे छाती ह्यांत दोन्ही स्तनहि येतात; आणि सातवा दोन्ही खांदे आणि आडवीं दोन हाडें ह्यांना "जत्रू" ( clavieles ) म्हणतात तीं येतात.

ओष्ठौ ग्रीवाष्टममिह नवमं स्याद्भ्रूयुगं नयनयुगुलम् ॥
सललाटमुत्तमांगं दशमं लक्षणविदः प्राहुः ॥ ३७३ ॥

मान आणि दोन्ही ओठ हा आठवा क्षेत्रभाग; नववा भाग दोन्ही डोळे आणि त्यांवरील भिवया. दहावा भालप्रदेश आणि मस्तक हा. याप्रमाणें दहा भाग शास्त्रकारांच्या मताप्रमाणें आहेत.

क्षेत्रवशाज्जायन्ते मनुजानां जगति दशदशाः क्रमशः ॥
क्षेत्रेष्वशुभेष्वशुभा दशाः शुभेषु शुभा प्रायः ॥ ३७४ ॥

ह्या दोन क्षेत्र विभागांना अनुरूप असा जीवनांतील ( शारीरिक-मानसिक ) स्थित्यंतरांचा क्रमहि ह्या लोकीं दहा प्रकारचा आहे आणि अशुभक्षेत्रांत अशुभदशा आणि शुभक्षेत्रांत शुभदशा असा नियम आहे.

श्लोकाचा आशय असा कीं, वयाच्या प्रत्येक दहा दहा वर्षांच्या कालखण्डामध्यें पहिल्या दशकांत पायाचें शुभाशुभ फल मिळतें; १० ते २० पर्यंत पोटरी, गुडघा या संबंधीं; २०–३० पर्यंत मांड्यांसंबंधीं या प्रमाणें शुभाशुभ फलें मिळतात.

बाल्याद् वृद्धिरथ बलं धीर्वाणीशुक्रविक्रमौ पुंसाम् ॥
दशकेन निवर्तते चेतः कर्मेंद्रियाणि तथा ॥ ३७५ ॥

( १ ) बाल्यावस्था, नंतर ( २ ) अवयवांच्या पुष्टतेची वृद्धि, त्या नंतर ( ३ ) बलवृद्धि नंतर ( ४ ) बुद्धीचा विकास, ( ५ ) वाक्कौशल्य; नंतर ( ६ ) वीर्योत्पत्ति आणि वृद्धि, त्यानंतर ( ७ ) पराक्रम, ( ८ ) मनोवृत्तींचा अविष्कार, नंतर ( ९ ) सत्कृत्यें आणि ( १० ) इन्द्रियांचे अप्रतिहत व्यापार हीं आयुष्य क्रमांचीं दहा स्थित्यंतरें सांगितलीं आहेत.

## प्रकृति स्वभाव

क्षितिजलशिखिपवनांबरसुरनररक्षःपिशाचतिर्यग्भिः ॥
तुल्या प्रकृतिः पुंसां क्रमेण तल्लक्षणं ब्रूमः ॥ ३७६ ॥

वरील दहा अवस्थाप्रमाणेंच दहा प्रकारच्या प्रकृति आढळतात. त्या पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश, देव, मनुष्य, राक्षस, पिशाच, आणि पशुकोटि अशा दहाच आहोत. त्यांचीं लक्षणें त्या त्या वस्तूंशीं सदृश असतात तीं सांगतों.

सुरभिप्रसूनगंधः सुखवान्भोगी स्थिरस्तुक्षितिप्रकृतिः ॥
प्रियवाग्घनांबुपायी नीरप्रकृतिर्नरो रसभुक् ॥ ३७७ ॥

सुगन्धित पुष्पाप्रमाणें ज्याच्या आंगाचा वास, जो सुखोपभोग घेणारा आणि स्थिरबुद्धि असेल त्याची प्रकृति पृथ्वी तत्त्वाची असते आणि जलप्रकृतीचा मनुष्य मिष्टान्न भाषण करणारा रुचिकर पेयें किंवा स्वच्छोदक जास्त पिणारा असा असतो.

चपलःशठो जिघत्सु स्तीक्ष्णो घनभोजनः शिखिप्रकृतिः ॥
चटुलक्षामः क्षिप्रप्रकोपनः स्यान्मरुत्प्रकृतिः ॥ ३७८ ॥

चपल, बिलंदर, खादाड, कडक स्वभावाचा, घट्ट पदार्थ जास्त खाणारा असा जो मनुष्य तो अग्निस्वभावाचा असतो, आणि किड-किडीत, वात्रट, फार तापट अशा मनुष्याला वायुप्रकृतीचा असें म्हणतात.

विद्वान्सुस्वरकुशलो विवृताक्षः शिक्षितोम्बरप्रकृतिः ॥
त्यागरतिः सस्नेहः सुरस्वभावेन लघुकोपः ॥ ३७९ ॥

विद्वान, गायक, कुशल, विशाल नेत्राचा, सुशिक्षित असा मनुष्य आकाश प्रकृतीचा असतो. आणि स्वार्थत्यागी, स्नेहाळू, असल्या-कारणानें ज्याला क्रोध फार कमी त्याला दैवी प्रकृतीचा असें म्हणतात.

भूषणगीतप्रवणो नरः स्वभावेन संविभागी स्यात् ॥
दुर्जनचेष्टः पापो रक्षःप्रकृतिः खरक्रोधः ॥ ३८० ॥

भूषणांची हौस, गाण्याचा शोकी, खेळीमेळीनें वागणारा अशाला मानुष प्रकृतीचा असें म्हणतीत. आणि दुष्टबुद्धि, दुष्ट आचार, पातकी, भयंकर कोपिष्ट अशाला राक्षस वृत्ति म्हणतात.

भवति पिशाचप्रकृतिः स्थूलो मलिनश्चलः प्रतापी च ॥
क्षुद्रानुगत स्तिर्यग्प्रकृतिर्बहुभुक् भवेन्मनुजः ॥ ३८१ ॥

लठ्ठंभारती, घामट, भटक्या मारणारा, परंतु पराक्रमी अशाला पिशाच वृत्ति म्हणावें; आणि क्षुद्र कार्यें करणारा, निर्बुद्ध, खादाड अशा मनुष्याला पशुवृत्ति म्हणतात.

इति दशविधा नराणां निर्दिष्टा प्रकृतयो यथादृष्टाः ॥
किंचिन्मिश्रकलक्षणमधुना चोक्तंच यत् सम्यक् ॥ ३८२ ॥

या मनुष्याच्या दहा प्रकारच्या प्रकृति जशा अनुभवास येतात त्याप्रमाणें निर्दिष्ट केल्या आहेत. परंतु ह्यामध्यें स्वभावाची परस्पर भेसळच फार, म्हणून त्रिगुणांचा मिश्रस्वभाव आम्ही सांगितला आहे.

शयानं चानुशेते हि तिष्ठन्तं चानुतिष्ठति ।
अनुधावति धावन्तं संचितं दैवमाश्रितम् ॥ ३८३ ॥

दैव तेंच कीं जें पूर्वकर्माचें संचित असून त्याचा भोग झालेला नसतो. त्यामुळें तें नेहमीं निजतां, बसतां, उठतां किंवा मनुष्य जेथें जातो तेथें त्याच्या बरोबर असतें.

यद्दैवमिति ज्ञातं समाश्रितं लक्षणेषु देहस्य ।
दैवस्य शुभः पाको निगद्यते सोऽपि सत्वंच ॥३८४॥

ज्याला दैव म्हणून म्हणतात तें दैव या जन्मामध्यें शरिरावर शुभाशुभ लक्षणांत सांठविलेलें असतें. अशा संचिताचा किंवा दैवाचा कांहीं विशेष योगानें जो शुभ परिणाम व्हावयाचा असतो त्यालाच सत्त्व म्हणतात.

कृष्यति क्षेत्रं पुरुषः समुप्यते बीजमत्र दैवस्य ।
क्षेत्रस्य बीजयोगात् प्रवर्धते पुरुषकारो हि ॥ ३८५ ॥

मनुष्य आपल्या कर्मानें देहरूप क्षेत्र निर्माण करितो; त्यांत दैवरूप बीज पेरलें जातें. याप्रमाणें क्षेत्रबीज संयोग झाल्यानें हातून जें सत्कृत्य दुष्कृत्य घडतें त्याला प्रयत्न किंवा पुरुषकार असें म्हणतात.

सत्त्वोत्कर्षः वराहमिहिराचार्योक्तः ॥

आत्मा सहैति मनसा मन इन्द्रियेण ।
स्वार्थेन चेन्द्रियमिति क्रम एष शीघ्रः ।
योगोऽयमेव मनसः किमगम्यमस्ति ।
यस्मिन् मनो व्रजति तत्र गतोऽयमात्मा ॥३८६॥

जिकडे मन गुतलेलें असतें तेथें भूतात्मा असतो, शब्दादि विषयांकडे म्हणजे सुस्वर, मृदुस्पर्श, लावण्ययुक्त व्यक्ति, मिष्टान्न इत्यादिकांकडे इंद्रियें आपोआप धांवत जातात; आणि मनहि जातें. याप्रमाणें वस्तूशीं मनाचा संबंध येण्याचा प्रकार आहे. सारांश

मन जेथें जाऊं शकत नाहीं अशी जागाच नाहीं. आणि म्हणूनच जेथें मन तेथें आत्मा.

दाक्षिण्य–मेकं सुभगत्वहेतु । विद्वेषणं तद्विपरीत चेष्टा ॥
मन्त्रौषधाद्यैः कुहक प्रयोगैः । भवन्ति दोषा बहवो न शर्म ॥३८७॥

जर जनामध्यें भलेपणा पाहिजे असेल तर त्याला सौजन्य हेंच एक साधन आहे. आणि त्याच्या उलट स्वभाव असेल, ह्मणजे उन्मत्तपणाची, तुसडेपणाची वागणूक असेल तर लोकांचा रोष ठेवलेला. आतां मंत्रप्रयोगासंबंधानें ह्मणाल तर दुष्ट मंत्र, औषधि, जादूटोणा ह्यांच्या योगानें मनुष्य बिघडतो; त्यापासून पातकाची वृत्ति बळावते आणि कल्याण दुरावतें.

वाल्लभ्य-मायाति विहाय मानम् । दौर्भाग्यमापादयतेऽभिमानः ॥
कृच्छ्रेण संसाधयतेऽभिमानी । कार्याण्ययत्नेन वदन्प्रियाणि ॥३८८॥

म्हणून ज्याला गर्व–ताठा नाहीं (जो विनय संपन्न आहे) तो लोकप्रिय होतो. चढेलपणाच्या वागणुकीनें शेवटीं दुर्दशाच होते. ताठरपणानें वागणाऱ्या मनुष्याला एकादें कार्य करण्यास कष्ट अतिशय पडतात, पण तेंच काम गोड बोलणारा मनुष्य सहज करून जातो.

तेजोन तद्यत् प्रियसाहसत्वं । वाक्यं न चानिष्ट-मसत्प्रणीतम् ॥
कार्यस्य गत्वान्तमनुद्धता ये । तेजस्विन स्ते न विकत्थना ये॥३८९॥

उगीच वाटेल तें साहस निरर्थक करणें ह्याला कोणी तेजस्विता ह्मणत नाहीं, खोटेंपणानें भरलेलें किंवा मर्म भेदक बोलणें हें भाषणच नव्हे. अवघड कार्य तडीस नेऊन त्याबद्दल जे शेखी मिरवीत नाहींत तेच तेजस्वी. क्षुल्लक कामाची नेहमीं बढाई मारणारे हे कोणीच नव्हेत. त्यांना किंमतच देऊं नये.

यत्सार्वजन्यं सुभगत्व मिच्छेत् गुणान् स सर्वस्य वदेत् परोक्षे ।
प्राप्नोति दोषान् असतोप्यनेकान् परस्य यो दोषकथां करोति॥३९०॥

सर्व लोकांकडून मिळाल्यास वाहवाच मिळवावी अशी ज्याची

इच्छा असेल, त्यानें दुसऱ्याचे गुण प्रांजल बुद्धीनें त्याच्या परोक्षहि बोलून दाखवावे. तसें न करितां दुसऱ्याची कुटाळकी, निंदा, आणि तीहि त्याच्या परोक्ष करणें हाच ज्याचा उद्योग असेल त्याच्या आंगीं सर्व दोष जडतात. पूर्वी नसलेलेहि उत्पन्न होतात.

सर्वोपकारानुगतस्य लोकः ।
सर्वोपकारानुगतो नरस्य ॥
कृत्वोपकारं द्विषतां विपत्सु ।
या कीर्तिरल्पेन न सा शुभेन ॥ ३९१ ॥

जो कोणालाहि अपकार करीत नाहीं, झाला तर उपकारच करतो. त्याच्याच शब्दाला कृतज्ञताबुद्धीचे सर्व लोक मान देतात, आणि त्याच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याची इच्छा करितात. प्रामाणिक मनानें वागणाऱ्या शत्रूवरहि त्याच्या संकटकाळीं उपकार केल्यानें जो लौकिक होतो, तो एरवीं एकादें चांगलें कृत्य केल्यानेंहि होत नाहीं.

तृणैरिवाग्निः सुतरां विवृद्धि-माच्छाद्यमानोऽपि गुणैरुपैति ।
स केवलं दुर्जनभाव-मेति हन्तुं गुणान् वाञ्छति यः परस्य ॥३९२॥

अग्निला गवताखालीं झांकून ठेवण्याचा कितीहि यत्न केला तरी तो सिद्धीस न जातां अग्नि आपल्या तेजोभरानें एकदम पेट घेतो, त्याप्रमाणें दुष्ट मनुष्यानें सज्जनाच्या सर्वमान्य गुणांची कितीहि निंदा केली, तरी शेवटीं तो डाव त्या दुर्जनावरच उलटणार.

मन आत्मा द्वौ यातो गच्छति तत्रैव लोहितं तनुजम् ।
तदनुसरन्ति हि रेषाः कुर्वाणाः सत्त्वमपि विशदम् ॥३९३॥

मन आणि आत्मा ही जोडी जशी फिरेल त्याप्रमाणें शरीरांतील सर्व रस रक्तादि धातूंची राहाटी असते. आणि सप्तधातूंच्या अनुसंधानानेंच रेषा उत्पन्न झालेल्या असतात. ह्याप्रमाणें शारीरलक्षणें हीं सत्त्वालाच उघड करून दाखवीत असतात.

# ॥ अथ हस्तसामुद्रिकम् ॥

श्रीगणनाथं नत्वा तथैव देवर्षि–मुनि–महाभागान् ।
वच्मि महत्शास्त्रमिदमङ्गुलिरेखान्वितं परमम् ॥ ३९४ ॥

वक्ष्ये तथेत उर्ध्वं कररेखालक्षणानि निखिलानि ।
प्रोक्तानि यानि पूर्वैर्यथा समुद्रादिभिर्मुनिभिः ॥ ३९५ ॥

आतां यापुढें प्रथम हस्तरेषा लक्षणें सांगतों. हीं शुभाशुभ लक्षणें पूर्वीच्या समुद्रादि मुनींनीं जशीं सांगितलीं आहेत त्यांना अनुसरूनच मीहि सांगतों.

तत्सत्त्वं यदनूक्तं तस्मिन् सति लक्षणानि सूक्ष्माणि ।
दधति सदा भाग्यवशात् सर्वं संहृत्य वर्तते सत्त्वम् ॥ ३९६ ॥

पूर्व प्रारब्ध तेंच सत्त्व; आणि जें पूर्वकर्म तेंच लक्षणरूपानें उत्कृष्ट असें दृष्टोत्पत्तीस येतें. परंतु हीं लक्षणें ढळढळीत नसून फार सूक्ष्म असतात ( म्हणून तीं एकदम ध्यानांत येत नाहींत ). याप्रमाणें सत्त्वगुण जरी श्रेष्ठ आहे तरी तो शरीरांतील सूक्ष्म लक्षणांशीं जुळून असतो.

उक्तंच—

शुभाशुभफलं कर्म मनोवाग्देहसंभवम् ।
कर्मजा गतयो नृणामुत्तमाधममध्यमाः ॥ ३९७ ॥

परंतु असें म्हटलें आहे कीं—

मन, वाणी, आणि देह यांच्या स्वाभाविक धर्मांच्या योगानें जीं अनेक योग्य अयोग्य कृत्यें मनुष्य करितो त्याचेंच सुखदुःख हें शुभाशुभफल होय; आणि अशा कर्मांचा परिणाम हा कीं त्या मनुष्याला अन्यजन्मीं उत्तम, मध्यम, अधम अशी परिस्थिति आणि तदनुरूप शरीर प्राप्त होतें.

तस्येदं त्रिविधस्यापि त्र्यधिष्ठानस्य देहिनः ।
दशलक्षणयुक्तस्य मनो विद्यात् प्रवर्तकम् ॥ ३९८ ॥

त्याप्रमाणें तीन प्रकारची परिस्थिति प्राप्त झाल्यावर, पूर्व-कर्मानुरूप प्रेरणेनें जीं जीं कृत्यें कायावाचा मन यांच्याकडून घडतात किंवा तो मनुष्य बुद्धिपुरःसर करितो, त्या कर्मांचे प्रकार त्यांच्या लक्षणानुरूप दहा आहेत. अर्थात् त्या सर्व कर्मांचें प्रेरकाहि मनच असते. म्हणून---

धनिनां पाणितले तु रेखा व्यक्ताः गभीरदीर्घाश्च ॥
निःस्वानामतिवक्राःसूक्ष्मा स्तरला मिथश्च संकीर्णाः ॥ ३९९ ॥

तळहातावर रेषा सर्वांच्याच असतात; पण त्या व्यवस्थित, एकमार्गी लांब, खोल आणि स्पष्ट असतील ते भाग्यवान् अथवा धनिक होतात, आणि त्या रेषा बारीक, वांकड्या आणि एकमेकांत घुसलेल्या अशा असल्या तर ती दारिद्र्याची खूण समजावी.

रेखाभिः पूर्णाभिस्तिसृभिः करमूलमंकितं यस्य ॥
धनकांचनरत्नयुतं श्रीपरिपूर्णंच जीवितं तस्य ॥ ४०० ॥

तीन पूर्ण रेषा हाताच्या मूळभागीं स्पष्टपणें उमटल्या असतां अशा मनुष्याचें आयुष्य, संपत्ति युक्त, धनधान्यसमन्वित सुखावह असें होतें.

करमूलैस्तुनिगूढैः सुदृढं सुश्लिष्टसंधिभिर्भूयः ॥
निःस्वः श्लथैः स्वशब्दैः पाणिच्छेदान्वितैर्हीनैः ॥ ४०१ ॥

बोटाचा तळहाताशीं जेथे सांधा असतो तो सांधा बळकट असून मासांत रुतलेला असावा. बोटाचीं इतर पेरीं देखील तशींच सुदृढ असावीं. अशा प्रकारचा हाताचा पंजा ( अग्र हस्त ) ज्यांचा असतो ते राजे किंवा जमीनदार असतात, व सांधे लिबलिबीत, कट्टकट्ट आवाज होणारे, चिटकविल्यासारखे दिसणारे असले म्हणजे तो दीन किंवा दरिद्री असतो.

अवहस्तं करपृष्ठं विस्तीर्णं पीनमुन्नतं स्निग्धम् ॥
विनिगूढशिरं परितः क्षोणिपतेः फणिफणाकारम् ॥ ४०२ ॥

हात पालथा धरला असतां मागील बाजू रुंद, पुष्ट, उंच तेजस्वी कोणत्याही शिरा फार न दिसणारी अशी असेल तर ती जमीनदार पुरुषाची असते. हात पालथा ठेवला असतां नागाच्या फणेप्रमाणें दिसावा.

मणिबंधसमं निम्नं निर्मांसं रोमसंचितं सशिरम् ॥
करपृष्ठं निःस्वानां रूक्षं परुषं विवर्णं स्यात् ॥ ४०३ ॥

मनगटाच्या सांध्याला जुळून अग्रहस्त (पंजा) असावा. तसा नसून तो खोलगट, वाळकुंडा, केंसाळ, शिरांनीं युक्त अशा प्रकारचा असला अर्थात् हाताची मागील बाजू याप्रमाणें असेल, किंवा रुक्ष खडबडीत, निस्तेज असेल तर तो मनुष्य दरिद्री असतो.

संवृत्तनिम्नेन धनी पाणितलेनोन्नतेन दानरुचिः ॥
निम्ने तु जनकवियुतो विषमेन भवति धनहीनः ॥ ४०४ ॥

तळहाताचा मध्यभाग वाटोळा आणि थोडा खोलगट असावा, म्हणजे तो पुरुष धनवान् असतो, खोलगटपणा नसला तर त्या मनुष्याची संपत्ति दानधर्मांत खर्च होते. तसा कांहींच प्रकार नसेल तर दारिद्य. खोलपणा फारच असेल तर पिता मृत्यु पावतो, किंवा पित्याशीं पटत नाहीं. तळहात विषम (म्हणजे कांहीं ठिकाणीं उंच कांहीं ठिकाणीं खोल असा) असला तर दारिद्य.

अरुणेनाढ्यः पीतेनागम्यस्त्रीरतिः करतलेन ॥
असितासितेन दरिद्रो नीलेनापेयपायी स्यात् ॥ ४०५ ॥

तळहात आरक्त असला तर धनलाभ. पिवळट असेल तर अगम्य स्त्रीशीं समागम. तळहात काळसर असला किंवा पांढरा असला तरी दारिद्य. निळी झांक असली तर दारूबाज.

बहुरेखापरिकलितं पाणितलं भवति यस्य मनुजस्य ॥
यदि वा रेखाहीनं सोऽल्पायुर्दुःखितो निःस्वः ॥ ४०६ ॥

तळहातावर फारच रेषा असल्या किंवा रेषा बहुतेक मुळींच नसल्या

अशा दोन्ही पक्षी दुःख आणि धननाश किंवा अल्पायुष्य—ह्यांतील एक किंवा अनेक आपत्ति.

अधुना मीनाद्याकृतिरेखाणां वच्मि लक्षणं स्पष्टम् ॥
वामकरे नारीणां दक्षिणपाणौ नराणां तु ॥ ४०७ ॥

तळ हातावर मत्स्याची आकृति दाखविणाऱ्या रेषा असतील आणि ती आकृति स्पष्ट दिसत असेल तर शुभ. पुरुषाच्या उजव्या हातावर मत्स्य असावा आणि स्त्रियांच्या डाव्या हातावर असावा.

जीवितमरणं लाभालाभौ सुखदुःखमिह जगत्यखिलम् ॥
कररेखाभिः प्रायः प्राप्नोति नरोऽथ नारी वा ॥ ४०८ ॥

शुभ म्हणजे दीर्घायुष्य, लाभ, सुख, भाग्य ह्यांचा इहलोकीं भोग, आणि अशुभ म्हणजे मृत्यु, हानि, दुःख ह्याप्रमाणें हस्तरेषांच्या अनुरोधानें शुभाशुभ फल स्त्रीपुरुषांना प्राप्त होतें.

अंतर्मुखेन मीनद्वयेन पूर्णेन पाणितलमध्यम् ॥
यस्यांकितं भवेदिह स धनी सत्रप्रदो* मनुजः ॥ ४०९ ॥

ज्याच्या तळ हातावर दोन मत्स्य आणि तेहि ज्यांचीं तोंडें आंतील बाजूस आहेत असे ठसठशीत असतील तर तो अतिशय धनाढ्य असेल. (परंतु तो कंजुषहि असूं शकेल. नेहमीं तसाच असेल असा मात्र अर्थ नव्हे.)

टीपः—ह्या ठिकाणीं पाठभेद परस्पर विरुद्ध आहेत.

तळहातावर तीन रेषा ढळढळीत दिसत असतात. त्यापैकीं एक मणिबन्धापासून निघते. आणि ज्याच्या हातावर त्या रेषा पूर्ण असतात, तुटक्या नसतात त्याच्या घरीं द्रव्यच काय पण जवाहिर-हि भरपूर असतें. घर द्रव्यानें भरलेलें आणि त्याला सर्व उपभोग यथास्थित घडतात.

अच्छिन्ना गंभीरा पूर्णा रक्ताब्जदलनिभा मृदुला ॥
अंतर्वृत्ता स्निग्धा कररेखा शस्यते पुंसाम् ॥ ४१० ॥

हातावरील रेषा कशा असाव्यात या धोरणानें पाहतां त्या तुटक्या नसाव्यातच, पण खोलगट असून कडेपर्यंत जाऊन भिडणाऱ्या असाव्यात. त्याच्यामध्यें रक्तकमलाप्रमाणें लाली आणि मऊपणा असावा, त्या जर वळलेल्या असतील तर आंतील बाजूकडे वळाव्यात. अशा रेषा पुरुषाच्या हातावर प्रशस्त होत.

मधुपिंगाभिः सुखिनः शोणाभिस्त्यागिनो गभीराः स्युः ॥
सूक्ष्माभिर्धीमंतः समाप्तमूलाभिरथ सुभगाः ॥ ४११ ॥

रेषांचा रंग लालवट, पिंगट असला तरी चालेल, पण जो मनुष्य दान शूर असतो त्याच्या हातावरील त्या रेषा लाल व खोल असतात. रेषा बारीक असल्या तरी चालतील ( पण पुसट नसाव्यात ) बारीक रेषांचा मनुष्य बुद्धिमान् असतो. ज्यांचें मूळ स्पष्ट दिसतें अशा रेषांचा पुरुष भाग्यशाली असतो.

पल्लविता विच्छिन्ना विषमाः परुषाः समा स्फुटितरूक्षाः ॥
विक्षिप्ताश्च विवर्णा हरिताः कृष्णाश्च पुनरशुभाः ॥ ४१२ ॥

फाटे फुटलेल्या, तुटक्या, विषम ( कोठें बारीक, कोठें ठोसर वांकड्या अशा ), खडबडीत, सळनळीत, फुटक्या, रूक्ष, मार्ग सोडून भलतीचकडे झुकणाऱ्या, निस्तेज, नीळसर, आणि काळ्या अशा रेषा अशुभ होत.

अव्यक्तास्तु च तनवः खंडाः रेखाः करे स्थिता यस्य ॥
तिग्मांशोरिव रजनी श्रीस्तस्य पलायते सततम् ॥४१३॥

ज्याच्या तळहातावरील रेषा अस्पष्ट, अगदीं बारीक, मध्येंच तुटलेल्या अशा असतात, त्याच्यापासून रात्र सूर्याला भिऊन पळून जाते त्याप्रमाणें संपत्ति दूर पसार होते. केव्हांहि जवळ येत नाहीं.

पल्लवितायां क्लेशः छिन्नायां जीवितस्य संदेहः ॥
विषमायां धननाशः परुषायां कदशनं ज्ञेयम् ॥ ४१४ ॥

रेषा फाटे फुटलेल्या अशा असतील तर क्लेश; तुटक्या असतील तर

प्राणाला धोका. विषम असल्यास धन हीन, आणि खडबडीत दिसणाऱ्या अशा असल्यास त्याला वाईट अन्न खावें लागेल.

## आद्या रेषा

आपाणिमूलकरगा निःसृत्यांगुष्ठतर्जनीमध्ये ॥
आद्या भवंति तिस्रो गोत्रद्रव्यायुषां रेखाः ॥ ४१५ ॥

" आद्या " रेषा कोणती म्हणाल तर मनगटाच्या रेषेंतून निघून आंगठा आणि तर्जनी ह्या दोन बोटांच्या मधोमध जो तळहाताचा कडेचा भाग आहे तेथें जिचा शेवट होतो ती " आद्या " रेषा होय. ही रेषा स्पष्ट आणि ठसठशीत असते. हिच्याशिवाय अशाच आणखीहि दोन रेषा पुष्कळ वेळां आढळतात. ह्याप्रमाणें ह्या रेषा तीन आहेत. त्यावरून कुटुंब, द्रव्य आणि आयुष्य ह्यांचा विचार करितात.

" आद्या "—हिलाच, " जीवन रेषा, " " स्वत्वरेषा " किंवा " आत्मरेषा " अशींहि नांवें कोणीं दिलेलीं आहेत. ह्या जीवनरेषेला Line of Life म्हणतात.

अतिभिन्नच्छिन्नाभिः स्वल्पानि भवंति कुलधनायूंषि ॥
रेखाभिर्दीर्घाभिर्विपरीताभिस्तु विपरीतम् ॥ ४१६ ॥

ह्या रेषा अत्यंत भिन्न म्हणजे निरनिराळ्या दिशेनें जाणाऱ्या, तुटलेल्या अशा असल्या तर कुल, धन आणि आयुष्य ह्यांना ओहोटी लागते; म्हणून ह्या रेषा लांबलचक असाव्या, म्हणजे शुभ होतें. ह्याच्याहून उलट प्रकार असेल तर विपरीत फल होतें.

मणिबंधान्निर्गच्छति रेखा यस्य प्रदेशिनीमूलम् ॥
बहुबंधुजनाकीर्णो तस्य पुनः जायतेऽभिजनः ॥ ४१७ ॥

एखाद्याची आद्या रेषा किंवा तिहींपैकीं एखादी रेषा मनगटापासून निघून तर्जनीच्या मूळाला जाऊन भिडेलेली असेल तर त्या

मनुष्याचें कुटुंब मोठें असतें. त्यांना पुष्कळ आप्तइष्ट असतात व नवीनहि जमतात.

" तर्जनी मूळ " म्हणजे तर्जनी आणि तळहात ह्यांच्या सान्ध्यांतील हाड; येथें " उंचवटा " असतो.

दभ्रा पुनर्नराणां लघुरिह दीर्घो च दीर्घया वंशः ॥
परिभिन्नो विज्ञेयः परिभिन्नया छिन्नया च्छिन्नः ॥ ४१८ ॥

ही रेषा जर बारीक असेल तर कुटुंब चिमुकलें राहील. रेषा लांबच लांब असली तर वंशवेल दीर्घकाळ टिकेल. रेषा भिन्न असतील तर कुटुंबांत फाटाफूट, आणि तुटक्या असतील तर कुटुंबाचा नाश होईल.

रेखा कनिष्ठिकाया ज्येष्ठामुल्लंघ्य यस्य याति परम् ॥
अच्छिन्ना परिपूर्णा स नरो वर्षशतायुः स्यात् ॥ ४१९ ॥

आतां दुसरी एक आयुष्यरेषा सांगतात.

करंगळीच्या मुळापासून ( म्हणजे उंचवठ्याजवळून ) जर रेषा निघत असेल आणि ती तळहातामधून मधल्या बोटाच्याहि पलीकडे दूर पोहोचत असेल आणि ती संपूर्ण म्हणजे भरपूर असेल तर तो पुरुष पूर्णायुषी होईल, शतायु होईल.

यावन्मात्राच्छेदा जीवितरेखा स्थिता भवति नृणाम् ॥
अपमृत्यवोऽपि तावन्मात्रा नियतं परिज्ञेयाः ॥ ४२० ॥

ही सुद्धां आयुष्यरेषा होय. ही जितकी कायम तितकें मनुष्याचें आयुष्य आणि हिच्यामध्यें जितके छेद दिसतील तितके त्या पुरुषाचे अपमृत्यु ह्याप्रमाणें छेदावरून अपमृत्यूची संख्या समजेल.

पुंसामायुर्भागो आयुष्यं पंचविंशतिः शरदाम् ॥
कल्प्या कानिष्ठिकांगुलिमूलादिह तर्जनीपरतः ॥ ४२१ ॥

आयुर्दाय मोजण्याची स्थूल पद्धति अशी कीं पंचविसाचा एकेक असे शंभराचे चार भाग करून त्यावरून निश्चित करावयाची. आतां

जी आयुष्यरेषा करंगळीच्या उंचवटयापासून तर्जनीकडे जात असेल तिचे तुकडे कसकसे पडत आहेत तें पाहून आयुर्दाय सांगावा.

रेखा मणिबन्धाद् या अंगुलिमूलेषु यान्ति करतलगाः ।
ऊर्ध्वारेषास्ताभ्यो भ्रवन्ति भाग्यर्द्धि विक्रमार्दीश्च ॥ ४२२ ॥

मनगटापासून निघून ज्या रेषा तळहाताच्या मधून कोणत्या तरी उंचवटयापर्यंत जातात त्यांना **ऊर्ध्वरेषा** म्हणतात.

ह्या ऊर्ध्वरेषांवरून भाग्य, भरभराट, बुद्धि, पराक्रम ह्यांचीं फळें पाहतात.

रेखा मणिबंधाद्यदि यात्यंगुष्ठप्रदेशिनीमध्यम् ॥
ऋद्धियुतं सा रचयति विज्ञानविचक्षणं पुरुषम् ॥ ४२३ ॥

ऊर्ध्वरेषा मणिबंधापासून निघून आंगठा आणि तर्जनी ह्यांच्या मधालकडेपर्यंत जात असेल तर तिच्यामुळें त्या पुरुषाचा भरभराट होईल, आणि तो पुरुष विद्या आणि बुद्धि यांत लौकिक मिळवील.

ही रेषा आत्यारेषेच्या जवळ असते.

चेदंगुष्ठं गच्छति सैव ततो वितनुते महीशत्वम् ॥
यदि सैव तर्जनीं वा साम्राज्यं मंत्रिपदमथ वा ॥ ४२४ ॥

जर ऊर्ध्वरेषा आंगठ्याच्या उंचवटयापर्यंत जात असेल तर तिच्यायोगानें राज्यपद प्राप्त होईल, आणि तीच जर तर्जनीच्या उंचवटयापर्यंत जाईल तर राजाचा किंवा साम्राज्याचा सचिव अथवा मुख्य प्रधान होईल.

निःष्क्रांता मणिबंधात्प्राप्ता यदि मध्यमांगुलिं रेखा ॥
नृपतिं सेनाधिपतिं सा कुरुते वा तमाचार्यम् ॥ ४२५ ॥

ऊर्ध्वरेषा मनगटापासून मधल्या बोटाच्या उंचवटयाशीं भिडत असेल तर असा पुरुष प्रत्यक्ष राजा किंवा सेनानायक होईल निदान विद्यागुरु आचार्य तरी होईल.

ह्या रेषेला पाश्चात्य पण्डित Line of Fate म्हणतात.

न च्छिन्ना न स्फुटिता दीर्घतरा विगतपल्लवा पूर्णा ॥
ऊर्ध्वा रेखा कुरुते सहस्रजनपोषमेकाऽपि ॥ ४२६ ॥

ऊर्ध्वरेषा तुटकी असूं नये, दुभंग होऊं नये, ती खूप लांब, परिपूर्ण आणि शेवटीं पल्लव असावे. याप्रमाणें एकच ऊर्ध्वरेषा हातावर स्पष्ट असली कीं पुरे. तिच्यामुळें देखील तो पुरुष हजारोंचा पोशिंदा होईल.

सा ब्राह्मणस्य रेखा वेदकरी क्षत्रियस्य राज्यकरी ॥
वैश्यस्य महार्थकरी सौख्यकरी भवति शूद्रस्य ॥ ४२७ ॥

अशा प्रकारची पूर्ण ऊर्ध्वरेषा ब्राह्मणाच्या हातावर असेल तर तो वेदपारंगत असेल, क्षत्रियाच्या असेल तर निष्कंटक राज्यप्राप्ति. वैश्याच्या असेल तर व्यापारांत भरभराट, आणि शूद्राच्या असेल तर सौख्य लाभ होईल.

करमूलान्निर्याता यदि रेखाऽनामिकांगुलिमुपैति ॥
विदधाति साऽर्थवाहं साऽर्थाढ्यं सततनृपमान्यम् ॥४२८॥

करमूल म्हणजे मनगट त्यांतून निघून जी ऊर्ध्वरेषा अनामिकेच्या उंचवट्यापर्यंत जाते. तिच्यायोगानें तो पुरुष समाजाचा, व्यापारी वर्गाचा पुढारी होतो, आणि त्यालाहि त्यांचा पाठिंबा मिळून तो राजालाहि मान्य होतो.

निःष्क्रम्य पाणिमूलात्प्राप्नोति कनिष्ठिकांगुलिं रेखा ॥
धनकनकाढ्यं श्रेष्ठिनमिह कुरुते सा यशोनिष्ठम् ॥ ४२९ ॥

करमूलांतून—मनगटांतून निघून एखादी ऊर्ध्वरेषा जर करंगळीच्या उंचवट्यापर्यंत जात असेल तर ती रेषा पुरुषाला सुवर्णाचा भरपूर लाभ करून देईल. त्याला श्रेष्ठि म्हणजे पुढारी करून यशस्वी करील.

टीपः—सर्व ऊर्ध्वरेषा मनगटापासून निघतात असें नव्हे. त्या जीवन रेषेच्या स्थानापासून निघत असल्या तरी चालतील.

प्रत्यङ्गुलिमूले तु दृश्यंते परिणता–स्त्वगावर्ताः ॥
उच्छ्रायाः कथ्यन्ते स्पष्टाः कठिणाः शुभास्तेऽपि ॥ ४३० ॥

प्रत्येक बोटाच्या तळहाताशीं जेथें सांधा असतो त्या ठिकाणीं कातडीमध्यें कठिण असा एक भाग बनून त्यांत फुगीरपणा टणकपणा येतो, त्याला उंचवटा म्हणतात. हे उंचवटे त्यांच्या स्वरूपावरून शुभाशुभ फळें देतात.

आलिखितं काकपदं धनरेखायां तु दृश्यते यस्य ॥
अर्जयति धनानि पुनः तल्लक्षणमतिव्ययं कुरुते ॥ ४३१ ॥

ज्याच्या धनरेषेमध्यें काकपद नामक एक प्रकारची खूण उत्पन्न होते किंवा झालेली असते, तो भक्कम पैसा मिळवितो पण तितका किंवा त्याहून ज्यास्त खर्च करितो.

टीपः—शर्यतीमध्यें हा प्रकार दिसून येईल.

अंगुष्ठस्याधस्तात्काकपदं यस्य भवति विस्पष्टम् ॥
स नरः पश्चिमकाले शूलेन विपद्यते सद्यः ॥ ४३२ ॥

जर आंगठ्याच्या खालच्या भागांत काकपद असेल आणि तें ठसठसीत असेल तर तो पुरुष उतार वयांमध्यें जोराच्या पोटशूळानें एकाएकी मृत्यु पावेल.

टीपः—या रोगाला हल्लीं अपेंडिसायटिस् म्हणतात.

त्रिपरीक्षेया व्यक्ता यवमाला भवति यस्य मणिबंधे ॥
नियतं महार्थसहितः स सार्वभौमो नराधिपतिः ॥ ४३३ ॥

ज्याच्या मनगटावर तीन पदरांची अशी यवमाला स्पष्टपणें दिसत असेल त्याच्या जवळ अलोट धन खात्रीनें असणार किंवा तो राजा असेल, अथवा सार्वभौमपदारूढहि असूं शकेल.

करमूले यवमाला द्विपरीक्षेया मनोहरा यस्य ॥
मनुजः स राजमंत्री विपुलमतिर्जायते मतिमान् ॥ ४३४ ॥

मनगटाच्या थोडें वर म्हणजे ऊर्ध्वरेषांच्या मुळाशीं जर यवमाला

दोन सारवळ्यांची किंवा दोन पदरांची स्पष्ट डोळ्यांत भरणारी अशी असेल तर तो राजाचा मुख्य प्रधान होतो. कारण तो बुद्धिमान असल्यानें त्याला वाटेल तो प्रश्न बुद्धिसामर्थ्यानें सोडवितां येतो.

सुभगैकपरीक्षेया यवमाला यस्य पाणिमूले स्यात् ॥
भवति धनधान्ययुतः श्रेष्ठीजनपूजितो मनुजः ॥ ४३५ ॥

ज्याच्या मनगटावर सुरेख अशा एकपदरी यवमाला दिसत असेल त्याच्याजवळ विपुल धनधान्य असेल आणि समाजांतील श्रेष्ठ लोकहि त्याला मान सन्मान देतील.

· यदि तिस्त्रो यवमाला मणिबंधादुभयतो विनिसृत्य ॥
परिवेष्टयंति पृष्ठं तदधिकतमामिह फलं ज्ञेयम् ॥ ४३६ ॥

जर तीन यवमाला मनगटाला सर्व बाजूनें वेढून टाकून पाठीमागेंहि जात आहेत असें वाटेल. तर वरानिर्दिष्ट केलेलीं फलें परंतु फार मोठ्या प्रमाणांत मिळतील.

भाग्येन भवंति यवाः पुंसामंगुष्ठपर्वसु स्पष्टाः ।
येषां विशेषनिमित्तात् कर्मकृतिर्यशस्तु तत्सैव ॥ ४३७ ॥

एकापेक्षां अधिक यव पुरुषांच्या आंगठ्यांतील पेरांवर जर दिसत असतील तर ती भाग्याची गोष्ट होय. असे यव असणारा पुरुष पराक्रमाचीं कृत्यें अशा झोंकानें करील कीं कमलांच्या रंगणांत जणों क्रीडा चालली आहे.

सुतवंतः श्रुतवंतो जायन्तेऽङ्गुष्ठमूलगैस्तु यवैः ॥
मध्यगतैर्धनकांचनरत्नाढ्या भोगिनः सततम् ॥ ४३८ ॥

आंगठ्यावरील यवांमुळें काय होत नाहीं. पुत्रपौत्रांचा लाभ, विद्येंत प्रावीण्य हे फायदे होतातच पण मध्यभागीं यव असतील तर धन, सोनें नाणें, रत्नें यांची लयलूट होऊन सर्व उपभोग प्राप्त होतात.

त्रिपरीक्षेया मूलेऽङ्गुष्ठगता भवति यस्य यवमाला ॥
द्विपसुसमृद्धः स पुमान् राजा वा राजसचिवो वा ॥४३९॥

ज्यांच्या आंगठ्याच्या उंचवट्यालगत यवांची तीन पदरी माळ स्पष्ट दिसते, त्याच्या पदरीं हत्ती, आणि अधिकारक्षेत्रांत द्वीपें भरपूर असतात, अर्थात् असा पुरुष राजा तरी असतो, किंवा मुख्य प्रधान तरी असतो.

यस्य द्विपरीक्षेया सैव नरो राजपूजितो भवति ॥
यस्यैकपरीक्षेया यवमाला सोऽपि वित्ताढ्यः ॥ ४४० ॥

ज्यांच्या आंगठ्यावर यवांची दोन पदरी माळ असते तो पुरुष राजाला देखील सन्माननीय होतो, आणि ज्याच्या आंगठ्यावर एकच यवमाला असेल तो धनकनकसंपन्न होतो.

इह ताभिः पूर्णाभिः पूर्णां प्राप्नोति संपदं सदसि ॥
मध्याभिर्वा मध्यां ऱ्हस्वाभिर्वा पुमान् ऱ्हस्वाम् ॥ ४४१ ॥

जर यवमाला मग त्या एक पदरी असोत, दोनपदरी असोत जर परिपूर्ण असतील तर संतत्ति, संपत्ति, अधिकार इत्यादि जीं त्यांचीं फलें तीं पुरेपूर मिळतील. जर पूर्ण यवमाला नसून थोडी कमी असेल तर फलहि त्या मानानें कमी मिळेल. तुटक्या यवमालेचें फलहि तोकडेंच असेल.

टीपः—यवमालेच्या कारिकामध्यें येथें द्विरुक्ति झालेली आहे.

## आयुष्य रेषा

आयुर्लेखा नामांगुलिमूलांतर्गता भवेदूर्ध्वा ॥
यस्य व्यक्ता रेखा स धर्मनिरतः सततम् ॥ ४४२ ॥

जी रेषा—अंगुलीच्या उंचवट्यातून नीट (वर) जाते तिला आयुष्यरेषा म्हणावें. ती ज्याची स्पष्ट असेल तो दीर्घायुषी होऊन कार्यप्रवणहि असेल.

टीपः—ही कारिका मुद्दाम मोघमपणानें लिहिली असावी. अंगुली म्हणजे कोणती तें संदिग्ध आहे आणि "नीट वर" म्हणजे ऊर्ध्व कीं तिर्यक् तेंहि संदिग्ध ठेविलें आहे. पण स्पष्टार्थ थोड्या विचारानें ध्यानांत येईल.

यदि रेखा सर्वांगुलिसमस्तपर्वांतरे स्थिता व्यक्ता ॥
स्पष्टो यवोऽपि पुंसां महीयसां तं महीशत्वम् ॥ ४४३ ॥

ज्याच्या रेखा म्हणजे—सर्व बोटांच्या पेरांवरील रेखा अस्पष्ट, किंवा गिचमिड अशा नसून, स्पष्ट ठळक व व्यवस्थित असतात, आणि पेरांवरील यव हीं स्पष्ट असतात, तो पुरुष राजा असतोच पण सर्वांना पूज्यहि होतो.

रेखाः कनिष्ठिकायुर्लेखामध्ये नरस्य यावंत्यः ॥
तावंत्यो महिलास्युः महिलायाः पुनरपि तनयः ॥ ४४४ ॥

करंगळी आणि आयुष्यरेषा ह्यांच्या मध्यें ज्या रेषा असतात. त्या रेषा पुरुषाचे विवाह अथवा ज्याच्या स्त्रियांची संख्या दर्शवितात. जितक्या रेषा तितक्या स्त्रिया. स्त्रियांसंबंधानें तशींच फलें जाणावीं.

रेखाभिर्विषमाभिर्विषमाः समाभिरथच समशीलाः ॥
हीनतरा हीनाभिर्ध्रुवमधिकतराः समधिकाभिश्च ॥ ४४५ ॥

पुरुषाचा व स्त्रियांचा विशेष त्या रेखावरून सांगावा. स्त्रीरेषा विषम, बारीक, सरळ वाकड्या अशा असतील तर स्त्रीपुरुषांचे खटके उडतील. स्त्रीरेषा समान म्हणजे व्यवस्थित असेल तर जुळता स्वभाव. स्त्रीरेषा किरकोळ असेल तर स्त्री कमी दर्जाची आणि सुस्पष्ट असेल तर उच्च दर्जाची मिळेल.

पुष्टाभिर्हि पुनर्भूः कन्या रेखाभिरथ च सुदीर्घाभिः ॥
सुभगाः सूक्ष्माभिः स्यात्स्फुटिताभिर्दुर्भगा नारी ॥ ४४६ ॥

स्त्रीरेषा खूप जाड असेल तर स्त्री पुनर्भू , बारीक परंतु व्यव-

स्थित असेल तर यथायोग्य विवाह. रेषा दीर्घ असेल तर स्त्रीला सौभाग्य. रेषा बारीक तुटकी असेल तर दुर्भाग्य.

मूलेऽङ्गुष्ठस्य नृणां स्थूला रेखा भवंति यावंत्यः ॥
तावंत्यः पुत्राः स्युः सूक्ष्माभिः पुत्रिकास्ताभिः ॥ ४४७ ॥

आंगठ्याच्या उंचवट्याजवळ जाड रेषा दिसत असतील तर त्या पुत्रदर्शक रेषा होत. त्यांच्या संख्येइतके पुत्र होतील. त्या रेषा बारीक असतील तर कन्या होतील.

यावंत्या मणिबंधायुर्लेखांतः प्रतिष्ठिताः स्थूलाः ॥
तावत्संख्यान्भातॄन् वदन्ति सूक्ष्माः पुनर्भगिनीः ॥ ४४८ ॥

मनगटाच्या जवळ आयुष्य रेषेप्रमाणें रेषा उत्पन्न होतात. त्या बन्धू, भगिनी यांच्या निदर्शक असतात. रेषांची संख्या बंधूंची संख्या दर्शविते, आणि बारीकपणा भगिनी दर्शवितो.

रेखाभिश्छिन्नाभिर्भिन्नाभिर्भाविमृत्कता ज्ञेया ॥
यावंत्यः परिपूर्णा नियतं जीवंति युक्तसंख्याभिः ॥ ४४९ ॥

जर ह्या रेषा तुटक्या असतील तर त्यांचे मृत्यु पूर्वीच घडलेले असतात. आणि भिन्न, दुभागलेल्या असतील, त्यांचे मृत्यु व्हावयाचे असतात. आणि पूर्ण रेषा असतील ते बंधू भगिनी पूर्णायुषी होतील.

मीनो मकरः शंखः पद्मो वाऽन्तर्मुखः सदाफलदः ॥
पाणौ बहिर्मुखो यदि तस्य फलं पश्चिमे वयासि ॥ ४५० ॥

( तळ हातावर कांहीं विशेष वस्तूंच्या आकृति उमटलेल्या असतात असे पूर्वीच्या शास्त्रज्ञांनीं लिहिलें आहे त्यांत ) मत्स्य, मगर, शंख, कमळ हे मुख्य आहेत. हे अन्तर्मुख असावे म्हणजे त्यांचें फल सर्व आयुष्यभर मिळतें. बहिर्मुख असलें तर फळ उत्तर वयांत मिळतें.

मीनांकः शतभागी सहस्रभागी सदैव मकरांशः ॥
शंखांको लक्षपतिः कोटिपतिर्भवति पद्मांकः ॥ ४५१ ॥

जर मत्स्य तळ हातावर असेल, तर शुभफळ शतपट मिळेल. मगराची आकृति असेल तर हजार पट, शंखाची आकृति असेल तर लक्षपट, आणि कमळाची असेल तर फळ कोट पटीनें अधिक मिळेल.

छिन्नैर्भिन्नैः स्फुटितैः व्यक्तैः किमपिनास्ति फलमेतैः ॥
जायंते पाणितले प्रायो-मी सर्वसार्वभौमानाम् ॥ ४५२ ॥

हीं चिन्हें कांहींच्या हातावर असतीलहि. पण ती तुटकीं, भेगाळलेलीं, फुटकीं अशीं असलीं तर त्यांचें फल कांहीं एक मिळणार नाहीं. म्हणून अशीं चिन्हें असलीं तर तीं सार्वभौमपदाधिष्ठित राजांच्याच हातावर असतात.

शैलः प्रांशुतनुर्वा हस्ततले यस्य विस्फुटं स्फुरति ॥
स पुमान्प्रायो राज्यं लभते निजसहायोऽपि ॥ ४५३ ॥

ज्याच्या तळहातावर एक भल्या मोठ्या प्रचण्ड पर्वताची आकृति आणि ती स्पष्ट अशी असेल तो पुरुष आपल्या एकटयाच्या पराक्रमावर राज्यहि मिळवील. त्याला कोणी सहायक नकोत.

रथवाहियानकुंजरवाजिवृषाद्याः स्फुटाः करे येषाम् ॥
परसैन्यजयनशीलास्ते सैन्याधिपतयः पुरुषाः ॥ ४५४ ॥

चालणारा रथ किंवा दुसरें वाहन तसेंच हत्ती, घोडा, बैल इत्यादिकांसारखी स्पष्ट आकृति ज्यांच्या तळहातावर असेल ते सेनापतिपद प्राप्त करून घेऊन शत्रुसैन्याचा धुव्वा उडवितील.

उडुपो वा वेडी वा पादो वा यस्य करतले पूर्णः ॥
धनकांचनरत्नानां पात्रं सो यांत्रिको वा स्यात् ॥ ४५५ ॥

होडी, नौका, जहाज इत्यादि आकृति ज्यांच्या हातावर पूर्णपणें आणि स्पष्टपणें उमटलेल्या असतील तो द्रव्य, सोनेंनाणें, रत्न ह्यांच्या राशी आपल्या स्वाधीन ठेवील आणि यन्त्रशास्त्रांत मोठा निपुण होईल.

श्रीवत्साभा सुखिनां चक्राभा भूभुजां करे रेखा ॥
वज्राभा वित्तवतां सुमेधसां मीनपुच्छाभा ॥ ४५६ ॥

त्याचप्रमाणें श्रीवत्स, चक्र ह्या आकृति तळहातावर असतील ते राजे होऊन अनेक सुखोपभोग भोगतील. वज्र चिन्ह हातावर असेल तो वैभवशाली, आणि मीनपुच्छाकृति हातावर उमटलेली असेल तर तो महाबुद्धिमान् होईल.

टीपः—श्रीवत्स म्हणजे छातीवर केसांचा विशिष्ट आकृतिचा भोंवरा.

वापीकूपजलाद्यैर्धर्मपरः स्यात्त्रिकोणरेखाभिः ॥
सीरेण नरः कृपिमानुलूखलप्रभृतिभिर्यज्वा ॥ ४५७ ॥

त्याचप्रमाणें, विहीर, वापि ( प्रशस्त पायऱ्याची विहीर ) व जलाशय अशीं चिन्हें हातावर असलीं म्हणजे पुरुष धर्माचरणी होतो. तसेंच त्रिकोण, नांगर हीं चिन्हें असलीं तर शेतकरी आणि उखळाप्रमाणें चिन्ह असेल तर याज्ञिक असतो.

करवालं कुशकार्मुकमार्गणशक्त्यादयः करे यस्य ॥
नियतं स क्षोणिपतिर्वीरः शत्रुकुलजेता स्यात् ॥ ४५८ ॥

तसेंच, तरवार, अंकुश, धनुष्य, बाण, शक्ति अशीं हत्यारांचीं चिन्हें हातावर असलीं तर तो पुरुष खात्रीनें भूमिपति होऊन शत्रूंचा नाश करणारा असा पराक्रमी वीर होतो.

जायंते गोमन्तः प्रासादैर्दामभिः स्फुटं मनुजाः ॥
निधिनायकाः कमंडलुकलशस्वस्तिकपताकाभिः ॥ ४५९ ॥

त्याचप्रमाणें कमंडलु, कलश, स्वास्तिक, ध्वज इत्यादि प्रकारचीं चिन्हें ज्याच्या हातावर स्पष्टपणें दिसणारीं असतील, त्याच्या हातीं द्रव्यनिधी राहतील, तो अनेक प्रासादांच्या ( राजमंदिरांचा ) मालक असेल, म्हणून त्याच्या घरीं गोधन असेल हें सांगणें नकोच.

यस्य सदंडं छत्रं चामरयुग्मं प्रतिष्ठितं पाणौ ॥
अंबुधिवलयेन युतां भुनक्ति भूमिं भुजिष्योऽपि ॥ ४६० ॥

ज्याच्या हातावर सदण्ड छत्र, चामराची जोडी अशी आकृति

उमटली असेल तो मनुष्य नौकर असला तरी समुद्रवलयाङ्कित पृथ्वीचा अधिपति होईल.

विप्रस्य यस्य यूपो वेदनिभं ब्रह्मतीर्थमपि हस्ते ॥
विश्वाधिपतिर्नियतं स भवेदथ वाऽग्निहोत्रीशः ॥ ४६१ ॥

ज्या ब्राह्मणाच्या तळहातावर यूप ( यज्ञस्तंभाचें ) चिन्ह असेल अथवा ब्रह्मतीर्थाचें चिन्ह दिसेल तो सर्व वस्तूंचा अधिपति होईल अथवा अग्निहोत्र्यांत श्रेष्ठ असेल.

एनमपराणि पाणौ शुभसंस्थाना शुभावहा रेखा ॥
किंबहुना मनुजानामशुभा पुनरशुभसंस्थाना ॥ ४६२ ॥

ह्याप्रमाणें इतर अनेक रेषात्मक आकृति शुभवस्तूंच्या निदर्शक अशा असतील तर त्यांचेयोगानें शुभफल मिळतें. तसेंच अशुभ वस्तूंच्या आकृति असतील त्या मनुष्यांना अशुभ फळ मिळेल, हें सांगणें नकोच.

रेखाशास्त्र सम्यक् यो जानाति स्वबुद्धि मात्रपरः ।
आयूरेखोर्ध्वा च तिर्यग्रेखाऽपि ज्ञायते तेन ॥ ४६३ ॥

केवळ आपल्या बुद्धिमत्तेच्या च जोरावर जो हें रेखाशास्त्र स्वतः समजावून घेईल, त्यालाच आयुष्यरेखा, ऊर्ध्वरेखा आणि तिर्यग्रेखा ह्यांच्या रहस्याचें ज्ञान होईल.

एवं शुभाशुभानां रेखाणां यः प्रशस्ततरबोधः ।
निगदित इत्येतावत् समुद्रमुनिना यथा कथित आसीत् ॥ ४६४ ॥

याप्रमाणें शुभाशुभ रेषांचे प्रकार विशेष खुलासेवार रीतीनें आतांपर्यंत सांगितले. ते सर्व समुद्रमुनींनीं ज्याप्रमाणें वर्णिले आहेत त्याप्रमाणेंच प्रदर्शित केले आहेत.



# नारदोक्त " रेखासङ्केत "

हस्तरेषा किंवा सामुद्रिक शास्त्रावर कांहीं सार्वत्रिक स्वरूपाचे व कांहीं विशिष्ट असे अनेक प्राचीन ग्रन्थ संकृत भाषेच्या भाण्डारांत होते. ' होते ' असें म्हणण्याचें कारण त्यांपैकीं बहुतेक आतां लुप्त झाले आहेत आणि थोडे उपलब्ध आहेत ते त्रुटित आहेत. अशाच एका उपलब्ध " त्रुटित " ग्रन्थापैकीं कांहीं भाग पुढें दिला आहे. ह्या " त्रुटित " ग्रंथाचें नांव " रेखासङ्केत " हा नारदांनीं सांगितलेल्या नियमानुसार रचला गेला आहे. हा फार संक्षिप्त आहे. वाचकांनीं हातांचे अनेक ठसे काळजीपूर्वक वठवून घेऊन शास्त्राधारें त्यांचें निरीक्षण केलें तर हा संक्षिप्त भागहि त्यांस अनुभवानें सहज समजेल.

संचिन्तयेद् भगवतश्चरणारविन्दं ।
वज्राङ्कुशध्वज सरोरुहलाञ्छनाढ्यम् ।
उत्तुंगरक्तविलसन्नखचक्रवालं—
ज्योत्स्नाभिराहत महद्‌हृदयान्धकारम् ॥ ४६५

भगवंतांच्या दोन्ही चरण कमलांचें स्मरण भक्तिभावानें करावें. भगवंताच्या चरणांवर ' वज्र ' ' अंकुश ' ' ध्वज ' ' कमल ' हीं शुभचिन्हें स्पष्टपणें असतात. त्या चिन्हांनाहि मनःश्चक्षूनें प्रत्यक्ष पहावें. भगवंतांच्या कृपेचा प्रभाव असा आहे कीं, लाल कमलपुष्पांच्या प्रचण्ड समूहाला एकट्या चन्द्राचा प्रकाश जसा विकसित करून त्यांच्यांतील तमःपटल नष्ट करतो, त्याप्रमाणें भगवंतांच्या आरक्तनखांची प्रभा भक्तांच्या अंतःकरणांतील अज्ञानान्धःकाराचा समूळ नाश करते.

सर्वलक्षणमध्ये तु रेखालक्षणमुत्तमम् ।
हानि–भाग्य करं नृणां नारदस्य वचः स्मृतम् ॥ ४६६

हातापायावरील किंवा देहाच्या इतर भागावरील लक्षणांपेक्षां हस्तरेषा लक्षणें फार श्रेष्ठ आहेत. त्यांच्या योगानें त्या मनुष्याला भोगावयास लागणाऱ्या लाभहानीच्या प्रसंगांचें ज्ञान होतें. असें हे शास्त्र नारदांच्या नियमानुसार सांगतों.

**कनिष्ठाङ्गुलिमूलात्तुरेखा गच्छति तर्जनीम् ।**
**यद्यच्छिन्नाभवेत् साच शतमायुर्विनिर्दिशेत् ।। ४६७**

करांगुली ( ह्म० अगदीं लहान बोट ) तिच्या तळाजवळील उंचवटयापासून ( ज्या अनेक रेषा निघतात त्या तर्जनी आणि आंगठा ह्यांच्या मधल्या जागेकडे जातात म्हणून त्यांना आडव्या "तिर्यक्" रेषा म्हणतात. अशी ) एक आडवी " तिर्यक् " रेषा तर्जनीच्या बाजूकडे जाते. ही रेषा स्पष्ट आणि अखण्ड असावी म्हणजे ती शुभ, ( तुटक किंवा फारच वाकडी-तिकडी असली तर अशुभ ) हिच्यावरून आयुष्य समजतें; रेषा अखण्ड असली तर पुरुष शतायु होतो.

टीपः—रेखा तुटकी असली तर आयुष्य खण्डित, परंतु वांकडी तिकडी असली तर व्याधियुक्त.

**कनिष्ठिका प्रदेशाच्च रेखागच्छति मध्यमाम्**
**अविच्छिन्ना तदा वर्षाण्यशीत्यायुर्भवेद्ध्रुवम् ।। ४६८**

करंगळीच्या मूल प्रदेशांतुन निघणारी आडवी रेषा मधल्या बोटापर्यंतच येऊन जरी थबकेल तरी आयुष्य ८० वर्षांपर्यंत असेल, मात्र आडवी रेषा स्पष्ट अखण्डित पाहिजे. कांहींच्या मतें हें आयुष्य सत्तर वर्षांचें धरावें.

**मूलात्कनिष्ठिकायाश्च रेखा गच्छत्यनामिकाम् ।**
**अविच्छिन्नाच वर्षाणि न्यूनानिच विनिर्दिशेत् ।। ४६९**

करंगळीच्या मुळापासून निघणारी आडवी रेषा जर अनामिकेच्या पुढें अखण्डितपणें गेलेली नसेल तर आयुष्य पुष्कळच कमी असणार.

**कनिष्ठांगुलिमूलात् तु रेखा यदि न दृश्यते**
**पंचाशच्च समायुःस्यात् अल्पायुर्वा भवेत् पुमान्** ४७०

ही करंगळीपासून निघणारी आयुष्य रेषा स्पष्टपणें दिसणारच नाहीं तर पन्नाशीपर्यंतहि मनुष्य जेमतेमच जगेल. बहुश: अल्पायुच.

**कनिष्ठांगुलिमूलाच्च रेखा वा नोपसर्पति ।**
**कुण्ठिता तत्रवाऽदृष्टा विंशत्यायुर्विनिर्दिशेत् ॥** ४७१

कांहीं शास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं, अशारीतीनें आयुष्य रेषा स्पष्ट न दिसली किंवा अगदीं तुटकी असली तर आयुष्य वीस वर्षांचें पुढें जाणार नाहीं.

टीप:—आयुष्यरेषा निश्चित करणें ही यांतील मख्खी आहे. म्हणूनच अनेक व्यक्तींच्या हातांचे ठसे पाहिले पाहिजेत.

**अगुंष्ठस्यैवान्तरालात् तथैव तिर्यग्रेखा दृश्यते हस्तमध्ये**
**एषा दधदायुरैश्वर्यसौख्यमारोग्यं वा ह्यातुरत्वं तथैव ॥४७२**

ज्याप्रमाणें करंगळीच्या मुळापासून आडव्या रेषा निघतात त्याचप्रमाणें आंगठा आणि तर्जनी ह्यांच्या मध्यें जी तळहाताची " कड " आहे तेथूनहि रेखा निघतात. ह्याहि रेषावरून आयुष्य, धनप्राप्ति, सौख्य आरोग्य, व्याधिग्रस्तता इत्यादि अनेक गोष्टींचा उलगडा होऊं शकतो.

टीप:—हा उलगडा " तिर्यक् " रेषा आणि स्वत्वरेषा ह्यांचेवरून होतो.

ही स्वत्व रेषा मनगटापासून निघून आंगठा आणि तर्जनी ह्यांच्यामधील सीमेकडे जाते. हिला इंग्लिशमध्यें Line of Life म्हणतात. दुसरी रेषा तिर्यक् असून ती आंगठा व तर्जनी ह्यांच्यामधून निघते. ह्याप्रमाणें दोन तिर्यक् आणि एक स्वत्व रेषा ह्या रेषा प्रमुख आहेत.

आतां प्राचीनांनीं ठरविलेलीं शुभचिन्हें सांगतातः—

**चक्रं वा रुचिरं च कुंजर–रथ–श्रीवत्स यूपाः शुभाः ।**
**मालाकुण्डलचामरांकुशयुताश्चापध्वजैस्तोमरैः ॥ ४७३**
**मत्स्यस्वास्तिकवेदिकाश्च कमलं शंखातपत्रादिकम् ।**
**पाणौ वा चरणे तदा हि नृपते राज्यं चिरं वर्धते ॥ ४७४**

सुंदर चक्र, तसेंच हत्ती, रथ, श्रीवत्स, यज्ञांतील यूप, हीं चिन्हें शुभ आहेत. फुलांचा हार, कानांतील कुण्डल, चवरी, अंकुश, धनुष्य, ध्वज, तोमर ह्या चिन्हांनीं युक्त असा जो हात तोहि शुभ. मत्स्य, स्वस्तिक, वेदी, कमल, शंख, छत्र, इत्यादि जीं मांगल्यदर्शक किंवा राजचिन्हें म्हणून गणलीं गेलीं आहेत तीं सर्व शुभ होत. अशीं कोणतीं-हीं शुभ चिन्हें तळहात व तळपाय ह्यांच्यावर स्पष्टपणें दिसतील तर चिन्हांकित हात असलेला पुरुष राजा तर होतोच, परंतु त्याचें राज्यहि दीर्घकालपर्यंत टिकतें.

**पाणिमूलादि मध्यान्तं रेखाणां मकराकृतिः ।**
**शुभानि यानि चिन्हानि सूक्ष्माण्यति भवन्ति च ॥ ४७५**

मनगटापासून प्रारंभ होऊन तळहातावर .मत्स्याकृति स्पष्टपणें दर्शविणाऱ्या रेषा असतात, त्या शुभ म्हणजे भाग्य दर्शवितात; परंतु अशीं जीं हीं शुभ चिन्हें असतात, तीं बारीक असल्यानें तितक्याच बारीक नजरेनेंच ओळखावीं लागतात.

टीपः—आपल्या प्राचीन ग्रंथांमध्यें ह्या चिन्हांचें महत्त्व अतिशय आहे. भाग्यशाली राजपुत्रांच्या चक्रवर्तित्वाचीं चिन्हें स्पष्ट असतात असें अनेक ठिकाणीं वर्णन आहे. श्रीरामचन्द्रांचें स्वरूप वाल्मीकि ऋषींनीं " अजानु-बाहुः सुशिराः .लक्ष्मीवाँ शुभलक्षणः " अशा शब्दांनीं केलें आहे. परंतु आतां प्रत्यक्ष प्रमाण आणि गुरुपरंपरा अत्यंत दुर्लभ झाल्याकारणानें हीं चिन्हें अचूक कशीं ओळखावीं ही अडचण सकृद्दर्शनी वाटेल. त्याबद्दल तूर्त इतकेंच लिहावयाचें कीं, हें ग्रन्थप्रकाशन पूर्ण झालें आणि

आमचेकडे जिज्ञासूंनीं योग्य गृहस्थांच्या हातांचे स्पष्ट ठसे पाठवून दिले तर त्यांतील रहस्यप्रकाशन अन्यग्रंथरूपानें सुकर रीतीनें करतां येईल.

" श्रीवत्स " म्हणजे हृदयावर केसांचा विशेष प्रकारचा भोंवरा असतो त्याचें नांव आहे.

**अंगुष्ठमूलादारभ्य तर्जनीमूलगामि यत् ।**
**दीर्घरेखाद्वयं प्रोक्तं नारीपुरुषसंज्ञकम् ॥ ४७६**

आंगठ्याच्या मूळापासून तर्जनीच्या मूळभागाकडे जर दोन रेषा जोडीनें जात असतील तर त्या दोन रेषांना (त्यांपैकीं एक लहान किंवा मोठी असल्यानें) " नारीपुरुष " अथवा स्त्रीपुरुषरेषा असें म्हणतात.

टीपः—स्त्रीपुरुषरेषा ह्या सत्त्वरेषा किंवा " जीवन रेषा " हिच्याशिवाय निराळ्या आहेत. अंगुष्ठमूल म्हणजे प्रत्येक बोटाच्या मुळांशीं जो उंचवटा असतो त्यालाच मूल भाग असें म्हटलें आहे.

**पुरतोऽगुष्ठस्य मूलस्य तर्जन्यांगुष्ठमध्यतः ।**
**रेखैका दृश्यते तिर्यग्गामिनी हस्तमध्यगा ॥ ४७७**

अंगुष्ठमूलाच्या बाहेरून तर्जनी आणि आंगठा ह्यांच्यामधील कडेपासून तळहातामधून जाणारी एक आडवी (तिर्यक्) रेषा असते तिला " अग्रिमा किंवा आदिमा " असें प्राचीन नांव आहे.

**तथैवान्या परा रेखा तिर्यक् गच्छति सर्वदा ।**
**कनिष्ठाङ्गुलिमूलाच्च हस्तमध्ये प्रसर्पति ॥ ४७८**

त्याचप्रमाणें करंगळीच्या उंचवट्याखालून तर्जनीच्या दिशेकडे जाणारी अशी दुसरी एक आडवी (ह्म० तिर्यक् रेषा असते हिला " अपरा " तिर्यक् असें नांव आहे.

टीपः—" अग्रिमा " आणि " अपरा " ह्या ओळखण्याची पंचाईत पडत नाहीं. " अग्रिमा " रेषा जीवन रेषेच्या शेंड्याकडून (तर्जनी

आणि आंगठा ह्यांच्यामधून ) निघते--आणि " अपरा " करांगुळीच्या उंचवट्याखालून निघते. याप्रमाणें हातावरील मुख्य रेषा तीन आहेत.

पहिली " जीवन रेषा " Line of Life.

दुसरी " अग्रिमा " हिला Line of the Head म्हणतात.

तिसरी " अपरा " हिला Line of Heart म्हणतात्.

इंग्लिश पद्धतीच्या नांवांनीं ओळखणें असल्यास—" अग्रिमा " हिला " बुद्धिरेषा " म्हणावें, " अपरा " हिला स्वभाव किंवा " अन्तःकरणरेषा " असें नांव द्यावें. अपवादात्मक अशा कांहीं हातावर ह्या दोन्ही " तिर्यक् रेषा " एकमेकींच्या अगदीं जवळ असतात.

**हस्तमध्यगता रेखा स्तिर्यग्गाश्चापरोर्ध्वगाः ।**
**गभीराः सुस्थिताज्ञेयाः शुभाश्चान्ये तु दुर्भगाः ॥ ४७९**

तळहातावर आणखीहि महत्त्वाच्या रेषा असतात, परंतु त्या मनगटांतून किंवा जीवन रेषेच्या मुळाजवळील भागांतून निघून तळहाताच्या मधून बोटांच्या उंचवट्याकडे जातात. ह्यांना ऊर्ध्वरेषा म्हणतात.

टीपः—ह्याप्रमाणें हस्तरेषांचे प्रकार तीन होतात—

पहिला—जीवनरेषा, आणि नारीपुरुषरेषा ह्यांचा.

दुसरा—" तिर्यक् " म्हणजे आडव्या रेषांचा. ह्यांमध्यें बुद्धिरेषा ( अग्रिमा ), आणि अन्तःकरणरेषा ( अपरा ) ह्या मुख्य आहेत.

तिसरा--ऊर्ध्वरेषांचा. म्हणजे मनगटापासून निघून बोटांच्या उंचवट्याकडे जाणाऱ्या रेषांचा.

ऊर्ध्वरेखा स्पष्ट, खोल, आणि व्यवस्थित असल्या म्हणजे त्या शुभ म्हणजे भाग्य आणि यश दर्शवितात, आणि किरकोळ वांकड्या, तुटक्या असतील तर अशुभ दर्शवितात.

**चक्रांकुशौ च वज्रंच यस्य हस्ते विराजते ।**
**साम्राज्यं प्राप्यते तेन यावज्जन्मसुखान्वितम् ॥ ४८०**

चक्र, अंकुश, वज्र हीं चिन्हें ज्यांच्या तळहातावर दिसतील ते पुरुष चक्रवर्ती असतात अथवा होतात.

अंगुलीपर्वणोऽग्रेच यस्य चक्रंच दृश्यते ।
सर्वोप्सितस्य प्राप्तिः स्यात् स भवेत् सर्वभोगभाक् ॥ ४८१

बोटाचें जें शेवटचें पेरें असतें त्यावरील कातडीमध्यें कांहीं विशिष्ट आकृतीच्या रेषा असतात, त्यांपैकीं ( कांहीं आकृतींना " शंख म्हणतात. इतरांना चक्र म्हणतात. याप्रमाणें ) बोटांच्या पेरांवर " चक्रें " स्पष्ट असलीं अर्थात् प्रत्येक बोटाच्या पेरावर चक्र असलें म्हणजे तो पुरुष भाग्यशाली असतो. तें भाग्य अचल टिकतें.

अंगुल्याग्रेषु शंखस्य विवर्तं यदि दृश्यते ।
पूर्ति–जठरस्य कष्टेन सर्वलोके स मध्यमः ॥ ४८२

पण बोटांच्या पेरांवर शंखाकृति असली तर त्या पुरुषाला निर्वाहाची देखील पंचाईत असते. शंखाकृतिमध्यें देखील वळसे असतात पण मध्यें बिन्दूची खूण नसते. उलटा शंख असणाऱ्या मनुष्यांचा दर्जा नेहमीं द्रव्यदृष्ट्या कनिष्ट असतो.

अंगुष्ठात् पुरतो रेखा यस्य स्पष्टाः समीपगाः ।
उभयोःसंगमं दृष्ट्वा सर्वेषां च स हीप्सितः ४८३

आंगठ्याच्या उंचवट्याभोंवतीं नारी-पुरुषात्मक रेषा असून त्या स्पष्ट असून जर परस्परांपासून दूर नसतील तर तो लोकप्रिय होतो.

अनामिकाया यदि सा पुरस्तात् सर्वतोमुखी ।
तस्य दास्यत्यसौ देवी सर्वा विद्याः सरस्वती ॥ ४८४

अनामिकेच्या उंचवट्याजवळ जर अशा रेषा असतील तर त्या पुरुषाला देवी सरस्वतीच्या कृपेनें सर्व विद्यांची प्राप्ती होईल.

टीपः—ह्या नाडीपुरुष रेषा पुष्कळ प्रकारचे हात पाहिल्याशिवाय

कळणार नाहींत. पुढील श्लोकांत सांगितलेली " **वनमाला** " म्हणून जी रेषा आहे. तीहि नवीन अभ्यासु जिज्ञासूंच्या लक्षांत येणें कठिण आहे.

**हस्तमूले तु या रेखा वनमाला प्रकीर्तिता ।**
**सर्वसिद्धिकरा दिव्या रत्नादीनांच दत्वरी ॥ ४८५**

तद्वतच हस्तमूलापासून जी एक विशिष्ट रेषा निघते तिला " **वनमाला** " म्हणतात. ही रेषा ज्याचे हातावर असेल त्याला रत्नें मिळतील इतकेंच नव्हे तर त्याच्या हातीं वाटेल ती सिद्धि आपोआप येईल.

**एषा रेखा सुसूक्ष्माच महायासेन दृश्यते ।**
**तस्मात् दैवविदां नित्यं दृष्टव्या सा प्रयत्नतः ॥ ४८६**

परंतु रहस्य हेंच कीं ही रेषा सहजासहजी ओळखतां येत नाहीं. ती ओळखण्यास प्रयास फार पडतात. म्हणून दैवज्ञानें भाग्यशाली पराक्रमी पुरुषांच्या हस्तांचें अवलोकन करून ( अलिकडल्या पद्धतीनें त्यांच्या हातांचे ठसे पाहून ) प्रयत्नानें त्याचें ज्ञान करून घ्यावें.

**हस्तमूलप्रदेशे या शुभ्रा रेखा च दृश्यते ।**
**धनधान्यस्य लाभः स्यात् तया सौख्यंच लभ्यते ॥ ४८७**

हाताच्या मूलस्थानीं म्हणजे मनगटाची जी कोर तिच्या जवळून जाणारी एकादी श्वेतवर्णरेषा असेल तर त्या पुरुषाला धनधान्याचा लाभ तर होतोच पण इतर दृष्टीनेंही सौख्य लाभतें ॥

टीपः—ह्या श्लोकांतील श्वेतरेषा हा पाठ दुर्बोध आहे.

**चक्रांकितांगुलिर्यस्य स नरो भाग्यवान् भृशम्**
**दशचक्रान्वितो राजा चक्राभावे च दुःखितः ॥ ४८८**

ज्याच्या बोटांवर चक्रें असतील म्हणजे दहापैकीं बऱ्याच बोटांवर चक्रें असतील तो धनवान् असतो. आणि दहाहि बोटांवर चक्रें असलीं तर जमीनदार किंवा राजा होतो. आणि कोणत्याच बोटावर चक्र नसेल तर तो दुःखी—कष्टी असतो.

सर्वांगुलीनां चक्राणि दृश्यंते यदि पर्वसु ।
ईश्वरेऽस्य परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥ ४८९

किंवा ज्याच्या सर्व बोटांच्या पेरांवर चक्रेंच असतील त्याची परमेश्वरावर, देवांवर आणि गुरुजनांवर अनन्य भक्ति असते.

टीपः—-दहा शंख असणारे लोक जसे कमी तद्वतच दहाहि बोटांवर चक्रें असणारे लोक कमीच असतात.

रेखा कनिष्ठाङ्गुल्याश्च समीपे यदि वर्तते ।
तयाऽसौ मन्त्री भवति पुरुषो नात्र संशयः ॥ ४९०

करंगुळीच्या जवळ एक विशिष्ट प्रकारची रेषा असली तर तो पुरुष राजाचा मंत्री असावयाचा. ह्यांत संशय नको.

कनिष्ठिकाऽधो या रेखा सा स्यात् पत्नी-प्रदायिनी
करमध्यगता तिर्यक् स्वर्गभोगान् प्रदास्यति ॥ ४९१

करंगळीच्या खालच्या उंचवट्यांतूनच कांहीं तिर्यक् (म्ह० आडव्या) रेषा लहान लहान निघतात ह्या विवाहदर्शक रेषा होत. अशीच तिर्यक् रेषा जर हाताच्या मध्यभागीं जात असेल तर त्या पुरुषाला स्वर्गभोगाप्रमाणें उपभोग लाभतील.

मणिबन्धोत्थिता रेखा हस्तमध्ये प्रसर्पति ।
ऊर्ध्वरेखोच्यते साच शुभाशुभ-विमर्शिनी ॥ ४९२

जी रेषा मणिबन्धापासून निघून थेट तर्जनी मध्यमा यांपैकीं कोणत्या तरी बोटाच्या उंचवट्यापर्यंत जाते तिला ऊर्ध्वरेषा म्हणतात. ह्या ऊर्ध्वरेषेवरून शुभाशुभ फल सांगण्याचा प्रघात आहे. (तिर्यक् रेषा आणि ऊर्ध्वरेषा असा स्पष्ट भेद आपल्या शास्त्रांत आहे) ह्या ऊर्ध्वरेखा तीन आहेत.

अनामिका–मूलगा स्यात् ऊर्ध्वरेखा स पुण्यभाक् ।
अन्योर्ध्वगा भवेत् सा या तर्जनीं प्रति गच्छति ॥ ४९३

( वर ऊर्ध्वरेषा कोणत्या तें सांगितलेंच आहे ) अशाच प्रकारची एक उर्ध्वरेषा मणिबंधापासून ( मनगटापासून ) निघून अनामिकेच्या उंचवट्यापर्यंत जाते असा पुरुष पुण्यवान् असतो.

तशीच दुसरीहि एक उर्ध्वगा रेषा कोणाकोणाच्या हातावर असते, ती तर्जनीपर्यंत जाते.

निर्गता करमूलात् तु रेखाऽनामिक–मूलगा ।
सर्वा विद्या भवेत्तस्य लोके पूज्यः सुखी भवेत् ॥ ४९४

तसेंच ज्याच्या हातावरील ऊर्ध्वरेषा अनामिकेपर्यंत स्पष्टपणें जाऊन भिडते, त्याला सर्वप्रकारच्या विद्या साध्य होतील आणि तो पुरुष सर्व लोकांत पूज्य ठरेल.

मणिबन्धात् गता रेखा मध्यमामूलसन्निधौ ।
धनभाक् स नरो भवति नित्यंच सुखमेधते ॥ ४९५

ऊर्ध्वरेषा मणिबन्धापासून (मनगटापासून) निघून मधल्या बोटाच्या उंचवट्यापर्यंत जर जात असेल तर तो पुरुष धनवान् तर होतोच पण सर्व आयुष्यभर त्याला सुखच लाभतें.

पाणिमूलागता रेखा मध्यांगुलनिवेशिनी ।
शस्त्रान्नैव भयं तस्य स नरो सुखभाग्भवेत् ॥ ४९६

तसेंच ही जी ऊर्ध्वरेषा मणिबन्धापासून निघते आणि मधल्या बोटापर्यंत जाते अशी असेल तर त्याला शस्त्रास्त्रापासूनहि मृत्यु येत नाहीं.

टीपः——ह्या ऊर्ध्वरेषेला इंग्लिशमध्यें Line of Saturn किंवा Line of Fate म्हणतात. जन्मभर सुख आणि भाग्य ह्याचा अर्थ इतकाच कीं अशा मनुष्याला अडचणी येत नाहींत परिस्थिति अनुकूल असते.

विशदा बहुला हस्ते रेखा भाग्यं विवर्धते
सूक्ष्मा यदिच स्वल्पा स्यात् द्रव्यहीनो नरो भवेत् ॥ ४९७

( वर अनेक वेळां सांगितलेंच आहे कीं ) रेषा कोणतीही असो ती स्पष्ट म्हणजे ठसठशीत, खोल, आणि व्यवस्थित असली पाहिजे. अशा रेषा ज्याच्या हातावर अधिक असतील त्याचें भाग्य वृद्धिंगत होतें यांत आश्चर्य नाहीं. परंतु ह्याच रेषा अस्पष्ट, किरकोळ, तुटक्या असल्या तर मात्र तो पुरुष द्रव्यहीन असतो.

तलहस्तगता रेखा आरक्ता यदि दृश्यते ।
आयुःसुखकरी चैव वर्तते नात्रसंशयः ॥ ४९८

तळहातारील रेषा मग ती " तिर्यक् " असो " ऊर्ध्वगामी " असो, ती आरक्त असली ( म्हणजे लाल असली—काळी नसली ) तर त्या पुरुषाचें आयुष्य सुखामध्यें जाणार. त्याला दुःखाचे प्रसंग फारसे येणार नाहींत ह्याविषयीं शंका बाळगूं नये.

येषां हस्ततले रेखा कृष्णा ते दुःखभागिनः ।
द्रारिद्र्यार्ति–परिक्लिष्टा भवन्ति व्याधिपीडिताः ॥ ४९९

ज्याच्या हातावरील रेषा लालसर नसून काळसर, पिवळट, मळकट असतात, त्यांच्या वाटयास दुःख जास्त, त्यांना दारिद्र्याची पीडा भोगावी लागते, तसेंच आधिव्याधिमुळेंहि त्याचे हाल होतात.

हस्तमध्ये मत्स्यरेखा दृश्यते चोल्बणाऽपि च ।
धनं कीर्तिं च पुत्रांश्च लभतेऽसौ नरो ध्रुवम् ॥ ५००

तळहातावर रेषांनीं बनलेली मत्स्याची आकृति जर स्पष्ट दिसेल तर त्या पुरुषाला धन कीर्ति, पुत्र, पौत्र, ह्यांचा लाभ खात्रीनें होईल.

अपि चक्रं च पद्मंच हस्ते चिन्हंच दृश्यते ।
अपारसंख्यद्रव्यस्य प्रार्जनं लभते नरः ॥ ५०१

चक्र आणि कमळ ह्यांच्या आकृति जर तळहातावर स्पष्ट दिसतील तर त्या पुरुषाजवळ द्रव्यनिधि अपरंपार असेल. किंवा त्याच्या वार्धक्या-पूर्वी त्याला तितकें द्रव्य त्याच्या उद्योगधंद्यांत मिळेल.

यस्य मीनो भवेत् हस्ते सत्यसन्धःस पुण्यवान् ।
उपकारप्रवृत्तोऽसौ क्लेशान् धैर्याव्यदपोहति ॥ ५०२

ज्याच्या हातावर मत्स्याचें चिन्ह असेल. ( तो धन, कीर्ति यांनीं युक्त होईल हें सांगितलेंच पण शिवाय ) तो पुरुष ( हरिश्चन्द्राप्रमाणें ) सत्यवक्ता आणि पुण्यवान् निपजेल. तो इतरांवर उपकारच करील आणि त्या कामीं पडतील ते कष्ट धैर्यानें सोशील.

स्वस्तिकाद् लभते भाग्यं धनुषः सर्व—वन्दितः ।
श्रीवत्साद् विन्दते लक्ष्मीं गवाद्यं दाससेवकान् ॥ ५०३

तळहातावर स्वस्तिक चिन्ह असलें तर भाग्यशालित्व येतें. धनुष्याचें राजचिन्ह असल्यास सर्वांना वन्दनीय होतो, श्रीवत्सचिन्ह हृदयावर असेल, तर लक्ष्मी, गोधन, दासदासी ह्यांचा भरपूर लाभ होतो.

ध्वजवतपत्रंच शंखपद्मदलानिच ।
पाणिपादतले सन्ति यस्यसौ चक्रवर्तिराट् ॥ ५०४

ध्वज, वज्र, छत्र, शंख, पद्मपत्र इत्यादि चिन्हें तळहातावर असोत, तळपायावर असोत, असा पुरुष साम्राज्याधिपति असतो किंवा होतो.

आयातास्ते च गंभीराः सुखाय मधुपिंगलाः ।
विशदाः सुघटिताश्चाथ सद्भाग्याय भवन्ति ते ॥ ५०५

रेषा लांबकचक, खोलगट, आणि आरक्त किंवा मधाप्रमाणें पिंगट असाव्या. त्याचप्रमाणें स्पष्ट आणि व्यवस्थित असाव्या म्हणजे त्या भाग्यशालित्व दर्शवितात.

छिन्ना सपल्वला रूक्षा विषमाः सूक्ष्मवक्रगाः
विवर्णाःस्फुटिताः कृष्णा दुर्भाग्याय भवंति ते ॥ ५०६

तुटक्या तुटक्या, रुक्ष, कांहीं ठिकाणीं खोलगट, त्यापुढें कांहीं ठिकाणीं उथळ, कांहीं ठिकाणीं रुंद, पुढें कांहीं ठिकाणीं बारीक,

वांकड्या तिकड्या अशा असल्या; अथवा मध्येंच त्यांच्या ठिकाणीं ( पल्वल ) पोकळ जागा उत्पन्न झाली असली म्हणजे अशा रेषा अशुभ दर्शवितात. तसेंच रेषा पांढऱ्या फटफटीत, फांटे फुटलेल्या, काळवंडलेल्या अशाहि असूं नयेत, त्या दुर्भाग्य दर्शवितात.

टीपः—पल्वल म्हणजे रेषा घेर घेऊन मध्यें पोकळी उत्पन्न करते तिला "पल्वल" म्हणतात. इंग्लिशमध्यें पल्वल म्हणजे Island.

स्फुटिताग्रे बहुक्लेशो निरग्रे निर्धनस्तु सः ।
आरक्तरेखो भोजःस्यात् कृष्णया प्रेष्यतां व्रजेत् ॥ ५०७

रेषांच्या शेवटाला फाटे फुटले असले तर क्लेश प्राप्त होतात. आणि रेषेला शेंडाच नसला तर द्रारिद्र्य येतें. परंतु रेषा लाल असली तर भोग, आणि मळकट किंवा काळी असली तर दुसऱ्याची हलकी नौकरी करावी लागते.

सूक्ष्माभिश्चैव रेखाभिर्वक्राभिरथ निर्धनः ।
रक्ताभिः सुखमाप्नोति भ्रंशं धूसरयाऽप्नुयात् ॥ ५०८

हस्तरेषा पुसट पुसट, बारीक, वांकड्या किंवा नागमोडी अशा असल्या तर निर्धनता प्राप्त होते. रेषा लाल असल्या तर सुख, पण काळ्या किंवा धुरकट रेषेनें द्रव्यनाश सूचित होतो.

अंगुष्ठ–मूलगा रेखा विपर्यस्ता यदि स्थिता ।
विमनस्को नरः प्रायो भवतीति वचः स्मृतम् ॥ ५०९

आंगठ्याच्या मूलप्रदेशीं असणारी रेषा भलत्याच दिशेकडे झुक-लेली असेल तर तो मनुष्य प्रायः उदासीन, खिन्न मनाचा असतो. त्यानें खिन्न असावें अशीच परिस्थिति पुष्कळ वेळां असतें असें तज्ज्ञांचें म्हणणें आहे.

अंगुष्ठमूलरेखाश्च बन्धुवर्गं दिशांति च ।
सुस्थिताः यदि वा नित्यमुपभोगानूभुनक्ति सः ॥ ५१०

आंगठ्याच्या मुळाशीं असणाऱ्या रेषांवरून बन्धुवर्गाचें ज्ञान होतें, आणि त्या रेषा असाव्या तशा असतील तर त्याला उपभोगांची केव्हांहि उणीव भासणार नाहीं. नेहमीं चैन चालेल.

रेखया भिद्यते रेखा तयाल्पायुर्भवेद्ध्रुवम् ।
धनुःपद्मं तोरणं स अशीत्यायुश्च विन्दति ॥ ५११

सुव्यवस्थित रेषा दुसऱ्या रेषेनें विच्छिन्न केली किंवा कापली ( आणि ती रेषा आयुष्य रेषा असेल ) तर त्या मनुष्यांस अपघात होईल किंवा तो अल्पायुषी होईल. परंतु त्याच रेषेच्या जवळ जर धनुष्य, कमल, तोरण इत्यादि शुभ चिन्हें असतील तर अपमृत्यूंतून तो वाचेल.

स्त्रीपुंसयो मध्यमकुण्डलेस्थिते, हास्यं रति-क्रीडन केलयःसदा ।
तत्रस्थले कर्कर नामचक्रं भवेद्यदिस्यात्स नरोत्वकिंचनः ॥ ५१२

स्त्रीपुरुष रेषेच्या जवळ किंवा मधोमध जर कुण्डल चिन्ह असेल तर त्या स्त्रीपुरुषांचें प्रेम इतकें जोरदार असतें कीं, त्यांचा काल हांसणें, चैन, नानाप्रकारचे खेळ व थट्टा मस्करी यांत जातो. परंतु तेथें जर कर्कर नामक चिन्ह असलें तर तो पुरुष निर्धन होतो.

टीपः—कुण्डल, कर्कर ह्या चिन्हांचा बोध नीट होत नाहीं.

अनामिकाङ्गुलिमूलेच यदि रेखा द्वयं स्थितम् ।
धनपुत्र समृद्धिश्च नरोऽसौ सुखभाग् भवेत् ॥ ५१३

अनामिका नामक बोटाच्या उंचवट्याजवळ दोन विशेष प्रकारच्या रेषा जर असल्या, तर त्या पुरुषाला धनसमृद्धीचा लाभ, आणि सुखोपभोग होणार असें समजावें.

अंगुलिमूलभागेषु सन्त्युच्छ्रायानतोन्नताः ।
तान् उपसरान्ति मणिबन्धोत्थिता पल्लवोर्ध्वगाः ॥ ५१४

प्रत्येक बोटाच्या मुळाजवळ एक टणक भाग असतो, त्याल

'उंच्छ्राय' किंवा उंचवटा असें म्हणतात, हे उंचवटे कमी अधिक प्रमाणानें स्पष्ट अस्पष्ट असतात, आणि मनगटांतून निघणाऱ्या ऊर्ध्वरेषा ह्यांपैकीं कोणत्याना कोणत्या तरी उंचवट्याच्या दिशेनें जात असतात.

टीपः—अशा उंचवट्यांना इंग्रजींत Mounts म्हणतात.

## यवचिन्हानि

तर्जनीमूलसंपृक्तौ यवौ पुत्रार्थदौ क्रमात् ।
मीनपुच्छाङ्कितौ स्यातां धनरेषान्वितौ यदि ॥ ५१५

तर्जनीच्या उंचवट्याशीं जर दोन यवचिन्हें असतील तर पुत्रप्राप्ति होईल आणि जर ते मत्स्यपुच्छाप्रमाणें दिसत असतील आणि त्यांचा धनरेषेशी योग होत असेल तर धनप्राप्तीहि होईल.

मध्यमायां यवश्चैवाप्यंगुष्ठे च धनप्रदः ।
अंगुष्ठोदर मध्येतु यवो यदि भवेत् खलु ॥ ५१६

मधल्या बोटावर किंवा अंगठ्यावर यवचिन्ह स्पष्ट असेल तर धनप्राप्ति होईल. परंतु आंगठ्यावरील हा आंगठ्याच्या मधल्या हाडावर असावा. ( यव पाहतात तो आंगठ्यावरच बहुतकरून पाहतात ).

उपभोगक्षमो स्यात् सोऽप्यंगुलीषु यवान्वितः ।
सर्वत्र यवमालाभ्यो राजमन्त्री भवेत् बुधः ॥ ५१७

बहुतेक बोटावर जर अनेक यव असतील तर तो पुरुष बुद्धिमान् असून राजाचा मन्त्री म्हणजे प्रधान होईल आणि शिवाय तो अशा यवचिन्हामुळें अनेक उपभोग भोगणारा होईल.

एकेनापि यवेन स्यात् नरो बहुधनान्वितः ।
मणिबन्धेयदि स्यात् च स नरो भूमिधारकः । ५१८

महत्त्वाच्या एका बोटावरच जरी यव असला तरी त्या पुरुषाला

विपुल धनप्राप्ति होईल ( मग अनेक यव असल्यावर होईलच होईल ) मनगटाच्या ठिकाणीं यव असल्यास भूमिपति होईल.

दक्षिणायां करांगुल्यां यवोयस्य विराजति ।
सर्वविद्या प्रवीणोऽसौ नरो भवति सर्वशः ॥ ५१९

ज्याच्या उजव्या हाताच्या करंगळीवर यव स्पष्टपणें असेल तो सर्व प्रकारच्या विद्यामध्यें प्रवीण होईल आणि त्याची सर्वतोपरी, सर्व ठिकाणीं वाहवाच होईल.

शुक्लपक्षे जनुर्ब्रूयात् दक्षिणाङ्गुष्ठगैर्यवैः ।
कृष्णपक्षे वदेत् जन्म वामाङ्गुष्ठगतैर्यवैः ॥ ५२०

जर उजव्या आंगठ्यांवर ठळक यव असेल तर जन्म शुक्ल पक्षांत झालेला आहे. आणि डाव्या हातावर यव अस्पष्ट असेल किंवा आंगठ्यावर यव असेल किंवा नुसती रेषाच असेल तर जन्म कृष्ण पक्षांत झालेला आहे असें सांगावें.

यद्यंगुष्ठद्विपर्वश्च यवरेखा विराजति ।
वसुलाभोभवेत्तस्य सर्वभोगसुखात्मकः ॥ ५२१

जर आंगठ्याच्या प्रत्येक पेरावर यव असले तर त्या पुरुषाला द्रव्यलाभ अशाप्रकारचा होतो कीं, त्याला त्यापासून सुखोपभोग घडतात ( द्रव्य असून उपभोग नाहीं असें होत नाहीं. )

अङ्गुष्ठाश्रायिणी सौख्य मूर्ध्वरेखा ददात्यसौ ।
मंत्री वा सचिवः पुरुषस्तर्जनीं गतया भवेत् ॥ ५२२

ऊर्ध्वरेषा आंगठ्याकडे वळलेली असली तर सौख्यप्राप्ति होते, तर्जनीकडे वळलेली असली तर तो पुरुष मंत्री किंवा राजाचा कोणताहि अमात्य किंवा सचिव होतो.

**मध्यमा गतयाऽऽचार्यः ख्यातो वा सैन्यपो भवेत् ।**
**अनामिक्यां गतायांच स्वार्थवाहो महाधनः ।** ५२३

उर्ध्वरेखा मधल्या बोटाकडे गेली असली तर आचार्य किंवा सेनापति होतो. अनामिकेकडे गेली तर मोठा धनाढ्य व्यापारी होतो.

**कनिष्ठिक्या गतायांतुरेखायां श्रेष्ठतां व्रजेत् ।**
**एवं फलानि रेखाया ऊर्ध्वायाश्च भवन्ति हि ॥** ५२४

करंगळीकडे उर्ध्वरेखा गेली तर बुद्धीमध्यें श्रेष्ठता पावेल. ह्याप्रमाणें ऊर्ध्वरेखांचीं निरनिराळीं फलें सांगितलीं आहेत.

**टीपः**—हस्तसामुद्रिक शास्त्राचे अर्थात् हस्तरेषा आणि हातावरील अनेक निरनिराळ्या शुभाशुभ चिन्हांवरून भविष्यकालीन गोष्टींचा निर्णय करण्याचे अनेक लहानमोठे ग्रंथ आहेत. त्यांत कांहीं अगदीं त्रुटित आहेत, कांहीं विस्तृत आहेत, तर कांहींमध्यें उगाच फालतुक वर्णनाचेंच प्रस्थ फार आहे. कांहीं हस्तलिखितांत २५–३० श्लोकच पण ते सूत्रात्मक व सारसंग्रहासारखे दिले आहेत. ह्या सर्वांचा समन्वय करून त्यांतील उद्‌बोधक व रहस्य दिग्दर्शक असा जो भाग आम्हांस वाटला तो ह्या ग्रंथांत दिला आहे. मद्रास प्रांतांत तामील भाषेमध्यें हस्तरेषाफल विवेचनाचे व भविष्यफलदिग्दर्शनाचे कांहीं ग्रंथ आहेत असें सांगतात व त्यावरून सांगणारेंही कांहीं सामुद्रिक आढळतात पण ज्यावरून ते फलें दर्शवितात, ते नाडीग्रंथ संस्कृतमध्यें नसल्यानें त्यांचा परामर्ष घेतां येत नाहीं. तथापि उपलब्ध अशा ग्रंथांचा विचार करून यांत महत्त्वाचा भाग दिला आहे.

---

# स्त्रीलक्षणाध्यायः

इह देहसंनिवेशः संस्थानं तस्य लक्षणमिदानीम् ॥
आपादतलशिरोजप्रांतस्य शुभाशुभं वक्ष्ये ॥ ५२५ ॥

आतां स्त्रियांसंबंधीं विशेष लक्षणें वर्णिलीं आहेत तीं सांगतों. त्यांत स्त्रियांचा बांधा, देहाची घडण इत्यादि प्रकार पायापासून ते मस्तकापर्यंत शुभाशुभ दृष्टीनें सांगितले पाहिजेत.

## अथ शारीरम्

प्रपादतलं स्याद्रेखाश्चक्रादयस्ततोऽगुष्ठः ॥
अंगुल्यस्तदनु नखः पृष्ठं गुल्फद्वयं पार्ष्णिः ॥ ५२६ ॥

पायाचा तळवा प्रथम घेऊं. त्याचा विचार प्रथम; त्यावरहि रेखा, चक्र इत्यादि चिन्हें पहावयाचीं असतात. नंतर पायाचे आंगठे तशींच बोटें, नखें, पायाचा पृष्ठभाग, घोंटा, टांचा हे भागही पहावे लागतात.

जंघाद्वितयं रोमाणि•जानुनी ऊरू काडयुन्नगलम् ॥
अथो कटिरथनितंबबिंबस्फिजौ भगं जघनमथ बस्तिः ॥५२७॥

तसेंच पोटऱ्या, त्यावरील लव, गुडघे, मांड्या कटिप्रदेश, नितम्ब, त्यांतील फुगीर बाजू ( स्फिक् ), बेंबीच्या खालचा भाग, बस्तिप्रदेश इत्यादि विभाग शक्य व अवश्य तरच पहावे.

नाभिः कुक्षिद्वितयं ततश्च पार्श्वद्वयं तथा जठरम् ॥
माध्यं त्रिवलीरोमावलिसहितं हृदयमथ वक्षः ॥ ५२८ ॥

बेंबी पार्श्व, कांखा, पोट, त्याच्या आजूबाजूचा भाग, पोटावरील त्रिवलि, रोमावलि, हृदय, छाति हेहि भाग पहावे.

**टीपः**—हे भाग पुरुषाच्या दृष्टीस पडणें संभवनीय नाहीं; तथापि हे भागहि सामुद्रिकांच्या पहाण्यांत पूर्वी कोणत्या रीतीनें व कोणत्या स्त्रियांचे येण्याचा संभव होता व आले हे सांगतां येत नाहीं.

उरसिचुचकुचयुगुलं जत्रुयुगं स्कंधयास्तदनुयुगम् ॥
अंसद्वयमथ कक्षाद्वितयं तथा भुजद्वंद्वम् ॥ ५२९ ॥

स्तन, चूचुके, मानेची ठेवण, खांदे आणि त्यांचा बांधा, त्यांचा घोटीवपणा, घेर, दोन्ही बाजू, बाहू–दंड यांचेंहि निरीक्षण करावयाचें असतें.

मणिबंधः पाणियुगं तस्य च पृष्ठतलं ततो रेखाः ॥
अंतरंगुष्ठोंऽगुलयो नखलक्षणमथ वानुपूर्विकया ॥ ५३० ॥

अग्रहस्त, मनगटें, दोन्ही हात, हाताचा पृष्ठभाग, तळहात, रेषा, आंगठा, त्याची रचना, पेरें, बोटें, नखें इत्यादि भाग यथायोग्य रीतीनें क्रमाप्रमाणें पहावयाचे असतात.

पृष्टिः कृकाटिकाथो कंठश्चुबुकं हनू कपोलयुगम् ॥
वक्तृमधरोत्तरोष्ठदंता जिव्हा ततस्तालु ॥ ५३१ ॥

पाठीचा कणा, पाठीचा विस्मृतपणा, मानेची मागील बाजू, गळा, हनुवटीचा खालचा भाग, हनुवटी भागाची ठेवण, गालांची रचना तोंडाची जिवणी, दोन्ही ओष्ट प्रांत, दांत,. जिव्हा, टाळु इत्यादि अवयवांचेहि महत्त्व आहे.

घंटिहसितं नासाक्षुतमक्षिद्वितयमथ च यक्ष्माणि ॥
भ्रूकर्णयुगललाटं सीमंतः शीर्षमथ केशाः ॥ ५३२ ॥

गळ्याची घांटी, हास्याचा प्रकार, नाकाचें प्रमाण, नाकपुड्या, दोन्ही डोळे, पापण्या, पाहाण्याची लकब, भिवया, कान, कानशील, कपाळ, मस्तक, केसांचा वर्ण, तलमपणा हेहि पाहिले पाहिजेत.

पादतलमुष्णमरुणं मांसलमस्वेदनं स्निग्धम् ।
भूसुप्रतिष्ठितं स्यात्स्त्रीणां भोगनिष्ठिताय स्यात् ॥ ५३३ ॥

पायाचे तळवे लाल आहेत कीं नाहींत? उबदार, मांसल, कोरडे, मऊ, तजेलेदार आहेत कीं नाहींत, पावले जमिनीवर पुरीं टेकली जातात किंवा नाहीं, यांवर स्त्रीचें भाग्यसुख अवलंबून असतें. म्हणून—

रूक्षं खरं विवर्णं चरणतलं भवति भोगनाशाय ॥
अरसितं दौर्भाग्याय श्वेतं दुःखाय योषाणाम् ॥ ५३४ ॥

पावलांचे तळवे रूक्ष, खरखरीत, निस्तेज किंवा काळवंडणारे असे असले तर त्या स्त्रीला सुखोपभोग लाभत नाहीं. काळसर तळवे दुर्भाग्य सुचवितात आणि पांढरे फटफटीत तळवे क्लेशकारक असतात.

कृतिभिः श्रेष्ठा कुटिलैः स्याद्दुर्भगा चरणतलैः ॥
शुष्कैः निःस्वा विषमैः शोकजुषा दुःखिता मृदु ॥ ५३५ ॥

पायाच्या तळव्यावर आकृति यथोचित असल्या तर स्त्री श्रेष्ठ पदवीस पोहोंचते. परंतु चिन्हें वेडींवाकडीं असलीं तर स्त्रीला क्लेश भोगणें प्राप्त होईल. तळवे अगदीं वाळलेले असे असले तर निर्धनत्व, खडबडीत असले तर शोकार्त आणि फाजील मऊ किंवा कडक असले तर दुःखप्राप्ति.

चक्रस्वास्तिकशंखध्वजाभुजछत्रमीनमकराद्याः ॥
जायंते पादतले यस्याः सा राजपत्नी स्यात् ॥ ५३६ ॥

चक्र, स्वस्तिक, शंख, ध्वज, कमल, छत्र, मत्स्य, मकर इत्यादि दुष्प्राप्य चिन्हें जर पायाच्या तळव्यावर असतील तर ती राजपत्नी होणार ह्यांत संशय नको.

श्वशृगालमहिषमूषकबकोलूककरभाद्याः ॥
चरणतले जायंते यस्याः सा दुःखमाप्नोति ॥ ५३७ ॥

कुत्रा, कोल्हा, महिष, घुबड, बगळा, उंदीर, करभ इत्यादि आकृति जर पायाच्या तळव्यावर दिसतील तर ती स्त्री दुःख भोगणारी आहे असें समजावें. म्हणजे बरेंच आयुष्य दुःखामध्यें जाईल.

मांसोपचितोऽगुष्ठः समुन्नतो वर्तुलः शुभाय स्यात् ॥
ऱ्हस्वाश्चिपिटोवक्रः कुलक्षयाय ध्रुवं स्त्रीणाम् ॥ ५३८ ॥

आंगठा ठसठशीत, वरचा पृष्ठभाग उंच, वाटोळा, फार लहान नाहीं असा असेल तर शुभ. पण आखूड, चपटा, वाकडा असा आंगठा स्त्रीचा असला तर संततीला धोका असतो.

वैधव्यं विपुलेन द्वेष्यत्वं स्वल्पवर्तुलेन स्यात् ॥
मरणावमानता पुनरंगुष्ठे नातिदीर्घेण ॥ ५३९ ॥

फार मोठा आंगठा असला तर वैधव्य, आखूड वाटोळा परंतु बारीक असेल तर कोणाशीच पटावयाचें नाही. आंगठा फारच लांबट असला तर पदोपदीं अपमान सोसावा लागेल.

मृद्वोऽङ्गुलयः शोणा पद्मांबुजस्येव कोमलदलानि ॥
सरला घनाः सुवृत्ताः समुन्नता भोगलाभाय ॥ ५४० ॥

परंतु बोटें मऊ, तांबूस आणि राकट नसून सुकुमार, सरळ, ठाकठीक, मांसल, वाटोळीं, थोडीं उंचावलेलीं अशीं असलीं म्हणजे सुखसंपत्ति प्राप्त होईल.

चक्रादिचिन्हमध्ये स्यादेकं बहूनि वा यासाम् ॥
ऐश्वर्यं सौभाग्यं वा तासामपि तदनुमानेन ॥ ५४१ ॥

चक्र, स्वस्तिक इत्यादि जीं चिन्हें भाग्यशाली व्यक्तीच्या तळहातावर किंवा तळपायावर असतात म्हणून सांगितलें, त्यांपैकीं कांहीं किंवा बरीचशीं चिन्हें जरी हातावर असलीं तरी त्या स्त्रियांना ऐश्वर्य आणि सौभाग्य प्राप्त होईल हेंच अनुमान वरील अनुरोधानें निघतें.

ऊर्ध्वा रेखांघ्रितले यावन्मध्यांगुलिं गता यस्याः ॥
सा लभते पतिमाढ्यं प्रिया पुनर्भवति तस्यापि ॥ ५४२ ॥

तळपायावर ऊर्ध्वरेखा असून ती पायाच्या मधल्या बोटापर्यंत जाऊन पोहोंचत असेल तर त्या स्त्रीला असा पति मिळेल कीं तो धनसंपन्नच असेल आणि त्याला तीच स्त्री अतिशय प्रिय होईल.

अतिदीर्घाः कुलटात्वं ददति कृशा निर्धनत्वमथ पृथवः ॥
स्थूला दुःखं विरला रूक्षाः शुष्काः पुनर्नैःस्व्यम् ॥ ५४३ ॥

आंगठा प्रमाणाबाहेर लांब असेल तर स्त्री कुलटा होण्याचा संभव, आणि आंगठा अगदीं किरकोळ असेल तर दारिद्र्य, आणि उगाच

फाजील रुंद, धोबड असा असेल तर दुःख; विरल म्हणजे विसविशीत, रूक्ष शुष्क असेल तरी दारिद्र्यच.

पूर्वसुकृता यस्यास्तनवोऽगुल्यः परस्परारूढाः ॥
हत्वा बहूनपि पतीन्दासी जायते नित्यम् ॥ ५४४ ॥

पूर्वीच्या दोषामुळें जिचीं बोटें बारीक खरीं पण एकमेकांपेक्षां उंच दिसतात, म्हणजे मध्येंच उंच, मध्यें सखल अशीं असतात ती पतीला सोडून दुसऱ्याची दासी होते.

यस्याः पथि प्रयांत्या रेणुगणः क्षितितलात्समुच्छ्लंति ॥
सा न कदाचन शस्ता कुरुते कुटिला स्वकुलविनाशं च ॥५४५॥

रस्त्यानें जात असतां जिच्या पावलांच्या ठोकरीनें वाटेवरची धूळ उडत राहते, अशा चालीची स्त्री पतीला शुभकारक नव्हे. ती कपटी असते आणि कुटुंबामध्यें नाशकारक परिस्थिति निर्माण करते.

यांत्या नित्यं यस्या न स्पृशति कनिष्ठिकांगुलिर्भूमिम् ॥
सा हत्वा पतिमाद्यं सद्यो रमते द्वितीयेन ॥ ५४६ ॥

जी स्त्री चालत असतां तिच्या पावलांची करंगळी जमीनीवर टेकत नाहीं, ती स्त्री पतीच्या नाशास कारणीभूत होऊन दुसऱ्या पुरुषाबरोबर खुशाल चैनींत राहणारी आहे असें समजावें.

यस्याः स्पृशति न भूतलमनामिका सा पतिद्वयं हंति ॥
अतिहीनायां यस्यां नित्यं कलहप्रिया प्रायः ॥ ५४७ ॥

चालत असतां जिच्या पावलांची अनामिका जमीनीला स्पर्श करीत नाहीं, ती वरील श्लोकांत वर्णत केलेल्या स्त्रीपेक्षांही वाईट चालीची निपजते. तिचें कोणाशींच पटत नाहीं इतकी ती भांडखोर असते.

हीना मध्या यस्याः सा योषित्पौरुषं वदति सततम् ॥
अस्पृष्टभुवि तथास्यां मारयति पुनः पतित्रितयम् ॥ ५४८ ॥

चालतांना जिच्या पायाचें मधलें बोट जमीनीवर टेकलें जात नाहीं ती स्त्री तर पुरुषी थाटाची असते.

ती त्याच ऐटीनें बोलते. बोट न टेकण्याचें कारण त्यांत अयब (गौणत्व) असतो. अर्थात् ती कोणत्याच पुरुषांशीं इमानानें राहणार नाहीं.

अंगुष्ठादधिक स्यात् अस्याः पादप्रदेशिनी नियतम् ॥
सा भवति दुःश्चारित्रा कन्यैव च कोऽत्र संदेहः ॥ ५४९ ॥

जिच्या पायाचे आंगठयाजवळचें बोट आंगठयापेक्षांहि लांब असतें ती स्त्री वर्तणुकीमध्यें वाईट निघते ह्यांत संशय नको. मग ती स्त्री कोणाचीहि कन्या असो—

आताम्रत्वचः स्निधाः समुन्नताग्राः शुभा नतास्तनवः ॥
वृत्ता स्त्रीणां न पुनः शस्ता विपर्यस्ताः ॥ ५५० ॥

बोटें अशीं असावीं कीं त्याची कातडी लालसर, मऊ, चमकदार, शेंडे थोड उंच अशीं आणि दिसण्यांत नाजूक असावीं. तीं कोमल आणि गोल असावीं म्हणजे तीं शुभ, नाहींतर याच्या उलट प्रकारचीं असलीं तर अशुभ.

कमठोन्नतेन मृदुना स्वेदशिरा विरचितेन पीनेन ॥
सा न स्निग्धेन स्त्रीणां स्यात्पादपीठेन ॥ ५५१ ॥

पावलांचा पृष्टभाग कांसवाच्या पाठीप्रमाणें कमानदार पण मऊ असावा. पावलांना घाम सरदी नसावी. तसेंच पावलें गोण्डस दिसावीं आणि त्यांत तजेला असावा, म्हणजे ती स्त्री राणीच शोभेल अशा पद-वीची निपजेल.

रोमान्वितेन दासी निर्मांसेनाधमा भवति नारी ॥
मध्यमया न दरिद्रा दौर्भाग्यवती शिरालेन ॥ ५५२ ॥

पावलांवर केंस असले तर स्त्री दासी, बटीक होते. पावलें मांस-रहित हडकुळीं असली म्हणजे स्वभावानें हीन असते. मधलें बोट वांकडें असेल तर दरिद्री आणि पावलावर शिरांचें जाळें असेल तर कुटुंबाचे भाग्य नष्ट होईल.

पुंल्लक्षणेषु यानिच कथितानि स्त्रीषु तानि ज्ञेयानि ॥
कररेखादीनि च तद् वक्ष्येऽहं पुनरपि स्त्रीणाम् ॥ ५५३ ॥

पुरुषाचा हात पहाते वेळीं ज्या रेखा, जीं चिन्हें हातावर पहावीं म्हणून सांगितलें तें सर्व स्त्रीच्या हातावर पहावें. रेषादि चिन्हें त्यांत येतात तथापि स्त्रियांसंबंधीं त्यांतील कांहीं भाग पुन: सांगतों.

आरक्ताः स्निग्धा अपि वृत्ताः पूर्णाः समाश्च गंभीराः
तिस्रोरेखा सम्यक् तलहस्ते सौख्य भोगाय ॥ ५५४ ॥

स्त्रियांच्या हातावरील रेषा देखील लाल, तेजस्वी, व्यवस्थित, संपूर्ण, आणि खोल असाव्या. अशा प्रकारच्या तीन रेषा ज्यांच्या हातावर असतील त्यांना सौख्य आणि उपभोग यांचा लाभ होईल.

· निःसृत्यांगुष्ठं तत् यदि तारां ( प्रति ) यात्यसौ करे रेखा
भर्तारं सा स्वीयं निहन्ति तस्माच्च नोद्वहे देनाम् ॥ ५५५ ॥

इति सामुद्रतिलके स्त्रीलक्षणविवरणम् ॥

जी रेषा अशुभदर्शक प्रकारानें आंगठयाच्या उंचवट्यापासून निघून करंगळीकडे जात असेल अशा स्त्रीच्या पतीस तारुण्यांतच मोठें गंडांतर येते, म्हणून अशा प्रकारची रेषा असणाऱ्या स्त्रीशीं विवाह करूं नये.

टीपः—ह्या ग्रंथांत स्त्रीसामुद्रिकाचा विचार फारच त्रोटक रीतीनें केला आहे. वास्तविक स्त्रीसामुद्रिकाच्या बाबतींत परिस्थिति अशी असते कीं, कोणत्याही स्त्रीचा विवाह झाल्यानंतर तिला वैयक्तिक स्वातंत्र्य किंवा कर्तबगारी अशी कांहीं राहातच नाहीं. कारण विवाहापूर्वी तिच्या पालनपोषणाची सर्व जबाबदारी तिच्या मातापित्यावर असते आणि विवाहानंतर सर्वच जबाबदारी पतीवर असते. यामुळें स्त्रीसामुद्रिकाचें विस्तृत विवेचन केलेलें नसणें संभवनीय आहे. स्त्रियांच्या हस्तरेषांवरून पहावयाच्या मुख्य गोष्टी म्हणजे शरीरसौख्य, पतिसौख्य, संतति आणि ऐश्वर्य ह्याच विशेष गोष्टी होत. त्या मूलतत्त्वानुरूप पुरुषांना व स्त्रियांना साधारणतः सारख्याच असावयाच्या.

---

# प्राक्संकेत-दिग्दर्शन

आतांपर्यंत सामुद्रिक शास्त्रांतील अत्यंत उपयुक्त, आवश्यक, जरूरीचा व संग्राह्य असा भाग आम्हीं वाचकांना सादर केला असून, तो प्रसिद्ध-अप्रसिद्ध, छापील, लेखी, त्रुटित, विस्तृत, प्राप्य, अप्राप्य अशा ग्रंथांतील अगर अनुभविक असा असून प्रयत्नांची पराकाष्ठा करून तो आम्हीं यांत दिला आहे. वाचकांनीं, समग्र ग्रंथ काळजीपूर्वक व बारकाईनें लक्ष ठेवून वाचल्यास त्यांना ही गोष्ट सहज अवगत होईल कीं, हस्तसामुद्रिक शास्त्रावर इतक्या उत्कृष्ट आणि भरपूर माहितीचा, विस्तृत विवेचनाचा आणि सामुद्रिक शास्त्राशीं संबंध असलेल्या इतर प्राचीन ग्रंथांतील उत्तमोत्तम वचनांच्या विशेष संग्रहात्मक व्यापक दृष्टीचा ग्रंथ, ह्या ग्रंथाखेरिज दुसरा कोणताही ग्रंथ आज तरी उपलब्ध नाहीं.

पृष्ठ ५२३ पासून देण्यांत आलेला "हस्तसंजीवनी" हा सामुद्रिक ग्रंथ, त्याचप्रमाणें यापूर्वीं दिलेला "सामुद्रिकातिलक" हा ग्रंथ असे महत्त्वाचे दोन ग्रंथ छापण्याची आमची योजना, घेऊन आम्ही पुन: लोकमान्य बाळगंगाधर टिळक यांच्याकडे १९१७-१९१८ मध्यें गेलों. या बाबतींत पुष्कळ विचार-विनिमय झाला आणि लो० टिळकांनीं आम्हांस फार महत्त्वाच्या सूचना व सल्ला दिला. इतकेंच नव्हे तर त्यांच्या संग्रहांत असलेल्या सामुद्रिक शास्त्रावरील हस्त-लिखित पोथ्यांतील हस्तरेषाविषयक सामुद्रिकतिलक ग्रंथांशीं आमचे हस्तलिखित ग्रंथ तपासून पाहण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तपासून पाहण्यांत आले व योग्य त्या दुरुस्त्याही करण्यांत आल्या. आमच्या जवळच्या दोन्ही ग्रंथाचें प्रकाशन मराठी भाषांतरासह करण्याबद्दल **लो० टिळकांनीं** सांगितलें. ग्रंथ छापण्याचें ठरलें. पण पुढें अशा कांहीं अडचणी आल्या कीं सांगतां सोय नाहीं. हा ग्रंथ छापतांना लो० टिळकांच्या नजरेखालून जावा अशी तर आमची तीव्र इच्छा होती व त्यास लोकमान्यांनीं संमति दिली होती. पण पुढें थोड्याच काळांत लो० टिळक विलायतेस गेले आणि छापण्याचें काम तसेंच पडून राहिलें. लोकमान्य परत आल्यावर त्यांना किंचित् यत् सवड झाली नाहीं. त्यामुळें छापण्याचें काम त्यावेळीं जें थांबलें तें थांबलेंच!

तथापि हा ग्रंथ छापण्याचा आमचा निर्धार कायम होता. भाषांतरासह नाहीं-तर नाहीं, निदान मूळ तरी छापून काढावें असें ठरवून "सामुद्रिकतिलक" आणि "हस्तसंजीवनी" ह्या दोन ग्रंथांचें संस्कृत मूळ आम्ही आमच्या तत्त्वविचार आणि ज्योतिर्भूषण मासिकाच्या शके १८४५ च्या आषाढ महिन्याच्या ( जून १९२३ ) खास टिळकअंकांत संपूर्ण छापून प्रसिद्ध केलें. त्यानंतर आतां पुन: १६ वर्षांनीं ते दोन्ही ग्रंथ विस्तृत भाषांतर व विवेचनासह प्रसिद्ध होण्याचा सुयोग प्राप्त झाला आहे. ही परमेश्वराची कृपा होय. हा वृत्तांत वाचकांनाही अवगत असावा म्हणून दिला आहे.

---

# हस्तसंजीवनींतील ( सामुद्रिक ) वेंचे.

तिसृभिरूर्ध्वे रेखाभिर्मण्डितं हस्तमण्डलम् ।
लक्ष्मभी राजते यस्य नतिः श्रीरामपादयोः ॥ ५५६ ॥

सर्वप्रकारच्या ऊर्ध्वरेषांनीं ज्याचे हस्त अलंकृत झालेले आहेत आणि अनेक शुभलक्षणांनीं जे सुशोभित दिसतात जे सुहस्त श्रीरामचन्द्र त्यांच्या चरणीं आमचे प्रणिपात असोत.

प्राधान्यात् हस्तस्य निखिलेष्वंगेषु लक्षणेस्तैस्तैः ।
रेखाशास्त्रं सम्यक् विव्रियेत विविदिषूनां च ॥ ५५७ ॥

देहाच्या सर्व अवयवांमध्यें हाताच्या रेषांनाच फार महत्त्व आहे. कारण तेथें शुभाशुभ लक्षणें निश्चितपणें समजतात. म्हणून जिज्ञासूंच्या उपयोगासाठीं हा हस्तसंजीवनी ग्रंन्थ प्रसिद्धीस आणतों.

## अष्टांगानांमध्ये हस्तस्यैव प्राधान्यात् ।

अंगे हस्तः प्रशस्तोऽयं शीर्षादपि विशिष्यते ॥
श्रीसमुद्रेण मुनिना तेन हस्तः प्रकाशितः ॥ ५५८ ॥

सर्व अंगोपांगांमध्यें तळहातावरील रेषा मस्तकापेक्षांहि भाग्यादि योगांचें ज्ञान करून देण्यास अग्रेसर आहेत. ही वस्तुस्थिति जाणून समुद्रमहामुनींनीं ह्या हस्तसंजीवनी नामक ग्रंन्थाची रचना केली.

दर्शनात् स्पर्शनाद्वापि तथा रेखाविमर्शनात् ॥
हस्तज्ञानं त्रिधा प्रोक्तं पुरातनमहर्षिभिः ॥ ५५९ ॥

नुसता हाताचा पंजा पाहूनच कोणी शुभाशुभ सांगतात. कोणी हाताला दाबून पाहून म्हणजे स्पर्श करून सांगतात. परंतु त्याहिपेक्षां खात्रीचा प्रकार, दर्शन स्पर्श, आणि रेखावलोकन ह्या तिन्ही प्रकारांनीं लक्षणें पाहून शुभाशुभ सांगणें हा होय. प्राचीन महर्षींनीं यालाच प्राधान्य दिलें आहे.

प्रोत्थितः प्रथमं वीक्षेत् स्वपाणिं दक्षिणं पुमान् ॥
पश्येत् वामं तु वामाक्षी निजपुण्यप्रकाशकम् ॥ ५६० ॥

म्हणून प्रत्येक पुरुषानें प्रातःकाळीं उठतांच प्रथम आपला उजवा तळहात शांतचित्तानें पाहावा. आणि स्त्रीयांनीं आपला डावा तळहात पाहावा. म्हणजे त्या योगानें ज्याच्या त्याच्या पुण्यांशाचा फलभोग मिळतो.

अक्षया जन्मपत्रीयं ब्रह्मणा निर्मिता स्वयम् ॥
गूढा रेखा यतो ह्यस्यां यावज्जीवं व्यवस्थिताः ॥ ५६१ ॥

तळहात हा एक प्रकारची नष्ट न होणारी आणि खात्रीची अशी जन्मपत्रिकाच आहे. ही जन्मपत्रिका स्वतः ब्रह्मदेवानें लिहिली असल्यामुळें चुकणें शक्य नाहीं. ह्या पत्रिकेमध्यें भविष्यकथन, निरनिराळ्या ज्ञात अज्ञात रेषांनीं केलेलें असतें आणि तें जन्मभर अगदीं बरोबर ठोकताळा आणून देतें.

प्रसूतिकाले प्रबला यदि स्युर्नृपालयोगाः पुरुषस्य यस्य ॥
सद्राजचिन्ह्यानि पदे तदीये भवंति वा पाणितलेऽमलानि ॥ ५६२ ॥

बालकाच्या भाग्यामध्यें जर राजयोग असला आणि असे योग जर प्रबळ असले तर जन्मकाळींच बालकाच्या हातावर आणि पायावर तीं राजचिन्हें स्पष्टपणें दिसतात. इतर योगांच्या रेषा वयपरत्वें कमी जास्त स्पष्टपणें उमटत असतात.

अनामिकामूलगता प्रशस्ता सा कीर्तिता पुण्यविधानरेखा ॥
मध्यांगुलेर्यामणिबंधमाप्ता राज्याप्तये सा च किलोर्ध्वरेखा ॥ ५६३ ॥

जी रेषा करंगळीच्या उंचवट्यांतून निघते अथवा करंगळीच्या उंचवट्याशीं जाऊन भिडते, अशा रेषेला कर्मरेखा म्हणतात. सत्कर्म, दुष्कर्म यांचें आचरण घडणार किंवा कसें तें या रेषेवरून कळतें. जी ऊर्ध्वरेखा मणिबंध आणि मध्यमांगुलीचा उंचवटा यांच्याशीं भिडलेली असते ती सुव्यवस्थित असेल तर राज्यप्राप्ति होईलच.

विराजमानं यवलांच्छनं चेदंगुष्ठमध्ये पुरुषस्य यस्य ॥
भवेद्यशस्वी निजवंशभूषा भूषाविशेषैः सहितो विनीतः ॥ ५६४ ॥

ज्या पुरुषाच्या आंगठ्याच्या मधोमध यवाकृति स्पष्ट आणि सुव्यवस्थित असेल तो पुरुष यशस्वी आणि स्वकुलाला भूषणभूत होईल. असें भूषण मिरवीत असूनहि तो उद्दाम असणार नाहीं.

चेद्वारणो वाऽऽतपवारणो वा वैसारिणः पुष्करिणीसृणिर्वा ॥
वीणा च पाणौ चरणे नराणां ते स्युर्नराणामधिपा वरेण्याः ॥५६५॥

ज्यांच्या हातावर हत्ती, छत्र, मत्स्य, अंकुश, पुष्करिणी, वीणा अशासारखीं शुभचिन्हें स्पष्ट दिसत असतील, किंवा पायाच्या तळव्यावरहि हीं चिन्हें असतील तरी ते पुरुष लोकाग्रणी, राजे किंवा महाराजेहि होतील.

आदर्शमालाकरवालशैलहलाश्च तत् पाणितले मिलंति ॥
स्यान् मांडलीकोऽवनिपालको वा कुले नृपालः कुलतारतम्यात्॥५६६॥

ज्यांच्या तळहातावर पुष्पमाला, तरवार, पर्वत, नांगर अशा प्रकारचीं चिन्हें दिसत असतील ते पुरुष माण्डलिक राजे तरी असतील किंवा निदान राजकुलांत तरी त्यांचा जन्म झालेला असेल. तेवढयाच चिन्हावरून सांगावयाचें तर परिस्थिति पाहून सांगावें.

चेद्यस्य पाणौ चरणे च चक्रं धनुर्ध्वजाब्जव्यजनासनानि ॥
रथाश्च दोला कमलाविलासा तस्यालये स्युर्गजवाजिशालाः ॥५६७॥

ज्याच्या तळहातावर किंवा पायाच्या तळव्यावर चक्र, धनुष्य, ध्वजा, पंखा, सिंहासन, रथ, वाहन, झोपाळा, कमळ इत्यादि राज्यदर्शक किंवा चैनीच्या पदार्थांच्या आकृति दिसत असतील तो इतका असेल कीं त्याच्या दारीं घोडयांची पागा आणि हत्तींची रांग आहे असें आढळेल.

स्तंभस्तु कुंभस्तु तरुस्तुरंगो गदा मृदंगोऽध्रिकरप्रदेशे ॥
दंडोऽथ वा खंडितराज्यलक्ष्म्या स्यांमंडितः पंडितशौंडिको वा ॥५६८॥

त्याचप्रमाणें स्तम्भ ( मोठा खांब ), कलश, वृक्ष, अश्व, गदा, मृदंग, दण्ड इत्यादि चिन्हें ज्याच्या तळहातावर किंवा तळपायावर अस-

तील तो जरी एखाद्या प्रसंगीं राज्यभ्रष्ट झाला तरी ती राज्यलक्ष्मी पुनश्च घरांत परत आणतां येईल, किंवा असा पुरुष राज्याधिकारी नसला तर पण्डितश्रेष्ठ तरी असेल.

सुवृत्तमौलिस्तु विशालभालश्चाकर्णनीलोत्पलपत्रनेत्रः ॥
आजानुबाहुं पुरुषं तमाहुर्भूमंडलाखंडलमार्यवर्याः ॥ ५६९ ॥

ज्याचें मस्तक प्रमाणबद्ध, भालप्रदेश विस्तीर्ण, डोळे विशाल आणि कर्णाच्या भागाकडे प्रसृत; बुबुळें नीळसर व त्यामुळें नीलकमला-प्रमाणें दिसणारीं; हात गुडघ्यापर्यंत पोहोंचणारे अशा पुरुषाला विद्वान् लोक भूलोकीचा इन्द्रच समजतात.

नरस्य नासा सरला च यस्य वक्षःस्थलं चापि शिलातलाभम् ॥
नाभिर्गभीराऽतिमृदू भवेतामारक्तकर्णौ स च भूपतिः स्यात् ॥५७०॥

ज्या मनुष्याचें नाक सरळ, आणि छाती विस्तीर्ण व सपाट परंतु भरदार असते. नाभि खोल; आणि तो प्रदेश मृदु असतो, नेत्रप्रांत आणि कर्णहि आरक्त ( लालसर ) असतात,„ असा पुरुष राज्यकर्ता असतो.

प्रसन्नमूर्तिः समुदारचेतो वंशाभिमानः शुभवाग्विलासः ॥
अनीतिभीरुर्गुरुसाधुनम्रः साम्राज्यलक्ष्मीं लभते मनुष्यः ॥५७१॥

ज्याची मुद्रा प्रसन्न, अन्तःकरण उदार, ज्याचा कुलाभिमान जाज्वल्य आणि बोलणें प्रभावी असतें, जो न्यायी आणि नीतिमान् असतो; गुरु-जन आणि सत्पुरुष यांच्यापुढें नम्र होतो, त्या मनुष्याला साम्राज्याचा लाभ होणार म्हणून समजावें.

करतले यदि यस्य तिलो भवेदविरलः किल तस्य धनागमः ॥
पदतले च तिलेन समन्विते नृपतिवाहनचिन्हसमन्वितः ॥५७२॥

ज्याच्या हातावर एखादा ठळक तिळ असेल त्याच्याकडे द्रव्याचा ओघ एकसारखा वहात राहील आणि असाच तीळ पावलावर असेल तर त्याची संपत्ति कुबेराप्रमाणें अमर्याद असेल.

उक्षा पताका कमलाभिषेकः सुदामकेकी धनपुण्यभाजाम्
आलोच्यते पाणितलेच येषां भवन्ति विक्रान्तगुणैश्च भूपाः॥५७३॥

ज्याच्या तळहातावर वृषभ, ध्वजा, कमल, अभिषेकपात्र, उत्तम पिसाऱ्याचा मोर इत्यादि चिन्हें स्पष्ट दिसतील ते पुरुष आपल्या पराक्रमानें आणि आंगच्या गुणानें राज्यपद मिळवतील.

चिन्हानि यानि प्रतिपादितानि व्यक्तानि संपूर्णफलप्रदानि ॥
वामेतरेऽध्रौच करे नराणां धन्यानि वामे खलु कामिनीनाम् ॥५७४॥

हीं जीं चिन्हें किंवा आकृति पूर्वीच्या श्लोकांमध्यें वर्णिल्या आहेत त्या जर अगदीं ठरक आणि निःसंशय अशा स्वरूपाच्या असल्या तरच त्यांचा ठोकताळा तंतोतंत पटेल. हीं चिन्हें पुरुषांच्या उजव्या तळहातावर किंवा उजव्या पायाच्या तळव्यावर पहावीं आणि स्त्रियांच्या डाव्या हातावर किंवा डाव्या तळव्यावर पहावीं.

ज्ञानमैश्वर्यवंशादि वीक्षेद्दक्षिणपाणितः ॥
जीवस्यागमनं वामे गमनं दक्षिणे करे ॥ ५७५ ॥

ज्ञान, ऐश्वर्य, वंशवृद्धि इत्यादि गोष्टी पुरुषासंबंधानें उजव्या तळहातावर पहाव्या; आणि लहानपणाची वृत्ति ही पुरुषांच्या देखील डाव्या तळहातावरून पहावी. मृत्युकाल मात्र उजव्या तळहातावरून पहावा.

एवं चराचरं सर्वं रेखाभिः संप्रकाश्यते ॥
भूतं भव्यं भविष्यद्वा दीपिकाभिर्गृहं यथा ॥ ५७६ ॥

याप्रमाणें जो जो प्रश्न आयुष्यांत उपस्थित होतो त्या त्या प्रश्नाचा उलगडा तळहातावरील रेषावरून होतो. सर्व गोष्टी म्हणजे लहानपण, चालू व्यवहार आणि पुढें येणारा काल यासंबंधीं सर्व प्रश्न दिव्यानें घर प्रकाशित करून तपासावे त्याप्रमाणें स्पष्ट दिसूं लागतात.

द्वादशाब्दांतरेखाणां न तावत् स्पष्टता भवेत् ॥
तत्परं त्रीणि वर्षाणि वामहस्तेक्षणं शिशोः ॥ ५७७ ॥

बारा वर्षें पुरीं होईपर्यंत उजवा तळहात पाहूं नये. त्यांत सर्व रेषा

उमटलेल्या नसतात. म्हणून तोपर्यंत डाव्या हातावरूनच फलें सांगावीं. इतकेंच काय पण बारा वर्षांनंतर तीन वर्षेंपर्यंत सुद्धां म्हणजे पंधरा वर्षें-पर्यंत सुद्धां डाव्या हातावरूनच फलें पहावीं.

मणिबन्धोत्थिता रेखांगुले मूलंप्रतिष्ठिता ।
दृश्यते मध्यगाहस्ते सोर्ध्वरेषा निगद्यते ॥ ५७८ ॥

जी रेषा मनगटापासून निघून कोणत्याही बोटाच्या उंचवट्यापर्यंत तळहाताच्या मधून जाते अशी दिसेल, त्या रेषेला आपल्या शास्त्रांत ऊर्ध्व रेषा असें नांव दिलें आहे.

मध्यमामूलपर्यंतं ऊर्ध्वरेखा च दृश्यते ।
पुत्रपौत्रादिसंपन्नो राजमान्यः सुखी भवेत् ॥ ५७९ ॥

जर ऊर्ध्वरेषा मधल्या बोटाच्या उंचवट्याला भिडली असेल तर तो राजकारणांत पुढें येऊन राजाला मान्य होऊन सुखी होईल. तसेंच त्याला पुत्रपौत्रांचाहि लाभ होईल.

टीपः—या रेषेला Line of Fate म्हणतात.

खाब्धिवर्षांतपरं यस्य रेखा दक्षकरे भवेत् ।
सा पूर्णा चेद्भवेद्राजा न्यूना चेत् कृत्स्नसौख्यभाक् ॥ ५८० ॥

अशी उर्ध्वरेषा पुरुषाच्या उजव्या हातावर ४० वर्षांनंतर दिसूं लागेल आणि ती संपूर्ण व स्पष्ट असेल तर त्याला राज्यप्राप्ति होईल. रेषेंत थोडा फरक असला तरी सर्वसौख्यसंपन्न तर तो होईलच.

मायासुदशभिश्चक्रे राजा योगीश्वरोऽथ वा ॥
दशभिः शुक्तिभिः सर्वावस्थासु बहुदुःखितः ॥ ५८१ ॥

ज्याच्या दहाहि बोटांच्या अग्रांवर चक्रचिन्हें असतील तो राजा किंवा राजयोगी होईल आणि दहा शंख किंवा दुसरींच अशुभ चिन्हें असतील तर कोणत्याहि वयांत तो दुःखीकष्टीच राहणार.

कनिष्ठांतस्तनूरेखा संमुख्या यात्ररेखिका ॥
सा भाग्यरेखा कथिता निर्वेधा सुखकारिणी ॥ ५८२ ॥

ऊर्ध्वरेखा करंगळीच्या उंचवटयापर्यंत गेलेली असेल तर तिचें मुख्य फल "**यात्रारेखा**" या दृष्टीनें पाहावें. तिला भाग्यरेखा समजल्यासहि चालेल; म्हणून ह्या रेखेच्या स्पष्टतेवर पुरुषाचें आयुष्य निर्वेध भाग्याचें होणार किंवा काय तें कळेल.

**उभयोस्तर्जनीमध्ये द्वे रेखे च प्रकीर्तिते ॥**
**वृष्टिकाले तदा जन्म प्राणिनां नात्र संशयः ॥ ५८३ ॥**

दोन्ही हातांच्या तर्जनीच्या पेरावर किंवा उंचवटयाजवळ जर ( विशेष आकृतीच्या ) दोन रेषा दिसत असतील तर त्या पुरुषाचा जन्म पावसाळ्यांत झालेला असेल ह्यांत संशय नको.

**वामहस्तस्य चांगुल्यां मध्यमामध्यपर्वसु ॥**
**विच्छिन्ना च भवेद्रेखा ग्रीष्मे जन्म ह्युपस्थितम् ॥ ५८४ ॥**

डाव्या हाताच्या मधल्या बोटाच्या मधल्यापेरावर एका विशिष्ट आकृतीची तुटकी रेषा दिसत असेल तर त्या पुरुषाचा जन्म उन्हाळ्यांत झालेला आहे असें सांगावें.

**टीपः**—ह्याहि श्लोकांत आकृति स्पष्ट दिलेली नाहीं. ह्याप्रमाणें पूर्वींच्या ग्रंथांतून समक्ष दाखविण्याच्या विशेष गोष्टी लिहिण्याचा प्रघात नव्हता. अशाच पद्धतीचे श्लोक पुढें आलेले आहेत.

**वामांगुष्ठस्य मूले तु यवाकारं च दृश्यते ॥**
**उष्णकाले तदा जन्म प्राणिनां नात्र संशयः ॥ ५८५ ॥**

डाव्या हाताच्या आंगठयाच्या मुळाशीं जर यवासारखी आकृति स्पष्ट दिसत असेल तर त्या व्यक्तीचा जन्म ऐन उन्हाळयांतच झाला असला पाहिजे ह्यांत संशय नको.

**टीपः**—ह्या रेषांचें वैशिष्टय सांगणारा श्लोक मूळ ग्रंथांत दिलेला नाहीं.

**वामांगुष्ठोदरोमध्ये यवचिन्हं च संस्थितम् ॥**
**मासाद्ये च तिथौ जन्म सौम्यवारे च तस्य तु ॥ ५८६ ॥**

डाव्या हाताच्या आंगठयाच्या मधल्या पेरावर जर यव चिन्ह स्पष्ट असेल तर त्या मनुष्याचा जन्म महिन्याच्या आरंभीं, आरंभ तिथीला व बुधवारीं झालेला असतो याप्रमाणें समजावें.

**वामहस्तानामिकायामग्रपर्वैकरेखया ॥**
**ऋत्वंते च भवेज्जन्म शैशिरो ऋतुरेव च ॥ ५८७ ॥**

डाव्या हाताच्या अनामिकेच्या शेवटच्या पेरावर जर विशिष्ट प्रकारची रेषा दिसत असेल, तर ऋतूच्या शेवटच्या भागांत म्हणजे शिशिर-ऋतूच्या शेवटीं त्या पुरुषाचा जन्म झालेला असतो.

**वामहस्तस्य चांगुष्ठे चक्रं श्रयति रेखया ॥**
**संवत्सरांतमासे च फाल्गुने च ह्युपस्थिते ॥ ५८८ ॥**

डाव्या हाताच्या आंगठयावर विशिष्ट रेषेजवळ चक्र असेल तर वर्षाच्या शेवटचा महिना जो फाल्गुन त्या फाल्गुनांत जन्म झालेला असतो.

**व्याप्तांगुलीषु सर्वासु छिन्नरेखा कनिष्ठिका ॥**
**शुचि मासे भवेज्जन्म मन्मथे च महामुने ॥ ५८९ ॥**

करंगळी सोडून बाकीच्या सर्व बोटांच्या पेरांवर योग्य तीं चिन्हें आणि करंगळीवर मात्र ती विशेष रेषा असें असलें तर त्या मनुष्याचा जन्म " शुचि " मासामध्यें " **मन्मथ** " वेळीं जन्म झालेला असतो.

टीप:—शुचि म्हणजे ग्रीष्मऋतूंतील दुसरा महिना. " मन्मथ " वेळ म्हणजे ' मिथुन ' लग्न. बोटांचें, आंगठ्यांचे, आणि हाताचे स्पष्ट ठसे घेऊन अभ्यास केल्याशिवाय ह्यांतील रहस्य कळणार नाहीं.

**अंगुष्ठोर्ध्वेयवः पूर्णः सदा पुंसां यशस्करः ॥**
**मध्यभेदे भवेदर्थं पंचाशद्वर्षतः परम् ॥ ५९० ॥**

आंगठ्याचें दुसरें पेरें हें सामुद्रिकशास्त्रांत फार महत्त्वाचें आहे. तें पेरें उत्तम भरदार चक्र चिन्हयुक्त, यवयुक्त असलें म्हणजे मनुष्य यशस्वी असतो. आंगठयाच्या खालच्या पेरावर शुभ चिन्हें असलीं ( आणि अग्रावर नसलीं ) तर मनुष्याचा उत्कर्षकाल पन्नास वर्षांच्या नंतर असतो.

यवैरंगुष्ठमध्यस्थैर्विद्याख्यातिविभूतयः ॥
शुक्लपक्षे तथा जन्म वामांगुष्ठे तु रात्रिकम् ॥ ५९१ ॥

आंगठयाच्या मधोमध जर यवचिन्हें असलीं तर तो पुरुष विद्या, कीर्ति आणि वैभव ह्यांनीं युक्त असतो. जन्म शुक्ल पक्षीचा असतो. डाव्या आंगठयावर जर चिन्ह असेल तर जन्म रात्रीं असतो.

यवे प्रदक्षिणांगुष्ठे दिवाजातं विनिर्दिशेत् ॥
उभयांगुष्ठगे तस्मिन् कृष्णपक्षे दिवाभवम् ॥ ५९२ ॥

उजव्या हाताच्या आंगठयावर यव दक्षिणमुखी असेल तर जन्म दिवसा आहे असें सांगावें आणि दोन्ही आंगठयावर तसेच यव असतील तर जन्म दिवसाच पण कृष्णपक्षांत झालेला असतो.

विद्याख्यातिर्विभूतिः स्यात् यवे त्वंगुष्ठमध्यगे ॥
शुक्लपक्षे जन्म रात्रौ वामांगुष्ठगते यवे ॥ ५९३ ॥

टीप:—ह्याच अर्थाचा श्लोक वर आला असतां पुनः निराळ्या तऱ्हेनें तोच अर्थ पुन: सांगण्याचा हेतु ह्या श्लोकाला महत्त्व देण्याचा आणि अभ्यासूनें बारीक नजरेनें अभ्यास करावा, असें सांगण्याचा आहे.

कृष्णपक्षे दिवा जन्म दक्षिणांगुष्ठगे यवे ॥
विद्धाविद्धविवेकेन पक्षस्य व्यत्ययः क्वचित् ॥ ५९४ ॥

उजव्या आंगठयावर यव असला तर जन्म दिवसा पण कृष्णपक्षांतहि झाला असतो ( वर दोन्ही आंगठयांवर यव असले तर कृष्णपक्षांत जन्म असें सांगितलें परंतु ) तो यव विद्ध आहे किंवा अविद्ध म्हणजे अखण्ड आहे तें पाहावें. कारण ह्या गोष्टीवरून शुक्लाचा कृष्ण अशी उलटापालट केव्हां केव्हां होऊं शकते. आणि

शुक्लपक्षे तथा जन्म दक्षिणांगुष्ठजैर्यवैः ॥
कृष्णपक्षे नृणां जन्म वामांगुष्ठगतैर्यवैः ॥ ५९५ ॥

उजव्या आंगठयावर विद्ध यव असला तर जन्म शुक्लपक्षांत ( रात्री-

चाहि ) होतो. तसेंच तसला यव डाव्या आंगठयावर असला तर जन्म कृष्णपक्षांत झालेला असतो.

अंगुष्ठयवैराढ्याः सुतवंतोऽगुष्ठमूलजैश्च यवैः ॥
रविरंगुष्ठमध्यस्थं स्तंनखे चंद्रमा स्फुटः ॥ ५९६ ॥

आंगठयावरील यव ज्यांचे स्पष्ट असतील त्यांना पुत्रसंतति असावयाची, तसेंच अंगुष्ठमूलभागीं यव असला तरी पुत्रसंतति होईल. आंगठयाच्या मधोमध यव असला तर रवीचा प्रभाव नाहींतर चन्द्राचा प्रभाव असतो.

(टीपः—यापुढें हाताचीं बोटें आणि ग्रहनक्षत्र इ० यांचा संबंध वर्णिला आहे. तो गूढ आणि रहस्यमय असल्यानें त्याचा खुलासा थोडक्यांत होणें कठिण.)

मंगलस्तर्जनीशीर्षे नृपासनगतो बुधः ॥
लक्ष्म्यां गुरुः कविर्गौर्यां कनिष्ठायां शनिस्तथा ॥ ५९७ ॥

रवीचा आंगठयाच्या मधल्या पेराशीं संबंध आहे आणि टोकाच्या पेराशीं चन्द्राचा आहे. तर्जनीच्या टोंकावर मंगलाचा, आंगठयाच्या उंचवट्याशीं बुधाचा संबंध असतो. मधल्या बोटाच्या ठिकाणीं गुरूंचे महत्त्व-अनामिकेसंबंधीं शुक्राचें महत्त्व आणि करंगळीविषयीं शनीचें महत्त्व असतें.

हस्तपृष्ठे राहुकेतू एवं वारा ग्रहास्तथा ॥
पूर्वोक्तं निखिलं स्थितयः ज्ञायते कररेखया ॥ ५९८ ॥

तसेंच हाताच्या पृष्ठभागाशीं राहूकेतूंचा संबंध आहे असें समजावें. याप्रमाणें ग्रहांचीं स्थानें सामान्यतः आहेत, त्यावरून रेषांच्या साहाय्यानें भावि जीवन ( आणि भविष्यकालीन स्थिति ) कळून येतें.

त्रीणि त्रीणि तलादिक्षुमध्ये नक्षत्रमश्विनी ॥
तारादिपंचशाखासु प्रत्येकं स्यात्त्रयं त्रयम् ॥ ५९९ ॥

प्रत्येक बोटाचें पेरें हा स्थानाचा तिसरा भाग ह्याप्रमाणें पांच बोटें मिळून पंधरा भाग करून त्यांवर नक्षत्रांची मांडणी केली आहे.

तळहाताच्या मध्यभागीं अश्विनी नक्षत्र धरलें आहे, आणि भोंवतीं हस्तापर्यंत बारा नक्षत्रें आहेत नंतर प्रत्येक बोटाच्या पेरावर एकेक ह्याप्रमाणें करंगळीपासून आंगठयापर्यंत चित्रेपासून रेवतीअखेरपर्यंत नक्षत्रें मांडण्याचा प्रकार आहे.

श्रावणो हस्ततालः स्यादंगुष्ठो भाद्रपत्तथा ।
आश्विनस्तर्जनीमध्यः कार्तिकः श्रीविधानतः ॥ ६०० ॥

ह्यानंतर श्रावण भाद्रपद असे महिनेहि तळहातावर योजिले आहेत तळहातावर श्रावण, आंगठा भाद्रपद, तर्जनीचें मधलें पेर म्हणजे आश्विन. मधल्या बोटावर कार्तिक मांडावा.

मार्गशीर्षोऽनामिकायां कनिष्ठायां तु पौषदः ।
दक्षिणायनमेव स्याद्दाक्षिणे सिंहवाहगे ॥ ६०१ ॥

अनामिकेवर मार्गशीर्ष मांडावा. करंगळीवर पौष समजावा. दक्षिणायनामध्यें महिन्यांची मांडणी कर्कसंक्रांतिपासून वर सांगितल्याप्रमाणें करावी.

वामो माघः कनिष्ठायां फाल्गुनोऽनामिका तथा ।
मध्या चैत्रे प्रदेशिन्यां माघवोंऽगुष्ठके परः ॥ ६०२ ॥

नंतर उत्तरायणामध्यें डाव्या हाताच्या करंगळीवर माघ, अनामिकेवर फाल्गुन महिना समजावा. तसेच मधल्या बोटावर चैत्र, तर्जनीवर वैशाख, आणि आंगठयावर ज्येष्ठ, आणि त्याखालीं आषाढ असतो. ह्याप्रमाणें उत्तरायणांसंबंधींहि मांडणी असते. याचप्रमाणें:—

आषाढो भूतलप्राप्तः स्यादेवं चोत्तरायणम् ।
आश्विन्यादीनि धिष्ण्यानि प्रत्येकं सप्त योजयेत् ॥ ६०३ ॥

महिने निश्चित केल्यावर अश्विन्यादि नक्षत्रें निश्चित करावीं, प्रत्येक गट सात सात नक्षत्रांचा समजावा आणि त्या अनुरोधानें जन्मनक्षत्र ठरवावें.

प्रत्येकं जन्मलग्नस्य निर्णयार्थं करेक्षणः ।
स्वराशिवर्षसंयुक्तं कृत्वा सूर्यैर्विभाजयेत् ॥ ६०४ ॥

जन्मलग्न याप्रमाणें ठरवावें. जन्मराशि आणि वय ह्यांची बेरीज

करून १२ नीं भागावें आणि बाकी राहील तितक्या स्थानापासून मोजून जन्मलग्नाचा राशि ठरवावा. याप्रमाणें जन्मलग्न समजल्यानंतर

**यच्छेषं स्थानकस्तस्मान्निजराजश्यादिकः क्रमः ।**
**चंद्रस्तत्रैव विन्यस्य चतुसृष्वंगुलिष्वपि ॥ ६०५ ॥**

चन्द्र त्याच राशीला मांडावा आणि चारही बोटांच्या ठिकाणीं जे जे ग्रह त्या त्या बोटाशीं संलग्न असल्याचें सांगितलें आहे ते ते ग्रह "**हस्तकुंडली**" मध्यें आपआपल्या स्थानीं मांडावे.

टीपः—हें "हस्तकुंडली" चें प्रकरण "नष्टजातका" पैकींच एक आहे, परंतु ह्या श्लोकांचा अर्थ–अनुभवावाचून नुसत्या तर्कानें कळणार नाहीं व नुसत्या शाब्दिक विवेचनानें वाचकांचा घोटाळा मात्र होईल, म्हणून विशेष विस्तार केला नाहीं.

**स्थाप्यस्तत्र ग्रहो देयाः प्रागुक्तस्था च युक्तितः ।**
**जागर्ति येन नामायास्तद्राशिर्यत्र पर्वाणि ॥**
**तारादिमेषराश्यादि तस्मादारभ्य गण्यते ॥ ६०६ ॥**
**( मेषादित्र्यंशकः क्रमात् )**

पृच्छकाच्या नांवराशीचें जें नक्षत्र ज्याठिकाणीं असल्याचें सांगितलें आहे, त्या नक्षत्रावरूनच त्या ठिकाणचा राशि समजतो, त्यावरून नक्षत्रें, राशि आणि ग्रह यांची कुण्डलि माण्डावी आणि राशींचें अंशादिकहि ठरवावे.

( टीपः—हस्तरेषावरून नक्षत्र राश्यादिकांचे जे वर्णन ग्रंथांत दिले आहे तें यांत सांगितलें आहे. परंतु ते वर्णन फारच त्रोटक व असंबद्ध असें दिसते. हातावरून कुंडली मांडण्याचा शास्त्राबाबतच्या नियमांच्या व पद्धतीच्या स्वरूपाचे स्पष्ट विवेचन करावयाचे झाल्यास त्यास मोठाले ग्रंथच करावें लागतील पण ग्रंथांतील मूळ भाग सोडावयाचा नाहीं म्हणून हा भाग दिला आहे.)

**लाभालाभौ सुखं दुःखं जीवितं मरणं तथा ।**
**गमागमौ जयो भंगः कार्याकार्ये शुभाशुभे ॥ ६०७ ॥**

याप्रमाणें तळहात आंगठा बोटें, त्यांचीं पेरें, उंचवटे इत्यादि

स्थानामध्यें सप्तग्रह, बाराराशि, आणि सत्तावीस नक्षत्रें यांची वाटणी कशी झाली तो प्रकार सांगितला. ह्या सर्व माहितीच्या आधारें लाभ, हानि; सुख दुःख; आयुर्दाय, मृत्यु, प्रवास, पुनरागमन; यशापयश कृत्याकृत्य इत्यादि गोष्टींचा निर्णय करावा.

पितृरेखा बाल्यवयस्तारुण्यं मातृरेखिका ।
वार्धक्यमायुरेखायां वायुः पित्तं कफस्तथा ॥ ६०८ ॥

पित्यासंबंधीची रेषा, मातेसंबंधी रेषा, तसेंच बालवय, तारुण्य, वार्धक्य, आणि वायु, कफ, पित्त, यांचा उपद्रव इत्यादि प्रकार मातृ, पितृरेषा आणि आयुष्य रेषा यावरून पहावें. तसेंच—

चरास्थिरद्विस्वभावाः पुंस्त्रीक्लीबाभिधास्तथा ।
नभस्तलांबुचारिण्यः सत्त्वं रजस्तमः क्रमात् ॥ ६०९ ॥
यस्याः प्राधान्यमेतासु तस्या रूपं विनिर्दिशेत् ।

चर, स्थिर द्विस्वभाव राशि, स्त्री, पुरुष, व नपुंसक इत्यादि भेद, भूचर, खेचर, जलचर इत्यादि प्रकार आणि सत्त्व रज, तम, ह्या गुणांचा जोर इत्यादि गोष्टीहि हातावरून पहातां येतात.

**टीप**—वर जे प्रकार सांगितले आहेत ते सर्व हस्तरेषेचें स्थान आणि रचना ह्यावरून कळतात. जी रेषा जेथें जितकी मुख्य ( म्हणजे स्पष्ट आणि निर्दोष ) तिचें जें फल तेंच अनुभवास येतें.

कनिष्ठामूलसंबद्धा ह्यायूरेखा च कीर्तिता ।
द्वितीया धनरेखा च तृतीया कुलवर्धिनी ॥ ६१० ॥

करंगळीच्या उंचवट्याला लागलेली अशी जी रेषा तिलाहि आयुष्य-रेषा म्हणतात. ही एक, आणि दुसरी धनरेषा, आणि तिसरी कुलरेषा अशा तीन रेषा मुख्य आहेत.

यदि पूर्णाश्च रेखाः स्युः पूर्णं तस्य सुलक्षणम् ।
त्यक्त्वाऽधो मणिबंधं या रेखा स्यात्करगामिनी ॥ ६११ ॥

ह्या रेषा जितक्या स्पष्ट, सुसंघटित तितकें त्यांचें फल शुभकारक असतें;

हा तर नियम ठरला आहे. तद्वतच दुसरी एक ऊर्ध्वरेषा मणिबन्धापासून निघून तळहातामध्यें शिरते तिची रचना जशी असावी तशी असली तर

सुवर्णरत्नराज्यश्रीदायिका नात्र संशयः ।
अंगुष्ठस्यापि मध्येसा ब्रूते नृपतिमुत्तमम् ॥ ६१२ ॥

त्या पुरुषाच्या हातीं सोनें, रत्नेंच काय, पण राजलक्ष्मी देखील स्थिर राहील, ह्यांत संशयच नाहीं. ही रेषा क्वचित् आंगठयाच्या मध्य भागाला जाऊन भिडते. आणि अशा रचनेचें फल म्हणजे तो पुरुष पराक्रमसंपन्न असा राजा होतो.

गोत्ररेखाऽथ यस्य स्यादखंडा वेधवर्जिता ॥
गोत्रे स मुख्यतां याति सर्वेषामाश्रयः पुमान् ॥ ६१३ ॥

कुलरेखा अथवा गोत्ररेखा ही अखंड असली, तिला छेदून जाणारी दुसरी रेषा नसली तर तो पुरुष कुलदीपक होऊन सर्व आप्त इष्टांचा परामर्ष घेतो.

यावंतः पल्लवश्चास्यामंगुलीमुखगामिनः ।
तावंतः पितृद्रव्यस्य भवेयुर्भागहारिणः ॥ ६१४ ॥

या गोत्ररेषेच्या शेवटाला जितके पल्लव फुटलेले असतील तितके त्या पुरुषाला भाऊबन्द असून ते वडलोपार्जित मिळकतीस आपला हक्क सांगतील.

मणिबंधादूर्ध्वरेखा यात्यंगुष्ठादिसंमुखी ।
असौ पंचविधा राजाश्रयिणी राजसौख्यदा ॥ ६१५ ॥

मणिबन्धापासून ऊर्ध्वरेषा निघतात. ( कोणाकोणाच्या हातावर उर्ध्वरेखा नसतातच ) परंतु कोणाकोणाचा हातावर एक ते पांचपर्यंतही असतात. ऊर्ध्वरेषा ही कोणत्यातरी बोटाच्या उंचवट्याकडे जाते. म्हणून ऊर्ध्वरेखा पांच प्रकारचा असतात. ऊर्ध्वरेखेचे फल राजाश्रय व राज्यसौख्य हें होय.

नृपो नृपतिमंत्री वा प्राप्ता चेत्तर्जनीमसौ ।
ज्येष्ठां प्राप्ता तथाऽऽचार्यः ख्यातिमान् सैन्यनायकः ॥६१६॥

ऊर्ध्वरेषा तर्जनीच्या उंचवट्यापर्यंत जात असली तर राजमंत्रित्वाचा अधिकार मिळतो. मधल्या बोटाच्या उंचवट्याकडे जात असली तर आचार्यपद किंवा सेनानायकत्व लाभतें.

अर्थबाहोधनीनेतोर्ध्वरेखा चेच्छिवाश्रिता ।
कनिष्ठायामूर्ध्वरेखा प्रतिष्ठावान् महायशाः ॥ ॥ ६१७ ॥

अनामिकेच्या उंचवट्याकडे ऊर्ध्वरेषा गेलेली असली तर सावकारी धंद्यांत यश मिळून जवळ भरपूर पैसा जमतो आणि करंगळीकडे ऊर्ध्व-रेषा जात असेल—तर पुरुषाला कीर्ति आणि महद्यश प्राप्त होतें.

मणिबंधोत्थितारेखा यांऽगुलेर्मूलमाश्रिता ।
दृश्यते हस्तमध्ये या सोर्ध्वा रेखानिगद्यते ॥ ६१८ ॥

जी रेषा मनगटाजवळून निघून तळहाताच्या मधून जाते आणि कोणत्यातरी बोटाच्या उंचवट्यापर्यंत जाऊन पोहोंचते तिला ऊर्ध्वरेषा म्हणतात.

आयुरेखाकनिष्ठांतलेंखाः स्यु गृहिणीप्रदाः ।
समाभिः शुभशीलास्ता विषमाभिः कुशीलकाः ॥ ६१९ ॥

करंगळीचा उंचवटा आणि आयुष्य रेषा ह्यांच्या मधोमध कांहीं रेषा असतात, त्या रेषा पुरुषाच्या बाबतींत स्त्रियांच्या दर्शक होत. ह्या रेषा व्यवस्थित असतील तर त्या पुरुषाच्या स्त्रिया सन्मार्गवर्ती आहेत असें आणि त्या वांकड्या ( विषम ) अव्यवस्थित असतील तर दुराचरणी आहेत असें समजावें.

तारामूलान्माणिं यावत् रेखा यत्संख्यकाः करे ।
तावंत्यो महिलास्तस्य राजयोगो विनिर्दिशेत् ॥ ६२० ॥

मणि ( म्हणजे मणिबन्ध ) पर्यंत जाणारी जी रेषा तिच्या आंतल्या बाजूस ज्या लहान लहान रेषा दिसतात त्या स्त्रीदर्शक रेषा होत. अशा जितक्या रेषा तितक्या स्त्रिया. मणिमबंन्धापर्यंतची रेषा राज-योगहि दर्शविते.

**मूलें गुष्ठस्य नृणां स्थूला रेखा भवंति यावंत्यः ।**
**तावंतः पुत्राः स्युः सूक्ष्माभिः पुत्रिकास्ताभिः ॥ ६२१ ॥**

पुरुषाच्या आंगठयाच्या उंचवट्याजवळ रेषा दिसतात त्या पुत्रदर्शक रेषा. त्या ठसठशीत असल्या तर पुत्र, बारीक असल्या तर कन्या; जितक्या रेषा तितकी संतति.

**टीप**—अशाच अर्थाचा श्लोक मागें ( ४४७ हा ) आला आहे. शिवाय ५१० श्लोकांत " बन्धुवर्ग " असा पाठ आहे. तो व्यापक असल्यानें ४४७ श्लोक आणि प्रस्तुत श्लोक यांच्याशीं विरोध नाहीं, पुनरुक्ति आहे इतकेंच.

**यवैरंगुष्ठमूलोत्थैस्तत्संख्यास्तनया नृणाम् ।**
**अपत्यरेखाः सर्वाः स्युः मण्यंगुष्ठतलांतरं ॥ ६२२ ॥**

आंगठयाच्या मूळशीं जितके " यव " उमटलेले असतील तितकी संतति मानावी या प्रमाणें कांहीं शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे, हें म्हणणें येथें सांगितलें आहे इतकेंच, परंतु

**जीवनं मरणं तेषां अभेदाद्भेदतः स्मृतम् ॥**

मणिबंध आणि आंगठा त्यांच्यामध्यें ज्या रेषा असतील त्या अपत्य-दर्शक आहेत असें पुनःसांगितलें पाहिजे. त्यांपैकी ज्या भिन्न म्हणजे तुटल्या असतील तितकी संतति मृत समजावी, रेषा अखण्डित असल्यास संतति विद्यमान ( अ० हयात ).

**यावंत्यो मणि बंधायुर्लेखांत प्रतिष्ठिताः स्थूलाः ।**
**तावत्संख्यान् भातृन् वदंति सूक्ष्माः पुनर्भगिनी. ॥ ६२३ ॥**

मणिबन्ध आणि आयुष्यरेषा यांच्यामधील जागेंत जितक्या ठळक रेषा असतील तितके भाऊ आणि बारीक रेषा असतील तितक्या बहिणी असें समजावें.

**टीपः**—ह्या श्लोकांचा वरील ४४८—५१० श्लोकांशीं मेळ पडतो.

रेखाभि श्छिन्नाभिस्त्रुटिताभिर्भावमृत्यवो ज्ञेयाः ।
यावंत्यस्ताः पूर्णा नियतं जीवंति तत्संख्याः ॥ ६२४ ॥

ह्या रेषा तुटलेल्या असल्यास किंवा तोकड्या असल्या तर त्या भावंडाचा मृत्यु होतो; आणि रेषा पूर्ण असली तर तें भावंड जिवंत आहे असें सांगावें.

टीपः—वरील ४४७, ४४८, ५१० ह्या श्लोकांचें फार सूक्ष्म रीतीनें संशोधन झालें पाहिजे. येवढा निष्कर्ष निघतो.

अंगुष्ठोदरमध्यस्थो यवो यस्य विराजते ।
उत्पन्नभक्ष्यभोजी च स नरः सुखमेधते ॥ ६२५ ॥

ज्याच्या आंगठयाच्या मधोमध असा " यव " असेल तो मनुष्य आपल्याच जमीनींतून निघणाऱ्या उत्पन्नावर निर्वाह करून चैनींत राहील.

यस्य मीनसमा रेखा कर्मसिद्धिस्तु दृश्यते ।
धनाढ्यः स तु विज्ञेयः बहुपुत्रो न संशयः ॥ ६२६ ॥

ज्याच्या तळहातावर मत्स्यासारखी खूण असते, मत्स्य चिन्ह स्पष्ट असतें तो पुरुष यशस्वी असतो, धनवान् असतो. शिवाय त्यास सुपुत्रहि अनेक असतात व त्यांचे सौख्य मिळतें.

मणेस्तलोन्मुखे मत्स्ये सहस्रधनवान् नरः ।
मकरे दशसाहस्रं शंखे लक्षपतिर्भवेत् ॥ ६२७ ॥

मत्स्याचें तोंड आंतल्या बाजूकडे असावें, म्हणजे तो मत्स्य शुभप्रद असतो. असा मत्स्य ज्याच्या हातावर त्याच्या हातांत शेकडों रुपये खेळतील. हातावर मकर चिन्ह असेल तर हजारों रुपये खुळखुळतील आणि शंख चिन्ह ( तळहातावर ) असेल तर लक्षाधीश होईल.

शंखमत्स्यसमाकारा यस्य स्यात् स धनी भवेत् ।
मीनयुगांकितपाणिर्नित्यं सत्रपदो भवति ॥ ६२८ ॥

एवंच; मत्स्य, मकर शख हीं चिन्हें धनाढय पुरुषाच्या तळहातावर स्पष्टपणें दिसतात. आणि दोन शुभप्रद मत्स्य जर हातांवर असले, तर तो धनाढ्य असेलच पण दातृत्वशीलहि असेल.

मत्स्ये शतं विजानीयात् मकरे तु सहस्रकम् ।
पद्मे कोटिं विजानीयाच्छंखे कोटिसहस्रकम् ॥ ६२९ ॥

मत्स्यचिन्ह तळहातावर असेल तर शेंकडों रुपये आणि सुसरीसारखे चिन्ह असेल तर हजारो रुपये तिजोरींत असतील, कमी होणार नाहींत. कमल चिन्ह असेल तर कोट्याधीश आणि उजवा शंख असेल तर नवकोट नारायण निरंतर राहील.

अंतर्मुखेन मीनद्वयेन युक्तेन पाणितलमध्यम् ।
यस्यांकितं भवेदिह स धनी सत्रप्रदो भवति ॥ ६३० ॥

तळहातावर दोन मत्स्य असले तरी त्यांचीं तोंडें आंतील बाजूस असावीं म्हणजे तो पुरुष फार औदार्यशाली असतो.

छत्रं चामरसंधनूरथ वसेदंभोलिकूर्मांकुशा ।
वापी स्वस्तिकतोरणानि चमरः पंचाननः पादपः
चक्रंशंखगजौसमुद्रकलशप्रासाद मत्स्यः यवः
यूपः सूर्यकमंडलू ह्यवनिभृच्चाभर तथा दर्पणम् ॥ ६३१ ॥

दांड्यासह छत्र, कमल, धनुष्य, निधि, वज्र, कुंभ, अंकुश, तलाव, स्वस्तिक, तोरणमाळ, चवऱ्या, सिंह, वृक्ष, चक्र, शंख, हत्ती, कलश, राजवाडा, मत्स्य यव, यूप, सूर्य, कमण्डलु, चाष, आरसा इत्यादि चिन्हें हातावर असलीं म्हणजे तो पुरुष राजा होतो.

टीपः—अशा अर्थाचे श्लोक वर अनेक आले आहेत. हल्लींच्या परिस्थितींत त्यांचा खुलासा करण्याची आवश्यकता नाहीं.

ध्वजो वा प्यथवा शंखः करमध्ये तु दृश्यते ।
समुद्रयायी स भवेद्बली च सततं किल ॥ ६३२ ॥

तळहातावर पताका, किंवा शंख ( उजवे कडील वळणाचा ) अशी चिन्हें ज्याच्या हातावर असतील त्याला समुद्रप्रवास घडेल. तो यशस्वी दर्यासारंग असेल यांत संदेह नाहीं. त्याचप्रमाणें—

कुंडलांकुशचक्राणि यस्य पाणौ भवेन्नृपः ।
त्रिशूलकरमध्ये तु तेन राजा प्रवर्तते ॥ ६३३ ॥

कवच, कुण्डलें, अंकुश, चक्र किंवा त्रिशूल अशीं लष्करीं चिन्हें ज्याच्या तळहातावर दिसत असतील तो भूपति म्हणजे राजा असणारच.

शक्तितोमरबाणासिरेखा चापोपमा भवेत् ।
यस्य हस्ते महाबाहो स जयेद्विग्रहे रिपून् ॥ ६३४ ॥

तळहातावर शक्ति ( फेंकून मारण्याचें तीक्ष्ण हत्यार ) तोमर ( परशु ) बाण, तलवार किंवा धनुष्य अशा सारख्या आकाराच्या रेषा जर ढळढळीत दिसत असतील, तर ज्याच्या हातावर त्या असतील तो पुरुष युद्धामध्यें आपल्या शत्रूंचा नायनाट करील

धनुषा वल्लभो लोके मंत्री चामरवान् करे ॥

नुसतें धनुष्यच तळहातावर दिसेल तर लोकप्रियता लाभेल, आणि दोन चवऱ्या ( चामरे ) दिसतील तर तो मुख्य प्रधान ( नांवाचा नव्हे तर वास्तविक अधिकार चालविणारा असा ) होईल.

कनिष्ठांगुलिमूलाच्च रेखा गच्छति तर्जनीम् ।
अविच्छिन्नानि वर्षाणि शतमायुर्विनिर्दिशेत् ॥ ६३५ ॥

करंगळीच्या उंचवट्याखालून एक तिर्यक् रेषा तर्जनीकडे जात असते. तिच्यावरून आयुष्याचें अनुमान करावें ( क्वचित् अशा रेखा दोनहि असतात ). ही रेषा विच्छिन्न तुटलेली नसेल तर पुरुषाला शतायुष्य सांगावें.

कनिष्ठांगुलिमूलाच्च रेखा गच्छति मध्यमाम् ।
अविच्छिन्नानि वर्षाणि षष्ठिमायुर्विनिर्दिशेत् ॥ ६३६ ॥

करंगळींच्या उंचवट्यापासून मधल्या बोटापर्यंत आयुष्यरेषा येऊन तेथें तुटत असेल, त्याच्या अलिकडे तुटत नसेल तर आयुष्य साठ वर्षांचें सांगावें.

यावंत्योंगुलयो लंघ्यो मूलाज्जीवितरेखया ।
तावंत्यः शरदो ज्ञेयाः पंचविंशतयो बुधैः ॥ ६३७ ॥

आयुष्यरेषा आरंभापासून निघून कोणत्या बोटाच्या उंचवट्याच्या पुढें जाते ते पहावें—आणि प्रत्येक उंचवट्यागणिक पंचवीस पंचवीस वर्षांचें आयुष्य सामुद्रिक शास्त्रज्ञानें सांगावें.

कालह्रानितयापेक्षा ज्ञेया विंशतयोऽपि च ।
आयूरेषास्वपाच्च अल्पमृत्युर्विचार्यते ॥ ६३८ ॥

आयुष्यरेषा फारच लहान असेल तर किती वर्षे कमी करावीं ह्याचा विचार करतां वीस वर्षांचा तरी कालखण्ड समजल्यास हरकत नाहीं. अशा रीतीनें आयुष्यरेषेच्या अनुरोधानें मृत्यु, अपमृत्यु ह्यांचा विचार सांगावा.

कररेषात्मकं शास्त्र मित्थमुक्तंमयाऽधुना ।
मुहुर्मुहुर्दर्शनाच्च हस्तानां ज्ञास्यते भृशम् ॥ ६३९ ॥

या प्रमाणें हे हस्तरेषाशास्त्राचें "दिग्दर्शनच येथें केलें आहे. त्यांचें परिशीलन केल्यावर वरचेवर अनेक प्रकारच्या हस्तांचें अवलोकन केल्यानें शास्त्राचें यथातथ्य ज्ञान होईल.

श्लाध्यश्चोष्णोऽरुणोऽस्वेदोऽच्छिद्रस्निग्धश्च मांसलः ।
श्लक्ष्णस्ताम्रनखो दीर्घाङ्गुलिको विपुलः करः ॥ ६४० ॥

जो हात म्हणजे हाताचा पंजा रुंद, उबट, लाल, कोरडा असतो, तसाच तजेलेदार व मांसल असतो; जो खडबडीत नसून बोटांमध्यें फटी नसतात आणि बोटें लांब, व नखें आरक्त असतात, असा हात शुभ होय. ( अगोदर हाताची ठेवण पाहून मग रेषा पहाव्या )

पद्मंवायदि वा शंखं स्पष्टाकारं च दृश्यते ।
पुरुषस्यकरे यस्य नृपतिः स च कथ्यते ॥ ६४१ ॥

तळहातावर कमळ किंवा शंख, अशा सारखी आकृति **स्पष्टपणें** दिसत असेल, तर तो पुरुष राज्यपदीं बसलेला असेल किंवा लवकरच राजा होईल, असें खुशाल सांगावें.

यस्य पाणितले रेखा कनिष्ठा मूलगामिनी ।
सुवर्णरत्नराज्यश्री—दायिकाऽसौ न संशयः ॥ ६४२ ॥

ज्याच्या तळहातावरील विशेष प्रकारची ऊर्ध्वरेषा करंगळीच्या उंचवट्यामध्यें घुसते त्या पुरुषाला सोनें, नाणें, रत्नें, राज्यलक्ष्मी यांचा लाभ त्याच्या कर्तबगारीच्या काळांत व्हावयाचा यांत संशय नाहीं.

अंगुष्ठमूलगाचासौ करोति नृपतिं नरम् ॥
सैव तर्जनिका प्राप्ता दत्ते साम्राज्यमुत्तमम् ॥ ६४३ ।

तशीच ऊर्ध्वरेषा आंगठयाच्या मुळाजवळील भागांत उमटेल, तर तो मनुष्य राज्यपदांवर आरूढ होईल आणि ती रेषा आंगठयाकडे न जातां तर्जनीकडे गेलेली असेल तर मग काय, तो राजांचाहि राजा होईल.

सेनापतिर्धनेशो वा मध्यमागतरखयो ।
अनामिकां पुनः श्रेष्ठो धनवान् सर्वदा नरः ॥ ६४४ ॥

ऊर्ध्वरेषा जर मधल्या बोटाच्या मूळप्रदेशांपर्यंत जाऊन भिडेल, तर तो मनुष्य सेनापति किंवा राज्याचा कोषाध्यक्ष होईल; आणि अनामिकेच्या तळाशीं भिडत असेल तर तो समाजांत श्रेष्ठ पद पावून त्याला निरंतर धनलाभहि होईल.

अकर्मकठिनौ हस्तावथाङ्गुल्या च कोमलौ ।
अच्छिद्रांगुलिनो यस्य स नरः सुखभाक् भवेत् ॥ ६४५ ॥

पुरुष जरी कोणतें शारीरिक मेहनतीचें काम हातांनीं करीत नसला तरी त्याचे हात त्रिसविशीत नसून टणक असावे. बोटें मऊ असावीं. बोटांमध्यें मोठमोठया फटी नसाव्या. असें असेल तर त्या पुरुषाला आयुष्यांत सुख लाभेल.

करपादांगुलौछिद्रं पादांगुष्ठश्च दीर्घकः ।
भार्याभर्तृविवादाय दारिद्र्याय च कल्पते ॥ ६४६ ॥

हात किंवा पाय ह्यांच्या बोटांत फटी असतील आणि पायाचा

आंगठा फाजील लांब असेल तर नवरा बायको यांच्यांत भांडणें होतील, आणि त्यापासून दारिद्र्यहि पाठोपाठच येईल.

आतपत्रंकरे यस्य दण्डेन सहितं यदि ।
चामरद्वितयं चापि चक्रवर्ती स जायते ॥ ६४७ ॥

परंतु तळहातावर " छत्री " सारखी आकृति दिसेल आणि त्या छत्रीचा दाण्डासुद्धा जर स्पष्ट दिसत असेल! किंवा दोन चामरांच्या खुणा दिसत असतील तर तो पुरुष चक्रवर्तीच होईल किंवा असेल.

आवर्ता दक्षिणाः शस्तास्तेंङ्गुष्ठाङ्गुलिपर्वसु ।
ताम्रंस्निग्धोन्नतंतुंगं पर्वार्धोत्थं नखं शुभम् ॥ ६४८ ॥

हातावर आंगठयावर अथवा बोटांवर भोंवरे असतात, ते उजवीकडे वळलेले असावे. तसेंच नखें, गुळगुळीत, उंच, कांसवाच्या पाठीसारखीं उठावदार, पेराच्या अर्धापासून निघणारीं आणि लालभडक असावा. अशीं नखें शुभकारक असतात.

नखेषु बिन्दवः श्वेताः पाणयोः पाद्योरपि ।
आगन्तवः प्रशस्तास्युः नरो भोगी च भाग्यवान् ॥ ६४९ ॥

नखांवर कित्येक वेळां छिटे दिसतात. ते पांढरे असतात. हे छिटे किंवा ठिपके हाताच्या किंवा पायांच्याहि बोटावर दिसतात. पण तसे छिटे कायमचे नसावेत उमटून मावळणारे छिटे हे उपभोग आणि भाग्यशालित्व कारक असतात.

अप्रत्यक्षाणि शास्त्राणि विवादास्तेषु केवलम् ।
हस्तसामुद्रिकंशास्त्रं प्रत्यक्षंच प्रचक्षते ॥ ६५० ॥
हस्तचिन्हफलार्थश्च संक्षेपेणात्र दर्शितः
विबुधानांचबालानां तुष्टयेकष्टहानये ॥ ६५१ ॥
रेखा ज्ञानपदोग्रंथो रचितोयं सुबोधनः ।
अमुना प्रीयतांश्रीमान् परमात्मा सदाशिवः ॥ ६५२ ॥

---

# मुखसामुद्रिक अथवा चेहऱ्यावरून कुंडली मांडणें.

आतापर्यंत हस्तसामुद्रिकासंबंधीं माहिती अगदीं सविस्तर दिली आहे. त्याच्या बरोबर मुखसामुद्रिक म्हणजे चेहऱ्यावरून ग्रहयोग जाणण्याची माहिती असणेंही तितकेंच महत्त्वाचें व आवश्यक असल्यामुळें ती माहितीहि ह्या ग्रंथांत विस्तृतपणें देत आहों. ह्या विवेचनाचा उपयोग सर्वांना होईल अशी आशा आहे. मात्र ह्या बाबतींत प्रत्येकानें अनेक हातांच्या प्रत्यक्ष आकृतींचा, त्यांचा जन्मकुंडल्यांचा व त्या त्या व्यक्तींच्या फोटोंचा संग्रह करून अनुभव पहावा.

मनुष्याचे शरीरावर, विशेषतः चेहऱ्यावर जन्मलग्नाचीं चिन्हें असतात. त्यावरून मनुष्याची जन्मकुंडली तयार करितां येते, ती कशी करावयाची याचें वर्णन आतां देतों.

**मनुष्यांचे चेहेरे त्रिकोण, दीर्घवर्तुळ, वर्तुळ व चौकोन** असे चार प्रकारचे असतात. म्हणजे स्थूलमानानें यांपैकीं कोणत्या तरी आकृतींत प्रत्येक मनुष्याचा चेहरा येतो.

डोळे, मोठे अगर लहान असून कपाळाचा भाग रुंद, आणि दोन्ही गालांमधील भाग अरुंद, हनुवटी ऱ्हस्व अगर दीर्घ कशीही असली तरी कोंचदार, असल्या लक्षणांनीं युक्त असलेल्या मुखास **त्रिकोणी** म्हणावें.

डोळे व नाक लहान अगर मोठें व कपाळाचा भाग अरुंद, असें असून तोंड लांब व दोन्ही गालांमधला भाग रुंद असतो, अशा **चेहऱ्यास दीर्घवर्तुळ** म्हणावें.

गाल फुगलेले, दोन्ही गालांमधील भाग जास्त रुंद; हनुवटीचा भाग अरुंद आणि कपाळ अरुंद असेल तर तो **चेहरा वर्तुळ** या संज्ञेखालीं येतो.

कपाळ रुंद, हनुवटीचा भाग रुंद, मधला भाग चौकोनी, डोळे लहान अगर मोठे आणि सबंध चेहरा लहान अगर मोठा असें असेल तर त्या मुखास **चौकोनी** म्हणावें.

**चेहरा त्रिकोण असेल** तर **मेष, वृश्चिक, मीन आणि मकर हीं लग्नें** असतात.

**चेहरा दीर्घवर्तुळ** असेल तर **तुला आणि वृषभ** हीं लग्नें असतात.

ज्याचें **मुख वर्तुळाकार** असेल त्याचें जन्मलग्न **कन्या, मिथुन, कुंभ** यांपैकीं कोणतें तरी एक असतें.

ज्याचें **तोंड चतुष्कोण असेल** त्याचें धनु, कर्क, सिंह यांपैकीं एक लग्न असतें. जिज्ञासूनें याप्रमाणें जन्मलग्नें ओळखावीं.

**मेष लग्नीं** जन्म असेल तर चेहरा त्रिकोणी, डोकें मोठें, नाकपुड्या फुगीर, डोळे व कपाळ मोठें, शरीरबांधा सडपातळ, रंग निमगोरा, हनुवटी कोंचदार, व गाल फुगीर अशीं लक्षणें असतात.

जो **वृश्चिक लग्नीं** जन्मला आहे त्याचा चेहरा त्रिकोणी, पुढें आलेला, नाक सरळ व चोंचीदार, हनुवटी लांब, कपाळ रुंद, डोळे फार मोठे नाहींत असें, तोंडावर केंस कमी, उंची फार नाहीं, वर्ण गोरा, चेहरा मोहक अशीं लक्षणें असतात.

ज्याचा जन्म **मकर लग्नीं असेल** त्याचें डोकें लहान, चेहरा त्रिकोणी, तोंड थापटल्यासारखें, डोळे लहान, नाक लहान पण सरळ, हनुवटी लहान, कपाळ पुढें आलेलें, चेहरा मोहक नव्हे, अशीं लक्षणें असतात.

जन्म **मीनलग्नीं असेल** तर चेहरा त्रिकोणी, डोकें मोटें, डोळे लहान, नाक लहान पण फुगलेलें, रंग काळा, कान मोठे. चेहऱ्याचा आकार मोठा, शरीरबांधा मध्यम उंचीचा, अशीं चिन्हें असतात.

चेहरा **दीर्घवर्तुळ असेल** तर जन्मकालीं तुला व वृषभ हीं लग्नें असतात.

चेहरा लांब, ज्याभोंवतीं कृष्णवर्ण आहे असे मोठे डोळे, लहान पण सरळ नाक, सर्वदा गर्वयुक्त कृति, डोकें मोठें, रंग सावळा, मध्यम उंची, गर्विष्ठ मुद्रा, डोळे काळे, हीं लक्षणें **वृषभलग्नावर** जन्म पावलेल्याचीं आहेत.

**जन्मकालीं तुला लग्न** असेल तर डोळे लहान पण काळे, नाक लांब व सरळ, **वृषभ लग्नावर** झालेल्या माणसाच्या चेहऱ्यापेक्षां लांब चेहरा, बांधा उंच, डोकें लहान व रंग काळा असतो.

त्रिकोण, चौकोन, दीर्घवर्तुल आणि वर्तुल ह्या चेहऱ्यांच्या चार मुख्य प्रकारांतच आणखी प्रत्येकीं ४–४ प्रकार होतात; पण ते प्रत्यक्ष अनुभवसाध्य असल्यानें प्रत्येकानें स्वतःच ठरवावें.

ज्या माणसाचें तोंड **वर्तुलाकार** असतें त्याच्या जन्मकाळीं कन्या, मिथुन, किंवा कुंभ यांपैकीं कोणतें तरी लग्न असतें.

**मिथुन लग्न असेल** तर चेहरा वर्तुळ, डोकें मोठें, नाक लहान, डोळे मोठे, रंग निमगोरा, हनुवटी लांब, घारे डोळे, मनुष्य गिड्डा, कपाळ रुंद, याप्रमाणें नऊ लक्षणें असतात.

**कन्यालग्न असेल** तर चेहरा वर्तुळ, डोकें लहान, नाक सरळ व लांब, डोळे मोठे, हनुवटी आंखूड, कपाळ रुंद, चेहरा मोहक, रंग गोरा, मुद्रा सौम्य, झुलत चालणारा, अशीं लक्षणें असतात.

**कुंभलग्नीं जन्म** पावणाऱ्याचा चेहरा वर्तुळ, डोकें मोठें, नाक सरळ व लहान, डोळे काळे व फार मोठे नाहींत, हनुवटी आंखूड, वर्ण गोरा, बांधा उंच अशीं लक्षणें असतात.

**चेहरा चौकोन** असेल तर **कर्क, सिंह व धनु हीं लग्नें असतात.**

**कर्कलग्न असेल** तर चेहरा चौकोन, डोकें लहान, नाक सरळ व लांब, कपाळ अरुंद, डोळे कमळपत्रासारखे, बांधा उंच, वर्ण गोरेला, मितभाषण, मुद्रा सौम्य अशीं लक्षणें असतात.

**सिंहलग्न असेल** तर चेहरा चौकोन, डोळे लहान, हनुवटी आंखूड, नाक पसरट, डोकें मोठें, चेहरा गंभीर, उंची मध्यम अशीं लक्षणें असतात.

**धनुलग्न असेल तर** चेहरा चौकोन, गाल पसरट, हनुवटी लांब, नाक लांब व पसरट, डोळे मोठे व काळे, रंग निमगोरा, उंची मध्यम अशीं लक्षणें असतात.

## मेषादि १२ लग्नांचे अनुभवसिद्ध गुणधर्म व स्वभाव

( १ ) मेष—**शरीरानें कृश, मनाचा** उदार, परोपकारबुद्धि, ठेंगणा, पुराणमताभिमानी, परंतु धर्माचरण कमी, बोलण्यांत वाकबगार, देखणा, **नेत्र घारे, केंस पुष्कळ, चेहरा वाटोळा,** उष्ण प्रकृति, वातविकार कौटुंबिक सुख कमी, परंतु कुटुंबपालक, धर्माचा कट्टा अभिमानी, भाषण कडक व खोंचदार, वृथाभिमानी, तापट, सारासार विचाराची कमतरता, स्वतंत्र धंद्यामध्यें यश, अनेक धंदे करणारा व वारंवार धंदा बदलणारा, सांपत्तिकदृष्ट्या अडचणींचे व नुकसानीचे प्रसंग फार, मनाची अनिश्चित स्थिति, दीर्घोद्योगी, परंतु बऱ्याच वेळां अपयश, लोक प्रतिकूल.

( २ ) **मेष—वागणूक** अर्धवट, वृत्ति अजागळ, (मलीन) साधारण उंच, कृश, सडपातळ, बोलण्याचा तिटकारा, बोलतांना अडणें, चेहरा पसरट लांब, डोळे मिश्र रंगाचे, नाक जाड, शब्द व आवाज घोंगरा किंवा कर्कश, दांत किंचित् पुढें, खालची हनुवटी दांताखालीं चाऊन किंवा पुढें करून बोलण्याची सवय, रागीट, भित्रा, मिशा आणि डोक्यावर केंस कमी, केंस पिंगट काळसर, कपाळ अरुंद, पोषाख ऐटदार करण्याची वृत्ति पण अस्वच्छ आणि अव्यवस्थित, वर्ण तांबूस, प्रवासशोकी दंत-

रोगी दुसऱ्यावर फाजील विश्वास ठेवणारा, शीघ्रकोपी, तोंडावर, चेहऱ्यावर जखमा, देवी, व्रण, खांडुक, खवडे किंवा अशा तऱ्हेच्या खुणा, अक्षर, बोजड व वांकडेतिकडे.

(१) **वृषभ**–**शरीर स्थूल व अवजड**, मनाचा कोंवळा, निष्कपटी, परंतु व्यवहारांत स्वार्थबुद्धि, **मध्यम गौर वर्ण**, **नेत्र काळे व पाणीदार**, हौशी व चैनी, सुखोपभोगांत व प्रापंचिक गोष्टींत निमग्न, कमी बोलणारा, विचारी, स्थिर व शांत स्वभाव, मृदु व गोड भाषण, **केंस थोडे**, **चेहरा गंभीर**, **लांबट**, शीत प्रकृति, थोड्याशा फायद्यांत समाधान मानणारा, मोठमोठ्या लोकांचा व राजादिकांचा आश्रय, परंतु अनिश्चित उत्कर्ष, परिस्थितींत वारंवार बदल होतो, ऐश्वर्याचा काल कायम टिकत नाहीं, स्वतंत्र धंद्यापेक्षां नोकरींत यशस्कर, सत्याचा अभिमान, वेदान्ताची आवड, ईश्वरभक्त, द्रव्यलाभ चांगला असून द्रव्यसंचय होतो.

( २ ) **वृषभ**–उंची साधारण, शरीर बांधेसूद, पुष्ट, गोंडस, दांत स्वच्छ पांढरे, वर्णानें गौर, कांतिमान तेजस्वी मोहक, डोळे, स्वच्छ व तेजदार, गाल व हात भरदार, चेहऱ्यांत गोल–वाटोळेपणा व भव्यता, नाक शेंडेदार, केस काळे, कपाळ मोठें, बोलणें उत्तम, पोषाख स्वच्छ व टापटीपीची वृत्ति व वागणूक साधेपणाची पण व्यवहारदक्ष, हनुवटी डोळ्यांची ठेवण, नाक, गाल वगैरे अवयव टाकटीक, अक्षर चांगलें वळणदार, लेखनाची व चित्रकलेची अभिरुची, लेखन व बोलणें सरळ, कपाळ मोठें.

( १ ) **मिथुन**—**शरीर कृश**, प्रकृति अशक्त, वातप्रकृति, मनाचा दिलदार, ठेंगणा, **पोषाख डौलदार**, गंभीर वृत्ति, नानातऱ्हेचे गूढ तत्त्वांचे शोध लावण्याविषयीं आतुर, बुद्धिमान, विद्वान, धोरणी, तीक्ष्ण विचार व अचाट कल्पना, वाक्चातुर्य, हरएक कामांत यशस्वी, **नेत्र घारे किंवा पिंगट रंगाचे**, **केस अल्प व राठ**, **तोंडावळा लांबट**, उदार, कोणासही हार न जाणारा व प्रसंगीं चातुर्यानें सर्वांवर छाप ठेवणारा, अभिमानी, शूर व वादविवादांत यश मिळविणारा, स्वतंत्र धंद्यांत व शास्त्रीय विषयांत पारंगत, धाडसी, लौकिकवान, उद्योगी व द्रव्याचा नायक, द्रव्यासंबंधी अडचणी कधींच येत नाहींत; परंतु अतिशय खर्चिक व उधळ्या होतो.

( २ ) **मिथुन**—शरीर कृश, सडपातळ, उंच परंतु डोकें किंचित मोठें, चेहरा आकर्षक, नखरेबाज, डोकें किंचित मागील बाजूस लांबट, रंग हिरवा आणि पांढरा असा मिश्र तांबूस काळसरपणाचीही झाक राहील. डोळे काळे, केंस बारीक, आणि

थोडे तेही भुरकट रंगाचे, वार्णी व उच्चार स्पष्ट, स्वर आणि आवाज मंजुळ, वक्तृत्वाची व कोणत्याही विषयांवर बोलण्याची हौस, तोंडाळ, चालण्याचे वेळीं कांहीं लकब असण्याचा संभव, कपाळ मोठें.

( १ ) **कर्क**—**शरीर स्थूल**, स्नायु व **शरीराचे अवयव मजबूत**, पोहण्याची व शरीरसामर्थ्याची (तालमीची) आवड, पोषाखांत साधेपणा, सारासारविचार व दूरदृष्टि, सत्याकरितां हाल सोसणारा, मनाचा खंबीर, लेखक व वादविवादपटु, निःस्वार्थी, ऐहिक गोष्टींविषयीं उदासीन, निरपेक्ष कार्यकर्ता, कर्तव्यबुद्धीची जाणीव, अव्याहत श्रम करणारा, बोलण्याप्रमाणें कृति, शरीरप्रकृतिविषयीं निष्काळजी, अतिशय बुद्धिमान्, विद्येच्या व मानाच्या ऐश्वर्यानें युक्त, **चेहरा भव्य वाटोळा**, **गौरवर्ण**, **नेत्र पिंगट** परंतु तेजस्वी, **केंस पुष्कळ**, चैनीच्या गोष्टीपासून अलिप्त, जबर महत्त्वाकांक्षा, संकटास न जुमानणारा, लोकनायक आणि श्रेष्ठ अधिकारसंपन्न, लोकहितवादी, आचरण शुद्ध व अनुकरणीय, जगाचा मित्र व हितकर्ता.

( २ ) **कर्क**—शरीर मध्यम आकाराचें, बांधा मजबूत, मध्यम देही म्हणजे जो उंचीच्या सदरांत जमणार नाहीं असा. चेहरा किंचित् लांबट गोल; आकर्षकपणा किंवा सौंदर्य यांचा अभाव, पण पाहणारांवर छाप बसविणारा, डोळे लहान पण तेजस्वी, दृष्टींत चंचलता, उत्तम पोहणारा, भाषण किंवा लेखन यांत निर्भीडपणा व कडक शब्दांचा भरणा, रंग काळासांवळा, जलद चालणारा, दांत व चेहरा स्वच्छ, दांत, मिशा मोठाल्या पण केंस थोडे, कपाळ भव्य, दृष्टींत तेज, निर्व्यसनी, हाताचा पंजा व पावलें मोठीं, अक्षर चांगलें पण बारीक, पोषाख वागणूक सभ्य व जुन्या पद्धतीची.

( १ ) **सिंह**—मनाची स्थिति चमत्कारिक, आडदांड, मत्सरी व भांडखोर, आपल्याच आढ्यतेंत व श्रेष्ठत्वाच्या भावनेंत गुंग, कोणास न जुमानणारा, **राकट**, उतावळा व शूर, **शरीर भव्य**, **रक्तवर्ण**, **अवयव दीर्घ**, **डोळे रक्तवर्णाचे व वाटोळे केंस फारच कमी**, **चेहरा उमदा**, **वर्तुलाकार**, परंतु पसरट, रानांवनांत अगर अन्य ठिकाणीं हिंडण्याचा नाद, राजवैभव किंवा राजसभेंत श्रेष्ठांची मैत्री, अविचाराच्या व उतावीळपणाच्या गोष्टी होऊन त्याबद्दल मागाहून विचार, अस्थिर व असाधानवृत्ति, वाहनांचा शोकी, कृतीपेक्षां बडबड जास्त.

( २ ) **सिंह**—शरीर मजबूत भव्य व मोठ्या आकाराचें, चेहरा सिंहासारखा उग्र, चेहऱ्यावर कुर्रेबाजपणाची व स्वतःच्या श्रेष्ठतेची भावना सदोदित. दांत व दाढा विशेष टणक व कणखर, छाती भव्य, रुंद आणि रुबाबदार, कपाळ मोठें नाक

रुंदट, नागपुड्या मोठ्या, तालमीचा शोक, वर्ण मध्यम गौर किंवा तांबूस, कर्णभार, निभड्या छातीचा, प्राणांतिक संकटांनाही न जुमानणारा व टक्कर देणारा, शब्द मोठा, भाषण कडक, अक्षर चांगलें, कोणत्याही विषयाचें मर्म जाणणारा, प्रचंड बुद्धिमान् स्वातंत्र्य वृत्तीचा आधारस्तंभ. केंस राठ, डोळे तीक्ष्ण, पोषाख, आवड आणि वृत्ति जुन्या पद्धतीवर.

( १ ) **कन्या—उंच, गौरवर्ण, चेहरा गोंडस**, स्त्रियांना प्रिय, भाषण साधें परंतु कळकळीचें, स्थूल व मध्यमदेह, वृत्ति चंचल, मनाचा कुरठा, **ऐटदार, व भपकेबाज पोषाख**, प्रपंचांत व ऐहिक गोष्टींत निमग्न, **कॆस थोडे, वाटोळा परंतु रेखलेला चेहरा,** दुसऱ्याचा हेवा करणारा, दुष्ट मनोवृत्तीच्या लोकांची संगत, स्वार्थपरायण, पापबुद्धि, आचारविचारांत मेळ नसणारा, धर्मबुद्धीचा तिटकारा, दुसऱ्यावर अवलंबून राहणारा व द्रव्याचे बाबतींत फार जपून वागणारा.

( २ ) **कन्या**—मध्यम देहाचा व साधारण पुष्ट, उंचीला कमी, चेहरा रुंद गोल आकाराचा, क्वचित् लाजाळू, चालताना बोलतांना हात किंवा पाय हलविण्याची किंवा एखादा हात पुढें करून बोलण्याची लकब, हांसरा, विनोदी, अवाच्या सवा गप्पा झोंकणारा, डुलत चालणारा, हौशी, दयाळू अंतःकरण, डोळे पाणीदार पण मिश्ररंगाचे, वर्ण तांबूस गौर, दांत व दाढा अढळ आणि स्वच्छ, आवाज लहान, कपाळ मध्यम, पोषाखांत विस्कळितपणा, केंस मृदु, छाती मध्यम, स्त्रियांची आवड, अक्षर चांगलें वळणदार, कलाकौशल्याचा शोकी, चित्रकलेंत प्राविण्य.

( १ ) **तूळ—शरीरप्रकृति** साधारणतः **अशक्त, मनाचा कोंवळा**, सुखी, स्वार्थ साधून परहिताविषयीं मेहनत करणारा, **गौरवर्ण, चेहरा लांबट, मस्तक मोठें, डोळे काळसर,** परंतु **पांढऱ्या रंगाची छटा, नाक मोठें, कॆस राठ व थोडे, रोगिष्ट**, पापकर्मबुद्धि, स्त्रियांचा अभिलाष, आपल्या हिताविषयीं जपणारा व तळमळणारा, मोह आणि मत्सर यांचा सोबती, परनिंदा व आत्मस्तुति करणारा, स्वार्थलोलुप, बुद्धि तीव्र, धंद्यामध्यें व व्यापारांत वाकबगार, द्रव्यसंपन्न, वाहनांचा परीक्षक.

( २ ) **तूळ**—शरीराचा आकार व विशेषतः चेहरा, हातपाय लांबट (दीर्घ) उंच, सडपातळ, वर्ण मध्यम पण गौरवर्णाची झांक. चेहरा आकर्षक, बोलणें थोडें व अगदीं मोजक्या शब्दांत, बोलतांना व चालतांना क्वचित डोलण्याची किंवा माना वेळण्याची

लपेट, पुढें वाकून बसण्याची अगर चालण्याची संवय, हास्य अगदीं बेताचें व तुरळक, पोषाख नीटनेटका तथापि पांढऱ्या वस्तूकडे ओढा, गोड पदार्थाची आवड, केंस थोडें पण काळेभोर, दांत स्वच्छ, कपाळ खालच्या बाजूस वळलेलें, छाती मध्यम, अक्षर चांगले वळणदार, नकाशे, चित्रें काढण्याची आवड.

( १ ) **वृश्चिक–उंच, शरीर कृश, जोमदार व बांधा मजबूत,** स्वभाव कपटी व अपमतलबी, धूर्त, विद्या अल्प परंतु विलक्षण धाडसी, क्षणोक्षणीं विचारांची स्थिति पालटणारा, स्वार्थाकरितां दुसऱ्याचें नुकसान करणारा, भाषण मायावी, गोड व भुरळ पाडणारें, कार्यसाधु, मत्सरग्रस्त, परंतु दिसण्यांत फारच साधा, **डोळे घारे किंवा पिंगट, केंस थोडे राठ,** विलक्षण बुद्धिमान् व व्यवहारकुशल, लोक अनुकूल करून घेण्याची हातोटी, महत्त्वाकांक्षी, स्वतंत्र विचाराचा, धाडसी व भयंकर उद्योगी, उष्ण प्रकृति, परंतु कांटक व कोणावरही विसंबून न राहणारा, धारिष्टवान्, सत्यासत्याची पर्वा न करणारा, चाणाक्ष.

( २ ) **वृश्चिक**—मध्यम देहाचा, वर्णमिश्र निळसर गौर, शरीराचा बांधा चांगला, कणखर व हाडापेरांनीं सकस, नाक मोठें व किंचित् फुगीर, गाल व चेहरा लांबट वर्तुल, तोंड व कपाळ मोठें, डोळे चांगले पण डोळ्याचा रंग विचित्र, मान उंच, छाती रुंद व फुगीर, चालणें बोलणें ऐटदार, नानातऱ्हेचे पोषाख करणारा, नाटकीवृत्तीचा, भाषा रसाळ, मानभावीपणा, चतुर, चलाख, लेखनाचे कामांत कंटाळा, अक्षर किरटें व बारीक, दांत व दाढा टणक व कणखर, तंबाखू, तपकीर, पानसुपारी इत्यादिकांपैकीं एखादें व्यसन.

( १ ) धनु—कोणत्याहि भानगडीपासून पराङ्मुख, **वर्ण मध्यम गौर**, स्थिर व शांत स्वभाव, **चेहरा बसकट, नेत्र रक्तवर्ण,** निस्तेज, **चेहऱ्यावर औदासीन्य,** प्रापंचिक गोष्टींपासून सुखाचा अभाव, कलहकारी, द्रव्याचा तुटवडा, उद्योग, अगर व्यापारधंद्यामध्यें कमीपणा, अपयशाचा वांटेकरी. मानसिक चिंता व दुःख, विद्या चांगली, परंतु विद्येचा उपयोग वाईट कामाकडे, निद्रा, आळशी, स्थिरबुद्धि व उद्योगांत अव्यवस्थित.

( २ ) धनु—शरीराची ठेवण व आकार बांधेसूद, पुष्ट, डुलत चालणारा, तुंदिलतनु, पोट सुटलेलें किंवा मोठें, शारीरिक व्यायाम व तालमीची आवड, नाक किंचित जाड व बसकट, छाती, गळा मान, दंड, हात वगैरे प्रगल्भ, बोलण्यांत व वागण्यांत अहंभाव, डोंगरावरून किंवा शेतांतुन चालण्यांत पटाईत, ज्याला उंच म्हणतां येणार

नाहीं पण ठेंगणाही नाहीं असा. डोळे मोठाले, चेहरा गोल, गाल फुगीर, दांत व दाढा कणखर परंतु दंतदोष, केंस थोडे, डोक्यास टक्कल असण्याचा संभव, मिशा पीळदार, कपाळ मध्यम आणि थोडेसें खोलगट, वृत्ति व वागणूक धीरगंभीरपणाची, अक्षर साधारण तथापि लेखांत मुद्देसूदपणा, शक्य तितकें कमी लिहिण्याची प्रवृत्ति, जबाबदारी ओळखणारा.

( १ ) **मकर**–स्वभाव चिडखोर, घातकी व क्रूरकर्मप्रवीण, प्रवासाची व हिंडण्याची अतिशय आवड, गुप्त कृत्यें करणारा, अस्थिर, दुसऱ्याचा द्वेष व अनिष्ट चिंतन करणारा, आळशी, मूर्ख, मनाचा कमकुवत आणि भ्याड, महत्त्वाकांक्षा फार, परंतु प्रयत्न अगर उद्योगाची कमतरता, आपलें हृद्गत न समजूं देणारा, कामें अर्धवट करणारा, व्यसनानें युक्त, विचारहीन, लोभिष्ट, विद्या सामान्य, वातविकारानें पीडित, संशयग्रस्त, **वर्ण गौर, देह कृश, सडसडीत, डोळे काळे, तोंड लांबट,** केंस मध्यम, चेहरा तेजहीन, फार उंच नाहीं असा, धंद्याच्या व द्रव्याच्या दृष्टीनें सामान्य, अव्यवस्थित.

( २ ) **मकर**—साधारणत: किरकोळ आणि फाटक्या शरीराचा, उंच मान, पोट, छाती, मान, गळा, गाल इत्यादि ऱ्हस्वाकार, हातपाय किंवा माना वेंगाडण्याची लकेर, चंचल व कशाचा कशास मेळ नाहीं अशा स्वरूपाची वागणूक व बोलणें, नाना-तऱ्हेचे हावभाव करणारा, जमाखर्च लिहिण्यांत दक्ष, मिशांचे झुपके, केंस राठ, शरीरानें कृश, उंच, डोकें मोठें, वर्ण तांबुसकृष्ण, एकदम हुरळून जाणारा, चेहरा, नाक, दांत, तोंड व हनुवटी यांची ठेवण निराळ्याच प्रकारची, केंस पुष्कळ, पोषाखांत नाविन्य, नव्याजुन्यांची भेसळ करण्यांत समाधान, लेखनाचे कामांत हुषार पण सांगकाम्या, रागलोभ झटपट येणारा अक्षर चांगलें पण लिहिण्याचा कंटाळा, ह्या लग्नाची कांहीं माणसें व त्यांचे कांहीं अवयव अतिशय स्थूल व लठ्ठ असतात.

( १ ) **कुंभ**—दिसण्यांत शांत, मितभाषणी, लोकांशीं मिळून मिसळून वागणारा, परंतु धूर्त, कावेबाज व अपमतलबी, स्वभावांत व वर्तनांत आळस व मंदपणा विशेष, अनियमित गोष्टी, कोणत्याहि गोष्टीमध्यें जपून व संभाळून काम करणारा, परावलंबनप्रवीण, मायाळू, उदार, परंतु स्वत:ला त्रास करून न घेणारा, स्वभाव मानी, हट्टी व आपलें मत खरें करणारा, विद्या पूर्ण व शास्त्रीय शोधांत किंवा विषयांत पारंगत, मानसन्मानाची आवड, **शरीर साधारणत: कृश, मध्यम गौर वर्ण, नेत्र चंचल घारे, तोंड बसकट, केंस थोडे.**

( २ ) **कुंभ**–शरीराचा बांधा पुष्ट व रेखलेला, मान गळा, चेहरा, छाती रुंद, चेहरा गोल, पण हनुवटी किंचित् पुढें, डोक्याचा मागील भाग जाड, कपाळ दोन्ही बाजूंस निमुळतें, पाहणाराच्या मनावर एकदम छाप बसेल अशा प्रकारचें चेहऱ्यांत वैशिष्ट्य, देखणा, सुंदर, मनगटें मोठीं, निरनिराळ्या नवीन कल्पनांचा जनक, विचारमग्न, डोळे काळे, केंस कमी, साधारणतः डोक्यास टक्कल असणारा, कपाळ रुंद, चालतांना आपल्याच तोऱ्यांत गर्क, बोलणें नियमित पण महत्त्वाचें, खोल बुद्धीचा, कोणासही थांग न लागूं देणारा, धारणाशक्ति प्रबळ, आठवणीचा धड, पोषाख सर्वसाधारण चालू पद्धतीचा, गायनाचा व कायद्याचा शोकी.

( १ ) **मीन—मध्यम गौरवर्ण**, सात्त्विक वृत्ति, धर्माविषयीं खटपट करणारा, स्वतंत्रपणांत व व्यापारधंद्यांत यश मिळविणारा, परोपकारी व दयाळू, **चेहरा लांबट**, प्रकृति अशक्त, परंतु काटक, मनाचा उदार, गंभीर, सत्याचा अभिमानी, **शरीरानें स्थूल**, धोरणी, बुद्धिमान्, साधकबाधक गोष्टींचा विचार करणारा, यशस्वी, आचार-विचारांत मेळ असणारा, लोकांच्या हिताचा विचार करणारा, द्रव्याचा अभिलाष कमी, खर्चिक, धंद्यामध्यें प्रसिद्ध, कीर्तिमान्, लोकांत मान मिळविणारा.

( २ ) **मीन**–शरीरानें ठेंगणा, पाठ, पोट, छाती, गळा, नाक, कान, वगैरे सर्व अरुंद व ऱ्हस्वाकार, शरीरावयव लहान, वर्ण गौर पण तांबूसपणाची झांक, डोळे स्वच्छ, पण घारे, केंस कमी, मिशा बारीक, हात व पाय बारीक, शरीर लहान असलें तरी काटकपणा अधिकपणा अतिशय. चापल्य, कोणत्याही एका ठिकाणीं किंवा एका कामांत कायम लक्ष राहण्याचा संभव कमी, एकाच वेळीं अनेक व्याप करण्यांत तरबेज, हुकमत चालविणारा, दांत व दाढा कमजास्त प्रमाणांत व मोठाल्या, दांतांत फटी, मिशा बारीक, केंस थोडे, मान उंच, कपाळ साधारण, बोलण्याचालण्यांत स्वैरवृत्ति, दुसऱ्यावर छाप पाडणारा, पाठ व धारणाशक्तीपेक्षांही लेखनशक्ती दांडगी, आनंदी चेहरा आनंदी व उत्साही, पोषाख ज्यावेळीं जो असेल तो पण पोषाखांत नाविन्याची आवड, प्रमुखपणानें कार्य करणारा, ऐटबाज.

याप्रमाणें मेषादि १२ लग्नांचीं सर्वसाधारण लक्षणें आहेत. ज्यावेळीं लग्नांत अगर सप्तमांत कोणताही ग्रह नसतो त्यावेळीं ह्या लक्षणांपैकीं बरींच लक्षणें अनुभवास येतील; पण ज्यावेळीं यापैकीं कोणत्याही लग्नांत कोणताही ग्रह असेल त्यावेळीं ह्या लग्नगुणाप्रमाणें तेथें असणाऱ्या ग्रहांच्या गुणधर्मांचाही परिणाम होणारच. म्हणून हीं लक्षणें पाहतांना एक गोष्ट निश्चितपणें ध्यानांत ठेवावी ती ही कीं, ज्यावेळीं लग्नीं

किंवा त्याच्या समोर म्हणजे सप्तमस्थानीं गुरु, बुध, शुक्र, चंद्र ह्या शुभग्रहांपैकीं कोणताही ग्रह असेल त्यावेळीं शुभलक्षणांची वाढ होते आणि ह्याच दोन स्थानांत शनि, मंगळ, राहु, रवि यांपैकीं कोणताही पापग्रह असतो त्यावेळीं लग्नाच्या नैसर्गिक गुणधर्माचा भंग किंवा त्यांत गौणत्व व उणेपणा आणून तो ग्रह आपल्या धर्माप्रमाणें निराळे गुणधर्म उत्पन्न करतो. चंद्र राशीवरूनही १२ राशींचे गुणधर्म ह्याप्रमाणेंच आहेत.

## स्वभाव आणि गुणधर्म

ज्याप्रमाणें जन्मलग्नाचे परिणाम व गुणधर्म मनुष्याच्या चेहऱ्यावर उमटलेले दिसतात त्याचप्रमाणें चंद्र ज्या राशींत असतो त्या राशीचेंही गुणधर्म कित्येक वेळां तीव्रतेनें आढळतात म्हणून लग्न किंवा चंद्र ह्या दोहोंपैकीं कोणतें तरी एक निश्चित करावें.

## " अन्यमतें " मेषादि १२ जन्मलग्नांचीं लक्षणें.

**मेष**—बळकट, मध्यम उंची, बांधा किरकोळ परंतु हाडें मोठीं, चेहरा लांबट मुद्रा रागीट.

**वृषभ**—ठेंगू, ठेंचून भरलेला, लट्ठ, नाक मोठें, खांदे रुंद, मान आंखूड.

**मिथुन**—उंच, हातपाय लांब, फारसा सुरेख नाहीं.

**कर्क**—मध्यम, चेहेरा वाटोळा, गौर, तोंडवळा लहान, पोट मुटल्यासारखें.

**सिंह**—पुरा उंच, खांदे रुंद, डोकें मोठें वाटोळें.

**कन्या**—साधारण उंच, शरीरयष्टि बारीक, चेहेरा फारसा सुरेख नाहीं.

**तूळ**—उंच यष्टि, किरकोळ, चेहेरा गोल, ठाकठीक.

**वृश्चिक**—मध्यम, जाडजूड, बळकट, मान आखूड, पावलें वाकडीं, तोंडवळा पसरट.

**धनु**—बांधा ठाकठीक, उंच, कपाळ रुंद, मोठें, नाक लांब, चेहरा लांबट.

**मकर**—ठेंगू, यष्टि किरकोळ, प्रमाणबद्ध नव्हे अशी, चेहेरा वाळकुंडा, छाती अरुंद, मान बारीक व उंच, गुडघे वांकडे.

**कुंभ**—मध्यम, बळकट, भडभाकट, चेहेरा लांबट, देखण्यांत जमा.

**मीन**—ठेंगू, धुलधुलीत, निस्तेज, मंद, हातपाय आंखूड दिसण्यांत अशक्त.

---

# ग्रहांचे नैसर्गिक गुणधर्म.

आतां ग्रहांचे जे नैसर्गिक गुणधर्म सांगितले आहेत ते देतो.

**रवि**—पिंगट दृष्टि, मध अगर काकवी या रंगांची, केंस थोडे, वर्ण तांबूस काळसर शरीरांतील **हाडांचा**कारक.

**चंद्र**—पुष्ट व देखणा, दृष्टी चांगली, चंचल, बोलणें मधुर. शरीरांतील **रक्ताचा**-कारक. रक्ताभिसरणाची स्थिति.

**मंगळ**—सूर्योदयापूर्वी अरुणकालाची प्रभा फाकते त्या रंगाचा लालसर, उतावळा, रागीट दृष्टी, कृश परंतु कणखर, शरीरांतील **मज्जातंतूंचा**कारक.

**बुध**—देखणा व सौंदर्यमय देह, अतिशय विनोदी व यशप्रिय, टोंचून बोलणारा व लिहिणारा, काळसर व हिरव्या रंगाची छाप असलेला वर्ण, शरीरांतील **त्वचेचा**कारक.

**गुरु**—पुष्टपण स्थूलदेह, पिंगटदृष्टी, गौरवर्ण, सभ्यपणा व प्रौढपणा, शरीरांतील **मेदतत्त्वाचा**कारक. सौंदर्यसंपन्न.

**शुक्र**—डोळे अतिशय पाणिदार, सुंदर, गौरवर्ण, स्त्रियांना प्रिय, केंस कुरळे, चित्रविचित्र वस्तूंची आवड व शोकी, पोषाखांत ऐट, शरीरांतील **रेताचा** कारक.

**शनि**—सडपातळ, फाटक्या अंगाचा, उंच, केंस व अंगावर लव फार, अंगावर शिरांचें जाळें दिसणारा, मंद व पिंगट दृष्टी, दांत मोठें, काळावर्ण, शरीरांतील **शिरांचा**कारक.

**राहु व केतु**—आकाशासारख्या नीळसर वर्णाचा, उंच पण कृशदेही, तोंडावर वण, केंस थोडे, दृष्टींत विचित्र मंदत्व, वणवणा हिंडणारा, विचित्र स्वभावाचा, एकांत प्रिय, मुखदुर्बळ, शरीरांतील कोणताही धातु बिघडविण्याचे कारकत्व.

जन्मलग्न, बारावें स्थान, आणि द्वितियस्थान ह्या तीन स्थानांपैकीं कोणत्याही स्थानाशीं शनि, राहु, मंगळ ह्यांपैकीं एकाचा किंवा अनेकांचा संबंध येत असेल किंवा ते त्या स्थानांत असतील तर दांत मोठाले, वाकडे तिकडे, दातांची कवळी सुंदर नसून दातांत भेगा व फटी असतात. दांत व दाढा ह्या विषम प्रमाणांत लहान मोठ्या व पुढचे दोन मोठाले अशी स्थिति दिसून येते. दातांची व दाढांची स्थिति निर्जीव रोगग्रस्त असून दांत अस्वच्छ असण्याचाही संभव असतो. अशा लोकांस तंबाखू, पानसुपारीचें व्यसन असतें. ह्याच तीन स्थानांत रवि असतां दांत घट्ट, कणखर

आणि भक्कम असतात. दांत व दाढा एकमेकांस आवळलेल्या असावयाच्या. सुपारीचें व्यसन असतें.

लग्नीं चंद्र. बुध, शुक्र, गुरु यांपैकीं कोणताही ग्रह असतां दांत स्वच्छ, सुंदर दांतांच्या कवळ्या नमुनेदार दांत एकमेकांस चिकटून बसलेले, फटीरहित असतात.

## ग्रहांचे अनुभवसिद्ध गुणधर्म व स्वभाव.

**रवि**—धीरोदात्त व स्पष्ट आणि उघड बोलणारा, मनाचा खंबीर, वैद्यकशास्त्राची आवड, यशस्वी. चेहरा गंभीर, लोकांवर छाप, समाज अनुकूल, स्वार्थापेक्षां लोकहितबुद्धि प्रबल, शत्रु अगर विरोधी लोकांस आपल्या बुद्धिसामर्थ्यानें पराभूत करण्यात प्रवीण, द्रव्यतृष्णा कमी, उदात्त विचार, दातृत्वशक्ति विशेष, दिसण्यात कठोर, परंतु परिणामी हितकर असें भाषण, स्वार्थत्यागी, ऐहिक व प्रापंचिक गोष्टींचे सौख्याविषयीं पराङ्मुख, उदासीन, परोपकारी देह झिजविणारा, कोणत्याही गोष्टींतील मर्म तत्काल जाणणारा, स्थिर स्वभाव, कल्पक, धोरणी; व्यवहार सरळ व चोख, भाषण उग्र परंतु सत्य, वर्तन शुद्ध, अनुकरणीय, आचार-विचार सुधारणा विषयक पंथांतील.

**चंद्र**—उतावळा, चंचल व अविचाराच्या गोष्टी करणारा, चैनी, ऐषआराम व प्रापंचिक गोष्टींत निमग्न, द्रव्याचा अभिलाष धरणारा, फाजिल आत्मविश्वास, व प्रौढी मारणारा, कर्तृत्वहीन, स्त्रीलोलुप, धंद्यासंबंधीं निष्काळजी, स्वार्थबुद्धि व दुसऱ्याचा अभिलाष, कोणत्याहि गोष्टींत फारच अस्थिरपणा, दिरंगाई व अविश्वास, उच्चकल्पना परंतु मनाची अतिशय चलबिचल, व्यवहारांत गोंधळ, भाषण मृदु, सौम्य वर्तन, उच्छृंखल, अनियमित, मनाचा दिलदार परंतु अर्धवट.

**मंगळ**—अतिशय क्रूर, धाडशी व तापट स्वभावाचा. माथेफिरू, हट्टी, दुराग्रही प्रसंगी हार न जाणारा, दीर्घ प्रयत्न, हरतऱ्हेच्या युक्तया प्रयुक्तया लढवून कार्य साधणारा, मनाचा दिलदार, द्रव्याचे बाबतीत फारच उधळ्या, व निष्काळजी, काटक व हिंमतवान्, धर्माविषयीं श्रद्धा कमी व मनाप्रमाणें वागणारा, व्यवहारांत उघड व सरळ आणि प्रामाणिक गोष्टीचा भोक्ता व कैवारी, भाषण, वर्तन, स्वभाव कडक, भविष्यकालीन गोष्टीपेक्षां सद्यःस्थिति- (वर्तमानकाला-) कडेच विशेष नजर ठेवणारा, अनियमित, परंतु कार्यकुशल, नियमानें कोणतेंहि कार्य होत नाहीं, उद्योग

तर सारखा उद्योगच करील, परंतु एकसारखा नियमानें पुष्कळ कालपर्यंत नियमितपणा अगर उद्योग टिकत नाहीं. मनाचा निष्कपटी, मैत्रीला चांगला, परंतु आचारभ्रष्ट व सुधारणावादी, उपहास करण्यांत प्रवीण.

बुध—प्रफुल्लित सुहास्यवदन, विनोदात्मक भाषण, बोलण्यांत चतुर, सदा आनंदी व उत्साहि, व्यवहारांत चोख, धूर्त व न फसणारा, वाहनांचा शोकी व नोकरचाकरांचें सुख भोगणारा, विश्वासाच्या कामास नालायक व ऐनवेळेला दगा देणारा, किंवा नाकारणारा, चैनी बुद्धिमान् स्वभावानें सौम्य, शांत, परंतु अहंपणानें युक्त, आचारविचारांत मेळ नसून द्रव्याचे बाबतींत फार विलक्षण असतो. कोणावरही विश्वास ठेवीत नाहीं. कुटुंबा-( घरांतील मंडळी ) विषयीं बेफिकिर, धंद्यामध्यें नवीन कल्पनासामर्थ्यानें जोम आणतो, परंतु मनांत तळमळ व चिंता राहून चेहऱ्यावर त्याचा परिणाम न दाखवितां दिसण्यांत मोठा निष्काळजी दिसतो. हजारों भानगडी व उद्योग करितो, प्रत्येक धंद्यांतील माहितगार. परंतु एकच धंदा कायमचा करीत नाहीं. कारभार फार धोक्याचा, कष्टसाध्य,अध्यात्म विषयाची आवड, शास्त्रीय गहन विषयाच्या विचारांत निमग्न, परंतु आपलें हृद्गत कोणासही समजूं देत नाहीं.

गुरु—विद्वान गुणसंपन्न, शांत स्वभाव व सत्कर्म आचरण करणारा, वेदांत गूढविषयाचा भोक्ता व अध्यात्मशास्त्रनिपुण, राजकारण. व समाजकार्यामध्यें प्रवीण, बुद्धिमान्, परोपकारप्रिय, व्यवहारांत सरळ व सत्याभिमानी, संकटांत सांपडलेल्यास मदत करून प्रसंगी खऱ्या गोष्टीकरितां आपणांवर संकटें ओढवून घेणारा, राजदरबारीं सन्मान, यश व प्रतिष्ठा मिळविणारा; मनाचा कोवळा, सत्वगुणी, शांतवृत्तीचा व मृदु-भाषण करणारा. सर्वांस प्रिय, उशीरां परंतु खऱ्या गोष्टींत यश मिळविणारा, द्रव्याचे बाबतींत उदारवृत्ति व अभिलाषबुद्धिपासून अलिप्त, प्रपंचाविषयीं आसक्ति कमी, ईश्वरविषयक विचारांत निमग्न, धर्मशील, दीनांचा साहाय्यक व योग्य सल्ला देणारा, अनीतिमान् गोष्टींपासून परावृत्त करणारा, धैर्यमणि.

शुक्र—काव्य, गायन, संगीत व कलाकौशल्य इत्यादि गोष्टींची आवड, चैनीच्या वस्तू किंवा पदार्थ यांचा संग्रह, झपकेदार व ऐटबाज पोषाख, मनाचा अस्थिर, संकुचितवृत्ति, स्वार्थबुद्धि व स्त्रियांविषयीं आसक्त, गुप्तकृत्यें करणारा. प्रापंचिक गोष्टींत रमणारा, धर्मावर श्रद्धा व धर्माचरण, अनीतिमान् व व्यसनासक्त लोकांची मैत्री, परस्त्रीसंबंध, पापबुद्धि, स्त्रियांस प्रिय व त्यांच्यावर छाप ठेवणारा,भाषण सौम्य,

मृदु, गोड, निष्कपटी व निष्काळजी, संस्कृत–वाङ्मय-विहार, द्रव्याचे बाबतींत खर्चिक, अविचारी व अनाठायीं द्रव्याचा व्यय करितो. व्यवहाराला आळा नसून अनियमितपणें बारभाई कारभार, ईश्वरावर पूर्ण श्रद्धा, व्यापार वगैरे स्वतंत्र धंद्यांत. यश मिळविणारा.

शनि––कावेबाज, स्वार्थ व दुष्टबुद्धि विशेष, धर्म, "मनःपूतं समाचरेत्" याप्रमाणें मनाला वाटेल त्या चांगल्या वाईट गोष्टी करणारा, मनाचा दुर्बल, आळशी, बुद्धिमांद्य, उद्योगपराङ्मुख, स्वतःचा फाजिल विश्वास व आत्मप्रतिष्ठा, नीच कामें व घातपातादि गोष्टीपासून आनंद होणारा, कलह, शत्रुत्व व भाऊबंदकी अर्थात् विरोधात्मक चळवळींचा पुरस्कर्ता, सत्यासत्याची बिलकूल पर्वा न धरणारा व दुसऱ्याचा उत्कर्ष न सहन होणारा, भाषण कठोर व दुसऱ्यास झोंबणारें असून स्वभाव फार तिरसट व विचित्र असतो. असमाधानी वृत्ति, व्यवसायामध्यें कमकुवत, उद्योगाचा शत्रु, निद्रादेवीचा व आलस्याचा भक्त, नानातऱ्हेच्या व्यसनांत गुंग, स्त्रियांचा अभिलाष, व पापपुण्याची भीति न बाळगणारा, कामासक्त, दुराचरणी असतो, समाजाला अनुकूल अशा सत्कर्मामध्येंही अडथळे आणणारा स्वतःच्या सुखाकडे व फायद्याकडे लक्ष देणारा होतो. दुसऱ्याच्या चुका काढण्यांत व उणेपणा सिद्ध करण्यांत दक्ष, भाषणांत क्रूर व अश्लीलपणानें प्राबल्य असून बोलण्यात अविचार व कठोरपणा फार, परद्रव्यापहार व द्रव्यतृष्णा प्रखर.

राहु–केतु––हुशार, विचारी व कार्यसाधक, परंतु बोलण्याचा तिटकारा, मुखस्तंभ, कल्पनाशक्ती दांडगी, उच्च महत्वाकांक्षा, राजकार्यांत व व्यवसायांत निमग्न, एकमार्गी, उद्योगरत. कोणत्याही गोष्टीचा दूरवर व साधक–बाधक दोन्ही बाजूनें विचार करणारा, गूढ व कठीण अशा विषयाची व विद्येची आवड, स्वभावानें स्थिर, शांत, भाषण फारच अल्प परंतु मुद्देसूद, व्यवस्थित व चोख, स्पष्ट आणि निर्भीड, मनाचा स्वार्थी परंतु इतरांच्या सुखदुःखाविषयीं उदासीन, परोपकाराची इच्छा व धार्मिक मतें पौराणिक व पूर्वकालीन जुन्या पद्धतींचीं, वादविवादांत कुशल, उद्योगधंद्यामध्यें सरळ व चोख, मैत्रीला योग्य. स्वतंत्र धंद्याविषयीं मनाचा उत्साह, समाजकार्याचा भोक्ता.

---

## अयन, पक्ष, दिवस-रात्र ओळखण्याच्या खुणा.

दक्षिणायनांत जन्म असेल तर हातांवरील **आयुष्यरेषा मधले बोटाचे व तर्जनीचे मध्यें** गेलेली असते असें म्हणतात, परंतु फक्त ह्या एकाच रेषेवरून अयन जमणार नाहीं.

**आयुष्यरेषा उजवीकडे सरळ गेली असेल तर उत्तरायणांत जन्म असें समजावें. पण अयन ज्ञानाची ही खूण अगदीं स्थूल आहे.**

**आंगठ्याच्या मध्यरेषेवर** ज्यास यव किंवा जव म्हणतात तो असेल तर **शुद्धपक्षांत जन्म,** व तसें नसेल तर **वद्यपक्षांत जन्म,** असें समजावें.

**कानाची पाळी** गालास चिकटलेली असेल तर **रात्री जन्म** आणि तसें नसेल तर **दिवसा जन्म** असें जाणावें.

## जन्मलग्न व ग्रह यांचीं लक्षणें.



**रवि, लग्नीं मेषराशीस** असल्यास रंग किंचित काळसर, मुद्रा गंभीर, डोळे मोठे, अशीं ( सामान्य ) लक्षणें असतात.

**चंद्र, लग्नीं मेषराशीस** असल्यास रंग गोरा, सौम्य मुद्रा, चेहऱ्यावर किंचित लाली, हीं लक्षणें असतात.

**मंगळ, लग्नीं मेषराशीस** असल्यास रंग तांबडा, क्रर मुद्रा, व अट्टल चोरा सारखी चंचल नजर असते.

**बुध, लग्नीं मेषराशीस** असेल तर तोंडावर हिरवी झांक असते, हंसतमुख चेहेरा व रंग किंचित पिवळसर असतो.

**गुरु, लग्नीं मेषराशीस** असेल तर चेहऱ्यावर रंग काळा जास्त असतो, डोळे घारे, कपाळ लांब व तोंड नृसिंहासारखें म्हणजे पसरट असतें.

**शुक्र, लग्नीं मेषराशीस** असेल तर रंग तांबूस गोरा असतो, व तो मनुष्य अति वाचाळ असून नटण्याचा हौशी असणारा असतो.

**शनि, लग्नीं मेषराशीस** असेल तर फोडेल तोंड, रंग काळा, फार कमी बोलणारा, असा मनुष्य असतो.

**मेषराशीस राहु अगर केतु** असतां त्यांस विशेष लक्षणें नाहींत. परंतु चेहऱ्यावर देवी, खोंक, जखम अशी कांहींतरी खूण असते.

**लग्नीं रवि वृषभराशीस** असेल तर रंग काळा, उदासीन मुद्रा, उंची कमी, मान फुगीर, विरळ दांत अशीं लक्षणें असतात.

**वृषभलग्नीं चंद्र असेल** तर वर्ण गोरा, बांधा उंच, स्मित वदन, तीक्ष्ण दृष्टि, दंतपंक्ति सुंदर, गाल फुगीर, अशीं लक्षणें असतात.

**वृषभ लग्नीं मंगळ** असेल तर रंग निमगोरा व गर्विष्ठ चेहरा, दुरभिमानी व हट्टी स्वभाव असतो. वृषभ लग्नीं **बुध** असल्यास तोंडावर हिरवी झांक, चेहरा मोहक, हीं लक्षणें दिसतात.

**वृषभ लग्नीं गुरु असेल** तर तोंडावर पिवळसर झांक, बांधा सडपातळ, डोळे पाणीदार असतात.

**वृषभ लग्नीं शुक्र असेल** तर चेहऱ्यानें सुंदर, कामी व नटणारा असा मनुष्य असतो.

**वृषभ लग्नीं शनि असेल** तर तो तामसी, गर्विष्ठ व मित्रविहीन असतो.

**मिथुनलग्नीं रवि असेल** तर डोळ्याखालील भाग उंचट व पांढरा आणि वर्ण सतेज श्याम असतो.

**मिथुन लग्नीं चंद्र असेल** तर दांत व तोंड पुढें आलेलें, आणि शरीराचा वर्ण पांढरा असतो.

**मिथुन लग्नीं मंगळ असतां** रंग तांबडा, मुद्रा रागीट हीं दोन लक्षणें असतात.

**मिथुन लग्नीं बुध असेल** तर अंगावर हिरव्या रंगाची झांक असते.

**मिथुन लग्नीं गुरु असेल** तर गंभीर मुद्रा व पिवळसर गोरेपणा असतो.

**मिथुन लग्नीं शुक्र असेल** तर सुंदर तोंड व फार गोरेपणा असतो.

**मिथुन लग्नीं शनि असेल** तर कावेबाज, खुनशी चेहरा, व वर्ण काळसर असतो.

**कर्क लग्नीं रवि असेल** डोळ्याचे बुबुळाच्या बाहेरील भाग काळसर व अंगाचा रंग काळा असतो.

**कर्क लग्नीं चंद्र असेल** तर अंगाचा रंग गोरा शुभ्र असतो व तो मनुष्य चालते वेळीं पाय वांकडे टाकणारा असतो.

**कर्क लग्नीं मंगळ असेल** तर रंग निस्तेज गोरा व गालावर खळगे असतात.

**कर्क लग्नीं बुध असेल** तर रंग हिरवट गोरा असून तो माणूस नकटा असतो.

**कर्क लग्नीं गुरु असेल** तर रंग पिवळट गोरा असून शरीर स्थूल असतें.

**कर्क लग्नीं शुक्र असेल** तर वर्ण गोरा, शरीर सुंदर व सडपातळ असतें.

**कर्क लग्नीं शनि असतां** कृष्णवर्ण,हनुवटीचा विस्तार मोठा,हीं लक्षणें असतात.

**सूचना—खालीं अमुक राशींत ग्रह असेल तर असें दिलें आहे. तेथें त्या राशींत तो ग्रह लग्नीं असेल तर असे समजावें.**

**सिंह राशींत रवि तर असेल** डोळे कमळासारखे सुंदर असून पिंगट असतात.

**चंद्र सिंह राशींत असेल** तर अकालीं केस पांढरे, रंग काळा, व ऐश्वर्य भोगणारा असतो.

**मंगळ सिंह राशींत असेल** तर ऊष्ण प्रकृति, रागीट स्वभाव व रंग तांबडा असतो.

**बुध सिंहराशीस असेल** तर तत्त्वज्ञानाचा अभ्यास, बहुजनप्रीति व वर्ण काळा हीं लक्षणें असतात.

**गुरु सिंहराशीस असेल** तर वर्ण पीत, प्रकृती स्थूल व राजैश्वर्याचा योग असतो.

**शुक्र सिंहराशिस असेल** तर गोऱ्या वर्णाचा, नखरेबाज व क्षयी मनुष्य असतो.

**शनि सिंहराशीस असतां** स्वभाव तामसी, दुःखें एकामागून एक येणें व रंग काळा हीं लक्षणें असतात.

**रवि कन्याराशीस असेल** तर रंग सावळा, स्वभाव सत्त्वशील, सदा रोगपीडा हीं लक्षणें असतात.

**चंद्र कन्याराशीस असतां** वर्ण गोरा, चेहरा सुंदर, अंतःकरण कोमल हीं लक्षणें असतात.

**मंगळ कन्याराशीस असतां** वर्ण तांबडा, कपटी स्वभाव, मधुर भाषण हीं लक्षणें असतात.

**बुध कन्याराशींत असेल** तर रंग हिरवट गोरा, दांत बारीक व स्वभाव सात्त्विक असतो.

**गुरु कन्याराशीस असतां** रंग पिवळट, गंभीर चेहरा व पांडित्य हीं लक्षणें असतात.

**शुक्र कन्याराशीस असेल** तर जलद भाषण, वर्ण गोरा, परस्त्रीचा अभिलाष हीं लक्षणें असतात.

**शनि कन्याराशीस असेल** तर तो मनुष्य तोतरें बोलणारा, रंगानें काळा व कपटी असतो.

सूचना—वर मेष लग्नापासून कन्या लग्नापर्यंत सहा लग्नापैकीं कोणताही ग्रह असतां कोणते गुणधर्म होतात हें दिलें असून तूळ लग्नापासून मीन लग्नापर्यंतचीं फलें तशीं दिलीं नाहींत. कारण साधारणतः हींच फलें पुढील ६ राशींची त्या त्या ग्रहांचीं असतात. ग्रहांचीं, राशींचीं व लग्नांचीं फलें स्वतंत्रपणें दिलीं असल्यानें पुढील ६ लग्नांच्या फलाचा उलगडा अभ्यासूस आपोआप व सहज होईल.

---

## उजव्या डोळयावरून जन्मकाळीं रवि कोणत्या राशींत आहे हें ठरविण्याचीं लक्षणें.

**मेषराशिस रवि असतां** डोळा मोठा, बुबुळ मोटें व काळें, डोळ्यांतील पांढऱ्या भागांत एक तीळ अशीं लक्षणें असतात.

**वृषभ राशींत रवि असतां** डोळा लहान, किंचित खोल, बुबुळ काळें व बुबुळाभोंवतालचा भाग काळसर असतो.

**मिथुन राशींत रवि असतां** डोळा मोठा, बुबूळ पुढें आलेलें व पिंगट, बुबुळाभोंवतील भाग पांढरा असतो.

**कर्कराशींत रवि असतां** डोळा मोठा, पापणी काळी, बुबूळ काळें व त्याभोंवतील भाग पांढुरका तांबूस असतो.

**सिंहराशींत रवि असतां** डोळा मोठा, बुबूळ पिंगट, बुबूळाभोंवतील भाग लाल व त्यावर लाल रेषा असतात.

**कन्याराशींत रवि असतां** डोळा साधारण मोठा, बुबूळ लहान व त्याचा रंग घारा व त्याभोंवतालचा भाग पांढरा असतो.

**तुलाराशींत रवि असतां** डोळा काळाभोर लहान, बुबूळ काळें व त्याभोंवतील भाग काळसर असतो.

**वृश्चिकराशींत रवि असतां** डोळा लहान, बुबूळाचा रंग घारा, खालील पापणी जाड व बुबुळाभोंवतील भाग तांबूस पांढरा असतो.

**धनुराशींत रवि असतां** डोळा मोठा व उग्र, बुबूळ काळसर आणि पुढें आलेलें व त्याभोंवतील भाग तांबूस असतो.

**मकरराशींत रवि असतां** डोळा मोठा व उग्र, बुबूळ काळें व लहान, त्याभोंवतील भाग काळसर असतो.

**कुंभराशींत रवि असतां** डोळा किंचित लहान, बुबूळ घारें व त्याभोंवतालचा भाग पिवळट पांढरा असतो.

**मीनराशींत रवि असतां** डोळा लहान, बुबूळ काळसर घारें व लहान व त्याभोंवतालचा भाग पांढरा असतो.

## डाव्या डोळयावरून चंद्र कोणत्या राशींत आहे हें समजण्याचीं लक्षणें

**मेषराशींत चंद्र असतां** उजव्या डोळ्याहून डावा डोळा मोठा, बुबुळ काळें, त्याभोंवतील भाग तांबूस व खालची पापणी जाड हीं लक्षणें असतात.

**वृषभराशींत चंद्र असतां** डोळा लहान, बुबुळ काळें व लहान, आणि त्याभोंवतालचा भाग पांढरा असतो.

**चंद्र मिथुनराशींत असतां** डोळा मोठा, बुबूळ पिंगट, व त्याभोंवतील भाग पिवळट पांढरा असतो.

**कर्कराशींत चंद्र असेल** तर डोळा पाणीदार व मोठा, बुबूळ काळें व किंचित घारी छटा असलेलें, व त्याभोंवतील भाग पांढरा असतो.

**सिंहराशींत चंद्र असतां** डोळा लहान, बुबूळ काळें, व त्याभोंवतील भाग तांबूस पांढऱ्या रेषा असलेला असतो.

**कन्याराशींत चंद्र असतां** डोळा किंचित मोठा, बुबूळ काळसर पिंगट व मोठें, आणि त्याभोंवतील भाग पिंगट असतो.

**तुळाराशींत चंद्र असतां** बुबुळाभोंवतील भाग काळसर पांढरा, बुबुळ काळें व डोळा लहान असतो.

**वृश्चिकराशींत चंद्र असतां** डोळा मोठा, बुबुळ मोठें व पिंगट व त्याभोंवतील भाग पांढरा असतो.

**धनुराशींत चंद्र असतां** डोळा मोठा, बुबुळ काळें, मोठें व पुढें आलेलें आणि त्याभोंवतील भाग तांबूस पांढरा असतो.

**मकरराशींत चंद्र असतां** डोळा लहान, बुबुळ मोठें, घारें, आणि त्याभोंवतील भाग काळसर असतो.

**कुंभराशींत चंद्र असतां** डोळा लहान, बुबुळ मोठें व किंचित् पिंगट आणि त्याभोंवतील भाग पांढरा असतो.

**मीनराशींत चंद्र असतां** डोळा पाणीदार मोठा, बुबुळ मोठें व काळें आणि त्याभोंवतील भाग पांढरा असतो.

**मेषराशींत मंगळ असतां** गाल फुगलेले व त्यांचा रंग गुलाबी असतो आणि तो **वृषभराशींत असेल** तर गाल साधे [ न बसलेले अगर न फुगलेले ], व त्यांचा रंग काळसर गोरा असतो.

जन्मकाळीं **मंगळ मिथुनराशींत असेल** त्याचे गाल किंचित् फुगलेले व गोऱ्या रंगाचे असतात, जर जन्मकाळीं **मंगळ कर्कराशींत** असेल तर त्याचे गाल निमगोरे असून हसतांना त्यांत खळगे दिसतात.

**सिंहराशींत मंगळ असेल** तर गाल साधे पण भरलेले व गोरे असतात.

**कन्याराशींत मंगळ असेल** तर मनुष्य पिवळ्या, बसवया गालाचा असतो. **तुळराशींत मंगळ** असेल तर तो मनुष्य पसरट निमगोऱ्या गालाचा असतो.

**वृश्चिकराशींत मंगळ असेल** तर तो मनुष्य तांबड्या व फुगेर गालाचा असतो. **धनुराशींत मंगळ असेल** तर तो मनुष्य फुगेर, लहान व गोऱ्या ( रंगाच्या ) गालाचा असतो.

**मकरराशींत मंगळ असेल** तर तो मनुष्य चपट्या आणि काळ्या गालाचा असतो. कुंभराशींत मंगळ असेल तर गाल निमगोरे व साधे [ न बसलेले अथवा फुगलेले ] असतात.

**मीनराशींत मंगळ असेल** तर गाल काळ्या रंगाचे आणि पसरट व फुगेर असतात. त्याप्रमाणें गालांच्या लक्षणावरून व रंगावरून मंगळ कोणत्या राशींत आहे हें जाणावें.

**बुध व शुक्र हे** नेहमीं सूर्याजवळ असल्यामुळें त्या ग्रहांचीं लक्षणें पृथक्पणें अल्प प्रमाणांत माणसांच्या शरीरावर दिसतात. **पण ते स्वतंत्र असल्यास त्यांची फलें व लक्षणें होतात.**

**कान व आंख** यांच्या लक्षणावरून **गुरु जन्मकाळीं कोणत्या राशींत होता** हें कळतें.

**मेषराशींत गुरु असतां** कान लहान, आखांचा रंग काळा व त्यावर दोन अगर तीन तीळ असतात.

**वृषभराशींत गुरु असेल** तर आंख पांढरे व जास्त लांब आणि कान किंचित मोठे असतात.

**मिथुनराशींत गुरु असतां** आंख पिवळट, गौर, डोळा आणि कान यांतील भाग अरुंद, व कान किंचित लहान असतात.

**कर्कराशींत गुरु असतां** डोळे आणि कान यांतील भाग [आंख] पिवळट, व जास्त रुंद व त्यांवर एक तीळ–म्हणजे प्रत्येक आखांवर तीळ असतील तर ते एकाहून अधिक असून उपयोगी नाहीं असें-आणि कान मोठे असतात.

**सिंहराशींत गुरु असतां** कान व डोळे यांतील भाग अरुंद व तांबूस, आणि कान लहान असतात.

**कन्याराशींत गुरु असतां** डोळे आणि कान यांतील भाग किंचित रुंद, आखांवरील भागांत हिरवी छाया, व कान मोठे असतात.

**तूळराशींत गुरु असतां** डोळे आणि कान यांतील भाग रुंद व कृष्णवर्णाचे, आणि कान लहान असतात.

**गुरु वृश्चिक राशींत असतां** डोळे आणि कान यांतील भाग रुंद व निमगोरा, आणि कान किंचित मोठे असतात.

**गुरु धनुराशींत असतां** डोळे आणि कान यांतील भाग जास्त रुंद व पिवळट रंगाचा, आणि कान मोठे असतात.

**मकरराशींत गुरु असेल** तर कान लहान, डोळे आणि कान यांतील भाग अरुंद आणि त्या भागाचा रंग काळसर असतो.

**गुरु, कुंभ राशींत असतां** डोळे व कान यांतील भाग रुंद व गोऱ्या रंगाचे असून कान किंचित मोठे असतात.

**मीनराशींत गुरु असेल** तर डोळ्यापासून कानापर्यंतचा भाग जास्त रुंद व रंगानें पिवळट गोरा आणि कान मोठे असतात.

**खालचा ओठ व हनुवटी यांच्या लक्षणांवरून शनि कोणत्या राशींत आहे हें जाणावें.**

हनुवटी रुंद व मध्यें चामखीळ असलेली अशी असेल, आणि खालचा ओठ व हनुवटी यांचा रंग काळा असेल, तर **शनि मेषराशींत असतो.**

हनुवटी अरुंद व लांब, आणि खालचा ओठ व हनुवटी यांचा रंग पांढरा असेल, तर **शनि वृषभराशींत आहे** असें जाणावें.

खालचा ओंठ पांढरा व जाड, आणि हनुवटी पांढरी व खळगा असलेली, हीं लक्षणें **मिथुनराशींत शनि आहे असें** दाखवितात.

खालचा ओंठ बारीक, हनुवटी लांब, व त्या दोहोंचाही रंग काळा, यां लक्षणांनीं **शनि कर्कराशीस** होता असें जाणावें.

**सिंहराशींत शनि असतां हनुवटी** रुंद व लांब, खालचा ओंठ जाड, व दोहोंचाही वर्ण काळा असतो.

**कन्याराशींत शनि असतां** हनुवटी रुंद व लांबीला कमी, खालील ओंठ किंचित् जाड, आणि दोहोंचाही वर्ण गोरा असतो.

**तूळराशींत शनि असतां हनुवटी** रुंद, पुढें आलेली, खालचा ओंठ बारीक आणि दोहोंचाही रंग गोरा असतो.

**वृश्चिकराशींत शनि असतां** हनुवटी अरुंद व लांबीला कमी, खालील ओंठ बारीक व दोहोंचाही रंग तांबूस असतो.

हनुवटी जास्त लांब व अरुंद, हनुवटीचा भाग पुढें आलेला, आणि हनुवटीखालचा ओंठ यांचा रंग काळसर असेल तर **शनि धनुराशींत असतो.**

हनुवटी व खालचा ओंठ यांमध्यें खळगा, हनुवटी बसकी [ दाबल्याप्रमाणें ] आणि हनुवटी व खाली ओंठ यांचा वर्ण निमगोरा असेल तर **शनि मकर राशींत आहे** असें समजावें.

**कुंभ राशींत शनि असतां** हनुवटी लांबीला कमी, रुंदीला जास्त व कमानदार खालचा ओंठ बारीक, आणि दोहोंचाही रंग गोरा असतो.

**मीनराशींत शनि असतां** हनुवटी व खालील ओंठ यांमध्यें खळगा, खालील ओंठ किंचित जाड, हनुवटी लांबीला जास्त, रुंदीला कमी; आणि हनुवटी आणि खालचा ओंठ यांचा रंग काळसर असतो.

**राहु आणि केतु यांचीं** स्थानें जरी इतर ग्रंथांत सांगितलेलीं नसलीं तरी **सामुद्रिक-तिलक** ग्रंथांमध्यें राहुकेतुचीं जीं स्थानें किंवा हातावरील जागा सांगितल्या त्यांचा अनुभव पाहतां असें आढळून येतें कीं "**हस्तपृष्ठे राहुकेतू सर्वदास्थानमाश्रितः**' म्हणजे उजव्या हाताचा पृष्ठभाग हें राहूचें स्थान आणि डाव्या हाताचा पृष्ठभाग हें

केतुस्थान होय. आतां त्यांचा निर्णय कसा करावयाचा हें सांगूं. पण एकट्या राहूचा निर्णय झाला म्हणजे केतूचा निर्णय आपोआप होतोच. यासाठीं फक्त राहूचाच निर्णय करूं.

**हातावर व हस्तपृष्ठावर जर** लव किंवा केंस मुळींच नसतील किंवा अगदीं अल्प असतील तर त्या व्यक्तीच्या जन्मकाळीं राहु **मेष, सिंह,** किंवा **धनु** ह्या राशींपैकीं एका राशींत असतो.

हस्तपृष्ठावर केंस अगदीं तुरळक आणि थोडे असतील तसेंच हस्तपृष्ठाच्या भागा वर ऊर्ध्वगामी अशा सूक्ष्म रेषांची ठेवण असेल तर अशा व्यक्तींच्या जन्मकाळीं राहु **वृषभ, कन्या** किंवा **मकर** ह्या राशींत असतो.

हस्तपृष्ठाचा भाग घनदाट, राकट, खडबडीत आणि जाड अशा चौकटीसारख्या म्हणजे ( सूक्ष्म ) आडव्या उभ्यारेषांनीं भरलेला असेल तर त्याच्या जन्मकाळीं राहु **मिथुन, तूळ** किंवा **कुंभ** ह्या राशींत असतो.

हस्तपृष्ठाचा भाग तुळतुळींत, नरम, मऊ व बारीक केंसानीं युक्त, हस्तपृष्ठावर शिरा न दिसणें, हाताचें वळण दक्षिणोत्तर दिशागामी अशाप्रकारचें असेल तर त्या व्यक्तीच्या जन्मकाळीं राहु **कर्क, वृश्चिक** किंवा **मीन** ह्या राशींपैकीं कोणत्यातरी एका राशींत असतो.

डोळ्याचा संबंध रवि चंद्राशींच विशेषतः आहे, त्याचप्रमाणें राहुकेतूचाही परि णाम डोळ्याच्या ठेवणीवर, आकारावर व स्थितीवर होतो. यामुळें अनेक प्रकारच्या मुखनिरीक्षणानें चंद्राची, रवीची व राहूची स्थिति सांगतां येते.

**रवि** आणि **चंद्र** हे राहु अगर केतूनें युक्त असतां किंवा त्यांचा केंद्रयोग असतां डोळ्यांत चमत्कारिकपणा किंवा दृष्टीदोष असतो. डोळ्याचीं बुबुळें किंचित मोठीं पण निस्तेज आणि तिरळीं, वक्र, अल्प अशी दृष्टी किंवा उरफाट्या भावल्या उत्पन्न होतात.

**रवि** आणि **चंद्र** ह्या ग्रहांपासून २-१२-६-८ ह्या स्थानांत राहुकेतू असतां डोळ्यांत खुपऱ्या, लालसर रंग, दिसण्यांत कमजास्तपणा, वारंवार डोळ्याचे विकार, डोळ्याचा आकार मोठा, ऊर्ध्वदृष्टी, दीप अशाप्रकारचीं फलें होतात. ह्या दोन प्रकारा खेरीज बाकीच्या कोणत्याही ठिकाणीं राहुकेतु असतां फलें चांगलीं मिळतात.

**सारख्या चेहऱ्याच्या माणसासारखीं माणसें** पुष्कळ वेळां आढळतात. अशांच्या कुंडल्यांचा संग्रह करावा आणि ज्यांच्या सारख्या प्रकारच्या कुंडल्या

असतील त्यांच्या चेहऱ्यांत कोणकोणत्या गोष्टींत साम्य आहे व कोणकोणत्या गोष्टींत विरोध आहे हें नीट न्याहाळून व पडताळून पाहून अशा सर्व टाचणांचा संग्रह ठेवावा. म्हणजे त्यावरून सततच्या अभ्यासानें चेहऱ्यावरून कुंडली मांडतां येईल.

ह्या अभ्यासाची आणखीही कांहीं उपकरणें सांगतां येतील. त्यांपैकीं एक असे कीं, आपल्या ओळखीच्या अनेक लोकांना एका वेळीं एकत्र आणावे. त्यांच्या प्रत्येकाच्या कुंडल्या मागून घ्याव्या, पण कोणाची कुंडली कोणती हें आपणांस न कळण्याची काळजी घ्यावी. नंतर शरीर लक्षणें व चेहरा पाहून क्ष गृहस्थांची कुंडली अमुक असें ओळखावें. १०-१० ते २०-२० लोकांत असा प्रयत्न शेंपन्नास वेळा केला म्हणजे चेहरा आणि कुंडली यांचा संबंध लक्षांत येईल. अनेक प्रकारच्या चेहऱ्यांची डोळ्यांची, डोक्यांची, नाकांची, कानांची, दातांची, व कपाळांची आणि ह्या सर्वांच्या विशिष्ट ठेवणीची ओळख पटेल, निरनिराळे प्रकार नजरेखालून जातील आणि तुलनात्मक रीतीनें कुंडलींतील ग्रहांचा निरनिराळ्या अवयवांवर काय काय परिणाम घडतो हेंही दृष्टीसमोर राहील. वर दिलेला प्रयत्न करतांना त्या त्या मनुष्याच्या वयाचा अंदाज आणि त्यावरून ग्रह पाहणें हें तर केलेंच पाहिजे.

( १ ) सर्व सामान्य उंचीपेक्षां ज्यांची उंची जास्त आहे अशांच्या कुंडल्यांचा संग्रह व त्यांच्या चेहऱ्याच्या वर्णनाचीं टांचणें.

( २ ) अगदीं ठेंगण्या व्यक्तींच्या कुंडल्या व त्यांच्या चेहऱ्याचें वर्णन.

( ३ ) अगदीं सारख्या चेहऱ्यांच्या व्यक्तींच्या कुंडल्या.

( ४ ) एकाच शकांतील, महिन्यांतील, एकाच दिवशीं व एकाच वेळीं जन्म झालेल्यांच्या कुंडल्या व चेहऱ्याचें वर्णन.

( ५ ) रवीच्या एका महिन्यांतील सारख्या जन्म लग्नांच्या कुंडल्या आणि त्याच प्रमाणें जन्म राशींच्या कुंडल्या.

( ६ ) जें जन्मलग्न, तीच जन्मराशी अशांच्या अनेक कुंडल्या व त्यांच्या चेहऱ्यांचें वर्णन. **आणि त्या प्रत्येकांतील कमजास्तपणा.**

( ७ ) एकाच शकांतील व एकाच लग्नाची पण कोणताही मोठा ग्रह बदलण्यापूर्वीच्या कालांतील व नंतरच्या कालांतील कुंडल्या.

( ८ ) ज्यांचा जन्म पूर्ण चंद्र अशा पौर्णिमेस किंवा चंद्रलुप्त अशा अमावास्येस, त्याचप्रमाणें शुद्ध आणि वद्य अशा ७॥ तिथि होतांना जन्मलेल्यांच्या कुंडल्या व मुखवर्णन.

( ९ ) शनि, राहु व गुरु हे निरनिराळ्या राशींत असून त्या राशींपैकीं कोणतेही एक जन्मलग्न असेल अशांच्या कुंडल्या व मुखवर्णन.

( १० ) सर्व ग्रहांचें युति-प्रतियोग आहेत किंवा ज्यांच्या केंद्रांत हे सर्व ग्रह आहेत अशांच्या जन्मकुंडल्या.

( ११. ) जे जन्मतः अंध, पंगु, बहिरे, मुके, अवयवहीन अगर अधिक अवयव असलेले असतील अशांच्या कुंडल्या व त्यांचें मुखवर्णन.

( १२ ) शनि आणि गुरु एकत्र मेष राशींत असतांना किंवा यांपैकीं एक मेष राशींत व दुसरा तूळराशींत असतां मेष, वृषभ, मिथुन इत्यादि लग्नावर किंवा राशींवर जन्म झालेल्यांच्या प्रत्येकीं २५-२५ कुंडल्या व त्यांच्या मुखलक्षणाचें वर्णन.

( १३ ) शुक्र प्रत्येक नक्षत्रांत असतांना जन्म झालेल्यांच्या कुंडल्या.

( १४ ) कोणत्याही राशींत चंद्र एकटा असतांना जन्म झालेल्यांच्या कुंडल्या आणि चंद्र–राहु, चंद्रशनि, चंद्रमंगळ, चंद्ररवि, चंद्रगुरु, चंद्रशुक्र बुध अशा योगांवर जन्मलेल्या व्यक्तींच्या कुंडल्या व त्यांचे मुखवर्णन. अशा अनेक प्रकारानें चेहऱ्यांच्या लक्षणांचे विविध संग्रह करून नंतर तुलनात्मक दृष्टीनें फलें पहावीं.

चेहऱ्यावरून, हस्तरेषांवरून आणि इतर शारीरलक्षणांवरून कुंडली मांडण्याचा प्रयत्न आणि उद्योग करूं इच्छिणाऱ्या शास्त्रसेवकांनीं सतत अवलोकन चालू ठेवलें पाहिजे. कोणत्याही व्यक्तीच्या दोन्ही हातांचे स्पष्ट छाप, त्यांची जन्मवेळेसह कुंडली हीं तर साधनें पाहिजेतच पण त्याच्याचबरोबर त्या व्यक्तीचा संबंध किंवा वरच्या भागचा फोटो इतकीं साधनें तरी अवश्य पाहिजेत. फोटोंत न येण्यासारख्या गोष्टी म्हणजे मनुष्याचे तेज, बोलण्याची व चालण्याची ढब, डोळ्यांचा रंग, दातांची ठेवण, वर्ण, रंग, केसांचा रंग, पंजाची स्थिति, बधिरता, दृष्टिदोष इत्यादि अनेक आहेत. त्या प्रत्यक्षच पाहिल्या पाहिजेत. प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत साधारणतः दर १०-१२ वर्षांनीं आणि वयपरत्वें क्रमशः फरक पडत असतो तोही सतत अवलोकनानें लक्षांत घेतला पाहिजे. स्त्रियांचे बाबतींत तर हा शारीरिक फरक फार काळजीपूर्वक लक्षांत घेतला पाहिजे आणि अशा तऱ्हेनें अवलोकनसामर्थ्य जितकें व जसजसें वाढत जाईल तसतसें चेहऱ्यावरून कुंडली मांडण्याचें कामीं अधिकाधिक यश येत जाईल. पद्धतशीर रीतीनें व सूक्ष्म नजरेनें निरीक्षण करण्याची व माणसें पाहण्याची संवय ठेवली म्हणजे साधारणतः कोणत्याही मनुष्याचें वय २–३ वर्षांच्या फरकानें कोणताही मनुष्य पाहण्याबरोबर सांगतां येईल. अशी संवय होण्यासाठीं एकाच

शकांतल्या अनेक व्यक्ती नजरेसमोर ध्यावा व नंतर दोन दोन वर्षांच्या फरकानें घेऊन सूक्ष्म दृष्टी उत्पन्न करावी.

**जन्मलग्न** निश्चित ठरल्यावर कुंडली मांडण्यास सुरवात करावी. **जें लग्न ठरलें असेल तें [ ती राशी ] पहिल्या घरांत मांडावी** व त्या पुढील राशी क्रमाने मांडून बारा घरांत बारा राशींचे आंकडे येतील. याप्रमाणें मांडलेल्या कुंडलीचे दोन भाग समजावें. त्यांतील आपल्या उजव्या हाताकडील भागास '**उदित गोलार्ध**' व डाव्या हाताकडील भागास '**अस्तगोलार्ध** अगर '**अनुदित गोलार्ध**' अशा संज्ञा आहेत. ह्या लक्षांत ठेविल्या असतां रवि कोणत्या राशींत आहे हें ठरविण्यास त्यांचा फार उपयोग होतो.

**कोणत्याही व्यक्तीचे प्रथमतः अंदाजनें वय ठरविणें हे पहिले काम. त्यानंतर त्या व्यक्तीचें जे वय आपण ठरविले असेल तितकीवर्षे चालू शकांतून वजा करून शककाढणें. आणि त्या शकांत शनि, राहु, गुरु हे ग्रह कोणत्या राशींत होते हे नक्की करून त्यांची लक्षणें त्याव्यक्तीशीं जुळतात कीं नाहीं याचा पडताळा पाहणें. जमत नसल्यास त्या वर्षांच्या मागें पुढें शनि, राहु, गुरु हे कोणत्या राशींत आहेत हे काढून त्यांची लक्षणें तपासून शक निश्चित करणें. शक निश्चित झाल्यावर रविवरून मास, रवि चंद्रावरून पक्ष, तिथि इत्यादि मेळ मिळवून मग एकंदर लक्षणावरून जन्म लग्न व राशि काढावी. व जन्मलग्न प्रथमस्थानी मांडून कुंडलीत ग्रह लिहावे. ह्या सर्व उद्योगासाठीं उपयुक्त अशी गेल्या ८०-८५ वर्षांतील ग्रह राश्यंतरें व ग्रह योग स्थिति मुद्दाम पुढें दिली आहे.**

एखाद्या **मनुष्याचा जन्मकाल काढणें** झाल्यास चेहरा पूर्वी सांगितल्यापैकीं म्हणजे **त्रिकोण, दीर्घवर्तुल, वर्तुल**; अगर **चतुःष्कोण**, यांपैकीं कोणत्या आकृतीचा आहे हें प्रथम ठरवावे. तो चेहरा विवक्षित वर्गात येतो असें ठरल्यानंतर, तें चिन्ह तर्जनीच्या आंगठ्याजवळील बोटाच्या खालच्या एक अंगुल प्रदेशांत असतें, तसें आहे कीं नाहीं याचा ताळा पहावा व विवक्षित वर्ग सिद्ध करावा.

**त्रिकोण, दीर्घवर्तुल, वर्तुल व चतुःष्कोण** यांपैकीं ज्या आकृतीचा चेहरा असेल त्या आकृतीचें कोणतें लग्न असतें हें मागे सांगितलेंच आहे. तीं तीं लक्षणें पाहून जन्मलग्न ठरवावें नंतर **जन्म दिवसाचा कीं रात्रीचा हें कानाची पाळी**

**पाहून** निश्चित करावें. मग जन्म **दाक्षिणायनांत** अगर **उत्तरायनांत** झाला आहे हें हातावरील आयुष्याची रेषा लक्षपूर्वक पाहून ठरवावें.

**कर्कसंक्रांतीपासून मकरसंक्रांतीपर्यंतच्या कालाला दाक्षिणायन व मकरसंक्रांतीपासून कर्कसंक्रांतीपर्यंतच्या कालाला उत्तरायण** असें म्हणतात.

येथवर चेहऱ्यांचीं लक्षणें सांगितलीं. मुख्यलक्षणावरून कुंडली कशी ठरवावयाची व जन्मशक, महिना, पक्ष, तिथि इत्यादि निश्चित करावयाचें तें कसें करावें हें उदाहरण देऊन आतां स्पष्ट करितों. चालू सालीं म्हणजे शके १८६१ च्या वर्षी एका मनुष्याची पत्रिका मांडावयाची आहे असें समजूं. तर प्रथम सदर मनुष्याचें वय किती आहे हें अनुमानानें ठरवावें. आपण असें धरूं कीं, त्या मनुष्याचे वय ६० वर्षांचें आहे तेव्हां आतां त्याचा जन्मशक वयाच्या अनुमानानें गृहीत धरावयाचा व तोच खरोखर आहे कीं काय हें ठरविण्याकरितां शनि व गुरु कोणत्या राशींत आहेत हें काढावे, याचें म्हणजे जन्मशक ठाम ठरविण्यास सुलभ पडेल.

प्रथम शनीविषयीं विचार करूं सध्यां शनि मेष राशींत आहे. तेव्हां ६० वर्षांपूर्वी शनि कोणत्या राशींत होता याविषयीं शोध करावयाचा. प्रत्येक अडीच वर्षांनीं शनि १ राशी जातो. म्हणजे तीस वर्षांनीं बारा राशींत त्याचा एक फेरा होऊन तो पुनः त्याच राशींत येतो. या क्रमानें शके १८६१ पूर्वी साठ वर्षें म्हणजे शके १८०१ च्या शेवटीं किंवा १८०२ मध्यें शनिचें दोन फेरे पूर्ण होऊन तो मेषराशींतच येणार. या उदाहरणांत आपण साठ वर्षेंच धरलीं असल्यामुळें मीन किंवा मेष राशींतच शनि असला पाहिजे. परंतु वयाचें अनुमान स्थूलमानानें केलें असल्यामुळें त्यांत कसर असण्याचा संभव आहे. याकरितां शनीची राशि ठरविण्याकरितां मेषराशीच्या पूर्वीची अगर नंतरची जी राशि असेल तिचीं लक्षणें खालचा ओंठ व हनुवटी यांवर दृग्गोचर होत असतील तर ती राशि आहे असें समजावें. यावरून मीन, मेष अगर वृषभ यांपैकीं कोणती तरी राशि ठरेल. याप्रमाणें शनीची राशि ठरल्यानंतर गुरुविषयीं विचार करूं.

गुरूला एक राशि जाण्यास एक वर्ष लागतें आणि म्हणून बारा वर्षांनीं गुरुचा एक फेरा होतो. शके १८६१ सालीं गुरु मीन राशींत आहे. तेव्हां ६० वर्षांपूर्वी तो कोणत्या राशींत होता हा विचार करावयाचा. आतां ६० वर्षांत त्याचे पांच फेरे पूर्ण होतात. शके १८०१ मध्यें गुरु कुंभ किंवा मीन राशींतच असला पाहिजे. तथापि संशय दूर करण्याकरितां आंख व कान यांच्या पूर्वोक्त लक्षणावरून कुंभ-मीन यांपैकीं

कोणत्या राशींत तो आहे हें पहावें. गुरु व शनि ह्या दोघांच्या राशि निश्चित करून त्यावरून सामान्यतः शक ठरवावा.

राहु व केतू यांचीं सामान्य लक्षणें पूर्वी दिलीं आहेत. पुढील माहितीचा उपयोग केला असतां त्यांची राशि ठरविणें सोपें जाईल. ती माहिती अशी:—अठरा वर्षांनीं राहूचा बारा राशींत एक पूर्ण फेरा होतो. तेव्हां ६० वर्षांपूर्वी म्हणजे शके १८०१ ह्या वर्षी तो (शके १८६१ सालीं तो तूळ राशींत आहे त्या अर्थी) मकर राशींतच असला पाहिजे. राहु ज्या राशींत असेल त्या राशीपासून सातव्या राशींत केतु असतो हें सर्वांना ठाऊक आहेच.

अशा पद्धतशीर रीतीनें प्रयत्न केला असतां कोणत्याही मनुष्याच्या वयाचा अंदाज किंवा ज्ञान सहज होतें असा अनुभव आहे. साधारणतः आपल्यापुढें असलेली व्यक्ति सांप्रत अमुक (वयाची) वर्षांची आहे असें कळलें–अनुमानानें समजलें–म्हणजे चालू शकांत तितकीं वर्षें वजा करून त्यांचा जन्म शके निश्चित करावा.

समजा कीं, जन्म शक एकदम निश्चित झाला नाहीं तरी ४–२ वर्षांच्या फरकानें अंदाजें तरी वयाचा ठावठिकाणा लागेल. अमुक वर्षें वयाचा हा मनुष्य असावा असा आपण अंदाज केला म्हणजे त्या शकाच्या सुमाराचे ग्रह पाहिले पाहिजेत. ते साधारणतः अलीकडे पलीकडे २–२ वर्षांचे पहावे. शनि हा ग्रह २॥ वर्षें एका राशींत असतो. त्यामुळें तो त्या चार वर्षांत दोन राशींवर येईल आणि राहु एका राशींत १॥ वर्षें राहत असल्याकारणानें तो ३ राशींत येईल. तसाच गुरु १ वर्ष एका राशींत राहत असल्याकारणानें तो ४ राशींत येईल. तथापि चेहरा आणि शरीराची ठेवण, हावभाव ( हालचाल ) दृष्टि बोलण्याची पद्धति, स्वर, नाक, कपाळ, इत्यादि गोष्टींवरून शनीचा कोणताही एक राशी कायम करतां येईल. तशीच राहु व गुरूचीही राशी त्यांच्या लक्षणांवरून जन्मकालीन सुस्थिर करतां येईल. येणेंप्रमाणें ३ ग्रहांची स्थिति कायम होईल. शनि, राहू, आणि गुरु ह्यांची राश्यात्मक स्थिती निश्चित करतांना मागील शेंपन्नास वर्षांची त्यांची स्पष्ट स्थिति माहीत पाहिजे. ती कशी लक्षांत ठेवावयाची हें सांगतों. आकाशस्थ राशिचक्रांत ग्रहांचें जें सतत परिभ्रमण चालले आहे त्यांत शनि साधारणतः ३० वर्षांत, राहु १८ वर्षांत आणि गुरु १२ वर्षांत सबंध बारा राशी भोगतो. ह्या प्रत्येकास एक राशी भोगावयास लागणारा काल शनीस २॥ वर्षें, राहूस १॥ वर्ष आणि गुरूस १ वर्ष याप्रमाणें आहे.

**शनि आणि राहु** हे ग्रह एका राशींत असल्यापासून सुमारें ५॥ वर्षांनीं एकमेकांच्या समोर येतात आणि नंतर पुनः ५॥ वर्षांनीं एका राशींत येतात.

**शनि आणि गुरु** हे ग्रह एका राशींत आल्यापासून सुमारें १० वर्षांनीं एकमेकासमोरच्या राशींत येतात आणि नंतर पुनः १० वर्षांनीं एकत्र एका राशींत येतात.

**राहु आणि गुरु** एका राशींत आल्यापासून सुमारें ३॥ वर्षांनीं एकमेकांच्या समोरच्या राशींत येतात आणि त्यानंतर ३॥ वर्षांनीं दोघेही एकाच राशींत येतात.

हे ग्रह एका राशींत किंवा एकमेकाच्या समोर आल्यानंतर अर्थातच त्या राशींत ते आणखी कांहीं काल असतातच. म्हणून ज्यांना अगदीं अंशकलात्मक स्थिति पाहिजे असेल त्यांना ती पंचांगावरून सहज पाहतां येईल.

वर सांगितल्याप्रमाणें जन्मशक कोणता हें ठरल्यावर जन्माचा महिना कोणता हें जाणण्यास **रवि कोणत्या राशींत** आहे हें **ओळखणें जरूर** आहे. **सूर्य हा चैत्रांत शु. १ पासून कृ. ३० पर्यंत केव्हांतरी मेषराशींत जातो.** रवि ज्या राशींत आहे तोच जन्ममहिना बहुतेक समजावा, **चैत्र महिन्याच्या अमावास्येला रवि मेष राशीस** असतो. **वैशाखाच्या अमावास्येला तो वृषभ राशींत** असतो. व याप्रमाणेंच पुढें प्रत्येक महिन्याच्या अमावास्येस पुढील एकएक राशींत असतो. रवीची ही स्थिति प्रत्येक अमावास्येची झाली आणि याप्रमाणें ती नेहमी कायम असते. परंतु सूर्याचें प्रत्येक राश्यंतर हे शुद्ध प्रतिपदेलाच होत नसल्यानें केवळ अमावास्येच्या सूर्यराशीवरून महिना नक्की होणार नाहीं. म्हणून त्याला सहाय्यक असें प्रत्येक वर्षी सूर्य मेषराशींत केव्हां येतो याचें स्थूल साधन सांगतोंः—इष्टशक १७८७ मधून वजा करून बाकी येणाऱ्या वर्षास ११$\frac{१}{५}$ नें गुणून त्यांत १५ मिळवावें ह्या **एकंदर संख्येस ३०नें भागावें. बाकी येईल ती तिथि** इष्ट वर्षाच्या मेषसंक्रांतिप्रवेशाची तिथि ग्र. ला. पंचांगाप्रमाणें होईल. १५ पर्यंत शुक्लपक्ष व १६ ते ३०पर्यंत कृष्णपक्ष. शुद्धपंचांगाप्रमाणें पहावयाचें असतां गुणाकारांत १२ मिळवावें. बाकी सर्व वरील रीतीप्रमाणेंच करावें. मेषार्कावरून पुढील सूर्यसंक्रांति काढावयाच्या असतां मेषार्कें तिथींत प्रत्येक संक्रांतिकरितां ३१ तिथि मिळवाव्या म्हणजे सुमारानें पुढील संक्रांति येतील. असो.

येणेंप्रमाणें १२ महिन्यासंबंधीं जाणावें. जन्म दक्षिणायनांत दिवसा झाला असेल तर उदितगोलार्धांत दक्षिणायनाच्या किती राशी आहेत हें पहावें. त्याचप्रमाणें दक्षिणायनांत रात्रीचा जन्म असेल तर अस्तगोलार्धांत त्या अयनाच्या किती राशी आहेत

हेंही पाहावें. याचें उदाहरण घेऊं. एका कुंडलींत लक्षणाप्रमाणें जन्मलग्न वृश्चिक आहे, आणि जन्म रात्रीचा दक्षिणायनांतला आहे, तर आतां सूर्य कोणत्या राशींत आहे हें सांगावयाचें. आतां अस्तगोलार्धांत दक्षिणायनांच्या किती राशी आहेत हें पाहिलें तर वृश्चिक व धनु या दोन दक्षिणायनाच्या राशी दिसतात. यांपैकीं कोणती राशी आहे हें मागें सांगितलेल्या लक्षणांवरून निश्चित करावें. असें केलें असतां अल्पायासानें रविज्ञान होईल. [उत्तरायणांत जन्म असेल तर दिवसाचा अगर रात्रीचा जन्म असेल त्याप्रमाणें उदित गोलार्धांत अगर अस्तगोलार्धांत उत्तरायणाच्या किती राशी आहेत हें पाहिलें पाहिजे हें उघडच आहे.]

आतां **चंद्र कोणत्या राशींत आहे हें काढावयाचें. त्यावरून तिथि कोणती** हें अर्थात सांपडेल. हाताच्या आंगठ्यावरील चिन्हावरून जन्म शुक्लपक्षांत अगर कृष्णपक्षांत हें पाहावें. सूर्य ज्या राशींत असेल त्या राशीपासून सातव्या राशीला पौर्णिमा असते. म्हणजे जन्म शुक्लपक्षांत असेल तर रवि ज्या राशींत असेल ती पासून सात राशींत चंद्र असला पाहिजे. जन्म कृष्णपक्षांतला असेल तर त्या सातव्या राशीपासून सूर्य ज्या राशींत आहे त्या राशीपर्यंत चंद्र कोठें तरी असला पाहिजे. तो कोणत्या राशींत आहे हें पूर्वोक्त डोळ्याच्या लक्षणांवरून ठरवावें. चंद्र सव्वादोन दिवसांनीं एक राशी जातो. उदाहरणार्थ, सूर्य मेषराशींत आहे आणि चंद्र धनुराशींत आहे असें धरिलें, तर जन्मतिथि कृष्णपक्षांतली आहे असें उघड ठरतें. ती कोणती, तर ती पंचमी अथवा षष्ठी असावी. कारण प्रस्तुत उदाहरणांत वद्य प्रतिपदेला चंद्र तूळराशींत असला पाहिजे व त्या तिथीपासून साडेचार दिवस म्हणजे पंचमी अगर षष्ठी ही जन्मतिथि येते.

**हस्तरेषा, चेहरा आणि कुंडली असें हें त्रिप्रवरी शास्त्र आहे म्हणून ह्या तिन्ही अंगांची सामुग्री जुळवावी म्हणजे यांतील रहस्य प्रत्यक्ष अनुभवानें कळून येईल. याकरितां प्रत्येकानें मिळतील तेवढे दोन्ही हातांचे छाप, त्यांच्या कुंडल्या व फोटो यांचा संग्रह करावा आणि आपला अनुभव वाढवावा.**

कोणत्याही मनुष्याचा चेहरा आणि शरीरयष्टि पाहिल्यानंतर व त्याच्या वयाच्या अंदाजावरून शनि, राहु, गुरु, हे ग्रह जन्मकाळीं कोणत्या राशींत आहेत येवढें समजलें तरी केवळ तेवढ्यावरून कुंडली मांडतां येणार नाहीं. कुंडली मांडण्यास दैनिक परिभ्रमणाचीच माहिती पाहिजे ती आतां सांगूं.

# चेहऱ्यावरून कुंडली मांडण्याचीं कांहीं साधनें.

कोणत्याही दिवशीं सूर्योदयाचे वेळीं सूर्य पूर्वक्षितिजावर यावयाचा व अस्ताचे वेळीं पश्चिम क्षितिजावर मावळावयाचा हें निश्चित आहे. दिवसां बरोबर मध्यान्हीं सूर्य आकाशांत आपल्या डोक्यावर आणि बरोबर रात्रीच्या मध्यान्हीं पाताळांत खालीं असतो. यावरून सूर्य दिवसां पूर्वेकडून पश्चिमेकडे व रात्रीं पश्चिमेकडून पूर्वेकडे जातो असें आपणांस भासतें. आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्य पुन्हा पूर्वेस उगवतो. यावरून २४ तासांत त्याचें भ्रमण होऊन पुनः तो पूर्वस्थळीं येतो. एका दिवसाच्या २४ तासांत एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंत मेषादि १२ लग्नें क्रमानें पूर्वक्षितिजावर उदय पावतात. त्यांत सूर्य ज्या राशींत असेल ती राशि सूर्योदयाला उगवतो आणि त्यानंतर क्रमानें त्याच्या पुढील लग्नें उगवतात आणि सूर्याप्रमाणेंच पश्चिमेस अस्त पावतात. सूर्यमेषादि राशींत प्रवेश करण्याचा जो दिवस साधारणतः ग्रहलाघवी पंचांगाप्रमाणें येतो तो येणेंप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| मेष १३ एप्रील | सिंह १६ ऑगष्ट | धनु १५ डिसें. |
| वृषभ १४ मे | कन्या १६ सप्टें. | मकर १४ जाने. |
| मिथुन १४ जून | तूळ १७ आक्टोबर | कुंभ १२ फेब्रु. |
| कर्क १६ जुलै | वृश्चिक १६ नव्हें. | मीन १३ मार्च |

शुद्ध पंचांगाप्रमाणें ही प्रत्येक संक्रांत ४ दिवस आधीं येते. वरील प्रत्येक संक्रांति प्रवेशाच्या तारखेवरून हें लक्षांत येईल कीं, सूर्य साधारणतः एक महिना एका राशींत असतो. आणि १२ महिन्यांत बारा संक्रांति भोगतो.

सूर्याचा कोणत्याही राशींत प्रवेश झाला म्हणजे तो कांहीं तेथें एकाच ठिकाणीं कायम राहत नाहीं, तर तो दररोज थोडथोडा पुढें पुढें सरकतो. २४ तासांत १२ राशी म्हणजे २ तासांत १ राशी आणि एका राशीचें अंश ३० असल्यामुळें ४ मिनिटांत १ अंश हें दैनिक लग्नाचे सामान्य प्रमाण झालें. सूर्य दररोज सुमारें १ अंश पुढें जातो याचा स्पष्ट अर्थ असा कीं ता. १३ एप्रिलला सूर्य मेष राशींत येतो व दररोज एकएक अंश पुढें जातो. याप्रमाणें तारीख २० एप्रीलला तो ७ अंश ( म्हणजे २८ मिनिटें ) त्या राशींत पुढें गेला. ता. २० ला जेव्हां सूर्योदय झाला तेव्हां उदयाच्या वेळीं सूर्य मेषराशीच्या ७ अंशांत होता. २८ तारखेस पाहिलें तर तो १५ अंशांत येईल—याचेंच नांव भुक्त अंश—याप्रमाणें भुक्तांश पाहिल्यानंतर त्याचे

त्या राशीचे भोग्यांश किती राहिले हें काढावयाचे. भुक्तांश हे सूर्योदयापूर्वी गत झालें असें समजावें. ३० अंशांतून भुक्तांश वजा केले म्हणजे बाकी राहील तें भोग्यांश, सूर्य ज्या राशींत असेल त्या राशीचे राहिले. भोग्यांशाच्या चौपट मिनिटें सूर्योदयकालांत मिळवावी. म्हणजे सूर्योदयापासून त्यावेळपर्यंत सूर्य ज्या राशींत आहे तें लग्न आहे असें समजावें. त्यानंतर त्या कालांत पुनः दोन तास मिळवावें म्हणजे तोपर्यंत ( सूर्य ज्या राशींत आहे त्याच्या ) पुढील राशीचें लग्न आलें. याप्रमाणें दररोजची बाराही लग्नें काढतां येतात. प्रत्येक राशीचे २ तास हे स्थूलमान आहे. ज्यांना अगदीं सूक्ष्मच पाहिजे असेल त्यांनीं नक्की स्वोदय किंवा निरयन उदयावरूनच तास मिनिटें घ्यावीं.

तात्पर्य, ज्या दिवशीं सूर्यसंक्रांति होते त्या दिवशीं सूर्योदयापासून २ तासपर्यंत ज्या राशींत सूर्य तेंच लग्न असते. त्यानंतर २ तासपर्यंत त्याच्यापुढचें लग्न येतें व सूय १२ व्या स्थानांत जातो. पुढें २ तासपर्यंत त्याच्यापुढचें लग्न येतें व सूर्य अकराव्या स्थानांत जातो आणि त्यानंतर २ तासपर्यंत त्याच्यापुढचें लग्न येतें व सूर्य दशमस्थानीं बसतो. याप्रमाणें बाराही लग्नें क्रमानें एकामागून एक अशी दोन दोन तासानीं पूर्वक्षितिजावर येतात आणि सूर्य एकेक घर मागें जातो. यावरून कुंडलींत सूर्य कोणत्या स्थानीं असला तर जन्मवेळ कोणती आणि जन्मवेळ व दिवस ठाऊक असेल तर सूय कोणत्या स्थानांत असेल हें सुमारानें सहज सांगतां येईल.

आतां सूर्य चंद्राच्या एकमेकांशीं असलेल्या संबंधाबाबत सांगूं.

कोणत्याही महिन्याच्या अमावस्येच्या दिवशीं सूर्यचंद्र एका राशींत असतात आणि पौर्णिमेच्या दिवशीं एकमेकांच्या समोर असतात, तसेंच शुद्ध ७॥ तिथीचे वेळीं सूर्यापुढें चंद्र ३ राशी असतो आणि कृष्ण ७॥ तिथीचे वेळीं सूर्याच्या मागें चंद्र ३ राशी असतो.

चंद्र २॥ दिवसांत एक राशी पुढें जातो. कोणत्याही अमावस्येनंतर सूर्याचे पुढें चंद्र २॥ दिवसांत एकएक राशी जाऊन पुनः महिना अखेर अमावास्येस ते दोघेही एकत्र येतात. यावरून सूर्याच्या पुढें चंद्र जितक्या राशींत असेल तितक्या राशी संख्येस २॥ नें गुणलें म्हणजे तिथि येते. किंवा याच्या उलट तिथि माहीत असेल तर रविपासून चंद्र कोणत्या राशींत येईल तेंही सांगतां येतें.

प्रत्येक पौर्णिमेस चंद्र कोणत्या नक्षत्राजवळ असावयाचा हें साधारण ठरलेलें असून त्यावरूनच महिन्यांचीं नांवें दिलीं आहेत. तीं अशीं—

| | |
|---|---|
| **चैत्र—चित्रा, स्वाती.** | **आश्विन—अश्विनी, भरणी.** |
| **वैशाख—विशाखा, अनुराधा.** | **कार्तिक—कृत्तिका, रोहिणी.** |
| **ज्येष्ठ—ज्येष्ठा, मूळ.** | **मार्गशीर्ष— मृग, आर्द्रा, पुनर्वसु.** |
| **आषाढ—पू. षाढा, उत्तराषाढा.** | **पौष—पुष्य, आश्लेषा.** |
| **श्रावण—श्रवण, धनिष्ठा, शतता.** | **माघ—मघा, पूर्वा.** |
| **भाद्रपद—पूर्वाभाद्र. उत्तराभाद्र. रेवती.** | **फाल्गुन—उत्तरा, हस्त.** |

ह्याप्रमाणें नेहमींच तें नक्षत्र नक्की येते असें नव्हे. उलट ज्यावर्षी अधिक मास येतो त्यावर्षी तर अधिकमासापूर्वी ४–५ महिने व नंतर ४–५ महिने प्रत्येक पौर्णिमेस १–२ नक्षत्राचा फरक पडतो. पण इतर वेळीं सामान्यतः जमतात. ह्या मास नक्षत्रावरूनहि इष्ट दिवशींच्या नक्षत्राचा सुगावा लावतां येईल. अमावास्येला तर रविचंद्र एकत्र असल्यानें रवि ज्या नक्षत्रांत असेल त्याच नक्षत्रांत चंद्र असावयाचा हे ठाम आहे, म्हणून त्यावरून देखील पुढील इष्ट दिवसाच्या नक्षत्राचा अंदाज कळेल. कारण पुढें एक दिवसास एक नक्षत्राप्रमाणें मोजावें. इष्ट दिवशीं कोणते नक्षत्र आहे हें पाहाण्याची एक सोपी रीति आहे ती अशीः—

ज्या महिन्याच्या शु. १ चें नक्षत्र पहावयाचें असेल त्याच्यापूर्वी जितके महिने गेले असतील त्यांस २९।। नें गुणून २७ नें भागावें, बाकी येईल त्या संख्येंत त्याच वर्षाच्या चैत्र शु. १ च्या नक्षत्राची संख्या मिळवावी. एकूण संख्या २७ पेक्षां जास्त झाल्यास त्यांत २७ वजा करावें बाकी उरलेल्या संख्येइतकें इष्ट दिवसाचें नक्षत्र समजावें. त्यावरूनही पुढील तिथींचें नक्षत्र काढतां येईल.'

जन्म कुंडलींत चंद्र सूर्यापासून १–२–३–४–५–६ ह्या स्थानांत असतां जन्म शुक्ल पक्षांत आणि बाकीच्या स्थानांत असतां कृष्णपक्षांत.

रवि, चंद्र एका राशींत असतां कांहीं कांहीं वेळां जन्म शुक्ल पक्षांत आणि रविपासून चंद्र. ७ व्या स्थानांत असतां जन्म शुक्ल पक्षांत किंवा कृष्णपक्षांत असतो. यासाठीं अंशस्थिति पाहून याचा निश्चित निर्णय होतो.

जन्म दिवसा आहे कीं रात्रीं आहे हें ओळखण्याचें साधन असें आहे कीं, जन्म कुंडलींत रवि जर कुंडलीच्या ८–९–१०–११–१२ ह्यांपैकीं कोणत्याही स्थानांत असेल तर जन्म दिवसाचा आहे असें नक्की समजावें. जन्मकुंडलींत रवि २–३–४–

५-६ ह्यांपैकीं कोणत्याही स्थानांत असेल तर जन्म निश्चितपणें रात्रीचा आहे असें समजावें.

कुंडलींत १ ल्या स्थानांत रवि असेल तर जन्म सूर्योदयाच्या सुमारास समजावा. कदाचित सूर्योदयापूर्वीं थोडावेळ असेल किंवा सूर्योदयानंतर थोडावेळ असेल.

कुंडलींत रवि सप्तम स्थानांत असेल तर जन्म सूर्यास्ताचे सुमाराचा समजावा कदाचित सूर्यास्तापूर्वीं थोडा वेळ किंवा नंतर थोड्या कालांत असेल.

येणेंप्रमाणें चेहऱ्यावरून कुंडली मांडण्याचीं साधनें म्हणजे शनि राहु, गुरु हे ग्रह, रवि चंद्र स्थिति, मासज्ञान, दिवसरात्रीं साधन, शुक्र कृष्णपक्ष ज्ञान, नक्षत्र साधन, वेळा साधन, मुखलक्षणें, ग्रहफलें व लग्नफलें इ० इ० सर्व माहिती सविस्तर सांगितली तिचा उपयोग ज्यानें त्यानें आपल्या बुद्धिबलाप्रमाणें करावा.

चेहऱ्यावरून कुंडली मांडण्याच्या साधनसामुग्रींत प्रत्येकाजवळ गेल्या ८०-९० वर्षांचे प्रत्येक पौर्णिमा अमावस्येचे सूर्योदयाचे राशि अंशात्मक ग्रह पाहिजेत म्हणून तशी एक लहानशीं जंत्री तयार करून ठेवावी. त्याचा अतिशय उपयोग होईल. उदाहरणार्थ, प्रचलित ग्रह लाघवी पंचांगावरून ग्रहांचे एकत्र व समोरासमोर येण्याचे आणि राश्यंतराचे काल पाहिले असतां खालीलप्रमाणें येतातः—

## शनि व गुरु एका राशींत, एका अंशांत.

( १ ) शके १७६३ मार्ग. कृ. ३० धनु १५ अंश.
( २ ) (अ) शके १७८३ आश्विन ३० कन्या १ अंश.
( २ ) (ब) शके १७८४ वैशाख ३० सिंह २८ अंश.
( ३ ) शके १८०३ चैत्र शु. १५ मेष ८ अंश.
( ४ ) शके १८२३ वैशाख शु. १५ धनु २२ अंश.
( ५ ) शके १८४३ भाद्र. शु. १५ कन्या ७ अंश.
( ६ ) शके १८६२ पौष शु. १५ मेष १४ अंश.

## शनि-गुरु अंशात्मक एकमेकाच्या समोरच्या राशींत.

( १ ) शके १७५४ फाल्गुन ३० शनि सिंह २२ गुरु कुंभ २२
( २ ) शके १७७२ आश्विन ३० शनि मीन २३ गुरु कन्या २३.
( ३ ) शके १७७४ आषाढ ३० शनि मेष २५ गुरु तूळ २४॥.
,, १७७४ श्रावण ३० शनि मेष २६ गुरु तूळ २६.

( ४ ) शके १७९२ कार्तिक ३० शनि धनु ४ गुरु मिथुन ३॥.
,, १७९३ ज्येष्ठ ३० शनि धनु १४ गुरु मिथुन १४.
( ५ ) शके १८१३ चैत्र ३० शनि सिंह २१ गुरु कुंभ २१.
,, १८१३ आषाढ ३० शनि सिंह २६ गुरु कुंभ २६.
शके १८१४ मार्ग. ३० शनि कन्या २२ गुरु मीन २२.
( ६ ) शके १८३३ आश्विन १५ शनि मेष २६ गुरु तूळ २६.
( ७ ) शके १८५३ ज्येष्ठ १५ शनि धनु २७ गुरु मिथुन २७.

## शनि आणि राहु एका राशींत एका अंशांत.

( १ ) शके १७५३ चैत्र ३० शनि सिंह ७ राहु सिंह ७ अंश.
( २ ) शके १७६४ मार्ग १५ शनि–राहु धनु २१ अंश.
( ३ ) शके १७७६ चैत्र ३० शनि राहु वृषभ ११ अंश.
( ४ ) शके १७८६ फाल्गुन ३० शनि राहु तूळ ९ अंश.
शके १७८७ आषाढ १५ शनि राहु तूळ ४ अंश.
( ५ ) शके १७९८ फाल्गुन ३० ,, कुंभ १८ अंश.
( ६ ) शके १८१० वैशाख शु. ८ शनि राहु कर्क ११॥ अंश.
( ७ ) शके १८२१ कार्तिक १५ ,, ,, वृश्चिक २९ अंश.
( ८ ) शके १८३३ चैत्र ३० शनि राहु मेष १७ अंश.
( ९ ) शके १८४३ माघ ३० ,, ,, कन्या १७ अंश.
( १० ) शके १८५५ फाल्गुन १५ शनि राहू मकर २५ अंश.

## शनि–राहु अंशात्मक एकमेकांसमोरच्या राशींत.

( १ ) शके १७५८ आश्विन ३० शनि तूळ आणि राहु मेष १९ अंश.
( २ ) शके १७७० मार्ग १५ शनि कुंभ आणि राहु सिंह २५ अंश,
( ३ ) शके १७८१ श्रावण १५ शनि कर्क आणि राहु मकर २८ अंश.
( ४ ) शके १७९२ फाल्गुन शु. ७ शनि धनु आणि राहु मिथुन १५ अंश.
( ५ ) शके १८०४ अ. श्रा. ३० शनि वृषभ आणि राहु वृश्चिक ३ अंश,
( ६ ) शके १८१५ आश्विन शु. ७ शनि कन्या २७ राहु मीन २७ अंश.
( ७ ) शके १८२७ मार्ग. शु. ७ शनि कुंभ आणि राहु सिंह २ अंश.

( ८ ) शके १८३८ श्रावण ३० शनि कर्क आणि राहु मकर ४ अंश.

( ९ ) शके १८४९ माघ १५ शनि वृश्चिक, राहु वृषभ २३ अंश.

( १० ) शके १८६१ पौष शु. १५ शनि मेष आणि राहु तूळ १ अंश

## गुरु आणि राहु एका राशींत व एका अंशांत.

( १ ) शके १७४९ कार्तिक ३० गु. रा. तूळ १२.

( २ ) शके १७५७ चैत्र १५ गु. रा. वृषभ १९.

( ३ ) शके १७६४ भाद्रपद. ३० गु. रा. धनु २४.

( ४ ) शके १७७१ श्रावण ३० गु. रा. सिंह ११.

( ५ ) शके १७७८ माघ १५ गु. रा. मीन १७.

( ६ ) शके १७८५ मार्ग. ३० गु. रा. वृश्चिक २.

( ७ ) शके १७९३ ज्येष्ठ. शु. ११ गु. रा. मिथुन १०.

( ८ ) शके १८०० मार्ग. १५ गु. रा. मकर १५.

( ९ ) शके १८०७ भाद्र. ३० गु. रा. कन्या २.

( १० ) शके १८१५ चै. शु. ७ गु. रा मेष ८.

( ११ ) शके १८२२ चै. १५ गु. रा. वृश्चि. २५.

( १२ ) शके १८२९ ज्ये. ३० गु. रा. कर्क १.

( १३ ) शके १८३६ माघ शु. ७ गु. रा. कुंभ ५ अंश.

( १४ ) शके १८४३ कार्ति. ३० गु. रा. कन्या २२ अंश

( १५ ) शके १८५१ चैत्र ३० गु. रा. मेष २९ अंश

( १६ ) शके १८५८ आश्वि. कृ. ८ गु. रा. धनु ४ अंश

( १७ ) शके १८६५ श्रावण ३० गु. रा. कर्क २२ अंश.

## गुरु आणि राहु समोरासमोर एका अंशांत, एका राशींत.

( १ ) शके १७५३ कार्तिक १५ गुरु मकर २५ राहु कर्क २५.

( २ ) शके १७६० आश्विन १५ गुरु कन्या १२, राहु मीन १२.

( ३ ) शके १७६७ फाल्गुन १५ गुरु मेष १८, राहु तूळ १८.

( ४ ) शके १७७४ माघ ३० गुरु धनु २ राहु मिथुन २-

( ५ ) शके १७७५ ज्येष्ट ३० गुरु वृश्चिक २७, राहु वृषभ २७.
,, ,, आषाढ ३० गुरु वृश्चिक २५ राहु वृषभ २५.
( ६ ) शके १७८२ आषाढ १५ गुरु कर्क ११, राहु मकर ११.
( ७ ) शके १७८९ पौष १५ गुरु कुंभ १५॥ राहु सिंह १५॥
( ८.) शके १७९६ कार्तिक १५ गुरु तूळ २॥, राहु मेष २॥
( ९ ) शके १८०४ वैशाख शु. ८ गुरु कुंभ ९ राहु सिंह ९
( १० ) शके १८११ आश्वि. ३० गुरु धनु १३ राहु मिथुन १३.
( ११ ) शके १८१८ श्रावण १५ गुरु सिंह २ राहु कुंभ २.
( १२ ) शके १८२५ फाल्गुन शु. ८ गुरु मीन ६ राहु कन्या ६.
( १३ ) शके १८३२ पौष ३० गुरु तूळ २२ राहु मेष २२.
( १४ ) शके १८४० वैशाख कृ. १३ गुरु वृषभ २९ राहु वृश्चिक २९.
( १५ ) शके १८४७ मार्ग. ३० गुरु धनु ४ राहु मिथुन ४.
( १६ ) शके १८५४ आश्वि. १५ गुरु सिंह २२ राहु कुंभ २२.
( १७ ) शके १८६१ फाल्गु. ३० गुरु मीन २७॥ राहु कन्या २७॥.

येणेंप्रमाणें ग्रहयोग ध्यानांत ठेवण्याचा दीर्घ प्रयत्न करावा म्हणजे कुंडली मांडण्याचे कामीं त्याचा फार उपयोग होईल. ही ग्रहस्थिति लक्षांत असून शिवाय प्रत्येक ग्रहास १ राशि आक्रमण करण्यास लागणारा काल दृष्टीसमोर आणून दोन्हींचा मेळ पाहतां येईल. चेहऱ्यावरून कुंडली मांडण्याचा प्रयत्न करणारांस दररोजच्या सूर्योदयकालीन ग्रहस्थितीवरून दुसऱ्या दिवसाच्या सूर्योदयापर्यंतच्या २४ तासांत म्हणजे एक दिवसांत क्रांतिवृत्तीय राशिचक्राची परिस्थिति कसकशी बदलते ह्याचें ज्ञान पाहिजे, त्याखेरीज कुंडली मांडतां येणार नाहीं.

## शनि, राहु, गुरु, हर्शल व नेपचून ह्या ग्रहांचें राश्यंतरकाल.

ज्याप्रमाणें ग्रह एकत्र असण्याचा व समोरासमोर असण्याचा काल दिला, त्याच प्रमाणें ह्या पांचही ग्रहांचें राश्यंतर काल माहित असणें अगदीं अगत्याचें आहे. म्हणून त्या ग्रहांचें राश्यंतरकाल पुढील कोष्टकांत दिले आहेत.

## शके १७५० ते १८६५ पर्यंतच्या ११५ वर्षांचें शनीचे राश्यंतरकाल. (ग्र. ला.)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मेष | १८६१ वै. कृ. ८<br>वक्री १८६३ मार्ग. कृ. ७ | १७७२ फा. कृ. १४ | १८०२ वै. शु. ५<br>वक्री १८०४ का. कृ. ८ | १८३१ फा. कृ. २ |
| वृषभ | १८६३ ज्ये. कृ. ११<br>मार्गी. १८६३ फा. शु. १२<br>वक्री १८६५ मार्ग कृ. १३ | १७७५ वैशा. शु. १ | १८०४ आषा. शु. ९<br>मा. १८०४ माघ कृ. ३०<br>वक्री १८०६ आश्वि. कृ. ७ | १८३४ वै. कृ. ४ |
| मिथुन | १८६५ आषा. कृ. १४<br>मार्गी १८६६ चैत्र कृ. ५ | १७७७अ. आषा. शु. ३ | १८०६ श्रा. शु. १४<br>मा. १८०७ वै. शु. ७<br>वक्री १८०८ पौ. शु. ३ | १८३६ ज्ये. कृ. ४ |
| कर्क | १७५० ज्ये. कृ. १० | १७७९ श्राव. शु. ४ | १८०८ भाद्र. कृ. ८<br>मा. १८०९ ज्ये. शु. ११ | १८३८ आषा. कृ. ६ |
| सिंह | १७५२ आषा. कृ. ३० | १७८१ भाद्र. शु. ५<br>वक्री १७८३ फा. कृ. ३० | १८१० कार्ति. शु. ४ | १८४० श्रा. कृ. ७<br>वक्री १८४३ चै. शु. ५ |
| कन्या | १७५४ श्रा. कृ. ३०<br>वक्री १७५७ वै. शु. ७ | १७८३ आश्वि. कृ. ३<br>मा. १७८४ आषा. शु. १४ | १८१३ श्रा. कृ. १४<br>वक्री १८१६ वै. शु. १५ | १८४२ आश्वि. शु. ४<br>मा. १८४३ ज्ये. कृ. ११ |
| तूळ | १७५६ का. शु. १४<br>मा. १७५७ श्रा. शु. १० | १७८६ भाद्र. कृ. १४<br>वक्री १७८९ वै. शु. १० | १८१५ का. शु. १<br>मा. १८१६ आषा. कृ. ८ | १८४५ भाद्र. कृ. ३<br>वक्री १८४८ वै. शु. १० |
| वृश्चिक | १७५९ कार्ति. कृ. ३ | १७८८ मार्ग. कृ. ८<br>मा. १७८९ आश्वि. शु. २<br>वक्री १७९२ आषा. कृ. ३० | १८१८ का. शु. ७<br>वक्री १८२१ चै. कृ. ९ | १८४७ पौष शु. १२<br>मा. १८४८ भाद्र. कृ. ३ |

## शके १७५० ते १८६५ पर्यंतच्या ११५ वर्षांचें शनीचे राश्यंतरकाल ( पुढें चालूं ).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| धनु | १७६२ मार्ग. शु. १<br>वक्री १७६५ आषा. शु.९ | १७७० पौष शु. ३<br>मा. १७९२ भाद्र. कृ. ९ | १८२० माघ कृ. १४<br>मा. १८२१ का. कृ. ४<br>वक्री १८२४ आषा. शु.१२ | १८५० मार्ग. कृ. ५ |
| मकर | १७६४ फा. शु. ५<br>मा. १७६५ मार्ग. शु. ८ | १७९४ पौष शु. १५<br>वक्री १७९७ आषा. शु.७ | १८२३ माघ कृ. ५<br>मा. १८२४ कार्ति. कृ. १२ | १८५३ पौष शु. ४<br>वक्री १८५६ आषा. शु.१० |
| कुंभ | १७६७ फा. शु. ५<br>वक्री १७७० श्रा. कृ. १ | १७९७ चैत्र कृ. १३<br>मा. १७९७ पौष कृ. ६ | १८२६ माघ कृ. ८<br>वक्री १८२९ श्रा. कृ. ६ | १८५६ अ. वै. शु. ८<br>मा. १८५६ पौ. शु. ८ |
| मीन | १७७० वैशा. कृ. १०<br>मा- १७७० माघ शु. १२ | १७९९ फा. कृ. ७ | १८२९ वै. शु. ६<br>मा. १८२९ माघ शु. ५ | १८५८ फा. शु. ११ |

## शके १७५० ते १८६० पर्यंतच्या ११० वर्षांचें राहूचे राश्यंतरकाल

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| मीन | १८५२<br>कार्तिक शु. १० | १७५९<br>कार्तिक शु. ४ | १७७८<br>वैशाख कृ. ७ | १७९६<br>पौष शु. ६ | १८१५<br>श्रावण शु. ८ | १८३४<br>चैत्र शु. ८ |
| कुंभ | १८५४<br>वैशाख शु. १४ | १७६१<br>अ. ज्ये. शु. १० | १७७९<br>पौष शु. १० | १७९८<br>श्रावण शु. १२ | १८१६<br>फाल्गुन शु. १२ | १८३५<br>आश्विन शु. १३ |
| मकर | १८५५<br>मार्गशीर्ष कृ. ४ | १७६२<br>मार्गशीर्ष शु. १५ | १७८१<br>आषाढ कृ. १ | १७९९<br>माघ कृ. १ | १८१८<br>भाद्रपद कृ. २ | १८३७<br>अ. वै. कृ. १४ |
| धनु | १८५७<br>ज्येष्ठ कृ. ९ | १७६४<br>ज्येष्ठ कृ. ६ | १७८२<br>पौष कृ. ५ | १८०१<br>भाद्रपद कृ. ६ | १८२०<br>चैत्र कृ. ८ | १८३८<br>कार्तिक कृ. ८ |

## शके १७५० ते १८६० पर्यंतच्या ११० वर्षांचें राहूचें राश्यंतरकाल ( पुढें चालू ).

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| वृश्चिक | १८५८ मार्गशीर्ष कृ. १४ | १७६५ पौष कृ. ९ | १७८४ श्रावण कृ. ११ | १८०२ फाल्गुन कृ. १२ | १८२१ आश्विन कृ. १४ | १८४० वैशाख कृ. ७ |
| तूळ | १८६० श्रावण शु. ५ | १७६७ आषाढ कृ. ३० | १७८५ फाल्गुन शु. १ | १८०४ आश्विन कृ. १ | १८२३ ज्येष्ठ शु. २ | १८४१ पौष शु. ४ |
| कन्या | १७५० आषाढ शु. २ | १७६८ फाल्गुन शु. ७ | १७८७ आश्विन शु. ६ | १८०६ वैशाख शु. ६ | १८२४ मार्गशीर्ष शु. ६ | १८४३ आषाढ शु. १० |
| सिंह | १७५१ माघ शु. २ | १७७० भाद्रपद शु. १० | १७८९ चैत्र शु. १२ | १८०७ कार्तिक शु. १२ | १८२६ ज्येष्ठ शु. १३ | १८४४ माघ शु. १४ |
| कर्क | १७५३ श्रावण शु. १४ | १७७२ चैत्र कृ. १ | १७९० कार्तिक कृ. १ | १८०९ ज्येष्ठ कृ. ३ | १८२७ पौष कृ. ४ | १८४६ श्रावण कृ. ५ |
| मिथुन | १७५४ फाल्गुन कृ. ५ | १७७३ आश्विन कृ. ७ | १७९२ वैशाख कृ. ७ | १८१० मार्गशीर्ष कृ. ७ | १८२९ आषाढ कृ. ९ | १८४७ फाल्गुन कृ. ९ |
| वृषभ | १७५६ भाद्रपद कृ. ९ | १७७५ चैत्र कृ. ११ | १७९३ कार्तिक कृ. ११ | १८१२ आषाढ कृ. १३ | १८३० माघ कृ. १४ | १८४९ भाद्रपद कृ. ३० |
| मेष | १७५८ चैत्र कृ. ३० | १७७६ कार्तिक कृ. ३० | १७९५ आषाढ शु. २ | १८१३ माघ शु. २ | १८३२ भाद्रपद शु. ४ | १८५१ चैत्र शु. ४ |

राहूचा संबंध राशिचक्र परिभ्रमणाचा काल मध्यममानानें १८ वर्षांचा असला तरी सूक्ष्म मानानें तो थोडा कमी आहे. तसाच शनीचा ३० वर्षांचा आणि गुरूचा १२ वर्षांचा राशिचक्र परिभ्रमणाचा काल हाही मध्यममानाचा आहे. सूक्ष्मकाल त्यांपेक्षां थोडा कमी येतो.

# शके १७८१ ते १८६४ पर्यंतचें गुरूचें राश्यंतरकाल.

| मेष | वृषभ | मिथुन | कर्क |
|---|---|---|---|
| १८६२ चै. शु. ८ | १८६३ चै. कृ. १३ | १८६४ वै. कृ. ४ | १७८१ भाद्र. कृ. ४ |
| | | १७८१ चै. कृ. १० | मा. १७८२ वै. कृ. १ |
| | | व. १७८१ पौ. कृ. ६ | व. १७८२ माघ कृ. ११ |
| १७९० चै. शु. १० | १७९१ फा. कृ. ३० | १७९२ श्रा. कृ. ६ | १७९३ अ. भाद्र. शु. १० |
| | १७९२ मार्ग. कृ. ९ | मा. १७९३ चै. शु. १४ | |
| १८०२ फा. शु. ७ | १८०३ आषाढ कृ. १३ | १८०४ अ. श्रा. शु. १० | १८०५ श्रा. शु. ५ |
| व. १८०३ का. कृ. ६ | मा. १८०३ फा. कृ. ४ | | |
| १८१४ आषा. शु. ६ | १८१५ अ. आ. शु. १५ | १८१६ आषा. शु. ६ | १८१७ आषा. कृ. ३० |
| मा. १८१४ माघ कृ. ११ | मा. १८१५ पौ. शु. ८ | | |
| व. १८१५ मार्ग. कृ. १३ | | | |
| १८२६ अ. ज्ये. कृ. ७ | १८२७ ज्ये. शु. ९ | १८२८ आषा. शु. १ | १८२९ ज्ये. कृ. ३० |
| मा. १८२६ पौ. शु. ६ | | | |
| १८३८ वै. शु. १४ | १८३९ ज्ये. शु. ५ | १८४० वै. कृ. ७ | १८४१ ज्ये. कृ. १० |
| १८५० वै. शु. १० | १८५१ वै. शु. १ | १८५२ वै. कृ. ८ | १८५३ ज्ये. कृ. ५ |
| | | | व. १८५३ पौ. कृ. १३ |

| सिंह | कन्या | तूळ | वृश्चिक |
|---|---|---|---|
| १७८२ अ. आ. कृ. २ | १७८३ आश्वि. कृ. ९ | १७८४ मार्ग. शु. ७ | १७८५ मार्ग. कृ. ४ |
| मा. १७८३ वै. शु. १४ | मा. १७८४ ज्ये. कृ. ५ | मा. १७८५ अ. श्रा. शु. १ | मा. १७८६ श्रा. शु. १५ |
| व. १७८४ चै. कृ १ | व. १७८५ वै. कृ. १२ | व. १७८६ ज्ये. शु. १ | व. १७८७ श्रा. शु. ५ |
| १७९४ भाद्र. शु. ११ | १७९५ आश्वि. कृ. ६ | १७९६ कार्ति. शु. १ | १७९७ मार्ग. शु. १४ |
| १८०६ भाद्र. शु. ६ | १८०७ भाद्र. कृ. १ | १८०८ आश्वि. कृ. १३ | १८०९ मार्ग. शु. १० |
| १८१८ श्रा. शु. ५ | १८१९ भाद्र. शु. १४ | १८२० अ. आ. कृ. ११ | १८२१ का. शु. ८ |
| १८३० श्रा. शु. २ | १८३१ श्रा. शु. ११ | १८३२ भाद्र. कृ. ९ | १८३३ का. शु. ६ |
| १८४२ आषा. कृ. १३ | १८४३ श्रा. शु. ३ | १८४४ भाद्र. कृ. ५ | १८४५ आश्वि. शु. १ |
| १८५३ आश्वि. कृ. १० | १८५४ मार्ग. शु. १ | १८५५ पौ. शु. १२ | १८५६ पौ. कृ. ९ |
| मा. १८५४ ज्ये. कृ. ७ | मा. १८५५ श्रा. शु. १ | मा. १८५६ श्रा. शु. १४ | मा. १८५७ भाद्र. कृ. ११ |
| व. १८५४ फा. शु. ६ | व. १८५६ चै. शु. १५ | व. १८५७ चै. कृ. ११ | व. १८५८ ज्ये. शु. १४ |

| धनु | मकर | कुंभ | मीन |
|---|---|---|---|
| १७८६ पौ. कृ. १३ | १७८७ माघ कृ. ३० | १७८८माघ कृ. ११ | १७८९ फा. कृ. ६ |
| मा.१७८७भाद्र.शु.१४ | | | |
| १७९८ पौ. कृ. ८ | १७९९ पौ. कृ. ११ | १८०० माघ कृ. ८ | १८०१ माघ कृ. २ |
| १८१० मार्ग. कृ. ४ | १८११ पौ. कृ. ८ | १८१२ पौ. कृ. ६ | १८१३ माघ शु. १२ |
| | | | व.१८१४आश्वि.शु. ७ |
| १८२२ मार्ग. कृ. ३ | १८२३ मार्ग. कृ. ६ | १८२४ पौ. कृ. १ | १८२५ ज्ये. कृ. ४ |
| | | व. १८२५ श्रा. कृ. ८ | मा. १८२५माघ शु. ५ |
| | | | व.१८२६ का. शु. १० |
| १८३४ का. शु. १४ | १८३५ मार्ग. कृ. १ | १८३६ वै. कृ. १० | १८३७ अ. वै.कृ.१४ |
| | व. १८३६आषा.कृ. ६ | मा. १८३६ पौ. शु. ९ | १८३७ मार्ग. कृ. ५ |
| | | व. १८३७ भाद्र. कृ.६ | |
| १८४६ का. शु. १० | १८४७ चै. कृ. ६ | १८४८ चै. शु. ४ | १८४९ चै. कृ. ५ |
| व. १८४७ ज्ये. कृ. ८ | मा.१८४७मार्ग.शु.१० | मा.१८४८का. कृ. ११ | |
| | व. १८४८ श्रा. कृ. १ | | |
| १८५७ फा. शु. २ | १८५८ फा. शु. २ | १८५९ फा. कृ. ९ | |
| मा.१८५८आश्वि.शु.२ | मा.१८५९आ.कृ. १२ | | १८६१ चै. शु. १५ |
| व.१८५९आषा. कृ. ४ | | | |

( १ ) **वसंत संपात** आणि सूर्य एका ठिकाणीं आल्यापासून सूर्यास सबंध राशिचक्राचें वर्तुल आक्रमण करून पुनः वसंत संपातस्थानीं येण्यास ३६५ दिवस ५ तास ४८ मिनिटें, ४८ सेकंद, म्हणजे ३६५ दिवस १४ घटिका व ३२ पळें इतका वेळ लागतो. ह्या परिभ्रमणाला संपातागत वर्षमान म्हणतात.

( २ ) **वेदकालांपासून** आजतागायत ५०००–६००० वर्षांच्या अविच्छिन्न परंपरेनें चालू असलेल्या नक्षत्रचक्रांतर्गत क्रांतिवृत्तीय निरयन राशिचक्रारंभस्थानीं म्हणजे रेवती योगतारा जयंती ( झीटापिशियम ) ह्या ताऱ्याशीं सूर्य आल्यापासून सबंध राशिचक्राचें वर्तुल आक्रमण करून पुनः त्याच जागीं येण्यास त्यास ३६५ दिवस, १५ घटिका, २३ पळें इतका काल लागतो. ह्याला निरयन वर्षमान किंवा "नाक्षत्र वर्षमान" म्हणतात. हें वेधसिद्ध वर्षमान होय.

( ३ ) **जुन्या पद्धतीच्या** मूळ सिद्धांतोक्त राशिचक्रारंभ स्थानाबद्दल कोणाचाही मतभेद नसतां जुन्या पद्धतीच्या पंचांगांतील ग्रहस्थितिमध्यें सांप्रत जो ४–४॥ अंशांचा जो फरक पडतो त्याचें कारण त्यांच्या गणितांत वर्षमान ८॥ पळांनीं जास्त म्हणजे ३६५ दिवस १५ घटिका ३१॥ पळें असें स्थूलत्वानें घेतलें आहे हें होय !

## हर्शल-राश्यंतरें.

मिथुन— १७८५
१७८७ चै. शु. १ मिं. ८ अं.
वक्री १७९१ फा. शु. ९
कर्क—. १७९१ आषाढ शु. ६
मा. १७९२ चै. शु. ७
व. १७९७ माघ शु १०
सिंह— १७९७ भाद्रपद कृ. ३
मा. १७९८ आषा. शु. ११
व. १८०३ माघ शु. १
कन्या— १८०३ मार्ग. शु. ८
मा. १८०४ भाद्र. कृ. ४
व. १८११ वै. कृ. ११
तूळ— १८१० आश्वि. शु. १४
मा. १८११ श्रा. शु.
व. १८१७ वै. शु. ४
वृश्चिक— १८१६ मार्ग. कृ. १३
मा. १८१७ आश्वि. कृ. ११
व. १८२४ ज्ये. कृ. ७
धनु— १८२३ मार्ग. कृ. ७
मा. १८२४ आश्वि. कृ. ६
व. १८३१ श्रा. शु. ८
मकर— १८३० माघ शु. १३
मा. १८३१ मार्ग. शु. १५
व. १८३८ आषा. शु. १५
कुंभ— १८३८ चै. कृ. ३
मा. १८३८ पौ. कृ. ३०
व. १८४६ आश्वि. शु. ३
मीन— १८४५ फा. कृ १०
मा. १८४६ पौ. कृ. ११
व. १८५३ अ. भा. कृ. १
मेष— १८५३ आषा. शु. ३
मा. १८५३ फा. कृ. ११
व. १८६१ का. कृ. ११
वृषभ— १८६१ ज्ये. शु. ११
मा. १८६१ फा. शु. ६

## नेपच्यून-राश्यंतरें.

मीन— १७८० चैत्र मीन—४
१७८७चै.शु १मीन २० अं.
व. १७९१ भाद्र. कृ. ११
मेष— १७९१ वै. कृ. ११—मेष ०
मा.१७९१फा.शु. ४—मेष ०
व. १८०४ आश्वि. कृ. १३
वृषभ— १८०४आषा.कृ.१०-वृष.०
मा. १८०५चै.कृ.८ वृष. ०
व. १८१८ मार्ग. कृ. १०
मिथुन— १८१८आषा.कृ. २ मिथु. ०
मा. १८१९चै.कृ.१० मि.०
व. १८३१ पौ. शु. ६
कर्क— १८३० भाद्र. कृ. २
मा. १८३२ ज्ये. कृ. ५
व. १८४५ माघ शु. १०
सिंह— १८४५ श्रावण कृ. १०
मा. १८४६ आषा. शु. ५
व. १८६० चै. शु. १०
कन्या— १८५९ भाद्र. शु. १४
मा. १८६० आषा. कृ. ७
तूळ— १८७३

---

हर्शलला एक राशिपरिभ्रमणास मध्यममानानें ७ वर्षे लागतात. नेपच्यूनचें एक राशीचें परिभ्रमण मध्यम मानानें सुमारें १४ वर्षांत होतें. सूक्ष्ममानानें दोघांनाही थोडा कमी काल लागतो.

## कोणत्याही वर्षाच्या मेष संक्रांतीचा वार काढणें

ज्या इष्ट शकाच्या मेष संक्रांति प्रवेशाचा वार काढावयाचा असेल त्या शक वर्षांतून १७८७ वजा करून बाकी येणाऱ्या वर्ष संख्येनें ७५॥ ह्या संख्येस गुणावे व ६० नें भागावें. भागाकार हे वार व बाकी राहील त्या घटका, असें समजावें.

त्या वार संख्येस ७ नें भागून फक्त बाकी घ्यावी. ती वारात्मक बाकी हे वार व त्यापुढें वरील घटी, पळें मांडावीं आणि त्यांत ३ वार ० घटी ० पळें मिळवावी म्हणजे मेष, संक्रांति प्रवेशाचा वार, घटी व पळें येतील ( वार संख्या ७ पेक्षां जास्त झाल्यास त्यांतून ७ वजा करावे व बाकी घ्यावी. वारांचा क्रम १ म्हणजे रविवार, २ म्हणजे सोमवार याप्रमाणें समजावा. )

ह्या रीतिप्रमाणें मेष संक्रांति प्रवेशाचा वार नक्की जमेल.

शुद्धपंचांगाप्रमाणें मेषार्क प्रवेशाचा वार काढावयाचा असतां ६ वार मिळवावे.

## कोणत्याही वर्षाच्या मेष संक्रांति प्रवेशाचें नक्षत्र काढणें

ज्या इष्ट शकाच्या मेष संक्रांति प्रवेशाचें नक्षत्र काढावयाचें असेल त्या शक-वर्षांतून १७८७ वजा करून बाकी येणाऱ्या वर्ष संख्येनें ५९७॥ ह्या संख्येस गुणावें आणि ६० नें भागून भागाकार, नक्षत्रें व बाकी घटिका आणाव्या. नक्षत्रास २७ नें भागून बाकी राहील तितकीं नक्षत्रें व वर आलेल्या घटिका हें फल आलें. ह्यांत चौदा ( १४ ) नक्षत्रें मिळवावीं म्हणजे मेष संक्रांति प्रवेशाचें नक्षत्र येईल. तें अश्विनी-पासून मोजावें.

शुद्धपंचांगाप्रमाणें नक्षत्र काढावयाचें असतां आलेल्या फलांत ११ अकरा नक्षत्रें मिळवावीं म्हणजे मेषार्क प्रवेशाचें नक्षत्र येईल. येणेंप्रमाणें कोणत्याही मेषार्क प्रवेशाच्या वेळची तिथि, वार आणि नक्षत्र सहज काढतां येईल.

तिथि व नक्षत्रांत क्वचित् एखाद्या तिथि नक्षत्राचा फरक पडला तरी तो क्षम्य आहे. कारण हा ठोकळ आहे. अतिसूक्ष्ममान नव्हे.

## सूर्य आणि चंद्र यांचा प्रदक्षिणाकाल.

एका चांद्रवर्षाचें ३५४ दिवस, ( ज्या वर्षी अधिकमास असतो त्या वर्षी ३८४ दिवस ) असतात, आणि एका नाक्षत्र सौरवर्षाचे दिवस ३६५-१५-३१॥ ( जुन्या पद्धतीनें ) आहेत. सूक्ष्म गणितानें व प्रत्यक्ष वेधानें नाक्षत्र सौरवर्षाचें मान ३६५ दिवस १५ घटिका २३ पळें इतकें आहे.

# स्वानुभव सिद्धांत प्रकाश

## हात कसा असावा ?

रक्तवर्ण म्हणजे तांबूस रंगावर हात असेल तर—आनंदी, हौशी, सुंदर. पिवळट असल्यास—समस्थिति, पित्तप्रकृति. कृष्णवर्णाचा हात दुःख व कष्टकारक.

हाताचा पंजा बारीक, अरुंद व चिंचोळा असेल तर अशक्त, दुर्जन, भ्याड, मनाचा चंचल, बुद्धिहीन, आळशी, कोणत्याही गोष्टीसंबंधीं हुषारी व खात्री नसणें, अनीतिमान्, स्वभावांत आपलेपणा कमी अशा तऱ्हेच्या गोष्टी दर्शवितो.

हाताचा पंजा प्रमाणशीर, पुष्ट, बोटें वगैरे सर्व प्रमाणांत असतील तर शहाणा, कल्पक, मनाचा उत्तम, चतुर व हुषार होतो.

पंजा जर फार मोठा, बोटें फार लठ्ठ अशी असल्यास लोकांची निंदा करणारा, दुसऱ्याचें वाईट चिंतणारा व आपमतलबी असतो.

वर लिहिल्याप्रमाणें हात असून कठिण व घट्ट असा ( म्हणजे मृदु नसेल तर ), त्याचप्रमाणें तळहातापेक्षां बोटें लहान आंखूड व अतिशय जाड, ओबडधोबड अशीं असल्यास रानटी, आडदांड, क्रूर, निरक्षर, निर्दय व पशुवत् आचरण करणारा परतंत्र बुद्धीचा, हलक्या कानाचा व बुद्धिहीन होतो.

हाताचीं बोटें लांब असून बोटांचीं पेरीं चांगलीं मऊ, रक्तवर्ण व सडसडीत असणें हें उत्तम लक्षण. आंगठ्याचें महत्त्व विशेष असल्यामुळें तो फार चांगला पाहिजे. ( जन्मवेड्यांचा आंगठा फार लहान असतो. )

आंगठ्याचीं पेरें वगैरे चांगलीं पाहिजेत. स्त्रीपुरुषांच्या कोणत्याही हातासंबंधीं हेंच प्रमाण समजावें. बारीक व चिंचोळीं बोटें असणारा मनुष्य अशक्त व अतिशय विचारी होतो. तो इतका कीं त्याच्याकडून झटपट काम होणेंच शक्य नाहीं.

हाताचा मध्यभाग म्हणजे तळहात खोलगट असणें हें भाग्यहीन मनुष्याचें लक्षण आहे. त्यास द्रव्यासंबंधीं अडचणी असून कोणत्याही धंद्यांत अपयश येतें. दरिद्री व सर्वांशीं विरोध करणारा होतो. इतर कोणत्याही रेषा विशेष चांगल्या असल्या तर ह्या योगाचे अनिष्टफल नष्ट होते. हाताच्या मागील बाजूस थोडे केस असणें चांगलें. तो मनुष्य शहाणा, सुखी व चैनी होतो. फार केस असल्यास चंचल, बोलण्यांत खरेपणा नसतो. केंस मुळींच नसल्यास मूर्ख व वृथाभिमानी.

स्त्रियांच्या हातांवर कॅस असल्यास ती स्त्री दुष्ट व दुसऱ्याचें चांगलें न पाहवणारी अशी होते.

हाताच्या बोटांचे दोन प्रकार असतात. एक सरळ व दुसरा गांठाळ.

गांठाळ बोट—म्हणजे बोटांचे सांधे जाड व पुष्ट असतील तर तो मनुष्य व्यवस्थित व विचारी असतो. बोटांत एकंदर सांधे तीन असतात ते नखांपासून पहावे.

बोटांचे पहिले सांधे पुष्ट व गांठाळ असल्यास तो मनुष्य पद्धतशीर कामें करणारा, कल्पक, स्थिर स्वभावाचा, अधिकार चालविणारा असा होतो.

सर्व सांधे गांठाळ असल्यास चतुर, गुणी, अव्यवस्था मोडणारा, नियमित काम करणारा, दूरदृष्टि, शास्त्राभ्यासी, शोधक व खोल विचारी असतो.

बोटांचा फक्त मधलाच सांधा गांठाळ असल्यास संसारदक्ष, प्रपंचाची आवड, व्यवहारज्ञान असतें, आपमतलबी व स्वार्थी होतो. दुसऱ्याच्या बऱ्यावाईटाची त्यास किंमत नसते. गाठाळ बोटांचीं मनुष्यें आपल्या स्वतःच्या बुद्धिप्रभावानें व कर्तृत्वानें व्यवसायांत प्रसिद्धीस येतात.

सरळ बोटें असणाऱ्या मनुष्यास कलाकौशल्य व अनेक तऱ्हेचे धंदे करण्याची फार आवड, व त्यांतील मर्म लवकर कळतें. त्यांचीं कामें लोकांच्या मदतीनें होतात. सरळ बोटांचा मनुष्य जितका उद्योगी तितकाच आळशी असतो. म्ह० सर्व काम लहरीप्रमाणें करितो. त्यास आपल्या कर्तबगारीची घमेंड फार असते. तो उद्योग तर सारखा घाईघाईनें उद्योगच करीत असतो. परंतु आपलें काय चुकत आहे याकडे त्याचें लक्ष नसल्यामुळें केलेल्या कामाचें चीज होत नाहीं, सर्व निरर्थक होतें.

गांठाळ बोटांचा मनुष्य थोडकेंच काम करितो; परंतु तें व्यवस्थित किता घेण्यासारखें, उपयुक्त व टिकाऊ असें असतें. बोटांच्या मध्यें फट पडत असेल तर चौकसबुद्धि, स्वभाव फार चमत्कारिक व कावेबाज, परंतु मनांत कांहीं न ठेवणारा होतो.

बोटांच्यामध्यें फट मुळींच पडत नसेल तर मत्सरयुक्त, व कोणाचेंही चांगलें न पाहवणारा होईल.

## आंगठा कसा असावा ?

जन्मवेळ्याचा आंगठा फार लहान असतो म्हणून मागें सांगितलेंच आहे. आंगठ्यावरून विचारशक्ति, इच्छाशक्ति व कर्तृत्व कळतें. आंगठ्यास इतर बोटांप्रमाणें

तीन पेरीं नसून दोनच असतात पहिल्या म्हणजे वरच्या पेऱ्यावर इच्छा व दुसऱ्यावर विचारशक्ति समजते.

पहिलें पेरें मोठें व पुष्ट असेल तर त्या मनुष्याच्या इच्छा मोठाल्या व तो महत्वाकांक्षी असतो.

दुसरें पेरें पुष्ट व मोठें असल्यास विचारशक्ति उत्तम, असून तो कार्यकुशल होतो.

दोन्ही पेऱ्यांत पहिलेंच पेरें फार मोठें असल्यास उतावळा, अविचारी व आपली योग्यता काय आहे याचा विचार न करतां पाहिजे ती इच्छा मनांत बाळगणारा, व उच्छृंखल होतो.

आंखूड आंगठा असणारा मनुष्य अविश्वासी; विश्वासानें कोणत्याही कामास नालायक. म्हणजे त्यावर विश्वास ठेवणें धोक्याचें असतें. त्याची वर्तणूक सभ्यपणाची नसतें.

आंगठा आखूड असून मस्तकरेषा उठावदार व स्पष्ट फांटे वगैरे न फुटलेली अशी असेल तर तो मनुष्य खरा दैववान, विद्वान्, तज्ज्ञ, सर्वांशीं मैत्री ठेवणारा व गरीब स्वभावाचा असतो.

आंगठ्याच्या पहिल्या व दुसऱ्या भागांत यव चिन्ह यश देतें.

## हाताचीं बोटें व त्यांचीं फलें.

हाताचीं बोटें लांब व सरळ असल्यास पराक्रमी, नाट्य व विषयीं गोष्टींची आवड, स्वभाव थंड व आळशी.

बोटें आंखूड व शेवटीं बारीक असल्यास चैनीकडे फार लक्ष. छानछोकी व नटण्यांत प्रवीण, भपकेदार काम करण्याची हौस, हुन्नरकला जाणणारा.

शेवटास चौरस परंतु अगदीं सरळ अशीं बोटें असल्यास स्वबुद्धीनें कार्य करणारा, धोरणी, व्यवस्थित, विचारी, धैर्यवान् होतो.

नखाग्रीं व भोंवतालीं मांस वाढलें असल्यास शूर, स्वातंत्र्यप्रिय, करामत करणारा फार चपळ असेल, बोटांच्या पेऱ्यावर पुष्कळ रेघा असणें हें लक्षण वाईट व शुभ फल कमी करणारें आहे.

आंगठ्यावर लांब व उभ्या रेषा मैत्री व प्रेम यांत कधींही अंतर पडूं देत नाहींत,

आंगठ्याचे बाजूवर रेषा असणें हें सांपत्तिकदर्शक चिन्ह आहे. पहिल्या पेऱ्यांत

पूर्ववय, दुसऱ्या पेऱ्यांत उत्तरवय याप्रमाणें ज्या पेऱ्यांत रेषा असतील त्या वयांत सांपत्तिक सौख्य देतात.

बोटांचीं पेरीं जीं सांगितलीं आहेत तीं अनुक्रमें नखें ज्यात असतात तें पहिलें, त्या खालीं दुसरें व त्याखालील तिसरें येणेंप्रमाणें पहावीत.

कोणत्याही बोटाच्या पेऱ्यावर एकच रेषा त्या बोटासंबंधींचें फल वाढविते. पुष्कळ आडव्या व उभ्या अशा रेषा कार्यनाश, अडथळे, संकटें वगैरे आणतात.

आंगठ्याचे शेजारचे बोटावर दुसऱ्या पेऱ्यांत दोन फुल्या ++ असल्यास त्या, त्या मनुष्यास प्रसिद्धीस आणतात व मोठमोठ्या संस्थांचा चालक किंवा कार्यकर्ता होतो.

## हातावरील ग्रहांचीं स्थानें व त्यांचीं फलें ( उंचवटे. )

हाताच्या प्रत्येक बोटाखालीं तळहातावर जराशी फुगलेली जी जागा त्यास त्या ग्रहाचें स्थान अगर उंचवटा असें म्हणतात. हे उंचवटे रवीपासून शनीपर्यंत सप्तग्रहांचे आहेत. राहुकेतूंचा संबंध यांत मुळींच नाहीं.

हीं स्थानें किंवा हे उंचवटे रवि, चंद्र, मंगळ याप्रमाणें अनुक्रमानें नसून **करांगुळीच्या बोटाखालीं बुधाचा, करांगुळी शेजारच्या बोटाखालीं रवीचा, मधल्या बोटाखालीं शनीचा, आंगठ्याचे शेजारच्या बोटाखालीं गुरूचा व आंगठ्याखालीं शुक्राचा**, येणेंप्रमाणें हे पांच ग्रहांचे उंचवटे झाले. आतां फक्त चंद्र व मंगळ हे उंचवटे राहिले.

बुधाच्या उंचवट्याखालीं ज्या ठिकाणीं अंतःकरणरेषा पूर्ण होते, **त्याच्या खालच्या ठिकाणास मंगळाचा उंचवटा; व** मणिबंधाच्या वर हाताच्या मध्यापासून शनीकडे जाणाऱ्या रेषेच्या डाव्या बाजूस म्हणजे **मंगळाच्या खालील कोपऱ्यास चंद्राचा उंचवटा म्हणतात.** याप्रमाणें हे सात ग्रहांचे उंचवटे आहेत.

हे उंचवटे उठावदार, स्पष्ट व ठळक असतील तर त्या ग्रहाचे सर्वगुण अगर तो ग्रह ज्या गोष्टींचा कारक असेल त्या गोष्टींसंबंधींचें सौख्य या मनुष्यास पूर्णपणें मिळेल व त्याची ख्याति होईल.

उंचवट्याची जागा सपाट असेल त्या ग्रहाच्या गोष्टी अगर गुणधर्म त्या मनुष्यांत नाहींत, न्यूनत्व व कमीपणा आहे असें समजावें.

उंचवट्याच्या जागीं उंचवटा नसून ती जागा खोलगट असेल तर ज्या ज्या

ज्या गोष्टी त्या ग्रहाच्या उत्तम त्या त्या सर्व गोष्टी विरुद्ध होतील व अशुभ फल मिळेल.

कोणत्या उंचवट्यावर काय पहावें हें समजण्याकरितां " कारकसूत्र " त्रोटक रीतीनें येथें दिल्यास समजुत लवकर पटेल व घोंटाळा होणार नाहीं, एवढ्याकरितां ग्रहांचें कारकसूत्र थोडक्यांत खालीं देतो.

( १ ) पिता, प्रताप, यश, आरोग्य, रुचि, ज्ञानविज्ञान, पवित्रता, धाडस, उद्योग, राजाश्रय, मानसन्मान, मोठा अधिकार, पुढारीपणा, लोकनायक, उच्चवैभव, राजयोग, वगैरे गोष्टींचा कारक रवी आहे.

( २ ) विचारवृत्ति, माता, श्वेतवस्त्र, दया, यश, क्रांति, नेत्र, व्यापार, फायदा; सिद्धि, या सर्व गोष्टी चंद्रापासून होतात.

( ३ ) पराक्रम, साहस, भांडणें, शत्रुक्षय, वादविवाद, कोर्टांत जाण्याचे प्रसंग, फौजदारी, भूमिलाभ, जमीनजुमला, रक्तदोष, धाडसाचीं अचाट कामें करणें, नापटपणा, वगैरे गोष्टी भौमाच्या शुभाशुभत्वावर अवलंबून आहेत.

( ४ ) संतति, शांति, नम्रता, भक्ति, बुद्धि, माया, गणित, वेदान्त, कलौ कौशल्य, लेखनचातुर्य, वक्तृत्व, समृद्धि, कुटुंब, व्यापार, वगैरेंचा कारक बुध आहे.

( ५ ) वाहनसौख्य, मनाची व अधिकाराची जागा, लोकांवर प्रेम व छाप वेद-शास्त्रज्ञान, राज्यकारभारी, वरिष्ठ नोकर, विद्या, संतति, बुद्धि, उपजीविका, शुभकृत्य, सांपत्तिक स्थिति, धंदा, यश, मानमान्यता, वंशवृद्धि, बुद्धलोक, विवेक, स्थित-प्रज्ञता, सारासारविचार, या गोष्टी गुरुमुळें घडतात.

( ६ ) संगीत, गायन, काव्य, अद्‌भुत कथा, कामवासना, स्त्रीसौख्य, विलास, व्यभिचार, क्रांति, व्यापार, सौंदर्य, गारुड, व इंद्रजाल विद्या, चतुर, प्रसिद्धि किंवा अप्रसिद्धि, अष्टैश्वर्य, वैभव, संस्कृत व ज्योतिषविद्या, चैन, उथळेपणा या गोष्टींचा कारक शुक्र आहे.

( ७ ) मोह, लोभ, परपीडा, निष्ठुर, वाईट इच्छा, दारिद्र्य, रोग, आयुष्य, संकटें, मानहानीचे प्रकार, दंड, कारागृहवास, चोरी, द्रव्यनाश वगैरे गोष्टींचा बोध शनीवरून होतो.

अतिशय मोठे उंचवटे असणें हें त्या उंचवट्याच्या मिळणाऱ्या फलाबद्दल खात्री

व अतिरेक दाखवितात. म्हणजे जें फल मिळावयाचें त्यापेक्षां पुष्कळ पटीनें जास्त, असें मिळतें.

उदाहरणार्थ, गुरूचा उंचवटा मध्यम प्रकारचा असेल तर विद्यायुक्त होईल. परंतु बराच मोठा असल्यास विद्येंत मान मिळवून वरिष्ठ नौकरी, अधिकार, राजाश्रय व सांपत्तिक स्थिति उत्तम होईल.

कोणत्या ग्रहाचा उंचवटा हातावर कोणत्या ठिंकाणीं असतो हें वर सांगितलेंच आहे; आतां त्यांच्या प्रत्येक ग्रहाचे **गुणधर्म** काय आहेत हें सांगतों.

**चंद्राचा उंचवटा** स्पष्ट व उठावदार असेल तर कल्पक अद्‌भुत गोष्टी करणारा, संशमी, गायनाची आवड, एकांतप्रिय, अतिशय चंचल, जुन्या पुराण्या गोष्टींविषयीं प्रेम, स्वप्नादिकांवर विश्वास, रसिक, सुंदर.

**चंद्राचा उंचवटा फार मोठा** असल्यास त्रासिक, संशयी, मध्यम शरीराचा, निराश, अस्वस्थ, डोकेफिरू, मस्तकदोष, असंभाव्य गोष्टींविषयीं उत्सुक.

**उंचवटा मुळींच नसल्यास** आपमतलबी, स्वार्थी, एकांतप्रिय, उतावळा पोरकट निष्काळजी, आळशी, मूर्ख व अविचारी.

**मंगळाचा उंचवटा चांगला** असल्यास पराक्रमी, धाडसी, निश्चयी, हट्टी, प्रसंगावधानी, उदार, स्वाभिमानी शूर व बाणेदार असतो.

**उंचवटा फार मोठा. असल्यास**, क्रूर निष्ठुर, क्रोधी, अतिशय तापट, सूड घेणारा, भयंकर कल्पना, छळ व जुलूम करणारा, स्वतंत्र व हेकेखोर असतो.

**उंचवटा मुळींच नसल्यास** भित्रा, पराक्रमहीन, कोणत्याही कामांत पराजय पावणारा, नीच कर्म करणारा, गुप्त कारस्थानें करण्यांत, घातपात वगैरेंत प्रसिद्ध व अस्थिर बुद्धि धैर्याचा अभाव, आडून गोळ्या मारणारा.

**बुधाचा उंचवटा जोमदार** असल्यास शोधक बुद्धि, चपल, हौशी, धमक, उद्योगी, स्वतंत्र तऱ्हेनें व्यापार करणारा, विनोदयुक्त, सडपातळ, शास्त्रीय विषयांची आवड. लेखक, वक्ता, हिशेबी कामांत चतुर.

**अतिशय मोठा उंचवटा** असल्यास खोटें काम करणारा, नीच, अज्ञानी, चोर, भामटेगिरी, फसवाफसवी.

**उंचवटा मुळींच नसल्यास**, आळशी, वक्तृत्वहीन, निरुत्साही बुद्धिमंद, कामाची टाळाटाळ करणारा, अक्षर वाईट.

**रवीचा उंचवटा चांगला** असल्यास नाना शास्त्रकला, हुन्नर, वगैरेंची आवड,

सदा आनंदी, हंसतमुख, भव्य, मनाचा उदार, मोकळा, श्रीमंत, शिल्पशास्त्र जाणणारा, प्रसिद्ध. मानमान्यता व अधिकार चालविणारा व रुबाबदार प्रतिष्ठित.

**उंचवटा अति मोठा असेल** तर दंभ माजविणारा, फार उदार, उधळ्या, पोकळ गर्व वाहणारा व हलकट वृत्तींच्या लोकांत राहणारा. अतिरेकी गोष्टी करण्यांतच प्रौढी बडा घर पोकळ वासा अशी स्थिती.

**उंचवटा मुळींच नसेल** तर कोणत्याही गोष्टींची आवड नसणें, मठ्ठ, आळशी आपमतलबी, स्वार्थी, मनाचा व बुद्धीचा कमकुवत, मनांत कुढणारा.

**शनीचा उंचवटा** चांगला, स्पष्ट व सुरेख असेल तर शहाणा, दूरदर्शी, थोडाबहुत जय, दैववादी, मोठ्यांचा आश्रय, न्याय निवाड्याचा अधिकारी.

**उंचवटा फार मोठा असल्यास** दुःखी, हट्टी, दुराग्रही, उदासीन, मानसिक चिंतायुक्त, भविष्यकाळीं आपलें कसें होईल याची काळजी करणारा, कष्ट, आत्मघातकी, अधर्मी व संन्यासी. संसारसुखापासून पराङ्मुख, विरक्त.

**हा उंचवटा मुळींच नसेल** तर दुर्दैवी, जगांत याचें नांवही ऐकूं येणार नाहीं, जन्म होऊन व्यर्थ ! अनेक आपत्तींत खितपत पडणारा.

**गुरूचा उंचवटा ठळक** व स्पष्ट असेल तर महत्त्वाकांक्षी, कीर्ति, मान व अन्नविषयीं फार धडपड करणारा, धार्मिक, मनमिळाऊ, कुटुंबाचा मालक, अधिकार चालविणारा, स्वेच्छाचारी, कुलांत श्रेष्ठ, अभिमानी, भाग्यवान, विवाहसुख, स्त्रीसुख चांगलें, अनेक सृष्टिचमत्कार पाहणारा, उदार निपुण, महत्त्वाकांक्षी व सौंदर्यप्रिय असतो. संतती विद्वान, गुणी व भाग्यवान.

**उंचवटा फार मोठा** असल्यास धर्मभोळा, हट्टी, चिडखोर, मानी, भक्तीचे वेड, शकून, स्वप्न इत्यादिकांवर विश्वास ठेवणारा, अति गर्विष्ठ.

**उंचवटा मुळींच नसेल** तर आळशी. ग्राम्य इच्छा, बीभत्स प्रकार, गर्व, पोकळ डौल, अरसिक, अधर्मी, परावलंबी, दुराचारी व दुःखी होतो.

गुरुच्या उंचवटयावर चतुष्कोणाकृति चिन्ह असल्यास त्याचें लग्न लवकर होतें. अधिकार सत्ता व मोठेपणा प्राप्त होऊन विपुल द्रव्य मिळतें व सर्व संकटांतून तो मुक्त होतो. गुरुरेषा प्रबल असतांही अशींच फळें मिळतात.

गुरुवर त्रिकोणचिन्ह असल्यास दुसऱ्यांचीं लग्नें जुळवून देतो. विवाहादि मंगलकार्यें करितो, त्याची स्त्री कुलीन घराण्यांतील असते.

गुरूवर फुली किंवा षट्कोणचिन्ह असल्यास लग्नांत पैसा व स्त्री उत्तम मिळते, व सुखी असतो. समाजांत मान्यता मिळते.

गुरूवर सरळ उभी रेषा असेल तर हरकामीं यशस्वी, आंगठयावर यव असून ही रेषा असेल तर पूर्ण यशस्वी होतो, त्यास अपेश येत नाहीं. गुरूवर पुष्कळ रेषा असतील तर अपेशी किंवा कष्टाधीन यश असा होतो.

गुरूवर काळा ठिपका असेल तर अब्रूची हानि, मानहानि, धनहानी वगैरे अपमान कारक गोष्टी घडतात. व त्या विशेषतः पूर्ववयांतच घडतात.

गुरूवर शून्याकार पोकळ चिन्ह असेल तर कुलास बट्टा लावणारा, तंटेबखेडे करणारा, कलहप्रिय असतो.

गुरूचा उंचवटा चांगला असून त्यावर स्पष्ट असें त्रिकोणचिन्ह व सूर्यरेखा किंवा सूर्याचा उंचवटा उत्तम असेल तर वरिष्ठ अधिकारी, संस्थानांत मुख्य कारभारी होतो. अनेक लोकांचा प्रतिपाल करणारा, लक्ष्मीवान व दैववान असतो.

गुरूवर जर लांबट चतुष्कोण असून त्यांत उभ्या आडव्या रेषा असतील, तर नीच कर्म, लोकांस भीति दाखवून आपल्यामागरखे करितो, कुत्सित बुद्धि, स्वार्थी व गर्विष्ठ असतो.

**शुक्राचा उंचवटा ठळक,** उठावदार व स्पष्ट असेल तर—गायनाची आवड बाळगणारा, सुंदर स्त्रियांची प्राप्ति, स्त्रीविषयक विचार, सभ्य, सुशील, प्रेम करणारा, विनयशील. कलाकौशल्याची व शास्त्रांची आवड, अगर स्वतंत्र धंद्याकडे मनाची प्रवृत्ति, स्त्रियांकडून लाभ.

**हा उंचवटा फारच मोठा** असेल तर गर्वानें फुगलेला, परस्त्रीरत, व्यभिचारी, उर्मट, डौली, भपकेदार पोशाख करणारा, चैनी, उथळ्या, नखरा करणारा, नाटकी निंदा करण्याविषयीं तत्पर, विश्वासघातकी, फसव्या.

**शुक्राचा उंचवटा मुळींच नसेल** तर दुर्गुणी, व्यसनग्रस्त, अपमतलबी, नीच कर्म करणारा, स्त्रियांनीं निंदित व स्त्रीसौख्य न मिळणारा, कमजोर, पाषाणहृदयी, धंद्यांत व मानमान्यतेंत कमीपणा, हीनत्व पावणारा अशा तऱ्हेचा असतो.

ग्रहांची हातावरील सात स्थानें किंवा उंचवटे या संबंधीच्या फलांचा विचार करतांना कांहीं महत्त्वाच्या गोष्टी लक्षांत ठेवणें फार जरूरीचे आहे कारण त्याखेरीज करण्यांत येणारा फलनिर्णय हा सदोष किंवा एकांगी होण्याचा संभव उत्तम होतो म्हणून खालीं दिलेल्या गोष्टी प्रत्येकवेळीं लक्षांत घ्याव्या.

**फलातिरेक, फलसाम्य** आणि **फलाल्पता** असे तीन प्रकार ग्रहस्थानांच्या किंवा उंचवट्याच्या **शुभ फलाचे** करावे लागतात. त्याचप्रमाणे प्रत्येक उंचवट्याच्या प्रतिकूल फलाचेही असेच तीन प्रकार असतात म्हणून त्यासंबंधीच्या निर्णयाची दिशा आतां दाखवूं.

कोणत्याही ग्रहस्थानाचें फल शुभ आहे की अशुभ आहे हें प्रथम् विचारपूर्वक ठरवावें तें असें:—इष्ट अशा ग्रहस्थानाची जागा किंवा उंचवटा वाकड्या तिकड्या रेषांनीं युक्त, गिचमिड किंवा अगदीं खोलगट रट असा असून त्यावरून निघणाऱ्या किंवा त्यावर येणाऱ्या रेषा महत्त्वाच्या भाग्यरेषांशीं न मिळतां मध्येंच खंडित होत असतील. किंवा स्वतंत्रपणें कात्रीसारखें किंवा फुली X सारखें चिन्ह स्पष्ट असेल. तसेंच ग्रहस्थानाच्या जागेचा जो मध्य भाग त्यावर कोणतेंही शुभचिन्ह उठावदार व स्पष्ट नसून अधोगामी आणि हाताच्या पृष्ठभागाकडे वळणाऱ्या केंसमय अगदीं बारीक रेषा तुटक तुटक असतील तर त्या ग्रहाचें स्थान व तो उंचवटा विघडला असून त्याचें अशुभफल मिळणार असें समजावें.

ह्याच्या उलट जी स्थिति ती शुभफलकारक अनुकूल परिस्थिति होय. अशा प्रकारचें ग्रहस्थान हें शुभफल देणारें असतें. आतां प्रत्येकांतल्या तीन तीन प्रकारच्या फलांची साधारण रूपरेषा सांगून त्यासाठीं शुक्राचें स्थान घेऊं.

**शुभफल--फलाल्पता—स्वभावधर्म** आणि प्रकृतिमान साधारणत: चारचौघासारखें. बायकी प्रवृत्तीच्या गोष्टीकडे आणि नाट्यगायनादि विषयाकडे सामान्यत: ओढा, स्त्रीसुख बेताचें, पोषाख नीटनेटका, आपल्या लाघवीपणानें लोकांशीं सलगी, स्त्रीसुखाचीआसक्ती. चैनीच्या गोष्टी आणि क्वचित् प्रसंगीं व्यसन. थोड्याशा दिखाऊ गोष्टीनें संतुष्ट व ह्याकरितां खर्च करण्याची तयारी, प्रापंचिक सुख व नातेवाईकांविषयीं आपुलकीची भावना. स्त्रियांशीं मैत्री. कन्या संततीवर प्रेम, संतती रुपवान, गुणी.

**शुभफल—फलसाम्य:**—सुखांत व चैनींत राहण्याकडे विशेष लक्ष आणि अशा तऱ्हेच्या चैनबाजलोकांशीं आपण होऊन सहकार्यकरण्याची हौस. संसारसुखांत दंग.

प्रापंचिक पसारा मोठा, स्त्री सुख चांगलें. पत्नीच्या माहेरच्या घरची स्थिति संपन्नतेची. कन्या संततीचें सौख्य, स्त्रियांच्या उत्कर्षाकरितां द्रव्याचा व्यय, छानछोकीची आवड, अत्तरें, तेलें, सुवासिक पुष्पें इत्यादिकांवर लुब्ध, सुंदर स्त्रियांचा अभिलाष, गायन वादनाच्या व नाटकांच्या नादांत विशेषव्यय, स्त्री नटांची मैत्री,

व ह्यांस साह्य, मोठमोठ्या घराण्यांतील स्त्रियांच्या ओळखी, पांढऱ्या वस्तूंची प्रीति. खर्चाविषयीं निष्काळजी, गाई व म्हशीं बाळगण्याची हौस. वाहनांचा शोक.

**शुभफल–फलातिरेक**—चैनींत व ऐषआरामांत दंग, स्त्रीयांचा अतिशय अभिलाष आणि कामासक्तीची परमावधी क्वचित् हीन आणि निंद्य अशांच्या संगती मध्येंहि अलिप्त, बागबगीचे, वाहनें, नौकरचाकर गाईम्हशीं यांचा विपुल संग्रह आणि त्यापासून सौख्य, मोठमोठ्या घरंदाज व श्रीमान् लोकांशीं दाट मैत्री, उत्कृष्ट व प्रसिद्ध गवई किंवा गायनसंस्था व नाट्यसंस्था यांत पुढारीपणानें वास्तव्य,सुंदर घरें किंवा मनोहर बंगले यांत वस्ती, कलाकौशल्याच्या कारखान्याचा किंवा उंची वस्तू, चांदी, मोती, सोनें इत्यादिकांचा व्यापार व त्यांत पारख. स्वभाव आकर्षक व लाघवी, प्रकृती उत्तम, अशा प्रकारें शुक्राच्या शुभफलाचे तीन प्रकार सांगितले. त्यावरून फलांची वाढ कसकशी होते हें दिसून येईल.

अशाच प्रकारच्या अशुभ फलांच्याही तीन अवस्था असतात. त्या कल्पनेनें सहज जाणतां येतील. सारांश शुभफलाचे प्रकार तीन, व अशुभ फलाचे प्रकार तीन आणि मिश्रफलाचे प्रकार तीन एकूण ९ प्रकार फलांच्या बाबतीत होतात.

## ग्रहस्थानें अर्थात् उंचवट्यासंबंधीं आणखी विवेचन

पाश्चात्य ग्रंथांत उंचवट्यांना बरेंच महत्त्व दिलें आहे. आपल्या ग्रंथांत उंचवटे असा स्पष्ट उल्लेख नाहीं. पण ग्रहस्थानें म्हणून हातावर ग्रहांच्या जागा सांगितल्या आहेत. त्यालाच पाश्चात्य लोक उंचवटे म्हणतात. अङ्गुलि म्हणजे बोटांच्या विवेचनांत उंचवट्यांचा अंतर्भाव होतो.

ह्या उंचवट्यासंबंधानें प्रथम हें पहावयाचें कीं, सर्व उंचवटे सारखे आहेत की त्यांच्यामध्यें कमीजास्त ठासरपणा आहे. हा ठासरपणा अर्थातच बोटांच्या परस्पर तुलनेनेंच पाहावयाचा असतो.

कोणताच उंचवटा भक्कम नसेल तर त्या मनुष्याच्या आयुष्यक्रमांत विशेष घडामोड होणार नाहीं.

कोणत्याही बोटांना मुळीं उंचवटेच नसतील किंवा अगदींच क्षुल्लक असतील तर आयुष्यक्रम दुःखमय व अपेशी.

एकाद्याच, किंवा एक दोन बोटांचेच उंचवटे स्पष्ट असतील, तर त्या बोटाचा आकार पाहून फलांचें शुभाशुभ ठरवावें लागतें.

उंचवटे फाजील मोठे असले तरी अशुभ, कमी उंच असले तरी अशुभ.

निमुळत्या बोटावरील उंचवट्याच्या फलामध्यें तात्त्विक विचारांचाच पगडा असतो.

चौरस तळ हाताच्या बोटांच्या उंचवट्यांचें फल व्यावहारिक धोरणाचें असतें, प्रयत्नाकडे विशेष भर असतो.

पट्टाकार बोटांचे उंचवट्याचें फल स्वार्थबुद्धीनें आच्छादित झालेलें असतें. किंवा त्याचा चैनीकडेच कल असतो.

याप्रमाणें उंचवट्यांच्या फलांची दिशा ठरल्यावर जास्त भक्कम उंचवट्यांचें शुभाशुभ फल कमी स्पष्ट अशा उंचवट्यावर आपला अंमल चालवितें.

ज्यांच्या हातांच्या बोटांमध्यें फटी असतात, त्यांच्या हातांचीं बोटें अगदीं किरकोळ कमजोर असतात अशा बोटामध्यें उंचवट्याचें फल विशेष असत नाहीं.

फल शुभ किंवा अशुभ हें ठरवितांना, फल अशुभच कीं काय हें निश्चित करतांना, शुभ चिन्हांचा पूर्ण विचार करण्यास विसरूं नये.

## गुरूचा उंचवटा

तर्जनीचा उंचवटा, ह्याला पाश्चात्य ग्रंथांत गुरुचा उंचवटा म्हणतात त्याचें फलः—

उंचवटा अतिशय गांठाळ उंच नसावा. तसा असेल तर तो मनुष्य अत्यंत घमेंडखोर व उद्दाम असतो.

तर्जनीचें बोट निमूळतें असून उंचवटा फाजील असेल तर देवभोळा, आणि मंत्रचळ्या.

तर्जनीच्या उंचवट्यावर कमलासारखी खूण असेल. तर कीर्ति, आणि उत्कृष्ट स्त्रीचा लाभ. परंतु तीळ असेल तर हानि.

तर्जनीच्या उंचवट्याच्या व आंगठ्याचें मूळ ह्यांच्यामध्यें आणखी उंचवटा असेल तर मनुष्य मोठेपणासाठीं हपापलेला.

केव्हां केव्हां असा मनुष्य आपला बडेजाव वाढण्यासाठीं वाटेल तें करील!

## शुक्राचा उंचवटा

तर्जनीच्या उंचवट्याच्याप्रमाणेंच आंगठ्याच्या तळाखालचा उंचवटा ( ह्याला "अंगुष्ठोन्नाय" म्हणू; हा ) जर खूप वांकडा तिकडा वाढला असेल तर तो मनुष्य अत्यंत स्त्रीलंपट, छिचोर असतो.

उंचवट्यावर फुलीसारखें चिन्ह असेल, तर मनमोकळा बोलका, विनोदी.

तर्जनी आणि अनामिका असे दोन उंचवटे चांगले असतील तर यशप्राप्ति, भाग्यशालित्व, दैवानुकूलता, उत्कर्षानुकूल संधी आपोआप मिळणारा.

तर्जनी आणि मध्यमा असे दोन्हीं उंचवटे स्पष्ट असतील आणि तर्जनीचा उंचवटा मधल्या बोटापेक्षां जास्त मोठा असेल तर वाटेल त्या शास्त्रांत पारंगतता.

तर्जनीचा उंचवटा चांगला मोठा, आणि त्याच्या खालोखाल कनिष्ठिकेचा असेल तर साहित्याची अभिरुचि, तत्त्वज्ञान, वैद्यशास्त्र यांतहि प्राविण्य, परंतु पंजा ओबड-धोबड असेल तर ह्या उंचवट्याचें शुभफल नष्ट होऊन अशुभ फल मिळतें.

साहित्याच्या अभिरुचि ऐवजीं—छाकटेपणा असतो. मंगळाच्या उंचवट्याचें महत्त्व अधिक असल्यास तर्जनीच्या उंचवट्याचें फल कमजोर होतें. वागणुकींत लुच्चेगिरी, दुष्टपणा असतो.

## शनीचा उंचवटा

मधल्या बोटाच्या उंचवट्याला पाश्चात्य लोक **शनीचा** उंचवटा म्हणतात. आपण याला "मध्यमोन्नाय" म्हणूं.

हा उंचवटा बेताचा, व्यवस्थित असेल तर मनुष्य शास्त्रांचा चाहता असतो. तथापि दैववादी असतो. परंतु बोटच ओबडधोबड असेल तर दैववाद खुळेपणाच्या वळणावर जाईल.

उंचवटा व्यवस्थित नसेल, जर खळगा असेल तर स्वभाव एकलकोंडा, लाजाळू, निरुत्साही असा असतो.

उंचवटा व्यवस्थित असेल तर कलेचा भोक्ता, गाण्याचा शोकी, बागाईताकडे लक्ष.

उंचवटा फाजील मोठा असेल तर भेकड, घवराट स्वभावाचा. उपासतापासकडे प्रवृत्ति, जपजाप्य आणि कोणीना कोणीतरी गुरु करणारा असा असतो.

उंचवट्यावर धनरेषा येईल तर भाग्यशालित्व, यशप्राप्ति. कातरी असेल तर अपयश, अशा व्यक्तींस ऐनवेळीं बुद्धि विपरीत सुचते.

परंतु नुसत्या रेषाच असतील तरी लौकिक वाढेल पण थोडा उशीर लागेल.

उंचवट्यावर काळा तीळ असेल तर भाग्यहानि. तांबूस असेल तर द्रव्यलाभ.

मधल्या बोटाच्या उंचवट्याला अनुसरून अनामिकेचा उंचवटा असेल तर मनुष्य अत्यंत दैववादी, सुस्त असेल.

तर्जनीचाहि उंचवटा तसाच स्पष्ट असेल तर फल शुभ असतें. वागणुकींत न्यायाची, सौजन्याची छाप पडते.

परंतु तर्जनीचा उंचवटा कमजोर असेल तर किंवा मधलें बोट ओबडधोबड असेल तर वागणुकींत ऐदीपणा आणि मूर्खपणा दिसतो.

कनिष्ठिकेचा उंचवटा चांगला असेल तर शास्त्रीय विषयांत नैपुण्य आणि यशप्राप्ति.

परंतु पंजाची रचनाच वाईट असेल तर उंचवट्याचा उपयोग न होतां वागणुकींत हलकटपणा, दुष्टपणा व दुसऱ्याचा घात करण्याची वृत्ती यथेच्छ असते.

एवंच हाताच्या घडणीकडे लक्ष देऊन उंचवटे पहावे.

## अनामिकोच्छ्राय (रवीचा उंचवटा).

'हा उंचवटा स्पष्ट असेल तर कलाशास्त्रज्ञ व यशस्वी थोडासा रागीट स्वभाव, मित्रत्वाला मात्र चांगले.

कलाशास्त्रज्ञ म्हणजे नक्षी, चित्रकला वगैरेंचे मर्म-जाणणारे; व त्या विषयीं विवेचन करणारे.

उंचवट्यावर एकच रेषा असली तर भाग्योदय, व कीर्तिलाभ.

दोन रेषा असल्यास बुद्धिमत्ता विशेष पण त्या मानानें यशप्राप्ति कमी.

अनेक रेषा असतील तर कैल फक्त शास्त्रीय चर्चेकडे. उंचवट्यावर रेषाच नसतील तर कलाकौशल्याची आवड.

उंचवट्यावर काळा छिद्रा असेल तर कीर्तिला एखादे वेळीं विघात.

रवीच्या उंचवट्यातील रेषा बुधाच्या उंचवट्याकडे 'जात असेल तर लोकोपयोगी शास्त्रज्ञता, बोलका आपलें म्हणणें दुसऱ्यास पटवणारा.

उंचवट्यावर जाळीप्रमाणे रेषा असतील तर स्वभाव घमेंडखोर-फाजील आढ्यतेचा, कर्तृत्व शून्य.

अनामिकेचे (अथवा रवीचे) उंचवट्यावर वर्तुळ व त्याच्या माथ्यावर चंद्रकोर ( अशी आकृति फार क्वचित आढळते ) तशी असेल तर अतिशय भाग्यशालित्व.

नुसते वर्तुळ सूर्याकृतीप्रमाणे असेल तर लोकोत्तर कर्तृत्वशक्ति.

ऊर्ध्वरेषेप्रमाणें दुसरी पार्श्वरेषा अनामिकेपर्यंत जात असेल तर राजाश्रय.

शुक्रकंकणाला अनामिकेच्या उंचवट्याजवळ खोल असा काट मारला जात असेल तर विषयलंपटते मुळें द्रव्यनाश.

अशीच दुसरी रेषा उंचवट्यापासून निघून **वाकडी होऊन** आंगठ्याच्या फुगवटी-पर्यंत जात असेल आणि उंचवट्यापाशीं काट असेल तर कुटुंबामध्यें अपमृत्यु.

उंचवट्यावर तारकाचिन्ह असेल तर मात्र द्रव्यप्राप्तींत कमी पडणार नाहीं.

करंगळीच्या खालून निघणारी रेषा अगदीं वांकडी होऊन उंचवट्यावर येत असेल तर वडेजावीचा अतिरिक्त व्यास.

## चंद्राचा उंचवटा

ह्या उंचवट्याच्या मनुष्यांत कल्पनाशक्तीचा जोर विशेष असतो: स्वभाव लहरी, एककल्ली, स्वतःच्याच अभिमानांत गर्क असा असतो.

उंचवटा व्यवस्थित असला तर गुणाकडे प्रवृत्ति, नाहीं तर दोष विशेष पुढें येतात.

रवीचा उंचवटा व्यवस्थित नसेल तर चन्द्राचा उंचवटा कमजोर होतो,व स्वभाव दोषाकडे झुलतो.

चन्द्राच्या उंचवट्याचा मनुष्य स्वतःच्या बळावर कांहीं करूं शकत नाहीं. इत-रांचें वाटेल तें झालें तरी त्याचें त्याला कांहीं नाहीं अशी वृत्ति.

चन्द्राच्या उंचवट्याच्या हाताच्या सीमेवर प्रवास रेषा उमटतात, त्यावरून प्रवास, जलपर्यटन पहतात. तेथें फुली असेल तर पर्यटन संकटावह होतें.

प्रवास रेषा बुद्धिरेषेला छेदून जाईल, तर कांहीं झालें तरी तो आपली प्रवासाची हौस पूर्ण करून घेईल.

उंचवट्यांतून रेषा निघून ती जीवित रेषेकडे जात असून तिच्यावर चक्र किंवा फुली असेल तर वेड लागण्याचा किंवा तशी स्थिति असण्याचा योग.

अन्तःकरण रेषेवर छेदून जाणाऱ्या रेषांनीं काट केले असून ते चन्द्राच्या उंच-वट्यावर जात असतील तर स्वभाव फाजील, दुःखी कष्टी.

चन्द्राच्या उंचवट्यावर काकपद असेल तर जलापासून भीति.

अर्धचन्द्राकार खूण असेल आणि उंचवटा ठीक नसेल तर स्त्री संबंधा-पासून भय.

करंगळीच्या बाजूकडे चन्द्राच्या उंचवट्याला लागून आणखी एक उंचवटा स्पष्ट दिसेल तर बुद्धि, युक्ति, हजर-जबाबीपणा हे गुण निदर्शनास येतात.

दोन्ही उंचवटे स्पष्ट असल्यास जलप्रवास, परंतु इतर चिन्हें अशुभ असल्यास अक्कल उलट चालेल.

चन्द्राचा उंचवटा स्पष्ट, बुद्धिरेषा त्यांत घुसलेली परंतु तिला फाटे फुटलेले अशी असेल आणि बोटामध्यें नानाप्रकारच्या सुरकुत्या, फटी असें असेल तर मनुष्य अप्रामाणिक, खोडसाळ, लुच्चा.

चन्द्राच्या उंचवट्याप्रमाणेंच तर्जनी आणि करंगळी ह्यांचे उंचवटे स्पष्ट आणि अशुभ रेषांचा बराच अभाव असला म्हणजे विद्वत्तेचें तेज चमकेल.

## बुधाचा उंचवटा ( करंगळीचा उंचवटा ).

उंचवट्यावर एकच रेषा असेल तर मनुष्य सौजन्ययुक्त आणि नेमस्त. परंतु द्रव्यप्राप्ति मात्र पुष्कळ.

उंचवट्यावर आडवी रेषा असून रवीच्या उंचवट्यामध्यें जात असेल तर विद्वत्तेचें ढोंग, तसेंच गूढविद्येचेंहि ढोंग माजविणारा.

यशोरेषेला छेदणारी रेषा ह्या उंचवट्यांतून जाईल तर महत्त्वाच्या कार्यांत अपेश. उभ्या किंवा आडव्या अशा अनेक रेषा उंचवट्यावर असल्या तरी यशाला अडचण नाहीं. शास्त्रांची आवड भरपूर, मात्र चंद्राच्या उंचवट्यामध्यें ह्या रेषा घुसत असतील तर स्वतःच्या आरोग्याबद्दल उगाच संशय. विवाह निदर्शक रेषा ह्याच उंचवट्याच्या खालच्या बाजूस असतात. त्यांची संख्या व स्पष्टपणा ह्यांवरून विवाहाचा संबंध समजतो.

येथें फुली असली तर विवाहाचा परिणाम अनिष्ट. उंचवट्यावर जाळीदार रेषा असतील तर अत्यंत अशुभ, छिद्र असेल तर धंद्यांत खोट.

उंचवटा चांगला आणि तळहातावर अनामिकेकडे ऊर्ध्वरेषाहि स्पष्ट असली तर सट्टयांत द्रव्यलाभ.

उंचवट्यांतून एक स्पष्टरेषा अर्धचंद्राकार वळण घेणारी अशी निघून चंद्राच्या उंचवट्यांत जात असेल तर मनुष्य अदृष्टज्ञानी होऊं शकतो.

त्याचप्रमाणें करंगळीच्या उंचवट्यांतून रेषा निघून ती आंगठ्याच्या फुगवट्याकडे जात असेल तर स्त्रीच्यासंबंधानें त्रास.

उंचवट्याच्या बाजूला हाताच्या सीमेवर बारीक परंतु अनेक रेषा दिसत असतील तर अनेक स्त्रियांशीं संबंध होण्याचा योग.

करंगळीच्या तळाच्या पेऱ्यांतून उंचवट्याकडे जाणाऱ्या अनेक रेषा असतील तर लफंगेपणा आणि चौर्यकर्म यांचेकडे जबरदस्त कल.

करंगळीच्या पेरावरील रेषांवरूनच दुष्ट स्वभावाचें किंवा गुन्हेगारी प्रवृत्तीचें ज्ञान होतें; परंतु तें अनेक हातांच्या अवलोकनावरूनच ठरवावें लागतें.

उंचवटा चांगला स्पष्ट आणि तळहात चौरस असा मनुष्य चित्रकलाभिज्ञ असतो.

## मंगळाचा उंचवटा

हा उंचवटा चांगला असल्यास मंगळाच्या गुणधर्माची वाढ, भडाई, साहस आणि कोणत्याही प्रसंगानां किंवा संकटांना न डगमगतां सत्याकरितां व तत्वाकरितां निःस्वार्थबुद्धीनें झगडणारा, हालअपेष्टा सहन करणारा, निर्लोभी, स्वाभिमानी व दृढनिश्चयी होतो. अशा व्यक्तीस द्रव्याची फिकीर वाटत नाहीं. वेळेला कर्ज काढूनही सत्कार्य करील, हातांत पैसा टिकणार नाहीं, पण पैशाची ददतही पडत नाहीं. ह्या उंचवटयावरून गुरुवर, रविची रेषा जात असल्यास किंवा त्या त्या ठिकाणावरून मंगळावर रेषा येत असल्यास तो राजैश्वर्याचा व आसेतु हिमाचल कीर्ति करणारा योग आहे.

## हातावरील ग्रहस्थानें किंवा उंचवटे म्हणजे काय ?

पुरुष आणि स्त्रिया यांच्या हस्तसामुद्रिकावरून कोणत्याहि गोष्टीचा निर्णय कसा करावयाचा याची माहिती सांगितली. ही सर्व माहिती यापेक्षां सविस्तर आणि विशद करून सांगूं लागल्यास त्याच्यावर शेंकडो नव्हे तर हजारों पृष्ठांचे ग्रंथ होऊं शकतील. परंतु आम्हांस आमच्या वाचकांना ह्या शास्त्राची दिशा दाखवावयाची व मूलतत्त्वें सांगावयाचीं असल्यानें प्रत्येक गोष्टीबद्दल सूक्ष्म, अतिसूक्ष्म अशा भेदांचें प्रत्यक्ष ज्ञान त्यांस अनुभवानेंच मिळेल. तथापि ज्या दोन तीन गोष्टी, सूक्ष्म अगर स्थूल कोणत्याही पद्धतीनें सामुद्रिक पाहतांना लक्षांत ठेवणें अत्यंत आवश्यक आहेत, त्या गोष्टी येथें नमूद करणें जरूर असल्यानें थोडक्यांत देत आहों.

पहिली गोष्ट ही कीं, हातावरील उंचवटयासंबंधीं विचार करतांना कोणताही उंचवटा उठावदार असल्यास त्याचें फल उत्तम प्रकारें व सुखकारक असें मिळतें. असें वेळोवेळीं सांगितलें; यावरून सर्व उंचवटे उठावदार पाहिजेत ही गोष्ट अगदीं उघड होय. एका ठिकाणीं असेंही सांगितलें आहे कीं तळहात खोलगट असणें ( स्त्रीपुरुषांचा दोघांचाही ) हें कमनशीबी व भाग्यहीनपणाचें लक्षण समजावें व तळहात खोलगट आणि अनेक बारीक बारीक रेषांनीं युक्त असा असेल तर मनुष्यास

आयुष्यांत अतिशय दुःख व संकटें भोगावीं लागतील. येथें असा प्रश्न उत्पन्न होणें साहजिकच आहे कीं, जर सर्व उंचवटे उठावदार असले तर तळहात खोलगट नाहीं असें कसें असूं शकेल ? अर्थात् सर्व उंचवटे उठावदार व स्पष्ट असल्यास तळहात खोलगटच असला पाहिजे व हातांचा मध्यभाग खोलगट असल्यास त्याला त्याचें फलही अशुभफलदायक मिळालें पाहिजे ! या शंकेचें निरसन असें आहे कीं, ज्या वेळीं हातावरील सर्व उंचवटे चांगले असतात व धनरेषा बलवान् असते त्या-वेळीं हाताच्या मध्यभागीं खोलगटपणा असला तरी इतर सर्व योगांच्या शुभफलामुळें त्याचें अशुभफल नष्ट होऊन शुभफलच मिळतें.

दुसरी गोष्ट अशी कीं, हाताचे उंचवटे म्हणून जे समजले जातात, त्यांच्यांतही एक अत्यंत महत्त्वाचा सूक्ष्म विचार व सूक्ष्म दृष्टि आहे. कांहीं ग्रंथकारांच्या मतानें ग्रहांचे उंचवटे म्हणजे ती जागा नुसती फुगीर व उठावदार असणें येवढीच गोष्ट नव्हे, तर उंचवटा म्हणजे त्या त्या जागेवर एक निराळेंच दृश्य व स्पष्टचिन्ह पाहिजे. रवीपासून शनीपर्यंत प्रत्येक ग्रहाच्या उंचवट्याची जी जागा सांगितली आहे तिच्या बरोबर मध्यभागीं वर्तुलाकार रेषांचा उठावदार पुंज किंवा चक्राकार रेषांचें वर्तुल पाहिजे. त्या वर्तुलाच्या रेषा बहिर्मुख नसून अंतर्मुख असल्या पाहिजेत व त्या ठिकाणीं दुसरें कोणतेंही चिन्ह अगर तुटकतुटक रेषा किंवा छेद करणारी मोठी रेषा असतां कामा नये. अशा प्रकारची जी स्थिति त्या स्थितीला उंचवटे असें म्हणावें व अशा तऱ्हेचा उंचवटा असेल तरच त्याचें फल फार महत्त्वाचें व भाग्योदयकारक मिळतें. नुसती त्या ग्रहाची जागा उठावदार असल्यानें सर्वोच्च फल मिळणार नाहीं. यांत येवढेंच ध्यानांत ठेवावयाचें कीं, आतां सांगितलेली उंचवट्याची स्थिती ही उच्चदर्जाची आहे व मागें सांगितलेली स्थिती सामान्यरीतीनें फल पाहण्यास उपयोगी पडते. वर सांगितलेल्या परिस्थितीप्रमाणें उंचवट्याचा योग फार थोड्या लोकांच्या हातावर दिसून येतो व असले लोक फार श्रेष्ठ पदाला गेलेले आढळतात.

तात्पर्य इतकेंच सांगावयाचें कीं, असला श्रेष्ठ योग फार थोड्यांच्या हातावर असतो. तेव्हां सामान्यतः सर्वांच्या हातांवर सामान्य प्रकारानेंच फलें आढळतात. व म्हणूनच ग्रंथकारांनीं ती पद्धत सांगितलेली आहे.

आतां हें केव्हांही अगदीं खरें आहे कीं, सूक्ष्म तऱ्हेनें उंचवटा आहे कीं नाहीं व त्याचें फल शुभ मिळणार किंवा अशुभ मिळणार याचा विचार सूक्ष्म रीतीनेंच केला पाहिजे. परंतु नवीन शिकणारांस तितक्या सूक्ष्म रीतीनें पाहतां येणार नाहीं व

ओळखतांही येणार नाहीं. अनुभवानें वारंवार अनेक लोकांचे हात पाहून या गोष्टी कळूं लागतील. **हस्तरेषांवर किंवा कोणत्याही ग्रहांच्या उंचवट्यावर जीं निरनिराळीं चिन्हें सांगितलीं आहेत. त्यांपैकीं कोणतेंही एक चिन्ह असतां त्या ग्रहासंबंधींचें फल फार तीव्र व उच्च प्रकारचें मिळतें. त्यांतही गुरु, मंगळ आणि चंद्राच्या उंचवट्यावर चक्र, त्रिकोण, चतुःष्कोण किंवा शंख हें चिन्ह असल्यास तो योग फार श्रेष्ठ असें समजावें. कारण अशा योगाचा मनुष्य जन्मतः दरिद्री असला तरीही श्रीमान् होतो. हा धनयोग होय.**

## ग्रहस्थानावरून धनयोग, संपत्ति, सन्मान, धंदा व भाग्योदय.

सांपत्तिक स्थिति व द्रव्ययोग चांगला असला ह्मणजे बाकी बहुतेक सर्व गोष्टींचें सौख्य मिळतें. प्रथम हें लक्षांत ठेवावें कीं, धनरेषेशीं रवि अगर शनि यांच्या उंचवट्यावरील रेषेचा संबंध येत असल्यास तो मनुष्य सरकारी अधिकारी अगर नोकरवर्गांतला आहे. तसेंच त्या दोन्हीं ठिकाणीं महत्त्वाचीं चिन्हें अगर त्रिकोण किंवा धनरेषा, आयुष्यरेषा यांचा त्रिकोण होत असल्यास सांपत्तिक दर्जा मोठा आहे असें समजावें. लॉर्ड किचनेर यांच्या हातांवर धनरेषा व आयुष्यरेषेवर असा त्रिकोण असून आयुष्यरेषा व धनरेषा यांतूनच एक रेषा थेट रवीवर गेली आहे व ती स्पष्ट आहे. ज्यांच्या हातांवर त्रिकोणरेषा, चक्र, शंख, यव, पालखी अगर मत्स्य चिन्ह असतें, तो जन्मतः कितीही दरिद्री असला तरी विद्वान व संपत्तिमान होतो.

**उच्चदर्जाचे राजकीय पुढारी, मोठमोठें अधिकार संपन्न व धनाढ्य लोक, कर्तबगार संस्थानिक आणि ज्यांची वाक्सत्ता, लेखन सत्ता किंवा अधिकार सत्ता हजारो लाखो लोकांवर निर्वेधपणें चालते अशा पुरुषांच्या हातावर सूर्य रेषा फार चांगली असते. अशा व्यक्ती आपल्या कर्तृत्वानें उच्चपदावर आरूढ होतात.**

हातावरील धनरेषा स्पष्ट, बारीकसारीक फाटे न फुटलेली आणि कोणत्या तरी चिन्हानें युक्त अशी असल्यास व त्याचप्रमाणें आयुष्यरेषा व अंतःकरणरेषा दोषरहित असल्यास तो मनुष्य दैववान्, सुखी, संपत्तिमान् व विद्वान् होतो.

**धनायुरेखासंपूर्णः सूक्ष्मरेखाविवर्जितः । गुरुरेखा भवेच्छ्रेष्ठः एतत् भाग्यस्य लक्षणः ॥**

ज्याच्या दोन्ही हातांवर धन, आयुष्य, अंत:करण या तिन्ही रेषा शुभ असतील तो हात भाग्यवान् व ऐश्वर्यसंपन्न असा उत्तम समजावा. दोन रेषा उत्तम असल्यास मध्यम समजावा. एकच रेषा चांगली असल्यास त्याचें भाग्य सामान्य. गुरु, रवि व शुक्र यांवरून वरील रेषांपैकीं कोणत्याही रेषेस दुसरी रेषा मिळत असेल तर त्यास स्थावर इस्टेट, वाहनें, नोकरचाकर यांचें सुख मिळतें. मंगळावरून रेषा आल्यास जमिनीपासून फायदा होतो. बुधावरून आल्यास अनियमित–अचानक द्रव्यलाभ होतो. लाभकालाचा निर्णय आयुष्यरेषेतील कालनिर्णयाप्रमाणें करावा. संकटें व नुकसान यांचा निर्णयही अनिष्ट रेषांवरून करावा.

कोणत्याही हातावर त्रिकोणादि चिन्हें अगर, रवि, गुरु,चंद्र, आयुष्य व भाग्यरेषा उत्तम असतील तर मोठमोठ्या प्रसिद्ध लोकांचा सहवास व मैत्री घडते. आणि तो पुरुष पुढारी होतो. **लोकमान्य टिळकांच्या हातावर सूर्यरेखा फार प्रभावी असून त्यामुळेंच ते अखिल हिंदुस्थानचें देदीप्यमान पुढारी झाले.** श्री. न. चिं. केळकर, महात्मा गांधी बॅ. चित्तरंजनदास, सेनगुप्त, सुभाषचंद्र बोस, महात्मा गांधी, पंडित मदनमोहन मालवीय, पंडित मोतिलाल व जवाहिरलाल नेहरू, लाला लजपतराय इत्यादि प्रसिद्ध पुढाऱ्यांच्या हाताचे छाप जर प्रसिद्ध झाले असते तर त्यावरून पुष्कळ खुलासा झाला असता. असो ग्रहांचे साधारणत: धंदे येणेंप्रमाणें:—

**बुध:**—लेखक, हिशेबी, शिक्षक, बुकसेलर, वर्तमानपत्रकार, व्यापारी, उत्पन्नदार, किरकोळ धंदे व सामान्य नोकऱ्या करणारा, स्टेशनरी, लेखन व प्रकाशन धंद्याशीं संबंध, दुधाचा व्यापार, किराणा व्यापारी.

**गुरु:**—वकील, राजकारणी, प्रधान, सल्लागार, वारकरी, साधु, जज्ज, पुढारी, मुलकी अंमलदार, देवघेवीचा धंदा, सराफी, ठेवी ठेवणारा, द्रव्यसंचयी, दिवाण, नायक, लोकमान्य, देशाचा आधार, सोन्याचा व्यापारी.

**शुक्र:**—कापड व सुगंधी सामानाचे व्यापारी, नाटकी सामानाचे व्यापारी, सोन्याचांदीचा व्यापारी, खजिनदार, खासगी कारभारी, इस्टेटींचे ट्रस्टी, धनरक्षक, विलासोपयोगी वस्तूंचा कारखानदार, चांदी व रत्नें यांचा व्यापार.

**शनि:**—नोकरी, छापखाना, शेतकी, बागाईत, कारस्थानी, गुप्तकार्य करणारा, पोलिस फौजदार व अंमलबजावणी कामगार, मोठ्या कारखान्यांचा चालक, गुप्तपोलिसांचा मुख्य, कारस्थानें करणारा, खुनशी बुद्धी.

**मंगळः**—डॉक्टर, कॉन्ट्रॅक्टर, जमिनदार, सेनापति, खनिज पदार्थांचा व्यापार. उघड हिशेबी; पोलिस अधिकारी, मिलिटरी, गणितज्ञ, अकौंट कामगार,

**रविः**—मोठा अधिकारी, पुढारी, अनेक धंदे करणारा व सत्ताधारी, वैद्य, हजारों लाखों लोकांवर सत्ता व अधिकार चालविणारा, जहागीरदार, जमीनदार, श्रीमान, ऐश्वर्यसंपन्न, संस्थानिक, डायरेक्टर. मोठ्या संस्थांचा चालक, मुख्य

**चंद्रः**—पाण्याशीं संबंध असणारे धंदे, दुकानदार, रेल्वे, पोष्ट वगैरे कामदार, किरकोळ धंदे, भाजीपाला फळफळावळ, रासायनिक वस्तु, औषधें, तेलांच्या गिरण्या, इलेक्ट्रिक, विद्युतसंबंधी धंदे, खनिज पदार्थांचा क्रयविक्रय, किंवा उत्पत्ति, मोठमोठ्या घराण्याशीं मौल्यवान वस्तु पुरविण्याचा मक्ता इ.

याप्रमाणें साधारणतः धंद्याची दिशा समजावी. निरनिराळ्या धंद्यांचे अनेक प्रकार आहेत. ते संवईनें व अनुभवानें लक्षांत येतील. ज्या ग्रहांवरून रेषा आयुष्यरेषेशीं विशेष निकट संबंध दर्शवीत असेल अगर अंतःकरण व धनरेषेला मिळत असेल, तो धंदा व त्यापासून फायदा होतो. २–३ रेषा मिळत असल्यास तितके धंदे होतात. याप्रमाणें विचारपूर्वक धनयोग उपजीविका–धंद्याचा निर्णय करावा.

## हातावरील अनेक चिन्हें

आपल्या जुन्या शास्त्राप्रमाणें, छत्र, ध्वज, पताका, मत्स्य, उलूक, सर्प, काकपद अशीं चिन्हें हातावर असतात असें वर्णन आहे. हल्लीं पाश्चात्यांनीं त्यांना निरनिराळीं नांवें दिलीं आहेत, तथापि त्यांचें मूळ आपल्या इकडीलच आहे.

पाश्चात्यांच्या तारका चिन्हाचें आपल्या इकडील कमल, किंवा चक्र यांच्याशीं साम्य आहे.

**तारका चिन्ह** हें पाश्चात्यशास्त्राप्रमाणें वहुत करून शुभ असतें, परंतु जी गोष्ट पुष्कळ अंशीं अकल्पित व निश्चित घडून येणार आहे त्या घटनेचें निदर्शक तारका हें चिन्ह आहे. अकस्मात संपत्ति मिळण्याचाही हा योग आहे.

तर्जनीच्या उंचवट्यावरील तारका शुभ समजावी यशप्राप्तीचें तें निदर्शक आहे.

तर्जनीच्या उंचवट्यावर तारका-चिन्ह असेल तर स्त्रीचा लाभ, शिवाय कीर्तिलाभ.

मध्यमेच्या उंचवट्यावर तारकादर्श चिन्ह फारसें आढळत नाहीं. फुली आढळते ती तारकेसारखी दिसते. अशी फुली असल्यास भयंकर गुन्ह्याचा आरोप येऊन शिक्षा होण्याचा संभव.

# × फुली

फुली हेंहि चिन्ह शुभ नाहीं. फुलीमुळें कार्यांत घोटाळे, फक्त तर्जनीच्या उंचवट्या मध्यें फुली असेल तर अशुभ नव्हे, मध्यमेच्या उंचवट्यावर फुली असेल तर ढोंग भतुरा माजविण्याकडे प्रवृत्ति–अपघाताची भीति.

अनामिकेच्या उंचवट्यामध्यें फुली असेल तर अपयशामुळें दोषदृष्टि, करंगळीच्य उंचवट्यामध्यें फुली असेल तर चौर्याकडे प्रवृत्ति.

चन्द्राच्या उंचवट्यांवर फुली असल्यास थापबाजी, खोटें बोलणें यांत अग्रेसरत्व

शुक्राच्या उंचवटयावर फुली असल्यास स्त्री संबधानें आपात्ति.

मध्यमेच्या खालच्या पेरावर ही फुली असल्यास प्राणसंकट ओढवण्याचा संभव.

अनामिकेच्या उंचवटयावर तारका असल्यास भरपूर द्रव्यप्राप्ति आणि प्रयत्न केल्यास कीर्तिचाहि लाभ घडेल.

परंतु कनिष्ठेच्याया वर मध्यमेप्रमाणेंच तारका चिन्ह नसतें; फुली असूं शकते.

अशी फुली असल्यास मनुष्य खोडसाळ, फसव्या असतो. मात्र हें इतर रेषांच्या शुभाशुभत्वावरून ठरवावें.

त्याच्याहि खालीं चंद्राच्या विभागांत फुलीचें चिन्ह म्हणजे बारीक कातरी असेल तर स्वभाव घातकी. हेंहि रेषांच्या विशेषतः तिर्यक रेषांच्या शुभाशुभत्वावरून ठरवावें.

आंगठयांच्या खालील फुगवटीवर कातरी असेल तर स्त्रीच्याकडून हानि पोहोचेल.

मध्यमेच्या उंचवट्यावर कर्तरी किंवा × अशा चिन्हानें युक्त आढळल्यास अनर्थापत्ति, कदाचित प्राणसंकटहि ओढवेल.

करंगळीच्या उंचवटयावर फुली असल्यास घातकीपणाची, ढोंगीपणाची वर्तणूक; तारका असल्यास कीर्तिलाभ.

अंतःकरण रेषेच्या जवळच्या उंचवटयावर × हें चिन्ह असेल तर क्रूरपणाचें आचरण केव्हां घडेल त्याचा नेम नाहीं. युद्धाकडे प्रवृत्ति.

चंद्राच्या उंचवटयामध्यें × असेल तर प्राणनाशक अपघात होण्याचा संभव.

शुक्राच्या उंचवटयामध्यें × असेल तर स्त्रियांमुळें संकटें उद्भवतील.

आंगठयांच्या खालच्या पेराच्या जवळ × चिन्ह असेल तर स्वतःच्या स्त्रीपासून त्रास.

चंद्राच्या उंचवट्यामधील रेषेवर × चिन्ह असल्यास जलापघाताचें भय.

खुद्द तळहाताच्या मधोमध अन्य अनिष्ट चिन्हयुक्त × असेल तरी अशुभ.

# शुभाशुभ चिन्हें.

**जीवितादि तलहस्तरेषांमध्यें** काळा छिद्रा असेल तर रोगोत्पत्ति, पांढरा निस्तेज छिद्रा दिसेल तर जडीप कष्टसाध्य आजार.

जीवित रेषांचें स्वरूप बदलतें असें पाश्चात्य म्हणतात, परंतु तसा अनुभव कोणास नाहीं.

अनुरेषा आणि उपरेषा मात्र बदलण्याचा संभव असतो.

केव्हां केव्हां मुख्य रेषांच्या लगत तशीच दुसरी तशाच वळणाची रेषा असते, तिला जोडरेषा म्हणतात. ही रेषा व्यवस्थित असली तर मुख्य रेषेचें फल अशुभ असलें तरी शुभ होतें.

एखाद्याच्या किंबहुना पुष्कळांच्या तळहातांवर खूप वांकड्या तिकड्या तुटक्या रेषा दिसतात. त्यांत कोणाचाच कोणाशीं मेळ नसतो. असें असेल तर मनुष्याच्या वागणुकींतहि कसलाच मेळ नसतो. स्वतःच्या हिताविरुद्धहि कृत्यें तो करतो. एकंदरींत वागणुकींत गोंधळ माजतो.

रेषेच्या टोकाशीं फाटे असले तर त्या रेषेनें निर्दिष्ट असलेल्या फलाला निश्चित स्वरूप लवकर येतें.

टोकाशीं झुपका असेल तर फलप्राप्तीमध्यें अडचणी, स्वभावरेषेला झुपका असेल तर साहसीकृत्यें होतील. जीवित रेषेला ऊर्ध्व शाखा म्हणजे बोटांच्या दिशेकडे जाणाऱ्या असतील तर फलादेशाला जोर. उलट दिशेकडे जातील तर कमजोरी.

**बुद्धिरेषेवर** ऊर्ध्वशाखा असल्या तर युक्तीचा अत्यंत जोर.

**साखळी असेल** तर अडथळे त्रास.

**नागमोडी रेषा** असल्या तर फल तसेंच अशुभ.

काटक्यांचा एक जुडगा असतो त्याप्रमाणें रेषांचा जुडगा असेल तरी अशुभ.

**कातर** अर्थातच अशुभ.

## चक्रचिन्ह

तर्जनीच्या उंचवट्यावर चक्रचिन्ह असल्यास सर्वप्रकारचे उपभोग.

अनामिकेच्या उंचवट्यावर चक्रचिन्ह आढळल्यास धनलाभ, उपभोगांचा लाभ, कीर्तीमुळें बडेजाव.

**हाताच्या मूलभागीं, रवि-गुरूच्या उंचवट्यावर, धनरेषेच्या व आत्मरेषेच्या सुरुवातीस, कपाळावर, छातीवर किंवा पादतलीं चक्रचिन्ह असल्यास सर्वप्रकारें संपत्ति, ऐश्वर्य, संतती, स्त्री व शरीरसौख्य मिळतें.**

## चौकोनचिन्ह

हें चिन्ह शुभचिन्हांपैकीं आहे. अशुभ चिन्हाचा जोर ह्या चिन्हामुळें मोडतो. रेषा तुटकी असली आणि तेथेंच चतुष्कोण असेल तर अशुभाचें निराकरण. आरोग्याचें संरक्षण आणि संकटांतून बचाव.

चौकोन—शुक्राच्या उंचवट्याखेरीज कोठेंही फार उत्कृष्ट फल देतो. शुक्राच्या उंचवट्यावर असल्यास कारागृहवास घडवितो.

## वर्तुलचिन्ह

अनामिकेच्या उंचवट्यावर वर्तुलचिन्ह असेल तर भाग्योदयाची जोरदार वृद्धि. रेषेमध्यें पोकळी उत्पन्न होते तिला पल्वल म्हणतात हे पल्वल चिन्ह अशुभ आहे. पल्वल चिन्ह ज्या रेषेमध्यें असेल त्या रेषेच्या शुभ फलासंबंधांत अडथळे. व्याधिग्रस्तता, मस्तकरोग, परंपरागत रोग यांची उत्पत्ति ह्यांना आळा बसला तर तो जीवित रेषेच्या जोरावर बसेल.

अन्तःकरण रेषेवर पल्वल असल्यास आजार, परस्त्रीशीं संबंध.

बुद्धिरेषेवर आढळल्यास दुष्टपणा, कपटाचरण. आरोग्य रेषेवर आढळल्यास लफंगेबाजपणाचा स्वभाव किंवा जठरव्याधि.

वर्तुल—सर्व उंचवट्यावर गुण वाढविणारें किंवा वाईट गुणांचा नाश करणारें आहे. रवीच्या उंचवट्यावर फार उत्तम. तळहातावरील रेषावर हें चिन्ह असल्यास अनिष्ट. 'आयुष्यरेषेवर किंवा चंद्रावर वर्तुलाकार चिन्ह असल्यास आंधळा होईल. ज्या ठिकाणी वर्तुल असेल त्या वर्षी नेत्रपीडा जाणावी.

## ध्वज चिन्ह ( लहान त्रिकोण )

हें ध्वजचिन्ह शुभ आहे परंतु फार कमी आढळतें. कोणत्याही उंचवट्यावर हें आढळेल तर त्या फलाचा उत्कर्ष करील.

तारका आणि ध्वज यांना आपल्या शास्त्रांत " ध्वजसरोरुह " असें म्हटलें आहे. भाग्यवानांच्याच हातावर हीं चिन्हें आढळतील.

मत्स्यचिन्ह म्हणजे पाश्चात्यांचा तळहातावरील शुभ त्रिकोण.

त्रिकोणांमध्यें शुभ आणि अशुभ असे दोन प्रकारचे त्रिकोण आहेत.

तसेंच प्रकार मत्स्यामध्येंहि आहेत. अशुभ मत्स्य हा मकर.

पाश्चात्य शास्त्रांत यवचिन्हांचा विचार आढळत नाहीं.

त्रिकोण—हा कोणत्याही उंचवटयावर शुभच आहे. त्या ग्रहाच्या कारक व गुणधर्माच्या ज्या ज्या गोष्टीं त्या त्या सर्व सौख्यकारक होतात. फक्त चंद्राच्या उंचवटयावर असल्यास पाण्यापासून क्वचित् भिती.

## जालक

जाळीसारखी आकृति किंवा चिन्ह हेंहि अशुभ आहे. तर्जनीच्या उंचवट्यावर जाळीचें चिन्ह असेल तर देवभोळा स्वभाव.

मधल्या बोटाच्या उंचवट्यावर असेल तर संकटकाल, अनामिकेवर आढळेल तर गर्विष्ठपणा, पोंचटपणा, करंगळीवर आढळेल तर डांबीसपणा-चौर्यवृत्ति, भौमाच्या उंचवट्यावर असेल तर अपघाताचें भय, चंद्राच्या उंचवट्यावर दिसत असेल तर औदासिन्य, शुक्राच्या उंचवट्यावर दिसेल तर स्त्रियांविषयीं लंपटपणा.

आजार, अपघात ह्यांची सूचना कशी समजेल असा प्रश्न येतो. त्याचा निर्णय—

जीवितरेषा, अंतःकरणरेषा ( हिला आयुष्यरेषा म्हणतात ), आणि मध्यमार्ग्वा ह्यांच्या सहाय्यानें आयुर्दायाची अटकळ बांधतां येते. ह्या रेषांमध्यें जे अनेक प्रत्यवाय, कातर, किंवा ज्या त्रुटि असतात त्यांतील दोन्ही हातांवरील त्रुटि जमल्यास त्या वयाचे सुमारास आजार व अपघाताचें भय असतें.

अपघातदर्शक त्रुटि, आणि अपघातदर्शक चिन्ह किंवा अनेक चिन्हें ह्यांचा परस्पराशीं मेळ पाहून आणि शुभ चिन्हांचा जोर अगदीच कमी असेल तर त्या वयाचे सुमारास अपघात किंवा आजार यांचा उद्भव होण्याचा योग येईल असें समजावें.

ज्या गोष्टीं घडून गेल्या असतात आणि त्या घडून गेल्यालाहि अनेक वर्षे लोटून गेलीं असतात त्या संबंधाच्या त्रुटि किंवा चिन्हें पुसट झालेलीं असतात किंवा होत

जातात हें लक्षांत ठेवून हात पहावा. ६०।६५ वर्षांच्या वयाच्या पुढें हात पहाण्यांत अर्थ नाहीं. कारण सर्वच रेषा शिथिल झालेल्या असतात.

## हातावरील इतर चिन्हें

+ असे ( अधिक ) चिन्ह गुरूवर असतां एकापेक्षां अधिक लग्नें होतात.

**तीळ**—अंतःकरणरेषेवर तांबडा तीळ असल्यास छातींत रोग किंवा चिंताग्रस्त असतो. बुधाच्या उंचवटयाखालीं तीळ असल्यास शोधक होतो. इतर ठिकाणीं तिळाचें महत्त्व विशेष नाहीं. **कोणत्याही रेषेवर काळा तीळ असल्यास त्या रेषेच्या फलाचा नाश व क्लेश.**

**सांखळी**—कोणत्याही उंचवटयावर सांखळीसारख्या रेषा किंवा कोणत्याही रेषा सांखळीच्या आकाराची असेल तर त्या रेषेच्या अगर उंचवटयावर मिळणाऱ्या फलांचे वेळीं त्रास, दगदग व अडथळे फार येतात.

**तुटक रेषा**—ज्या ठिकाणीं असतात त्या ठिकाणचा नाश करितात.

**सूक्ष्मरेषा**—मुख्य रेषेचा गुण वाढवितात. पण त्या उर्ध्वगामी पाहिजेत.

विणलेल्या रेषा ज्या ठिकाणीं असतात त्या ठिंकाणचा त्या नाश करितात असें मागें सांगितलें. परंतु कांहीं ठिकाणीं क्वचित त्या शुभ फलही देतात. ह्या रेषा गुरूवर असल्यास अति धार्मिक व स्वाभिमानी होतो. शनीवर असल्यास दुर्दैवी, संकटांनीं जर्जर झालेला, मंगळावर असल्यास अपघातानें भयंकर मृत्यु येतो.

शुक्राच्या उंचवटयावरून बुधाच्या उंचवटयाकडे सरळ अशी एकच रेषा जाईल तर त्यापासून धन, वाहन, घर, स्त्री, संतति, बुद्धि, प्रेम, इत्यादि सौख्य चांगलें मिळेल.

## हस्त रेषाप्रकरण

हातावरील रेषा पाहतांना ज्याप्रमाणें आपल्या प्राचीन ग्रंथांत पुरुषांचा उजवा व स्त्रियांचा डावा हात पहावा असें सांगितलें आहे, त्याप्रमाणें इंग्लिश ग्रंथांत सांगितलेलें नाहीं. ज्या हातावर स्पष्ट व ठळक रेषा उमटलेल्या असतील तोच हात विशेषतः पहावा; मग तो उजवा अगर डावा कोणताही असो. मात्र एकाच हातावरून खात्रीलायक फल केव्हांही सांगूं नये. जास्त रेषा उमटलेले हात मुख्यतः पाहून त्याचे मदतीकरितां दुसराही पहावा व त्या दोन्ही हातांत सारखें चिन्ह असल्यास होणाऱ्या फलाबद्दल पूर्ण खात्री जाणावी.

एकाच हातावर रेषा अगर चिन्ह असल्यास पूर्ण फल मिळणें कठीण आहे.

तथापि ज्याच्या त्याच्या सारासारविचारानें इतर सर्व चिन्हें वगैरे पाहून फल सांगावें, म्हणजे सहसा चूक होणार नाहीं.

हात पहाणें तो श्रम केल्यानंतर तसेंच भोजन केल्यानंतरही पाहूं नये, असें ग्रंथकार लिहितात.

सामुद्रिकशास्त्रामध्यें रेषाप्रकरण हेंच फार महत्त्वाचें व उपयुक्त आहे, तेव्हां त्याचा फार सूक्ष्म व काळजीपूर्वक विचार करावा म्हणजे शास्त्राकडे दोष येणार नाहीं.

## हातावरील मुख्यरेषा

( १ ) तर्जनी म्हणजे आंगठ्याचे शेजारचे बोटापासून निघून करांगुलीचे खालपर्यंत येणारी रेषा ती **अंतःकरणरेषा** होय.

( २ ) आंगठा व तर्जनी यांचे मधून अंतःकरणरेषेजवळून निघून मंगळ अगर चंद्राचे उंचवटयाकडे जाणारी जी रेषा ती **मस्तकरेषा.**

( ३ ) आंगठा व तर्जनी यांचेमधून निघून शुक्राचे उंचवटयास वळसा घालून जी हस्तमूलाचे मध्यभागीं मिळते अगर आंगठ्याचे बाजूस किंचित् तिरपी जाते ती **आयुष्यरेषा.**

( ४ ) मनगटाचे मध्यभागापासून निघून थेट समोर शनीचे उंचवटयावर जाणारी जी रेषा ती **उद्योग, धन, उपजीविका, दैव** अगर **नशिबाची** रेषा होय.

( ५ ) नशिबाच्या रेषेच्या डाव्या बाजूनें जरा पुढून निघून थेट रवीकडे जाणारी राजयोगरेषा, **आत्मरेषा किंवा सूर्यरेषा होय.**

( ६ ) आयुष्यरेषेजवळून मनगटाचे सन्निध प्रारंभ होऊन धनरेषा व सूर्यरेषा या दोन्ही रेषांवरून बुधाकडे जाणारी आरोग्यरेषा.

राजयोगरेषा व आरोग्यरेषा या दोन्ही रेषा पुष्कळ वेळां उमटलेल्या दिसत नाहींत, किंवा मुख्यस्थानांतून न निघतां मागेंपुढें कोठून तरी निघतात.

(७) गुरु अगर शनि यांचे उंचवटयावरून निघून कमानीसारखी होऊन रवि किंवा बुध या ग्रहांचे उंचवटयांकडे जाणारी जी रेषा ती मदनधनुष्यरेषा. या रेषेस कांहीं ठिकाणीं शुक्राचे कंकण असेंही म्हणतात.

**प्रत्येक ग्रहस्थानावरील धनुष्याकार रेषेस त्या ग्रहाचें कंकण म्हणतात.**

**ग्रहरेषांची गति त्या त्या स्थानापासून समोर ऊर्ध्वगति, दक्षिणावर्त व वामावर्त गति अशी असते.**

सर्वसामान्यत: प्रत्येक व्यक्तीच्या उजव्या किंवा डाव्या हातावर दिसणाऱ्या म्हणजे नेहमीं दिसणाऱ्या रेषा आतापर्यंत सांगितल्या, परंतु ज्या रेषा कायमच्या हातावर राहात नाहींत, सतत दिसत नाहींत, पण फार महत्त्वाच्या असतात अशाही रेषा आहेत. ह्या रेषा फक्त शुभ अगर अशुभ गोष्टी घडण्याचे कालापूर्वी २।३ वर्षे हातावर हळूहळू दृग्गोचर होऊं लागतात, आणि त्या गोष्टी घडून गेल्यानंतर कांहीं कालानें नाहींशा होतात त्या रेषा खालीलप्रमाणें:—

( ८ ) मंगळाच्या उंचवटयावरून निघून दुसऱ्या कोणत्याही रेषेस मिळणारी जी रेषा ती भौमरेषा होय.

( ९ ) शुक्राच्या उंचवटयावरून निघून कोणत्याही रेषेस छेदून कोणत्याही ग्रहाच्या उंचवटयावर जाणारी रेषा ती शुक्ररेषा.

( १० ) गुरूच्या उंचवटयावरून निघून सरळ चंद्राकडे जाणारी अगर कोणत्याही उंचवटयाकडे जाणारी किंवा दुसऱ्या कोणत्याही रेषेंत मिळणारी रेषा ती गुरुरेषा.

(११।१२) चंद्र आणि बुध यांच्या उंचवटयावरून निघणारी व कोणत्याही रेषेंत किंवा उंचवटयाकडे जाणारी रेषा ती चंद्ररेषा व बुधरेषा होय.

( १३ ) रवीवरून कोणत्याही रेषेस मिळणारी रेषा ती रविरेषा.

( १४ ) शनीच्या उंचवटयावरून धनरेषा छेदून किंवा स्वतंत्रपणें कोणत्याही उंचवटयावर जाणारी ती शनिरेषा होय.

( १५ ) चंद्र आणि रवि यांच्या उंचवटयाच्या मस्वातीपलीकडील मागील जागेंतून निघणारी रेषा ती राहुरेषा.

( १६ ) कोणत्याही ग्रहस्थानास कवटाळणारी अर्धवर्तुलाकार जी रेषा किंवा रेषा युग्म, त्या रेषेस त्या ग्रहाची कंकण रेषा असे म्हणतात. कोणत्याही ग्रहस्थानावर फक्त एकच विवेध व स्पष्ट रेषा असल्यास त्या रेषेस उदयरेषा म्हणतात.

**प्रत्येक ग्रहाच्या उंचवट्यावरून निघणारी जी रेषा ती त्या ग्रहाची ऊर्ध्वगामी रेषा होय. आणि त्या ग्रहावरील छेदकारक अध:प्रांतिय जी रेषा ती अधोगामी रेषा होय. विकास आणि संकोच ह्या तत्त्वप्रणालीप्रमाणें ऊर्ध्वगामी अर्थात् विकासिनी रेषा ह्या फलविकास घडवून आणतात आणि संकोचिनी रेषा कांहीं प्रमाणांत तरी फलसंकोच करतात ही वस्तुस्थिति लक्षांत ठेवणें युक्त आहे.**

ह्याप्रमाणें निरनिराळ्या ग्रहांच्या स्वतंत्र रेषा आहेत व त्यांची फलेंही स्वतंत्र स्वरूपाचींच असतात. ह्या रेषांपैकीं कांहीं रेषा कांहीं लोकांच्या हातांवर जन्मानंतर बऱ्याच कालानें येतात. राहुरेषा ही ओळखण्यास फार प्रयास पडतात, कारण ती फार सूक्ष्म व दुसऱ्या रेषांच्या सन्निध व त्यांत मिसळलेली असते. कांहीं कांहीं वेळां ही रेषा मंगळ गुरूच्या उंचवटयाखालून दृग्गोचर झालेली आढळते. ह्या रेषांचें फल आणि त्यांचे परिणाम धनरेषेशीं ज्या तऱ्हेचा त्या रेषेचा संबंध असेल त्याप्रमाणें मिळतें. शुभग्रहांच्या रेषांचें फल शुभ आणि पापग्रहांच्या रेषांचें फल अनिष्ट मिळतें. असें पाहण्यांत आलें आहे कीं, चंद्र आणि गुरूच्या रेषा एकमेकांच्या उंचवट्यावर जात असून त्या मनुष्याच्या जन्मकुंडलींत कर्कलग्न व भाग्यस्थानीं गुरु-चंद्र होते. त्या मनुष्यास अकस्मात् मोठ्या अधिकाराचा, वैभवाचा व संपत्तीचा योग आला. अशा तऱ्हेनें हस्तरेषा आणि जन्मकुंडलींतील योग यांचें साहचर्य किंवा एकवाक्यता कित्येकवेळां फार स्पष्टपणें आढळून येते. म्हणून कुंडली व हस्तरेषा यांचा मेळ पाहणें केव्हांही श्रेयस्कर आहे.

## आयुष्ययोग, आरोग्य व आजार.

ही गोष्ट सामुद्रिकांत काय किंवा ज्योतिषांत काय फार महत्त्वाची आहे. कारण शास्त्रकार प्रथमच सांगतात कीं,—

**प्रथमायुः परीक्षेत पश्चाल्लक्षणमेव च ।**
**आयुर्हीननराणां तु लक्षणैः किं प्रयोजनम् ॥**

आयुष्याचा विचार करतांना आयुष्यरेषा, अंतःकरणरेषा, रविचंद्राचे उंचवटे, त्या रेषांवरील चिन्हें व सूक्ष्म रेषा यांचा विचार करावा लागतो. आयुष्यरेषा आणि अंतःकरणरेषा यांवर जर छेदकारक रेषा असतील तर त्यावेळीं आजार उत्पन्न होईल असें समजावें. या दोन्ही रेषांवर आणि दोन्ही हातांवर मारक व छेदकारक रेषा स्पष्ट असेल तर त्या वेळीं मोठें दुखणें येईल असें समजावें. आयुष्यरेषेचा आरंभ व अंतःकरण रेषेचा आरंभ या दोहोंना सांधणारी एक रेषा काढावी व त्याचप्रमाणें पुढेंही थोडथोड्या अंतरावर दोन्ही रेषांना जोडणाऱ्या रेषा काढाव्या आणि ज्या वेळीं छेदक रेषा असतील त्या वेळीं शरीरकष्ट सांगावें, अगर त्याच वेळीं घरांतील वडील माणसांस धोका व परिस्थितींत एकदम फरक सांगावा. कोणत्याही रेषेला खालच्या बाजूस सूक्ष्म रेषा असल्यास त्या फलनाशक,

क्लेशदायक व अनिष्ट असतात; आणि अशाच रेषा वरच्या बाजूस ऊर्ध्वगामिनी असल्यास त्या भरभराट, उत्कर्ष व वैभव दर्शवितात. आयुष्यरेषा आणि अंतःकरणरेषा यांच्यावरील छेदकारक अशुभ रेषांचा फलदायक काल कोणता हें काढावयाचें असतां प्रथम आयुष्याचा निश्चय झाला पाहिजे. तो येणेंप्रमाणें करावा.

सबंध रेषेला १०० वर्षांचा काल भरलेला आहे. तेव्हां छेदकारक रेषेपर्यंत कोणता काल येतो हें काढून ज्या वेळीं आयुष्यरेषा व अंतःकरणरेषा अशा दोन्ही रेषांवरील तीक्ष्ण छेदकारक रेषेचा काल एकदम येईल तो काल आयुष्याचा समजावा. येणारें आयुष्य सबंध रेषेला भरावें व त्यावरून ५।५ वर्षांचे रेषेचे भाग करून त्याप्रमाणें कष्टदायक कालाचें वर्ष काढावें.

कांहीं सामुद्रिकांची पद्धत अशी आहे कीं, आयुष्यरेषेवरच ज्या ठिकाणीं मोठी मारक रेषा असेल तेथपर्यंत आयुष्य समजावें; अन्यमतें आयुष्यरेषा आणि अंतःकरणरेषा या दोन स्वतंत्र रेषांवरून आयुष्य काढावें; व ज्या वेळीं दोन्ही हातांवर मारक रेषा पूर्ण असून त्या ज्या वर्षांच्या असतील तेथपर्यंत आयुष्ययोग मानावा. आमच्या मतानें दोन्ही हातांवरील आयुष्यरेषा व अंतःकरणरेषा यांवरून आयुर्दाय पहावा. एकाच हातावर रेषा असल्यास मोठाले आजार, कल्पनांतीत क्लेश व शारीरिक कष्ट होतील, पण मृत्यु येणार नाहीं. हातांवर मारक रेषा जबरदस्त असल्यास व त्याच वर्षाचे वेळीं अंतःकरणरेषा भंग पावत असल्यास किंवा त्या रेषेवर अधोगामिनी मोठाल्या रेषा असल्यास मृत्युयोग संभवतो. कारण

**अत्र आयुष्यरेखायां यावंतश्छेदाः तावंतो अपमृत्यवः । उपरिच्छेदे रोगः अधश्छेदे शस्त्रभीतिः । आयुरेखायाश्च दश वा विंशति भागाः कल्पनीयाः । तत्र यस्मिन् रेखाभागे रेखाच्छेदस्तदार्धुर्देशभागे दृष्टं फलं कल्पनीयम् ।**

**रेखागत्यनुसारेण वातपित्त कफात्मिका । भौमार्के स्थानमाश्रित्य पित्तरोगं विशेषतः ।। बुध मंदश्च वातश्च भृगुर्जीवः कफात्मकः ।। शीत रोगकरश्चंद्रः क्षयवृद्धिप्रदः सदा ।। खंडयोगे महत्पीडा तंतु रेषाच दुख.दा ॥**

असें सामुद्रिकसिद्धांत ग्रंथांत म्हटलें आहे. सारांश, आयुष्यनिर्णय हा आयुष्यरेषेवरील मोठाल्या मारक रेषांवरून दोन्ही हात पाहून करावा व कालनिर्णयही वर सांगितल्याप्रमाणेंच करावा. **मात्र अनेक हात पाहून हस्तरेषांवर पूर्ण दृष्टि बसल्याखेरीज कोणाचाहि आयुष्यनिर्णय करूं नये.**

हातांवरील ज्या उंचवटयावर विशेष रेषा किंवा अनिष्ट चिन्हें असतात, त्या ग्रहांचा विकार नेहमीं होतो. तसेंच अंतःकरण व आयुष्यरेषा यांना ज्या उंचवटयावरून स्पष्ट अशा रेषा येऊन मिळत असतील अगर आयुष्यरेषेवरून ज्या उंचवटयाकडे रेषा जात असतील त्या ग्रहाचा विकार व आजार उत्पन्न होतो. **रविमंगळाचे** विकार म्हणजे पित्त-विकार, रक्तदोष, मस्तकास व नेत्रांस त्रास, ज्वर, उष्णता आणि अशक्तपणा. **चंद्र व शुक्र** यांचे विकार म्हणजे गुप्तदोष, कफपीडा, थंडीपासून होणारे विकार, शुक्रविकारांची वाढ व त्यापासून उत्पन्न होणारे आजार. **शनि व गुरु** यांचे आजार म्हणजे वातवृद्धि व वातापासून उत्पन्न होणारे विकार, अपचन, निद्रानाश वगैरे. **बुधाचे** विकार म्हणजे त्रिदोष, याप्रमाणे आहेत. यावरून हस्तरेषाचे आधारे कोणत्या कालांत कोणत्या विकारापासून त्रास होईल व सामान्यतः प्रकृति कशा प्रकारची असेल हें काढतां येईल. या गोष्टी कमींत कमी ४००।५०० व्यक्तींच्या हस्तरेषा पाहिल्याशिवाय व त्यांची टांचणें करून ठेवल्याशिवाय पूर्णपणें लक्षांत येणार नाहीं. म्हणून हस्तरेषांचें अवलोकन सतत चालू ठेवावें.

## आयुष्यरेषेचीं फलें.

(I) सामुद्रिकशास्त्रांत आयुष्यरेषेइतकें महत्त्व दुसऱ्या कोणत्याही रेषेस नाहीं. कारण मनुष्य जर जिवंत असेल तर धनरेषा, राजयोगरेषा वगैरे रेषांचीं फलें त्यास मिळणार परंतु आयुष्यरेषाच जर बिघडलेली व वाईट असेल तर या रेषांचें महत्त्वच नाहीं, म्हणून या रेषेसंबंधीं विचार सूक्ष्म रीतीनें करावा. म्हणजे सहसा चूक होणार नाहीं.

शास्त्रकारांनीं आयुष्यरेषेचे दहा भाग केले आहेत. प्रत्येक भाग १० वर्षांचा येणेंप्रमाणें एकंदर आयुष्य १०० वर्षें धरलें आहे.

आयुष्याचा निर्णय ठरविण्याचें काम अतिशय जिकिरीचें कष्टसाध्य व अनुभवसाध्य असें आहे. प्राचीनकाळीं ज्यावेळीं सामुद्रिक शास्त्रावरील ग्रंथ लिहिले गेले, त्या काळीं मनुष्याचें सरासरीचें आयुष्यमान १०० ते १२५ वर्षें असलें पाहिजे आणि होते ही गोष्ट "**शतायुर्वै पुरुषः**" किंवा "**शतायुषी भव**" अशीं जीं वचनें व आशीर्वचनें आहेत त्यावरून सिद्ध होते. अर्थात् त्यावेळच्या आयुर्मानानुसार हातांवरील आयुष्यरेषेचे १०—१० वर्षांचे भाग केले ते ठीक होते पण सांप्रत मनुष्याचें सरासरीचें आयुष्यमान व प्रमाण सुमारें ६५ ते ७० वर्षांचें आहे. तेव्हां

सध्यांच्या आयुष्यमानाच्या प्रमाणानुसार हातावरील आयुष्यरेषेचे विभाग केले पाहिजेत. सबंध आयुष्यरेषेला जर ७० वर्षे आणि त्याचे दहा भाग करावयाचे तर एकेक भाग ७ वर्षांचा येणार ही गोष्ट पक्की लक्षांत ठेवावी आणि त्यावरून फलें पहावीं.

यासाठीं प्रथमतः हस्तरेषांवरून आयुष्याचा योग, दीर्घायु, मध्यमायु किंवा अल्पायु यापैकीं कोणता येतो तें बारकाईनें ठरवावें.

अल्पायु म्हणजे ३० वर्षांपर्यंत जगणारा, मध्यमायु म्हणजे ३० ते ६० वर्षांपर्यंत जगणारा, आणि दीर्घायु म्हणजे ६० च्या पुढें कितीही वर्षे जगणारा असे विभाग पाडावे. ह्या प्रत्येक विभागांत ५–५ वर्षांचा उपविभाग करून नंतर आयुष्ययोग निश्चित करावा.

आयुष्यरेषा लांब व स्पष्ट, उठावदार, जाड आकाराची, किंचित तांबूस वर्ण अशी असून आंगठयाचे मुळापर्यंत सारखी येईल तर तो पूर्णायुषी, सशक्त, निरोगी असतो. तीच रेषा जर बारीक, निस्तेज, क्षीण अशी असेल तो मनुष्य साधारणतः अशक्त, रोगी व मंद असा असतो.

तीच रेषा आंखूड असेल तर ती वर सांगितल्याप्रमाणें ६५–७० वर्षांचा भाग करून तो जेथपर्यंत येईल तितकें आयुष्य जाणावें.

आयुष्यरेषा एकाच हातावर तुटलेली व दुसऱ्या हातावर चांगली असेल तर तुटलेली रेषा ज्या वयाचे सुमारास असेल त्या वेळीं मृत्युसम पीडा देणारें प्राणांतिक दुखणें येईल, परंतु त्यांतून बचाव होईल. दोन्ही हातांवर ही रेषा स्पष्ट नसून, अंधुक व सांखळीसारखी असेल तर फार अशक्त, नेहमीं रोगी किंवा कायम एखादा रोग असेल.

क्वचित कांहीं मनुष्यांच्या हातावर ही रेषा गुरूचे उंचवट्यावरून निघते. तशा तऱ्हेची रेषा असेल तर त्या मनुष्याचा लौकिक फार होतो.यश, कीर्ति व मानमान्यता वाढते व तो पुण्यवान् असतो.

या रेषेचे मनगटाजवळ दोन भाग होतात. ( असें क्वचित होतें. ) अशा तऱ्हेचे दोन तीन भाग झाल्यास त्या सुमारास एकंदर स्थितींत पालट होतो. याच रेषेपैकीं एकादी रेषा चंद्राकडे जाईल तर तो भ्रमिष्ट होतो.

हीच रेषा कधीं कधीं जुळ्यासारखी जवळ जवळ असते. म्हणज सारख्या दोन

रेषा असतात. तशा असल्यास पूर्ण आयुष्य, शरीरसौख्य चांगलें; शक्तिमान्, आडदांड, अगर शौर्याच्या कामांत यश येतें.

या रेघेवर फुली, तीळ अगर ठिपका यांपैकीं कांहीं असल्यास शरिरास कष्ट देतात.

आयुष्यरेषेंतून शनीच्या उंचवटयावर एखादी रेषा जाईल तर चतुष्पाद वाहनापासून अपघात. ही रेषा मनगटापर्यंत गेल्यास पूर्ण आयुष्य. फार बारीक अगर फार लठ्ठ, फांटे फुटलेली असल्यास नेहमीं रोगी व अशक्त असेल.

या रेषेस एखादा फांटा येऊन मिळाल्यास ज्या उंचवटयावरून फांटा येईल त्यापासून पीडा व भय जाणावें. दुहेरी रेषा सुख व वैभव देणारी आहे. या रेषेवर एखादें वर्तुळ अगर ठिपका असल्यास क्षयरोग वगैरे हृद्रोग होतील

**आयुष्यरेषेस छिन्नविच्छिन्न करणारी रेषा ज्या ग्रहाच्या उंचवट्यावरून येऊन आयुष्य व अंतःकरण रेषेचा भंग करीत असेल, त्या ग्रहाचे जे रोग ते त्या मनुष्यास होतात.** रोग हजारों प्रकारचे आणि त्याच्या तऱ्हा इतक्या विविध आहेत कीं, हाताच्या रेषांचे अनेक दिवस परिशीलन केल्याखेरीज रोगाचा निर्णय निश्चितपणें करतां येणार नाहीं. परंतु येवढें मात्र केव्हांही सांगतां येईल कीं, **रविमंगळामुळें** उष्ण विकार, ज्वर, रक्तदोष, अपस्मार, मूळव्याध, रक्तनाश करणाऱ्या गोष्टी, मुदतीचे ताप, **शनिचंद्रामुळें** वात आणि अंगांत मुरलेले विकार, क्षय, आणि सर्व प्रकारचे शीत विकार. गुरु, बुध, शुक्रामुळें कफकारक आणि शुक्रकारक विकार, नेत्ररोग, हृदयाचे विकार व पोटांतील विकार जाणावे.

## आयुष्य किंवा जीवितरेषा

( II ) **मुख्यरेषांपैकीं** पहिली रेषाः–हिला आयुष्य, स्वत्व किंवा **जीवित रेषा**–म्हणतात. हिच्यावरून आयुष्याचा विचार होतो म्हणून हिला आयुष्यरेषा असें नांव आहे. हीच पाश्चात्यांची Line of Life.

**दुसरी मुख्यरेषा**–तर्जनीच्या उंचवटयाचे खालचे भागांतून तर्जनीकडील सीमेपासून निघते. हिच्यावरून बुद्धि, अक्कल, युक्ति यांचा विचार होतो. ही तळहाताच्या मधून आडवी जाते म्हणून हिला " **तिर्यक् रेखा** " किंवा " **अग्रिमा** " म्हणतात.

**तिसरी मुख्यरेषा** करंगळीकडील सीमेच्या उंचवटयाला लागून निघते आणि मध्यमा, तर्जनी यांच्या रोखानें जाते किंवा बुद्धिरेषेकडेहि झुकते. ही **अंतःकरण रेषा**, कोणी हिला " **आयुष्यरेषाहि** " म्हणतात.

**जीवितरेषा**—ही एकसारखी स्पष्ट, खोल, लाल असावी. तिला मध्यें तुटकपणा नसावा किंवा विषमता नसावी.

ही रेषा अपूर्ण असेल तर आयुष्य कमी. मध्येंमध्यें तुटक असेल तर जबर आजार, तुटकपणा जास्त असेल आणि दोन्ही हातांवर असेल तर दुखणें अतिशय जोरदार, जीवितरेषेच्या मध्येंच चौकोन असेल तर आजारांतून बचावण्याचा संभव. तुटकी रेषा सांधली जात असल्यास शुभ.

जीवितरेषेला दुसरी जोडरेषा असली आणि ती जर व्यवस्थित असली तर शुभ-दर्शक, तिच्यामुळें जीवितरेषेंतील दोषबाधा कमी.

जीवितरेषेच्या टोंकाशीं मनगटाचे बाजूकडे झुबका असेल तर द्रव्यहानी, किंवा आरोग्यहानी, तर्जनीचे बाजूकडे असेल तर कल्पनेचें साम्राज्य विशेष.

तर्जनीचे बाजूकडे फक्त फाटा असेल तर उंचवट्याच्या शुभाशुभत्वाप्रमाणें फल मिळेल.

जीवितरेषेला कापून जाणाऱ्या अनेक रेषा असल्या तर संकटें, भानगडी ह्यांच्या-पासून त्रास.

ज्या ज्या रेषांना काट बसेल त्यांच्या फलासंबंधामध्यें अडचणी उत्पन्न होतील.

उदाहरणार्थः बुद्धिरेषेला काट बसत असेल तर पुष्कळ वेळां कामामध्यें गोंधळ, कोणतीही युक्ति सुचत नाही.

अन्तःकरण रेषेला काट बसत असेल तर आपल्याच इष्ट आप्ताकडून त्रास.

जीवितरेषेला मध्येंच × अशी फुली स्पष्ट उमटेल तर जिवावरचें दुखणें उद्भवेल.

मनगटाच्या बाजूला फुली असेल तर तें दुखणें उतारवयांत येईल.

जीवितरेषेपासून दुसऱ्या अनुरेषा किंवा उपरेषा निघत असतील तर ज्या उंच-वट्याकडे त्या जात असतील त्या फलाचा विशेष लाभ.

जीवितरेषेवर काळा ठिपका उमटेल तर अपघात, किंवा अपयश.

जीवितरेषेच्या आंतील बाजूस दुसरी रेषा केव्हां केव्हां आढळते हिला कोणी **द्रव्यरेषा** म्हणतात.

जीवितरेषेच्या धोरणानेंच जाणाऱ्या दुसऱ्या उपरेषा असल्यास शुभ.

जीवितरेषेवर पल्वला सारखी खूण असेल तर आपत्ति आणि खोटे आरोप यांचे-पासून त्रास. पल्वल हें पोकळ दीर्घ वर्तुळाकार असतें.

जीवितरेषेमध्यें सांखळी असेल तर आरोग्यहानि, डाव्या हातावरील जीवितरेषा तुटकी आणि उजव्या हातावरील व्यवस्थित असे असलें तरी देखील आरोग्य बेताचेंच.

जीवितरेषा आणि बुद्धिरेषा ह्यांच्यामध्यें तर्जनीच्या बाजूकडे फार अंतर असेल तर कल्पनेच्या भराऱ्या व बेछूटपणा.

खुनी आणि वेडसर मनुष्याच्या बुद्धिरेषा आणि अंतःकरणरेषा ह्यांच्यामध्यें फार बिघाड असतो. त्या अतिशय वांकड्या व एकत्र मिसळलेल्या असतात.

## आरोग्यरेषेचीं फलें.

रेषा प्रत्येक हातावर असतेंच असें नाहीं. ही रेषा आयुष्यरेषेच्या जवळून मनगटावरून बुधाकडे जाते. ही स्पष्ट असेल तर—आरोग्य, बुद्धि, स्मरणशक्ति उत्तम; व तो यशस्वी होतो.

ही रेषा अंतःकरणरेषेवर थांबल्यांस हृद्रोग होतात.

या रेषेच्या पलीकडे एक रेषा कांहीं हातावर पहाण्यांत येते. त्या रेषेस आकाशगंगा असें म्हणतात.

आकाशगंगेची रेषा ही बुधाच्या उंचवट्याकडेच जाते. ही रेषा व आयुष्यरेषा दोन्हीही चांगल्या असल्यास तो मनुष्य अति कामी, व विषयासक्त होतो.

## अंतःकरणरेषेचीं फलें.

(I) पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ही रेषा तर्जनीपासून न निघतां शनीपासून निघेल तर कामांध, व्यभिचारी व वेश्यागमनाकडे मनाची प्रवृत्ति राहील.

गुरूकडे गेलेली रेषा शुभफलदायक, सत्कर्म करणारी,—तो मनुष्य फार दयाळू, उदार अंतःकरणाचा, सत्वशील व फारच ममता करणारा असतो.

ही रेषा केव्हां केव्हां उद्योग रेषा व शनीकडे जाणारी धनरेषा याप्रमाणेंच थेट हाताचे एका बाजूकडून समोर व लांबलचक अशी हातांचे दुसऱ्या बाजूस मिळते. कधीं कधीं आडवी होऊनही मिळते. अशा तऱ्हेची रेषा असेल तर तो मनुष्य फारच ममता करणारा, अंधश्रद्धा ठेवणारा व कोणत्याही कामांत डोळेझांक करणारा असतो.

ही रेषा बुधाचे उंचवट्याकडे गेल्यास व्यापारधंदा, उद्योग, स्त्री, स्वजन वगैरे ऐहिक गोष्टींवर जास्त प्रेम.

ही रेषा तुटक तुटक अशी असल्यास मैत्री व प्रेम यासंबंधीं नेहमीं सारख्या प्रमाणांत न वागणारा.

ही रेषा शनि व रवि यांच्या उंचवटयाच्या मध्यभागीं तुटकपणा दाखवीत असेल तर मूर्खपणा व अविचारानें मनास दुःख.

रवि व बुध यांचे उंचवटयाखालीं तुटलेली असल्यास विषयासक्ति, कामलोभा-मुळें दुःखी व आपल्या इच्छेप्रमाणें लग्न करण्याची हौस.

शनीखालीं रेषा तुटक असल्यास प्रेम भंगकारक गोष्टींमुळें मन दुःखी होईल.

रवीच्या उंचवटयाखालीं तुटलेली असल्यास अहंकार, हट्ट व दुराग्रहामुळें दुःख, रेषा मुळींच नसेल किंवा अगदीं लहान असेल तर दुष्टपणा, गैरविश्वास, दुसऱ्याचा उत्कर्ष सहन होणार नाहीं. मनांतल्या मनांत जळफळणारा असून त्यास अल्पवयांत मृत्युसम पीडा येणारीं गडांतरें येतात.

ही रेषा मध्येंच तुटली असल्यास मित्र, बायको अगर आपणांस प्रिय अश मनुष्याबरोबर कलह, विरोध व शत्रुत्व उत्पन्न होईल.

बुधाच्या खालीं रेषा तुटली असेल तर स्वतःच्या अविचारी अगर एककली वर्तना मुळें प्रेमदुःखी होईल.

ही रेषा साखळीसारखी असणें चांगलें नाहीं, अशा तऱ्हेची असल्यास मनाल स्थैर्य मिळणार नाहीं. अतिशय चंचल व क्षणिक चित्तवृत्तीचा, केलेला विचार एक क्षणांत पालटणारा, कोणत्याही गोष्टींत अगर कामांत स्थैर्यत्व राहाणार नाहीं. गड-बड्या, मनाला पटेल व उच्छृंखलपणात जें घडेल तेंच करणारा असा असतो.

प्रारंभापासून शेवटापर्यंत रेषा सारखी सांखळीच्या आकाराची असेल तर व्यभिचारी, स्त्रियांविषयीं फार आसक्त, कामांध, हीनबुद्धी, स्वभाव चमत्कारिक, मत्सरी, अर्धवट. रेषा साखळीसारखी असेल तर आपलेंच खरें म्हणणारा, उघड्या मनाचा व स्पष्ट बोलणारा.

या रेषेला (ऊर्ध्वगामी रेषा) फांटे फुटलेले असल्यास फार उत्तम गुणधर्म व सांप त्तिक स्थिति वाढविणारे असतात. फांटे वगैरे फुटलेले नसल्यास—दरिद्री. द्रव्यहीन होतो. उत्तम नटाची ही रेषा—अंतःकरणरेषा—बुधाकडे गेलेली असते.

अंतःकरणरेषा रक्तवर्णाची चांगली, पिवळी असल्यास औदासीन्य दाखविते. याच रेषेवर कांहीं तांबडे ठिपके असतील तर त्या मनुष्याच्या मनाला किंवा शरीराला तीक्ष्ण्या जखमा होतात.

ही रेषा दोन्ही हातांत, आंगठा व त्याचे शेजारचें बोट यांमधून आयुष्यरेषेंतून निघत असेल तर अकस्मात् मृत्यु.

कोणत्याही एकाच हातावर असल्यास भयंकर दुखणें.

रवीच्या उंचवटयावर ही रेषा तुटलेली, दोन्ही हातांवर स्पष्ट दिसत असेल तर त्यास पोटांत किंवा छातींत एखादा जाणवणारा असा रोग होईल. एकच हातावर रेषा असेल तर तो रोग अल्पप्रमाणांत असतो.

रवीचे उंचवटयाखालीं हीच रेषा तुटेल तर वातापासून भयंकर पीडा जाणावी. ही रेषा हातावर नसणारे लोक फार भयंकर कृत्यें करणारे, दुष्ट, विश्वासघातकी, कठोर, उलटया काळजाचे असे असतात.

( II ) ह्या रेषेला लागून प्रेमकंकण असेल तर तो मनुष्य प्रेमलंपट असतो. क्वचित् कोणाच्या हातावर अंतःकरण रेषा नसतेच, अशा माणसापासून जपून राहावें.

रेषा तुटकी असेल तर आयुष्य, द्रव्य, प्रेम इत्यादि संबंधांत हानि.

रेषेमध्यें कातरे, आडव्या तिडव्या रेषा असतील तर प्रेमसंबंधांत त्रास, मनस्ताप.

मध्येंच रेषा तुटत असेल तर आरोग्याचीहि हानि, काळा डाग रेषेवर असेल तर आजार.

रेषा प्रेमकंकणांत घुसेल तर वृत्ति बेताल. तर्जनी आणि मध्यमा ह्यांच्यामध्यें जात असेल तर वृत्ति बेतालच पण आटोक्यात.

रेषेला तर्जनीचे बाजूकडे फाटा फुटत असेल तर वृत्ति चंचल पण आचारांत विक्षिप्तपणा, स्त्रीसंबंधीं धुसफुस.

रेषा पुसट असेल तर भावना कमजोर. जीवितरेषेंतून उपरेषा निघून ती ह्या रेषेंतून मध्यमेकडे जात असेल तर विवाहसौख्याची हानि, स्त्रीशीं शत्रुत्व.

चन्द्राचे उंचवटयांतून उपरेषा निघून ती थेट अंतःकरण रेषेला भिडत असेल तर तो मनुष्य केव्हां कोणाचा घात करील त्याचा नेम नाहीं.

अंतःकरणरेषा ही नीट सरळ तळहाताच्या मधून थेट पलीकडील सीमेपर्यंत जाईल तर अत्यंत भावनावशता. परंतु बुद्धिरेषेशीं अगदीं जुळून राहील तर मतलबी स्वभावाची परमावधि.

अंतःकरण रेषा आंखूड असेल तर आयुष्य कष्टमय, रेषा साखळीनें बनली असेल तरी तोच प्रकार.

( III ) आयुष्यरेषेंतील तुटकेपणा आणि अन्तःकरण रेषेचें दौर्बल्य हे कुरुकुरु प्रकृतीचें द्योतक, प्रकृति नीट राहणार नाहीं.

ज्या रेषेवर चतुष्कोणाकृति असेल त्या रेषेच्या फलांतील विघ्नांचा परिहार.

तसेंच तुटक्या रेषेला सांधा असेल तरी विघ्नांचा परिहार.

अन्तःकरण रेषेंतून फाटा निघून तळहाताच्या खालील फुगवट्यामध्यें ( चन्द्राच्या फुगवट्यामध्यें ) जातो. काल्पनिक दुःखापासून खरोखरीचा त्रास.

अंगुष्ठाच्या फुगवट्यांतून त्रासकारी रेषा अनेक रेषांना छेदून जाते. हें चिन्ह आधि व्याधींचें द्योतक.

त्याचप्रमाणें अंगुष्ठमूलांतूनही त्रासरेषा निघून तिनें छेद केल्यास शारीरिक मानसिक क्लेश.

त्रिशूळ चिन्ह अव्यवस्थित आकाराचें ज्या रेषेवर असेल त्या रेषेचें फल हवेंसें वाटेल पण मिळणें कठिण.

परंतु तोच सुव्यवस्थित त्रिशूळ असेल तर त्या रेषेच्या फलाची उत्तम अभिवृद्धि.

आरोग्यरेषा जीवितरेषेला चिकटली असेल तर प्रकृतिमान यथातथा, चिकटलेली नसेल तर आरोग्य-आरोग्यरेषा ही एक स्वतंत्र ऊर्ध्वरेषा आहे.

अन्तःकरण रेषेला छेदून जाणारी त्रासरेषा सणसणीत असेल तर मोडता घालणाऱ्या लोकांपासून उपद्रव.

तर्जनीच्या उंचवट्याखालच्या भागांतून रेषा निघून थेट तिरपी चन्द्राच्या उंचवट्याच्या दिशेस मनगटाकडे जाते ती व्यसनें, वेळूट वागणूक यांची निदर्शक असते.

अन्तःकरणरेषेचा शेंडा तर्जनी आणि मध्यमा ह्यांच्यामध्यें जात असेल तर मनुष्य विश्वासार्ह, इमानी.

परंतु त्या शेंड्याला फाटा फुटून दुबळका मोठा असेल तर मनुष्य अतिशय गर्विष्ठ.

तळहातावर अन्तःकरण रेषाच नसेल तर त्या मनुष्याचा जीवनक्रम अत्यंत स्वार्थी.

## मस्तकरेषेचीं फलें.

(I) ही रेषा स्पष्ट, ठळक व लांब असेल तर तरतरीत बुद्धि, तीव्रपणा, एकपाठी, स्मरणशक्ति उत्तम, समजून पटणारा असे गुण अनुभवास येतात.

ही रेषा अंतःकरणरेषेस न मिळतां गेली तर अज्ञान, आयुष्यरेषेस न मिळाल्यास निष्काळजी, चिंतारहित, नेहमीं आनंदी असतो. या रेषेस फाटे फुटतात त्यापैकीं एकादा फांटा शनिकडे गेल्यास हट्टी, वृथा अभिमानी, आपलेपणा जास्त, खऱ्याखोटयाची पर्वा न बाळगणारा असा तो असतो.

फांटा गुरुकडे गेल्यास द्रव्यसंग्रह करणारा किंवा अकस्मात द्रव्याचा ठेवा त्यास मिळेल. दुसऱ्याच्या द्रव्याची व्यवस्था करण्याची प्रवृत्ति असते.

ही रेषा बुधाकडे गेल्यास, शेतकी, जमीनजुमला, व्यापार वगैरे स्वतंत्रपणाच्या गोष्टी होतील. बुद्धिप्रभावानें नवीन युक्त्या लढवून कार्य साधील.

फांटा चंद्राचे उंचवटयाकडे गेल्यास लहरी, नादिष्ट, वेड, पाण्यापासून भीति उत्पन्न होईल. अतिरेकीपणानें भलत्याच भाडसी गोष्टी करण्याचा मोह.

ही रेषा चंद्राचे उंचवटयाकडे येईल तर तो मोठा कल्पक, परंतु लोकांचें आचरण किंवा चालीरीती या मनुष्यास चमत्कारिक वाटतात. त्यांतील मुख्य तत्त्व काय आहे हेंच त्यास समजत नाहीं. भुतपिशाच इत्यादि गोष्टींवर त्याचा विश्वास असतो.

रेषा चंद्राकडे उंचवटयावर बरीच गेलेली असुन धनरेषा, आयुष्यरेषा व गुरुचा उंचवटा यांचें फल चांगलें असेल तर तो मनुष्य ग्रंथकर्ता, कवि, भविष्यवादी किंवा प्रकाशक होतो. ज्योतिष, सामुद्रिक या शास्त्रांसंबंधीं त्याचे विचार नेहमीं चालू असुन दैव जाणण्याचा मार्ग त्यास ठाऊक असतो.

ही रेषा फार रुंद, निस्तेज असेल अगर अर्ध्याच भागापर्यंत असेल तर कोणत्याही कामाविषयीं निरुत्साह व त्याची बुद्धि साधारण असते.

ही रेषा स्वतंत्र ( म्हणजे आयुष्यरेषेतून न निघतां ) निघेल तर अति विचारी, चलबिचल, स्वतःबद्दल वृथा खात्री देणारा, नेहमीं विचारांत कुचमत राहतो. एक मार्ग कांहींच लागत नाहीं. विचाराला निश्चितपणा नसतो.

गुरु व मंगळ यांचे उंचवटे मोठे असून मस्तकरेषा स्वतंत्र निघेल तर पराक्रमी, साहसी, कोणत्याहीं कामांत मागें न घेतां जय मिळविणारा, धैर्यवान व प्रसिद्ध होतो.

ही रेषा फार बारीक असेल तर, अविश्वासी, घात करणारा, कोणत्या वेळीं काय करील याचा नियम नसतो. याच रेषेवर बारीक बारीक आडव्या रेषा असतील तर मस्तकशूल, पीडा, संशयी, चिंताग्रस्त असतो.

ही रेषा संपतांना अंतःकरणरेषेवर पुरी होईल तर अल्पायुषी. याच रेषेवर फुलीसारखें चिन्ह असल्यास भयंकर—प्राणघातक अशा तऱ्हेची जखम डोक्यास होते.

दोन्ही हातांत ही रेषा शनीचे उंचवट्याखालींच तुटत असेल तर त्या मनुष्यास देहांतशासन फांशीची शिक्षा होईल किंवा भयंकर रीतीनें मृत्यु देणारी अशी एखादी जखम होईल; एकाच हातावर रेषा तुटलेली असेल तर तो मनुष्य वेडा होईल.

## मनःस्थिति

बुद्धिरेषा आणि अन्तःकरण रेषा ह्यांच्यामध्यें परस्परांना जोडणारे कांहीं बारीक रेषादोरक असतील तर बुद्धीचा जोर विशेष.

परंतु त्याच रेषांपैकीं एखादी दणगट रेषा हद्दीबाहेर जाऊन चंद्राच्या उंचवट्यांत नीट बसून जाईल तर दुसऱ्यांचा घात करण्याची बुद्धि, फसवेगिरीची बुद्धि, आंगठ्याच्या मुळाशीं **चक्राकार फुली** असेल तर स्वभाव कज्जेदलालीचा, भांडखोर; त्या फुलीपासून निघणाऱ्या छेदकरेषाहि अशुभ.

तशीच एक बारीक उभी रेषा आंगठ्यापासून तर्जनीकडे जाईल तर स्वभाव फारच गर्विष्ठ.

बुद्धिरेषेला खालच्या बाजूस दोन फाटे स्पष्ट फुटलें असतील तरी खोटा व अप्रामाणिक स्वभाव.

बुद्धिरेषा आणि आरोग्यरेषा ह्यांचीं टोंकें एकत्र मिळून त्रिकोण होईल तर फार मोठें यश—आणि तसेंच मोठें मन.

परंतु ह्या त्रिकोणांत फुल्यासारख्या किंवा अर्धवर्तुळी तुटक्या रेषा असतील तर यशामध्यें थोडा कमीपणा.

त्याच त्रिकोणाला शुभ त्रिकोण म्हणतात.

त्रिकोणाच्या बाजू—जीवितरेषा, बुद्धिरेषा, आणि आरोग्यरेषा.

जीवितरेषा आणि बुद्धिरेषा ह्या आंगठ्याकडील सीमेपाशीं संलग्न नसाव्या, असल्या तर आत्मविश्वास फारच कमी.

जीवितरेषा आणि बुद्धिरेषा ह्यांच्यामध्यें थोडें अंतर त्या सीमेपाशीं असावें म्हणजे ती आत्मविश्वासाची खूण.

हें अंतर फारच असेल तर स्वभाव बेफाट, लहरी. ह्या सीमेपाशीं जीवितरेषा किंवा बुद्धिरेषा ह्याना फाटे असतील तर स्वभाव घमेंडखोर, निर्धाराचा अभाव.

जीवितरेषा, बुद्धिरेषा ह्या संलग्न असून तेथेंच जर अन्तःकरण रेषाहि चिकटली असेल तर तें चिन्ह अत्यंत अशुभ.

**जीवितरेषा व बुद्धिरेषा चांगली असून स्वतंत्रपणें आयुष्यरेषेशी ती आयुष्याचे पूर्वभागीं संयोग करीत असेल तर बडा व्यासंगी, निश्चयी व उद्योगी होतो. चिकाटी फार असते.**

## बुद्धिरेषा

ही रेषादेखील व्यवस्थित, स्पष्ट, खोल असावी. बुद्धिरेषा ही तर्जनीच्या उंचवट्याच्या सीमेपासून निघालेली असावी.

बुद्धिरेषा ही तर्जनीच्या सीमेतून निघतांना जीवितरेषेला चिकटली असल्यास धडाडी नाहीं, घाई नाहीं, परंतु वृत्ति नाजुक व सावधगिरीची. बुद्धिरेषा जीवितरेषेच्या आंतील बाजूकडून निघून त्या रेषेला छेदून बाहेर पडत असेल तर थोडें वाईटच. कारण स्वभाव चिडखोर, आणि तापट असतो. म्हणून बुद्धिरेषा आणि जीवित यांचेमध्यें आरंभीं थोडें अंतर असावें, परंतु फार असू नये. बुद्धिरेषेमध्येंहि सांखळी असु नये व रेषा वांकडीतिकडीहि असू नये.

सांखळी असल्यास विचारामध्यें घोटाळा होणार. मध्यें पोकळ वर्तुळें असतील तर डोक्याला त्रास. विचार सहजासहजीं सुचणार नाहीं.

चंद्राच्या उंचवट्याकडे रेषा झुकेल तर व्यवहाराचा भाग कमी.

बुद्धिरेषा अगदीं सरळ नीट तळहाताच्या मधून सीमेपर्यंत भौम ( मंगळाच्या ) भागांत जाईल तर मनुष्य स्वार्थी धोरणाचा; पैसा गांठी बांधणारा.

बुद्धिरेषा आंखूड असेल तर चातुर्य, अक्कल बेताची, उदर भरणासाठीं करावयाचा तेवढाच काय तो उद्योग हाच क्रम.

बुद्धिरेषा चंद्राच्या उंचवट्यामध्यें घुसेल तर गूढ विद्येची आवड.

बुद्धिरेषेचा फाटा अंतःकरण रेषेमध्यें शिरत असेल तर स्वभाव किरकिऱ्या, कांटेकोर.

बुद्धिरेषा दोन्ही हातांवर तुटलेली असेल तर अपघात.

बुद्धिरेषेला आरंभींच तुऱ्याप्रमाणें अनेक फाटे असतील तर कांहींना कांहीं तरी युक्ति सुचते.

बुद्धिरेषा, गुरु रेषा आणि गुरु रवींचे उंचवटे हे शुभफलदायी असतां व रवी रेषा प्रभावी असतां विद्यायोग पूर्ण होतो. पदवीधर होतो. याच्या उलट परिस्थिति असतां विद्येंत विघ्नें, अपयश, अर्धवटपणा ही स्थिति.

## स्त्रीसौख्य

अनामिकोर्ध्व रेषेला लागून दोन तीन बारीक रेषा उंचवटयानजीक समांतर असतील तर कार्यांत यश.

दोन जुळ्या रेषा यशोदायक.

चंद्राच्या उंचवटयांतून रेषा निघून ती धनरेषेंत समाविष्ट होऊन तशीच मध्यमेच्या किंवा तर्जनीच्या उंचवटयापर्यंत जाईल तर स्त्रीसुख आणि धनाढ्य स्त्रीचा लाभ.

परंतु धनरेषेला शुक्ररेषेचा काट बसल्यास स्त्रीसुखांत अंतर.

अंतःकरण रेषेला फाटा फुटून एक टोक बुद्धिरेषेला ( पंजाच्या सीमेजवळ जाऊन ) मिळेल तर स्त्रीसुख कमी.

जीवितरेषेवर शुक्राच्या उंचवटयानजीक काट असेल तर स्त्रीसुख कमी.

जीवितरेषेचा छेद शुक्राच्या उंचवटयांतील रेषेकडून होत असेल तर स्त्रीपासून त्रास.

शुक्राच्या उंचवटयांतील रेषा धनरेषेंत मिळून जात असेल तर विवाहसौख्य.

अंतःकरण रेषेला तुरमे फुटतात त्याप्रमाणें सर्वच बारीक फाटे असून टोंकाला मोठा दुबेळका असेल तर स्त्रीसुखाला लंपट, चैनबाजी.

ह्याच दुबेळका तर्जनीजवळ असेल तर स्त्रीपुरुषप्रेम.

जीवितरेषेला मध्यें अनेक खंड असतां अपघाताचा संभव.

जीवितरेषेच्या सीमेलगत बुद्धिरेषेला मोठा खंड असतां अपघाताचा संभव.

जीवितरेषेवर फार स्पष्ट अशी खोंच, गण्डान्तर.

जीवितरेषेला तुरमे फुटल्याप्रमाणें बहुत फाटे आणि शेवटाला काट अशी स्थिति असतां ती अपघाताची खूण.

कनिष्ठिकेच्या उंचवटयाच्या खालच्या भागांतून छेदक रेषा निघून जीवनरेषेच्या छेद करील तर जखम होण्याचा योग.

असेच योग जीवितरेषा, आणि अन्तःकरणरेषा ह्यांच्या मध्येंच पन्वल ( पोकळ यवासारखी लांबट आकृति ) उत्पन्न झाली असेल तर येण्याचा संभव.

या दोन्ही रेषांवर काकपदासारखी आकृति असेल तर अपघात, जखमा यांचा संभव.

शुक्राच्या उंचवट्याचा चिडमिडित रेषांनीं भंग केला असेल, अंतःकरणरेषा निर्जीव असेल आणि चंद्राचाही उंचवटा नाशकारक रेषांनीं किंवा × फुलीसारख्या चिन्हांनीं

युक्त असेल तर त्या पुरुषास स्त्रीसौख्य चांगलें मिळत नाहीं. स्त्रीशीं मतभेद, मतवैचित्र्य राहते. स्त्रीचा स्वभाव तामसी, हेकेखोर, आणि उद्दामवृत्तीचा असतो. स्वतःच्या मानापमानाबद्दल स्त्रीला फार घमेंड असते. कदाचित अशा पुरुषाचे विवाह एकापेक्षां अधिक होतात व ते वयाच्या २८ ते ३२ वर्षांच्या दरम्यान होतात.

## स्त्री, संतति आणि भावंडें यांच्या रेषा.

**स्पर्यावत्यंतरं रेखामणिजीवितरेखयोः ।**
**तावंत्यो महिलास्तस्य स्त्रियस्तावन्मितः प्रियाः ॥**
**स्त्रियः दक्षिणपाणिस्था पतिरेखाप्रकीर्तिताः ।**
**मूलेऽगुष्ठस्य नृणां स्थूला रेखा भवंति यावंत्यः ।**
**तावंतः पुत्राः स्युः सूक्ष्माभिः पुत्रिकास्ताभिः : ॥**

मणिबंधरेषेंत जितक्या रेषा येऊन पूर्णपणें मिळत असतील तितक्या स्त्रिया होतील. स्त्रियांच्या उजव्या हातावरून पतिरेखा पाहावी. येथें काय किंवा अन्यत्र काय हें सदैव लक्षांत ठेवावें कीं, कोणत्याही गोष्टींचा निर्णय एकाच हाताच्या रेषांवरून करूं नये. दोन्ही हात पाहावे. म्हणजे फलनिर्णयाची निश्चितता होईल. कारण डावा हात म्हणजे पूर्वजन्मांच्या शुभाशुभत्वाचें दिग्दर्शन अर्थात दैवानें घडणाऱ्या गोष्टी व उजवा हात म्हणजे चालू जन्मांत प्रयत्नानें होणाऱ्या गोष्टी असा अन्योन्य संबंध होय. म्हणून कांहीं अपवाद सोडून बाकीच्या गोष्टींचा दोन्ही हातांच्या रेषांवरून फलनिर्णय करावा.

**दैवरेषा** किंवा आयुष्यरेषा यांच्यांतून निघणाऱ्या किंवा त्या रेषांशीं संबंधित अशा जितक्या स्पष्ट व निर्विकार रेषा मणिबंधरेषेंत येऊन मिळत असतील तितक्या स्त्रिया म्हणजे लग्नें होतात असें वचन आहे. त्याचा उपयोग तारतम्यानेंच केला पाहिजे; कारण आपापल्या धर्मविधीनें होणारें विवाह हेंच फक्त ह्या रेषांवरून दिग्दर्शित होतात. उत्तुंग स्त्रीपुरुष प्रेमानें घडून येणारीं लग्नें ह्यांचा ह्या रेषांवरून निर्णय होणार नाहीं. त्यांचा निर्णय शुक्रमंगळाच्या स्थितीवरून करावा.

स्त्रियांच्या हातावर अशा रेषा असल्यास त्यांचे अनेक पति होतात ह्याचा स्पष्ट अर्थ असा आहे कीं, ज्या जातींत किंवा समाजांत काडीमोड, इत्यादि प्रकारानें स्त्रियांचीं अनेक लग्नें करण्याची पद्धति आहे त्यांना तसें फल मिळेल. पण ज्या उच्चवर्णीय जातीमध्यें स्त्रियांचे दुसरें लग्न करण्याचा प्रघात नसून त्याचा पूर्ण निषेध आहे, त्या ठिकाणीं अशा रेषा असल्यास त्या व्यक्तींच्या कौटुंबिक व प्रापंचिक सुखांत कांहींना

कांहीं तरी व्यत्यय किंवा संकट आहे असें समजावें. ( १ ) पतिपत्नींचें वास्तव्य एका ठिकाणीं न राहतां पत्नी एका ठिकाणीं तर पति हजारों कोसांवर, (२) पति किंवा पत्नी सतत अजारी असण्यानें एका ठिकाणीं असूनही सांसारिक सुख न मिळणें, ( ३ ) पतिपत्नी एकत्र असूनही कांहीं मनाच्या विक्षिप्त ठेवणीमुळें, हट्टानें, रागयानें आततायीपणानें किंवा ब्रह्मचर्यपालनाच्या अतिरेकी अगर एकांगी वृत्तीनें, तसेंच एकमेकांचे आचार, विचार, मतें व वागणूक न पटल्यानें,अशा विविधकारणानें कांहीं कांहीं पतिपत्नींना प्रपंचसुखाच्या अभावीं खडतर शारीरिक यातनांचा निग्रह सोसावा लागतो. अशा सर्व प्रकारांचा विचार मणिबंधरेषेंत येऊन मिळणाऱ्या रेषांवरून करावयाचा असतो.

हा विचार अतिशय सूक्ष्मपद्धतीनें करावा आणि त्या व्यक्तीची सामाजिक व धार्मिक परिस्थिति प्रथम लक्षांत ध्यावी. तसें न केल्यास दोष घडण्याचा संभव.

सबंध हयातभर पतिपत्नींचें उत्तम प्रेम, एकमत व संसारसुख आणि प्रापंचिक गोष्टींत अत्यंत सहकार्यानें संसारचक्राचा गाडा अगदीं सुरळीत चालावयाचा अशा परिस्थितीला सांसारिक व कौटुंबिक उत्तम परिस्थिति म्हणतां येईल. अशी परिस्थिति असण्यास आयुष्यरेषा, अंतःकरणरेषा, धनरेषा ह्या चांगल्या असून ऊर्ध्वगामी रेषायुक्त, मणिबंध रेषेशीं पूर्ण मिसळलेल्या, गुरूचा उंचवटा चक्रांकित, मंगळाच्या उंचवट्यावर चंद्ररेषेचा शुभ मिलाफ; आणि शुक्ररेषा एकच पण आयुष्यरेषेशीं अगदीं एकजीव झालेली. रविरेषा आयुष्यरेषेंतून निघालेली याप्रमाणें योग असतात.

अंगुष्ठमूळाच्या ठिकाणीं स्थूल—मोठाल्या रेषा असतील तितके मुलगे व लहान रेषा असतील तितक्या मुली होतील. ज्या रेषा तुटक्या, अपूर्ण अगर छिन्नविछिन्न असतील तितक्यांचा नाश होईल. याप्रमाणें संततीचा विचार करावा. आयुष्यरेषा व अंतःकरणरेषा चांगली असून गुरूच्या उंचवट्याकडे गेली असेल तर संततिसौख्य पूर्णपणें मिळून संतति भाग्यवान्, प्रसिद्ध व विद्वान होते.

**यावंत्यो मणिबंधायुः रेखांतः प्रतिष्ठितः सूक्ष्माः ।**
**तावत्संख्यान् भ्रातॄन् वदंति सूक्ष्माः पुनर्भगिनीः ॥**
**तासु या अस्फुटा रेखास्तावंतो निधनं गतः ।**
**ये स्फुटाश्चाथ जीवंत इति सामुद्रिकं वचः ॥**

मणिबंधापासून आयुष्यरेषेपर्यंत असणाऱ्या जितक्या स्थूलरेषा तितके भाऊ व

सूक्ष्मरेषा तितक्या बहिणी समजाव्या. त्यावर मारकरेषा, असतील तितकीं भावंडें मृत अगर अल्पायु समजावीं.

येथें असा घोटाळा होईल कीं आंगठ्याखालील रेषा संततीच्या व तेथील रेषा भावंड्याच्या हें काय ? याचा उलगडा असा कीं, धन व आयुष्यरेषेच्या पलीकडे शुक्राचे उंचवटयावर उभ्या रेषा त्या भावंडांच्या व आडव्या रेषा त्या संततीच्या समजाव्या.

## मातृपितृरेखा.

सामान्य नियम असा कीं, चंद्ररवींचा उंचवटा वाईट, व आयुष्यरेषा व अंतःकरणरेषा मूळांतच भंग पावलेली असली, मणिबंध रेषेवर, रेषा कापणाऱ्या रेषा असल्या आणि रविचंद्राच्या उंचवट्यावर मारक रेषा चिन्हें असलीं म्हणजे अल्पवयांत मातृपितृसुख नाहींसें होतें. या गोष्टी चांगल्या असल्यास मातृपितृसुख ठीक. अंतःकरण रेषेला किंवा आयुष्यरेषेला ज्या ठिकाणीं मोठा छेद दुसरी रेषा करीत असेल तो काल अनिष्ट. त्यांचा संबंध चंद्राशी असतां आईस व रवि गुरुशीं असतां वडिलांस मृत्युसम पीडा. हा विचार विशेषेंकरून डाव्या हातावरून करावा असें आमचें मत आहे.

तर्जन्याधस्त्रिवेण्यांतर्यदा रेखाद्वयं भवेत् ।
आद्या दैर्घ्यें पितामृत्युः प्रथमं मातुरन्यथा ॥

असें ग्रंथांत म्हटलें आहे. तर्जनीशीं मातापित्यांचा संबंध फारसा येत नसला तरी तेथून निघणाऱ्या दोन रेषांचें हे फल आहे. अर्थात त्या अनिष्ट रेषाच समजाव्या. मातापित्याचे सुखाबाबत दोन गोष्टींची जाणीव ठेवणें युक्त आहे. माता अगर पिता जिवंत असून त्यांच्या पासून दूर राहणें हा पहिला प्रकार व माता आणि पिता लहानपणींच मृत होणें हा दुसरा प्रकार. हे दोन्ही प्रकार तारतम्यानें ठरवावें.

## मदनधनुष्यरेषेचीं फलें.

ही रेषा हातावर असेल तर तो मनुष्य व्यभिचारी, गुप्त पाप करणारा, कामी, परदारासक्त होतो. शुक्राचा उंचवटा तेजस्वी, स्पष्ट व बारीक रेषांनीं युक्त असल्यास असा प्रकार खात्रीनें होतो. हीच रेषा बुधाचे उंचवटयाचेही वर जाईल तर वर सांगितलेल्या गोष्टींची परमावधि होते. व्यसनी, अविचारी व भ्रष्ट असा तो असतो.

# धनरेषा अर्थात दैवरेषा.

सामुद्रिक, मुखचिन्हनिर्णय अगर हस्तरेषा यांचा विचार करतांना एक गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे कीं, ज्या हस्तरेषा शुभफलदायक असतात त्या नेहमीं **ऊर्ध्वगामी** अशा असतात. हस्तसामुद्रिक पाहातांना रेषांचे बाबतींत आणखीही दोन प्रकार आहेत, त्यापैकीं १ म्हणजे **छेदकारक रेषा** व दुसरा **अधोगामी रेषा.** हे दोन्ही प्रकार हानिकारक व अशुभफलदायक समजावे. ग्रंथांत हाताच्या ज्या आकृती दिल्या आहेत त्या पाहातांच असें आढळून येईल व अनेक हात पाहातांच खात्री होईल कीं, विशेषेकरून शुक्राचा जो उंचवटयाचा भाग दिला आहे, त्या ठिकाणीं अनेक रेषा प्रत्येकाच्या हातावर असतात. सामुद्रिक शास्त्राच्या ग्रंथांत **हातावर अनेक रेषा असणें हें निर्धनतेचें किंवा दारिद्र्याचे लक्षण सांगितलें आहे.** पण नुसत्या अनेक रेषा आहेत, यावरून त्याचा निर्णय लावतां येणार नाहीं. कारण धनयोगाचा विचार करतांना धनरेषा, हातावरील इतर चिन्हें व गुरु, शुक्र आणि रवि यांचे उंचवटे व त्यांवरील रेषा व चिन्हें यांचाही विचार करावा लागतो. आणि या सर्वांचा विचार केल्यानंतर धनयोगाचा निर्णय होऊं शकतो.

धनयोगाचा निर्णय ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाहीं. कारण सांपत्तिक स्थिति ही जन्मापासून अखेरपर्यंत अगदीं एकसारखी राहते किंवा असूं शकते अशी गोष्ट नसून असें एकतरी उदाहरण दाखवितां येईल कीं नाहीं याची शंकाच आहे. मनुष्य जन्मतः गरीब असो अगर अत्यंत श्रीमान असो त्याच्या आयुष्यांत "चंचल लक्ष्मीच्या एकत्र स्थिर राहण्याच्या बेभरंवशामुळें व लक्ष्मीला हजारों ठिकाणीं भांवपळ करण्याची जन्मतःच खोड असल्याकारणानें" हजारों प्रसंग असे घडून येतात कीं, जन्मतः श्रीमान असतो तो मध्यम वयांत दरिद्री बनतो. व दरिद्री असतो तो श्रीमान होऊन जातो. तसेंच जो मध्यम वयांत श्रीमान असतो तो वृद्धावस्थेंत श्रीमान राहीलच अशी खात्री नसून दारिद्र्याच्या दुर्दैवांत तळमळणारा एखादा जन्मदरिद्री आयुष्याचे वृद्धावस्थेंत श्रीमंतीचें सुख भोगूं लागतो! अशीं प्रत्यक्ष उदाहरणें आहेत कीं, वयाच्या ४०।४५ वर्षांपर्यंत ३०।४० रुपये महिना मिळून आयुष्य कंठणारे लोक अचानक रीतीनें परिस्थिती बदलून. आज मोठ्या ऐश्वर्यांत आहेत व लक्षाधीश बनलेले आहेत. जन्मतः लाखों रुपयांच्या इस्टेटी असलेले श्रीमान् लक्ष्मीपुत्र आज दारिद्र्याच्या दुःखःकारक परिस्थितींत खितपत पडले आहेत. तात्पर्य काय कीं, सांपत्तिकयोग हा नेहमीं प्रत्येक

मनुष्याचा एकाच स्थितींत व प्रमाणांत राहूं शकत नाहीं. म्हणून धनयोगाचा विचार करतांना अशा प्रकारची दृष्टि ठेविली पाहिजे कीं, या मनुष्याच्या आयुष्यांत कोणता काल द्रव्यदृष्ट्या अनुकूल व उत्कर्षकारक आहे, याच्याच बरोबर सामान्यतः हा मनुष्य नेहमीं चांगल्या स्थितींत राहणार कीं, द्रव्यदृष्ट्या संकटकारक स्थितीमध्यें आयुष्य कंठणार याचा विचार करावयास हरकत नाहीं व तो हस्तरेषांवरून करतांही येतो. पण विशेष गोष्ट म्हणून या बाबतींत जी ध्यानांत ठेवावयास वर सांगितली आहे तिकडे केव्हांही दुर्लक्ष होतां कामा नये.

हस्तरेषा पाहतांना व धनयोगाचा विचार करतांना प्रथम **धनरेषा आणि उजव्या हातावरील आंगठा व करांगुली शेजारचें बोट या दोहोंवर यवाकार चिन्ह** आहे कीं नाहीं हें पहावें. त्या ठिकाणीं यवाकार चिन्ह असल्यास धनयोगाला अनुकूल अशा या दोन गोष्टी आहेत असें समजावें.

आंगठा आणि करांगुली, शेजारचें बोट यांवर यवाकार रेषा अगर चिन्ह असणें भाग्यकारक व यशदायक चिन्ह आहे. त्याचप्रमाणें मणिबंध रेषेंतून निघणारी धनरेषा जर मणिबंध रेषेस अगदीं बिलगलेली अशी असेल व मणिबंध रेषेवर अगर धन रेषेवर यवाकार चिन्ह दुसऱ्या रेषामुळें होत असेल तर तो मनुष्य सांपत्तिक सुस्थितींत असला पाहिजे व आयुष्यांत कमजास्त प्रमाणानें त्याची सांपत्तिक स्थिति चांगली असली पाहिजे असें बेलाशक समजावें.

वर सांगितलेलें यवाकार चिन्ह उजव्या हाताच्या पांच बोटांवर असेल तर तो मनुष्य विशेष उच्च स्थितींत राहील अशाचें तें द्योतक आहे. डाव्या हातावरही याप्रमाणें वर दर्शविलेली परिस्थिति पहावी.

कित्येकांचें मत असें आहे कीं, उजव्या हातावरील चिन्हें व रेषा यांवरून निघणारे योग हे त्या मनुष्याच्या स्वतःच्या कर्तृत्वानें प्राप्त होणाऱ्या गोष्टींचे दिग्दर्शक असतात व डाव्या हातांवरून दिसणारे योग हे त्याचें नशीब व दैव त्याला कितपत अनुकूल आहे हें दाखवितात. याचा अर्थ इतकाच समजावयाचा कीं, डाव्या हातावर धनयोग अगर इतर योग अनुकूल असल्यास अल्प श्रमानें त्या गोष्टी प्राप्त होतील व उजव्या हातावरील चिन्हें व रेषा हितकर असल्यास त्याच्या कर्तबगारीनें हें फल त्याला मिळालें असें म्हणावयास सवड राहील. कसेंही असलें तरी फल जें मिळावयाचें तेंच मिळणार, त्यांत फरक होणार नाहीं. मग तें नशिबानें मिळो किंवा उद्योगानें मिळो !

धनरेषा मूळापासून शनीच्या उंचवट्यापर्यंत जर सरळ गेली असेल तर धनयोग हा कायम टिकाऊ–कर्मांअधिक मानानें–आयुष्य अखेरपर्यंत असतो. पण त्या रेषेस जर मध्यें एखादी रेषा छेद करीत असेल तर तो काल सांपत्तिक हानीचा आहे असें समजावें. त्याचप्रमाणें धनरेषेवर आणि आयुष्यरेषेवर जर अधोगामीरेषा उत्पन्न झाल्या असतील तर तो काल हानिप्रद आहे असें समजावें. धनरेषा आणि आयुष्य-रेषा यांच्यावर ऊर्ध्वगामी अशा बारीक बारीक रेषा असतील तर त्या आयुष्यकालाचे प्रसंगीं अनेक प्रकारें द्रव्यलाभ होईल असें समजावें.

आयुष्यरेषा व अंतःकरणरेषा या दोन रेषाधारें आयुष्याचा अंदाज करावा आणि मग इतक्या आयुष्यास जर सर्व रेषा तर त्या रेषेच्या अगर धनरेषेच्या एक चतुर्थांश, एक अष्टमांश रेषेस किती वर्षे येतात हें पाहून फल मिळण्याचा काल ओळखावा. अगर संबंध रेषेचे ५।५ वर्षांचे भाग पाडावें आणि जन्मापासून मोजून कोणत्या वर्षी शुभ चिन्हें आहेत अगर अशुभ चिन्हें आहेत हें पाहून त्याप्रमाणें कालनिर्णय करावा.

धनरेषा नेहमीं शनीच्याच उंचवट्याकडे जाते असा नियम नाहीं. त्याप्रमाण ती मणिबंधरेषा अगर तळहाताचे मध्यभागापासूनच निघते असाही नियम नाहीं. ती केव्हां केव्हां शुक्राच्या उंचवट्यावरून अगर चंद्राच्या उंचवट्यावरून निघून रवि, बुध अगर गुरूचे उंचवट्याकडे जाते किंवा मध्यंतरींच थांबते. अशा वेळीं आयुष्यरेषा व अंतःकरण-रेषा या दोन रेषांची स्थिति पाहून व त्यांच्याशीं धनरेषेचा संबंध कसा आहे हें पाहून नंतर निर्णय करावा.

धनरेषा कोणत्याच उंचवट्याकडे न जातां मध्येंच विराम पावत असेल तर आयुष्याच्या मध्यमभागापर्यंत सांपत्तिक स्थिति जोमदार राहील असें समजावें व धनरेषा मूळापासून न निघतां मध्यंतरींच उद्भूत होत असल्यास आयुष्याचे २०।२२ वर्षांनंतर सांपत्तिक स्थिति सुधारणार असें समजावें.

धनुरेषा रवीच्या उंचवट्याकडे जात असल्यास त्याच्या आयुष्याचे २५ वर्षा-पासून मोठमोठाले लाभ घडतील व भाग्योदय ३४।३५ व्या वर्षी होईल. गुरूच्या उंचवट्याकडे जात असल्यास वयाचे १८–१९ वर्षांपुढील काल सुखाचा, मान्य-तेचा व यशदायक होईल असें समजावें. अशा लोकांचा भाग्योदयकाल ३० ते ३२ च्या दरम्यान येतो. धनरेषा बुधाचे उंचवट्याकडे गेल्यास त्याचें बुद्धिसामर्थ्य

दांडगें असून द्रव्ययोगही श्रेष्ठ प्रकारचे येतात. वयाचें ३२।३३ वर्षांपासून संपत्तीचा आगम होतो व ३८ ते ४२ पर्यंत भाग्योदय करणाऱ्या गोष्टी घडून येतात. **धन-रेषा शनीच्या उंचवट्याकडे** गेल्यास त्या मनुष्यास कष्ट, दगदग आणि त्रास फार होऊन आयुष्याचे पूर्वार्धाचा काल जिकीरीचा जातो, पण पूर्वार्जित धनाचा व स्थावराचा लाभ त्याला होतो. आयुष्याचे अखेरीस, वृद्धपणीं, वयाचें ४० नंतर सांपत्तिक स्थितींत फेरबदल होऊन धनलाभाची वाढ होते. आयुष्याची अखेर हितावह स्थितींत जाते. पण याच रेषेवर ऊर्ध्वगामिनी बारीक रेषा, यवाकार चिन्ह अगर चंद्र, मंगळ, गुरु, शुक्र यांच्या उंचवट्यावरून येणाऱ्या शुभ रेषा मिलाफ करीत असतील तर तो काल द्रव्यदायक व भरभराट करणारा समजावा. शुक्ररेषा धनरेषेशीं किंवा आयुष्यरेषेशीं मिळत असेल तर अशा व्यक्तीचें लग्न लवकर होतें. स्त्री स्वरूपवान, सुंदर मिळते आणि विवाहानंतर भाग्योदय प्रारंभ होतो. सासऱ्याकडून संपत्ति मिळण्याचा संभव असतो.

शुक्र व चंद्राचे उंचवट्यावर यवाकार किंवा चक्राकार चिन्ह असल्यास व त्या उंचवट्यावरून निघणारी एक रेषा आयुष्य अगर धनरेषेंत पूर्णपणें मिसळत असल्यास त्या मनुष्यास अयाचित मोठाले लाभ होतात. सट्टे, शर्यती, लॉटरी वगैरेमध्यें ज्यांना द्रव्य मिळतें त्यांच्या हातावर अशा प्रकारच्या रेषा दिसून येतात. चंद्ररेषेचा व धनरेषेचा संयोग झाल्यास व त्या दोन्ही रेषा बुधाकडे निमूळत्या असल्यास अशा प्रकारचे लाभदायक प्रसंग वारंवार येतात.

चंद्राच्या उंचवट्यावरील चिन्हें आपलें फल वयाचे २५।२६ पासून देतात. मंगळाचा निकट संबंध धनरेषेशीं येत असल्यास त्या मनुष्यास स्थावर, जमीनजुमला, कॉन्ट्रॅक्ट, वैद्यकी वगैरेपासून फायदा होतो व तो वयाचे २८ पासून सुरू होतो, व त्याच्या हातून धाडसाचीं कामें फार घडतात.

रवि, मंगळ, गुरूचे उंचवटे जोरदार असणें हें भाग्यदायक लक्षण आहे. अशा प्रकारचे योग असलेले पुरुष, समाजाचे पुढारी, व्यवसायांत प्रसिद्ध, वजनदार, कर्तबगार व यशस्वी होतात. त्यांची एकसारखी भरभराट होत असते व उत्कर्ष वाढत जातो. द्रव्यविषयक कमतरता राहात नाहीं पण खर्चही अतिशय होतो.

वर सांगितलेल्या चिन्हांखेरीज व रेषांच्या व शुभयोगाखेरीज बाकीचे सर्व योग निर्धनत्व व दारिद्र्य देणारे समजावे, मात्र त्यांच्याही आयुष्यांत त्यांच्या मानानें कांहीं काल थोडा तरी धनसुख देणारा जातो. पण जन्मतः योग बलवान् नसल्यानें तो

टिकाऊ होत नाहीं हें लक्षांत ठेवावें. त्यांना कोणता काल चांगला आहे हें वरील माहितीवरून सहज काढतां येईल.

कोणत्याही व्यक्तीची सांपत्तिक स्थिति कोणत्या दर्जाची असेल किंवा होईल हें पाहण्याचें हस्तरेषा साधन म्हणजे मुख्यतः धनरेषा, गुरूचा, शुक्राचा आणि मंगळाचा उंचवटा आणि त्या ठिकाणचीं निरनिराळीं चिन्हें हेंच होय. ह्या साधनांचे योगानें कोणत्याही व्यक्तीची सांपत्तिक स्थिति पाहातां येईल.

मनुष्याजवळ द्रव्यसंचय आहे किंवा कर्जबाजारीपणा आहे हें पाहणें ही गोष्ट फार महत्त्वाची असते. कित्येक वेळां संपत्ति पुष्कळ असतांही कर्ज असूं शकतें, पण कोणत्याही मनुष्यास कर्ज आहे असें तेव्हांच म्हणतां येईल कीं, त्या वेळीं त्या मनुष्याच्या सांपत्तिक स्थितीस न झेंपण्याइतकें तें मोठें असेल आणि तें फेडण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें असणार नाहीं. लक्षावधी रुपयांची इस्टेट असणाऱ्या व्यक्तीस १०।४ हजार रुपये कर्ज असल्यास त्याचें फारसें महत्त्व नाहीं. कारण तो तें सहज फेडूं शकेल. परंतु इस्टेट कमी आणि कर्ज जास्ती असें असतां तें त्यास केव्हांच फेडतां येणार नाहीं. याकरितां कर्जाचे योग पाहातांना व सांगतांना फार सावधगिरीनें सांगावे लागतात.

ज्यांच्या हातावर धनरेषा बिघडलेली, तुटक, छेदकारक, अधोगामिनी रेषांनीं युक्त, त्या रेषेवर फुलीसारखें अगर काळ्या तिळासारखें चिन्ह, धनरेषा वक्रगतीनें जाणारी, धनरेषा कांहीं ठिकाणीं अगदीं बारीक व कांहीं ठिकाणीं अगदीं जाड, त्या रेषेवर दुसऱ्या रेषांनीं काटीसारखें चिन्ह होणें इत्यादि गोष्टी असतील तर त्या मनु-ष्यास कर्जाचे व ऋणग्रस्ततेचे योग वारंवार व डोईजड असे येतात. अशा मनुष्याची जन्मतः कितीही संपत्ति असली तरी त्याला अशा नानाप्रकारच्या दुर्बुद्धिकारक व हटकून नुकसानकारक गोष्टी सुचतात कीं, त्यांपासून त्याला सदोदित नुकसान येतें, इतकेंच नव्हे तर अशा गोष्टी करीत असतांना त्यांत आपणांस फायदाच होणार आहे. अशी त्याची खोटी कल्पना असते. असल्या व्यक्ती फार उच्छृंखल, अविचारी आणि निष्कारण घमेंडखोर असतात. नफानुकसानांची अगर हिशेबाबाबतची बेपर्वाई त्यांच्यांत फार राहते. वर दिलेले योग मंगळ, चंद्र, शनी यांच्या उंचवट्यांवर होत असतां सट्टे, शर्यती किंवा अशाच तऱ्हेच्या धननाशक गोष्टी करण्याची त्यांना बुद्धि होते.

हाताच्या रेषांवरून दरमहा या मनुष्याचें उत्पन्न किती आहे हें पहावयाचें असत।

धनरेषेशीं ज्या ग्रहाच्या उंचवटयावरून येणाऱ्या रेषेचा विशेष योग होत असेल त्याप्रमाणें फल मिळतें. चंद्र, मंगळ, गुरु, यांच्या कारकत्वामुळें लाभाचें प्रमाण मोठें असतें. रवि, बुध, शुक्र यांचे लाभयोग मध्यम प्रमाणांत आणि शनीचे लाभयोग अल्प प्रमाणांत होतात. पण रेषा एकमेकांत मिळत असतां किंवा तेथें चिन्ह असतां फलें **विलक्षण लाभदायक** मिळतात.

## धनरेषेचीं फलें.

(II) ही रेषा आयुष्यरेषेपासून थोड्याशा अंतरातून निघून थेट शनीच्या उंचवटया-वर जाते. या रेषेस उद्योगरेषा, शनीची रेषा, नशिबाची रेषा, वगैरे अनेक नांवें आहेत. ही रेषा प्रत्येक मनुष्याचे हातावर असते; परंतु तिचें उगमस्थान मात्र निरनिराळ्या ठिकाणीं होतें; म्हणजे सर्वांच्या हातावर एकाच ठिकाणाहून ही रेषा निघते असें नाहीं. कधीं कधीं मंगळाचे उंचवटयापुढून, कधीं चंद्राचे उंचवटयावरून व कधीं आयुष्य-रेषेंतून सुद्धां निघते. या रेषेचें मुख्य उगमस्थान मनगटाचा मध्यभाग हें होय.

केव्हां केव्हां ही रेषा शनीच्या उंचवट्यावर न जातां, हाताच्या मध्यावर, मस्तक-रेषेवर किंवा अंतःकरणरेषेवर थांबते. अगर रवि, बुध किंवा गुरु यांच्या उंचवटया-कडे जाते. ही रेषा मनगटापासून निघून शनीच्या उंचवटयावर मधल्या बोटाचे पायथ्यापर्यंत येईल तर इतर सर्व चिन्हें जरी वाईट असलीं तरी तो मनुष्य मोठा दैववान व जन्मभर सुख भोगणारा असतो.

ही रेषा दोन्ही हातावर असणें फार चांगलें. फक्त उजव्या हातावर असेल तर स्वकष्टानें व स्वपराक्रमानें द्रव्यलाभ होईल. डाव्या हातावर असल्यास नशिबानें मिळेल.

ही रेषा चंद्राचे उंचवटयावरून निघेल व अंतःकरणरेषेवर तुटेल तर शारीरिक अथवा मानसिक पीडा, प्रेमहानि, सुखांत व्यत्यय, अंतःकरण पीडित.

चंद्रावरून निघेल व तुटक वगैरे नसेल तर सुखदायक. परदेशांत मान व धनलाभ.

मंगळाचे उंचवटयापुढून निघेल तर नेहमीं त्रास, क्लेश, अस्वस्थता.

ही रेषा गुरूच्या उंचवटयावर गेल्यास स्त्रीप्रेम, विलास, लग्नांत फायदा, सौख्य, संतति, हुशार व आनंदी.

धनरेषा मनगटापासून मस्तकरेषेपर्यंत मुळींच नसून त्यापुढें उत्पन्न होईल व शनी-कडे जाईल तर तो मनुष्य जन्मदरिद्री, भिकारी, धनविद्याहीन व मूर्ख असतो.

धनरेषा प्रारंभीं बिघडली असून पुढें चांगली असेल तर वयाचा पूर्वार्ध दुःख व कष्टदायक दरिद्रीपणांत गेला असला तरी उत्तरार्ध फार सुखाचा जातो.

ही रेषा मस्तकरेषेवर किंचित थांबेल तर मनाच्या गैरसमजुतीमुळें, खोटेपणानें अगर कांहीं चुकी झाल्यानें व्यवसायांत, धंद्यात कमीपणा व मानहानीचा योग दाखविते. वरिष्ठ अधिकाऱ्यांची गैरमर्जी होते. वर सांगितल्याप्रमाणें मस्तकरेषा असून आयुष्यरेषा बिघडलेली असेल तर भ्रमिष्ट किंवा बुद्धिभ्रंश होईल.

ही रेषा तुटक असून सारख्या प्रमाणांत नसेल तर चिंताग्रस्त व त्रासलेला असतो.

ही रेषा निघतांना वांकडीतिकडी निघेल व पुढें चांगली असेल तर पूर्ववय व तारुण्य त्रासदायक स्थितींत जाईल. उत्तरार्ध सौख्यकारक.

मात्र ही रेषा मधल्या बोटाचे पायथ्यापर्यंतच गेलेली असावी. बोटावर गेल्यास फल वाईट.

वर सांगितल्याप्रमाणें ही रेषा वांकडी तिकडी असून अंतःकरणरेषेचेही पुढें जाईल तर तरुणपणीं व म्हातारपणीं दुःख व कष्टकारक योग.

अंतःकरणरेषेच्या पुढें ही रेषा चांगली असेल तर मृत्युपूर्वी कांहीं दिवस सौख्य मिळेल.

पूर्वी सांगितलेल्याप्रमाणें ही रेषा ठळक असून जर ती बुधाचे उंचवट्याकडे वळेल तर तो मनुष्य स्वतंत्र धंदा, व्यापार, वक्तृत्व, शास्त्राभ्यास कलाकौशल्य, गणित, हुन्नर यां गोष्टींत यश मिळवितो.

ही रेषा गुरूचे उंचवट्याकडे जाईल, तर शांत, कोणत्याही गोष्टीविषयीं निरिच्छ, समाधान पावलेला, आनंदी, व भगवद्भक्त असतो. मोठा अधिकारी अगर राजकीय पुढारी होतो.

रवीच्या उंचवट्यावर ही रेषा गेल्यास कलाकौशल्य व हुन्नर या विषयांत ख्याति व द्रव्यलाभ, शनीची रेषा—धनरेषा—दुहेरी असेल तर अनीतिकारक गोष्टी करणारा, व शरीरांत व्यंग असा मनुष्य होतो.

ह्या रेषेवर फुलीसारखें चिन्ह असल्यास त्या वयाचे सुमारास चालू स्थितींत फेरफार होतो, व निराळी दिशा लागते.

शनीच्या रेषेस वरच्या बाजूस बारीक रेषा फुटतील तर त्या वयाचे सुमारास सौख्यकारक गोष्टी घडतील. त्याचप्रमाणें खालच्या बाजूस बारीक रेषा फुटतील तर त्या वेळीं दुःखकारक गोष्टी होतील.

# धन रेषा

(III) धनरेषा ही एक ऊर्ध्वरेषा आहे. ही मनगटापासून निघते आणि मध्यमेच्या उंचवट्याच्या दिशेकडे जाते.

ही रेषाच हातावर नसली तर आयुष्यांत घडामोडी होणार नाहींत.

ह्या रेषेला छेदणाऱ्या म्हणजे विघ्न करणाऱ्या रेषा असतील तर धनप्राप्ती आणि धनोपभोग ह्या बाबतींत त्रासच फार.

आरंभींच ( मनगटाजवळ ) दोन मोठे फाटे फुटले असले तर स्त्रीबुद्धि आणि लहर यांच्या कैचींत धनप्राप्तीमध्यें त्रास.

आंगठ्याच्या मूळ प्रदेशांतून निघणाऱ्या रेषेनें धनरेषा छेदली तर स्त्रीच्या नादांत द्रव्यनाश.

आंगठ्याच्या उंचवट्यांत फुली, आणि तिच्या छेदक रेषा जेथें छेद करतील त्या त्या फलांत स्त्रीलोभामुळें विघ्नें.

मनगटाजवळ छिद्र रेषेवर असेल तर मातेला किंवा पित्याला लहाणपणीं धोका त्यामुळें द्रव्यनाश.

धनरेषेच्या जवळ चक्र असूनहि धनरेषा छेदली गेली तरी द्रव्यनाश.

त्याचप्रमाणें मंगळावरील या रेषेनें केलेला छेदहि द्रव्यनाश दाखवितो.

तसाच शुक्रस्थानावरील क्षुपकाहि द्रव्यनाशदर्शक आहे.

अधोगामी, तुटक, क्षुद्र, अशा रेषांना त्रासरेषा म्हणतात.

या त्रासरेषेनें केलेल्या अनेक छेदांमुळें धननाश. ही रेषा एका छिद्या पासून निघते. परंतु ही जर अनामिकेच्या उर्ध्वरेषेमध्यें मिळून जात असेल तर धनप्राप्ति.

अनामिकेच्या उंचवट्याजवळ जर दुशाखी फाटा असेल तर द्रव्यलाभामध्यें विघ्न. तशी मुसंधी येऊनही पदरांत पडत नाहीं.

मधल्या बोटाच्या उंचवट्याकडून छेदक रेषेनें ऊर्ध्वरेषेला अनामिकेजवळ छेद केला तर द्रव्यनाश.

धनरेषा स्पष्ट आणि तळहात जाड, आयुष्यरेषा स्पष्ट, किंवा आंतील द्रव्यरेषा स्पष्ट असें असेल तर द्रव्ययोग चांगला, कार्यांत यश, प्राप्ति उत्तम.

याच धनरेषेवर किंवा तिच्या आसपास चामर चिन्ह असते. (इंग्रजींमध्यें Trident म्हणतात ).

## राजयोगाचें विशेष चिन्ह.

बृहत्संहितेंत आणि सामुद्रिक ग्रंथांत असा एक योग दिला आहे कीं, स्त्रीच्या अगर पुरुषाच्या हस्तमूलापासून उत्पन्न होऊन मध्यमांगुलीवर गेलेली रेषा किंवा पायाच्या तळव्यावर ऊर्ध्वस्थित सबंध रेषा असल तर तो मनुष्य राजा किंवा राज्याधिकारी होतो.

हा योग लक्षांत ठेवण्यासारखा आहे, कारण कांहीं प्रसंगीं हातावर महत्वाच्या स्पष्ट रेषा दिसत नाहींत; पण पायावर स्पष्ट रेषा असते व तो मनुष्य मोठ्या उच्च स्थितींत असतो. याकरितां पायावरील रेषा पाहिली पाहिजे.

ह्या रेषेचें फल राजा होणें किंवा राज्याधिकारी होणें असा आहे. पण सांप्रतच्या काळांत राजा होणें ही गोष्ट राजकुलांत जन्म झाला असतांच आणि तोही सर्वांत वडील असतांच शक्य आहे. लढाया मारून स्वतः कर्तबगारीनें होणारे राजे सध्यां नाहींत. याकरितां राजा होणें अगर मोठा राज्याधिकारी होणें ह्या योगाबरोबरच तो फार श्रीमान्, ऐश्वर्यसंपन्न, संपत्तियुक्त व ज्याला लाखों लोक अनुकूल आहेत असा लोकनायक किंवा प्रमुख पुढारी होणें असाही अर्थ होईल. मोठमोठ्या पुढाऱ्यांच्या हातावर अगर पायावर अशी रेषा असली पाहिजे. कारण सांप्रतच्या काळांत लोकपुढाऱ्यांचें वर्चस्व इतकें दांडगें असतें कीं, सत्ताधाऱ्यांना जी गोष्ट करतां येणार नाहीं ती गोष्ट पुढारी करूं शकतात व कोटयावधि लोक त्यांच्या ताब्यांत व आज्ञेत असतात. महात्मा गांधींनीं प्रतिज्ञापूर्वक १ कोटी रुपयांचा फंड लोकांच्या मदतीनें अवघ्या दोन महिन्यांत जमा केला ही गोष्ट सर्वविश्रुत आहे. त्याचप्रमाणे सन १९२० सालापासून १९३९ सालअखेरपर्यंत महात्मा गांधी, पं. जवाहिरलाल नेहरू, वल्लभभाई पटेल, दे. सुभाषचंद्र बोस इ० पुढाऱ्यांनीं अखिल हिंदुस्थानावर आपलें वर्चस्व ठेवलें आहे हें उघड दिसत आहे.

## राजयोगरेषा.

ही आयुष्यरेषेंतून चंद्रावरून निघून रवीच्या उंचवट्याच्या बोटाच्या पायथ्याशीं जाते. ह्या रेषेस सूर्य रेषाही म्हणतात.

ही चांगली असेल तर हुन्नर व कलाकौशल्य यांत ख्याति, विद्वान्, प्रसिद्ध होईल. या रेषेस बारीक बारीक आडव्या रेषा असतील व रवीच्या उंचवट्यावर

ही चांगली असेल तर हातीं घेतलेल्या कामांत असंख्य अडचणी, परंतु अखेर त्यांत यश येतें.

स्त्रीच्या उंचवट्यावर त्रिशूलाकार रेषा असतील तर संपत्तीनें युक्त होतो.

# प्राचीन ग्रंथांतील माहिती.

आपल्या प्राचीन ग्रंथांपैकीं बहुतेक ग्रंथ पूर्णपणें मनन करण्यांत आले. त्यांत विशेषतः शंख, चक्र, ध्वजा, मत्स्य, रथ, कुंडल, धनुष्य, अंकुश, गज, इत्यादि चिन्हांविषयींच जास्त ऊहापोह केलेला आढळतो. याच शास्त्रावर म्हैसूर, मद्रास वगैरे ठिकाणीं प्राचीन व उत्कृष्ट ग्रंथ आहेत, ते तामिल किंवा तेलगु भाषेत आहेत. त्यांचाही परिचय दुभाषाचें द्वारें करून घेण्यांत आला आणि त्यांतील रेषाविचाराचा सारसंग्रह तत्त्वरूपानें यांत ग्रथित केला आहे.

या शास्त्रावर इंग्लिश ग्रंथ पुष्कळ आहेत. पण त्या सर्व ग्रंथांचें मूळ, भारतवर्षांतील हस्तसामुद्रिक ग्रंथ संपत्ति हेंच आहे. इतर भाषेतही याच्यावर बरेच ग्रंथ आहेत. प्राचीन ग्रंथांतील चिन्हांबरोबर हातावरील रेषा, ग्रहस्थानें वगैरेपासून बोध जास्त होणार असल्यामुळें तो भाग प्रथमतः शक्य तितका सविस्तर दिला असून समजुतीकरितां हाताच्या आकृतीही जोडल्या आहेत. प्राचीन ग्रंथांतील जीं चिन्हें वर सांगितलीं तीं हातावर कशीं उमटतात, हें समजण्याकरितां प्राचीन पद्धतीचीं सर्व चिन्हें ज्या हातावर आहेत असा हातही दिला आहे त्यावरून कळेल.

त्या हातावर सुमारें ५० चिन्हें आहेत. त्यांतील मुख्य चिन्हांचीं फलें थोडक्यांत सांगतों.

हाताचे मध्यभागीं मत्स्य चिन्ह असेल तर त्या मनुष्यास कोणत्याही धंद्यांत व कामांत यश, सांपत्तिक स्थिति चांगली, स्त्रीपुत्र इत्यादि सौख्य मिळेल.

तराजू, ग्राम, किंवा वज्र हीं चिन्हें हातावर असणारा मनुष्य व्यापारामध्यें प्रवीण होतो.

कमळ, धनुष्य, तरवार, अष्टकोण, शंख, चक्र, ध्वजा, वगैरे चिन्हें हातावर असतील तर तो मनुष्य भाग्यवान् व विद्वान् होतो.

त्रिशुल, भाला, रथ, हीं चिन्हें हातावर असल्यास, मोठा अधिकारी व राजपूज्य होतो. पराक्रमी असतो.

सूर्य, चंद्र, लता, त्रिकोण, गज, ग्रह, अश्व, हीं चिन्हें ज्या पुरुषाचे हाताचे

मध्यभागीं स्पष्ट दिसत असतील तो मनुष्य निरंतर सुखी, अतिशय श्रीमंत, पृथ्वी-पालक व वैभवयुक्त होईल.

आंगठयाचे मध्यभागीं यवाप्रमाणें चिन्ह असल्यास निरंतर यशस्वी होतो. त्याचा भाग्योदय जन्मक्षेत्रांत ( म्हणजे जन्म झालेल्या गांवांतच ) होतो.

पांचही बोटावर यवाकार चिन्ह असणें चांगलें. तो मनुष्य स्वदेशांत • परदेशांत कोठेंही असो, करील तें काम सिद्वीस जातें.

यवाकार चिन्ह पूर्ण नसल्यास त्या मनुष्यास कष्टानें यश मिळतें. त्याच्याविरुद्ध शत्रु फार असतात. परंतु त्यांचें कांहीं चालत नाहीं. अशा वेळीं मंगळाचा उंचवटा चांगला असतो, असा अनुभव आहे.

यवाकार चिन्ह आंगठयाचे मध्यभागीं नसून तेथें फक्त एकच रेषा असेल व करांगुलीच्य शेजारचे बोटावर सांध्याच्या ठिकाणीं यवाकार चिन्ह असून गुरु व मंगळ याचे उंचवटे चांगले असतील तर तो मनुष्य फार चळवळ्या, जगाच्या पुढें येणारा, धाडसी, अचाट कामें करून लोकांस चकित करणारा, द्रव्यवान्, कीर्ति मिळविणारा व कुलांत श्रेष्ठ होतो.

**हाताच्या मणिबंधापासून वर सरळ रविस्थानापर्यंत जाणारी रेषा ही आत्मरेषा किंवा ऊर्ध्वरेषा होय.**

ही रेषा स्पष्ट, ठळक, उठावदार, व तांबूस वर्ण असेल तर, कोणत्याही कामांत यशदायक, पराक्रम करविणारी, अधिकार व राज्यलाभ देणारी, व शत्रुनाशक होते. ती रेषा तुटक, बारीक, क्षीण, कृष्णवर्ण, बारीक बारीक फांटे फुटलेली अशा तऱ्हेची असल्यास दुष्ट फल देणारी म्हणजे दारिद्र्य दुःख, चिंता, अपयश, निरंतर, हानि, वगैरे गोष्टी घडतात. ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं,

**सोर्ध्वरेखा विशेषेण राज्यलाभकरी भवेत् ।**
**खंडिता दुष्टफलदा क्षीणाक्षीणफलप्रदा ॥**

हातावरील पांचही बोटांवर "शंख" किंवा "चक्र" हीं चिन्हें असतात. बोटांवर शंखापेक्षां चक्रें जास्त असणें हें उत्तम पुरुषाचें लक्षण असून, तो संपत्तिमान्, विद्वान् व सुखी होतो.

बोटांवर शंख जास्त असतील तर बुद्धिमान्, विद्वान् व श्रेष्ठ, परंतु द्रव्यहीन

असतो. बोटांवरील शंख दक्षिणावर्त, व चक्र वामावर्त, असेल तर हीं दोन्हीं फार श्रेष्ठ फल देतात.

प्राचीन ग्रंथांतील रेषांचा विचार पाश्चिमात्यांच्या रेषाशीं तुलना करतां दिसतो तो असाः—

इंग्लिश ग्रंथांत ज्या रेषेस नशीबाची रेषा असें म्हणतात, त्याच रेषेस प्राचीन ग्रंथाधारें हल्लीं जे लोक सामुद्रिक पाहतात ते धनरेषा-दैवरेषा हें नांव देतात.

त्याचप्रमाणें आयुष्यरेषेस आईची रेषा, व मस्तक रेषेस पित्याची रेषा असें म्हणतात. प्राचीन ग्रंथांतील आयुष्यरेषा म्हणजे आंग्लग्रंथांतील अंतःकरणरेषा होय.

या रेषेची सुरवात करांगुलीच्या मूलापासून धरतात व एकंदर आयुष्य १०० वर्षें आहे अशी कल्पना करून, ती रेषा जर करांगुलीच्या बोटापर्यंतच तुटत असेल तर २५ वर्षें, अनामिकेपर्यंत तुटत असेल तर ५० वर्षें, मधल्या बोटाच्या खालीं तुटली असेल तर ७५ वर्षे व तर्जनीपर्यंत म्हणजे पूर्ण गेली असेल तर १०० वर्षे येणें प्रमाणें आयुष्य धरतात. म्हणजे प्रत्येक बोटापर्यंतच्या रेषेचें २५ वर्षे आयुष्य ठरविलें आहे.

त्या रेषेवर काळा ठिपका, डाग, तीळ, फुली वगैरे असल्यास त्या वयाचे सुमारास शरीरास फार यातना व भयंकर क्लेश सहन करावे लागून मनुष्य संकटें व आपत्ति यांच्या कात्रींत सांपडतो.

भावंडाच्या रेषा—मंगळाच्या उंचवटयाखालीं जितक्या रेषा असतील तितकीं भावंडें असतात, त्यांपैकीं ज्या क्षीण अगर अर्धवट रेषा असतील तितकीं भावंडें मृत अगर त्यांस गंडांतर जाणावें.

संततीच्या रेषा-शुक्राच्या उंचवटयावर उत्तरदिशागामी अशा ज्या रेषा असतात त्या संततिदायक रेषा होत. त्या रेषावर असणाऱ्या भंगकारक रेषा संततिनाश, अल्पायुष्य वगैरे प्रकार घडवितात.

आंगठयावर आकाशासारखें चिन्ह असल्यास किंवा चतुष्कोण, त्रिकोण, हीं चिन्हें असल्यास, वरिष्ठ नौकर, कारभारी व अधिकारी होतो.

तर्जनीवर ऊर्ध्वरेषा असल्यास चांगला नौकर व चाणाक्ष असतो, तर्जनीवर फुल्या असल्यास तो मनुष्य प्रसिद्ध, कल्पनातींत धाडस करणारा, आनंदी व वैभव-युक्त असतो. त्यास विद्या थोडीच येईल, परंतु तो आपल्या कर्तबगारीनें मोठमोठ्या विद्वान लोकांसही मागें सारील. प्रयत्नवादी असतो.

करांगुली व शेजारचें बोट या दोन्ही बोटांवर तुटक अर्धवट, अशा रेषा असतील तर सुखदुःखाची सारखी चढाओढ चाललेली असते म्हणजे सुख व दुःख यांपैकीं कोणतीही स्थिति कायम राहत नाहीं. कांहीं दिवस चांगले, कांहीं दिवस वाईट असें नेहमीं चालतें.

करांगुलीमूलापासून तर्जनी, मध्यमा व अनामिका या बोटापर्यंत जाणारी रेषा अनुक्रमें पूर्णायु, मध्यमायु व अल्पायु करिते. ही रेषा बारीक, किरकोळ, क्षीण असल्यास अशक्त, भ्याड व दुर्जन असतो.

# स्त्री-सामुद्रिक.

स्त्रियांच्या हस्तरेषावरून भविष्यकालीं घडणाऱ्या गोष्टींचा विचार करतांना पुरुषां-प्रमाणें त्यांचा उजवा हात न पाहतां डावा हातच पहावा असें कांहीं सामुद्रिकांचें म्हणणें असून, सामान्यतः त्यांच्या डाव्या हातावरूनच भविष्य सांगण्याची पद्धत आढळून येते. या बाबतींत आमचें मत असें आहे कीं, स्त्रियांच्या उजव्या आणि डाव्या अशा दोन्ही हातांवरील रेषा पाहून नंतरच फलनिर्णय करावा. कारण कित्येक वेळां डाव्या हातावरील रेषा स्पष्टपणें उमटलेल्या नसतात. स्त्रियांचा डावाच हात पाहाण्याचें कारण काय, असें सामुद्रिक जाणणारांस विचारल्यास बुद्धीला पटेल अशाच तऱ्हेचें उत्तर त्याजकडून सहसा मिळत नाहीं. परंतु स्त्रियांच्या डाव्या हाता-वरील रेषा पाहण्याचें कांहीं तसेंच प्रमुख कारण असलें पाहिजे; आम्हांस वाटतें तें हें कीं, डाव्या हातावरील रेषा व चिन्हें यांजवरून नशिबानें मिळणाऱ्या गोष्टींचा खुलासा होतो व उजव्या हातावरील रेषा वगैरेवरून प्रयत्नानें कोणत्या गोष्टी कितपत साध्य आहेत, याचें स्वरूप समजतें. अर्थात् पुरुष हा प्रयत्न व स्त्री हें नशीब अशा विचारसरणीनेंच पुरुषांचा उजवा आणि स्त्रियांचा डावा हात पाहाण्याची शास्त्र-कारांनीं पद्धत ठेविली असावी. या पद्धतीचा अवलंब केला म्हणजे स्त्रियांचा डावा हात पहावा-हें सोपपत्तिकच सिद्ध झालें. एवंच हस्तसामुद्रिक पाहतांना दोन्ही हातां-वरील रेषा व चिन्हें विचारांत घेतल्याखेरीज कोणताही निर्णय करूं नये हें मुख्य तत्त्व लक्षांत ठेवावयास सांगूनही आम्ही असें सांगतों कीं, स्त्रियांचा डावा व उजवा हात पहाणें म्हणजेच त्या शास्त्रांतील प्रमुख तत्त्वांपैकीं एक तत्त्व पाळण्यासारखें आहे, व त्या दृष्टीनें त्याचें महत्त्वही विशेष आहे.

आतां स्त्रियांच्या हातांवरून कोणत्या गोष्टींचा विचार कसा करावयाचा हें पाहूं. कांहीं सुशिक्षित, पदवीधर, उच्च शिक्षण मिळविलेल्या आणि स्वतंत्रपणें उपजीविकेचा व्यवसाय करणाऱ्या अपवादात्मक स्त्रिया सोडल्यास, वास्तविक स्त्रिया ह्या अद्याप तरी बहुतांशीं परतंत्रच आहेत. मग त्या सुशिक्षित असोत वा अशिक्षित असोत. स्वतंत्रपणें वावरणाऱ्या स्त्रिया अद्याप तरी फारच थोड्या आढळतात. पुढें काय होईल कोणीं सांगावें! स्त्रियांच्या आयुष्यांतील बहुतेक गोष्टी त्यांच्या पतीच्या वैभवावर, किंवा ऐश्वर्यावर किंवा इष्टानिष्ट परिस्थितीवर अवलंबून असतात. अर्थात् त्यांच्या स्वतंत्र म्हणून ज्या कांहीं गोष्टी आहेत अगर त्यांच्या नशिबाचे जे कांहीं योग घडणें शक्य आहेत ते थोडक्यांत आम्ही सांगतों.

ज्या स्त्रीच्या हातावर शनीचा अगर चंद्रशुक्राचा उंचवटा अगदीं सपाट झालेला दिसेल, तसेंच त्याच उंचवट्याच्या सपाट जागेवर निरनिराळ्या तुटक तुटक रेषा किंवा दुसरीं कांहीं अपूर्ण व अर्धवट चिन्हें दिसत असतील, ती स्त्री आपमतलबी, स्वार्थी, हेकेखोर, गर्वानें व अहंपणानें युक्त, छानछोकी व डामडौल करणारी, परोपकारापासून परावृत्त, दंभ माजविणारी व सत्य असत्य यासंबंधाची भीति अगर पर्वा न बाळगणारी अशी असते.

तिच्या हातून सत्कर्माला मदत किंवा साह्य मिळणें दुर्लभ. स्वभाव फार तिरस्करणीय; बोलण्यांत मात्र अघळपघळ, परंतु कृतीनें अत्यंत हिकमती करणारी, परोत्कर्ष व दुसऱ्याचें बरें न पाहवणारी अशी होते. भक्ति, श्रद्धा, ईश्वरोपासना वगैरे गोष्टींकडे लक्ष न राहतां प्रांपचिक क्षणिक सुखाची आवड फार. दुसऱ्याची निंदा व न्यूनत्व काढून आत्मप्रौढी मिरविण्याची अनावर इच्छा व दुरुत्तरें बोलण्यांत प्रवीण, अंतःकरणाची दुष्ट व कपटी असते.

ज्या स्त्रीच्या हातावर चंद्रशुक्राचा उंचवटा उठावदार, तेजस्वी व कोणत्याही तुटकतुटक व छेदकारक रेषांनीं रहित असा असेल, ती स्त्री सुस्वभावी, प्रेमळ, दयाळू, परोपकारी, उदार, सहनशील व दुसऱ्याकरितां कष्ट करणारी व दुःख भोगावयासही तयार अशी दिसते. प्राचीन परंपरेचा अभिमान, ईश्वरावर पूर्णनिष्ठा व श्रद्धा आणि आचार, विचार व शील फार उत्तम असतें. तसेंच ती अंतःकरणापासून सत्कर्म करणारी व निष्कपटी होते.

स्त्रियांच्या हातावरील उंचवट्यावरून पुढें दिल्याप्रमाणें सामान्यतः निर्णय करावा. कालानिर्णय कसा करावयाचा हें पुढें दिले आहे. स्त्रियांच्या आयुष्यांत प्रथम अत्यंत

महत्त्वाची गोष्ट जर कोणती पहावयाची असेल तर ती सौभाग्ययोग व पतिसुख ही होय. त्याच्याच बरोबरीची दुसरी गोष्ट म्हणजे भाग्य व ऐश्वर्यकारक योग, संतति, घरदार, जमीनजुमला, नौकरचाकर, सासरच्या आणि माहेरच्या आप्तवर्गांचे सुख, गाडीघोड्यांचें ऐश्वर्य, मानसन्मान या गोष्टी वस्तुतः दुय्यम प्रतीच्या आहेत. सध्यांच्या काळांत ह्या दुय्यम गोष्टींना देखील कोणी महत्त्व देत असतील व देतात, परंतु तें योग्य नव्हे. एके काळीं प्रचंड राजैश्वर्य भोगलेल्या व सर्वसत्ता चालविलेल्या स्त्रियांची स्थिति, पतीच्या पश्चात् सर्व ऐश्वर्य असतांही किती हलाखीची, पारतंत्र्याची व कष्टमय होते याची अनेक उदाहरणें आज प्रत्यक्ष आहेत. मनुष्याचें जीवन ही गोष्ट तर प्रत्येकास महत्त्वाची आहेच, परंतु त्यापेक्षांही स्त्रियांचें सौभाग्य व पतिसुख ही गोष्ट त्यांना जास्त महत्त्वाची आहे, म्हणून आतां क्रमाक्रमानें या सर्व गोष्टींचा थोडक्यांत विचार करूं.

## शरीरप्रकृति, रोग, आजार, आयुष्य.

या सर्व गोष्टींचा विचार आयुष्यरेषा आणि शनि व शुक्र यांचे उंचवटे यावरून होतो. तसेंच प्रत्येकाच्या मानसिक स्थितीचें दिग्दर्शन चंद्राच्या उंचवटयावरून करतां येतें.

ज्या स्त्रीच्या हातावर आयुष्यरेषा पूर्ण उठावदार, तेजस्वी व अधोगामी बारीक बारीक रेषांनीं रहीत अशी असेल, त्या स्त्रीस शरीरसौख्य, आरोग्य, मानसिक स्वस्थता वगैरे सर्व गोष्टींचे अनुकूल योग आहेत असें समजावें; अर्थात् त्या स्त्रीची प्रकृति निरोगी व सशक्त राहील. त्याचप्रमाणें ज्या स्त्रीच्या हातावरील शनि व शुक्र यांचे उंचवटे चांगले उठावदार असून आंगठयावर यवांचें चिन्ह पूर्ण असेल व अंतःकरणरेषा आणि आयुष्यरेषा यांना कोणतीही दुसरी रेषा छेद करीत नसेल, त्या स्त्रीस शरीरसौख्य चांगलें मिळेल. ती सशक्त व निष्काळजी राहील. आयुष्यरेषेला जर दुसरी मोठी रेषा छेद करील तर ती शारीरिक क्लेश देणारी आहे असें समजावें, व शनिशुक्राचे उंचवटे बलवान् नसल्यास मोठालीं दुखणीं त्या वेळीं येतील हें निश्चित होय. चंद्राचा उंचवटा पूर्ण जोरदार नसल्यास व त्या उंचवट्यावर किरकोळ रेषा किंवा अभेवट चिन्हें असल्यास किंवा उंचवटा व चिन्हें अस्पष्ट दिसत असल्यास मानसिक स्थिति चांगली रहात नाहीं. चिंता, व्यग्रता अस्वस्थता व मनाला कांहींना कांहीं तरी हुरहुर विशेष राहते.

आयुष्यरेषा किंवा अंतःकरणरेषा दुहेरी, साखळीसारखी असल्यास तो योग वारंवार दुखणीं व आजार उत्पन्न करणारा असला तरी, त्याच योगामुळें कौटुंबिक व आप्तवर्गाचें सौख्य उत्तम मिळतें. अंतःकरणरेषा व आयुष्यरेषा यांना ज्या ठिकाणीं छेदकारक रेषा असतील त्या वेळीं आयुष्यांत महत्त्वाचे फेरफार होतात. अनेक संकटें उत्पन्न होऊन शारीरिक क्लेश व आप्तवर्गाचे विरह दुःख त्या स्त्रीस भोगावें लागतें. व आजारामुळें तिची प्रकृतिही चांगली राहात नाहीं.

## सांपत्तिक योग.

भनरेषा पूर्ण बलवान् आणि आंगठ्यावर यवाकार चिन्ह पूर्ण असून रवीच्या व गुरूच्या उंचवट्यावर + चिन्ह, त्रिकोण अगर एकच ठळक रेषा असून ते उंचवटे चांगले असल्यास त्या स्त्रीचें आयुष्य श्रीमंतींत व ऐश्वर्यांत जातें. तिच्या आयुष्यांत कोण-त्याही प्रकारची कमतरता राहात नाहीं. अशा स्त्रीस तिच्या विवाहानंतर विशेष भाग्योदय व उच्च स्थिति येते. भनरेषा आणि चंद्र व शुक्राचे उंचवटे चांगले ठळक असल्यास तिला स्थावर जमीनजुमला, घरदार, नोकरचाकर वगैरेचें भरपूर सुख मिळतें. खरोखरी ती "गृहलक्ष्मी" होते. असे योग असलेली स्त्री ज्या ठिकाणीं जाईल त्या घराचा व कुलाचा उत्कर्ष आणि भाग्योदय झाल्याखेरीज कधींही राहत नाहीं. ही स्त्री यशस्वी, पुण्यवान्, दैववान् व सर्व प्रकारचें सौख्य भोगणारी होते.

## सौभाग्ययोग, पतिसौख्य

ज्या स्त्रीच्या हातावर करांगुलीखालीं असलेली, मणिबंध रेषेंत मिळणारी किंवा आयुष्य रेषेस संलग्न अशी विवाहरेषा स्पष्ट, ठळक व बारीकसारीक रेषांनीं रहित अशी असेल, त्या स्त्रीस पतिसौख्य फार उत्तम मिळतें. त्या रेषेचें तोंड जर बुधाकडे वळेल तर पति सुशिक्षित व विद्वान् मिळून संसार अत्यंत सुखावह होतो. विवाहरेषेचें तोंड मंगळाकडे वळलेले असल्यास पति पराक्रमी, उद्योगी, धाडसी, पुढारी व सर्वांवर छाप टेवणारा मिळतो. विवाहरेषेवर जर निर-निराळ्या बारीक रेषा असतील तर पतिसौख्य सामान्य व प्रापंचिक त्रास फार होतो. ही रेषा अंतःकरणाच्या रेषेला जितकी मिळती व जवळ असेल तितका सौभाग्ययोग जास्त महत्त्वाचा असून विवाह अल्पवयांत होतो. या रेषेवर फांटे व तुटक रेषा असल्यास विवाहास उशीर व अडचणी येतात. स्त्रियांच्या हातावरील भनरेषा व

चंद्र-शुक्र-गुरूंचे उंचवटे अत्यंत उठावदार असल्यास तो योग धनवान्, श्रीमान् व संपत्तीनें युक्त करणारा आहे. अशा स्त्रीला स्थावर वगैरे सर्व प्रकारचें सुख मिळतें. अनेक नोकर-चाकरांवर अधिकार चालविणारी ती होते. तसेंच तिच्या माहेरची आणि सासरची उच्च स्थिति असते. याच्या विरुद्ध योग असतांना विरुद्ध, प्रतिकूल, कष्टदायक व दुःखकारक गोष्टी घडतात.

मणिबंधरेषेंतून निघून शुक्राच्या उंचवट्यावरून किंवा स्वतंत्रपणें विवाहरेषा किंवा कामासक्तरेषा अंतःकरणरेषेला, आयुरेषेला किंवा दैवरेषेला मिळत असेल तर तो अखंड सुखाचा दांपत्य योग्य होतो. अशा योगाच्या स्त्रिया पतीसौख्य आजन्म भोगतात, दीर्घायु होतात व त्यांस उत्तम संतती सुख मिळते.

## संततिसौख्य

संततिकारक ज्या रेषा सांगितल्या आहेत, त्या छेदणाऱ्या रेषांनीं युक्त नसतील तर त्या स्त्रीस संततिसौख्य फार उत्तम मिळतें. संततिकारक रेषा जितक्या असतील तितकी संतति होते. अर्धवट असतील तितक्या मुलांस अपाय व अनिष्ट योग संभवतात. संततीच्या बाबतीत ही गोष्ट केव्हांही लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं, गुरूचा उंचवटा व रवीचा उंचवटा यांवरील रेषा अनुकूल व ठळक असल्याखेरीज पुत्रसंततीचें सुख मिळत नाहीं. ते उंचवटे चांगले असल्यास पुत्रसंतति जास्त. शुक्र व चंद्राचे उंचवटे ठळक असल्यास कन्यासंतति विशेष. याप्रमाणे एकंदर गोष्टींचा निर्णय करावा.

**संततीच्या बाबतींत पती आणि पत्नी अशा दोघांच्या हातावरील संततीकारक रेषा व योग पाहून निर्णय करणें शास्त्रशुद्ध आहे. दोघांच्या हातावर पूर्णयोग असतां फलाची निश्चितता.**

## कालनिर्णय

या गोष्टी कोणत्या वेळीं घडणार याचा आतां विचार करूं.

गुरूचा उंचवटा चांगला किंवा वाईट असल्यास वय वर्षे १६ ते २२ पर्यंत त्याचा शुभाशुभ परिणाम होतो. बाल्यपणीं म्हणजे वयवर्ष १६ पर्यंत रवि व चंद्र या दोन उंचवट्यांमध्यें जो जोमदार असेल त्यावरील रेषा व आयुष्य आणि धनरेषा यांच्या प्रारंभीच्या रेषा यावरून होणारा परिणाम जाणतां येतो. तसेंच गुरूच्या उंचवट्यावरूनच १६ ते २२ वर्षांपर्यंत, शुक्राच्या उंचवट्यावरून २२ ते २७ वर्षां-

पर्यंत, मंगळाच्या उंचवट्यावरून २८ ते ३२ वर्षांपर्यंत, बुधाच्या उंचवट्यावरून ३३ ते ३६ पर्यंत, व शनीच्या उंचवट्यावरून ३६ ते ४६ पर्यंत, व त्याच्यापुढील आयुष्याच्या अखेरपर्यंत होणाऱ्या शुभाशुभ गोष्टींचा निर्णय ऊर्ध्वरेषेवरून करतां येतो. शिवाय आयुष्यरेषा, अंतःकरणरेषा आणि भनरेषा या तिन्हींवरून आयुष्ययोगाचा अंदाज ठरवून, एकंदर पूर्ण रेषेला जर अमुक आयुष्य तर $\frac{1}{4}$ किंवा $\frac{1}{2}$ रेषेला आयुष्याचा कोणता वर्षात्मक काल येतो, हें पाहून त्यावरून घडणाऱ्या गोष्टीबद्दलचा काल निश्चित ठरवावा. आयुष्यरेषा पूर्ण जोमदार अंतःकरणरेषाही तशीच, शनिगुरु व चंद्र यांचा उंचवटा उठावदार असल्यास (आयुष्याला धोका देणारी छेदकरेषा नसल्यास) आयुष्य ७० वर्षेपर्यंत आहे असें समजावें. रेषा व उंचवटे मध्यम असल्यास आयुष्य ५० वर्षे, रेषा व उंचवटे निर्बल असल्यास आयुष्य ३५ ते ४९ वर्षे. आयुष्यरेषा विच्छिन्न, प्रतिकूल रेषा व चिन्हें फार, आयुष्यरेषेवर काळा तीळ असें असतां आयुष्य २५ ते ३४ वर्षे. यापेक्षांहि अनिष्ट योग असतां अल्पायु असें स्थूलमानानें समजावें.

ज्या स्त्रीच्या हातावरील आयुष्यरेषा व रविमंगळाचे उंचवटे बिघडलेले असतील, त्या स्त्रीस पित्तविकार, ज्वरपीडा, रक्तदोष व रक्तनाश करणारे अन्य विकार होतात व नेत्रांस पीडा उद्भवते. ज्या स्त्रीच्या हातावरील चंद्र, बुध. व शुक्र यांचे उंचवटे बिघडलेले व आयुष्यरेषा प्रतिकूल असेल, त्या स्त्रीस कफविकार आणि रक्ताभिसरणांत दोष उत्पन्न होऊन नेहमीं अशक्तता राहते. तसेंच शनि-गुरूचे उंचवटे बिघडल्यास वातरोग आणि पोटांत नाना प्रकारच्या व्याधि होतात. रेषा व उंचवटे चांगले असल्यास व्याधिनाश होऊन आरोग्य मिळतें. जन्मापासून अशक्त व रोगी स्त्रीची आयुष्यरेषा क्षीण व रविचंद्राचे उंचवटे दुर्बल असतात.

ज्या स्त्रीच्या हातांवरील शुक्ररेषा कमजोर व क्षीण झालेली असते, त्याचप्रमाणें त्या रेषेचा मंगळाच्या रेषेशीं तंतुमय किंवा युग्म रेषांनीं संबंध येतो आणि अशाही स्थितींत त्यावर मारक रेषा असतात, त्या स्त्रीस स्त्रियांचे विकार, गर्भाशयस्थ दोष व विकृति, कंबरेंत कळा येणें, हातापायांत दांब उत्पन्न होणें, मूत्राशयाचे विकार, मासिक निसर्गजन्य स्थितींत कमजास्त कालावधी, आणि ह्या सर्वांमुळें भयंकर अशक्तता, मस्तकास त्रास, अंगांत कणकण येणें, इत्यादि अनारोग्यकारक गोष्टी होतात.

## " हस्तसंजीवनी "प्रयुक्त

# विविध आणि विशेष योगांचा निर्णय

( १ ) **आजीव रेषा-कायमरेषाः**—कोणताही मनुष्य जन्माला आल्यापासून तो मृत होईपर्यंत, सर्वांच्या हातावर ( क्वचित कांहीं अपवाद सोडल्यास ) **दैवरेषा, आयुष्यरेषा, अंतःकरणरेषा** आणि **मस्तकरेषा** ह्या चार रेषा बहुतकरून असतात. त्यांत एखाद्या हातावर यांपैकीं एक रेषा स्पष्ट व जोरदार असेल आणि बाकीच्या रेषा साधारण असें असूं शकेल किंवा कांहींच्या हातावर दोन, कांहींच्या हातावर तीन आणि कांहींच्या हातावर चारी रेषा स्पष्ट असतील. कांहीं हातावर दोन रेषा चांगल्या व बाकीच्या दोन रेषा तुटक, अर्धवट किंवा मध्येंच लहान आणि प्रारंभीं व शेवटीं त्यापेक्षां जाड अशा असतात. पण त्या कशाही असल्या तरी बहुतेकांच्या हातावर ह्या महत्त्वाच्या रेषा असतात हें खरें. आणि ह्या **चार रेषा** ज्यांच्या हातावर स्पष्ट व निर्वेध असतात तो हात यशस्वी, भाग्यवान् व विद्वान् अशा व्यक्तीचा असतो. ह्या चार रेषांना आजीव रेषा किंवा कायमच्या रेषा असें म्हणतात. मग त्या मूळापासून अखेरपर्यंत स्पष्ट, उठावदार असोत किंवा मूळापासून न निघतां मधूनच निघालेल्या असोत. त्यांचे नांव **आजीव रेषा** किंवा **कायमच्या रेषा** हेंच आहे.

( २ ) वर दिलेल्या कायमच्या चार रेषांशीं सहकार्यानें किंवा तुटक तुटक रेषांनी संबंध जोडणाऱ्या ज्या रेषा त्या **कार्योत्पन्न रेषा**. ह्या रेषा कोणतेंही शुभ किंवा अनिष्ट कार्य किंवा फल घडण्यापूर्वीं कांहीं काल उत्पन्न होतात आणि तें फल घडल्यानंतर अजिबात नष्ट होतात किंवा अगदीं निस्तेज अशा स्वरूपांत राहतात. ह्या **कार्योत्पन्न** किंवा **कार्यदर्शनरेषा** अर्थातच वेळोवेळीं नव्या उत्पन्न होतात आणि कालांतरानें विराम पावतात.

( ३ ) ज्याप्रमाणें ह्या रेषा मुख्य रेषांशीं संबंधित अथवा स्वतंत्रपणें पण महत्त्वाच्या रेषांशीं जुळून अशा दिसून येतात, तशाच त्या, ग्रहांच्या उंचवट्यावरही उत्पन्न होतात आणि विराम पावतात. त्यांचीं फलें रेषांच्या व उंचवट्याच्या मुख्य फलानुरोधानेंच पहावीं.

( ४ ) हाताच्या मधल्या बोटाचा पायथा ही पूर्वदिशा, बरोबर त्याच्यासमोर मणिबंधाचा मध्यभाग ही पश्चिम दिशा, मंगळाचा उंचवटा ही उत्तर दिशा व गुरूचा

उंचवटा आणि शुक्राचा उंचवटा याचा बरोबर मध्य अर्थात मंगळाच्या उंचवट्याच्या नक्की समोरचा भाग ही दक्षिण दिशा याप्रमाणें मुख्य चार दिशा असून त्याच्या दरम्यानच्या बाकीच्या चार दिशा नेहमींप्रमाणें समजाव्या.

**कोणत्याही महत्त्वाच्या रेषेवर** उमटणाऱ्या **ऊर्ध्वगामी रेषा** किंवा **विकासरेषा** ह्या सूक्ष्म असोत वा स्थूल असोत त्या मुख्य रेषेच्या फलाची वृद्धी करितात. **सूक्ष्म** किंवा **तंतुमय अस्पष्ट** असतील तर फल मिळण्याचें प्रमाण सामान्य आणि स्पष्ट व रेखीव असल्यास फल पूर्णत्वानें मिळतें. कोणत्याही मुख्य रेषेंतून न निघतां स्वतंत्रपणें अशा रेषांचा उगम व समाप्ती होईल तर, ज्या रेषेशीं ह्या रेषांचा सहाय्यक किंवा छेदकारक संबंध येईल, त्या रेषेसंबंधीं अगर असा कोणत्याही रेषेशीं संबंध येत नसेल, तर ज्या ग्रहाच्या स्थानाशीं त्यांचा संबंध पोंचत असेल, त्या स्थानाच्या ग्रहासंबंधींच्या फलावर त्यांचा परिणाम घडतो. तात्पर्य, मुख्यरेषांखेरीज अशा ज्या रेषा, त्या **फलवर्धक, भाग्यप्रवर्तक** आणि **फलविकासरेषा** होत.

( ५ ) हातावरील चार मुख्यरेषांखेरीज त्यांच्या बरोबरीच्या महत्त्वाच्या किंवा जवळ जवळ त्यांच्यासारखे फल देणाऱ्या अगर त्यांपेक्षांही अधिक महत्वाचें व सर्वंकष फल देणाऱ्या आणखी कांहीं रेषा आहेत. त्या अशाः—

( १ ) चंद्रस्थानापासून, शुक्रस्थानापासून अगर त्यापुढें मध्यंतरीं कोठूनही निघून सरळ रविस्थानावर जाणारी **आत्मरेषा** किंवा **सूर्यरेषा.**

( २ ) मंगळाच्या उंचवट्यावरून निघून गुरूच्या उंचवटयाकडे जाणारी **भौमरेषा** किंवा **पराक्रमरेषा.**

( ३ ) चंद्राच्या स्थानापासून निघून सरळ गुरुस्थानावर जाणारी **सत्त्व रेषा.**

( ४ ) शुक्राच्या स्थानावरून निघून सरळ रवी अगर बुधाच्या उंचवटयावर जाणारी **शुक्र रेषा.**

( ५ ) शुक्रस्थानावरून गुरुस्थानीं जाणारी **शुक्रोर्ध्वरेषा.**

( ६ ) रवि, गुरु किंवा बुध यांच्या स्थानावर सरळ व स्पष्ट अशी मोठी एक किंवा दोन रेषा. ह्या रेषांचा संयोग अंतःकरणरेषा किंवा शीर्षरेषा ह्या दोन्ही रेषांशीं झालेला असल्यास विशेष श्रेष्ठ.

वर दिलेल्या उत्कृष्ट कारकरेषांपैकीं एक किंवा अनेक योग ज्यांच्या हातावर असतील ते पुरुष दैववान्, स्वपराक्रमानें व नशिबाच्या साहाय्यानें जगांत सुकीर्ति,

श्रेष्ठपद, अधिकार, आणि संपत्ती या गोष्टींचा उपभोग घेणारे, विद्वान् व यशस्वी असतात. अशा पुरुषांची जन्मकाळची स्थिती कितीही दारिद्र्याची व जीवन कष्टमय असो पण ते आयुष्याचे मध्यभागीं उच्च परिस्थितींत गेलेच पाहिजेत,अशी परिस्थिती त्यास येते. मग जे जन्मतःच साधारणतः चांगल्या स्थितींत असतील त्यास त्यापेक्षां अनेक पटीनें उच्च स्थिती येईल हें सांगावयास नको.

ह्या सर्व रेषांना (संचित) फलवर्धक, भाग्यप्रवर्तक, संपत्ति संपन्न आणि शुभफल विकास रेषा म्हणतात. रेषांचे फलदायक सामर्थ्य हे त्यांच्या स्थानावरून आणि, विशेषतः ज्या रेषांशीं त्यांचा सन्निध संबंध येत असेल त्यावरून, तसेंच त्यांच्या स्वरूपावरून ठरवावें.

आतां भाग्यनाशकरेषा, संपत्तीसंकोच अर्थात दारिद्र्यरेषा, निरुपयोगी रेषा आणि सर्व सामान्यतः द्रव्यदृष्ट्या नाशकारक रेषा कोणत्या हें सांगतों.

( १ ) वर सांगितलेल्या चांगल्या योगांपैकीं कोणत्याहि योगकारक रेषा हातावर नसणें. ( २ ) ज्या रेषा असतील त्या तुटक तुटक, अगदीं बारीक, ज्या रेषेवर असतील त्या रेषेच्या खालच्या बाजूस बारीकसारीक अंकूर फुटलेल्या, अधोगामी रेषांनीं युक्त, महत्त्वाच्या रेषा खंडित, महत्त्वाच्या रेषांवर फुली किंवा फुली X सारखे चिन्ह होणाऱ्या रेषा, ग्रहांच्या उंचवट्यावर भरमसाट आडव्यातिडव्या व किचकट रेषा, आयुष्य व अंतःकरणरेषा ठिकठिकाणीं भंग पावलेली, मुख्यरेषावर काळातीळ, कोणत्याही रेषेचें आरंभीं X अशा चिन्हानीं सुरवात. हे सर्व प्रकार अनिष्ट रेषा आणि फलनाशक रेषांचें समजावें. यांनाच फलनाशन "कण्टक रेषा" किंवा भाग्यविग्रह रेषा म्हणतात. अशा रेषा ज्यांच्या हातावर असतील त्या व्यक्तींना संबंध जन्मभर हालअपेष्टांत, संकटकारक परिस्थितींत आणि हरघडीं मनाला जिकीरीच्या स्थितींत ठेवणाऱ्या वातावरणांत दिवस काढावे लागतात.

जन्मतः धनरेषा आणि आयुष्यरेषा ह्या रेषांना अशा अधोगामी कटक किंवा विग्रहरेषांचा बाध येत असेल, तर अशा व्यक्तींच्या धनयोगाला बंधन प्राप्त झालें आहे असें समजावें. याचा अर्थ हा कीं, अशा योगाच्या व्यक्तींना वडिलोपार्जित बरेंच मोठें अवजड व अवघड स्वरूपाचें कर्ज असण्याचा संभव असतो. त्यांची स्थावर इस्टेट, जमीनजुमला, घरें, इमारती, वाहनें इत्यादि गोष्टी जरी वरून पुष्कळ दिसल्या तरी त्या ऋणयोगाच्या बंधनांत गुंतलेल्या असतात आणि त्यामुळें त्या व्यक्तीस मोठा पेंचप्रसंग असतो व त्यांतून सुटणें फार दुर्घट होतें.

अशा कंटकरेषा किंवा विग्रहरेषा, धनरेषा आणि आयुष्यरेषा यांपैकीं एकाच रेषेस मिळालेल्या असतील व बाकीचे योग भाग्यवर्धक असे असतील तर आयुष्याचे ३२ वर्षांपर्यंतच अनिष्ट योगाचा त्रास होतो. त्यापुढें कंटकरेषांचें फल नष्ट होतें. आणि दैवरेषेचें फल प्रबल होतें. ज्यांच्या हातांवर आयुष्याच्या उत्तरार्धातील कालांत धनरेषा, आयुष्यरेषा किंवा मस्तकरेषा यांच्यावर कंटकरेषांचा प्रादुर्भाव होईल, त्यांना वयाच्या ४२ ते ४५ च्या पुढें संपत्ति. संकोच आणि द्रव्यविग्रह, पैशाच्या टंचाईचे कमीपणाचे, व ऋणग्रस्ततेचे योग येतील.

हातावरील कोणत्याही रेषेवर रेषेच्या आरंभीं किंवा रेषेच्या इतर कोणत्याही भागांत कृष्णवर्णाय तीळ जर बिलगलेला असेल, रेषेपासून तुटक किंवा अलग नसेल, तर तें चिन्ह त्या रेषेच्या फलाचा नाश, कमीपणा. अर्धवटपणा, व्यत्यय, फलभेद, अल्पांत अल्प फल, ऐनवेळीं मनाला धक्का देणारी स्थिती, विपरीतता आणि विघ्न असे प्रकार उत्पन्न करणारें आहे. अर्थात हें कृष्णवर्णाय तीळचिन्ह रेषेवर ज्या ठिकाणीं असेल त्या स्थानीं आयुष्याचें जें वर्ष किंवा जो काल येत असेल, त्या काळीं तशा प्रकारचें फल किंवा परिस्थिती विशेष प्रकारानें येणार असें समजावें.

ज्याप्रमाणें कृष्णवर्णाय तीळचिन्हाचें फल वाईट आहे, त्याचप्रमाणें कोणत्याही रेषेवर फुली ( × गुणिलें चिन्ह ) कात्री ( कर्तरी ) सारखें चिन्ह किंवा जाड व बारीक छेदकारक रेषा हीं सर्व चिन्हें शुभफलाचा नाश, संकटाची उत्पत्ती, त्या रेषेच्या बाबतींत मिळणाऱ्या फलांत गौणत्व, उणेपणा आणि मनोभंग करणाऱ्या प्रतिकूल गोष्टी असे प्रकार घडविणाऱ्या आहेत. ह्या प्रकारांचें प्राबल्य किती आणि मुख्य शुभफलदायक रेषेच्या फलांचें प्राबल्य किती, हें हातावरील महत्त्वाच्या इतर रेषा, ग्रहस्थानावरील योग आणि मुख्य रेषांवर घडणारी त्रिकोणादी महत्त्वाचीं श्रेष्ठचिन्हें यावरून तारतम्यानें ठरवावें.

हस्तमूलाचे ठिकाणीं ऊर्ध्वगामी मत्स्यचिन्ह असेल तर तें अत्यंत शुभफल देणारें चिन्ह आहे. त्याचप्रमाणें धन ऊर्फ दैवरेषा. अंतःकरणरेषा, आयुष्यरेषा आणि मस्तकरेषा ह्या चार रेषांवर इतर महत्त्वाच्या रेषांमुळें त्रिकोण घडत असेल तर किंवा सूर्यस्थानावर उभ्या दोन रेषा जोरदार असतील, त्या स्थानावर किंवा चंद्र, मंगळ, गुरु व रविस्थानावर त्रिकोण, चतुष्कोण किंवा चक्र चिन्ह असेल आणि त्यांचा संबंध आयुष्यरेषेशीं किंवा अंतःकरणरेषेशीं येईल तर, हीं सर्व चिन्हें किंवा योग शुभ आणि वैभवी, प्रभावी व धनसंपन्न परिस्थितीचें आहेत असे निश्चितपणें समजावें.

कर्तरी मालिका XXXX अशा रेषा कोणत्याही ठिकाणीं असल्यास त्या अतिशय दारुण आणि दुष्ट फलें देतात.

कोणतेहि फल पाहतांना निसर्गसिद्धांत हे प्रथम लक्षांत घेतले पाहिजेत. निसर्गाला हटविण्याचे दीर्घ प्रयत्न पुष्कळ झाले पण मानवी प्रयत्न आणि बुद्धिमत्ता पूर्णपणें मागें हटली व निसर्गस्थिती आहे तीच कायम राहिली !

मानवी जीवनाचा पहिला बालपणीचा सुमारें १५–१६ वर्षांपर्यंतचा काल हा सर्वसामान्यतः अल्लडस्थितींत जावयाचा. १७ ते २० ह्या कालांत जिज्ञासा, आतुरता, जगांतील व्यावहारिक व इतर गोष्टींचें ज्ञान मिळविण्यास योग्य अशा प्रकारें मनाची व बुद्धीची तयारी आणि आपल्यावर कांहींना कांहीं तरी जबाबदारी आहे किंवा पडणार याबद्दलची सामान्य कल्पना अशा प्रकारचा असतो. वय वर्षे २१ ते ३५ हा काल म्हणजे मनुष्यप्राण्याचा तारुण्याचा पूर्वार्ध. ह्या कालांत क्रमाक्रमानें जबाबदारी, जगांतील व्यावहारिक व प्रापंचिक शहाणपण, विकारप्राधान्य ज्ञान, आपल्या बुद्धिमत्तेची व कर्तृत्वाची पूर्ण जाणीव अशा गोष्टींच्या परिणतावस्थेचा असतो. आणि ह्याच कालांत मनुष्याच्या बुद्धिमत्तेचें, विद्वत्तेचें, कर्तृत्वशक्तीचें आणि नांवलौकिकाचें तेज जनतेवर पडावयाचें तें पडत असतें किंवा ह्या कालांत अशा गोष्टींना सुरवात तरी होते. वय वर्षे ३६ ते ५० हा काल म्हणजे तारुण्याचा उत्तरार्ध, ह्या कालांत अनुभवसिद्ध अशी मनाची प्रगल्भता, सारासार विचार, योग्य आणि अयोग्य अशा गोष्टींची किंवा कार्याची निश्चितपणें निवड करण्याची स्थिरबुद्धी, विकारापेक्षां विचारप्रधान गोष्टी आणि जगांत आपला चांगला नांवलौकिक राहावा अशा उच्च हेतूंची जोपासना व त्याप्रमाणें प्रयत्न अशा गोष्टींचा असतो.

वयवर्षे ५१ ते ६५ हा वृद्धावस्थेचा पूर्वभाग आणि वयवर्षे ६६ ते ७५ किंवा त्यापुढें हा मनुष्याचा वृद्धापकालाचा उत्तरभाग होय.

ह्या वृद्धावस्थेच्या उत्तरार्धाचा प्रश्न फारसा महत्त्वाचा नाहीं. कारण वयाच्या ६५ वर्षांपुढें आपल्या कर्तबगारीनें कांहीं विशेष करूं शकतील किंवा केलें आहे अशा व्यक्ती हाताच्या बोटावर मोजण्याइतक्याच निघतील. पण अशाही कांहीं अपवादात्मक अलौकिक व्यक्ती आहेत हें खरें आहे. वृद्धावस्थेचा जो पूर्वार्ध वयवर्षे ५१ ते ६५ काल म्हणजे पूर्वायुष्यांत केलेल्या कार्याचा, उद्योगाचा, संचिताचा, प्रारब्धाचा आणि संबंध आयुष्यांतील सुख किंवा दुःख यांच्या उपभोगाचा काल होय ! संबंध आयु-

ध्यांत न झालेली भरभराट किंवा सांपत्तिक उच्चस्थिती आणि स्वास्थ्य अशी सुंदर परिस्थिती ह्या वृद्धावस्थेमध्यें अनेकांना उपभोगावयास सांपडतें.तशीच याच्या उलटही पुष्कळ उदाहरणें आहेत.

कै० लोकमान्य टिळक यांचें संबंध आयुष्य हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या चळवळीकरितां हालअपेष्टा व दुःसह यातना भोगण्यांत गेलें ही गोष्ट सर्वथैव सत्य असली तरी त्यांच्या आयुष्याचा एकंदरीनें विचार केला असतां, वयाच्या ५८ व्या वर्षी ते तुरुंगांतून सुटून आल्यानंतरचीं सुमारें ५।६ वर्षे तींच काय तीं त्यांच्या संबंध आयुष्यांत त्यांतल्यात्यांत उत्कृष्ट अशी गेलीं, पण त्यांना जास्त आयुष्य न लाभतां ६५ वें वर्ष सुरु होतें न होतें तोंच त्यांच्यावर निर्घृण काळानें झडप घातली!

वयवर्षे ६५ च्या पुढें आणि सुमारें ८० वर्षांपर्यंत हयात असलेल्या व्यक्ती पारशी समाजांत बऱ्याच आढळतात.बंगालमध्यें,मध्यहिंदुस्थानांत,मद्रासेंत, मुंबईला, गुजराथेंत अशा कांहीं प्रमुख व्यक्ती दीर्घायुषी आढळतात पण महाराष्ट्रामध्यें राजकार्यधुरंधर असे राष्ट्रपुरुष अल्पायु किंवा मध्यमायूच्या पुढे फारसे जगलेले नाहींत असेच आतापर्यंत दिसून आलें आहे. पण सध्या जे हयात आहेत त्यांना परमेश्वरानें दीर्घायुषी करावें अशीच कोणीहि प्रार्थना करील.

निसर्गसिद्धांताचा ठोकताळा किंवा प्रचिती ही अशा प्रकारें पहावयास सांपडते कीं, वृद्धावस्थेंत पोंचलेला मनुष्य तरुण किंवा बाल होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें बाल किंवा तरुण असलेल्या व्यक्तीस वृद्धव्यक्तींचा जगांतील अनेक प्रकारचा अनुभव असूं शकत नाहीं. तात्पर्य बाल, कुमार, तारुण्य, माध्यम, वृद्ध आणि अतिवृद्ध अशा ज्या अवस्था आहेत, त्या प्रत्येकांतला निसर्गसिद्ध अनुभव, ज्ञान आणि वस्तुस्थिती ही त्या त्या अवस्थेंत गेल्याखेरीज कळणें शक्य नाहीं व कळत नाहीं. एखाद्या ५-७ वर्षांच्या बालकास ज्याप्रमाणें शृंगाररसाचे व कामचेष्टांचें कितीही ज्ञान पाजलें तरी त्यांत त्याला यत्किंचितही कळणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्येक अवस्थेंतील प्रत्यक्षज्ञान हें त्या अवस्थेंतून गेल्याशिवाय समजणें शक्य नाहीं..

ह्या बाबतींत इतका विस्तार करण्याचें कारण असें कीं, हस्तरेषांवरून फलें पाहतांना ह्या निसर्गसिद्ध अवस्थांचें आणि त्या त्या अवस्थाकालांतील प्रत्यक्ष वस्तुस्थितीदर्शक गोष्टींचें स्वरूप लक्षांत ठेवून फलनिर्णय करावा. याबद्दलचें उदाहरणच द्यावयाचें झाल्यास असें देतां येईल कीं, हातावरून विद्यारेषा ही फार प्रबल आहे

आणि ती अगदीं बालपणांतच आपला योग दर्शवित आहे. पण बालपणांत, विद्येत महत्वाचे श्रेठत्व, सार्वजनिक व जाहीर रीतीनें मिळणें शक्य नसतें. कारण त्या वेळ त्या व्यक्तीस फार महत्वाचा दर्जा प्राप्त होईल अशी कोणतीही परीक्षा नसते. म्हणून विद्यायोग हा जरी फार प्रबल असला तरी तो अकालीं आणि निसर्गस्थितीच्या विरुद्ध आल्यानें त्याचें फल म्हणजे त्या व्यक्तीची बुद्धिमत्ता फार उत्कृष्ट असणें येवढेंच त्या कालांत दिसू शकेल. व इतकेंच त्यावेळीं अनुभवास येईल.

पण असाच श्रेष्ठ योग वयाच्या १८ वर्षांच्या पुढें व ३२ वर्षांच्या आंत स्पष्ट दिसत असल्यास निसर्गनियमाप्रमाणे वयवर्षे १६ ते ३२ पर्यंतचा काल म्हणजे विद्यायोगाचा काल असल्ययामुळें ह्या कालांत त्या योगाचे फल विद्येमध्यें, परीक्षेमध्यें उत्तमोत्तम यश येणें, त्यांत वरचा दर्जा प्राप्त होणें, सन्मान होणें, आणि कायमचें नांव व कीर्ति राहील असें यश मिळणें हें होईल. म्हणून निसर्गस्थिती प्रथम पाहिली पाहिजे. सर्वसाधारणतः हजारांत ९९९॥ टक्के निसर्गनियमांचेंच सर्वस्वीं प्राधान्य आहे पण निसर्गनियमाना धुडकावून लावून चमत्कार वाटण्यासारख्या अशाही कांहीं गोष्टी, कांहीं अपवाद, आश्चर्यकारक रीतीनें झालेले दृष्टोत्पत्तीस येतात. पण तो नियम नसून अपवाद होय. आणि असे अपवाद प्रत्येक गोष्टीला असतात म्हणूनच नियमाचें प्राधान्य व प्रामुख्य सिद्ध होतें.

निसर्गजन्य अशा प्रकारची " बालः कुमारोऽथयुवाचमध्यः वृद्धातिवृद्धो क्रमश स्तथैव "। अशी सहाप्रकारची जी निरनिराळी स्थिति त्या प्रत्येक स्थितींत दुसऱ्या कोणत्याही स्थितीचें कार्य करतां येत नाहीं, होऊं शकत नाहीं. अतिवृद्धस्थितींत आत्यंतिक श्रमाची, तारुण्यांत फिकीर न वाटणारीं कार्यें करणें जसें अशक्य, इतकेंच नव्हे तर इच्छा असून किंवा साधनें असूनही पुष्कळ गोष्टी केवळ वृद्धावस्थेमुळें अशक्य, तद्वत कित्येक अनुभवसिद्ध व केवळ स्वानुभवानेंच उतारवयांत कळणाऱ्या गोष्टी बालपणीं किंवा तारुण्यांत उमजणें कठीण. विद्याभ्यासाची व धारणाशक्तीची-पाठशक्तीची बौद्धिक कार्यें ज्याप्रमाणें पूर्णपणानें पूर्ववयांतच साध्य, उत्तरवयांत अशक्य! अविचारी अनाचारी व अत्याचारी तामसीपणाचीं कार्यें ज्याप्रमाणें तारुण्य कालांत होण्यास निसर्ग स्थितीचें साहाय्य त्याचप्रमाणें आयुष्याच्या प्रत्येक ठराविक विभागांत निसर्गजन्य व स्वंयंपूर्ण अशा गोष्टी निश्चित ठरलेल्या आहेत. त्या कोणत्याही व्यक्तीस बद-

ळतां येत नाहींत. म्हणून कोणताही विचार करतांना निसर्गजन्य परिस्थिती काय आहे हें ध्यानांत घेतलेंच पाहिजे.

( १ ) ज्याच्या हातावर सूर्यरेषेचे आणि आयुष्यरेषेचे योग बलवान् असतील त्यांस शरीरसौख्य, आरोग्य, दीर्घायुष्य, मनःस्वास्थ्य इत्यादि सर्व गोष्टी अनुकूल असतात. ह्या रेषांना आणि अंतःकरणरेषेस ज्यावेळीं प्रतिकूल योग असतात त्यावेळीं आजार, संकटे आणि नुकसानीच्या गोष्टी होतात.

( २ ) **व्यवसायापासून नित्य आणि नैमित्तिक द्रव्यलाभ उपजीविकेचें साधन, संपत्तिसंचय, सांपत्तिकस्थिति व द्रव्याचे व्यवहार** ( मग ते उत्तम नोकरीपासून असो किंवा स्वतंत्र धंद्यापासून असो ) ह्या सर्व गोष्टी आणि अशाच प्रकारच्या इतर गोष्टी यांचा निर्णय धनरेषा, आयुष्यरेषा, धनकारक रेषा, राजयोगरेषा, सूर्यरेषा आणि गुरु, शुक्र, रवी व चंद्र स्थाने ह्या सर्वांवरून करावयाचा असतो. त्याचप्रमाणें **अकस्मात लाभाचे योग, कल्पनेबाहेर द्रव्यलाभ आणि कल्पना नसतांना मोठ्या प्रमाणावर धनलाभ, स्थावर इस्टेट, जमीन जुमला, घर, बंगले, कारखाने, नोकरचाकर, वाहनें,** गिरण्या इत्यादि सर्व गोष्टींचा विचार वरील स्थानावरून व रेषेवरून आणि त्या त्या स्थानाशीं व रेषांशीं होणाऱ्या इतर उच्च रेषांच्या संयोगावरून करावयाचा असतो. या संबंधीं पूर्वीं विस्तृत विवेचन केलेलें आहेच.

( ३ ) **अधिकारयोग, विनामूल्य किंवा विनावेतन ( ऑनररी ) सन्मानाधिकार, ट्रस्टी, पंच, लवाद, पुढारीपण** इत्यादि सर्व गोष्टींचा विचार रवी, गुरु आणि भाग्यरेषा ह्यावरून करावा लागतो. भाग्यरेषा—दैवरेषा फार प्रबल असेल तर ह्या गोष्टींची भरपूर अनुकूलता असते.

मोठमोठ्या अधिकारी व्यक्तींच्या हातांवर रवि, भौम आणि गुरु यांच्या रेषा फार विलक्षण परिणाम करणाऱ्या असतात. अपघात शत्रु, **संकटें, नुकसान, अपमान, मनोभंग, दुःखदायक प्रसंग, फौजदारी खटले, कैदेचे योग, अंतःकरणदुर्भंग करणाऱ्या अशा सर्व गोष्टींचा निर्णय,** हाताची एकंदर ठेवण, **त्यावरील महत्त्वाच्या ४ रेषांवर होणारे मारक रेषांचे आघात, फलनाश करणाऱ्या रेषांचें प्राबल्य,** शनी आणि मंगळावरील चिन्हांचे व रेषांचे आयुष्यरेषेवर, गुरुवर आणि रवीवर होणारे अनिष्ट परिणाम आणि भाग्यरेषा व सूर्य रेषांचें निर्बलत्व या सर्व योगावरून करावा लागतो. हे योग तात्कालिक, विशिष्ट काळपर्यंत,

किंवा दीर्घकाळ अगर कायमच्या स्वरूपाचे आहेत हें वरील सर्व इष्टानिष्ट विचार करून नंतर ठरवावे लागतें.

**विवाह, स्त्रीसौख्य, संतती, कायमचे मित्र, मित्राचे शत्रु किंवा शत्रूचे मित्रः**—स्त्रीला पती आणि पुरुषाला पत्नी हे प्रपंचकार्यांत आजन्म सहभागी आहेत. पण प्रथमतः आपापल्या धर्मबंधनांनीं, विवाह संस्कारानें एकजीव झालेले असे एकरूप आहेत. त्यांच्यांत भिन्नत्व नाहीं असें शास्त्रप्रमाण आहे. ह्या दोन भागिदारांपैकीं एखादा भागीदार जर योग्य प्रकारचा नसला किंवा दोन्ही भागिदारांचें एकमेकांशीं पटत नसलें, मतभेद, मतवैचित्र्य अगर विरोध असला तर प्रपंचाचा गाडा अडूनच पडणार. स्त्री आणि पुरुष एकमेकांस योग्य व संपूर्ण सहाय्यक अशीं मिळणं ही खरोखर केवळ नशिबाची व दैवाची गोष्ट होय ? पुरुषाच्या हातांवर आयुष्यरेषेच्या जवळ शुक्राच्या उंचवट्यावर किंवा अंतःकरणरेषेजवळ साधारणतः समान रेषा असते त्या रेषेस **स्त्रीरेषा** असें म्हणतात. स्त्रीच्या हातावरील अशा रेषेस "**पुरुषरेषा**" म्हणतात. ह्या रेषा बिनकसर, मारकरेषा आणि छेदकरेषा यांपासून निवृत्त आणि स्वयंपूर्ण अशा असल्या म्हणजे त्या स्त्रीपुरुषास प्रापंचिक सौख्य, व संततिसौख्य चांगलें मिळतें. त्यांचा विवाह लवकर होतो, स्त्रीचा स्वभाव चांगला, व्यवहारदक्ष आणि सद्‌गुणी असतो. आयुष्यरेषा आणि पुरुष अगर स्त्री रेषा यांचा उत्कृष्ट प्रकारचा संयोग होत असेल तर अशा दंपत्यास प्रथमतः पुत्र-संतति होते, पण त्या रेषेशीं शुक्राचा निकट संबंध जमत असेल तर प्रथम कन्या संतति जाणावी. **कायमचा मित्रपरिवार**—आयुष्य, अंतःकरण व शीर्षरेषा यांच्याशीं ज्या ग्रहांच्या उंचवट्यावरून रेषासंयोग होत असेल त्याप्रमाणें जाणावा. गुरूच्या उंचवट्याखालीं किंवा रवीच्या उंचवट्याखालीं असणारी रेषा ही **मित्ररेषा** समजावी. मित्ररेषा खंडित, अस्पष्ट, वक्र व अर्धवट असल्यास मित्रांचें साह्य बेताचेंच असतें. उलट याजकडूनच मित्रवर्गास मदत व साह्य केलें जातें. **भयंकर रोग, मधुमेह, ॲनिमिया, क्षय, अपस्मार, मूळव्याध, रक्तदाब, शारिरीक व्यंग, वेड लागणें, दृष्टीदोष, बहिरेपणा, मूकत्व, पंगू, अर्धांग गेलेला, अपघातानें व्यंगः**—अंतःकरण आणि मस्तकरेषा अगदीं अस्पष्ट किंवा अतीशय जाड आणि त्यावर मारक रेषा, **काळा तीळ** एक किंवा अनेक काळे तीळ, रेषांचे मधोमध × चिन्ह, अधोगामी जाड रेषा आणि त्या मुख्य रेषेला कापून बाहेर आलेल्या रेषांना खळगे, गुरू व रवीचा उंचवटा बिघडलेला, हीं सर्व लक्षणें त्या व्यक्तीस कांहींना कांहीं तरी

कायमचा आजार, रोग, व्याधी, गौणत्व आणि व्यंग असल्याचें स्पष्ट दर्शवितात. ह्या रेषांना ज्या रेषा येऊन मिळत असतील त्यांच्या लक्षणांवरून रोग भोग किती काल हें काढावें. यांपैकीं फक्त एकाच रेषेचा वर दिल्याप्रमाणें बिघाड झाला असेल आणि बाकीच्या रेषा, चिन्हें व लक्षणें चांगलीं असतील तर तो विकार, आजार किंवा व्यथा थोडा कालपर्यंत भोगावयास लागणारी आहे असें समजावें. अंतःकरण रेषा आणि शीर्षरेषा ह्या दोन्ही रेषा फार बिघडलेल्या असतील आणि कोणतेंही तारक चिन्ह नसेल तर तो आजार व विकार बराच कालपर्यंत टिकणारा व त्रास देणारा आहे असें समजावें.

अंतःकरणरेषा व शीर्षरेषा या दोन्ही रेषांवरून आजाराबाबत निघणारीं फलेंही अनुक्रमें अल्पकालीन व स्थिरकालीन असतात. पण ह्या दोन्ही रेषांबरोबर आयुष्य रेषा आणि दैवरेषा ह्या दोन रेषा जर तशाच बिघडलेल्या असतील, त्यांच्यावर खळगे किंवा काळ्या तिळाचें चिन्ह असेल, मारकरेषा असतील, कापणाऱ्या रेषा, अधोरेषा असतील तर तो योग कायमच्या स्वरूपाचा रोग किंवा आजार उत्पन्न करणारा असतो.

शारीरिक व्यंग ज्या व्यक्तीस असतें अशांच्या हातांवर आरोग्यरेषा आणि आयुष्यरेषेचा मूळभाग फार बिघडलेला असतो. त्या ठिकाणीं × किंवा ∧ ∧ ∧ अशा चिन्हांनीं किंवा चिताडलेल्या रेषांनीं त्या रेषेचा भंग होतो. तसाच अंतःकरण रेषेचाही बिघाड झालेला असतो. अशा योगामुळें मेंदूचे विकार, वेड लागणें, दृष्टी-दोष, कर्णदोष, अर्धांग किंवा कोणत्याही इंद्रियास बधिरत्व व शक्तीहीनता येते. ह्या योगांत शनीच्या उंचवट्यावरही अनिष्ट चिन्हें असतात. मधुमेह, मूळव्याध, रक्त-दाब किंवा रक्तदोष, ॲनिमिया हे विकार उत्पन्न होण्यास आरोग्यरेषा, बिघडलेली, कापली गेलेली, मस्तकरेषेवर × असे चिन्ह, मंगळाच्या उंचवट्यावरील रेषांनीं आरोग्यरेषेचा भंग झालेला आणि आयुष्यरेषा तुटक, कमजोर, दुभंगलेली, अनेक रेषांच्या जाळ्यांत सांपडलेली अशी असते. त्यांत आणखी चंद्रावरील रेषा सामील झाल्यास विशष पीडा होते.

**क्षय, अपस्मार, हार्टफेल्युअर, हाडीज्वर, अस्थीक्षय, मेंदुक्षय, अशा प्रकारचे दुर्धट व दुर्धर आजार** अंतःकरणरेषा, रवीचा उंचवटा, आरोग्यरेषा **आणि** आयुष्यरेषा **इतक्यांचा बिघाड झाला असेल तर होतात. शनीवरून मंगळावर रेषा**

येत असून ती कापलेली असेल, चंद्रावरून शनीवर कर्तरींत सांपडलेली जोड रेषा जात असेल, हातांच्या मध्यभागीं काळा तीळ असेल आणि आयुष्यरेषा ३ ठिकाणीं तुटक किंवा मारक रेषांनीं बिघडलेली असेल, आरोग्यरेषेवर जाळीसारखें चिन्ह असेल तर अशा सर्व योगावर वर दिलेले रोग होतात.

गुप्त रोग, मूत्राशयाचे किंवा जननेंद्रियाचे विकार हे ज्यावेळीं हातावरील आरोग्य रेषा तुटक व फार बारीक असते, शुक्राच्या उंचवट्यावरील रेषा आयुष्यरेषेला छेदून मंगळाच्या रेषेवर जाते, त्या रेषेला कर्तरीरेषा असतात, शुक्रावर किंवा मंगळावर × फुली किंवा काळा तीळ असें चिन्ह असतें, मंगळावरून तुटक तुटक व तंतुमयरेषा किंवा रेषांची साखळी शनीच्या उंचवट्यापलीकडे जाते अगर शुक्राचा उंचवटा तंतुमय रेषांनीं अतिव्याप्त होऊन त्यावर मंगळ अगर शनिरेषा येते, अशा योगामुळे वर दिलेले विकार होतात.

विकार, आजार आणि रोग उत्पन्न करणारे जे योग वर दिले आहेत त्याचें प्रतिकूल फल खालीं दिलेले योग असतां कमी होतें किंवा नष्ट होतें आणि जरी विकार उत्पन्न झाले तरी कालांतरानें ते नष्ट होऊन आरोग्य लाभतें.

**ऊर्ध्वगामी मत्स्यचिन्ह, समान चतुष्कोण किंवा दीर्घ चतुष्कोण, त्रिकोण, शंख, चक्र, वर्तुळ, शुक्ति** ( शिंप ) **ध्वज, सूर्य, चंद्र,** ह्या चिन्हा-पैकीं कोणतेंही चिन्ह जर हातावर असेल तर त्याचप्रमाणें रोगकारक योग किंवा रेषा त्यापेक्षां सूर्यरेषा, आयुष्यरेषा आणि मस्तकरेषा स्वतंत्र, जोमदार आणि सूर्य व गुरूचे उंचवटे प्रबल शुभफल देणारे असतील तर रोग किंवा विकार उत्पन्न झाले तरी त्यांचा नाश होतो.

**दत्तकयोग परदेशगमन,** आणि **अकस्मात् उच्चास्थितिः—**ह्या तीन योगां-पैकीं परदेशगमन योग जन्मकाळीं हातावर चंद्रावरून निघणाऱ्या रेषा आणि शुक्रा वरून मंगळ, बुध, रवीवर जाणाऱ्या रेषा यांवर बराच अवलंबून आहे. आयुष्यरेषा आणि सूर्यरेषा यांचा किंवा त्या रेषाना जोडणाऱ्या जोड रेषांचा संबंध आयुष्य रेषेशीं व भाग्य रेषेशीं येत असेल तर परदेशगमनाचा योग येतो. मात्र ह्या रेषांवर मारकरेषा असतील तर योग भंग होतो. जाणें स्थगित होतें, अडथळे येतात. पण चंद्र, मंगळ रेषा, खणखणीत असेल तर विद्यार्जनाकरितां समुद्र प्रवास, परदेशवास आणि परदेशगमन होतें. परदेशांत यश येण्यास सूर्यरेषा आणि दैवरेषा यांचा एकमे-

कांशीं योग चांगला लागतोच, पण त्याच्याचबरोबर आयुष्यरेषेचा योगही त्या दोन रेषांना साहाय्यक पाहिजे, गुरूचें फल शुभ पाहिजे. ह्यांपैकीं कोणतीही रेषा गुरूवर गेलेली असेल तर विद्यायोगांत हटकून यश मिळतें. ह्या तीन रेषांचा त्रिकोण होईल तरीही विद्येंत यश मिळतें. सूर्यरेषा प्रभावी असल्यास यश ताबडतोब मिळते. विद्यायोगांत यश म्हणजे इतर सर्व कामांत यश असें नव्हे; त्रिकोण असतांही परदेशांत इतर कार्यांत अपयश येतें.

अकस्मात् ( अकल्पित ) सांपत्तिकदृष्ट्या किंवा इतर सन्मानदृष्ट्या एकदम उच्च स्थिती प्राप्त होणें आणि दत्तकयोग येऊन मोठी संपत्ती मिळणें ह्या दोन्ही गोष्टी एकाच स्थितीच्या निदर्शक आहेत. कल्पना नाहीं इतका मोठा लाभ व्यवसायांत होणें, अगर नोकरींत इतका उच्च अधिकार व दर्जा प्राप्त होणें कीं, ज्याची कल्पना आधीं स्वप्नांतसुद्धां होणार नाहीं. इतक्या अशक्य स्वरूपाच्या गोष्टी घडून येणें, हे सर्व प्रकार दैवाधीन संचिताचे. प्रारब्धानें आपोआप घडून येणाऱ्या गोष्टींचे आहेत. ह्यांपैकीं एकही प्रकार प्रयत्नानें साध्य होत नाहीं, होणें शक्य नाहीं.

धनरेषा—दैवरेषा फार बलवान, स्पष्ट. इतर कोणत्याही रेषांनीं न बिघडलेली. आयुष्यरेषा स्वतंत्र, सूर्यरेषा, त्रिकोण. चिन्ह किंवा चक्र चिन्हांकित, चंद्ररेषा समूळ गुरूवर गेलेली, सूर्यस्थानावर दोन किंवा एक उभी रेषा आणि तीधनरेषेला मिळणारी. धनरेषेवर किंवा चंद्रावर मत्स्याकार, त्रिकोण, चक्राकाररेषा आणि दोन शुक्ररेषा फक्त आयुष्यरेषेला मिळालेल्या, धनरेषा मणिबंध संबंधित, असे योग असतां अचानक सांपत्तिक स्थित्यंतर करणारे योग घडतात. उच्चस्थिती प्राप्त होते, आणि त्यायोगानें सर्व प्रकारचें वैभव व श्रेष्ठदर्जा मिळतो.

सामुद्रिकाचे ग्रंथ अनेक ! त्यांत कशांत कांहीं कशांत कांहीं अशातऱ्हेचें कांहीं कांहीं महत्त्वाचे भाग आढळतात. अशा सर्व महत्त्वाच्या सूक्ष्म तत्त्वांचें आलोडन करून ह्या ग्रंथांत त्याचा समावेश केला आहे. म्हणून जे कोणी ह्या ग्रंथांचें मनन पूर्वक अध्ययन व अभ्यास करतील त्यांना इतर कोणत्याही ग्रंथाकडे पाहण्याचें कारण राहणार नाहीं.

इतर कोणत्याच ग्रंथांत नसलेली माहिती म्हणजे संपत्ति किती मिळेल याचें विवेचन हस्तसंजीवनी अर्थात् सामुद्रिक तिलक ग्रंथांत स्पष्टपणें केलेलें मूळ वचनासह

पूर्वी दिलें आहे. तशीच एका ग्रंथांत खालील वचनें दिग्दर्शित केलेलीं सांपडलीं तीं जशींच्या तशीं देतों.

बुद्धिमंतश्चधीमंतः श्रीयुक्तः सर्वथा भवेत् ।
बृहत् शीर्षश्च भव्यश्च सनरः सुखमेधते ॥ १ ॥
दीर्घबाहुस्तथा जानुर्वक्षस्थल यथोचितं ।
आदीर्घ चक्षुयुग्मंच भवेतां राजपूजितः ॥ २ ॥
युग्माग्रांतर दीर्घंच स्तनं भाग्य प्रदायकम् ।
पुरुषाणांच नारीणां सम्यक् फलमुदीरयेत् ॥ ३ ॥
यवचिन्हं शुभंश्रेष्ठं सपत् संतानदायकम् ।
तथैव छत्र चक्रंच मीनंच फलवृद्धिदम् ॥ ४ ॥
राजरेखा, भाग्यरेखा आयूरेषाच पुष्टदा ।
हस्तमध्येच या श्रेष्टा तथैव तलपादयोः ॥ ५ ॥
रेखात्रयं समायुक्तं त्रिकोणं चक्रसंयुतं ।
यद्योगः सचसर्वज्ञो राजाभवति निश्चितम् ॥ ६ ॥
ग्रहमंडल, व्यूहंच कक्षाच ग्रहवास्तवः ।
रश्म्यादि विविधान् संज्ञान् ग्रहस्थानान् विनिर्दिशेत् ॥ ७ ॥
सूर्यमंडल चक्रंवा त्रिकोणं सुप्रतिष्ठितम् ॥
भाग्यरेषा शीर्षरेषा प्रबला उत्तमोत्तमा ॥ ८ ॥
आयूरेषा विशेषेण दैव संबंधिन स्तथा ॥
राजरेषा सुसंबद्धा राजयोगकरः सदा ॥ ९ ॥

याप्रमाणें आणखी किती तरी वचनें आहेत. पण त्यांचें सर्व रहस्य त्या ग्रंथांत योग्य प्रकारें आलें असल्यानें स्वतंत्र विस्ताराचें प्रयोजन नाहीं.

हस्तरेषा, ( मुखलक्षणें ) चेहरा आणि जन्मकुंडली असें हे त्रिप्रवरीशास्त्र आहे ही गोष्ट पूर्वी स्पष्टपणें सांगितली आहे. ह्या शास्त्राचा अभ्यास करणारांनीं ह्या तिन्ही प्रकारांचा संग्रह आणि मनन करणें हे अतिशय सहाय्यक होणारें आहे. म्हणून कांहीं थोर व्यक्तींचे फोटो आणि जन्मकुंडल्या देत असून लो. टिळकांच्या दोन्ही हाताचे ठसेकही दिले आहेत.

## सद्गुरु अण्णासाहेब पटवर्धन



शके १७६९ वैशाख कृ. ४ भौमे सू. ग.

घ. ७ प. १५ (ग्र. ला.)

ता. ४ मे १८४७

### जन्मकालीन ग्रहस्थिती

जन्मलग्न-मिथुन. जन्मराशी-धनु.

चतुर्थस्थानीं कन्याराशींत राहु.

सप्तमस्थानीं धनुराशींत चंद्र.

नवमस्थानीं कुंभराशींत शनि, मंगळ, नेपच्यून.

दशमस्थानीं मीनराशींत बुध, केतु.

एकादशस्थानीं मेषराशींत रवि, हर्शल.

द्वादशस्थानीं वृषभराशींत गुरु, शुक्र.

## लोकमान्य बाळ गंगाधर टिळक



१७७८ आषाढ कृ. ६ बुधे सूर्यो.

घटी २ पळें ५ (ग्र. ला.)

ता. २३ जुलै १८५६.

### जन्मकालीन ग्रहस्थिती

जन्मलग्न-कर्क. जन्मराशी-मीन.

प्रथमस्थानीं कर्कराशींत रवि, शुक्र.

तृतीयस्थानीं कन्याराशींत केतु.

चतुर्थस्थानीं तूळराशींत मंगळ.

नवमस्थानीं मीनराशींत गुरु, चंद्र, राहु, नेपचून.

एकादशस्थानीं वृषभराशींत हर्शल.

द्वादशस्थानीं मिथुनराशींत शनि, बुध.

## महात्मा मो. क. गांधी



१७९१ भाद्रपद कृ. १२ शनौ सूर्यो.
घ. ३ प. १२, (ग्र. ला.)
ता. २ आक्टो. १८६९.

### जन्मकालीन ग्रहस्थिती

**जन्मलग्न–तूळ. जन्मराशी–कर्क.**

प्रथमस्थानीं तूळराशींत बुध, शुक्र, मंगळ.
द्वितीयस्थानीं वृश्चिकराशींत शनि.
चतुर्थस्थानीं मकरराशींत केतु.
सप्तमस्थानीं मेषराशींत नेपच्यून, गुरु.
दशमस्थानीं कर्कराशींत चंद्र, राहु, हर्शल.
द्वादशस्थानीं कन्याराशींत रवि.

## बॅ. वि. दा. सावरकर



शके १८०५ वैशाख कृ. ६ सोमवार जन्म ता.
२८ मे १८८३ रात्रौ ९ वा. २१ मि.
(ग्र. ला.)

### जन्मकालीन ग्रहस्थिती

**जन्मलग्न–धनु. जन्मराशी–कुंभ.**

तृतीयस्थानीं कुंभराशींत चंद्र
पंचमस्थानीं मेषराशींत शुक्र, मंगळ, केतु.
षष्ठस्थानीं वृषभराशींत रवि, शनि, नेपच्यून.
सप्तमस्थानीं मिथुनराशींत गुरु, बुध.
दशमस्थानीं कन्याराशींत हर्शल.
एकादशस्थानीं तूळराशींत राहु.

**बॅ. पंडित जवाहरलाल नेहरू** **प्रि. गोविंद सदाशिव आपटे,**
**एम्. ए., बी. एस्सी.**



शके १८११ कार्तिक कृ. ६ गुरुवार (प्र. ला.)
ता. १४ ११ १८८९.

**जन्मकालीन ग्रहस्थिती**

जन्मलग्न–सिंह. जन्मराशी–कर्क.
प्रथमस्थानीं सिंहराशींत शनि.
द्वितीयस्थानीं कन्याराशींत मंगळ.
तृतीयस्थानीं तूळराशींत रवि, हर्शल, बुध, शुक्र.
पंचमस्थानीं धनुराशींत गुरु, केतु.
दशमस्थानीं वृषभराशींत नेपच्यून.
एकादशस्थानीं मिथुनराशींत राहु.
द्वादशस्थानीं कर्कराशींत चंद्र.



शके १७९२ आषाढ कृ. १३-१४ मंगळवार
ता. २६ जुलै १८७०.

**जन्मकालीन ग्रहस्थिती**

जन्मलग्न–कन्या. जन्मराशी–मिथुन.
चतुर्थस्थानीं धनुराशींत शनि, केतु.
नवमस्थानीं वृषभराशींत गुरु.
दशमस्थानीं मिथुनराशींत, चंद्र, मंगळ, शुक्र.
राहु. (अष्टमांत मेष व नेपच्यून).
एकादशस्थानीं कर्कराशींत रवि, बुध, हर्शल.

## श्री. नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए. एल्. एल्. बी.



शके १७९४ श्रावण कृ. ६ शनो सू. ग.
घ. ५.५-० नं. (प्र. ला.)
ता. २४ आगस्ट १८७२.

**जन्मकालीन ग्रहस्थिती**

**जन्मलग्न—कर्क. जन्मराशी—वृषभ.**

प्रथमस्थानीं कर्कराशींत गुरु, मंगळ, हर्षल.
द्वितीयस्थानीं सिंहराशींत रवि, बुध, शुक्र.
तृतीयस्थानीं कन्याराशींत मंगळ.
पंचमस्थानीं वृश्चिकराशींत केतु.
षष्ठस्थानीं धनुराशींत शनि.
दशमस्थानीं मेषराशींत नेपच्यून, चंद्र.
एकादशस्थानीं वृषभराशींत राहु.

## जनार्दन सखाराम करंदीकर बी. ए. एल्. एल्. बी.



शके १७९६ माघ शु. १० सूर्योदयापूर्वी
पहाटे ४ वाजतां (प्र. ला.)
ता. १५ फेब्रुवारी १८७५.

**जन्मलग्न—धनु. जन्मराशी वृषभ.**

प्रथमस्थानीं धनुराशींत शुक्र.
द्वितीयस्थानीं मकरराशींत शनि.
तृतीयस्थानीं कुंभराशींत रवि, बुध.
चतुर्थस्थानीं मीनराशींत राहु.
पंचमस्थानीं मेषराशींत नेपच्यून.
षष्ठस्थानीं वृषभराशींत चंद्र.
अष्टमस्थानीं कर्कराशींत हर्षल.
एकादशस्थानीं तुळराशींत गुरु.
द्वादशस्थानीं वृश्चिकराशींत मंगळ.

## प्रो. वि. ब. नाईक, एम्. ए.



शके १८०१ माघ कृ. २ भृगौ

सू. घ. ६ प. १५ ( ग्र. ला. )

ता. २७ फेब्रुवारी १८८०.

**जन्मलग्न–मेष. जन्मराशी–सिंह.**

प्रथमस्थानीं मेषराशींत नेपच्यून.

द्वितीयस्थानीं वृषभराशींत मंगळ.

तृतीयस्थानीं मिथुनराशींत केतु.

पंचमस्थानीं सिंहराशींत चंद्र व हर्शल.

नवमस्थानीं धनुराशींत राहु.

दशमस्थानीं मकरराशींत शुक्र.

एकादशस्थानीं कुंभराशींत रवि, बुध, गुरु.

द्वादशस्थानीं मीनराशींत शनि.

## रा. सा. विनायक त्र्यंबक आगाशे, एम्. ए. एल्. सी. ई.



शके १७८८ आश्विन कृ. ५ रवौ

रात्रौ १२.१ ( ग्रहलाघव )

ता. २८–१०–१८६६.

**जन्मकालीन ग्रहस्थिती**

**जन्मलग्न–कर्क. जन्मराशी–मिथुन.**

प्रथमस्थानीं कर्कराशींत मंगळ.

तृतीयस्थानीं कन्याराशींत राहु.

चतुर्थस्थानीं तूळराशींत शनी व रवि.

पंचमस्थानीं वृश्चिकराशींत बुध, शुक्र.

सप्तमस्थानीं मकरराशींत गुरु.

नवमस्थानीं मीनराशींत नेपच्यून व केतु.

द्वादशस्थानीं मिथुनराशींत चंद्र व हर्शल.

## गणक चूडामणि
## पंडित शिवराम गणपत पवार



शके १७८८ वैशाख कृ. १२
शुक्रवार सायंकाळीं ( प्र. ला. )
ता. ११ मे १८६६.

**जन्मकालीन ग्रहस्थिती**

**जन्मलग्न-तूळ. जन्मराशी-मीन.**
प्रथमस्थानीं तूळराशींत शनि.
चतुर्थस्थानीं मकरराशींत गुरु.
षष्ठस्थानीं मीनराशींत चंद्र, मंगळ, केतु, नेपच्यून.
सप्तमस्थानीं मेषराशींत रवि, बुध.
अष्टमस्थानीं वृषभराशींत शुक्र.
नवमस्थानीं मिथुनराशींत हर्शल.
द्वादशस्थानीं कन्याराशींत राहु.

## ज्योतिषसुधाकर पंडित
## रामचंद्र पांडुरंगशास्त्री मोघे



शके १७९२ माघ शु. १५ रवौ सू.
घ. २ प. ३० ( प्र. ला. )
ता. ५ फेब्रु. १८७१

**जन्मकालीन ग्रहस्थिती**

**जन्मलग्न-कुंभ. जन्मराशी-कर्क.**
प्रथमस्थानीं कुंभराशींत शुक्र.
तृतीयस्थानीं मेषराशींत नेपच्यून.
चतुर्थस्थानीं वृषभराशींत गुरु.
पंचमस्थानीं मिथुनराशींत राहु.
षष्ठस्थानीं कर्कराशींत चंद्र व हर्शल.
अष्टमस्थानीं कन्याराशींत मंगळ.
एकादशस्थानीं धनुराशींत बुध, शनि, केतु.
द्वादशस्थानीं मकरराशींत रवि.

# लो० टिळकांच्या हस्तरेषांचें वर्णन

कै० लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्या दोन्ही हातांचे ब्लॉक ह्या पुस्तकांत दिले असून आतां त्यांच्या हातावरील रेषांवरून कोणकोणत्या महत्त्वाच्या गोष्टी कशाप्रकारें निर्णित होतात त्या पाहूं.

लो० टिळकांचे, दोन्ही हातांचे पंजे आणि हातांची ठेवण पाहिली असतां हात खणखणीत, भरीव, रुबाबदार, मांसल आणि घट्ट असे असून दोन्हीं हातांचीं बोटें व आंगठा देखील सरळ, ताठ, रेखीव आणि यथाप्रमाण अशीं आहत. दोन्ही हातांचा आकार योग्य प्रमाणांत असून हात भरदार आहे. आतां त्यांतील मुख्य योगांचें दिग्दर्शन करूं.

पहिली गोष्ट अशी कीं, लोकमान्य टिळकांच्या दोन्ही हातांवर आयुष्यरेषा अगदीं स्वतंत्रपणे निघालेली असून ती फक्त शीर्ष किंवा मस्तकरेषेशीं योग करते. इतर कोणत्याही रेषांशीं ह्या रेषेचा संबंध येत नाहीं. आयुष्यरेषेला तुटक्या किंवा अधोगामी अशा कोणत्याही रेषांचा संबंध येत नाहीं. आयुष्य रेषेला प्रारंभीं तंतुरेषा आहेत, त्यामुळें त्यांची बालपणांत प्रकृती चांगली नव्हती, परंतु वयाच्या १२।१३ वर्षापासून आयुष्याचे अखेरपर्यंत प्रकृति निरोगी, सुदृढ आणि सशक्त अशीच राहिली.

लोकमान्य टिळकांच्या हातावर आयुष्यरेषेच्या पलीकडे शुक्रमंडलावर चक्र चिन्ह आहे. त्याचप्रमाणें त्या मंडळाच्या मर्यादेंत ध्वजाचिन्ह. त्रिकोण आणि चतुष्कोण अशीं चिन्हें आहेत. हीं सर्व चिन्हें महापुरुष लक्षणांपैकीं आहेत.

लोकमान्यांच्या हातावर रेषा मोजक्या आणि स्पष्ट आहेत. अंतःकरण रेषा मूल-भागीं जरा १।२ अधोगामी रेषायुक्त असली, तरी ती सरळ गुरुमंडलावर गेलेली आहे. ह्या रेषेंतून सरळ सूर्य मंडळावर स्पष्ट रेषा जात आहे. ह्या दोन्ही रेषांचा संयोग झाल्यामुळें, सूर्यासारखी प्रखर तेजस्विता, कर्तृत्व आणि बुद्धिमत्ता व स्वयंसिद्ध जनतेचे नेतृत्व ह्या गोष्टी स्पष्ट झाल्या.

लो० टिळकांच्या हातावर शीर्षरेषा स्पष्ट आहे, पण त्या रेषेला आणि सूक्ष्म प्रमाणांत अंतःकरण रेषेला भौम सान्निधान रेषा छेद करीत असून ती छेदकारक रेषा मुख्य योगाला मारकयोग करते. लोकमान्यांच्या आयुष्यांत जी राजकीय भयंकर संकटें आली ती दर्शविणारी रेषा म्हणजे भौमसान्निधान रेषा ही होय.

लोकमान्यांच्या हातावर गिचमीड किंवा भरमसाट अतिरिक्त रेषा नाहींत हें शुभ चिन्ह होय. अशा रेषा असणें हें प्रतिकूलत्वाचे व अभागीपणाचे लक्षण शास्त्रानें मानलें आहे पण तसा कोणताच योग लो० टिळकांच्या हातावर नाहीं.

लोकमान्यांच्या हातावर दैवरेषा किंवा भाग्यरेषा ही अगदी स्पष्ट व स्वतंत्र आहे, ह्या रेषेच्या बाबतींत महत्त्वाची गोष्ट अशी कीं, भाग्यरेषेचा उगम दोन्ही हातांवर शुक्रमंडल मूलस्थानापासून झालीं आहे. हें लक्षण कांहींना कांहीतरी पूर्वार्जित स्थावरादी उत्पन्न असण्याचें जसें आहे, तसेंच उपजत प्रचंड बुद्धिमत्तेचें आणि स्वपराक्रमानें लाखों रुपयांची संपत्ति मिळविण्याचें व मिळण्याचें दर्शक आहे.

लोकमान्यांच्या दैवरेषेला आघात करणाऱ्या आणि आयुष्यक्रमाला निराळें वळण लावणाऱ्या ज्या रेषा आहेत, त्यांत दैवरेषा शीर्षरेषा, आणि अंतःकरणरेषा ह्या तिन्ही महत्त्वाच्या रेषांचा छेद करणारी जी चंद्रमंडलाच्छादित भौमसान्निधान रेषा तीच विशेष अनिष्ट होय. ह्या रेषेच्या भीषण परिणामामुळेंच लोकमान्यांना अनेकवेळां कारागृहवास भोगावा लागला. पण गुरु आणि रविमंडलावरील शुभ रेषा-चिन्हांमुळें आणि बुधमंडलांतून निघून सूर्यमंडलाखालीं अंतःकरणरेषेंत मिसळून गुरुमंडलावर जाणाऱ्या रेषेमुळें हालअपेष्टा आणि संकटें यांतच उत्कर्षाचें बीज अशा स्थितीं राहून अखिल हिंदी जनतेचें साह्य मिळलें.

लोकमान्यांच्या अंगुष्ठावर पूर्णयवचिन्ह, अंगुष्ठमूलाचे ठिकाणीं मत्स्याकाररेषा आणि हातावर महत्त्वाचे त्रिकोणयोग हे योग चांगले अर्थात राजैश्वर्यस्थितीचे द्योतक आहेत.

शुक्रमंडलावरील मुख्यरेषा आणि त्यांना मारक रेषांचे होणारे आघात-प्रत्याघात लक्षांत घेतां एक महत्त्वाचें वैशिष्ट्य त्यांत दिसून येतें तें हें कीं महत्त्वाच्या शुक्रोर्ध्व रेषा, आयुष्यरेषेसह शीर्षरेषेला पूर्णपणें जाऊन मिळाल्या आहेत. आणि याचाच परिणाम हा कीं भयंकर संकटें व हालअपेष्टा होऊनहि अखेर यश आणि उत्कर्ष व्हावयाचाच.

लो. टिळकांच्या दोन्ही हातांवरील रेषा पाहिल्या असतां त्यांच्या मस्तकरेषेला ऊर्फ ज्ञानरेषेला कापून जाणारी जी एक रेषा भाग्यधनरेषा समीपत्वानुरोधाने निघून मस्तकरेषेला कापून अंतःकरण रेषेच्या सन्निध विराम पावते. एका दृष्टीनें हा योग फार भयंकर संकटाचा व सबंध आयुष्यभर, मेंदूला, शरिराला आणि मनाला अती-

शय क्लेश व यातना देणारा आणि शारीरिक हालअपेष्टा करणारा असा होय. पण दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें असतां, ह्या रेषेमुळें धन, शीष व अंतःकरण या तीन रेषांचे जे मोठाले दोन त्रिकोण होतात, ते दोन्ही त्रिकोण उच्च वैभव व प्रचंड सामर्थ्य यांचें प्रतीक आहेत व त्याप्रमाणें घडलेंही. मस्तकरेषेला छेदणारी ही रेषा उत्पन्न होते तिचा आरंभ दैवरेषेच्या प्रमाणानुरूप पाहिले असतां ही रेषा उत्पन्न होते त्या ठिकाणीं साधारणतः वयाचे २५–२६ वें वर्ष येतें. आणि लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, लो. टिळकांच्यावर कोल्हापूर प्रकरणांत जो फौजदारी खटला झाला तो त्यांच्या वयाच्या २५–२६ व्या वर्षीच झाला! व १०१ दिवस कारागृहांत रहावें लागलें! त्यानंतर वय वर्षें ४१ आणि ५२ ह्या वर्षींही असेंच घडलें!

कित्येक लोकांच्या हातावरील रेषांचा प्रभाव असा असतो कीं, एकदां मारकरेषा–फलाचा प्रादुर्भाव झाला कीं, पुनः म्हणून शुभफल प्रवर्तन व्हावयाचेंच नाहीं. ती व्यक्ती कायमची नामशेष व्हावयाची! पण लो. टिळकांच्या हातांवरील रेषांचे योग फारच निराळे व विलक्षण! लो. टिळकांच्या हातावरील रेषांचा प्रभाव असा दांडगा व चमत्कृतिजन्य कीं, त्यांच्यावरील भयानक संकटें हाच त्यांचा ऐश्वर्याचा, भाग्याचा व यशस्वीपणाचा पाया!

इतकीं भयानक संकटें आणि हानि झाली तरीही लो. टिळकांचें कर्तृत्व, बुद्धिमत्ता, धडाडी, प्रभुत्व आणि जनतेचें नेतृत्व, ह्यापैकीं कोणत्याही गोष्टींत यत्किंचितही उणेपणा आला नाहीं. याचें कारण त्यांच्या हातावरील स्वतंत्र, स्पष्ट, रेखीव आणि इतर कोणत्याही प्रतिकूल [illegible] अनिष्ट फलाचा प्रतिबंध करणारी दैवरेषा व आयुष्यरेषा हेंच होय.

**लोकमान्य टिळकांच्या हातांवरील दैवरेषा व आयुष्यरेषा ह्यांच्या प्रबल उच्चयोगामुळें त्यांचा आयुष्यक्रम आणि मुख्यतः त्यांचें मुत्सद्दीपणाचें प्रभावी व आकर्षक राजकारण यशस्वी झालें. इतकेंच नव्हे तर सबंध हयातींत त्यांना कोणत्याही बाबतींत माघार घ्यावी लागली नाहीं.**

**— समाप्त —**